प्रस्तावना लेखक-
गुरुवर्य-वीरबसव शिवलिंगापा श्रेष्ठी
बी. ए. मास्तरसाहेब कोल्हापूर.



मुद्रक-
श्री. वासुदेव नारायण ठकार,
मालक ' श्रीसिद्धेश्वर प्रेस '
कोल्हापूरसिटि.



फोटोग्राफर-
मि० जी० व्ही० मिरजी आणि कंपनी.
फोटोग्राफर गोकाककर मु० निपाणी.

प्रकाशक-
के० एस्० छप्रे हेडमास्तर म्यु०
मराठी शाळा नं० २ यांनीं
राघवाचार्यगल्ली घर नं. २०१५
निपाणी येथें प्रसिद्ध केलें.



# अर्पण-पत्रिका



ज्याच्या केवळ कृपावलोकनानें, श्रीक्षेत्र यडुरांतील पुजेबद्दलच्या प्रख्यात खटल्यांत वीरशैव समाजाला न्याय मिळून सत्पक्षाचाच शेवटीं जय झाला; आणि ज्यानें तो विजयनिनाद या प्रथम लेखन-पुष्पद्वारें सर्वत्र पसरविण्याची स्फूर्ति माझ्या मनांत उत्पन्न केली, त्या जगन्नियन्त्या भगवान् श्रीवीरभद्रदेवाच्या चरणारविंदीं ही अल्प कृति अत्यादरानें अर्पण केली आहे.

श्रीवीरभद्रदेवाचा अनन्यभक्त,

'शिव-तनय.'

# अनुक्रमणिका



# चित्रांची सूचि





---

सूचनाः—यांत मुख्यतः पंचक्रोशींतलि देव-देवालयें व प्रख्यात खटल्यांत प्रामुख्यानें संबंध आलेल्यांचींच चित्रें दिलीं आहेत. त्यांतीलही कांहीं महत्वाच्या साक्षीदारांचे व साह्यकर्त्यांचे फोटो वेळेवर हातीं न आल्यानें व खर्चाच्या नडीमुळें देतां आले नाहींत. या पुस्तकाच्या लवकरच छापण्यांत येणाऱ्या कानडी आवृत्तींत हे व शिवाय श्रीवीरभद्रमूर्ति; शरभावतार; दक्षयज्ञ; श्रीरामलिंग; संगम व बन इ० चित्रें जास्त देण्याचा विचार आहे. आणखी कोणत्याही देवांचीं, स्थानांची अगर सद्गृहस्थांचीं यांत चित्रें देणें रास्त वाटेल; तीं चित्रें देऊन पुस्तक सुबक करण्यास मी तयार आहें; पण द्रव्यसाह्य करणें हें जनतेचें कार्य आहे; तरी तें करून लवकरच द्वितीयावृत्तीचा योग आणून देवो हीच भगवान् श्रीवीरभद्रदेवाजवळ नम्र प्रार्थना आहे.

# आत्मनिवेदन.

भगवान् श्रीवीरभद्रदेवाच्या कृपेनें आज ही प्रथम लेखनकृति प्रसिद्ध करून प्रिय वाचकांच्या हातीं देण्याचा सुयोग येऊन माझ्या आगाऊ देणगी व वर्गणीदार सद्गृहस्थांना दिलेल्या अभिवचनांतून मुक्त होण्याचा सुदिन उगवला आहे. यापूर्वी सदरहू पुस्तक प्रकाशनाच्या प्रसिद्ध केलेल्या अनेक मुदती टळून गेल्यामुळें माझ्यावर अत्यंत रुष्ट झालेल्या त्या आगाऊ आश्रय देणाऱ्या महाशयांच्या पुढें या ग्रंथप्रकाशनाच्या मार्गांत आलेल्या अनंत अडचणींचा अल्प पाढा वाचिल्यास ते या कल्पनातीत दिरंगाईबद्दल मला फारसा दोष देणार नाहींत असा भरंवसा असल्यानें, मी त्या सदयांतःकरणी सद्गृहस्थांना पुढील आत्मनिवेदन कथन करण्याचें धाष्टर्य करीत आहें. हें माझें हृद्गत मनःपूर्वक वाचिल्यास ते सदरी पुस्तक-प्रकाशनाच्या या विलंबाबद्दल विशेष चिकित्सा न करितां उलट उत्साहानें मला क्षमाच करितील असा दृढ आत्मविश्वास आहे.

आमचें कुलदैवत श्रीक्षेत्र यंडूर येथील श्रीवीरभद्रदेव होय. गरिबांना आपल्या तापदायक संसारामध्यें नेहमीं देवाची आठवण होणें स्वाभाविक आहे. त्याप्रमाणें मला समजूं लागल्यापासून आमचें उदरंभरण व माझें शिक्षण यांत देवानेंच मन घालावें म्हणून 'हे देवा, कसेंही करून माझा इतका शिक्षणक्रम पूर्ण करवून मला एखाद्या चांगल्या उद्योगाची जोड करून दे.' असा धांवा करणारा, श्रद्धायुक्त शुद्धांतःकरणरूपी नदीचा प्रवाह, वरील ओढा ओघळरूपी काम्य वासना घेऊनच देवाकडे धांवत होता. झालें; श्रीवीरभद्रदेवाच्या कृपेनें मनकामना पूर्ण होऊन मी ट्रेंड-मास्तर बनलों. त्यामुळें संसारांतील हरघडी उत्पन्न होणारी उदरनिर्वाहाची एक त्रासदायक उणीव बरीच दूर झाली. वरील तगाद्यानिमित्त श्रीवीर-देवाची वारी लहानपणापासूनच अनियमित कां होईना पण सुरू होती;

त्या वारी करीत असलेल्या काळांतच माझ्या अंतःकरणांत प्रस्तुत पुस्तकाच्या एखाद्या क्षेत्रवर्णनरूपी लहानशा आवृत्तीचा उदयास्त होत होता. अस्त म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, अंतर्यामीं उत्पन्न झालेल्या विचारप्रवाहाला मूर्त स्वरूप देण्याचा विचारच कधीं मनांत येत नव्हता. त्यावेळीं इतर क्षेत्रवर्णनाचीं अनेक पुस्तकें पाहून आपणही आपल्या कुलदैवताचें असेंच एकादें वर्णन लिहावें अशी एकप्रकारें लहरच उठत होती म्हणण्यास हरकत नाहीं. अशा मनःस्थितींत दैवयोगानें अवचितपणें सन १९१७ सालीं माझी बदली नंदगडाहून एकदम श्रीक्षेत्र यड्डूरास झाली. तेव्हां मनांतील वरील विचाराला मूर्तस्वरूप येण्याची आशा दृढ झाली. इतक्यांत कर्मधर्मसंयोगानें सन १९१८ सालीं यड्डूरांत लिंगायत—ब्राह्मणांतील पुजेसंबंधीच्या प्रख्यात खटल्यास प्रारंभ झाल्यामुळें हा कज्जा लिंगायतांसारखा झाल्यास देवस्थानच्या साग्र माहितीचें एकादें पुस्तक लिहावें असा मनाचा पक्का निश्चय ठरला. शिवाय तो खटला लिंगायतांच्या वतीनेंच खात्रीनें निकालांत निघणार असा खटल्याच्या आरंभापासूनच आत्मविश्वास वाटत असल्याकारणानें इतके दिवस मनोराज्यांत वावरणाऱ्या विचारलहरींना मूर्त स्वरूप देण्याची उमेद वाटून प्रत्यक्ष लेखनद्वारां प्रस्तुत पुस्तकाच्या रूपरेषेची आंखणी सुरू झाली.

पण इतक्यांत बेळगांवचे असि. जज मे. नार्मन साहेब यांच्या विरुद्ध निकालानें जोराचा धक्का बसला; तथापि लवकरच त्या निकालावर अपील होऊन श्रीवीरभद्रदेवाच्या पूर्ण कृपेनें डिस्ट्रिक्ट जज कोर्टात मे. पामर साहेब बहादुरांनीं सदरी खटल्याचा लिंगायतांप्रमाणें निकाल दिला! तेव्हां आनंदभरित होऊन लेखनकार्य पुनः सुरूं झालें. तरी अद्याप विरुद्ध पार्टीचें प्रिव्हीकौन्सिलपर्यंतच्या अपिलाचें बुजगावणें लेखनव्यवसायांतील उत्साह खंडित करीत होता. नंतर क्रमानें तेथपर्यंत जाऊनही जेव्हां सन १९२४ इ. सालीं विरुद्धपार्टी अयशस्वी ठरली, त्या वेळीं मन पूर्णपणें निर्वेध झालें. त्यांतच श्रीमंत चनबसापाअण्णा कराळे व श्रीचरंती-

स्वामी यांजकडून लेखनकार्याला सक्रिय प्रोत्साहन मिळाल्यामुळें लेखणीची गति अविछिन्नपणें सुरू झाली.

यानंतर पुस्तकांत येणाऱ्या विषयांबद्दल पुष्कळ सद्गृहस्थांच्या उपयुक्त वाटणाऱ्या सूचना पुढें येऊं लागल्या. त्यांतील प्रमुख सूचना अशा होत्या. श्रीयड्डूरक्षेत्र वर्णनाबरोबरच आजपर्यंत अप्रसिद्ध राहिलेलें श्रीवीरभद्रपुराण साग्रपणें गद्य कथानकरूपानें यांत आल्यास उत्तम. त्याचप्रमाणें श्रीआद्य-काडदेवरुस्वामी यांचें चरित्र या पुस्तकांत येणें अत्यंत अवश्य आहे. आणखी कित्येकांचीं मतें, वीरशैवांना विजयश्रीनें माळ घातलेल्या नुकत्याच संपून गेलेल्या प्रख्यात खटल्याचें साग्र वर्णन यांत दिल्यास बरें होईल अशीं होतीं, तर श्रीस्वामी व त्यांचे सल्लागार श्री. करोसी इत्यादिकांचें मत असें होतें कीं, हल्लींच्या खटल्याचें यथार्थ स्वरूप समजावयास पाहिजे असेल तर पेशव्यांच्या साह्यानें ब्राह्मणांचा श्रीवीरभद्रगर्भदेवालयांत प्रथमतः चंचुप्रवेश झाल्यापासूनचा सर्व इतिहास देणें जरूर आहे. याप्रमाणें विष-यांसंबंधीं भवति न भवति सुरू झाली. त्यांतून मार्ग निघतो न निघतो इतक्यांत दुसरा अडचणीचा प्रश्न दत्त म्हणून उभा राहिला कीं, इतके सर्व विषय आलेल्या पुस्तकाला नांव कोणतें द्यावें? प्रथमारंभीं या ग्रंथाची कल्पना जनते-पुढें ठेवितेवेळीं म्हणजे १९२४ च्या मे महिन्यांत हस्तपत्रकांच्या द्वारें ' श्रीसिद्धलिंगेश्वरचरित्र ' असें नांव जाहीर करण्यांत आलें होतें. कारण वरील ग्रंथ निर्माण होण्याला, व श्रीवीरभद्रगर्भदेवालयांतील वीरशैवांना जाचक होणारा भटांचा प्रवेश मर्यादित होण्याला श्रीसिद्धलिंगेश्वरस्वामीमहा-राजाचा दीर्घ प्रयत्नच मुख्यतः कारणीभूत झाला होता. पण हल्लींचा कज्जा व श्रीस्वामीमहाराज यांचीच तेवढी हकिकत यांत येणार नसून, क्षेत्रवर्ण-नासह श्रीवीरभद्रदेवाचें साग्र पौराणिक कथानकही यांत येणार असल्यामुळें आमच्या कांहीं हितचिंतक मित्रांनीं या पुस्तकास 'श्रीक्षेत्रयड्डूरमाहात्म्य ' हें नांव देणें विषयानुरूप होईल, अशी सूचना केली; परंतु हेंही नांव पूर्ण-पणें सार्थ ठरेना. कां कीं यामध्यें प्राचीन कालापासून या देवस्थानाशीं निगडित असलेलें श्रीआद्यकाडदेवरु शिवयोगी महात्म्यांचें चरित्र साग्र असणार व

त्याबरोबरच वीरशैवधर्मांची माहितीही येणें क्रमप्राप्त होणार. तेव्हां वरील नांव दिलें गेल्यास श्रीयड्डूरक्षेत्रभक्त अशा भाविक लिंगायतेतर ग्राहक लोकांना श्रीक्षेत्रयड्डूर माहात्म्याबरोबरच त्यांना त्यासोबत प्रामुख्यानें असलेले अन्य विषयही वाचावे लागणार आणि त्यांना जर ते इष्ट नसल्यास या ग्रंथाच्या बाबतींत त्यांजबरोबर एक प्रकारें प्रतारणा केल्याचा दोष येणार! तेव्हां कसें करावें? यांविषयीं मित्रमंळींत वाटाघाट होऊन, वरील नांव पाहातांच ग्राहकांना पुस्तकांतील विषयांची पूर्ण कल्पना यावी; एतदर्थ आतां दिलें आहे हें लांबलचक नांव देण्याचें ठरलें.

त्यावेळेपासून माझा लेखनव्यवसाय तर जोमानें सुरू झाला, पण ग्रंथाच्या विस्तारामुळें त्याबरोबरच ग्रंथप्रकाशनास लागणाऱ्या द्रव्याची मोठ्यांत मोठी अडचण मजपुढें उभी राहिली. पूर्वीं मी प्रसिद्ध करूं इच्छित होतों त्या ग्रंथाला चारपांचशें रुपये खर्च येत होता, तर आतां होऊं घातलेल्या विस्तृत ग्रंथाला सुमारें अडीच हजार रुपये खर्च येणार! तेव्हां पूर्वीच्याच एकदोघां उदारहृदयी श्रीमंतांच्या आश्रयावर भिस्त ठेवून कसें भागावें? पण मनानें निश्चय केला कीं, आणखी कांहीं श्रीमंतांच्या व उदारधी वीरशैव संस्थानिकांच्या गांठी घ्याव्या. त्याप्रमाणें लागलीच कांहीं धनिक लोकांच्या व फक्त श्रीमंत सरदार लखमगौडा बसवप्रभु सरदेसाई साहेब सं. वंटमुरी व श्रीमंत चचडीकर सरदेसाईसाहेब या उभय प्रख्यात संस्थानिक व या भागांतील उदारधी श्रीमंत रावसाहेब मल्लापा गंगापा अण्णा शिंते कुर्लीकर या महाशयांच्या गांठी घेतल्या. त्यांतील कित्येकांकडून कांहीं रोख रकमा व आश्वासनें मिळाल्यामुळें माझा उत्साह द्विगुणित झाला. तेव्हां सर्व कार्य पूर्ण करणारा श्रीवीरभद्र देव समर्थ आहे या भरंवशावर छपाईस आरंभही केला; आणि वाचक ग्राहक वर्गास 'अमुक मुदतींत पुस्तक देतों.' असें सांगून आगाऊ पैसेही उकळले! पण इतकें करूनही खर्चाची तोंडमिळवणी होईना; ग्राहकांच्या आर्डरीमाणें पुस्तकें व्ही. पी. करून पाठवून ग्राहक लोक ती व्ही. पी. स्वीकारतील कीं नाहीं म्हणून काळजी करणाऱ्या नित्य व्यवहारांतील बुकसेलरांचा अनुभव, माझ्या ग्रंथांच्या बाबा-

तींत मात्र लोकांना उलट आला. कारण—वर्ष दोन वर्षें पैसे अगाऊ भरूनही ग्रंथ मिळतो कीं नाहीं, याची काळजी ग्राहक लोकांनाच करावी लागली! असो. याप्रमाणें लेखन व्यवसायाबरोबरच मनाची व्यग्रताही वाढत होती. मला तर ही एक प्रकारें आणीबाणीची वेळ वाटली. अशा प्रतिकूल परिस्थितींत श्रीवीरभद्रदेवाच्या कृपेनें श्री. गुंडापा भरमापा कुडची इंगळीकर या सन्मित्राची गांठ पडली. आणि त्यांनीं पैशाच्या अभावीं एक धार्मिक पुस्तक अडून राहाणार हें पाहून मला लोकांची मदत मिळवून देण्याचें आश्वासन दिलें व नंतर लागलेंच गांवोगांवीं फिरून अनेक सद्गृहस्थांच्या गांठी घेतल्या; त्यांना वरील माझ्या ग्रंथप्रकाशनाच्या बाबतींतील खरी परिस्थिति समजावून देऊन त्याजकडून उदारहस्तें मिळालेल्या देणग्या व वर्गण्या वसूल करून, या पुस्तकाच्या प्रसिद्धिकार्यांतील द्रव्यसाह्याची महत्वाची उणीव पूर्णत्वानें दूर करुन इतक्या दीर्घ मुदतींत कां होईना, पण हें पुस्तक प्रसिद्ध होण्याची जी अमूल्य कामगिरी बजाविली त्यामुळेंच हा ग्रंथ वाचकांचे हातीं देतां आला; असें म्हणणें अनाठायीं होणार नाहीं. अशा तऱ्हेनें या पुस्तकाच्या बाबतींत या दीर्घोद्योगी प्रिय मित्रानें मजवर कधीं न फिटणारें स्नेहऋण करून ठेविलें आहे.

त्यानंतर मात्र ग्रंथलेखन—कार्य पूर्ण निर्वेध चाललें; परंतु जसजसा ग्रंथ पूर्ण होऊं लागला तशी प्रस्तावनेबद्दल काळजी उत्पन्न झाली. कारण आधुनिक पद्धतीस अनुसरून आपल्यांतील एकाद्या विद्वान लेखकाच्या प्रस्तावनेची या पुस्तकास जोड मिळावी असें मला वाटत होतें. म्हणून तसा प्रयत्न करून पाहावा या हेतूनें वीरशैव समाजाच्या उन्नतिप्रीत्यर्थ आज तागायत कायावाचामनेंकरून श्रम करणारे समाजकार्यनिरत सर्वमान्य विद्वान् पुढारी गुरुवर्य वीरबसव शिवलिंगाप्पा श्रेष्ठी बी. ए. मास्तरसाहेब यांना विनंति केली. आश्चर्य हें कीं, त्यांनीं स्वतः श्रीमद्भगवद्गीता या जगन्मान्य तत्वविवेचक ग्रंथांत आमच्या वीरशैव धर्माचीं मूलतत्त्वेंच कशीं स्पष्टपणें ग्रथित केलीं आहेत हें दर्शविणारा एक 'गीताधर्म-विचार' या नांवाचा वीरशैवसमाजास आदर्शभूत होणारा, वीरशैव-धर्म-तत्त्व-विवे-

चक उत्तम ग्रंथ लिहिण्याचें विस्तृत व अवघड कार्य अंगीकृत केलें असतांनाही, त्यांतल्या त्यांत सवड काढून सोबतची मुद्देसूद प्रस्तावना लिहून देऊन या ग्रंथाचें मुख उज्ज्वल केलें आहे. या त्यांच्या उदारपणाबद्दल त्यांचे ग्रंथकर्त्यावर अनंत उपकार झाले आहेत. गूढ तत्वज्ञानांत सर्वदा गढून गेलेल्या गुरुवर्यांच्या गंभीर व विचारपरिपक्व उदार मनाला या ग्रंथांतील खटल्यासारखे तात्कालिक महत्वाचे तरुण वृत्तीला तरतरी आणणारे विषय विशेष महत्वाचे वाटले नसल्यास नवल नाहीं. म्हणून त्यांनीं या ग्रंथांतील तशा भागांना आपल्या विवेचक दृष्टीची कसोटी लाविली नसेल. एवढी एक बाब सोडून दिल्यास बाकी साग्र पुस्तकाचें त्यांनीं केलेलें परीक्षण अत्यंत मार्मिक आहे, हें प्रस्तावनेवरून कोणासही कळून येईल.

याशिवाय लेखनव्यवसायांत मला ज्या ज्या सद्गृहस्थांनीं प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणें वेळोवेळीं अनेक मार्मिक सूचना करून साह्य केलें, त्यांचाही येथें नम्रतापूर्वक नामनिर्देश करणें माझें अवश्य कर्तव्य होय. प्रथम प्रस्तुत ग्रंथरचनेचा पाया घालण्यास साह्य करणारे श्री. कलापा सिद्धलिंगापा करोसी व यांतील प्रत्येक प्रकरण अत्यंत काळजीपूर्वक वाचून पाहून ग्रथांतील कांहीं बाबतींत मतैक्य नसतांही उपयुक्त सूचना करणारे श्री. सिद्धलिंगापा महारुद्रापा हरट्टी आणि आपल्या होम लायब्ररींतील अनेक अमूल्य ग्रंथांचा सांठाच माझ्या स्वाधीन करून प्रसंगविशेषीं मार्मिक सूचना करणारे श्री. वीरभद्रापा शिवलिंगापा जडी या सर्वांचे आभार मानणें अत्यंत जरूर आहे.

मला या कामीं उदारहस्तें द्रव्यसाह्य केलेल्या व करणाऱ्या अनेक श्रीमंतांचा मागें उल्लेख आलाच आहे. त्या सर्वांचे तर आमच्यावर अनिर्वाच्य उपकार आहेतच. त्यांच्याशिवाय ज्या अनेक समाज कार्य-प्रेमी सद्गृहस्थांनीं आम्हांस उदारहस्तें साह्य केलें आहे, त्या सर्व शेवटीं नांवें प्रसिद्ध केलेल्या प्रेमळ आश्रयदात्या देणगीदारांचें माझ्यावर अगणित उपकार आहेत; फार तर काय केवळ या सर्व देणगीदार महाशयांच्या दातृत्वानेंच ही अल्पकृति समाजापुढें आली आहे. यावेळीं स्थलाभावीं

ज्यांचीं नांवें प्रसिद्ध करितां आलीं नाहींत, अशा माझ्या सर्व उदार अंतःकरणी—कीं ज्यांनीं दोन दोन वर्षे अगाऊ वर्गणी भरूनही इतक्या कालापर्यंत आमच्या सबबी ऐकून घेतल्या त्या शांतवृत्ति-अगाऊ वर्गणी-दारांचाही मी फार फार आभारी आहें.

आतां ज्याचा गौरवपूर्ण उल्लेख करणें अत्यंत जरूर आहे त्यांत आमचे फोटोग्राफर मित्र श्री. गुरालिंगापा वीरत्यापा मिरजी गोकाककर यांचा प्रामुख्यानें नामनिर्देश केला पाहिजे. त्यांनीं मजबरोबर श्रीक्षेत्र यडुराच्या पंचक्रोशींतील सर्व भागीं हिंडून, अत्यंत अडचणीच्या जागीं जाऊन, त्या त्या पवित्र स्थलांचे अनेक सुंदर फोटो काढून देण्यांत जे परिश्रम घेतले ते चिरस्मरणीय आहेत. शेवटीं कोल्हापूरच्या 'श्रीसिद्धेश्वर प्रिंटिंग' प्रेसचे मालक श्री.वासुदेवराव ठकार आणि त्यांचे सुस्वभावी बंधु श्री बळवंतराव व श्री. सितारामबापू यांचा गौरवपूर्ण उल्लेख करण्यास अभिमान वाटतो. यांनीं या पुस्तकाच्या छपाईसंबंधीं माझ्याकडील पैशांची वसुली व मज-कडून होणारा अनियमित लेखनपुरवठा या बाबतींत जो सहनशीलपणा दाखविला त्यामुळें अडचणींतच एकप्रकारें मनास समाधान वाटे; या त्यांच्या सुस्वभावानेंच हें कार्य बरेंच सुकर होऊन लवकर पूर्ण झालें. असो.

जातां जातां ज्या कोणा साह्यकर्त्यांचा विस्मरणानें येथें उल्लेख करण्याचें राहून गेलें असेल, त्या सर्व सद्गृहस्थांचा, आणि ज्या ज्या ग्रंथांचा व लेख, बखरी व पुराणें इत्यादिकांचा मी सदरहू पुस्तकरचनेच्या कामीं उपयोग केला आहे त्या त्या सर्व ग्रंथकर्त्यांचा हा अल्पज्ञ लेखक अत्यंत ऋणी आहें.

सारांश माझ्या शक्तीबाहेरील हें कार्य परमेश्वरी कृपेनें सिद्धीस गेलें. याप्रमाणेंच याहूनही जास्त सरस अशीं समाज व राष्ट्रोपयोगी लेखन-कार्यें करण्यास तोच बुद्धिदाता सामर्थ्य देवो, असें त्या जगन्नियंत्याचेंच चिंतन करून तूर्त वाचकांची रजा घेतों.

सर्वांचा नम्र,

'शिवतनय' ग्रंथकर्ता.

विशेष सूचना-(१) पुढील यादींतून न आलेले देणगीदार महाशय-
५ रुपये देणारे—

| | |
|---|---|
| श्रीमन्निरंजन महांतस्वामी विरक्तमठ. नंदगड | ,, कलापा सात. कोळकी. शिरगांव |
| शिव. पलया राचया अथणीमठ वीरशैवानंदाश्रम. बेळगांव | ,, बाबू कलापा खलीले. हुन्नरगा |
| ,, आपया गिर. हिरेमठ. उगारखुर्द | ,, पुनापा बाबाजी लट्टी. ,, |
| श्री. बनापा भ. संकाजे. खडकलाट | ,, गिरगौडा म. पाटील. गिरगांव |
| ,, बाबू सिद पा ,, ,, | ,, आणापा घुळापा चौगला. ,, |
| ,, शिवलिंगापा नी. बड्डे. शिरगांव | ,, कलगौडा परगौडा पाटील ,, |
| | ,, सत्यगौडा मलगौडा पाटील. ,, |
| | ,, बसापा सिद. अरगावी नंदगड |

(२) पृष्ट ४९७ ते ५०८ पर्यंत ज्या ज्या ठिकाणीं मि. रात्र असें पडलें असेल त्या त्या सर्व ठिकाणीं 'दिवाणबहादूर राव' असें वाचावें.



# प्रस्तावना

ॐ भद्रं कर्णेभिः श्रुणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः
स्थिरैरङ्गैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥

श्रीयुत करवीरच्या शिवाच्या छत्रे यांनीं या ग्रंथाची प्रस्तावना लिहिण्या बद्दल आग्रहपूर्वक विनंति केली, आणि अशा पवित्र ग्रंथाची प्रस्तावना लिहिण्याचा मान मला दिला, ही एकप्रकारें श्रीवीरभद्रदेवाची आज्ञाच असें समजून मी यथामति चार शब्द लिहिण्यास प्रारंभ करीत आहें.

सध्यांच्या काळीं बुद्धिवादाला महत्त्व देऊन आपल्या विवेचक बुद्धिमत्तेनें आमच्या प्राचीन पुराणांतील कित्येक अद्भुत कथानकांबरोबरच त्यांतील एकूणएक चांगल्या गोष्टीही भरडणाऱ्या कित्येक आधुनिक चिकित्सकांच्या बुद्धीलाही संमत होईल अशा तऱ्हेचीच ग्रंथाची एकंदर रचना करण्याची सदरहू ग्रंथ लिहिण्यांत लेखकानें आरंभापासून शक्य तितकी खबरदारी घेतली आहे; त्यामुळें यांतील पौराणिक विषयाला प्रारंभापासूनच एक तऱ्हेचें नावीन्य आलें आहे. ग्रंथकर्त्यांनीं, श्रीवीरभद्रचरित्रपुराण, स्कंदपुराण श्रीकृष्णामाहात्म्य, श्रीआद्यकाडदेवरुबखर व वचनें, कोल्हापूर गॅझेटीयर व इतिहास, अष्टावरणविवेक, सिद्धांतसार, शिवपुराण, भगवद्गीता व शिवगीता इत्यादि अनेक ग्रंथांचें परिशीलन करून हा ग्रंथ लिहिल्यामुळें त्या त्या इतर ग्रंथांतील श्लोक वगैरे विषयानुरूप या ग्रंथांत योग्य ठिकाणीं घातले गेले आहेत; यामुळें यांतील श्रीवीरभद्रचरित्ररूपी पुराणाला एक प्रकारची सुवासिक पुष्पमाला घातली आहे कीं काय असें दिसून येत असल्यानें 'सुवर्णाला असलेली सुगंधाची उणीव दूर झाली' असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

श्रीक्षेत्र यड्डूरच्या हद्दीमध्यें उत्तम हवापाण्याच्या योगानें मनुष्यें व इतर प्रकारचे प्राणी आरोग्यसंपन्न आहेत म्हणून सांगून, ग्रंथकर्त्यांनीं तुष्टिरस्तु पुष्टिरस्तु करीत करीत, वाचकांना वनश्रीचा एकेक मनोरम देखावा दाख-

वीत दाखवीत, त्यायोगें उल्लसित झालेल्या वाचकांच्या मनाला पुण्यक्षेत्राच्या पवित्र वातावरणांत आणून, तेथील एकेका पुण्यस्थलाचें दर्शन करवीत, अखेर देवाधिदेव श्रीवीरभद्रलिंगाच्या दर्शनांत, दर्शन घेणाऱ्या भाविकांच्या सायुज्यमुक्तीची कल्पना आणून, मनोरम देखावे पाहून पवित्र दर्शन घेणाऱ्यांच्या उत्क्रांत झालेल्या मनांला आत्म्याच्या सर्वव्यापी दर्शनापर्यंत आणून सोडिलें आहे. त्यामुळें हा पहिला भाग फारच उत्कृष्ट साधला आहे. यांतील श्रीउत्सवमूर्तींच्या समर्पणाचा चमत्कृतिजन्य इतिहास मनास थक्क करितो, तर साधुमहाराजांच्या आरंभापासून समाधिकालापर्यंतची गोष्ट वाचीत असतां क्षणभर साधुवृत्तींत अंतःकरणाचें पर्यवसान होऊन तें सत्वगुणांनीं भरून जातें; आणि निस्पृह जीवात्मा कसा आत्मसुखरत असतो व त्यास जग कसें तृणवत् असतें याची बरोबर कल्पना मनांत येतें. (पृष्ठ६३).

शिवाय याच भागांत श्रीवीरभद्रदेवालयांतील नित्य नेमानें त्रिकाळ होत असलेली पवित्र पूजा व अपूर्व पालखी-महोत्सव यांची संपूर्ण माहिती दिली आहे. हा भाग कोणत्याही भाविक मनुष्याची—एकदां तरी हें सर्व प्रत्यक्ष पाहून नेत्रांचें सार्थक करावें, इतकी—भावना उद्दीपित करण्यासारखा साधला आहे. पालखीमहोत्सवाच्या विशेष प्रकारांत, विजया दशमीच्या शुभ दिवशीं सीमोल्लंघनाच्या पवित्र काळीं अस्पृश्य मानिलेल्या लोकांचा सुद्धा नैवेद्य पालखीतून त्यांच्या मोहल्यांत गेलेल्या श्रीवीरभद्रदेवाला पोहोंचविला जातो! असें वर्णन केलें आहे. त्यावरून इतर कांहीं ठिकाणीं दिसून येणाऱ्या शुद्धाशुद्धतेच्या कल्पनेपासून श्रीवीरभद्रदेव कसा अलिप्त आहे, हें दाखवून देवाच्या सर्वव्यापकत्वाला गौणपणा आणणारी वरील प्रकारची वेडगळ कल्पना या श्रीक्षेत्र यड्डरांत नाहीं, याचें स्पष्ट दिग्दर्शन केलें आहे. ग्रंथकर्त्यांनीं हा ग्रंथ लिहितांना जातींच्या?—चातुर्वर्ण्य-संबंधांत—'गुणकर्म विभागशः' हें उच्च ध्येयच डोळ्यासमोर ठेविल्यामुळें समाजसुधारकांनाही हा पुराण-संमिश्र ग्रंथ एक प्रकारें महत्वाचा वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

श्रीक्षेत्र यडुरांतील श्रीकाडदेवरु मठाधिपतींकडे असलेल्या वीरशैवमत-प्रसारकार्याच्या विवेचनांत लिंगायतसमाजाला उद्देशून केलेला उपदेश वीरशैव-समाजोद्धारकांनीं मनन करण्यासारखा आहे. वीरशैवांना सध्यांच्या सुधारणेच्या काळांत आपली सर्वांगीण उन्नति करून घेऊन पुढें यावयाचें असल्यास, वीरशैव जगद्गुरु महानुभाव श्रीबसवेश्वर महाराजांनीं बाराव्या शतकांत अनुसरलेल्या अति उदात्त ध्येयाप्रमाणेंच जाणें विहित आहे. म्हणजे धार्मिक बाबतींत समान दृष्टि ठेवून अस्पृश्यतानिवारण करावयाचें व येतील त्या इतरे जनांस वीरशैव धर्माची दीक्षा देऊन सर्वमान्य धर्मतत्त्वांचे प्रसार करण्याचें आगमप्रणीत कार्य—जें श्रीबसवेश्वरांचें उदात्त ध्येय—त्यापासून च्युत झाल्यामुळें, हल्लींच्या कित्येक वीरशैव मठांना आलेलें स्वरूप नष्ट करण्याकरितां अनेक धार्मिक संघ स्थापन करण्यास समाजधुरीणांनीं कंबर कसावी.

श्रीक्षेत्र यडूर म्हणजे ग्रंथकारांच्या मतें 'दक्षिण काशीक्षेत्र' होय. अर्थात् या प्रख्यात महाक्षेत्रास पंचक्रोशी असली पाहिजे व आहेही. श्रीक्षेत्रयडूरच्या यात्रेस येणारे हजारो भाविक लोक यडुराहून प्रथम श्रीक्षेत्र चंदूर येथील श्रीचंद्रेश्वरास व तेथून श्रीकोपेश्वर दर्शनाकरितां खिद्रापुरास जाऊन परत श्रीवीरभद्रदेवालयास येतात; त्याचें कारण ही संक्षिप्त पंचक्रोशी प्रदक्षिणाच होय. तथापि संपूर्ण पंचक्रोशी प्रदक्षिणामार्गांत लागणाऱ्या तीर्थांच्या व इतर पवित्र स्थानांच्या सविस्तर वर्णनानें हा भाग उठावदार झाला आहे. त्यांत ठिकठिकाणीं दिलेल्या तीर्थस्नानादिकांच्या उत्पत्ति-कथांवरून त्या त्या तीर्थांचें महत्त्व समजून भक्तिपूर्वक पवित्र मार्गक्रमण करीत असल्याची भावना मनांत येते.

या भागांत लेखकानें ठिकठिकाणीं तीर्थस्थानांच्या वर्णनांबरोबरच स्वतःचे जे विचार प्रकट केले आहेत, त्यांवरून त्यांची लेखनशैली किती स्वाभाविक, साधी पण सहज मनोहर असूनही वाचकांच्या मनावर तत्काळ परिणाम करून तें तद्रूप बनविणारी आहे हें दिसून येतें. यांत दानवाडच्या बुवांचा मठ सराफकट्टा बनल्यानंतर परिणाम काय झाला याचें विवेचन

करितांना, समाज सुशिक्षित करण्याकरितां श्रीमंत लिंगप्पा जायाप्पा सरदेसाई शिरसंगीकर यांनीं आपलें दरसालचें सुमारें पाऊण लाख रुपये उत्पन्नाचें संस्थानच देणगीदाखल वीरशैवसमाजास समर्पण केलें! यावरून हे 'जगद्विख्यात स्वार्थत्यागी महात्मे हे विरक्तांचे विरक्त होत!' असे ग्रंथकारांनीं काढिलेले उद्गार म्हणजे सर्वथैव धन्योद्गार नव्हेत काय? दीक्षागुरु, शिक्षागुरु, मोक्षागुरु म्हणवून घेणाऱ्या नामधारी गुरुवरांचे मठ सध्यां कसल्या घटांनीं पूरीत आहेत हें कळून आल्यानंतर त्यांच्या उत्पन्नांस योग्य वळण लागण्याकरितां काल-परिस्थित्यनुरूप साधनांतही फेरफार होणें टेनीसन कवीच्या—

'The old order changeth, giving place to new" या उक्तीप्रमाणें अत्यंत जरूरीचें आहे. ह्मणून समाजशिक्षणार्थ उत्पन्न झालेलें धारवाड लिंगायत एज्युकेशनफंड, सिरसंगीफंड, धर्मगुरु तयार करण्याकरितां ह्मणून स्थापण्यांत आलेलें बदामी येथील 'श्रीशिवयोग मंदिर' कै. रावबहादुर वारद सोलापूर यांचें धर्मग्रंथ प्रसिद्धीकरणकार्य, दासोहमूर्ति श्रीमन्निरंजन मृत्युंजय महास्वामी यांनीं चालविलेलें धारवाड येथील विशाल 'वीरशैव विद्यार्थी वसतिगृह' व रावसा. हळकट्टी विजापूर यांनीं आरंभिलेलें वचनशास्त्र-प्रचाराचें कार्य, हीं सर्व मुंबई इलाख्यांतील वीरशैवांचे नवीन साधनरूपी प्रयत्न होय. अशा कालीं ग्रंथकर्त्यांनीं सुचविल्याप्रमाणें एका वीरशैव संशोधन--संस्थेची अत्यंत जरूरी भासते. तीही उणीव समाजपुढाऱ्यांकडून लवकरच दूर करण्यांत येईल अशी आशा आहे. अशा प्रकारें कोठें पुण्यकारक तीर्थस्थानांच्या वर्णनानें वाचकवर्गाच्या मनाला शुद्धता, तर कोठें मनोरम देखाव्यानें कुतूहलता, कोठें उदात्त विचारसरणीनें गंभीरता तर कांहीं ठिकाणीं "सर्वे यस्य वशादगात्स्मृतिपथं कालाय तस्मै नमः" अशा नमस्कारानें आलेली उदासीनता अशा तऱ्हेच्या निरनिराळ्या भावना उत्पन्न करीत करीत ही पुण्यपावन प्रदक्षिणा संपविली आहे. श्रीकोपनाथ देवालयाच्या अत्युत्कृष्ट बांधणीसंबंधीं वर्णन वाचीत असतां, प्रत्यक्ष त्या देवालयाचें दृश्य आपल्या अंतश्चक्षूपुढें उभे राहातें, तोंच त्याच्या सौंदर्य-

भंगाच्या वर्णनानें मन अत्यंत उद्विग्न होतें.

या भागांतील शेवटचें 'सेवेकऱ्यांची व्यवस्था' या प्रकरणावरून यडूर येथील श्रीवीरभद्रदेवालयांतील पूजा व पालखी-उत्सवाचा विशाल कार्यक्रम सर्वकाळ सुयंत्रित चालण्याचें मर्म काय हें पूर्ण समजून येतें.

प्रस्तुत पुस्तकांतील दक्षयज्ञांतील अग्नीच्या ज्वाळा म्हणजे आरंभापासूनच कलहाग्नीच्याच ज्वाळा झालेल्या आहेत, हें दक्षप्रजापतीचा श्रीमहादेवासंबंधीं मत्सर व त्यानें केलेली शिवनिंदा हीं वाचीत असतांना समजून येतें. दक्ष व नंदी आदिकरून शिवगणांचे परस्पर शाप हे फारच आवेशयुक्त भाषेंत मांडले गेले आहेत. यांतील दक्षाचा दुराग्रही स्वभाव व अशा सर्वनाशक स्वभावापासून परावृत्त होण्याकरितां भगवान् श्रीविष्णूंनीं केलेला उपदेश आणि 'विनाशकाले विपरीतबुद्धिः।' या न्यायानें श्रीविष्णूंच्या उपदेशाची दक्षाकडून झालेली अवहेलना हीं फारच उत्तम साधलीं आहेत. यावरून इतकीच गोष्ट सिद्ध होते कीं, सर्व विनाशकारी विपरीतबुद्धि-वृक्षांचीं हीं मुळें देवादिकांपर्यंतही जाऊन पोहोंचलीं आहेत. असो.

यांतील जगन्माता सती दाक्षायणी देवीचें योगाग्नीनें भस्म होणें, हें प्रकरण ग्रंथकर्त्यानें फारच उत्तम रंगविलें आहे. सत्यधर्मप्रतिपालन व पातिव्रताधर्माचरण यांच्या समर्थनार्थ श्रीदाक्षायणीदेवीनें पित्याशीं क्रोधानें केलेलें संभाषण, कोणत्याही वीररसप्रधान काव्यांची खास बरोबरी करील. देवीच्या भाषणांतील पतिनिष्ठा व शेवटीं देवाधिदेव श्रीमहादेवाची तिनें सद्गदित अंतःकरणानें केलेली तत्त्वज्ञानयुक्त प्रार्थना हीं वाचीत असतां, कोणत्याही वाचकांचें हृदय भक्ति व करुणरसांनीं भरून आल्याशिवाय राहाणार नाहीं. शिवाय श्रीमहादेवीचें योगाग्नीनें भस्म होणें ही केवळ कविकल्पना नसून समान वायूच्या जयानें ही गोष्ट साध्य आहे, हें पातंजलयोगशास्त्राच्या आधारानें सिद्ध करून दाखविलेलें आहे. इतकेंच नव्हे, तर आधुनिक काळांतही ही गोष्ट शक्य असल्याबद्दल बंगाली प्रख्यात साधु 'पव्हारीबावा' या महान् शिवयोग्यांचा दृष्टांत देऊन सिद्ध केलेली आहे. यामुळें या प्रकरणाचा पौराणिकपणा जाऊन त्यास जवळ

जवळ चिकीत्सक दृष्टीचा शास्त्रीयपणा आलेला आहे. यावरून ग्रंथांतील विषय वाचकवर्गाच्या विवेचकबुद्धीला यथार्थ पटवून देण्याकरितां ग्रंथकर्त्यांनीं जे श्रम घेतले आहेत ते वाखाणण्यासारखे आहेत.

श्रीदेवीचें योगाग्नीनें भस्म होणें म्हणजे एक प्रकारें सृष्टींत वीररसाचा प्रसव होणें आहे. येथून कथानकाच्या रौद्रस्वरूपास प्रारंभ होतो. श्रीदेवी दग्ध झाल्याचें ऐकून श्रीशंकराचा झालेला कोप हा त्यप्रक्ष प्रलयाग्नीच होय ! आणि या क्रोधाग्नीपासून श्रीवीरभद्रदेवाचा जन्म होणें म्हणजे श्रीशिवनिंदकांचा उच्छेद करून दक्षाध्वरध्वंसनाकरितां एक प्रकारचा, भीमपराक्रमी असा प्रळयरुद्राच च झालेला अवतार होय. अशा तऱ्हेनें निर्माण झालेला हा देदीप्यमान वीर श्रीशिवाची आज्ञा घेऊन दक्षमखनाशाकरितां जातो, त्यावेळीं श्रीवीरभद्र देवानें दक्षयज्ञाचा नाश करून शेवटीं केलेला दक्षाचा शिरच्छेद व त्या काळीं वाहिलेली रक्ताची गुरुतर तरंगिणी आणि ही शिवनिंदकांच्या रक्ताची तरंगिणी निर्माण करण्याकरितां त्यांत श्रीवीरभद्रदेवानें केलेलें युद्धाचें भीषण तांडवनृत्य यांशिवाय दुसरें काय असणार ? हें युद्धप्रकरण जितक्या भीषण स्वरूपांत रंगवितां येईल तितकें ग्रंथकर्त्यांनीं रंगविलें आहे. पण युद्धप्रसंगांत एकमेकांनीं प्रतिपक्षांशीं केलेलीं संभाषणें बरींच विस्तृत असल्यानें कंटाळवाणी वाटण्याचा संभव आहे. अशा तऱ्हेनें दक्षाचा व त्याच्या यज्ञाचा नाश झाल्यावर तेथें श्रीमहादेवाचें आगमन व सर्व देवादिकांनीं दक्षाला सजीव करण्याकरितां केलेली शिवस्तुति आणि तीमुळें भोळा चक्रवर्ति श्रीसदाशिव संतुष्ट होणें व पुनः मेषशिरासह सजीव झालेला दक्ष व शेवटीं या महायज्ञाची सांगता हीं सर्व प्रकरणें उत्तम साधलीं आहेत.

या युद्धप्रकरणांत ग्रंथकर्त्यांनीं सर्व लोकांस अवगत असलीच पाहिजे अशी एक अत्यंत महत्वाची माहिती दिली आहे ती म्हणजे—

**गुग्गुळ प्रकरण—**

होय. हिंदुधर्मांतील बहुतेक सर्व जातींत लग्नसमारंभांत व उपनयनप्रसंगीं गुग्गुळ काढण्याचा प्रघात सर्वत्र दिसून येतो. पण हा गुग्गुळ ह्मणजे

काय चीज आहे याची यथार्थ माहिती असणारे इसम फारच विरळा. लग्नाच्या आधीं नवरदेव हात जोडून मस्तक नम्र करून वाद्यांच्या निनादांत स्तुतिपाठरूपीं वीररसप्रधान पुण्यमय काव्याचें श्रवण करीत चाललेला असतो. त्याच्यापुढें अर्धकुंभाकार मृत्तिकापात्रांत गुग्गुळ, कर्पूर, चंदन, तूप यांच्या दहनापासून दरवळलेला सुगंध वातावरणांत मिसळून लोकांना तुष्ट करीत असतो. नवरदेवाच्या मागून अलंकारानें विभूषित झालेला स्त्रीजन चाललेला असतो. अशा प्रकारचें हें पवित्र दृश्य अवलोकन करून प्रेक्षक वर्गांना साहजिकच जिज्ञासा उत्पन्न होते कीं, हें काय आहे? हा कोणत्या देवतेचा वरदपुत्र तिच्या साक्षात् दर्शनाकरिता चालला आहे? असें मन कुतुहलपूर्ण होतें. या ग्रंथांत या सर्व प्रश्नांची पूर्ण माहिती होण्याकरितां गुग्गुळाची उत्पत्ति कशी झाली व हें 'शिरोव्रत' कोणत्या प्रकारें करावें हें सविस्तर देऊन सदरहू प्रकरण फारच उपयुक्त करून ठेविलें आहे. हिंदुधर्मातील कोणत्याही पंथांतील इसमांनीं, त्यांतल्या त्यांत ज्यांच्यांत गुग्गुळ काढण्याचा परिपाठ आहे त्यांनीं, तर हें प्रकरण आवश्य वाचण्यासारखें केलें आहे. मात्र सदरहू ग्रंथांत लेखकांनीं गुग्गुळासारख्या पवित्र व मंगलसमारंभापुढें छानछोकीचे निंद्य प्रकार चालतात अशी टीका केली आहे. अशा गोष्टी क्वचित् कोठें कोठें होत असल्या, तरी त्या अपवादात्मकच समजल्या पाहिजेत. त्याला इतकें महत्व देऊन टीका करावयास नको होती.

उत्तरार्धांत महान् शिवयोगी श्रीआद्यकाडदेवरुस्वामी यांचा साग्र वृत्तांत म्हणजे त्यांची साधुवृत्ति, त्यांच्या ठिकाणीं असलेली यौगिक (सिद्ध) शक्ति यांचें विशेष वर्णन देऊन त्यांच्या मुखांतून स्रवणाऱ्या वीरशैव धर्मातील ज्ञानकर्म व आचार, गुरुलिंग-जंगमादि अष्टावरणें व षट्स्थलादिकांचे वर्णनरूपी उपदेशामृताची माहिती देऊन लिंगायत धर्माचें मुख्य जें शक्तिविशिष्टाद्वैतमत त्याची व त्याबरोबरच तदनुषंगीं द्वैत, विशिष्टाद्वैत व अद्वैत सिद्धांतांचीही माहिती शक्य तितकी दिली आहे. वीरशैवधर्माचें श्रीआद्यकाडदेवरुस्वामींनीं केलेलें हें विवरण, आपण आचरीत असलेल्या पूज्य धर्माच्या शक्तिविशिष्टाद्वैत मताचें सामान्य स्वरूप सुलभ रीतीनें समजण्या-

इतकें सुबोध करण्याचा पूर्ण प्रयत्न केला आहे. यामुळें हा ग्रंथ सध्यांच्या लिंगायत जनतेच्या आदरास पात्र होईल, यांत तिळमात्र संशय नाहीं. तसेंच या ग्रंथांतील शेवटच्या भागांत मूर्तिपूजा प्रकरणांत श्रीशिवलिंगपुजाच कशीं श्रेष्ठ आहे व सर्व देवादिकांनींही ही लिंगपूजाच कशी स्वीकारली आहे. अतएव हिंदुधर्मांतील अनेक जाति पंथांमधील भेदभाव नष्ट होण्यास्तव एकाच देवतेची उपासना करण्याची आवश्यकता वाटल्यास तिला लिंगपूजाच कशी सर्वथैव योग्य व सहजसाध्य आहे. याचा आपल्या बुद्धीनुरूप जें स्वतंत्रपणें महत्व वर्णन केलेलें आहे तें प्रत्येकानीं मनन करण्यासारखें आहे. त्याचबरोबर श्रीवीरभद्रदेवाच्या जागृतपणादर्शक कांहीं प्रत्यक्ष व परोक्षानुभावाच्या गोष्टी दिल्या आहेत, त्याही बोधप्रद आहेत.

आतां राहतां राहिली कज्ज्याची हकिकत, वास्तविक कज्जासंबंधीं टीकात्मक विषय या तात्विक धर्मग्रंथांत इतका आला नसता तर बरें झालें असतं; पण अशा तऱ्हेनें कज्जाची हकिकत देऊन श्रीवीरभद्र देवाच्या या पुराणाला 'श्रीक्षेत्र यड्डूर' या नांवानें यड्डूरच्या गॅझेटियरचें स्वरूप दिलें आहे. हें इतिहासमिश्र पौराणिक कथानक लिहिण्यांत मुख्य ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे ग्रंथकर्त्यांनीं होतां होईल तों कथानकांबरोबर हिंदुधर्मांतील तत्त्वज्ञानही आणून वाचकांना वेदांत विषयाचें साधारणपणें ज्ञान व्हावें असा प्रयत्न केलेला आहे; आणि हा प्रयत्न त्यांना चांगला साधला आहे यांत संशय नाहीं.

ग्रंथकारांच्या भाषेंत जिवंतपणा असून लेखनशैली व विवेचनपद्धति हीं वाखाणण्यासारखीं आहेत. वाचकांची जिज्ञासा सदा जागृत ठेवून त्यांची वृत्ति आपल्या वृत्तीशीं तादात्म्य करून टाकण्याची कला त्यांस चांगली साधली असून, तीमुळें आपण ग्रंथ वाचीत नसून ती ती स्थिति प्रत्यक्ष अनुभवित आहों असें वाटतें ! पंचक्रोशी–प्रदक्षिणा मार्गांतील ओसाड पडलेल्या रामपुरासंबंधीं ग्रंथकरांनीं काढिलेले उद्गार म्हणजे सहृदय वाचकांच्या अंतःकरणांची खळबळ होय ! असे प्रसंग ठिकठिकाणीं आलेले असून दिलेली माहिती पूर्ण व सर्वांगसुंदर होण्याकरितां उत्तम छायाचित्रें-

ही मुबलक दिलीं आहेत. ग्रंथकर्त्यांचा हा प्रथमचाच प्रयत्न असूनही तो उत्तम साधला आहे. यापुढें आपल्या समाजांतील थोर थोर विभूतींचीं चरित्रें लिहिण्याचा आपला मनोदय त्यांनीं ठिकठिकाणीं व्यक्त केला आहे. तेव्हां त्यांच्या या व पुढील परिश्रमाचें चीज समाजाकडून केली जाईल व त्यांस उत्तेजन मिळेल अशी बलवत्तर आशा आहे.

या ग्रंथापासून शिकण्यासारख्या व ध्येयरूपानें पुढें ठेवितां येण्यासारख्या अनेक गोष्टी आहेत. भगवान् श्रीविष्णूची शांतताप्रधान सामवृत्ति, व त्यांनीं पुढील घोर संकट टाळण्याकरितां दक्षप्रजापतीस मत्सरी स्वभाव सोडण्याबद्दल केलेला अमोल उपदेश ध्यानांत ठेवण्यासारखा असून, तो उपदेश न मानितां, बेगुमानपणें वागल्यामुळें अखेर त्या शिवद्वेषाचा परिणाम त्याच्या स्वतःच्या अवनतींत कसा झाला, तें पाहून प्रत्येकानें मनांतील मत्सर घालविण्याकरितां शांतवृत्तीचा अवलंब करून प्रतिपक्षाशीं साम करण्याचाच सदैव प्रयत्न केला असतां तो स्वतःच्या उन्नतीस कारण होतो, हा बोध घेण्यासारखा आहे.

श्रीमहादेवीची सरलता, शुद्धता व पतीचा अपमान सहन न झाल्यामुळें, तिनें केलेल्या आपल्या देहाचा होम हा तर प्रत्येक स्त्रीला पतिनिष्ठा किती उच्चप्रतीची असली पाहिजे आणि पतीचा मान म्हणजे स्वतःचा प्राण व पतीचें निंदाश्रवण म्हणजे स्वतःचें देहविसर्जन होय! अशा तऱ्हेनें पतीचा मान वाढविण्याकरितांच पत्नीनें जगावें, नाहींपक्षां प्राणार्पण करावें! म्हणजे धर्म, अर्थ, काम, मोक्ष यांत पतीची मान्यता वाढविण्याकरितां झटणें हा स्त्रियांचा धर्म होय. हा बोध ठसविणारा आहे.

भगवान् श्रीवीरभद्रदेवाच्या स्वभावावरून प्रतिपक्षास दंड कसा करावा व प्रसंगीं 'जशास तसें' या न्यायानें वागणेंच अगत्याचें असतें हें समजून येतें, तर देवाधिदेव श्रीमहादेवाचें स्वभाववर्णन म्हणजे दंडाचें पर्यवसान जर प्रतिपक्षी शरण येत असेल तर भेदामध्यें न करितां समेटांतच करणें म्हणजे दया, क्षमा, शांतीचें अखंड साम्राज्य जगतीतलावर प्रसृत करणें होय, हें दक्षाच्या मेषशिरावरून समजून येतें.

श्रीआद्यकाडदेवरुस्वामींच्या चारित्र्यावरून लोकसंग्रह करणारे पुण्य-

श्लोक महात्मे कशा रीतीनें वागत असतात व त्यांच्या मुखांतून श्रावणारें दिव्य बोधामृत किती ओजस्वी असतें याचा प्रत्यय येतो.

याप्रमाणें या ग्रंथापासून साम, दाम, दंड व शरणागतांशीं भेदवृत्तीनें न राहातां, पुनः साम, ह्या गोष्टी शिकण्यासारख्या आहेत. यावरून जगांत शांतता नांदावी असें वाटत असलेल्या प्रत्येक मनुष्याला, दंडापर्यंत जाऊनही प्रतिपक्षी ताळ्यावर येत असल्यास भेद वृत्ति व दूषित पूर्वग्रह सोडून क्षमेचा अवलंब केला पाहिजे. अशा तऱ्हेची शम--दम--वृत्ति उत्पन्न करण्याचा धडा शिकविणारा हा ग्रंथ आहे.

या ग्रंथांत क्वचित् ठिकाणीं दिसून येणारा मांडणींतील व विषयप्रतिपादनांतील दोष, आणि कांहीं ठिकाणीं पडलेले अयथार्थ शब्द हे वाचकवर्गाच्या सूक्ष्मदृष्टीस दिसून आले, तथापि या दोषारोपांपासून स्वतःचें संरक्षण करण्याकरितां ग्रंथकर्त्याजवळ 'लेखनाचा प्रथम प्रयत्न' रूपी ढाल असल्यामुळें दोषदिग्दर्शनाचा प्रहार त्यावर न करितां तूर्त यानंतर दुसरें कोणतेंही पुस्तक लिहावयाचें झाल्यास अपवादादाखलही असे दोष न घडतील अशी लेखनांत दक्षता ठेवावी, इतकीच त्यांना सूचना देणें बरें. शिवाय असे अल्प स्वल्प दोषही पुस्तकाच्या मोठेपणाकडे पाहातां क्षम्य आहेत. असो.

आतां येथें जातां जातां ग्रंथकर्त्यांचाही वाचकांना अल्प परिचय करून देणं अप्रासंगिक होणार नाहीं. यांचा जन्म रुकेश्वर ( जि. बेळगांव ) या गांवीं एका गरीब घराण्यांत पण सात्विक वृत्तीच्या मातापित्यांच्या पोटीं इ. स. १८९३ सालीं झाला. आपल्या पुत्राचें संगोपन व शिक्षण यांची सर्वतोपरी काळजी घेणाऱ्या पित्यानें जन्मानंतर एका महिन्याच्या आंतच स्वर्गवास केल्यामुळें यांची सर्वच बाबतींत काळजी घेण्याची जबाबदारी सर्वस्वीं यांच्या धार्मिक वृत्तीच्या मातोश्रीवरच येऊन पडली; पण त्यांनीं तशा गरिबींतूनही शिशुसंगोपनाचाच नव्हे तर बाल्यपरिपालन व शिक्षण इत्यादिकांच्या जबाबदारीचें हें कार्य परिस्थितीस अनुसरून इतक्या उत्तम रीतीनें तडीस नेलें कीं, बालसंगोपनाचें द्योतक म्हणून ज्या प्रमाणें 'मातृदेवो भव' ह्या मंत्राची जाणीव मानवप्राण्यास नेहमीं बाळगावी लागते;

त्याप्रमाणें बाल्यपरिपालन व शिक्षण यांकरितां 'पितृदेवोभव' व 'आचार्यदेवो भव' या मंत्रांची जाणीव देखील ते मातृपदींच ठेवितात; यावरून यांच्या मातुश्रींची दक्षता कशी असेल याची कल्पना होईल. अशी दक्षता जर ठेविली गेली नसती, तर हा सुपरिणाम संशयांचाच विषय झाला असता.

शिवाय, प्रस्तुत ग्रंथकारांना जन्मापासूनच दारिद्र्यांची जोड मिळाली होती. त्यामुळें विद्या संपादन करण्याच्या कामीं चिकाटी व हुशारी या दोन गुणांशिवाय यांना मदत करण्यास दुसरें साधन नव्हतें. नाहीं म्हणण्यास हुशार विद्यार्थ्यांवर सहाजिक असणारें शिक्षकवर्गाचें प्रेम, हेंही यांचा उत्साह द्विगुणित करीत असे. अशा उत्साहानें संकेश्वर यथील मराठी शाळेंत यांचें सातव्या इयत्तेपर्यंत शिक्षण होऊन सन १९०९ सालीं हे व्हर्न्यांक्युलर फायनल परीक्षेंत उत्तीर्ण झाले. मग उदरंभरणासाठीं भांडवलाच्या अभावामुळें अन्य स्वतंत्र उद्योग करण्याची सोय नसल्यानें सेवा-धर्माचा आश्रय केल्याविना गत्यंतर नव्हतें. म्हणून तेथील मुख्याध्यापक श्री० रामचंद्र गोविंद वावडेकर व हितचिंतक आप्त श्री. निजलिंगप्पा अण्णा ढग यांच्या आग्रहानें हे सन १९१० सालीं पुणें ट्रेनिंग कॉलेजच्या प्रवेशपरीक्षेस गेले, व थर्ड ईयरपर्यंतचा कोर्स पुरा केला. नंतर दैवयोगानें सन १९१७ सालच्या आक्टोबरांत यांना इष्ट असलेल्या चिकोडी तालुक्यांतील श्रीक्षेत्र यडुरास यांचा वर्ग झाला. पुढें एका वर्षाच्या आंतच, म्हणजे सन १९१८ सालच्या जून महिन्यांत, यडूरच्या प्रख्यात खटल्यास सुरवात झाली त्यावेळीं हे तेथें प्रत्यक्ष हजर होते. त्याचवेळीं यांना प्रस्तुत ग्रंथ लिहिण्याची प्रेरणा झाली. सन १९२० सालीं निपाणी म्युनिसीपालिटीनें शिफारस करून यांना आपल्या येथें मागून घेतल्यापासून ग्रंथलेखन व्यवसायास यांना योग्य स्थान मिळालें आणि सरकारी खात्यांत, विद्यादानासारखें पवित्र कर्तव्य करीत असतांनाच असें हें धार्मिक ग्रंथलेखन–कार्य यांनीं सुरू ठेविलें. याचें कारण हेंच कीं, यांच्या मातोश्रीपासून एक प्रकारें आरंभापासून धार्मिकवृत्तीचें बाळकडूच यांना पाजिलें गेल्यामुळें, यांचा स्वभाव धार्मिक बनलेला होता. त्यामुळें हें आपलें शिक्षणाचें पवित्र

कर्तव्य सांभाळून धार्मिक पुस्तकें वाचण्यांत आपला काळ घालवीत असतांनाच श्रीवीरभद्रदेवाविषयीं असलेल्या आपल्या अचल श्रद्धेनें प्रेरित होऊन हें विस्तृत कार्य ग्रंथकर्त्यांनीं हातीं घेतलें यांत बिलकूल संदेह नाहीं. प्रस्तुतचा हा ग्रंथ म्हणजे यांच्या धार्मिक वृत्तीचें दृश्य स्वरूप होय. सांपत्तिक स्थिति अनुकूल नसतां, सेवाधर्मासारखें खडतर कर्तव्य बजावीत असतांना, इतका मोठा धार्मिक ग्रंथ लिहून यांनीं जनतेपुढें ठेविला आहे ही एक स्वावलंबनाच्या बाबतींत आश्चर्य करण्यासारखी गोष्ट आहे. 'श्रेयांसि बहु विघ्नानि' अशी स्थिति असल्यानें प्रस्तुत ग्रंथ समाप्त होण्यास सहा वर्षांचा अवधि लागला. ह्याविषयीं ग्रंथकर्त्यानें आत्मनिवेदनांत खुलासाही केलेला आहे. स्वीकृत कार्याची व्याप्ति वाढतच चालल्यामुळें अनेक अडचणी उपस्थित होऊन ग्रंथप्रकाशनास जरा विलंब लागला, यास ग्रंथकर्त्यांचा नाइलाज आहे. तथापि प्रतिकूल परिस्थितींतही केवळ हुशारी व चिकाटी या गुणद्वयांच्या साह्यानें थर्ड इयरपर्यंतचा अभ्यास जसा यांनीं शेवटास नेला; तीच चिकाटी धार्मिक वृत्तींतही यांच्या मनानें धरिल्यामुळें सध्यांचा हा धार्मिक ग्रंथ प्रकट झाला यांत संदेह नाहीं. परंतु असें कार्य हातीं घेतांना जितकें सुकर वाटतें तितकें तें वस्तुतः नसतें, याची सत्यप्रतीति ग्रंथकारांस आलेली यांनीं पृष्ठ ३५ मध्यें व्यक्त केलेली आहे. अशी जरी वस्तुस्थिति आहे, तरी केवळ स्वकपोलकल्पित कादंबरी न लिहितां, शक्य तितक्या प्रयत्नानें अनेक ग्रंथांचें परिशीलन करून त्यांच्या आधारें हा ग्रंथ लिहिला आहे. कथांतरें असल्यास तींही देऊन लौकिक आख्यायिकांचा अगर मूढजनगप्पाचांही अव्हेर करण्यांत आलेला नाहीं. (पृष्ठ १०४ व १०६). इतकेंच नव्हे, तर योग्य प्रसंगीं सप्रमाण अनुमानही काढण्यास कमी केलेलें नाहीं (पृ. ३५७). हें वाचकांना दिसून येईल. एकंदरींत इतर स्वावलंबनेच्छु लोकांना सदर ग्रंथ लेखकांनीं जणों काय—'निश्चयाचें बळ, तुका म्हणे तेंचि फळ' अशा तऱ्हेचा स्वावलंबनाला दृढ निश्चयाची आवश्यकता असल्याबद्दलचा कित्ताच घालून दिला आहे, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

निपाणी
ता. २२।११।२६ } वीरबसव शिवलिंगाप्पा श्रेष्ठी.

श्रीवीरभद्रदेव प्रसन्न

# श्रीक्षेत्र यडूर

येथील

## प्रसिद्ध खटला आणि वीरशैव समाज

## पूर्वार्ध

### भाग पहिला

### श्रीक्षेत्र यडूर माहात्म्य.

#### ( १ ) यडूर गांवचें सामान्य वर्णन.

श्रीक्षेत्र यडूर हा गांव बेळगांव जिल्ह्यांतील चिकोडी तालुक्याच्या उत्तरभागीं परम पवित्र अशा कृष्णानदीच्या डाव्या तीरावर वसलेला आहे. यडूर या शब्दाची व्युत्पत्ति जरा चमत्कारिक पण अर्थपूर्ण आहे. हा शब्द कानडी भाषेंतील यरडु ह्मणजे दोन, व ऊरु ह्मणजे गांव; या दोन्ही शब्दांचा मिळून झालेला असावा असें कानडी जाणणाऱ्यांना वाटणें अगदीं साहजिक आहे. आणि येथें जवळ जवळ वसलेल्या दोन्हीं गांवांस मिळून ' यडूर ' हें एकच नांव असल्यामुळें हा समज दृढ होण्याचा संभव आहे; परंतु खरा प्रकार अगदीं निराळा आहे. हा शब्द कानडी भाषेंतील यड=डावी बाजू, आणि वीर=श्रीवीरभद्रदेव या दोनांचा संधि होऊन झालेला शब्द जो " यडवीर, " त्यापासून यडूर

हा शब्द झाला आहे. ' यडवीर ' हें नांव पडण्याचें तरी कारण आद्य श्रीकाडदेवरुस्वामी यांच्या वचनावरून असें समजून येतें कीं, या गांवचा मुख्य देव जो श्रीवीरभद्र किंवा वीर हा कृष्णानदीच्या डाव्या तीरीं वास्तव्य करितो; ह्मणून त्या वीराच्या जवळ असलेल्या गांवास यडवीर व त्यावरून रूढ नांव *यडूर हें पडलें आहे.

या गांवाला येण्यास बरेच मार्ग आहेत. त्यांपैकीं दोन मुख्य होत. अद्यापि या गांवापर्यंत लोकलबोर्डाची सडक सुद्धां झाली नाहीं, ही मोठी गैरसोय आहे. तथापि चिकोडीकडून येणारांना एकसंबे या गांवापर्यंत सडकेनें येऊन पुढें कल्लोळावरून नदीकांठीं येतां येतें. मग नदीस उतार असल्यास नदीमधून किंवा उतार नसल्यास नावेंतून नदी ओलांडून यडूर गांवास येतां येतें. या रस्त्यानें यडूर गांव १२ मैल अंतरावर आहे. दुसरा मार्ग, चिकोडीहून अंकली गांवाजवळून सडकेनें मांजरी गांवापर्यंत येऊन तेथून गाडीरस्त्यानें यडूरास यावें लागतें, हा होय. हा पल्ला सुमारें पंधरा मैलांचा आहे. बऱ्याच दुरून अग्निरथानें येणाऱ्या उत्तरेकडील यात्रेकरूंना सदर्न मराठा रेल्वेच्या शेडबाळ स्टेशनाहून व दक्षिणेकडच्या यात्रेकरूंना रायबाग स्टेशनावरून सडकेनें मांजरीपर्यंत येऊन तेथून इकडे येतां येतें. त्यांतही रायबागा-पेक्षां शेडबाळ स्टेशनावरून यडूरास येणें चांगलें. कारण येथें बैलगाड्या, छकडे, टांगे व क्वचित् मोटारी भाड्यानें मिळतात; व वाटेंत नदीनाले विशेष लागत नाहींत. स्टेशनापासून मांजरीपर्यंत ११ मैलांची चांगली सडक आहे आणि स्टेशनावर विहिरीच्या पाण्याची व धर्मशाळेची सोय असून फराळाच्या व स्वयंपाकाच्या वस्तुही थोड्याफार मिळतात. परंतु रायबाग हें मात्र बरेंच गैरसोयीचें स्टेशन आहे. येथें पिण्याच्या पाण्याची

---

* कित्येकांच्या मतें वैडूर्य या रत्नवाचक शब्दावरून रत्नाप्रमाणें झळकणाऱ्या श्रीवीरभद्र देवाच्या या पवित्र क्षेत्राला ' वैडूर्यक्षेत्र ' हें नांव पडलें; व वैडूर्य यावरून यडूर हें नांव पडलें असावें असा समज आहे.

सोय नसून वस्ति विशेष नसल्यानें फराळाचें सामान मिळत नाहीं. उन्हाळ्याशिवाय इतर दिवसांत भाड्याच्या गाड्याही मिळत नाहीं. या स्टेशनापासून अंकलीपर्यंत दहा मैलांची साधारण सडक आहे. त्यांतील रायबाग गांवापर्यंत दोन मैलांची सडक जरा बरी असते. पुढची आठ मैलांची सडक खालसांतील लोकल बोर्डाच्या सडकेसारखीच आहे.

अंकलीपर्यंतचा हा सर्व खडकाळ डोंगराचा उजाड प्रदेश करवीर सरकारच्या अमलाखालीं असून रायबाग हा एक महाल आहे. येथें महालकरी वगैरे ऑफिसर असतात; व एक धर्मार्थ दवाखानाही आहे. परंतु कोल्हापूर राजधानीपासून हा प्रदेश बराच दूर असून उत्पन्नाच्या दृष्टीनेंही कंगाल असल्याकारणानें रहदारी रस्त्याच्या बाबतींत इतकें दुर्लक्ष्य झालें असावें. शिवाय या खडकाळ रस्त्यानें येणारांना अंकलीजवळ एक मोठा ओढा व मांजरीजवळ नदी ओलांडावी लागते. येथें कृष्णानदीस कॉज-वे (फरशी) बांधिलेली आहे. ह्मणून उन्हाळ्यांत प्रवासाची सोय होते. पण पावसाळ्यांत चार महिने काजव्यावरून पाणी वाहात असतें म्हणून नांवेंतून पलीकडे जावं लागतें. त्यामुळें तेव्हां अत्यंत त्रास होतो. असो.

या दोन्ही स्टेशनांवरून सडकेनें आल्यास कृष्णाकांठचा मांजरी हा गांव लागतो. तेथून क्षेत्र यडूर थेट पश्चिमेस २ मैलांवर आहे. मांजरी हा गांव कृष्णेच्या डाव्या तीरावर वसलेला असून गांवांत श्रीमान् व्यापाऱ्यांची व धनिक रयतांची बरीच वस्ति असल्यानें गांव सधन आहे. गांवच्या पश्चिम बाजूस यडूरच्या रस्त्यावरच श्रीवीराण्णाचें टुमदार देऊळ आहे. याला ' कडबागिल वीराण्णा ' असेंही ह्मणतात. हें देवालय श्रीक्षेत्र यडूरचें प्रवेश–द्वारच होय. आणि वरील कानडी नांवावरून हा देव यडूर क्षेत्राच्या पूर्वेकडील महाद्वाराचा रखवालदारच होय. या देवाविषयीं विशेष माहिती पुढें एका भागांत येणार आहे. या महाद्वारापासूनच यडूर क्षेत्राच्या पंचक्रोशीचा प्रारंभ होतो. या देवालयाच्या थेट

दक्षिणेस सुमारें २॥-३ फर्लांग अंतरावर नदीच्या दक्षिणतीरीं उंचवट्यावर ' बिरदावन ' (वृंदावन) या नांवाचें एक रम्य ठिकाण आहे. तेथें एक समाधि व एका उंच चौथऱ्यावर दोन मोठीं शिवलिंगें स्थापिलीं आहेत. त्यालिंगांविषयीं विशेष माहिती पुढें एका प्रकरणांत दिली आहे. हें स्थान यड्डूर क्षेत्राची आग्नेय कोणशिला (लिंगमुद्रा) होय. मांजरीपासून यड्डूर क्षेत्रापर्यंत प्रशस्त गाडीचा रस्ता असून या रस्त्याच्या दुतर्फा बाभळीची बरीच झाडी आहे. हा रस्ता कृष्णानदीच्या कांठाकांठानें गेला असून दोहों बाजूंस त्यांतही विशेषतः डाव्या बाजूस कृष्णेच्या कृपेनें सदैव हिरव्यागार पिकानें गजबजून गेलेलीं शेतें दिसून येतात. तीं पाहून, खरोखर हें पीक नसून या नदीच्या कांठीं वास्तव्य करून राहणाऱ्या देवतांना संतुष्ट करण्याकरितां निसर्गानें नदीच्या दोन्ही तीरांवर रम्य असा हा हिरवागार गालिचाच पसरला आहे कीं काय असें वाटतें. त्यामुळें हा सुंदर देखावा पाहात पाहात या रस्त्यानें जाणारा प्रवासी आपला सर्व शीणभार विसरून जातो. आणि हा दीड दोन मैलांचा रस्ता केव्हां चालून संपतो हें त्याच्या लक्षांत न येतां तो एकदम यड्डूर गांवाच्या हद्दींतच येऊन थडकतो.

यड्डूर हा गांव स्वतंत्र वस्तीचीं दोन लहान लहान खेडीं मिळून बनलेला आहे. हें मागें सांगितलेंच आहे. यांपैकीं पूर्व बाजूच्या खेड्यास 'जुनें किंवा गांव यड्डूर व पश्चिमेकडच्यास ' क्षेत्र यड्डूर ' अशीं नांवें आहेत. या दोन्हीं खेड्यांत सुमारें अर्धा मैल अंतर आहे. यड्डूर गांवची लोकवस्ति अगदीं कमी म्हणजे ' यड्डूरवाडी ' नांवाचें खेडें धरून या तिन्ही खेड्यांची वस्ति अवघी दोन हजार आहे. यांतील जुनें यड्डूर हीच मुख्य वस्ति होय. गांव कामगार जे पाटील-कुलकर्णी व इतर चौगुला, मगदूम इत्यादि सर्व वतनदारांची वस्ति येथेंच आहे. तसेंच गांवांतील धंदेवाइक लोक म्हणजे सोनार, लोहार, सुतार, कुंभार वगैरे बारा बलुतेदारही येथेंच राहतात. मग ' क्षेत्र यड्डूरां 'त कोण राहतात

असें कोणी विचारील तर त्यास थोडक्यांत ' बहुतेक भिक्षुक ' असें उत्तर देतां येईल ! नाहीं म्हणण्यास त्यांचेच साथीदार शोभतील असे दुकानदारी करणारे जंगम भिक्षुक व इतर कांहीं किराणा-मालाचे व लाह्या फुटाणे विकणारे दुकानदार आहेत आणि थोडे वतनदार रयतही आहेत; पण मुख्य भरणा भिक्षुकांचाच आहे. तथापि इतर क्षेत्रांपेक्षां येथें हें विशेष आहे कीं, या ठिकाणीं परस्पर अगदीं भिन्न अशा दोन जातींचे भिक्षुक एकाच देवाच्या नांवावर आपला चरितार्थ चालवितात. पंढरपूर, काशी, प्रयाग इत्यादि कोणत्याही प्रसिद्ध क्षेत्रांतून बहुतेक फक्त ब्राह्मण जातीच्या भिक्षुकांचाच गराडा देवळाभोंवतीं पडलेला दिसतो. परंतु येथें वीरशैव जातींतील जंगम भिक्षुकांनीं त्यांची जागा पटकाविली आहे; व त्यांचीच संख्या एथें मोठी आहे. पण त्यांतील बहुतेक सर्व श्रीवीरभद्र देवाचे वतनदार सेवेकरी आहेत. फुकटे, खुशालचेंडू कोणी नाहींत. येथें जंगम भिक्षुकांचें प्राबल्य होण्याचें एक कारण असें असावें कीं, या क्षेत्रांतील मुख्य देव जो श्रीवीरभद्र त्याचे हक्कदार पुजारी येथील काडदेवरू मठाचे वीरशैव ज्ञातीचे पट्टचरमूर्ति स्वामी हे असून, वीरभद्र देवाच्या भक्तांत वीरशैव ज्ञातीच्या लोकांचा पुष्कळ भरणा असल्यामुळें जंगम भिक्षुकांची येथें साहाजिक पोळी पिकत असावी. आणि याच कारणानें भट भिक्षुकांची येथें डाळ शिजली नसेल. म्हणून त्यांची वस्ति थोडी आहे.

क्षेत्र यड्डूर हें खेडें दिसण्यांत लहान आहे. तथापि ' लहान मूर्ति पण थोर कीर्ति ' या म्हणीप्रमाणें येथें मोठ्या गांवासारख्या आधुनिक सुधारणेच्या साधनांचीं मूळ स्वरूपें, जीं शाळा, पोष्ट, सोसायटी इत्यादि संस्था होत, तीं उत्तम प्रकारें चालू आहेत. येथें सरकारी शाळा असून त्यांत सुमारें ७९ मुलें शिकत आहेत. शिवाय जुन्या यड्डूरांत तितक्याच मुलांची एक गांवठी शाळा चालू आहे ती निराळीच. एथें ब्रँच पोष्ट असून दररोज टपाल येत जात असतें. शेतकऱ्यांच्या सोयी करितां को-ऑपरेटिव्ह क्रेडिट सोसायटी स्थापन झाली असून, तिचे शेंकडों

शेतकरी मेंबर झाले आहेत. गांव लहान असतांही येथें हल्लीं मराठींत प्रसिद्ध होणारीं बहुतेक सर्व दैनिकें, साप्ताहिकें व मासिकें येत असतात. कोणत्याही पक्षाचें कसलेंहीं मराठी वर्तमानपत्र अगर मासिक येथील पोष्टांत येत नाहीं असें बहुधा घडावयाचें नाहीं. शिवाय आसपास २०।२५ कोसांच्या प्रदेशांत ज्यांचा कोणीच हात धरू शकणार नाहीं असे प्रसिद्ध तबलावादनकार गुरुजी 'शिवरामबुवा' हे याच ठिकाणीं राहात असतात. तसेंच या भागांत सुप्रसिद्ध असलेले राजवैद्य 'वझे' यांचें वास्तव्य याच-ठिकाणीं आहे. नाडीपरीक्षेंत व वैद्यकविषयांमध्यें त्यांची प्रगति फारच झाली आहे. यांच्या घराण्याचा वैद्यकीय विषयांत असा एक परिपाठच पडून गेला आहे कीं, यडूर, यडूरवाडी, नृसिंहवाडी या तीन गांवांतील कसल्याही आसन्नमरण रोग्यांना उत्तमोत्तम औषधें देऊन त्यांना बरें करावयाचें; तथापि त्यांजकडून औषधाचें बिल एक पैसुद्धां घ्यावयाची नाहीं, कीं व्हिजिट फीही घ्यावयाची नाहीं. अशा रीतीनें गरिबांना सुद्धां बहुमोल औषधें फुकट देऊन निरोगी बनविणारे निरपेक्ष वैद्य सध्यां कितीसे आढळतील? यावरून यांचा उदारपणा अवर्णनीय होय हें स्पष्ट आहे. क्षय, पंडु, दमा इत्यादि जीर्ण व असाध्य रोगांवर रामबाण ठरलेलीं बहुमोल औषधें यांचेकडे नेहमीं तयार असतात. अशा या वैद्यराजांनीं या स्थानाच्या मोठेपणांत भर टाकिली आहे. तसेंच मराठेशाहींत स्वराज्य व स्वधर्मसंरक्षक प्रतापी सेनापतींच्या खांद्यांशीं खांदा भिडवून ज्यांनीं मराठा साम्राज्याची इभ्रत वाढविली त्या निपाणकर श्रीमंत सिद्धोजीराव निंबाळकराच्या वंशज-देसायांच्या घराण्याच्या एका शाखेनें येथेंच कायमचें वास्तव्य केलें आहे. या सर्व अभिमानास्पद गोष्टींमध्यें अधिक भर टाकण्याकरितांच कीं काय याभागांतील बहुतेक सर्व वीरशैवांचे कुलगुरु श्रीसिद्धलिंगेश्वर पट्टचरमूर्ति काडदेवरूमठ यांनीं याच टुमदार क्षेत्रास सुशोभित व पावन केलें आहे. हिरा जसा कोंदणांत शोभतो तसा श्रीकाडदेवरू स्वामींचा मध्यवर्ती मठ या क्षेत्रास भूषवितो.

अशा प्रकारच्या उत्तमोत्तम पुरुषांच्या वास्तव्यानें या यड्डूर क्षेत्रास जें सौंदर्य व महत्व आलें आहे तें खरोखर इतर क्षेत्रांच्या मानानें अवर्णनीय च अभिमान वाटण्याजोगें आहे.

या सर्व शोभादायक गोष्टींत, सृष्टिदेवीनेंही या ठिकाणीं चिंचेच्या झाडांचें विशाल वन उत्पन्न करून त्यांत आपल्या निसर्ग-सौंदर्याची विलक्षण भर घातली आहे. या वनांत शेंकडों वर्षें आपल्या शीतल छायेनें व नयन-मनोहर देखाव्यानें हजारों यात्रेकरूंचीं अंतःकरणें आकर्षून घेणारे अनेक गगनचुंबित वृक्ष आहेत.इतकीं उंच व विशाल चिंचेचीं झाडें या भागांत नदीच्या कांठीं आणखी कोठेंही नाहींत. चैत्र वैशाख मासांतील कडक उन्हाळ्याच्या दिवसांत उन्हानें व वाटेच्या श्रमानें थकून जाऊन तहानेनें जीव कासावीस होत असलेल्या यात्रेकरूंना हें निसर्ग-निर्मित रमणीय वन दृष्टीस पडतांच जो अवर्णनीय आनंद होतो तो काय वर्णावा ? आणि जेव्हां हे यात्रेकरू या वनांत शिरून येथील गर्द व थंडगार सावलींत विश्रांति घेऊं लागतात तेव्हां आपण मृत्युलोकीं नसून स्वर्गलोकीं प्रत्यक्ष इंद्राच्या नंदनवनांतील वृक्षांच्या शीतल छायेखालींच बसलों आहोंत कीं काय असा त्यांना भास होतो. त्यामुळें ते वाटेचे श्रम विसरतात, इतकेंच नव्हे, तर तहानभूकसुद्धां विसरून आनंदानें निद्रादेवीच्या आधीन होतात.

अशा तऱ्हेचें रमणीय वन व त्यांतील सुंदर व पवित्र असें श्रीवीरभद्र देवाचें देवालय आणि सभोंवतालच्या कृष्णानदीच्या सान्निध्यानें कडक उन्हाळ्यांतही हिरव्यागार पिकांनीं नयनमनोहर दिसणारा भूप्रदेश यामुळें या पवित्र क्षेत्रास फारच शोभा आलेली आहे. हा निसर्गतः शोभादायक व पवित्र गांव लहान असतांही भर उन्हाळ्याच्या दिवसांत आधुनिक काळांतील तालुक्याचे मामलेदार, मुनसफ व जिल्ह्याचे कलेक्टर डेप्युटी कलेक्टर, वगैरे बडेबडे सरकारी अंमलदार वर्षांतून एकदां तरी येथें ४।५ दिवसांचा मुक्काम ठोकून येथील आल्हादकारक सृष्टि—सौंद-

यांचा आस्वाद घेतल्याशिवाय राहात नाहींत ! लहान सहान कामगार तर या भागाची फिरती याच ठिकाणीं सहकुटुंब ठाणें देऊन आटपतात. अशा प्रकारें बेळगांव जिल्ह्यांतील लहानमोठ्या अधिकाऱ्यांचें व जवळपासच्या बऱ्याच गांवांतील श्रीमंतांचें हें थंड हवेचें ' महाबळेश्वर ' अगर ' माथेरान ' च बनलें आहे. महाराष्ट्र, कर्नाटक, या समीप भागच्या आणि निजामचें राज्य व म्हैसूर इत्यादि दूरदूरच्या प्रांतांतीलही मोठमोठे श्रीमंत लोक देवदर्शन व हवापालट करण्याच्या निमित्तानें येथें हमेशा येत असतात. आणि संसारतापानें संतप्त झालेल्या मुमुक्षु मनाला शांत करून व येथील दैवी आनंद अनुभवून परत जातात. येथील पथ्यकर हवापाण्याचा व अन्नाचा प्रताप असा आहे कीं, क्षय, पंडु, दमा, महारोग इत्यादि असाध्य रोगांनीं ग्रासलेले अनेक रोगी येथील आरोग्यकारक हवापाण्यानें व श्रीवीरभद्र देवाच्या नित्य दर्शनाच्या पुण्याईनें निरोगी होऊन निघून जातात. अशा प्रकारच्या आरोग्यवर्धक परिस्थितीमुळें या ठिकाणच्या किंबहुना कृष्णा कांठच्या कायम रहिवाश्यांत अशक्त, दुर्बल किंवा दुर्मुखलेला असा मनुष्य क्वचित् दृष्टीस पडेल. पोरांपासून थोरांपर्यंत व तरुणांपासून वृद्धांपर्यंत सर्व लोक सशक्त, धिप्पाड, गुटगुटीत, व आनंदी चेहऱ्याचे दिसून येतात. गालफाडें बसलेला, बरगड्यांचीं हाडें बिनचूक मोजतां येतील असा काडीपैलवान कोणीही इसम येथें क्वचित् दिसून आला तर तो शहराच्या चहा, कॉफी, सोडालेमनादि आधुनिक कवडीमोल खाद्यपेयांचा व इतर सुधारणांचा सुखास्वाद मनमुराद घेतलेलाच मनुष्य प्राणी आहे असें खुशाल समजावें ! येथील माणसें तर सशक्त आहेतच; परंतु गाई, बैल, हैशी इत्यादि पाळीव जनावरेंसुद्धां सशक्त ढवदार व देखणीं असतात. येथील बैल तर सर्वत्र ' कृष्णाकांठचे बैल ' म्हणून प्रसिद्ध आहेत. हे बैल देखणे व सुंदर तर असतात; पण त्याबरोबर सशक्त व दमदारही असतात. डोंगराळ प्रदेशांतील चार सहा बैलांकडून ओढला जाणारा नांगर इकडचे दोन बैल

सहज लीलेनें ओढू शकतात इकडच्या गाई म्हैशी ह्यासुद्धां फारच सशक्त असतात. एकाच वेळीं सात आठशेर पर्यंत दूध देणाऱ्या पुष्कळ म्हैशी व गाई येथें आहेत. हा सर्व येथील कसदार अन्नाचा व निर्मल हवा-पाण्याचा प्रताप आहे. येथील जमीन इतकी सुपीक आहे कीं, वर्षांतून फक्त एकच भरपूर पाऊस पडला तर तेवढ्यानें तींत उत्तम पिकें येतात. ज्वारी, मक्का, कापूस व तंबाखू हीं येथील मुख्य पिकें होत. शिवाय पावटे, हरबरा, तूर हीं धान्येही बरींच पिकतात. मळी जमिनींत भोपळा, कालिंगड, कांकडीं, वांगीं हीं इतकीं उत्तम पिकतात कीं, असे रुचकर पदार्थ दुसरीकडे कोठें मिळत नाहींत अशी प्रसिद्धि आहे.

या सर्व धनधान्यसमृद्धीला कारण कोणतें असें कोणी विचारील तर त्यास 'पुण्यपावन कृष्णानदी ही एकच होय,' असें चटकन उत्तर देतां येईल. या नदींतून सालोसाल वाहात येणारा गाळ सांचून इकडच्या सर्व जमिनी फार सुपीक बनल्या आहेत. येथील जमिनीस केव्हांही खत घालण्याची जरूर पडत नाहीं. या भागांत कोणत्याही ठिकाणची जमीन वीस पंचवीस हात खोल खणली तरी तींत निर्भेळ काळ्या मातीशिवाय दुसरें कांहींच सांपडावयाचें नाहीं. नदीलगतच्या मळी जमिनी तर अत्यंत सुपीक आहेत. एकदां पूर येऊन गेला कीं, मग पाऊस न पडला तरीसुद्धां, त्यांत एक पीक उत्तम येतें. याप्रमाणें या नदीच्या योगानें येथील लोकांना सर्व समृद्धि व आरोग्य मिळून सौख्य होत असल्याकारणानें येथील लोक या नदीला फार पूज्य मानितात. आणि मोठ्या भक्तीनें हिला 'आई कृष्णाबाई' असें संबोधितात. हिचें महत्व वर्णन करणारें 'कृष्णामाहात्म्य' या नांवाचें एक अत्युत्तम पुराण या भागांतील कोणा विद्वानानें रचिलें आहे. एथें व कृष्णाकांठच्या सर्व क्षेत्रांतून दरसाल 'कृष्णामाहात्म्य' या पुराणाचें पारायण करून कृष्णा-बाईचा मोठ्या थाटानें उत्सव करण्याचा प्रघात पडून गेला आहे तो उगाच नव्हे. या भागांतील लोक या नदींत घाणेरड्या अगर अपवित्र

वस्तु मुळींच धूत नाहींत, किंवा टाकीतही नाहींत. ऋतुस्नात स्त्रिया नदीला स्पर्श करीत नाहींत. इतकी कृतज्ञता व आदरबुद्धि या पवित्र नदीसंबंधानें बाळगून आपल्या आवडत्या कृष्णा–मातेला फार मान देत असतात.

अशा या पवित्र कृष्णाबाईच्या सांनिध्यानें पावन झालेला हा प्रदेश ज्या क्षेत्र माहात्म्यानें मृत्युलोकांतलि केवळ कैलासभुवन बनलेला आहे, अशा या यडूर क्षेत्राचें पौराणिक महत्व काय आहे हें ऐकण्याची आतां आपणास उत्कंठा लागली असेल; तरी हें ग्रामवर्णन येथेंच संपवून आतां आपण क्षेत्रवर्णनाकडे वळूं.

## (२) क्षेत्र-देवता-दर्शन.

यापूर्वी आपण मांजरी गांवाजवळ यडूर क्षेत्राची पूर्व हद्द व आग्नेय दिशेची वृंदावन नांवाची लिंग–मुद्रा पाहिलेली आहे. शिवाय पूर्वमहाद्वारावरील द्वारपाल कडबागिल वीरेश्वराचें दर्शन घेऊन क्षेत्रांत आलोंच आहोंत. आतां या क्षेत्रांत सगळीकडे हिंडून पवित्र अशा सर्व देवतांचें आणि तीर्थांचें दर्शन घेऊंया. क्षेत्राच्या महाद्वारांतून आंत आल्याबरोबर क्षेत्रस्थ मुख्य देवता श्रीवीरभद्र देव याचें प्रथम दर्शन घेतलें पाहिजे असा प्रघात आहे. तरी प्रथम धूळभेटीकरितां श्रीवीरभद्र देवालयाकडे जावें हेंच उत्तम. तथापि तिकडे जातांना राजमार्गांतील अन्य देवतांचें व पवित्र स्थळांचें दर्शन साहजिक घडतें व त्यामुळेंच भाविक यात्रेकरूंचें मस्तक त्या देवांपुढें नम्र होतें.

देव–दर्शनाला रिकाम्या हातांनीं जाऊं नये कारण ' रिक्तहस्तो न पश्येत राजानं देवतां गुरुम् ' असें शास्त्र-वचन आहे, तेव्हां नारळ, केळीं, खारकादि फळांची व कर्पूर-धूपादि गंधांची खरेदी करूं व दक्षिणा देण्याकरितां पैशाच्या पिशवीचें तोंड मोकळें सोडूं, नाहीं तर या क्षेत्रांतील भिक्षुकरूपी जंगमादि भूदेव दक्षिणा न दिल्यास आम्हांस भंडावून

सोडतील, व शांत चित्तानें देव-दर्शनही घडूं देणार नाहींत. मांजरी-पासून जुनें यडूर पश्चिमेकडे दीड मैलावर आहे. या रस्त्यानें मागें सांगितल्याप्रमाणें निसर्ग—शोभा पाहात पाहात येत असतांना महार-वाडा डावीकडे सोडून जरा पुढें आलों कीं, जुन्या यडुराच्या गांव-कुसवाजवळ प्रथमच श्री मारुतीरायाचें देऊळ लागतें. देवालयाचें तोंड गांवाकडे ह्मणजे पश्चिमेकडे आहे. देवालयाची इमारत कौलारू असून जीर्णावस्थेस आलेली आहे. या देवालयांतील श्रीमारुतीचें दर्शन करून हमरस्त्यानें गांवाच्या मुख्य पाणोथ्याजवळ आलों ह्मणजे तेथें रस्त्याच्या उजव्या बाजूस ' गर्गेश्वरलिंग ' दिसतें. या गर्गेश्वरलिंगास येथील लोक हल्लीं ' पवाडसिद्ध असें ह्मणतात. हें लिंग औरस चौरस सात फूट दगडीं चौथऱ्याच्या मध्यावर स्थापिलें असून पुढें लहानसा नंदी आहे. या गर्गेश्वरलिंगाच्या थेट दक्षिणेस नदीमध्यें ' गर्गतीर्थ ' आहे. त्याविषयीं सविस्तर वर्णन पुढें तीर्थ-वर्णनांत आलेंच आहे. या गर्गेश्वराला नम-स्कार करून, राजमार्गानें क्षेत्र यडुराकडे जाण्यास निघतों तोंच या लिंग-स्थानापासून थेट पश्चिमेस सुमारें एक फलांग अंतरावर उजवीकडे शेतांत श्रीगणपतीचें देऊळ दृष्टीस पडतें. हें देऊळ अगदीं लहान आहे. पण याच्याखालचा दगडी चौथरा मात्र बराच मोठा आहे. त्याची उंची जमिनीपासून दोन फूट असून क्षेत्रफळ सुमारें २५।३० चौरस फूट आहे. या चौथऱ्यावर मध्यभागीं तीन फूट लांबी रुंदीच्या या चिमुकल्या देवालयांत पूर्वेकडे तोंड करून श्री गजाननाची सुबक मूर्ति बसविलेली आहे. या गणपतीच्या दर्शनानें पुनीत होऊन पुढें जाऊं लागलों कीं, सुमारें दोन फलांग अंतरावर राजमार्गावरच एका विशाल चिंचेच्या झाडा-खालीं ' रुद्रपादा ' चें पवित्र दर्शन घडतें. रुद्रपाद ह्मणजे श्रीशंकराच्या च्या पादुका होत. एका दीड फूट उंचीच्या दगडी चौथऱ्यावर मधोमध दगडांमध्यें वर्तुळ कोरून त्यांत पादुका स्थापिलेल्या आहेत. यांनाच रुद्रपाद ह्मणतात. या रुद्रपादाजवळच पश्चिमेकडे सुमारें पंचवीस फुटां-

वर श्रीनंदीचें देऊळ आहे. या देवळाचें तोंड पश्चिमेकडे आहे. हाच या क्षेत्रांतील मुख्य नंदी होय. हा श्रीवीरभद्र देवाकडे तोंड करून ह्मणजे पश्चिमाभिमुख बसला आहे पण तो वायव्यदिशेकडे पाहात आहे असा दिसतो. या दिशेस पाहाण्याचें काय कारण असावें हें पुढें श्रीवीरभद्र-अवतार या भागांत सविस्तर कळून येईल त्याचप्रमाणें मागें सांगितलेलीं श्रीगगंश्वरलिंग, श्रीगणपती, व रुद्रपाद इत्यादि स्थानें व पुढील भागांत वर्णन केलीं जाणारीं प्रसिद्ध देवालयें व पवित्र स्थानें त्या त्या ठिकाणींच कां स्थापिलीं आहेत हें त्यांच्या उत्पत्ति कथानकांसह सदरी श्रीवीरभद्रावतार या भागांत सविस्तर आलें आहे.

श्री नंदिकेश्वराचें हें देऊळ बरेंच मोठें आहे व देवळापुढें कमरेइतक्या उंचीचा सुमारें वीस बावीस फूट लांबरुंद असा भक्कम चौथरा बांधिला आहे. आणि त्या चौथऱ्यापुढें मोठें पटांगण आहे. या नंदिकेश्वर देवळाच्या नैर्ऋत्य दिशेस सुमारें पन्नास फूट अंतरावर शेतामध्यें ' श्रीराचाण्णा ' चें उत्तराभिमुख देऊळ आहे. त्यांत श्रीराचेश्वराची तीन साडेतीन फूट उंचीची उभी राहिलेली सुबक मूर्ति स्थापिली आहे. या मूर्तीची दृष्टि रुद्रपादाकडे वळलेली दिसते. या देवळाच्या थेट पश्चिमेस दोन फर्लांगावर क्षेत्रयड्डुरांतील बाजारपेठ दिसते. या पेठेंत वाण्यांचीं व हलवायांचीं मिळून दहा बारा दुकानें आहेत. या लहानशा बाजारपेठेंतून जरा पुढें जातों तोंच या क्षेत्रांतील मुख्य देव जो श्रीवीरभद्र त्याच्या प्रख्यात देवालयाचा पूर्वेकडील महादरवाजा दृष्टीस पडतो. या महाद्वाराबाहेर राजमार्गाच्या दोहों बाजूस उंचच उंच व सुबक बांधणीच्या दोन दीपमाला दृष्टीस पडतात.

## (३) श्रीवीरभद्र-देवालय.

श्रीवीरभद्र हा फारच उग्र व कडक देव आहे. व हें स्थान अत्यंत जागृत आहे. असा अनादि कालापासून आजपर्यंतचा अनुभव आहे. व तो अगदीं खरा आहे. या देवाचे लक्षावधि भक्त दूरदूरच्या प्रांतांत



श्री वीरभद्र देवालय ( श्रीक्षेत्र यड्डूर. )

सुखानें नांदत आहेत. आसपासच्या भागांतील लोकांची तर श्रीवीर-भद्र देवावर दृढभक्ति जडलेली आहे. प्राचीनकालापासून अत्यंत जागृतस्थान ह्मणून प्रसिद्ध असलेल्या या प्रख्यात क्षेत्राला शोभेल असें विशाल व सुंदर श्रीवीरभद्र देवालय आहे. या देवालयाचे निरनिराळे भाग निरनिराळ्या काळीं अनेक वैभवशाली संस्थानिकांनीं व भक्तिवान् संपन्न सद्गृहस्थांनीं बांधिलेले आहेत. हें देवालय प्राचीन असल्यामुळें प्राचीन काळच्या इतर प्रसिद्ध देवालयांप्रमाणें यालाही भक्कम चुनेगची तटबंदी आहे. त्या तटबंदींत भुईकोट किल्ल्याप्रमाणें बंदुका व तोफा डागण्याचीं ठिकाणें असून यदाकदाचित् परधर्मीयांनीं या देवालयावर हल्ला केल्यास त्यांजबरोबर पुष्कळ दिवसपर्यंत हें देवालय लढविण्याची जय्यत तयारी करून ठेविल्याचें प्रत्यक्ष दिसून येतें. ही सर्व तटबंदी अद्याप उत्तम स्थितींत आहे. हें देवालय बरेंच मोठें असून याची पूर्व पश्चिम लांबी १५० फूट व दक्षिणोत्तर रुंदी १०० फूट आहे. तटबंदीच्या आंतल्या चारी बाजूंस त्याला लागूनच सुमारें ५० ओंवऱ्या आहेत. या ओंवऱ्यांची रुंदी सर्व ठिकाणीं १० ते १२ फूट आहे. व त्यांची आंतील बाजू कमानींनीं सजविली असून वरील छावणीस चुनेगची धुमस केला आहे. म्हणून ही सर्व छावणी गच्चीप्रमाणें शोभायमान दिसते. तिज-वर सभोंवार प्रशस्तपणें हिंडतां-फिरतां येतें. या गच्चीच्यावर एक पुरुष म्हणजे सुमारें ५ फूट उंचीची तटबंदी राहते. तींतच वर सांगितलेली बंदुका-तोफा वगैरे .ागण्याचीं भोंकें व कमानी आहेत. व आंतील बाजूकडे सभोंवार . फूट उंचीचा कठडा बांधून काढिला आहे. म्हणून या गच्चीवरून f तांना लहान मुलांनासुद्धां पडण्याची भीति नाहीं. या गच्चीवर चढण्‍..ा पूर्व, दक्षिण व उत्तर या प्रत्येक दिशेस एकेक जिना बांधिलेला आहे.

या महादेवालयाला दोन मोठे दरवाजे आहेत. महादरवाजा पूर्वा-भिमुख आहे. व दुसरा दक्षिणेकडे आहे. त्याला ' नदी दरवाजा '

असेंही ह्मणतात. पूर्वींचा महादरवाजा जुन्या पद्धतीचा असून तो दुम
जली होता. दहा बारा वर्षांपूर्वी तो अगदीं नादुरुस्त झाला, ह्मणून तो
पाडून टाकून त्याच पायावर नवीन महादरवाजा व त्यावर नगारखाना
आणि गोपुर बांधण्याची मोठी खर्चाची कामगिरी करण्याची प्रेरणा, श्री
वीरभद्र देवानें या भागांतील सुप्रसिद्ध लक्षाधीश श्रीमंत रावसाहेब महापा
गंगापा अण्णा शिंत्रे कुर्लीकर यांच्या मनांत केली. तिला अनुसरून
त्यांनीं तो जुना दरवाजा पाडून टाकून कामाला सुरवात केली. आणि या
प्रख्यात देवालयास शोभेल आणि आधुनिक काळांतील लोकाभिरुचीस रुचेल
असा भक्कम, तसाच शोभायमान कमानदार दरवाजा बांधविला आहे. पण
वरील नगारखाना वगैरेचें काम तसेंच अपुरें राहिलें आहे. तेंही ते
लौकरच पूर्ण करणार आहेत असें समजतें; हें काम पूर्ण झाल्यास या देवा-
लयास अत्यंत शोभा येईल; इतकेंच नव्हे तर भविष्यकाळीं हा दरवाजा
शिल्पकलेचा एक उत्तम नमुना ह्मणून अभिमानानें दाखविण्याचा विषय
होऊन, श्रीमंत शिंत्रे यांचा कीर्तिध्वज मिरवत राहील. तरी ते तो दर-
वाजा लवकरच पूर्ण करोत.

दक्षिण दरवाजा जुन्या पद्धतीचा असून फार मजबूत आहे. या दर
वाज्यावरील दुसरा मजला फार प्रेक्षणीय आहे. त्यांतील कमानींची व
जिन्यांची रचना बरीच गुंतागुंतीची पण मोठ्या बहारीची आहे. याच्या-
वरील तिसरा मजलाही अशाच तऱ्हेनें बांधविण्यास सुरवात करून तो
अपुराच सोडिला आहे. या दरवाज्याच्या बाहेरील दक्षिणेकडील बाजू
सुंदर चित्रांनीं सुशोभित केली आहे. हीं सर्व चित्रें स्त्रीपुरुषांचीं असून
त्यांतील कांहीं शृंगारचेष्टादर्शक आहेत. परंतु हीं सर्व इतकीं सुबक
आहेत कीं, त्यांवरून कोरणाऱ्याचें हस्तकौशल्य व्यक्त होतें. या दरवा-
ज्याच्या दोन्ही बाजूंस भिंतींत दोन मोठ्या कमानदार देवळ्या ( कोनाडे)
आहेत. त्यांतील डावीकडील देवळींत श्रीमारुतीची स्थापना केलेली
आहे. व उजवीकडे श्रीमुरलीधराची मूर्ति बसविलेली आहे. याशि-



श्री वीरभद्र गर्भदेवालय.

वाय या देवालयाला उत्तरेकडे एक लहानसा दरवाजा होता. पण तो हल्लीं बंद करून टाकिलेला आहे.

पूर्व महादरवाज्यानें देवालयांत प्रवेश करितांच समोरच एक मोठा सुंदर सभामंडप दिसतो. या मंडपाचें सर्व काम दगडी असून अगदीं साधें आहे, कोठेंही नक्षी नाहीं; परंतु बांधणी इतकी रेखीव व प्रमाणबद्ध आहे कीं, कोठेंही जरासुद्धां कसूर झालेली नाहीं. म्हणून हा मंडप साधा असूनही अत्यंत उठावदार दिसतो. या मंडपाची पूर्वबाजू मोकळी असून पश्चिमबाजूच्या भिंतींत मेहरपी कमानीचें द्वार ठेविलेलें आहे. ती कमान फारच सुबक साधलेली आहे. या कमानीखालीं राहून पश्चिमेकडे दृष्टि फेंकिल्यास अपूर्व शोभा दिसते. भूलोकींच्या कैलासांतील श्रीशंकराचें सिंहासन तें हेंच होय! समोरच दिसणारें तें विशाल यज्ञकुंड, त्या यज्ञकुंडाच्या मध्यभागींच शिल्पकृतीचा केवळ आदर्श असें दिव्य तेजानें झळकणारें तें देव-मंदिर (गर्भ-देऊळ), त्या मंदिराचा रौप्य-पत्र्यानें मढविलेला तो शुभ्रप्रकाशमय सुंदर दरवाजा आणि त्या दरवाज्याच्या आंत अवलोकन करितांच समोर दिसणाऱ्या जगदात्मा, परमपावन, परममंगल, अतुलपराक्रमी, भगवान् श्रीवीरभद्रलिंगाचें पुण्यकारक दर्शन घडतांच त्रिविध तापांनीं त्रासलेलें अंतःकरण शांत होऊन जातें. व नानाविध भ्रमांचें निराकरण होऊन निराकारी निर्विकारी व निरामय अशा या नीलकंठाच्या भजनानंदांतच निमग्न होऊन राहावें अशी तल्लीन वृत्ति होऊन जाते. खरोखर आमच्या पूर्वजांनीं अशा पुण्यमय पवित्र स्थळाचें दर्शन घेण्याविषयीं जो कळकळीचा उपदेश करून ठेविला आहे तो अत्यंत योग्य आहे. संसारसागरांत मग्न झालेल्या मनुष्याच्या मनाला अशा पवित्र स्थानांच्या दर्शनानें शांत व परम सुखदायी अशा निराळ्याच वातावरणांत कांहीं काळ निरंकुशपणें वावरतां यावें आणि या रीतीनें ऐहिक सुखाहून श्रेष्ठ प्रतीचें पारलौकिक शाश्वत सुख म्हणून कांहीं आहे याची थोडीतरी प्रतीति मुमुक्षु मनाला घडावी हेंच कारण असावें. नास्तिकांच्या मनांतही

आस्तिक्य बुद्धीचा पक्का ठसा उमटविण्यास अशा पवित्र जागृत स्थळाचें एकवार दर्शन घडलें तरी बस्स होईल. यावरून आस्तिक्य बुद्धीच्या भाविक मनुष्यांचें हृदय भक्तिरसानें किती उचंबळून येत असेल याची वाचकांनींच कल्पना करावी. श्रीवीरभद्र लिंगाच्या दर्शनानें अशा प्रकारें अंतःकरणांत अनेकविध सुविचारांची गर्दी होऊन श्री वीरभद्र देवाच्या दर्शनानंदानें उचंबळलेली वृत्ति पळभर त्या लिंगाशीं तादात्म्य पावते आणि द्रष्टा, दृक् व दृश्य हीं समरस होऊन जातात., अथवा याला दुसरा यथार्थ दृष्टांत म्हणजे ' देवाचिये द्वारीं उभा क्षणभरी । तेणें मुक्ति चारी साधियेल्या ॥ या साधुवर्य तुकाराममहाराजांच्या उक्तीप्रमाणें क्षेत्राच्या हद्दींत पाय ठेविल्यापासून सलोकता, समीपता यांतून क्रमेण उत्क्रांत होऊन संरूपता मुक्तीचा अनुभव घेणाऱ्या मुमुक्षु भक्ताला क्षणभर सायुज्य स्थिति प्राप्त झाल्याचा भास होतो.

या लिंगाची पिंडी दीर्घवर्तुळाकार असून जरा तांबूस रंगाची आहे. परंतु जलहरी ( शाळुका ) काळ्या वर्णाची आहे. ती बहुधा वालुकामय असावी. कारण तीमध्यें बरींच छिद्रें आहेत. यांतील कांहीं कांहीं छिद्रें तर वीत दीडवीत खोल आहेत. या छिद्रांसंबंधानें येथील पुजाऱ्यांचें असें ह्मणणें आहे कीं, हीं छिद्रें ह्मणजे दक्षयज्ञ संहाराच्या वेळीं झालेल्या भयंकर युद्धांत श्रीवीरभद्रदेवाच्या शरिरास लागलेल्या शस्त्रांच्या जखमा होत ! ह्मणून या जखमासंबंधानें आह्मांस फार जपावें लागतें. कारण यांत पूजेच्या वेळचें पाणी राहिलें किंवा अक्षता अगर पुष्पाचा देंट किंवा द्रव्यांतील असाच कोणतातरी एखादा कठीण पदार्थ जाऊन अडकला व तो सायंकाळच्या तृतीय पूजेच्यावेळीं स्वच्छ काढिला नाहीं तर श्री वीरभद्र देवास रात्रीं वेदना होऊं लागतात व त्यामुळें आह्मांसही त्रास भोगावा लागतो. म्हणून श्रीवीरभद्रदेवाच्या या जलहरीरूपी देहावर नेहमीं रुपेरी कवच घालावें लागतें तें याचकारितां. या कवचाशिवाय अशा वस्तूंना प्रतिबंध होत नाहीं. ह्मणून प्रातःकालच्या पूजेच्या वेळीं शुद्धो-

दकाचें स्नान लिंगास घातल्याबरोबर जलहरीवर आह्मी हें रुप्याचें कवच घालून ठेवितों. या मुख्य लिंगाजवळच जरा उजवीकडे "चंडिकेश्वर" ह्मणून एक लहान पिंडी आहे. श्रीवीरभद्र देवाची पूजा विसर्जन केल्या-नंतर त्याच्यावरील निर्माल्य पुष्पें, त्रिदळें, गंध, अक्षता ही सर्व द्रव्यें पुजारी प्रथम चंडिकेश्वरास वाहतो. व नंतर तीं काढून कृष्णार्पण करि-तो. परंतु भक्त लोक पूजा करितांना श्रीवीरभद्रदेवाबरोबरच याचीही पूजा करितात. या चंडिकेश्वराच्या खालीं जलहरी वगैरे कांहीं नसून हा फक्त जमिनीवरच स्थापिलेला आहे.

याशिवाय या गर्भदेवळांत दुसरे कोणतेहि देव नाहींत. तेव्हां या देवा-लयांतच नव्हे, तर या सर्व क्षेत्रांत अद्वितीय तेजानें झळकणाऱ्या मुख्य अशा या श्रीवीरभद्रलिंगास शुचिर्भूतपणानें व भक्तियुक्त अंतःकरणानें शतशः शिरसाष्टांग प्रणिपात करून आपण पवित्र होऊं या. नंतर गर्भदेवळाच्या बाहेर पडून यज्ञकुंडांतीलच लहानशा प्रदक्षिणा- मार्गानें श्रीवीरभद्र देवास प्रदक्षिणा घालूं लागल्यास कोणकोणत्या देवतांचें दर्शन घडतें तें पाहूं. यज्ञकुंडांत असलेले सर्व देव या गर्भालयाच्या सभोंवारच्या भिंतींतील लहा-नमोठ्या देवळ्यांतून स्थापिलेले आहेत. ते अनुक्रमें असे आहेत—

गर्भदेवळांतून बाहेर निघतांच त्या सुंदर द्वाराच्या उजव्या बाजूस ह्मणजे पूर्वेकडील दर्शनी बाजूच्या भिंतीमधील एका मोठ्या सुबक व कमानदार दे-वळींत बाणमूर्तीची स्थापना केलेली आहे. त्यापुढें दक्षिणेकडील भिंतींत मध्यभागीं असलेल्या एका मोठ्या कोनाड्यांत जमिनीबरोबर बीर अथवा बीरेश्वर या नांवाची लहानशी पिंडी आहे. श्रीवीरभद्र लिंगाचा जीर्णो-द्धार होण्यापूर्वीं या यज्ञकुंडांत याच बीरेश्वराची मुख्यत्वें पूजा होत असा-वी. याविषयीं संपूर्ण इतिहास पुढें पांचव्या भागांत सविस्तर लिहिला आहे.

बीरेश्वराच्या देवळीच्या वरील भागीं सात आठ फूट उंचीवर दक्षिणा-भिमुखी श्रीमारुतीची लहानशी मूर्ति बसविलेली आहे. या दोन्ही देवांचें

दर्शन घेऊन पुढें गेलों ह्मणजे मागील ( पश्चिमेकडील ) भिंतींत सात आठ फूट उंचीवर श्रीनारसिंहाची मूर्ति बसविलेली आहे. पुढें उत्तरेकडील भिंतींत एका कोनाड्यांत ज़मिनीखालीं पांच फूट खोलीचें तीर्थकुंड असून त्यांत आंतील श्रीवीरभद्र देवाच्या अभिषेकाचें पाणी गोमुखांतून पडतें. या कोनाड्याच्या वरील भागीं शलभ किंवा शरभावताराची मूर्ति स्थापिली आहे. या अवतारासंबंधानें पुढें चवथ्या भागांत संपूर्ण वर्णन दिलें आहे. या शरभाचें दर्शन घेऊन पुन्हां पूर्व दिशेच्या रौप्य द्वारासमोर आलों कीं, आपली एक प्रदक्षिणा संपली. या रौप्य द्वाराच्या डावीकडे बाणमूर्तिसारख्याच कमानदार देवळीमध्यें श्रीगजाननाच्या मूर्तीची स्थापना केली आहे. हा गणपति दोन फूट उंचीचा व अगदीं प्रमाणबद्ध असून सर्व आयुधांनीं युक्त आहे. गर्भ देवालयाचा हा पूर्व बाजूचा दर्शनी भाग फारच नयन-मनोहर दिसतो. मधोमध चार साडेचार फूट उंचीचा तो भक्कम दरवाजा, व त्या दरवाज्याच्या दोन्हीं बाजूस बाणमूर्ति व गणपति यांच्या सुंदर व मेहरपी कमानदार विशाल देवळ्या आणि या सर्वांवर शिखराखालील दगडी तोरण यामुळें हा भाग अत्यंत उठावदार दिसतो. गर्भ-देवालयाचा हा दरवाजा निपाणी शहरचे रहिवासी व श्रीवीरभद्र देवाचे परम भक्त श्रीमंत चन्नाप्पा अदृश्याप्पा अण्णा विरदे यांनीं शके १८३४ म्हणजे सन १९१५ इसवीमध्यें, कौशल्यपूर्ण नयनमनोहर वेलबुट्टी काढिलेल्या जाड व मजबूत अशा रुपेरी पत्र्यांनीं मढवून काढिला आहे. या पत्र्यावरील नकशी काम फारच अप्रतिम झालें आहे. दरवाज्यावरील शृंगारपट्टीमधील गणपतीस सोन्याचा मुलामा केल्यामुळें, तो फार सुंदर दिसतो. गर्भ-देवळाच्या नैसर्गिक शोभेमध्यें या रौप्य पत्र्याच्या जडावानें अत्यंत भर पडली आहे.

हें गर्भ-देवालय पंधरा फूट लांबी रुंदीच्या चौरस क्षेत्रावर बांधलेलें असून तोरणापर्यंत याची उंची पंधरा फूट आहे. हें इतकें लहान अस-

तांही याचें बांधकाम इतकें उत्तम सफाइदार बठलें आहे कीं, त्याच्याकडे सर्व काळ पाहात बसावेंसें वाटतें. या टुमदार व शोभिवंत गर्भदेवाल. याचें शिखरही सर्वतोपरी त्यास शोभण्यासारखेंच कौशल्यपूर्ण आहे. दगडी तोरणाच्या वरच्या भागीं शिखराच्या बांधणीचा प्रारंभ आहे. हें शिखर अष्टपैलू असून त्याची उंची सुमारें ३० फूट होईल. याचे तीन मजले केले आहेत. प्रत्येक मजल्यांतील आठही बाजूंस आठ सुंदर नकशीदार कमानी असून त्या प्रत्येक कमानींत पौराणिक देवतांचीं घोंटीव चुन्याचीं निरनिराळीं अशीं एकंदर आठ चित्रें बसविलेलीं आहेत. सर्वांत खालच्या मजल्यांत पूर्व बाजूच्या समोरच्या कमानींत शिवपंचायतन आहे. पश्चिमेस वरुण देवाची, दक्षिणेस यमधर्माची, व उत्तरेस कुबेराची याप्रमाणें त्यांच्या त्यांच्या वाहन इत्यादिकांसह स्थापना केली आहे. शिवाय उप-दिशांना त्या त्या दिशेच्या अधिपतींची स्थापना केली आहे. त्याचप्रमाणें, वरील दोन्ही मजल्यांत व चारी कोपऱ्यांतील चबुतऱ्यांवरच्या कमानींत तेहतीस कोटी देवांची वस्ति आहे. दक्षप्रजापतीच्या महायज्ञास आलेल्या व श्रीवीरभद्र लिंगाच्या स्थापनेच्या वेळीं हजर असलेल्या सर्व देवादिकांचीं, तशींच प्रख्यात ऋषींचींहीं चित्रें आहेत. तीं कोणाकोणाचीं आहेत या-संबंधाची सविस्तर माहिती पुढील तिसऱ्या भागांत दिली आहे ती पहावी. या तीनही मजल्याच्यावर उंचच उंच असा पितळेचा कळस आहे. श्रीवीरभद्र देव व त्याचें हें सुंदर गर्भ–देवालय आणि या देवा-लयावरील हें चित्रयुक्त नयनमनोहर शिखर, या तीन उत्तम विषयांचा हा येथील त्रिवेणी–संगम इतका आनंददायी झाला आहे कीं, या स्थानाचें दर्शन घेणारा कोणताही मनुष्य येथील सौंदर्यानें गुंग होऊन जातो ! व तें सौंदर्य पाहात असतांना जागचें हालूंच नये असें त्यास वाटतें. अशा प्रकारचें हें सुंदर गर्भ–देवालय यज्ञकुंडाच्या मध्यभागीं आहे. या देवा-लयाला यज्ञकुंडातील प्रदक्षिणा–मार्गानें एक प्रदक्षिणा आपण घातलीच आहे. हा खालचा प्रदक्षिणा–मार्ग फारच अरुंद ह्मणजे अवघा दोन

फूट रुंदीचा आहे. व त्याच्या पलीकडे लहान लहान ओंवऱ्या आहेत. या ओंवऱ्या तीन बाजूस चार चार प्रमाणें व पूर्व बाजूस मात्र तीन मिळून एकंदर १५ आहेत. यांची उंची सर्व ठिकाणीं सहा फूट असून प्रत्येक ओंवऱ्याची कमान चार फूट रुंद आहे. या ओंवऱ्यांचा उपयोग देवाला येणारा नैवेद्य, नंदादीपाचें तेल व निर्माल्य-द्रव्यें वगैरे ठेवण्यास तर होतोच; पण कडक उन्हाळ्याच्या दिवसांत आणि यात्रेच्या गर्दीत शांतपणें बसण्यास हें गार हवेचें तळघरच होय. यांच्यावरील छावणी दगडांची असल्यामुळें आंतील हवा नेहमीं गार असते. या ओंवऱ्यांच्या वरची दगडी छावणी म्हणजेच वरचा प्रदक्षिणा-मार्ग होय. यज्ञकुंडांतून या वरच्या प्रदक्षिणा-मार्गास जाण्यास पश्चिमबाजू शिवाय तीनही बाजूंस सहा सहा पायऱ्यांच्या तीन वाटा आहेत. यांपैकीं पूर्वेच्या वाटेनें वर चढून वरील प्रदक्षिणा-मार्गानें एक प्रदक्षिणा घालूं, म्हणजे तेथें कोणकोणत्या देवांची स्थापना करण्यांत आली आहे हें दिसून येईल. वरच्या प्रदक्षिणा-मार्गाची रुंदी पूर्व, पश्चिम, उत्तर या तीन्ही बाजूंस ८।१० फूट असून पश्चिम बाजूस ५ फूट आहे. या मार्गाच्या पूर्वेस सभामंडपाची भिंत व कमानदार दरवाजा आहे हें मागें सांगितलें आहे. बाकीच्या तिन्ही दिशांस पुरुषभर उंचीची चुनेगची भिंत आहे. ही भिंत म्हणजे गर्भ-देवळाभोंवतालचा लहानसा तटच होय. या तटांत उत्तर व दक्षिण बाजूंस दोन दरवाजे आहेत. या लहानशा भिंतींतील देवळ्यांतून व त्याला लागून ठेविलेल्या दगडी चबुतऱ्यांवर या आवारांतील सर्व देव स्थापिले आहेत. ते कोणते हें प्रदक्षिणेच्या वेळीं पाहूं. पूर्वेकडील वाटेनें वर चढून आल्यानंतर त्या वाटेजवळच जरा डावीकडे पादुका व त्यापुढें दोन सुबक नंदी आहेत. या नंदीच्या उजव्या बाजूस दोन फूट उंचीच्या चुनेगची कठड्यांत दक्षिणेकडे तोंड करून नागाच्या तीन मूर्ति ठेविल्या आहेत. आणि या कठड्याला लागून इतक्याच उंचीचा कठडा यज्ञकुंडाकडील बाजूस चारही दिशेस बांधलेला असल्यामुळें या वरील मार्गानें प्रदक्षिणा घालतांना लहान

मुलांनासुद्धां यज्ञकुंडांत पडण्याची भीति नाहीं. नंदीसहित या नागांचें दर्शन घेऊन आपण जरा पुढें जातों तोंच, आग्नेय कोपऱ्यांत बसलेला एक विचित्र नंदी दिसतो. या नंदीला अंगें (देह) दोन असून मुख मात्र एकच आहे. असा हा दोन अंगांचा सृष्टिक्रमाविरुद्ध असणारा प्राणी कसला? म्हणून पुजाऱ्यांस विचारिल्यास ते असें सांगतात कीं, " ब्राह्मणांचा पूर्वकालीन म्होरक्या म्हणजे ज्याची हल्लीं दशावतारांत गणना केली जाते, असा जो प्रसिद्ध जमदग्निपुत्र परशुराम त्याच्या आगमनाचें हें चिन्ह होय! हा परशुराम प्राचीनकाळीं जेव्हां या क्षेत्रांत आला, तेव्हां त्यानें ही आपली निशाणी येथें ठेविली असावी. कारण ज्या ज्या ठिकाणीं परशुराम गेला होता, त्या त्या सर्व स्थळीं आपण गेल्याचें दर्शक-चिन्ह म्हणून असा एकेक चमत्कारिक नंदी त्यानें स्थापिला आहे असें म्हणतात. " या म्हणण्यांत कितपत तथ्य आहे याचा एकाद्या भाविक प्रयत्नवादी शोधकानें तपास लावावा. म्हणजे एक अज्ञात गोष्ट लोकांपुढें आणिल्याचें त्याला श्रेय मिळेल.

या नंदीच्या पाठीमागें कोनाड्यांत मारुतीची लहान मूर्ति आहे. दोन्ही देवांचें दर्शन घेऊन दक्षिण–दरवाज्या–जवळ गेलों कीं, तेथें एका कोनाड्यांत श्रीकरवीरभद्राची तीन फूट उंचीची मूर्ति स्थापिली आहे. हाही श्रीवीरभद्र देवांचा एक अवतार आहे. या देवापुढेंच गजाननाची एक अर्धभग्न मूर्ति ठेवलेली दिसते. पश्चिमेकडील भिंतींत कोणत्याही मूर्ति नाहींत. तेव्हां आतां थेट या आवाराच्या ईशान्य कोपऱ्यास जाऊं या. तेथें प्रदक्षिणा-मार्गाच्या फरसबंदीवर देवतांच्या तीन मूर्ति बसविलेल्या दिसतात. मधली शरभावताराची असून त्याच्या उजवीकडे शृंगी व डावीकडे भृंगी आहे. व भिंतींमधील कोपऱ्यांतील देवळींत दक्षिणेकडे तोंड करून श्रीशंकरपार्वती व गणपति या तीन्ही देवतांची मिळून एक शुभ्र संगमरवरी दगडाची सुंदर कोरींव मूर्ति स्थापिली आहे. ही एकत्र मूर्ति फारच लहान

पण अत्यंत सुंदर आहे. या सर्व देवतांचें दर्शन करून आपण पूर्वस्थळीं आलों कीं आपली प्रदक्षिणा संपली. येणेंप्रमाणें या आवारांत ब-याच देवता असून यज्ञकुंडामध्येंही वर सांगितल्याप्रमाणें अनेक देवता आहेत. या सर्व देवतांची स्थापना येथें कां करण्यांत आली आहे, हें पुढें यथाक्रम सांगण्यांत आलें आहे. त्यावरून कारणाशिवाय येथें कोणतीही देवमूर्ति स्थापिली नाहीं असें दिसून येईल.

गर्भ-देवालय व यज्ञकुंडाभोंवतालचा हा प्राकार व त्याच्या पूर्वेस असलेला हा भव्य सभा-मंडप हे दोन्ही मिळून या विशाल देवालयाचा अत्यंत सुशोभित मध्यभाग झालेला आहे. या मध्यभागाच्या चारी बाजूंस मागें सांगितलेल्या तटबंदीस लागून असलेल्या मोठ्या ओंवऱ्याच्या चौथऱ्यापर्यंत २४।२५ फूट रुंदीचें फरशी केलेलें प्रशस्त पटांगण आहे. या पटांगणाची सभामंडपासमोर रुंदी बरीच जास्त ह्मणजे सुमारें ४० फूट आहे. पटांगण हेंच प्रदक्षिणेचा बाहेरील राजमार्ग होय. याच राजमार्गांतून दररोज श्रीवीरभद्र देवाच्या उत्सवमूर्तीची पालखींतून प्रदक्षिणा होत असते. दंडवत, लोटांगण वगैरे घालणारे भक्तही याच पटांगणांतून घालीत असतात. या राजमार्गाच्या पलीकडे चारी बाजूंस ओंवऱ्यांच्या रांगा आहेत. त्या ओंवऱ्यांची मध्यभागाकडील बाजू अर्धवर्तुळाकार कमानींनीं सजविलेली आहे. या सर्व ओंवऱ्यांतील जमीन चुनेगची पक्की केली असून ती पटांगणांतील फरशीपेक्षां दोन फुटांपासून तीन फूट उंचावर आहे. या ओंवऱ्यांची सर्व ठिकाणीं रुंदी पुढील जोत्यापासून मागील भिंतीपर्यंत १५ ते २० फूट आहे. या ओंवऱ्यांच्या पिछाडीची भिंत हींच या देवालयासभोंवतालची मजबूत तटबंदी होय.

या ओंवऱ्यांचा उपयोग यात्रेकरू लोकांना उतरण्याकरितां होत असतो यात्रेकरू लोक यामध्यें स्वयंपाक, जंगमार्चन, निजणें बसणें वगैरे करितात. व खालीं पटांगणांत बरोबर आणिलेलीं बैल, घोडीं इत्यादि जनावरें बांधि-

तात. या सर्व ओंवऱ्यांतून पांच सहाशें लोक एकाच वेळीं प्रशस्तपणें राहूं शकतील ! मामलेदार, डेप्युटी कलेक्टर वगैरे वरिष्ठ दर्जाचे अम्मलदार-सुद्धां येथें फिरतीस आल्यावेळीं याच ओंवऱ्यांतून राहत असतात. या ओंवऱ्यांच्या रांगेंत पूर्व व दक्षिण बाजूंस दोन मोठे दरवाजे असल्याचें मागें सांगितलें आहे. पण ते दोन्ही त्या त्या बाजूच्या तटबंदींत मधोमध मुळींच नाहींत. पूर्व–महादरवाजा मध्यभागाच्या बऱ्याच उत्तरेस बांधिला आहे, तर दक्षिण दरवाजा मध्यभागाच्या बऱ्याच पश्चिमेस झाला आहे.

देवालयांतील सर्व ओंवऱ्या यात्रेकरूंकरितां नेहमीं खुल्या असतात. फक्त नैर्ऋत्य कोंपऱ्यांतील सहासात ओंवऱ्या कायमच्या अडलेल्या आहेत. श्रीवीरभद्रदेवाच्या उत्सवमूर्तीचें देवालय नैर्ऋत्य कोंपऱ्यात आहे. त्या देवालयाला लागून असलेल्या दक्षिणेकडील सहासात ओंवऱ्यांची एक मोठी खोली बनविलेली आहे. ती या देवालयाचें कोठारच होय. येथें देवालयांतील भांडीं, देवांच्या नैवेद्याचें भक्तास आलेलें अन्न, तेल व देवा-लयांतील उपयोगाच्या इतर वस्तु ठेवितात.

नैर्ऋत्य कोपऱ्यांत उत्सव–मूर्तीचें देवालय असल्याचें वर सांगितलें. हें देवालय पूर्वेकडे तोंड करून बांधिलेलें असून याची दक्षिणोत्तर लांबी ४० ४२ फूट व पूर्वपश्चिम रुंदी २० फूट आहे. या देवालयाचे तीन भाग केलेले आहेत. मध्यें लहानसा सभामंडप असून त्याच्या दक्षिण व उत्तर बाजूस दोन खोल्या बांधिल्या आहेत. यांतील उत्तरेकडच्या खोलींतच उत्सवमूर्ति ठेविलेली असते. या उत्सवमूर्तिबरोबरच श्रीवीरभद्रदेवाची अर्धांगी 'श्री-भद्रकाळीं'चीही पूजा केली जाते, म्हणून या देवळास कित्येक लोक 'श्री-' भद्रकाळीचें देवालय असेंही म्हणतात. या देवळाचें द्वार दक्षिणाभिमुख असून, देवळावर १०–१२ फूट उंचीचें, पक्या विटांचें, पायऱ्याच्या आका-राचें, वर निमुळतें होत गेलेलें साधें शिखर आहे. या खोलीवजा देवळांत पश्चिमेकडील भिंतीमध्यें एका मोठ्या कमानदार देवळींत उत्सवमूर्ति पूजितात.

शिवाय या खोलींत श्रीवीरभद्रदेवाच्या अनेक तऱ्हेच्या निरनिराळ्या धातुमय साकार मूर्ति पूजिल्या आहेत. येथें एक मच्छरदाणियुक्त सुंदर लांकडी पलंग असून त्यावर किनखापी गादी व गिर्द्या घालून शय्या तयार केलेली असते. उत्सवमूर्ति ही श्रीवीरभद्रदेवाची 'भोगमूर्ति' असल्यामुळें दोनप्रहरीं व रात्रीं या मऊ शय्येवर तिला श्रीभद्रकाळीसह निजवितात. देवास निजविल्यावर सांयकाळीं व प्रातःकाळीं पूजेच्या वेळींच दार उघडतात. मध्यंतरीं बहुधा दर्शनाची मनाई असते.

येथपर्यंतच्या वर्णनावरून 'श्रीउत्सवमूर्ति' म्हणजे कशा प्रकारची आहे हें जाणण्याची वाचकांस जिज्ञासा झाली असेल; तरी त्या मूर्तीचें जरा सविस्तर वर्णन या ठिकाणीं देणें अप्रासंगिक होणार नाहीं. श्रीवीरभद्रदेवाची खड्ग, त्रिशूल, धनुष्यबाण व पट्टीश वगैरे सर्व आयुधांनीं युक्त अशी पंचधातूंची सुवर्णकांतियुक्त साकार प्रतिमा करून ती एका पितळी प्रभावळीच्या मध्यभागीं बसविली आहे. ही मूर्ति लहानच म्हणजे अवघी ७।८ इंच उंचीची असून सर्व अवयव अगदीं प्रमाणबद्ध बनविले असल्यामुळें फारच सुबक दिसते. याच्या डोकीस लहानशी सोन्याची पगडी घातलेली असून तीवर सुवर्णछत्र शोभत असतें. गळ्यांत सुवर्ण-मण्यांच्या व मोत्यांच्या अनेक सुंदर माळा घातलेल्या असतात. पायांत व चारी हातांतही सुवर्णाचे चिमुकले तोडे घालून पायांखालीं रुप्याच्या खडावा ठेविलेल्या आहेत. या मूर्तीस उत्तम रेशमी उंची पीतांबर नेसवून तीवर कमरेस सोन्याचा कमरपट्टा बसवितात. अशाप्रकारें अनेक मौल्यवान् वस्त्रालंकारांनीं ही मूर्ति नेहमीं सजविलेली असल्यानें फार सुंदर दिसते. बुबुळाच्या ठिकाणीं उत्तम नीलरत्नें बसवून डोळे बनविले असल्यामुळें जणूं काय ही मूर्ति डोळे उघडून आपल्या तेजस्वी दृष्टीनें आपणाकडे पाहत आहे अशी भासते!

अशी ही सौंदर्यसंपन्न श्रीवीरभद्रमूर्ति प्रभावळीच्या मध्यभागीं बसवून तिच्या डाव्या बाजूस, जवळच तिजपेक्षां जरा लहान पण सौंदर्यपूर्ण

श्रीभद्रकाळी बसविली आहे. हीसुद्धां त्याच धातूची बनविली आहे. हिच्या अंगावरही अनेक सोन्यामोत्याचे दागिने घातले आहेत. या सर्वांत विशेष इतकेंच कीं, या दोन्ही मूर्तीस सोन्याच्या लहानशा सजिका घालून त्यामधून लिंग धारण केलेलें आहे. या सजिकाही त्या त्या मूर्तींच्या गळ्यांत उत्तम अलंकाराप्रमाणें शोभतात! श्रीवीरभद्रदेवाच्या उजव्या बाजूस जवळच श्रीभद्रकाळीइतक्याच उंचीची श्रीदक्षप्रजापतीची मूर्ति बसविलेली आहे. याच्या अंगावर विशेष अलंकार नसून ही मूर्ति हात जोडून उभी असल्याचें दिसतें. या तीन्ही मूर्ती एकाच मोठ्या प्रभावळींत बसवून, त्यापुढें खालीं त्यांच्या पायाजवळ मध्यभागीं रुप्याच्या दोन मोठ्या पादुका ठेविल्या आहेत व त्या पादुकांच्या दोन्ही बाजूस दोन सुबक नंदी बसविले आहेत. हे नंदी फारच घाटदार आहेत. त्यांच्या गळ्यांत रुप्याच्या घुंगुरमाळा घालून, अंगावर रेशमी आवरण (झूल) घालितात, यामुळें ते फारच शोभतात. नंदीसुद्धां त्याच पंचरशी धातूचे बनविलेले दिसतात. या सर्व उत्तम समूहामुळें हें श्रीवीरभद्र देवाचें पंचायतनच बनतें व तें फारच उठावदार दिसतें.

हें श्रीवीरभद्र देवाचें पंचायतन एका नकशीदार लहानशा सागवानी चौरंगावर ठेऊन पुढें रेशमी झग्गा पसरतात व त्यावर व सर्व देवमूर्तींवरही बेल, फुलें वाहतात. ज्यावेळीं ही मूर्ति पालखींत बसवावयाची असते तेव्हां ह्या सर्व देवांसह चौरंग उचलून पालखींत ठेवितात व मग पालखी उत्सवाकरितां काढतात.

पंचायतनांतील ह्या सर्व मूर्ति अगदीं अलग असून त्या पितळी प्रभावळीवरसुद्धां कायमच्या बसविलेल्या नाहींत. श्रीवीरभद्रदेव, भद्रकाली व दक्ष या तीन्ही उभ्या मूर्ति घट्ट बसविण्याकरितां प्रभावळींत खांचा ठेऊन त्यांत या मूर्तींच्या पायांखालचा दुहेरी पत्रा खोंचून बसविला कीं ह्या अगदीं गच्च बसतात. पालखी कितीही हालली तरी ह्या मुळींच हालत नाहींत. पुढें ठेविलेले नंदी व पादुका मात्र प्रभावळीवर नुसत्या ठेवून दिलेल्या

असतात. पूजेच्या वेळीं प्रत्येक मूर्ति खालीं काढून घेऊन, शुद्धोदकानें स्नान घालून नंतर स्वच्छ पुसून वस्त्रालंकार अंगावर घालितात व प्रभावळींत बसवितात. सर्व मूर्ति अशा अलग काढून स्नानादिक विधि झाल्यानंतर सर्वांची मिळून प्रभावळीवर भस्म, गंध, अक्षता, बिल्व, पुष्पादिकांनीं षोडशोपचारें पूजा करितात. दुपारीं व रात्रीं यांतील फक्त श्रीवीरभद्रदेव व भद्रकाली ह्या दोन मूर्ति काढून घेऊन त्या, वर सांगितलेल्या छप्परपलंगावर निजवितात व बाकीच्या मूर्ति प्रभावळीवरच असतात; परंतु त्यांवर शुभ्र वस्त्राचें आवरण घालून पूजा विसर्जन करितात.

अशा प्रकारची ही अत्यंत रम्य शोभायमान उत्सवमूर्ति आहे. या उत्सवमूर्तिशिवाय या देवळांत दुसरे फारसे देव नाहींत. फक्त २–४ साकार श्रीवीरभद्रमूर्ती आहेत. त्याही या प्रभावळीपुढच्या देव्हाऱ्यावर ठेवून पूजिलेल्या आहेत. शिवाय याच देवळांत श्रीविरभद्रदेवाच्या शाळुंखीवर घालण्याचें रुपेरी कवच व नागफणा हीं ठेवितात. उत्सवमूर्तीवर नेहमीं घालावयाचे अलंकार व रेशमी वस्त्रें याच देवळांतील एका पेटाऱ्यांत ठेवीत असतात. देवालयांतील अशा प्रकारच्या मौल्यवान वस्तू ठेवण्याची ही खोली असल्याकारणानें श्रीवीरभद्रदेवालयांतलि हा जामदारखानाच होय.

या जामदार खान्यांतून श्रीउत्सवमूर्तीचें दर्शन घेऊन आपण बाहेर पडलों कीं, तेथें पश्चिम बाजूच्या भिंतींत मधोमध एका सुंदर कमानींत एका मूर्तीची पूजा केलेली दिसते. या मूर्तीस 'मुदमल्लाप्पा' म्हणजे "वृद्ध मल्लाप्पा असें म्हणतात. प्राचीनकाळीं हीच मूर्ति पालखींत बसवून उत्सव करीत असत, म्हणजे हीच उत्सवमूर्ति होती. परंतु सुमारें तीनशें वर्षांच्यापूर्वी हल्लींची उत्सवमूर्ति मिरज प्रांतांतील दानोळी गांवच्या पाटलानें श्रीवीरभद्र देवास अर्पण केल्याकारणानें ही नवीन मूर्ति पालखींत ठेवून नेहमीं उत्सव करण्यास योग्य आहे असें पाहून हिचाच पालखी-उत्सव सुरू झाला; व पूर्वींची मूर्ति काढून सभामंडपांत स्थापिली तोच हा

मुदमल्लाप्पा होय. आणि याच कारणानें या देवास ' वृद्ध ' हें विशेषण लाविलें गेलें आहे. या मूर्तीच्या समोरच फरशीवर उत्सवमूर्तीची पालखी ठेवीत असतात. शिवाय या सभामंडपांतील भिंतीमधील दोन्ही बाजूंच्या खुंट्यांवर उत्सवमूर्तीच्या पालखीपुढें नेहमीं वाजविण्याचीं वाद्यें ठेविलेलीं असतात. या वाद्यांपैकीं बरींच चर्मवाद्यें आहेत, व कांहीं शिंग, नेपेरी इत्यादि कर्ण्यासारखीं वाद्यें आहेत. चर्मवाद्यांत करंडी, ढोल, तबला हीं मुख्य होत. याशिवाय झांज, टाळ, सनई वगैरे अनेक वाद्यें नेहमीं ठेविलेलीं असतात. व सेवक लोकही सवडीच्या वेळीं याच मंडपांत बसून विश्रांति घेत असतात. या मंडपाची पूर्वबाजू मोकळी असून ओंवऱ्याप्रमाणें तेथें तीन कमानी बांधिलेल्या आहेत. या सभामंडपाच्या दक्षिणेस एक खोली असल्याचें वर सांगितलें आहे. त्या खोलींत उत्सवमूर्तीचा पुजारी, दररोज तीन वेळां नैवेद्य तयार करून तो नैवेद्य सोंवळ्यानें प्रथम श्रीवीरभद्र देवास व मग देवालयांतील इतर सर्व देवांस दाखवून शेवटीं उत्सवमूर्तीस दाखवितो. प्रत्येक दिवशीं त्रिकाळ दाखविल्या जाणाऱ्या याच नैवेद्यास महानैवेद्य म्हणतात. आणि हा नैवेद्य वर सांगितलेल्या खोलींत तयार होत असल्याकारणानें त्या खोलीला ' नैवेद्याची खोली ' असें नांव पडलेलें आहे. याच खोलींत उत्सवमूर्तीपुढील नंदादीपाचें तेल व श्रीउत्सवमूर्तीचा नैवेद्य वगैरे ठेवितात. ही खोली श्रीवीरभद्र देवालयाच्या नैर्ऋत्य कोपऱ्याला आहे. महानैवेद्य तयार करण्याकरितां लागणारें सर्पण याच खोलीला लागून असलेल्या पूर्व बाजूच्या ओंवरींत रचून ठेवितात. या ओंवरीपुढच्या उंच पारावर एक बिल्ववृक्ष आहे. त्यामुळें उत्सवमूर्तीच्या देवळाच्या दर्शनी बाजूस बरीच शोभा आली आहे.

## (४) देवालयाच्या बांधणीचा इतिहास.

अशा प्रकारें या विशाल देवालयाच्या सर्व भागांचें आपण निरीक्षण केलें. हें देवालय हल्लीं दिसतें या स्थितींत पूर्वकाळीं मुळींच नव्हतें. या

देवालयाचे निरनिराळे भाग निरनिराळ्या लोकांनीं वेगवेगळ्यां काळीं बांधिलेले आहेत. पूर्वेकडील महादरवाज्याच्या बांधणीसंबंधानें मागें उल्लेख आलेला आहे. दक्षिणेकडील महादरवाजा, कोल्हापुरच्या कोणा एका सरदारानें बांधिल्याचें सांगतात. तोही अद्याप अपुराच आहे. देवालयाभोंवतीं ज्या मोठ्या ओंवऱ्या आहेत, त्यांपैकीं पश्चिमबाजूच्या आठ भक्कम व मोठ्या ओंवऱ्या या देवाचे परमभक्त श्रीमंत शिरगांवकर मुतालिक देसाई यांनीं चाळीस वर्षांपूर्वी बांधिलेल्या आहेत. दक्षिणेकडील ओंवऱ्यांपैकीं दरवाज्याच्या पश्चिमेकडच्या सर्व व पूर्वेकडच्या तीन ओंवऱ्या दक्षिण दरवाजा बांधणाऱ्या सरदारानेंच बांधविल्या असाव्या असें दिसते. कारण बांधणी सलग असून एकच नमुन्याची दिसते. पूर्व दरवाज्या-जवळच्या ओवऱ्यां-प्रमाणें बांधणीचा भिन्नपणा येथें नाहीं. दक्षिण बाजूच्या बाकी सर्व ओवऱ्या, गर्भागारांतलि मोठा सभामंडप बांधणारे श्रीमंत अण्णाजी नरसिंह देशपांडे पाच्छापूर यांनीं त्या सभामंडपाबरोबरच बांधविल्या आहेत; हें त्यांवरच्या शिलालेखावरून समजून येतें. इतर ओंवऱ्या कोणी केव्हां बांधविल्या याची कांहीं माहिती मिळत नाहीं.

गर्भागारांतील मोठा सभामंडप सदरहू देशपांडे यांनीं शके १७५२ म्हणजे इ. स. १८३० मध्यें सुमारें पाऊण लाख रुपये खर्च करून बांधविला असें या सभामंडपांतील शिला-लेखावरून कळतें. देशपांडे हे श्रीवीरभद्र देवाचे निःसीम भक्त आहेत. व त्यांच्या घरचें कोणतेंही धर्मकृत्य या देवाशिवाय चालत नाहीं.

श्रीवीरभद्र देवाचें गर्भ-देवालय, यज्ञकुंड व त्या सभोंवतालचा चुनेगच्ची प्राकार यांची बांधणी कोणी केव्हां केली आहे यासंबंधीं कांहींच मागमूस लागत नाहीं. तथापि बाराव्या शतकांत देवगिरीच्या शिंघणदेव या प्रख्यात रजपूत राजानें हें देवालय बांधविलें असावें किंवा बांधण्यास प्रोत्साहन दिलें

असावें असें अनुमान करण्यास बराच आधार आहे. यासंबंधानें विस्तृत विवेचन पुढें पांचव्या भागांत ‘ श्रीआद्यकाडदेवरु आगमन ’ या प्रकरणांत केलेलें आहे. तथापि बांधाविणारा कोणीही असो, त्याचें भक्तिमय अंतःकरण व उदार मनस्कता हीं अश्रुतपूर्व असल्याचें दिसून आल्याविना राहत नाहीं. अशा पुण्यपुरुषाला धन्यवाद द्यावे तितके थोडेच आहेत.

श्रीउत्सवमूर्तीचें देवालय, उपरिनिर्दिष्ट उत्सवमूर्ती देवास अर्पण करणाऱ्या दानोळीच्या भाविक पाटलानेंच बांधाविलेलें आहे असें कळतें. या देवालयाच्या बांधणीची व उत्सवमूर्तीच्या समर्पणाची हकीकत मोठी मनोरंजक व रहस्यपूर्ण अशी आहे. ती येथें सांगणें अप्रासंगिक होणार नाहीं. दानोळीचे पाटील हे जैनधर्मी असून त्यांचें कुलदैवत श्रीवीरभद्र देव आहे. हल्लींच्या पाटलांच्या पूर्वजांनीं ही उत्सवमूर्ति आपल्या घरांत देव्हाऱ्यावर पूजण्याकरितां त्याच गांवांतील एका कसबी सोनाराकडून तयार करविली. सोनारानें सुद्धां मुळींच कसूर न करितां आपल्या हस्तकौशल्याची परमावधि करून पुराणांत वर्णिलेल्या श्रीवीरभद्र देवाच्या माहितीस अनुसरून हें उत्तम वीरभद्रपंचायतन घडविलें. व आपल्या पाटलानें मनांत कल्पिलेल्या ध्यानमूर्तीला अशा तऱ्हेनें मूर्त स्वरूप दिलें. ही मूर्ति पूर्ण तयार झाल्यानंतर सोनाराच्या घरांतून सुमुहूर्तानें मोठ्या समारंभानें आपल्या घरांत नेण्याचा विचार ठरवून पाटलांनीं एक शुभ दिवस मुक्रर केला. त्या दिवशीं ग्राम–प्रयोजनाचा बेत निश्चित करून सर्वांस आमंत्रणें दिलीं. व एक नवीन पालखी तयार करवून त्यांत ती मूर्ति बसवून मोठ्या समारंभानें वाजत गाजत आपल्या घरीं आणण्याकरितां पाटलांची स्वारी सर्व समुदायांसह सोनाराच्या घरीं गेली. तेथें गेल्यानंतर यथाविधि पूजा वगैरे करवून मूर्ति पालखींत ठेविली. व सर्व लोक मोठ्या समारंभानें वाजत गाजत पाटलाच्या घरीं जाण्यास निघाले. इतक्यांत असा चमत्कार झाला कीं, पालखी वाहणारे भोई व पालखीजवळचे दोघे

चौघे भाविक इसम " मला यड्डूरास न्या रे मी येथें राहण्यास तयार नाहीं" असें एक सारखे किंकाळी फोडून ओरडूं लागले ! व सर्व समारंभ पाटलाच्या घराकडे चालला असतांना हे ओरडणारे लोक पालखीसह यड्डूरच्या दिशेनें चालूं लागले. व त्यांच्या जाण्यास अडथळा करणाऱ्यांना ते मुळींच जुमानीनात व स्वतःही मागें फिरेनात ! तोंडानें यड्डूरचा घोष तर सारखा चाललेलाच होता. असा जेव्हां सारखा दंगा सुरू झाला तेव्हां त्या समारंभांतील सर्व लोक आश्चर्यचकित झाले ! पाटलांनाही फारच विस्मय वाटला. व या प्रसंगीं कोणतें धोरण स्वीकारावें हें त्यांस कांहींच समजेना. आणि त्या घोष करणाऱ्यांच्या उद्गारांचा कांहीं उमज पडेना समारंभांतील सर्व लोकांचा अगदीं विरस झाला व ते सर्व या गर्जना करणाऱ्या इसमांभोंवतीं जमा झाले. अशा प्रकारें रंगाला निराळा तरंग येऊन त्या पालखी-भोंवतीं एकच गर्दी माजली. इतक्यांत त्या घोळक्यांतून श्रीवीरभद्रदेवाचे दोघे वृद्ध वारकरी व दोन समंजस गृहस्थ पुढें होऊन पालखीसमोर येऊन उभे राहिले, व ते पाटलास ह्मणाले. " पाटीलसाहेब, आमच्या सांगण्याचा राग मानूं नका. खरोखर श्रीवीरभद्रदेवाच्या या साकार मूर्तीची आपल्या घरीं स्थापना होऊं नये अशीच देवाची इच्छा दिसते. सबब ही मूर्ति आपण आपल्या घरीं न नेतां परभारें यड्डूरास नेऊन तेथें भगवान् श्रीवीरभद्रास अर्पण करावी असें आम्हांस वाटतें; तरी आपल्या मर्जीस येईल तसें करावें. " असें सांगून त्यांनीं लागलेंच नारळ वगैरे फोडून शांति करण्यास सांगितलें. हें त्या सद्गृहस्थांचें म्हणणें बहुतेकांस पटलें व त्याप्रमाणें तात्काळ शांति करण्यांत आली; तेव्हां भोयांची गडबड जरा कमी झाली; परंतु यड्डूरसंबंधीं घोष कांहीं केल्या बंद होईना. ही गडबड ऐकून हा चमत्कर पाहाण्यास सर्व गांव लोटला ! त्यावेळचे लोक हल्लींप्रमाणें धार्मिक बाबतींत नैराश्यवृत्तीचे व फाजील चिकित्सक नसून ते अत्यंत भक्तिमान् व स्वधर्माभिमानी होते; त्यामुळें तो सर्व प्रकार पाहून त्या भाविक लोकांनीं पाटील-

बुवांस असा सल्ला दिला कीं, ' ज्या अर्थी श्रीवीरभद्र देवाची आपल्या घरीं येण्याची इच्छा दिसत नाहीं, त्या अर्थी ही उग्र मूर्ति आपण घराकडे नेण्याचा आग्रह धरूं नये. आणि देवाच्या इच्छेस मान देऊन आतांच या समारंभारसह ही मूर्ति श्रीक्षेत्र यड्डूरास घेऊन जाण्याची तयारीं करावी. करितां तसा संकल्प करून सर्व व्यवस्था तावडतोब व्हावी हेंच योग्य होय. ' शेवटीं निरुपाय होऊन पाटलांना हाच सल्ला मान्य करावा लागला; शिवाय ते स्वतः श्रीवीरभद्रदेवाचे परमभक्त असल्यामुळें देवाच्या इच्छेस मान देणें हेंच आपलें आद्य कर्तव्य होय असें समजून त्यांनीं तात्काळ पालखीपुढें शिरसाष्टांग नमस्कार घातला व ' आतांच आपल्या इच्छेप्रमाणें आपणास श्रीक्षेत्र यड्डूरास पोहोंचवितों; तरी आपण शांत व्हावें. ' अशी नम्रभावानें प्रार्थना केली. आपल्या सद्भक्ताची ही विनम्र प्रार्थना ऐकून परम कारुणिक श्रीवीरभद्र देव संतुष्ट झाला असावा. कारण पाटलानीं पालखीपुढें साष्टांग नमस्कार घालून विनंति करतांच ते सर्व घोर करणारे इसम तावडतोब स्तब्ध झाले व थोड्याच वेळांत शुद्धीवर आले !

पाटलांनींही विलंब न करितां भोयांस व आपल्या सर्व सेवकांस हुकूम केला कीं, ' याच पावलीं तुम्ही ही पालखी यड्डूरास घेऊन चला. ' या आज्ञेनें पालखी यड्डूरास जाण्यास सिद्ध झाली; परंतु ती घराकडे चालविलेल्या सर्व समारंभासह यड्डूरास जाऊं द्यावी असा सर्व भाविकांचा अभिप्राय ठरून, सर्व थाटमाटासह मिरवीतच देवास पोहोंचवूं असें म्हणून ते सर्व लोक त्या समारंभांत सामील झाले. वृद्ध पुरुष व बायकामुलें सुद्धां यड्डूरास जाण्यास तयार झालीं. दानोळी गांवापासून यड्डूरक्षेत्र सहा सात कोस अंतरावर असल्याकारणानें हा इतका पल्ला चालून जाणें त्या काळच्या शक्तिसंपन्न लोकांना विशेष त्रासाचें वाटलें नाहीं. त्यामुळें लहान लहान मुलेंसुद्धां पालखीबरोबर जाण्यास तयार झालीं यांत आश्चर्य नाहीं. अशाप्रकारें सर्व गांव त्या पालखीबरोबर निघाला !

ही सर्व सिद्धता झाली तों दुसरी एक निराळीच अडचण उपस्थित झाली. ती ही कीं, याच दिवशीं पाटलाच्या घरीं या निमित्तानें ग्रामप्रयोजन करण्याचें योजिलें होतें; आणि त्याप्रमाणें सर्वांस आमंत्रणें देऊन आठ नऊ वाजण्याच्या सुमारास सर्व स्वयंपाक तयार करविला होता. इकडे घरांत सर्व स्वयंपाक तयार होऊन पानें मांडण्याची अवधि राहिली होती, तों तिकडे वर सांगितल्याप्रमाणें विचित्र घटना घडून येतांच सर्व लोक यड्डूरास जाण्यास निघाले ! मग या तयार केलेल्या अन्नाची वाट काय ! हा मोठा बिकट प्रश्न पाटलापुढें येऊन पडला. केलेलें अन्न लोकांना जेवूं घालून मग यड्डूरास जावें असें सांगावें; तर ज्या देवाच्या प्राणप्रतिष्ठेकरितां हें प्रयोजन केलें, तो यड्डूरच्या वाटेस लागून त्याची पालखी गांवाबाहेर पडलेली ! ती परत फिरवावी कशी व आणून संध्याकाळपर्यंत त्याची स्थापना कोठें करावी ? हें मोठेंच कोडें होतें. शिवाय नुकताच घडलेला सर्व प्रकार डोळ्यापुढें होताच, तद्यांत पुनः पालखी परत फिरविणें तर मुळींच शक्य नव्हतें. बरें पालखी तेथेंच ठेवून सर्वांनीं जेवण करून मग मार्गास लागावें म्हटलें ; तर देवास अशाप्रकारें वाटेवर बसवून वाटेल तसें वर्तन करणारे विचित्र लोक त्या धर्मभोळ्यांसमाजांत सांपडणें शक्य नव्हते. शेवटीं सर्वानुमतें असें ठरलें कीं, ' तें अन्नसुद्धां पालखीबरोबर घेऊन निघावें व यड्डूरक्षेत्रांत देवाची प्राणप्रतिष्ठा करून मग तेथेंच प्रयोजन उरकावें ! हा बेत ठरण्याचा अवकाश तों कामास सुरवात झालीच. त्यावेळीं यड्डूरपर्यंत गाडीरस्ता नीट नसल्यामुळें तीनचारशें जवान स्त्रीपुरुषांनीं स्नान करून येऊन तें खंडोगणंति अन्न निरनिराळ्या भांड्यांत व हाऱ्यांत भरून डोक्यावर घेतलें ! पुढें मोठ्या समारंभानें पालखी निघाली असून मागें पक्वान्नांचें भारवाहक शेकडों लोकांचा समूह हळूहळू चालला आहे अशा प्रकारची ही अद्भुत यात्रा निघालेली पाहून रस्त्यावर लागणाऱ्या सर्व गांवाच्या लोकांनाही अत्यंत आश्चर्य वाटलें. व प्रत्येक गांवांतील कितीतरी भाविक लोक या यात्रेंत येऊन सामील झाले.

अशा रीतीनें सकाळीं दहा वाजण्याच्या सुमारास दानोळीहून निघालेली यात्रा पुढें पुढें हजारों लोकांचा समावेश करून घेऊन संध्याकाळच्या वेळीं यङ्कूरक्षेत्रांत श्रीवीरभद्र देवालयाजवळ येऊन दाखल झाली ! ही प्रचंड व विचित्र यात्रा पाहून यङ्कूरांतील सर्व लोकही थक्क झाले ! नंतर पाटलांनीं श्रीवीरभद्र देवाचे पुजारी श्रीकाडदेवरु मठाचे स्वामी यांना बोलावून आणून त्यांच्या हस्तें श्रीवीरभद्रदेवाच्या गर्भदेवळांत त्या मूर्तीची स्थापना केली. व षोडशोपचारें पूजा करून ही नवी मूर्ति पालखींत बसवून पालखी–उत्सव करण्यास सर्वतोपरी योग्य असल्याचें पाहून पूर्वीची मूर्ति काढून देवालयांत कायम स्थापिली व हीच देवाच्या पालखींत ठेऊन त्याचवेळीं पालखी–प्रदक्षिणोत्सव केला ! आणि नंतर श्रीस्वामीसह सर्वांचें श्रीवीरभद्र देवालयांत जेवण आटोपलें ! पुढें ती मूर्ति पूजण्यास एक भक्कम देऊळ बांधून देण्याविषयीं श्रीस्वामींनीं पाटलास सुचविल्यावरून त्यांनीं लवकरच हें उत्सवमूर्तीचें देवालय बांधविलें व पुनः एकदां येथें सहस्र भोजन घालून पाटील आपल्या गांवीं गेले; अशी आख्यायिका आहे. हींत बराच तथ्यांश असेल असें म्हणण्यास येथें आधार आहे कारण पूर्वीची उत्सवमूर्ति म्हणजे हल्लीं या उत्सवमूर्तिच्या देवळांतील सभामंडपांत स्थापिलेला ‘मुदमल्लापा’ होय व ज्याअर्थीं ही मूर्ति येथें आहे त्याअर्थीं हल्लीची उत्सवमूर्ति मागाहून आली हें उघड दिसतें, असो. अशाप्रकारें मोठ्या विचित्र घटनेनें ही उत्सवमूर्ति या देवालयांत आली असून हें देवालय तयार झालें आहे.

गर्भागारासभोंवतीं पालखीप्रदक्षिणेचा जो प्रशस्त राजमार्ग अथवा पटांगण आहे त्यास ‘राजांगण’ (कानडींत राजांगळ) म्हणतात. या राजांगणांतील दगडी फरसबंदीचें काम रामदुर्गचे श्रीमंत व्यापारी श्री. वीरबसाप्पा मरवद यांनीं सुमारें तीस वर्षांपूर्वीं स्वतःच्या खास देखरेखीखालीं करविलें. मोठ्या सभामंडपापुढें फरशींत जो शिलालेख आहे तो त्यांच्याच नांवचा आहे. या फरसबंदीच्या योगानें हें विशाल देवालय सुरेख तर

दिसतेंच; पण त्याबरोबर स्वच्छतेला अत्यंत मदत झाली आहे. फरशी नसती तर देवालयांत राहाणाऱ्या यात्रेकरूंनीं सांडलेले घाण पाणी व पावसाचें पाणी स्वच्छ वाहून न जातां जेथल्या तेथें मुरून सर्वत्र घाण सुटली असती. आणि यात्रेच्या भयंकर वर्दळींत अशा घाणींत राहाणें म्हणजे रोगास आमंत्रण देणें होय ! ही मोठी अडचण श्री. मरळद यांनीं दूर केली. ही फरसबंदी होण्याचें अगोदर पक्क्या विटा चुन्यांत उभ्या बसवून साधारण फरशी केलेली होती; परंतु तिजमध्यें सगळ्या बाजूस मोठमोठे खळगे पडून जाऊन पालखी-प्रदक्षिणेस व लोकांना जाण्या-येण्यास अत्यंत त्रास होत असे. तो या फरसबंदीनें दूर होऊन देवालय सुंदर व स्वच्छ बनलें. तथापि या फरसबंदींतही एक दोष राहून गेला आहे. या फरसबंदीच्या कोणत्याही बाजूस गटार नाहीं, त्यामुळें ओवऱ्यांतून पाणी सांडलें कीं, तें सगळीकडे पसरतें व मध्यें मध्यें केर सांचून तें तुंबून राहातें, बाजूनें वाहून जात नाहीं. या कारणानें पुष्कळ पाणी सांडल्यादिवशीं तें घाणेरडें पाणी तुडवीतच पालखीप्रदक्षिणा करावी लागते, हें योग्य नव्हे. हें पाणी लवकर वाहून न जाण्यास दुसरें एक कारण आहे. दक्षिण दरवाज्याबाहेर पटांगणांतील सर्व घाण पाणी वाहून नेणारें जें मोठें गटार आहे, तें भरून जाऊन त्यांतून पाणी मुळींच वाहात नाहीं. त्यामुळें दक्षिण-दरवाज्यासमोरची जागा फार घाण झाली आहे. हें मोठें गटार उत्तम तऱ्हेनें बांधून काढण्याकरितां कांहीं सद्गृहस्थांनीं चार वर्षांपूर्वीं नदीपर्यंत मोठी चरही खणविली; परंतु पुढें द्रव्याभावीं तें काम तसेंच पडून गेलें. असो हीं दोन्हीं कामें शेवटास नेण्याची प्रेरणा श्रीवीरभद्रदेव कोणा तरी सद्भक्ताच्या मनांत लवकर करो व हें पटांगण अधिक सुंदर व स्वच्छ होवो हीच मनीषा आहे.

श्रीउत्सवमूर्तींच्या देवळांतील लहान सभामंडपाच्या पूर्व बाजूच्या तीन नवीन कमानी बांधून वरील छावणी दुरुस्त करण्याचें काम, श्रीवीरभद्रदेवाचे परम भक्त श्रीमंत रावसाहेब रुद्राप्पा चनवीराप्पा हालप्पनवर सद-

लगें यांनीं दोन वर्षांपूर्वीं केलें आहे. त्या कमानींतून लोखंडी सळ्या बसवून मधल्या कमानींत दार लावण्याची त्यांनीं योजना केली आहे. तीही ते लवकरच पूर्ण करणार आहेत असें समजतें.

या विशाल प्राचीन देवालयाच्या निरनिराळ्या भागांच्या बांधणीसंबंधाचा हा त्रोटक इतिहास वर सांगितला आहे. यांत कित्येक ठिकाणीं ऐकीव गोष्टींवर भिस्त ठेवावी लागली, त्याला निरुपाय आहे. कारण या देवालयाचाच काय पण या क्षेत्राचाही सविस्तर इतिहास तर राहो; पण संक्षिप्त टिप्पणसुद्धां गांवच्या अगर वहिवाटदाराच्या दप्तरांत किंवा श्रीकाडदेवरु मठाच्या कागद-पत्रांत अद्याप आढळून आलें नाहीं. संगतवार ऐतिहासिक माहिती लिहून ठेवण्यांत आपल्या लोकांनीं किती हलगर्जीपणा दाखविला आहे हें इतिहास-भक्तांस निराळें सांगणें नको. अर्थात् हें देवालय किंवा हें क्षेत्र त्या ऐदीपणाला अपवाद कसें ठरेल? ठरणें शक्य नाहीं, म्हणून अशा कित्येक दंतकथावर भरंवसा ठेवणें भाग पडतें. या देवालयांत जे जे शिलालेख आहेत त्यांचा वर निर्देश केला आहे. ऐतिहासिक अंधःकारांत चांचपडत चाललेल्यांना 'शिलालेख' हे विद्युद्दीपच होत! सामान्य जनांच्या खिजगणतींत नसलेले ताम्रपट, शिलालेख व जुनीं नाणीं दृष्टीस पडतांच इतिहासभक्तांस परमानंद होतो त्याचें कारण हेंच होय. कवडीमोल वाटणाऱ्या कित्येक जुन्या कागदी चिटोऱ्यावरून अनेक ऐतिहासिक, सत्य व गूढ गोष्टींचा स्पष्ट उलगडा झाल्याचें वृत्त सर्वांना विदित आहेच. अशाच प्रकारच्या कांहीं मातीमोल समजल्या गेलेल्या परंतु सध्यां अमूल्य ठरलेल्या कागदी चिटोऱ्यांचा उल्लेख पुढें नवव्या भागांतील एका प्रकरणांत केला आहे तो पहावा. गर्भदेवळाच्या इतिहासाचा हवाला पुढील भागावर देऊन हे तर्कवितर्क येथेंच थांबवावे हें बरें.

## पूजा व पालखी-उत्सव

श्रीवीरभद्र देवाची पूजा आणि श्रीउत्सवमूर्तीची पूजा व त्याची पालखींतून मध्यभागाभोंवतीं सर्व सरंजामासह मिरवणूक ही नित्य त्रिकाळ निय-

मानें निरंतर होत असते. अशा प्रकारची नित्याची तीन वेळ होणारी पूजा व पालखी-उत्सव हीं आसपास शेंदीडशें मैलांच्या प्रदेशांतील दुसऱ्या कोणत्याही प्रख्यात देवालयांतून अगर मठांतूनसुद्धां आज मितीस इतक्या नियमितपणानें दररोज होत असल्याचें कोणाच्या ऐकण्यांत नसेल! तेव्हां अपूर्व भक्तीचा असा हा पूजा व उत्सवाचा परमोच्च समारंभ या देवालयांत आज अनेक वर्षें कसा अखंडित चालला आहे याचें आश्चर्य वाटल्याशिवाय राहात नाहीं. दोनचारशें रुपये उत्पन्नाचीं देवळांची अगर मठांची गोष्ट बाजूस ठेविली आणि हजारों रुपये दरसाल उत्पन्न असलेल्या संपत्तिमान् देवालयांकडे किंवा मठाकडे नजर फेंकिली तर तेथेंही सणावारांच्या दिवशीं किंवा आठवड्यांतून एकाद्या ठराविक दिवशीं फक्त एक वेळ त्या त्या देवांच्या उत्सवमूर्तीची फक्त त्या देवळांभोंवतीं पालखी-प्रदक्षिणोत्सव होण्याची किती मारामार पडते याचा अनुभव सर्वांना असेलच; मग दररोजच्या आणि त्यांतही त्रिकाल पालखी-प्रदक्षिणोत्सवाची गोष्ट बोलावयासच नको! या श्रीवीरभद्र देवाचे जसे अनेक वतनदार सेवेकरी आहेत त्याचप्रमाणें प्रत्येक मोठमोठ्या देवालयांना व मठांना वतनदार सेवेकरी असतात. व त्यांजकडे मोठमोठ्या उत्पन्नाच्या जमिनी चालत असतात. असे असतांही कोठें देवाची पालखी दुरुस्त नाहीं, तर कोठें भोई हजर नाहींत, कोठें घडशी, तव्वलजी वगैरे वादनकार आले नाहींत म्हणून, तर आणखी कोठें देवाच्या सेवेकरी कलावंतिणींना येण्यास सवड नाहीं, अशा अनेक सबबींनीं प्रत्येक ठिकाणीं हा आठवड्याचा एक वेळचा पालखी-प्रदक्षिणोत्सवसुद्धां नीटपणें होत नाहीं हें आपण पाहतों; त्यावरून येथें दररोज तीन वेळां न चुकतां सर्व सरंजामासह होणारा पालखी-महोत्सव अप्रतिम नव्हे काय? तेव्हां असा हा पालखी-महोत्सव कोणकोणत्या वेळीं व कसा होतो हें आपणास माहीत असणें अवश्य आहे.

श्रीवीरभद्रदेव व उत्सवमूर्ति यांची पूजा आणि पालखी-उत्सव यांची एकमेकांशीं जवळ जवळ सांगड घालून रोजचा कार्यक्रम ठरविला आहे.

श्रीवीरभद्र देवालयांतील सेवकांसह—



श्री उत्सवमूर्तींचा पालखीमहोत्सव ( पालखीसेवा ), श्रीक्षेत्र यड्डूर.

मनोरंजन प्रेस, मुंबई.

मानें निरंतर होत असते. अशा प्रकारची नित्याची तीन वेळ होणारी पूजा व पालखी-उत्सव हीं आसपास शेंदीडशें मैलांच्या प्रदेशांतील दुसऱ्या कोणत्याही प्रख्यात देवालयांतून अगर मठांतूनसुद्धां आज मितीस इतक्या नियमितपणानें दररोज होत असल्याचें कोणाच्या ऐकण्यांत नसेल! तेव्हां अपूर्व भक्तीचा असा हा पूजा व उत्सवाचा परमोच्च समारंभ या देवालयांत आज अनेक वर्षे कसा अखंडित चालला आहे याचें आश्चर्य वाटल्याशिवाय राहात नाहीं. दोनचारशें रुपये उत्पन्नाचीं देवळांची अगर मठांची गोष्ट बाजूस ठेविली आणि हजारों रुपये दरसाल उत्पन्न असलेल्या संपत्तिमान् देवालयांकडे किंवा मठाकडे नजर फेंकिली तर तेथेंही सणावारांच्या दिवशीं किंवा आठवड्यांतून एकाद्या ठराविक दिवशीं फक्त एक वेळ त्या त्या देवांच्या उत्सवमूर्तीची फक्त त्या देवळांभोंवतीं पालखी-प्रदक्षिणोत्सव होण्याची किती मारामार पडते याचा अनुभव सर्वांना असेलच; मग दररोजच्या आणि त्यांतही त्रिकाल पालखी-प्रदक्षिणोत्सवाची गोष्ट बोलावयासच नको! या श्रीवीरभद्र देवाचे जसे अनेक वतनदार सेवेकरी आहेत त्याचप्रमाणें प्रत्येक मोठमोठ्या देवालयांना व मठांना वतनदार सेवेकरी असतात. व त्यांजकडे मोठमोठ्या उत्पन्नाच्या जमिनी चालत असतात. असे असतांही कोठें देवाची पालखी दुरुस्त नाहीं, तर कोठें भोई हजर नाहींत, कोठें घडशी, तब्बलजी वगैरे वादनकार आले नाहींत म्हणून, तर आणखी कोठें देवाच्या सेवेकरी कलावंतिणींना येण्यास सवड नाहीं, अशा अनेक सबबींनीं प्रत्येक ठिकाणीं हा आठवड्याचा एक वेळचा पालखी-प्रदक्षिणोत्सवसुद्धां नीटपणें होत नाहीं हें आपण पाहतों; त्यावरून येथें दररोज तीन वेळां न चुकतां सर्व सरंजामासह होणारा पालखी-महोत्सव अप्रतिम नव्हे काय? तेव्हां असा हा पालखी-महोत्सव कोणकोणत्या वेळीं व कसा होतो हें आपणास माहीत असणें अवश्य आहे.

श्रीवीरभद्रदेव व उत्सवमूर्ति यांची पूजा आणि पालखी-उत्सव यांची एकमेकांशीं जवळ जवळ सांगड घालून रोजचा कार्यक्रम ठरविला आहे.



श्री उत्सवमूर्तींचा पालखीमहोत्सव ( पालखीसेवा ), श्रीक्षेत्र यड्डर.

मनोरंजन प्रेस, मुंबई.



श्रीउत्सवमूर्ति.

मनोरंजन प्रेस, मुंबई.

वरील दोन्ही देवांची दररोज प्रातःकाळीं माध्यान्हीं व सायंकाळीं अशी त्रिकाळ पूजा होत असते. सकाळची पूजा दररोज आठ नऊ वाजण्याच्या दरम्यान संपून महानैवेद्य होतो. नंतर लागलीच सकाळचा पालखी-प्रदक्षिणोत्सव सुरू होतो. यावेळीं पालखीबरोबर उत्सवमूर्तीचा पुजारी व पालखीचे भोई यांशिवाय करंडी-ढोल-वाले, घडशी, शमनमृदंग्या, नायकिणी, गुरवमृदंग्या, श्रृंगी, भृंगी, नेपेरी आणि चोपदार इत्यादि सर्व सेवक हजर असतात. या सर्वांसह पटांगणांतून मध्यभागाभोंवतीं मोठ्या समारंभानें पालखीच्या तीन प्रदक्षिणा सावकाशीनें होतात. सुरवातीस उत्सवमूर्ति पालखींत बसविल्याबरोबर ती वाजत गाजत नेऊन प्रथम मोठ्या सभामंडपापुढें उभी करितात; व तेथें पालखीसमोर भृंगी याचें श्रीवीरभद्र-पराक्रम-वर्णनपर श्रीकाडसिद्धेश्वराच्या भविष्य-वचनांचें कानडी गाणें तबला व तालांच्या ठेक्यांत होतें. आद्य श्रीकाडसिद्धेश्वरांनीं खास पालखीपुढें म्हणण्याकरितांच अशीं भविष्य-वचनांचीं व श्रीविरभद्र-पराक्रमवर्णनांचीं अनेक गाणीं रचिलीं असून त्या सर्व सुरस व बोधप्रद कवनांचें बाड भृंगी यांजकडे आहे. परंतु हीं बोधवचनें जुन्या कानडी भाषेंत असल्यामुळें आणि खुद्द भृंगी-घराण्यांत सुशिक्षित माणसांचा अभाव असून प्रचलित कानडी भाषा उत्तम जाणणाऱ्यांनासुद्धां जुनी भाषा दुर्बोध असल्याकारणानें या अप्रतिम बोधवचनांचें बाड अप्रसिद्ध स्थितींत राहिलें आहे. त्यांतील कांहीं सुबोध-वचनें मात्र परंपरेनें पाठ करीत आल्याकरणानें भृंगी घराण्यांतल्या सर्व पुरुषांना तोंडपाठ आहेत. बाकीचें सर्व बाड उजेडांत आणिल्यास एका प्रख्यात शिवावतारी साधु पुरुषाच्या अमृतमय काव्य-वचनांचा जीर्णोद्धार केल्याचें श्रेय मिळेल, असो.

सदरील भविष्यवचनांचें गाणें संपतांच 'हर हर महादेव' असा घोष करून पालखी मिरवणूक पुढें चालूं होते. याचप्रमाणें पुढें अनुक्रमें दक्षिण दरवाज्याजवळ, उत्सवमूर्तीच्या देवळासमोर, मध्यभागाच्या वायव्य कोपऱ्याजवळ व शेवटीं त्याच्या उत्तर दरवाज्यासमोर अशा चार ठिकाणीं चार मजलसी होतात.

म्हणजे प्रत्येक प्रदक्षिणेच्यावेळीं एकंदर पांच ठिकाणीं पालखी उभी करितात म्हणजे पांच मजलसी होतात. प्रथम आठ मजलसींत प्रारंभीं भृंगी हे भविष्यवचनांचें गाणें वर सांगितल्याप्रमाणें म्हणतात. नंतर आठ मजलसींत नायकिणींचीं गाणीं म्हटलीं जातात. नायकिणीबरोबर शमन-मृदंग्या तबल्याची साथ करितो व साजिंद्या सारंगी वाजवितो. प्रत्येक मजलस संपून पालखी चालू झाली कीं, ती पुन्हां थांबेपर्यंत मध्यंतरीं करंडी-ढोलवाले, घडशी, शृंगी, नेंपेरी या सर्वांच्या वाद्यांचा सारखा गजर चालू असतो, पण पालखी उभी राहातांच हे सर्व स्तब्ध राहतात आणि मग भृंगी अगर नायकिणींचीं गाणीं होतात.

अशा प्रकारें मोठ्या समारंभानें मध्यभागाभोंवतीं तीन प्रदक्षिणा होतांच सरतेशेवटीं पालखी उत्सवमूर्तीच्या देवळापुढें म्हणजे तेथील लहान सभामंडपासमोर जाऊन उभी राहते; नंतर भृंगी त्या वचनांतीलच एक आरती म्हणतो. आरती संपतांच सर्व लोक ‘ हर हर महादेव ’ अशी गर्जना करितात; तोंच पालखीबरोबर असलेला पुजारी उत्सवमूर्ती पालखींतून उचलून नेऊन देवळांत पूजास्थानीं आसनावर ठेवितो; व सर्वांना पानसुपारीचा प्रसाद वांटितो; इतकें झालें कीं, ही प्रातःकालची सेवा संपली. हा एवढा कार्यक्रम संपण्यास सुमारें दोन तास लागतात. व साडे दहा अकरा वाजतां हा उत्सव आटपतो.

या पालखी–उत्सवाच्यावेळीं प्रत्येक मजलसींत पालखी उभी राहातांच तिजपुढें रात्रीं व दिवसासुद्धां भक्त लोक कापूर, ऊद वगैरे जाळीत असतात. कित्येक भक्त, अत्यंत प्रेमानें श्रीवीरभद्र देवाच्या वीरवृत्तीचें व शौर्यधैर्यादिकांचें दिव्य स्तोत्र म्हणजे ‘ स्तुतिपाठ ’ ( यांना कानडी भाषेंत ‘वडब’ असें म्हणतात ) मोठ्या वीरश्रीनें म्हणत असतात. या स्तुतिपाठ म्हणणाऱ्या भक्तांना ‘ पुरंत ’ किंवा ‘ पुरवंत ’ असें म्हणतात. यांना ही पुरवंतदीक्षा, लग्नापूर्वीं श्रीवीरभद्र-भक्तांना जो ‘गुग्गुळ’ काढावा लागतो त्या गुग्गुळांत अग्नि प्रदीप्त करण्यापूर्वीं घ्यावी लागते. ही पुरंतदीक्षा

घेणाऱ्यांना देव, गुरु व अग्नि यांचें समक्ष कांहीं धार्मिक नियम आजन्म पाळण्याविषयीं शपथ घ्यावी लागते. तेव्हां गुरूकडून मंत्रोपदेश होऊन मग त्याचवेळीं एक लहानसा स्तुतिपाठ सांगून त्याजकडून पाठ म्हणवून घेतला जातो. ही दीक्षा घेऊन जे पुरंत होतात त्यांनीं कोठें कोणत्याहि जातींतील इसमांचे गुग्गुळ निघालेले असोत. ते दृष्टीस पडतांच शुचिर्भूतपणानें येऊन त्यापुढें एकादा स्तुतिपाठ म्हटलाच पाहिजे; त्याशिवाय पुढें जाऊं नये असा निर्बंध आहे. सवड असल्यास ते गुग्गुळ समाप्त होईपर्यंत त्याबरोबर असलें पाहिजे असा नियम आहे. आणि ज्यांनीं अशी पुरवंत दीक्षा घेतली असेल त्यांनींच हे स्तुतिपाठ शुचिर्भूत असतेवेळीं म्हणावे, इतरांनीं म्हणूं नयेत; असाही पण नियम आहे. आणि या पुरंतांनीं सुद्धां हे स्तुतिपाठ कोणत्याही ठिकाणीं श्रीवीरभद्र देवालयांत अगर शिवालयांत किंवा गुग्गुळ अगर श्रीवीरभद्र-उत्सव किंवा शिवोत्सव-प्रसंगीं मात्र म्हणावे; भलत्या स्थळीं भलत्या प्रसंगीं मलीनपणांत म्हणूं नयेत; व त्या स्तुतिपाठांचा दुरुपयोग किंवा उपहास करूं नये व होऊं देऊं नये; असा कडक निर्बंध आहे. यावरून या स्तुतिपाठांविषयीं किती पवित्रता ठेवावी लागते हें निराळें सांगणें नको. कोणतीहि पारमार्थिक अथवा व्यवहारविषयक उच्च विद्या प्राप्त होऊन ती लाभदायक होण्यास तिजाविषयीं अशीं आदरबुद्धि बाळगून पवित्रता राखावीच लागते, तेव्हां ती साध्य व फलदायक होते असा सिद्धांत आहे. हा नियम या स्तुतिपाठांनाहीं लागू आहे. म्हणून याविषयीं सर्वांनीं योग्य ती दक्षता ठेवावी हेंच हितकारक होय. कित्येक वेळीं श्रीवीरभद्र देवाच्या पालखीपुढें व. सांगितल्या प्रकारचे स्तुतिपाठ म्हणणारे पुरंत पुष्कळ जमतात. यात्रेच्या वेळीं तर यांची खूपच गर्दी होते. मग एकमेकांची स्तुतिपाठ म्हणण्यांत अहमहमिका सुरू होते. या चढाओढीमुळें भृग्यांचें अगर नायकिणींचें गाणें लवकर आटपून किंवा बंद ठेवून त्यांना म्हणण्यास अवसर देण्याची पाळी येते! आणि यामुळें यात्रेच्या दिवसांत केव्हां केव्हां सकाळचा पालखी—प्रदक्षिणोत्सव संपण्यास

चार चार तासमुद्धां लागतात ! तथापि हे स्तुतिपाठ ऐकण्यानें आबालवृद्धांना श्रीवीरभद्र-चरित्राची व पौराणिक कथांची साहजिक माहिती होते, व देव, धर्म इत्यादिकांवरील श्रद्धा दृढ होऊन त्यांच्या मनावर फारच हितकारक परिणाम घडतो, याकरितां पालखी–प्रदक्षिणेस तास दोन तास उशीर झाला तरी कांहीं चिंता नाहीं असें सर्वांस वाटतें, म्हणून पुजारी अगर सेवक केव्हांही गड्बड करीत नाहींत. आणि कांहीं कारणानें ते गडबड करूं लागले तरी भक्तलोक आग्रहानें पालखी थांबवितात. असा परस्पर प्रेमाचा व श्रद्धेचा झगडा येथें चालत असतो.

या स्तुतिपाठांशिवाय कित्येक प्रसंगीं पालखीपुढें पुष्कळ भक्तजन उपदेशपर लावण्या व पदेंही म्हणत असतात. मात्र शृंगारविषयक अचकटविचकट पदें किंवा लावण्या म्हणण्यास कडक निर्बंध असतो; पण कोणी उमटपणानें म्हणूं लागलाच तर त्याला गचांडी देऊन घालवून देतात किंवा पालखी उचलून पुढें चालवितात म्हणजे त्याची वटवट आपोआप बंद होते. असा प्रकार क्वचित् घडत असतो.

अशा प्रकारें मोठ्या थाटमाटानें सकाळचा पालखी प्रदक्षिणोत्सव संपल्याबरोबर अर्ध्या तासाच्या आंत दोन्ही देवांची माध्यान्ह पूजा संपून महानैवेद्य होतो. नंतर लागलीच दुपारीं दुसऱ्या वेळेची पालखीसेवा सुरू होते. या सेवेच्या वेळीं पालखी कोठेंही थांबत नाहीं. म्हणूत भृंगी अगर नायकिणी यांचीं गाणीं म्हटलीं जात नाहींत व ते सेवक पालखीबरोबर असतही नाहींत. फक्त शृंगी, नेपेरी, करडी–ढोलवाले व घडशी हे सेवक आपलीं वाद्यें वाजवीत पालखीपुढें चालत असतात. उत्सवमूर्तीचा पुजारी व भोई यांना तर केव्हांही सुटका नाहीं. आणि यांपैकीं एकादा हजर नसल्यास पालखी सेवाच थांबवावी लागणार यास्तव यांतला कोणी बहुधा गैरहजर राहात नाहीं. जरी राहण्याची पाळी आली तर बदली मनुष्य देतात. तेव्हां इतक्या नियमित सेवकांसह हा माध्यान्ह-पालखी-प्रदक्षिणोत्सव होतो. हा जेवणानंतर शतपावली–निमित्त होणारा श्रीवीरभद्रदेवाचा

अश्वारोहणयुक्त पालखी—प्रदक्षिणोत्सव होय, असा समज असल्यामुळें केव्हां केव्हां हे सर्व सेवक सावकाश न चालतां जलद चालतात इतकेंच नव्हेतर कित्येक वेळां पालखीसह धांवून तीन्ही प्रदक्षिणा पूर्ण करितात ! अशा प्रसंगीं पालखी पळवीत नेत असतांना पुढें चालणारे सर्व वादनकार आपआपलीं वाद्यें वाजवीत धांवत असतात. ही धांवपळीची प्रदक्षिणा फारच मौजेची दिसते. अशाप्रकारें तीन प्रदक्षिणा घालून शेवटीं उत्सवमूर्ति देवळांत नेऊन पूर्वींप्रमाणेंच पूजास्थानीं बसवितात.

या पालखीप्रदक्षिणेच्यावेळीं भक्त लोक बरोबर असत नाहींत हें उघडच आहे. तथापि कांहीं तरुण भक्तिवान् पुरुष मौजेनें पालखीबरोबर धांवत असतात. यावरून दुपारीं होणाऱ्या या प्रदक्षिणांना पालखी—उत्सव म्हणण्यापेक्षां हा देवाचा शतपावलीकरितां सहज होणारा फेरफटका होय; असें म्हणणें जास्त सयुक्तिक दिसतें.

ही दुपारची सेवा संपतांच उत्सवमूर्ति तेथेंच ठेविलेल्या ( मागील वर्णनांत सांगितलेल्या ) छप्परपलंगावर भद्रकाळीसह निजावितात. व त्याच शय्येवर पायथ्याशीं उत्सवमूर्तिपुढील दोन्ही नंदी बसवून सर्वांवर रेशमी वस्त्राचें पांघरूण घालून पूजारी त्या देवळाचें दार बंद करितो. हें दार सायंकाळपर्यंत म्हणजे सुमारें पांच साडेपांच वाजेपर्यंत बंद असतें. दुपारची सेवा संपतांच रात्रीच्या सेवेपर्यंत पुजाऱ्याशिवाय बाकीच्या सेवकांना कांहीं काम नसतें. या रिकाम्या वेळीं कोणा भक्ताकडे प्रयोजन असल्यास त्याची तयारी होईपर्यंत जंगम व गुरव वगैरे सेवक उत्सवमूर्तीच्या देवालयांतील सभामंडपांत गप्पा मारीत बसतात. कोठें जेवण नसल्यास आपापल्या घरीं जेवणास व शेतकामास निघून जातात. दोघां पुजाऱ्यांना मात्र देवालय सोडून जातां येत नाहीं; कारण यावेळीं देवदर्शनास येणाऱ्या भक्तांना तीर्थ, प्रसाद व आशीर्वाद देऊन दक्षिणारूपी खंडणी वसूल करावयाची असते ! हे दोघे पुजारी, श्रीवीरभद्र देवांचे हक्कदार पुजारी जे श्रीकाडदेवरु—मठाचे पट्टचरमूर्ति स्वामी, त्यांचे पगारी नोकर होत; म्हणून त्यांन ।

दोन्ही देवांपुढील येईल तें सर्व उत्पन्न काळजीपूर्वक जमा करून रोजच्या रोज मठांत पोहोंचतें करावयाचें असतें. याकरितां देवळांतून बाहेर जाऊन भागत नाहीं. हे दोघे श्रीचरमूर्ति स्वामींचे नोकर असल्याकारणानें ज्यावेळीं देवाल्यांत अगर गांवांत कोठेंही कोणा भक्तांचें जेवणाचें आमंत्रण नसतें त्यावेळीं आणि दररोज दोन्ही वेळ स्वामीच्या मठांत जेवीत असतात. मात्र जेवण होतांच इतराप्रमाणें कामधंद्यांस न जातां देवालयांत बसावें लागतें. आणि त्यास देवाच्या सांयकाळच्या पूजेची तयारी करावी लागते.

संध्याकाळीं सुमारें पांच वाजतां सर्व देवांची तृतीय पूजा सोंवळ्यानें करण्यास सुरवात होते. कोणत्याही पूजेच्या वेळीं दोघां पुजाऱ्यांनीं नदीस्नान करून आल्यानें गंगोदक आणून अगदीं शुचिर्भूतपणानें पूजा केली पाहिजे. दोन्ही देवांच्या गाभाऱ्यांत ओंवळेपणीं मुळींच प्रवेश-करितां येत नसल्या कारणानें तेथें मलीनपणाला यत्किंचित् वाव मिळत नाहीं झणूनच श्रीवीरभद्रदेवाचें गर्भदेऊळ अथवा गाभार सर्वदा स्वच्छ व पवित्र दिसतो. स्वतः पुजारी केव्हांही ओंवळेपणानें आंत जात नाहीं किंवा गलिच्छपणा करीत नाहीं. आणि दुसऱ्या कोणाला तसें करूं देत नाहीं. यामुळें श्रीवीरभद्रलिंगाची पूजा करण्याकरितां कोणालाही गाभाऱ्यांत प्रवेश करावयाचें असल्यास नदीस्नान करून ओल्यानेंच आलें पाहिजे, त्याशिवाय पूजारी आंत सोडीत नाहीं. गाभाऱ्याला अस्वच्छतेचा स्पर्शसुद्धां होऊं नये म्हणून इतका कडक निर्बंध ठेवून तो कडकपणानेंच पाळिला जातो. सायंकाळची ही पूजा रात्रीं सात वाजतां संपते. नंतर दोन्हीं ठिकाणीं पुजारी पंचारती, कर्पूरारती, काकड-आरती वगैरे करितात. ह्या आरत्या होण्यास सुमारें एक तास लागतो. यावेळीं श्रीवीरभद्रलिंगाजवळच्या पुजाऱ्याबरोबर आरती वगैरे म्हणण्यास पेठेंतील भाविक व्यापारी व जंगम मिळून दहा बारा इसम नित्य, धूतवस्त्रें अंगावर घेऊन, हातपाय इत्यादि स्वच्छ धुऊन, भस्म लावून शुचिर्भूत होऊन येत असतात.

अशा स्वच्छतेनें आलेले सर्व लोक यज्ञकुंडांत खालीं गाभाऱ्यासमोर रांगेनें उभे राहातात. व ओंवळ्यानें आलेले सर्व लोक आणि स्त्रिया वरच्या प्रदक्षिणा मार्गावर राहातात. यज्ञकुंडांत राहिलेल्यांपैकीं कोणी झांज वाजवितो, कोणी ताल वाजवितो, कोणी घंटा व कोणी करतल वाजवितो पुजारी गाभाऱ्यामध्यें लिंगासमोर उभा राहून प्रथम धूप घालून धूपारती ओवाळितो, नंतर नीरांजन, एकारती, पंचारती, काकड–आरती आणि शेवटीं कर्पूरारती ओवाळीत असतो. व त्याचवेळीं तोंडानें त्या त्यासंबंधीं आरत्या म्हणत असतो व त्याचेबरोबर यज्ञकुंडांत उभे असलेले सर्व लोकही आरत्या म्हणत असतात. आरतीनंतर मंत्रपुष्पांजळी होऊन सर्व लोक खालीं बसतात. मग अष्टकें, मानसपूजा व शेवटीं शिवाष्टोत्तरशत नामावळी आणि श्रीवीरभद्राष्टोत्तरशत नामावळी म्हणून श्रीवीरभद्रदेवाच्या जयजयकारांत हा मंत्रघोष थांबतो. नंतर सर्वांना विभूति, तीर्थ व प्रसाद दिल्यानंतर हा कार्यक्रम आटपतो. या कार्यक्रमाला सुमारें एक तास लागतो.

श्रीउत्सवमूर्तीच्या देवळांतही याच क्रमानें आरती वगैरे होते, परंतु तेथें इतर भक्त लोक विशेष असत नाहींत. म्हणून सर्व प्रकार पुजाऱ्यालाच करावे लागतात. हा सर्व कार्यक्रम आटपल्यानंतर महानैवेद्य होऊन ही तिसरीपूजा समाप्त होते. मग रात्रीं नऊ वाजण्याच्या सुमारास तिसरा पालखी–प्रदक्षिणोत्सव सुरू होतो. यावेळीं पालखीबरोबर सकाळच्या पालखी–उत्सवाप्रमाणेंच सर्व सेवेकरी असून शिवाय दोघे मशालजी जास्त असतात. सकाळप्रमाणें पांच ठिकाणीं पालखी थांबून मजलसी होतात. तींत क्रमानें प्रथम भृंगी व नंतर नायकिणींकडून गाणीं म्हटलीं जातात. या सेवेच्या वेळीं सकाळच्या पेक्षां जास्त भक्त लोक हजर असतात, व तेव्हां पालखीपुढें कापूर, ऊद लावून कोणी कोणी ‘ स्तुतिपाठ ’ म्हणत असतात. दुसरे कित्येक भक्त पालखीपुढें साखर वांटितात. बहुतेक सर्व मोठ्या सणांच्या दिवशीं रात्रीं पालखीपुढें साखर वांटिली जाते;

पण त्यांतही विजया दशमी, आश्विन वद्य अमावास्या, कार्तिक शुद्ध १, फाल्गुन वद्य ३० आणि वर्षप्रतिपदा या पांच तिथींस रात्रीं पालखीपुढें कित्येक मण साखर वांटली जाते! ही साखर वांटण्यापूर्वीं तिसऱ्या प्रद-क्षिणेच्या शेवटीं मोठ्या सभामंडपापुढें विशाल पटांगणांत धावळी पसरून तीवर पालखी ठेवितात. नंतर तिजसमोर वादनकारांच्या एक दोन गति भृंगी यांचें वचन, नायकिणींचीं गाणीं, स्तुतिपाठ, देवतास्तुतिविषयक लावण्या व पदें इत्यादि क्रमानें होतात. तोंपर्यंत साखर वांटणारे सर्व भक्त आपापल्या शक्त्यनुसार साखर आणून तिचा पालखीपुढें एक ढीग घालून ठेवितात. तास दोन तासांत सर्व गाणें बजावणें संपल्यानंतर सर्वांस ती साखर वाटून पालखी उचलतात व सकाळच्याप्रमाणें शेवटीं आरती करून, उत्सवमूर्ति देवळांत निजवून प्रसाद देतात; तेव्हां हा तृतीय उत्सव समाप्त होतो व सर्व लोक आपापल्या घरीं निघून जातात. अशा प्रकारचा त्रिकाळ पूजोत्सवाचा हा अपूर्व सोहळा या देवालयांत प्राचीन काळापासून अव्याहत चालत आला आहे.

प्रत्येक सोमवारीं पालखी-उत्सवाचा सोहळा जरा विशेष प्रकारचा होतो. या दिवशीं सकाळीं पालखी उत्सवाचे वेळीं उत्सवमूर्ति श्रीकाड-सिद्धेश्वराच्या दर्शनाकरितां त्यांच्या मठास जात असते. त्याकरितां देवालयांत दोन प्रदक्षिणा पूर्ण होतांच तिसऱ्या प्रदाक्षिणेच्या वेळीं, पूर्वेक-कडील महाद्वारांतून पालखी देवालयाबाहेर नेतात आणि देवालयाच्या उजव्या बाजूनें ( दक्षिण दिशेकडून ) पश्चिमेस जवळच नदीपाणोथ्यावर ब्रह्मा, अदृश्येश्वर इत्यादि लहान लहान देवळें आहेत त्यांना वळसा घालून पालखी पुढें चालवितात व क्षेत्र यड्डूर गांवाच्या मध्यभागीं श्रीकाडदेवरू-मठासमोर असलेल्या ' श्रीपंचलिंगेश्वरा ' च्या देवळापुढें थांबवितात. येथपर्यंत मार्गांत महाद्वार, दक्षिणदरवाजा; ब्रह्मदेव, अदृश्येश्वर व जुनावाडा यांसमोर पांच ठिकाणीं नायकिणींच्या गाण्यांच्या मजलसी होतात. पुढें श्रीपंचलिंगेश्वराच्या देवळासमोर एकदां व त्याच्या आग्नेय आणि नैर्ऋत्य

दिशांस एकेकदां अशा तीन ठिकाणीं नायकिणींची गाणीं होऊन पालखी श्रीकाडदेवरू–मठाच्या दिवाणखान्या ( सदरे ) पुढें जाऊन उभी राहाते. तेथें श्रीचरमूर्तिस्वामी शुचिर्भूतपणानें पालखीजवळ येऊन उत्सवमूर्तींची संक्षिप्त पूजा करितात व दिवाण–खान्यांत जाऊन सिंहासनावर बसतात. तोंपर्यंत भृंगी एक ठराविक वचन तबला व तालाच्या ठेक्यांत ह्मणत असतो. तें संपताच पालखी उचलून श्रीपंचलिंगेश्वर देवळाच्या ईशान्य कोपऱ्याजवळ उभी करितात. येथें नायकिणीचें एक गाणें होतें. येथून पालखी जी निघते, ती थेट श्रीवीरभद्रदेवालयाच्या महाद्वारापुढील डावी-कडच्या दीपमाळेजवळ जाऊन थांबते. येथें नायकिणींच्या गाण्यांच्या दोन मजलसी होतात; महाद्वारासमोर मात्र भृंगी एक वचन म्हणतो, या तीन मजलसी आटपतांच पालखी महाद्वारांतून देवालयांत नेतात. पुढें उत्स-वमूर्तींच्या देवळासमोर नेहमींप्रमाणें भृंगी यांनीं आरती म्हटली कीं, 'हर-हर महादेव ' च्या गर्जनेंत उत्सवमूर्ति देवळांत नेऊन प्रसाद वांटितात. म्हणजे हा सकाळचा पालखी–प्रदक्षिणोत्सव संपतो. दुपारची व रात्रीची सेवा नेहमींप्रमाणेंच होते.

सोमवारीं पालखी श्रीकाडदेवरूमठास नेली नाहीं तर श्रीवीरभद्रदेवास भयंकर ताप होतो, व तो निरनिराळ्या उत्पाताच्या रूपानें व्यक्त होतो; असा पूर्ण अनुभव आहे. हें असें कां होतें, व पालखी दर सोमवारीं मठास कां न्यावी लागते याचें कारण पुढें पांचव्या भागांत सविस्तर दिलेंच आहे; तथापि येथें जातां जातां इतकें सांगितलें पाहिजे कीं, श्रीवीरभद्रदेवास दक्षयज्ञसंहाराच्या वेळीं जो भयंकर ताप झाला, त्याच्या शमनार्थ श्रीशंकराचें व सद्गुरूचें दर्शन निरंतर घडलें पाहिजे. त्यांत अंतर घडल्यास तो संताप भडकून उत्पातरूपानें व्यक्त होतो असा भाविकांचा दृढविश्वास आहे; आणि या कारणानेंच प्रत्येक सोमवारीं श्रीअदृश्येश्वराचें दर्शन घेऊन श्रीकाडसिद्धेश्वराच्या दर्शनाकरितां पालखींतून श्रीउत्सवमूर्ति–रूपानें श्रीवीर-भद्रदेव मठास जात असतो.

पूर्वकाळीं प्रत्येक सोमवारीं सकाळीं श्रीउत्सवमूर्तीची पालखी यड्डूरक्षेत्राच्या थेट उत्तरेस सुमारें एक मैलावर असलेल्या 'चंदूर' नामक खेड्याजवळील 'श्रीचंद्रेश्वर' अथवा 'अदृश्येश्वर' या देवाच्या दर्शनास सोबतच्या नेहमींच्या सर्व समारंभासह जात असे. व तेथें त्या देवळाभोंवतीं येथल्याप्रमाणेंच वचन व गाणें बजावण्यांसह तीन प्रदक्षिणा करून मग उत्सवमूर्ति यड्डूरांत काडदेवरूमठास घेऊन येत असत. येथें श्रीचरमूर्तिस्वामींनीं त्याची संक्षिप्त पूजा केल्यानंतर मग नेहमींच्या मार्गानें श्रीवीरभद्रदेवालयांत आणीत असत असें वृद्धलोक सांगतात. आणि ज्या रस्त्यानें त्या काळीं पालखी श्रीचंद्रेश्वरास जाई, त्याला हल्लींसुद्धां लोक 'पालखी-रस्ता' असें म्हणतात. या सांप्रत दिसणाऱ्या स्मारकचिन्हावरून ही गोष्ट सत्य असावी अशी खात्री पटते. या दर आठवड्याच्या दूरच्या पालखी प्रदक्षिणेनें भोयांच्या मानगुटी सुजून दुखत असत. केव्हां केव्हां खरचटून त्यांना जखमा होत असत. अशाप्रकारें पालखीभोयांना व इतर सेवकांनाहि फार त्रास होत असे. पुढें एकेवेळीं श्रीचरमूर्ति स्वामींना श्रीअदृश्येश्वराचा असा दृष्टांत झाला कीं, 'प्रत्येक सोमवारीं माझ्या भेटीस येण्यानें श्रीवीरभद्रदेवाच्या सेवकांना फार त्रास होतो; तरी तेथें यड्डूर क्षेत्रांतच माझ्या नांवाचें अदृश्येश्वरालिंग स्थापून त्याचें दर्शन घेत जावें' हा दृष्टांत शिरसा मान्य करून तत्कालीन चरमूर्ति स्वामींनीं श्रीवीरभद्रदेवालयाच्या मागील (पश्चिम) बाजूस एक लहानसें देऊळ बांधून त्यांत श्रीअदृश्येश्वर-लिंगाची स्थापना केली. आणि दर सोमवारीं चंदूर येथील चंद्रेश्वराऐवजीं याच लिंगाच्या दर्शनास पालखींतून उत्सवमूर्ति जाऊं लागली! तेव्हांपासून चंदूरची तासिक प्रदक्षिणा चुकली. म्हणून हल्लीं पालखी चंद्रेश्वरास जात नाहीं.

## पालखी महोत्सवाचे विशेष प्रकार.

नित्य त्रिकाळच्या व साप्ताहिक सोमवारीं सकाळच्या विशेष प्रकारच्या पालखी-महोत्सवाशिवाय प्रत्येक मोठमोठ्या सणांच्या दिवशीं आणि इतर

कांहीं ठराविक तिर्थांस श्रीवीभद्रदेवाच्या उत्सवमूर्तीची पालखी मोठ्या समारंभानें मिरवीत देवालयाबाहेर नेण्याचा प्रघात प्राचीन काळापासून पडला आहे. ती प्रत्येक महिन्यांतील सणावारास व तिर्थांस कोठें कोण-त्यावेळीं जाते हें प्रस्तुत लेखकास प्रत्यक्ष अवलोकनानें माहीत झालें आहे. श्रीवीरभद्रदेवाच्या कृपेनें या क्षेत्रांत चार वर्षे कायम वास्तव्य करण्याचा योग लेखकास लाभला होता; त्या अल्पावधींत पालखी–महोत्सवाच्या प्रत्येक प्रसंगी उत्सवमूर्तीबरोबर राहून श्रीवीरभद्रदेवाची सेवा करण्याचा सुयोग लाभत गेल्यानें व त्यांतील एकही संधी वायां न दवडूं दिल्या कार-णानें त्या त्या प्रसंगांची खडानखडा माहिती लेखकास झाली आहे. व त्यांविषयीं त्यास आदर वाटत आहे. म्हणून इतर भक्तजनांसही अशा एकाद्या प्रसंगी यड्डर क्षेत्रांत हजर राहण्याचा योग आल्यास त्या सेवेचा त्यांस सुखास्वाद घेतां यावा म्हणून मुख्य मुख्य विशेष प्रकारानें घडणाऱ्या पालखी-महोत्सवांची महिन्यांच्या अनुक्रमानें थोडक्यांत माहिती खालीं देण्यांत येत आहे. करितां ज्या ज्या वाचकांस त्या संधीस येथें राहण्याचा योग येईल त्यांनीं ती वायां दवडूं नये, असें आग्रहपूर्वक सुचवून पुढील वर्णनाकडे वळूं. वर्णनाच्या सोईकरितां कार्तिक शुद्ध प्रतिपदेपासून घड-णाऱ्या विशेष उत्सवांची माहिती सांगण्यास सुरवात केलेली बरी.

कार्तिकमास—शुद्ध पतिपदा ( बलिप्रतिपदा ) या दिवशीं सकाळीं नेहमींच्या मार्गानें पालखी श्रीकाडदेवरू–मठास जाऊन येते; व याच दिवशीं माध्यान्ह सेवेची फक्त तिसरी ( शेवटची ) प्रदक्षिणा श्रीवीरभद्र देवालयांत न संपतां देवालयाबाहेरून त्वरेनें होते. रात्रीची सेवा मात्र नेहमींप्रमाणें होते.

पांडव-पंचमीस—सकाळच्या सेवेच्या वेळीं पालखी नेहमींच्या मार्गानें मठास जाऊन येते.

मार्गशीर्ष मास—या महिन्यांत कोणतेही महत्वाचे सण नाहींत. म्ह-णून नेहमींप्रमाणें सेवा होते.

'पौषमास—मकर सक्रांतीच्या दिवशीं सकाळीं नेहमींच्या मार्गानें पालखी मठास गेल्यानंतर तेथून देवालयास परत न जातां श्रीउत्सवमूर्ति गंगास्नाना· करितां नदीवर नेतात. या वेळीं पालखीबरोबर श्रीचरमूर्तिस्वामी वहिवाटदार व इतर सर्व पुढारी लोकही नदी–स्नानास येतात. हा सर्व सोहळा नदीच्या कांठीं आल्यानंतर तेथें नदी–किनाऱ्यावर धावळी आंथरून तीवर पालखी ठेवितात. व आंतील नंदी वगैरेसह श्रीउत्सव-मूर्ति बाहेर काढितात. त्या सर्वांवरचीं उंचीं वस्त्रें व दाग–दागिने काढून ठेवून प्रत्येक जण एकेक मूर्ति हातांत धरून नदींत प्रवेश करितो. तेथें प्रत्येक देवास तीळ, हळद व अत्तर लावून तैलाभ्यंगस्नान घालितात. नंतर कागदी लिंबाच्या रसानें मूर्ति स्वच्छ करून पुन्हा प्रवाहांत बुडवून शुद्धोदकानें स्नान घालितात. इतकें झाल्यावर त्यावेळीं पालखीबरोबर नदी–स्नानास आलेल्या श्रीस्वामीसह प्रत्येक पुरुषाच्या डोकीवर मूर्ति ठेवून त्यांसह पाण्यांत बुडी मारण्यास पुजारी सांगत असतो. बुडी मारण्याच्या अगोदर प्रत्येकजण मूर्तींच्या अंगास थोडे तीळ वगैरे लावून उरलेले आपल्या आंगास लावून घेतो. याप्रमाणें नदीमध्यें स्नान करीत असतांना पुजारी संकल्प सांगत असतो, व भक्त लोक त्यास दक्षिणा देत असतात. सर्वांचें या प्रकारें तिलस्नान झाल्यावर श्रीउत्सवमूर्तीसह सर्व देव पूर्वींप्रमाणें पालखींत बसवून त्यांच्या अंगावर भरजरी पेहराव व अलंकार घालितात. पालखी उचलण्यापूर्वीं दोघां पुजाऱ्यांसह इतर सर्व जंगमांस व सेवेकऱ्यांस येथील वहिवाटदार दक्षिणा देतो. मग मोठ्या समारंभानें पालखी संक्रांतिकट्टयावर नेऊन ठेवितात. 'संक्रांति-, कट्टा' म्हणजे श्री-वरिभद्र-देवालयाच्या नैर्ऋत्य कोपऱ्यास सुमारें शंभर कदमांवर क्षेत्र-यडूरच्या पाणोथ्याच्या मोठ्या रस्त्या-लगत उजव्या बाजूस चार फूट उंच व आठदहा फूट लांब रुंद असा चौरसाकृति दगडी चौथरा आहे तो होय. त्यावर संक्रांतीच्या दिवशीं पालखी बसवितात म्हणून त्यास संक्रांति-कट्टा म्हणतात. पालखी येथें ठेविल्यानंतर याच ठिकाणीं दुपा-

रची सेवा होते. व रात्रीची तृतीय सेवाही सर्व सेवेकऱ्यांसह येथेंच होते. मात्र या दोन्ही सेवेच्या वेळीं पालखी चौथऱ्यावरून न उचलितां तिच्या पुढें उभें राहूनच वादनकार, भृंगी व नायकिणींच्या मजलसी होतात. सदरी चौथऱ्यावर या दिवशीं आम्रपल्लवांचा सुंदर मंटप घालून शोभा आणिलेली असते.

सायंकाळच्या वेळीं या गांवांतील आणि मांजरी, अंकली, कल्लोळ, चंदूर, टाकळी इत्यादि जवळपासच्या खेड्यांतील लोक संक्रांति–निमित्त श्री·वीरभद्र-देवाच्या व उत्सव–मूर्तींच्या दर्शनास येतात. यामुळें या दिवशीं पालखीपुढें मोठी यात्रा भरत असते. येथील दोन्ही देवांस शर्करायुक्त तिळगूळ अर्पण केल्याशिवाय कोणीही एकमेकांस देत नाहींत असा येथें सांप्रदाय आहे, व हा फार चांगला आहे. या दिवशींचा हा सर्व सोहळा शक्य असेल त्यानें अवश्य पाहावा. रात्रीं आठ नऊ वाजल्यानंतर ही संक्रांतिकट्ट्यापुढील यात्रेची गर्दी कमी होते. नंतर रात्रीं सेवा होऊन तेथून पालखी उचलितात. आणि मोठ्या समारंभानें पूर्व-महादरवाज्यानें पालखी देवालयांत आणितात.

माघ मास— शुद्धपौर्णिमेच्या दिवशी सकाळीं, नेहमींच्या मार्गानें पालखी मठास जाऊन येते. रात्रीं सेवेच्या वेळीं तिसऱ्या प्रदक्षिणेस पालखी देवालयाबाहेर नेऊन नेहमींच्या मार्गानेंच परंतु मठाकडे न नेतां थेट रुद्रपादाजवळ नेतात. तेथें पालखीपुढें सुमारें दीड तासपर्यंत सर्वांची सेवा ह्मणजे, गाणें बजावण्यांच्या मजलसी होऊन शेवटी भृंगी हा एक ठराविक भविष्यवचन ह्मणतो. नंतर पालखी उचलून रुद्रपादास व नंदीच्या देवळास प्रदक्षिणा घालून मोठ्या समारंभानें देवालयांत आणितात.

महाशिवरात्रि व वद्य अमावास्या या दोन्ही दिवशीं सकाळीं पालखी मठास जाऊन येत असते.

फाल्गुनमास— पालखी–सेवेसंबंधानें फाल्गुनमास फारच धामधुमीचा असतो. होळी–पौर्णिमेदिवशीं सकाळीं नेहमींच्या मार्गानें पालखी

मठास जाऊन येते; परंतु येथें हें विशेष आहे कीं, येथील होलिकोत्सव पौर्णिमेदिवशीं न होतां दुसऱ्या दिवशीं ह्मणजे धुळवडीच्या दिवशीं होतो. याचें कारण पौराणिक कालीं श्रीवीरभद्रदेवाचा भद्रकालीशीं होळी—पौर्णिमेदिवशींच विवाह झाला आहे हें होय. ह्मणून या दिवशीं सकाळीं श्रीवरिभद्रदेवाचा गुग्गुळ निघत असतो, आणि संध्याकाळीं लग्न होतें, असा श्रीवीरभद्रचरित्रांत उल्लेख असल्यानें या दिवशीं होलिकोत्सव ह्मणजे काम—दहन करीत नाहींत. याकरितां तो उत्सव दुसऱ्या दिवशीं करावा अशी वीरभद्र चरित्रांत आज्ञा आहे. याविषयीं सविस्तर वर्णन पुढें चौथ्या भागांत दिलेलेंच आहे, तें पाहावें. यास्तव दरसाल या दिवशीं सकाळीं श्रीवीरभद्र—देवाकरितां गुग्गुळ काढण्याची वहिवाट आहे. या देवाकरितां काढाव्या लागणाऱ्या गुग्गुळाचा सर्व खर्च अलीकडे निपाणीचे श्रीमान् व्यापारी श्रीयुत गुरलिंगाप्पा सिद्दाप्पा आडके हे देत असतात. व दरवर्षीं स्वतः हजर राहून ह्या गुग्गुळाचा सोहळा शेवटास नेत असतात. असा प्रकार आज सुमारें १५ वर्षें त्यानीं चालविलेला आहे, हें त्यांस भूषणास्पद आहे.

वद्य १ ( धुळवड ) या दिवशीं फक्त क्षेत्र यड्डूरांतच होलिकोत्सव होत असतो. रात्रीं सेवेच्या वेळीं नेहमींच्या मार्गानें पालखी प्रथम मठास जाते. व तेथून श्रीपंचलिंगेश्वरापुढील होळी पेटविल्यानंतर परभारें रुद्र-पादास जाते. मग त्या ठिकाणीं माघी पौर्णिमेप्रमाणें सर्वांची सेवा व वचन ( भविष्यवचनांचें ठराविक गाणें ) म्हटल्यानंतर तेथील होळी पेटवून मोठ्या समारंभानें पालखी देवालयास परत येते.

वद्य द्वितीया ते चैत्र शुद्ध प्रतिपदा ( वर्षप्रतिपदा ) अखेर पर्यंतचा कार्यक्रम असा आहेः—या दिवसांत दररोज सकाळच्या सेवेच्या वेळीं नेहमींच्या मार्गानें पालखी मठास जाऊन येत असते आणि दुपारच्या सेवेच्या वेळची फक्त शेवटची तिसरी प्रदक्षिणा श्री-वीरभद्र-देवालया बाहेरून मोठ्या समारंभानें होते. याच दिवसांत वद्य द्वितीयेपासून वद्य १० अखेर ९ दिवस रात्रीं सेवेच्या वेळींही तिसरी प्रदक्षिणा देवा-

लयाबाहेरून समारंभानें झाली पाहिजे; मात्र या वेळीं पालखी मठास जात नाहीं. या नऊ दिवसांत पुजाऱ्यांसह सर्व सेवेकऱ्यांना येथीस वहिवाटदारानें दररोज १ ढेप याप्रमाणें ९ दिवसांत ९ ढेपा गूळ देण्याची वहिवाट आहे. सेवेकऱ्यांच्या विशेष मेहनतविद्दल हें गुळाच्या ढेपांचें बक्षीस असावें ! श्रीवीरभद्रदेव लौकिकरीत्या तरी कोणाची क्षुल्लक सेवाही फुकट घेत नाहीं. मोठ्या (मेहेनतीच्या) सेवेबद्दल जमिनी तोडून दिलेल्या असतांही यःकश्चित् सेवेबद्दलही ज्या त्या वेळीं बिदागी दिली जाते. यावरून असें वाटतें कीं, श्रीवीरभद्र देव हे या गांवचे इनामदार असल्या कारणानें त्यांना कोणाकडूनही फुकट सेवा घेणें आवडत नसेल ! याविषयीं सविस्तर उहापोह पुढें येणार असल्यानें तूर्त इतकेंच पुरें.

चैत्रमास— वर्ष प्रतिपदे दिवशींसकाळीं नेहमींच्या मार्गानें पालखी मठास जाते. व दुपारीं फक्त देवालयाभोंवतीं मोठ्या समारंभानें एक प्रदक्षिणा होते. हें वर सांगितलें आहे. याशिवाय या महिन्यांत विशेष पालखी–उत्सव नाहींत.

तथापि या चैत्र महिन्यांतच शुद्ध १० पासून शुद्ध पौर्णिमेअखेर सहा दिवस मोठी यात्रा भरत असते. दहा बारा वर्षांपूर्वी दुष्काळजन्य महागाई वगैरे कारणानें यात्रा फारच कमी भरूं लागली; व जी यात्रा भरे, ती सुद्धां एक ठराविक वेळीं न भरतां पौष वद्य ३० म्हणजे विशाळी अमावास्येपासून वैशाख वद्य अमावास्येपर्यंत थोडथोडी यात्रा येत जात असे. तेव्हा ती खंडशः होणारी यात्रा कोणत्यातरी एकाच वेळेला जमावी म्हणून या गांवच्या सर्व पुढाऱ्यांनीं विचार करून आधुनिक काळच्या वहिवाटीप्रमाणें येथलि भक्तिप्रधान यात्रेला श्रीक्षेत्र चिंचलींप्रमाणें जनावरांच्या खरेदी–विक्रीचें व्यापारी स्वरूप दिलें. त्यामुळें वरील सहा दिवसांत पूर्वीपेक्षां फारच मोठी यात्रा भरूं लागली आहे. या जनावरांच्या यात्रेची समाप्ति चैत्र शुद्ध पौर्णिमा म्हणजे महादेव–पौर्णिमेदिवशीं होते.

त्या दिवशीं येथें अत्यंत गर्दी जमते. तेव्हां सुमारें ५०।६० हजार लोक समुदाय तरी जमत असावा! ही यात्रा संपली तरी देवतार्चन व गणाराधनेकरितां येणाऱ्या भक्तांची थोडथोडी यात्रा वैशाख वद्य अमावास्या अगर ज्येष्ठी पौर्णिमेपर्यंत येत असतेच.

यात्रेचे हे दिवस कडक उन्हाळ्याचे आहेत. या दिवसांत येथें नदीचें पाणी अत्यंत स्वच्छ असतें. वसंतऋतूच्या आगमनानें येथील वनांतील वनश्री नुकतीच प्रफुल्ल झालेली असल्यानें त्या हिरव्यागार वृक्षांच्या छायेखालीं मंद व शीतल वायु वाहात असतो. मळी जमिनींतील पिकांना याच दिवसांत बहार येत असतो; त्यामुळें नदीच्या दोहों थडीला दिसणारा हिरवागार देखावा पाहून अतीशय आनंद होतो. दूधदुभतें, भाजीपाला, फळफळावळ व जनावरांना दाणावैरण यांचीही या दिवसांत येथें समृद्धि असल्यानें ही यात्रा लोकांना फार सुखकर होते. कोणाची कसलीही गैरसोय होत नाहीं यामुळें सालोसाल ही यात्रा फारच मोठ्या प्रमाणांत भरत चालली आहे.

वैशाख मास—अक्षय्यतृतयेिस सकाळीं नेहमींच्या मार्गानें पालखी मठास जाऊन येते.

ज्येष्ठ मास—या महिन्यांतील पौर्णिमेच्या सुमारास ज्या दिवशीं ज्येष्ठा नक्षत्र असतें, त्या म्हणजे बेंदराच्या दिवशीं सकाळच्या सेवेस पालखी मठास जाऊन येते.

आषाढ मास—पालखीउत्सवाचे विशेष प्रकार नाहींत. नेहमींप्रमाणें सेवा होते.

श्रावण मास—शुद्ध १ या दिवशीं सकाळीं सूर्योदयापूर्वीं पालखी मठास जाऊन येते. फाल्गुन मासाप्रमाणें हा श्रावण महिनाही पालखी-सेवेसंबंधानें बराच धामधुमीचा आहे. या महिन्याच्या शुद्ध १ पासून भाद्रपद शुद्ध १ अखेरपर्यंत दोन्ही देवांची सकाळची पूजा व प्रातःकालचा पालखी-प्रदक्षिणोत्सव हीं दररोज सूर्योदयापूर्वींच संपलीं पाहिजेत असा नियम

आहे; आणि प्रत्येक श्रावण सोमवारीं शुद्ध १ प्रमाणेंच सकाळीं सूर्योदया-च्या आंत पालखी मठास जाऊन आली पाहिजे. शिवाय प्रत्येक सोमवारीं दुपारच्या सेवेची शेवटची प्रदक्षिणा मठास न जातां फक्त देवालयाबाहेरून होते; परंतु ही घाईनें न होतां दुपारचे १२ वाजल्यापासून ३ वाजेपर्यंत मोठ्या थाटानें व सावकाशपणानें पुरी होते. यावेळीं केव्हा केव्हां देवाल-याबाहेर पालखीपुढें होनकरू पहिलवानांच्या कुस्त्या, दांडपट्याचे व बोथा-टीचे हात आणि कसरतीचे खेळ वगैरे होत असतात. आणि अशा होतकरू जवानांना उत्तेजनार्थ देवाचा प्रसाद ( नारळ खारका इ. ) देत असतात.

सेवेच्या वेळेप्रमाणेंच या महिन्यांत महानैवेद्यांतही बदल होतो. सका-ळचा अर्थात् या महिन्यांतील पहाटेचा महानैवेद्य नुसत्या भाताचा न करितां दररोज एक शेर गव्हाच्या मिष्टान्नाचा ( बहुधा मलिद्याचा ) करितात. प्रथमारंभीं शुद्ध प्रतिपदेदिवशीं प्रातःकालचा महानैवेद्य तीन शेर मलिद्याचा करावा लागतो. व हा देवास दाखवून आणितांच सर्व सेवेकऱ्यांना थोडा थोडा वांटून देतात. इतर दिवसांचा कोणास वांटावयाचा नसून तो नेह-मींप्रमाणें श्रीचरमूर्तिस्वामींच्या मठास पोंचता करावा लागतो, परंतु पुजारी केव्हां केव्हां प्रसाद म्हणून थोडथोडा मलिदा रोज गांवांतील मुख्य मुख्य घराण्यांना देत असतो व महिनाअखेरपर्यंत रावापासून रंकापर्यंत बहुधा सर्वांना हा प्रसाद एकदां तरी पोंचतोच. हा प्रसाद या क्षेत्रांतील सर्व लोक मोठ्या आवडीनें, आदरानें व भक्तीनें ग्रहण करितात. या महिन्यां-तील दुपारच्या व संध्याकाळच्या महानैवेद्यास हा नियम लागू नाहीं, तो नेहमींप्रमाणें एक शेर भाताचाच होतो.

भाद्रपद मास—शुद्ध प्रतिपदेदिवशीं पहाटेस पालखी मठास जाऊन येते हें मागें सांगितलें आहे. या दिवशीं रात्रीं तृतीय पालखी-महोत्सवाच्या वेळीं ती देवालयाबाहेर जाऊन नेहमींच्या मार्गानें पण मठास न जातां थेट रुद्रपादास जाते; व तेथें सुमारें तास दीड तासपर्यंत सर्वांची सेवा ( मज-लसी वगैरे ) होऊन भृंगी यांचें ठराविक वचन म्हणून संपतांच नारळ

फोडून तेथेंच प्रसाद वांटितात मग पालखी सगारंभासह देवालयांत येते; याप्रमाणें दरसाल तीन वेळां ( माघ शुद्ध १५, फाल्गुन वद्य १ व भाद्रपद शु. १ अशा तीन तिथींस ) रात्रीं पालखी रुद्रपादास जात असते.

गणेशचतुर्थी व गौरीपूजनाच्या दिवशीं सकाळीं पालखी मठास जाऊन येत असते.

आश्विन मास—शुद्ध प्रतिपदेच्या ( घटस्थापनेच्या ) दिवशीं आणि शुद्ध ८ ( दुर्गाअष्टमी अगर जागराच्या ) दिवशीं पालखी सकाळीं मठास जाऊन येत असते.

खंडेनवमी आणि विजयादशमी ह्या दोन्ही एकाच दिवशीं आलेल्या असोत अथवा निरनिराळ्या दिवशीं येवोत, त्यांपैकीं फक्त विजया-दशमी दिवशीं सकाळीं पालखी नेहमींच्या मार्गानें मठास जाऊन येते. या दिवशीं माध्यान्ह सेवा मुद्दामच जरा उशीरानें म्हणजे सुमारें ४वाजतां दुपारीं सुरू करितात; परंतु या सेवेच्या दोन प्रदक्षिणा पुऱ्या होतांच तिसऱ्या प्रदक्षिणेस सायंकाळीं सुमारें पांच वाजतां नेहमींच्या रस्त्यानें पालखी प्रथम मठास जाते; नंतर तेथून जी निघते ती श्रीवीरभद्र देवालयास व पेठेस वळसा घालून वनांतून त्वरेनें मळीच्या रस्यास लागते. त्या रस्त्यानें पश्चिमेस अर्धा पाऊण मैल जाऊन नंतर शेतांतून उभ्यां पिकांमधून सर्व सरंजामासह ती मोठ्या वेगानें दोन मैलांचा फेरा घालून क्षेत्र येडूरच्या ईशान्य दिशेस यडूरवाडीच्या रस्त्यावर चौगुल्याच्या शेतांत जाते तेथें गेल्यानंतर घावळी अंथरून तीवर पालखी ठेवितात. पालखी तेथें येण्यापूर्वींच श्रीचरमूर्ति—स्वामी, वहिवाटदार, पाटील, कुलकर्णी, चौगला, मगदूम व दोन्ही गांवांतील इतर सर्व प्रमुख लोक येऊन राहिलेले असतात. सर्व लोक जमल्यानंतर पालखीपुढें सर्व सेवकांच्या मजलसी होतात. त्यावेळींही भृंगी एक ठराविक वचन ह्मणतो. ही सर्वांची सेवा संपल्यानंतर विधिपूर्वक शमीपूजन करून सर्व लोक सोनें लुटतात. व श्रीउत्सवमूर्तीस सोनें वाहून पालखी उचलितात. आणि पूर्वींप्रमाणेंच पालखी मोठ्या वेगानें पिकांमधून थेट

पूर्व-दिशेस यङ्करच्या सीमेपलीकडे मांजरी गांवच्या हद्दींत १०।२० पावलें नेऊन सीमोल्लंघन करितात. परंतु या वेळीं वर सांगितलेले सर्व प्रमुख लोक पालखीबरोबर असत नाहींत हें उघडच आहे. ते सर्व लोक चौगुल्याच्या शेतांतूनच सरळ रस्त्यानें गांवाकडे जातात. व श्रीवीरभद्र देवाचें दर्शन घेऊन घरोघरीं जातात. तथापि पाखलीबरोबर शेंदोनशें लोकांचा जमाव असतोंच. त्या सर्व लवाजम्यासह त्याच दौंडीनें पालखी मांजरीच्या हद्दींतून गांवाकडे परतवून ती जुन्या यङ्करच्या महार-वाड्यांतील थळोबा व लक्ष्मीच्या देवळांपुढें नेऊन थांबवितात. तेथें महारसुवासिनी देवास आरती ओवाळितात. त्या पालखी येण्यापूर्वींच हातांत आरत्या घेऊन तेथें रांगेनें राहिलेल्या असतात. नंतर त्यांनीं आणिलेली साखर, खारका, केळीं अगर नारळा हे जिन्नस देवास नैवेद्य दाखवून पुजारी प्रसाद ह्मणून त्यांना परत देतात. वास्तविक पाहातां गुणकर्मांवर वर्णव्यवस्था अवलंबून असतांना रूढि-प्राबल्यानें जन्मावरच जातिजातींत उच्चनीचपणा मानण्याचें आधुनिक हिंदुधर्मांत घुसडलें गेलेलें अनिष्ट लचांड निदान या विवक्षित ठिकाणीं तरी निर्मूल करण्याचें कृत्य श्रीवीरभद्रदेवानें प्रत्यक्ष आचरणांत आणिलेलें पाहून कोणास आनंद वाटणार नाहीं? इतकेंच नव्हे, तर देवाजवळ स्पर्श-अस्पर्श हा भेद मुळींच नसून सर्व जातींचा नैवेद्यसुद्धा देव आवडीनें ग्रहण करितात. हें येथें स्पष्ट दिसून येतें! असो. वर सांगितलेला देवाचा प्रसाद घेतल्यानंतर या दिवशीं सर्व महार मंडळींचें जेवण होतें. तोंपर्यंत एकही महार जेवीत नाहीं असें म्हणतात! या मागासलेल्या लोकांतील ही निष्ठा ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. सर्वांना प्रसाद दिल्यानंतर तेथून पालखी उचलून ती जवळच असलेल्या जुन्या यङ्कर गांवांतील श्री मारुती रायाच्या देवळांत आणून आसनावर ठेवितात. इतकें होईतों रात्रीचे सुमारें आठ वाजतात. नंतर ९ वाजण्याचे सुमारास त्याच ठिकाणीं रात्रीची पालखी-सेवा सुरू होते. त्यावेळीं जुन्या यङ्करांतील बहुतेक सर्व लोक पालखीपुढें साखर वांटतात. हें सर्व संपल्यावर सुमारें बारा वाजतां सरंजामासह पालखी देवालयांत येते.

या वेळची पाहण्यासारखी दुसरी विशेष मौज ही कीं, जेव्हां पालखी उभ्या पिकांतून त्वरेनें जात असते; त्या वेळीं तिजबरोबर पळत असलेले दीडदोनशें लोक ज्वारीच्या पिकाचे वीत दीड वितीचे शेंडे कडाकड मोडून पालखीवर एकसारखे उडवीत व तोंडानें ' हर हर महादेव ' अशी गर्जना करीत पळत असतात; तेव्हां ज्याप्रमाणें लग्नमंडपांत वधूवरांवर विवाहसमयीं चोहोंकडून मंगलाक्षतांचा वर्षाव होतो त्याप्रमाणें या वेळीं पळतां पळतां पालखीवर सर्व बाजूनें होणारा ज्वारीच्या कोमल तृणांचा वर्षाव पाहून अत्यंत गंमत वाटते; पण आश्चर्य हें कीं, पालखी निघून गेलेल्या ठिकाणीं तिजबरोबरच्या लोकांनीं तुडवून मोडून नासाडी केलेल्या प्रत्येक धाटास अनेक कोंब फुटून चार चार पांच पांचपर्यंत भक्कम कणसें हमखास येतात. असा दरसालचा अनुभव आहे, म्हणून हल्लीं येथील शेतकरी लोक " आमच्या शेतांतून पालखी न्या. आमच्या शेतांमधून उत्सव-मूर्ति जाऊं द्या " असा पुजाऱ्यास आग्रह करीत असतात. अशा प्रकारचा विजयादशमीचा हा येथील पालखी-महोत्सव अत्यंत प्रेक्षणीय व अपूर्व होतो. असा दुसरीकडे बहुधा कोठें पाहण्यास मिळावयाचा नाहीं. करितां प्रत्येकानें तो एकदां तरी अवश्य पाहवा.

या महिन्यांतील भूदेवीपूजेच्या दिवशीं ( पौर्णिमेच्या सुमारास अश्विनी नक्षत्र ज्या दिवशीं असेल त्या दिवशीं ) तसेंच वद्य १३ ( धन त्रयोदशी अगर ब्रह्मपूजा ) या दिवशीं आणि वद्य १४ ( नरक चतुर्दशी ) दिवशीं सकाळीं नेहमींच्या मार्गानें-पालखी मठास जाऊन येते.

येणेंप्रमाणें दरसालच्या पालखी महोत्सवाचा हा विशाल कार्यक्रम आहे. आतां कोणी असें म्हणतील कीं, वर सांगितलेला हा सर्व सोहळा श्रीउत्सवमूर्तीचा झाला; प्रत्यक्ष श्रीवीरभद्र-लिंगापुढें सर्व सेवकऱ्यांची केव्हां सेवा होते कीं नाहीं ? तर अशांना इतकेंच सांगतां येईल कीं, ज्या देवाच्या उत्सव-मूर्तीची अशा भक्तिभावानें उत्तम प्रकारें सेवा केली जाते. तेथें मुख्य देवास विसरणें कधीं शक्य आहे काय ? मुळींच नाहीं. श्रीं-

वीरभद्रलिंगाच्या अथवा ईश्वर-लिंगाच्या दररोजच्या पूजेचा थाटच मोठा अपूर्व असा आहे. त्यासंबंधानें मागें थोडेसें सांगितलेलें आहे. तरी आणखी ज्या कांहीं विशेष प्रकारच्या पूजा होतात त्याविषयीं थोडें लिहूं.

दररोज सकाळीं पुजारी नदीस्नान करून ओल्यानें येतो. व गाभाऱ्याचा दरवाजा उघडून रात्रीची पूजा विसर्जन करून बरोबर आणिलेल्या शुद्धोदकानें ईश्वरलिंगाला स्नान घालितो. नंतर कवच, नागफणा इत्यादि रुपेरी आभरणें चढवून नंतर काकड आरती, पंचारती वगैरे मागें सांगितल्याप्रमाणें षोडशोपचारें पूजा करितो, व ९ वाजण्याच्या सुमारास महानैवेद्य होऊन पुजा संपते. यानंतर भक्तांनीं सांगितल्यास पुजारी सकाळचा रुद्राभिषेक अगर महिम्नस्तोत्राभिषेक वगैरे करितो. याच वेळीं भक्त लोक गंगास्नान करून शुचिर्भूत होऊन ओल्यानें कलश भरून घेऊन येतात. आणि लिंगावर तें पाणी घालून स्वतः पूजाही करितात. नदीस्नान न करितां ओंवळेंपणानें आलेल्याना गर्भदेवळांत येऊं देत नाहींत; अगर पूजाही करूं देत नाहींत. कारण येथील गर्भदेवळांत मलिनपणा अगदीं चालत नाहीं हें मागें सांगितलेंच आहे.

पुनः दुपारीं १२ वाजण्याच्या सुमारास दुसरी पूजा सुरू होते. व ती १-१॥ वाजतां संपून दुपारचा महानैवेद्य दाखविला जातो. शेवटीं संध्याकाळीं ५ वाजतां तृतीय पूजा सुरू होते. यावेळीं पुजारी प्रथम नागफणा कवच, वगैरे सर्व काढून ठेवितो, व नंतर शुद्धोदकानें ईश्वरलिंगास स्नान घालून धूतवस्त्रानें लिंग स्वच्छ पुसून काढितो. पिंडी अगर जलहरी यांवर कोठेंही ओलसरपणासुद्धां राहूं देत नाहीं. शाळुंकींत ( जलहरींत ) मागें सांगितलेली जीं छिद्रें आहेत, तींतील पाणीसुद्धां तें वस्त्र, स्वच्छ रुपेरी सळईनें आंत घालून पुसून काढितो. याप्रमाणें आंत बाहेर खडखडीत स्वच्छ केल्यानंतर दुसऱ्या दिवशीं सकाळपर्यंत कोणासही पाणी घालूं देत नाहीं अगर पूजा करूं देत नाहीं. लिंगावर व्रत्तिपूजा (दहींभात)अगर पानपूजा बांधावयाची असल्यास लिंगावर स्वच्छ कपडा पस-

रून तीवर वृत्तीनें श्रीशंकर-पार्वती अगर श्रीवीरभद्रमूर्ति बनवितो. आणि पानें एका चौकटींत बसवून ती चौकट द्वाराजवळ ठेवितात. परंतु या दोहों-पैकीं कोणत्याही पूजेची भानगड नसल्यास लिंग स्वच्छ पुसून झाल्यावर जलहरीवर रेशमी अगर लोंकरी वस्त्र ( गलेफ अथवा गवसणी ) घालून नंतर तीवर पुजारी बेल, फुलें, वाहातो. आणि मागें सांगितल्या-प्रमाणें आरती, मंत्रपुष्प, प्रसाद व शेवटीं महानैवेद्य होऊन सुमारें ९ वाजतां ही तृतीय पूजा समाप्त होते. मग ही सर्व पूजा विसर्जन करून पुजारी १ तासपर्यंत देवाचें अंग रगडीत बसतो आणि १० वाज-तां जलहरीवर पुन्हा रेशमी वस्त्र ( गलेफ ) घालून व पिंडीस बनातीचा टोप चढवून देवास निजवितो व गाभाऱ्याबाहेर येऊन दार पुढें ओढून घेतो.

दररोजच्या या मंगलमय पवित्र त्रिकाल पूजेशिवाय दरसाल चार वेळां म्हणजे कार्तिक शुद्ध १ ( बली प्रतिपदा ) चैत्र शुद्ध १, ( गुडी पाडवा ) विजयादशमी आणि नरकचतुर्दशी या चार सणांच्या दिवशीं सूर्योदयपूर्वीच पहाटेस श्रीवीरभद्रलिंगास सुवासिक उटणें व अत्तरें लावून ऊन पाण्यानें तैलाभ्यंग स्नान घालितात. नंतर दररोज सायंकाळप्रमाणें त्याच वेळीं लिंग स्वच्छ पुसून रुप्याचा मुखवटा, कवच, नागफणा, हीं घालून भरजरीं वस्त्रें व अलंकार देवावर चढवितात. यास महापूजा म्हणतात. ही महापूजा सायंकाळीं विसर्जन करितात. तोंपर्यंत त्या दिवशीं कसलाही अभिषेक अगर पूजा करितां येत नाहीं. ही महापूजा केल्याबरोबर नित्याच्या सायंकाळच्या पूजेप्रमाणें या दिवशीं सकाळींसुद्धां सर्व भक्त लोक येऊन पूजाऱ्याबरोबर पंचारती, काकड आरती, कर्पू-रआरती म्हणून नंतर मंत्रपुष्प करितात. शेवटीं अष्टकें, अष्टोत्तरशत-नामा-वळी म्हणून होतांच तीर्थ, विभूति व प्रसाद वाटून ही पूजा समाप्त करितात. या वेळची विशेष गोष्ट ही कीं, या चारही 'तिथींस श्रीवर-मूर्तिस्वामी पहाटेसच स्नान, लिंगपूजा वगैरे आटोपून श्रीवीरभद्रलिंगाच्या

प्रातःकालच्या पूजेस स्वतः येत असतात आणि ही प्रातःकालीन पूजा संपेपर्यंत तेथें राहून नंतर मठास निघून जात असतात.

यांपैकीं बलिप्रतिपदा व वर्षप्रतिपदा या दोन सणांच्या दिवशीं सर्व सेवेकऱ्यांना उत्सवमूर्तिशिवाय तिच्याप्रमाणें खुद्द श्रीवीरभद्र-लिंगाची सेवा करावी लागते. ती करण्याकरितां सकाळचा पालखी-प्रदक्षिणोत्सव संपल्याबरोबर सर्व सेवेकरी मध्यभागांतील मोठ्या सभामंडपांत जमतात. नंतर प्रथम गर्भ-देवळासमोर त्या मंडपांतच उभे राहून करडी, ढोलवाले व घडशी यांची मजलस होते. मग भृंगी यांचें भविष्य-वचनाचें गाणें होऊन नंतर चौघा नायकिणींची बैठक होते. याप्रमाणें सर्व छबिन्यासह सुमारें दोन तासपर्यंत ही सेवा होऊन ती एक दीड वाजतां संपते. नंतर त्याच ठिकाणीं पंचांग-पूजा करून सर्व लोक वर्षफल श्रवण करितात. शेवटीं वहिवाटदारानें सर्व सेवेकरी, जंगम आणि भट यांना दक्षिणा दिली म्हणजे हा समारंभ पुरा होतो.

अशा प्रकारचा हा पूजा व उत्सवाचा दरसालचा विशाल कार्यक्रम फार प्राचीनकालापासून आज तागायत अव्याहत चालत आला आहे. यांत केव्हांही खंड पडला नाहीं. व पडणें शक्य दिसत नाहीं. या परंपरागत सेवेंत कोठें चुकी झाल्यास ती करणाऱ्या सेवेकऱ्यांना अथवा सेवेस बुद्ध्या अडथळा आणणाऱ्या मगरूर इसमांना अनेकवेळां अत्यंत कडक शासनरूप दैवी तडाखे सोसावे लागले व लागत आहेत. म्हणून प्राचीनकाळापासून आजपर्यंत या भागांत अनेक राज्य क्रांत्या होऊन गेल्या तथापि हा गांव या देवाकडे सतत चालत आलेला आहे; व येथील पूजा व सेवाक्रम सृष्टिक्रमाप्रमाणें आज तागायत अबाधित चालला आहे. त्यास कोणाच्यानेंही अडथळा करितां आला नाहीं. हा सर्व भगवान् श्रीवीरभद्रदेवाचाच महिमा होय, यांत तिळमात्र संदेह नाहीं. अशा प्रकारची पूजा व पालखी-उत्सव इतक्या नियमितपणें काय कारणानें चालला आहे याचा विचार पुढील भागाच्या शेवटीं केला

आहे तो पहावा. तूर्त, विशाल व प्रख्यात अशा या श्रीवीरभद्रदेवालयाचे निरनिराळे भाग त्यांतील देव-देवता, त्यांची पूजा व पालखी-उत्सव यां विषयीं आपणांस जी माहिती क्षेत्रस्थ प्रसिद्ध देवता या दृष्टीनें पाहिजे होती, ती बरीच झाली आहे. शिवाय या देवालयाखेरीज आणखी जे देव, देवता आणि प्रसिद्ध स्थळें या क्षेत्र यड्डूरांत आहेत. त्यांचें दर्शन घेऊन पंचक्रोशी प्रदक्षिणा करण्याकारितां आपणांस लवकरच निघालें पाहिजे; म्हणून येथील त्रिकाळ पूजा व पालखी-महोत्सव इतक्या व्यवस्थित रीतीनें सर्वकाळ सुयंत्रित चालण्याचें मर्म कोणतें याचा पंचक्रोशी-प्रदक्षिणेनंतर याच देवालयांत येऊन शांतपणानेंच विचार केलेला बरा; यास्तव श्रीवीर-भद्रदेव व श्रीउत्सवमूर्ति यांचें पुन्हा एकदां प्रणामपूर्वक दर्शन घेऊन या देवालयाच्या दक्षिण ( नदी ) दरवाज्यानें बाहेर पडूं, व तेथें बाहेर कोण-कोणतीं देवळें आहेत तें पाहूं. कोणत्याही शिवालयांत पूर्व अथवा महाद्वा-रानें प्रवेश करून देवदर्शन केल्यानंतर दक्षिण द्वारानें बाहेर जावें असा प्रघात असल्यानें, आपणही दक्षिण दरवाज्यानें बाहेर पडलों हें योग्य झालें. आतां पुढील स्थलांच्या दर्शनास जाऊं.

# क्षेत्र यड्डूरांतील दुसरीं स्थळें

## यमाजी रुद्रो यांचें थडगें—दक्षिण महाद्वारासमोर.

सुमारें चाळीस कदमांवर येथील वहिवाटदाराचे प्रसिद्ध पूर्वज यमाजी यांचें थडगें दृष्टीस पडतें. हें सात आठ फूट लांब रुंद असून चौकोनी आहे. या थडगेवजा देवालयाचें द्वार उत्तरेकडे असून आंत मधो-मध महादेवाची पिंडी व द्वाराबाहेर नंदी आहे. या थडग्याच्या भिंतींत बाहेरील चारी बाजूंस छावणीपर्यंत लहान लहान कोनाडे केले असल्यामुळें हें थडगें विचित्र दिसतें. या थडग्याच्या थेट पश्चिमेस नदीच्या पाण्या-वर प्रसिद्ध ‘ संक्रांति-कट्टा ’ ( संक्रांतीचा ओटा ) आहे. याचें वर्णन मागें आलेंच आहे.

ब्रह्मेश्वराचें देवालय—संक्रांतिकट्टयाच्या उत्तरेस जवळच ब्रह्मेश्वराच

मोडकें देऊळ दिसतें. त्याचें द्वार उत्तरेकडे असून पडून गेलें आहे, व सर्व भिंती आणि शिखर यांत चिरा सुटून तीं कललेलीं आहेत. देवळांत एक मोठें 'ब्रह्मेश्वरलिंग' आहे. पण त्यावर कित्येक वर्षें महापुरांचा गाळ सांचून तें झांकून गेलें आहे. जेमतेम वरचा गाळ काढून फक्त पिंडी दिसेल अशी सोय केली आहे. त्याचेंच लोक दर्शन घेत असतात. हल्लीं-च्या खटल्यांतीस वादी–ब्राह्मण–भट हे या ब्रह्मेश्वराचे हक्कदार पुजारी होते असें लोक सांगतात, परंतु येथें कांहींच लभ्यांश नसल्यानें 'जातात भृंग कट सोडुनि त्या गजाचा' या चारुदत्ताच्या उद्गाराप्रमाणें सर्व भट–ब्राह्मण या देवाला सोडून निघून गेले असावेत. अशा या जीर्णावस्थेंत असलेल्या देवालयांतील श्रीब्रह्मदेवास दुरून नमस्कार करून पुढें जाण्याकारितां उत्तरे-कडे तोंड फिरवितांच जवळच १०।१२ फूट अंतरावर प्रसिद्ध—

## श्रीअदृश्येश्वराचें (अदृश्याप्पाचें) देऊळ

दिसतें. हें देऊळ लहान परंतु भक्कम आहे. लांबी रुंदी सुमारें दहा दहा फूट असून वरील शिखरासह उंची १५ फूट होईल. याचें द्वार पूर्वाभिमुख आहे. दरसाल महापुरानें येणाऱ्या गाळानें अर्धें अधिक देऊळ बुजून गेलें आहे. मात्र प्रवेशद्वारासमोरील गाळ काढून टाकून खालच्या फरशीपर्यंत पांच सहा फूट उंचीचा चौफेर गराडा घालून आंत जाण्यास पायऱ्या केल्या आहेत. पायऱ्यांवरून खालीं उतरून जातांच देवळांत मधो-मध श्रीअदृश्येश्वराचें सुबक लिंग व दाराबाहेर नंदी दिसतो. या देवाची पिंडी श्रीवीरभद्रदेवाइतकीच पण काळसर वर्णाची आहे. देवळांत दुसरें विशेष कांहीं पाहाण्यासारखें नाहीं. हा अदृश्येश्वर म्हणजे श्रीक्षेत्र चंदूर येथील श्रीचंद्रेश्वर अगर अदृश्येश्वराची प्रतिकृतीच होय. या अदृश्याप्पाची येथें स्थापना कां केली आहे याचें सविस्तर कारण मागें पालखी सेवेच्या विशेष प्रकारांत सांगितलें आहे. या देवाची श्रीवीरभद्रदेव व उत्सवमूर्ति ह्यांबरोबर त्रिकाळ पूजा करून उत्सवमूर्तींचा पुजारी तीन वेळ महानैवेद्यही दाखवीत असतो आणि दर सोमवारीं या देवाकरितांच पालखी या मार्गानें जात असते.

## श्रीचरमूर्ति स्वामींच्या पूर्वज गुरुवर्यांच्या समाधि

अदृश्येश्वराच्या देवळामागें पश्चिमेस एक बाग आहे. तींत झाडीं वगैरे विशेष नाहीं; मात्र येथील श्रीकाडदेवरू मठातील पूर्वींच्या स्वामींच्या सहा सात समाधि आहेत. या प्रत्येकांवर कोठें पादुका तर कोठें नंदी अगर लिंग स्थापिलेलें आहे. अदृशाप्पाच्या देवळालगत उत्तरेसही एक समाधि आहे. या समाधीच्या उत्तर दिशेस नदी-पाणोथ्याच्या वाटेवर मधोमध एक मोठें पिंपळाचें झाड असून, त्याच्या बुंध्याभोंवतीं वर्तुळाकार मोठा प्रशस्त असा पार बांधिलेला असून त्या पारावर झाडास टेकून दक्षिणेकडे मुख करून एक मारुतीची लहान मूर्ति बसविली आहे. हा पार सुमारें दोन फूट उच असून त्यावर चांगली फरशी केलेली आहे. पार ओलांडून जरा पुढें जातांच जवळच डावीकडे

## साधुबुवांची समाधि

दृष्टीस पडते. ही समाधि म्हणजे लहानसें देऊळच आहे. समाधीच्या मध्यभागीं चार फूट उंचीचें पूर्वाभिमुख लहान देऊळ असून आंत फक्त साधुबुवांच्या पादुका मात्र आहेत. आणि त्या पादुकानींच या देवळांतील सर्व जागा व्यापिली आहे, इतकें हें देऊळ चिमुकलें आहे! पण याच्या सभोंवतीं चारी बाजूंस प्रशस्त ओटा आहे. या ओट्यावर चांगली फरशी केली असून, या ओट्याची जमिनीपासून उंची सुमारें दोन फूट आहे. लांबी रुंदी बारा तेरा फूट आहे. या ओट्यावर व समोर पल्लवांचा चांगला मांडव घालून उन्हाळ्यांत सावली करून ठेवितात. ह्मणून संध्याकाळच्या वेळीं बरेच लोक हवा खाण्याकरितां व गप्पा मारण्याकरितां या ओट्यावर येऊन बसतात. यामुळें हा साधुबुवांचा ओटा म्हणजे, रिकामटेकड्या लोकांचा अड्डाच बनला आहे! त्या पुण्यपुरुषाच्या पवित्र समाधी जवळ बसूनही केव्हां केव्हां कित्येक दुष्टबुद्धि लोकांचे नष्ट विचार चाललेले असतात. व सुष्ट जनांच्या कुचेष्टा करून स्वतःस श्रेष्ठ ठरविण्याचा प्रयत्न करणारे पुष्कळ रिकामे शिष्टही केव्हां केव्हां या ठिकाणीं विश्रांति

येत असतात! गांवांतील बरेच सुविचारी लोकही येथें विश्रांतिस्तव पुष्कळदां बसतात ही गोष्ट विसरून चालणार नाहीं; परंतु अशांची संख्या फार थोडी, म्हणून सध्यां हें मृत सज्जनाच्या व जिवंत दुर्जनांच्या संयोगाचें स्थळ होय असें म्हणण्यास हरकत नाहीं!

येथें त्या सत्पुरुषांसंबंधानें चार शब्द लिहिल्याशिवाय पुढें जावत नाहीं. ज्या सत्पुरुषाला या पुण्यक्षेत्रांत मरण आलें व मरणोत्तरही सर्व लोक ज्याला पूज्य मानून ज्याच्या समाधीला मोठ्या भक्तीनें वंदन करितात. तो पुण्यपुरुष खरोखरच अत्यंत श्रेष्ठ दर्जाचा असला पाहिजे. त्या साधुवर्यांचें पूर्वचरित्र कांहीं उपलब्ध नाहीं; परंतु ते उत्तर हिंदुस्तानांतील कोणत्या तरी एकाद्या ठिकाणचे रहिवासी असावे असें त्यांच्या भाषेवरून समजून येत होतें असें ह्मणतात. ते या यड्डूर-क्षेत्रांत वीस बावीस वर्षें वास्तव्य करून राहिले होते. तथापि त्यांच्या ज्ञातिगोताचा इतक्या दीर्घ काळांतसुद्धां मुळींच पत्ता लागला नाहीं. कारण ते साधुबुवा अत्यंत मितभाषणी होते. ते वायफळ गप्पांत केव्हां सामील होत नसत. व कोणाशीं विशेष बोलत नसत. बोलण्याप्रमाणें ते जेवणांत अत्यंत मिताहारी होते. आणि ते कडकडीत सोवळें पाळणारे होते. त्यांची दिनचर्या लक्षात ठेवण्यासारखी होती. कोणावरही यत्किंचित् भार न घालितां प्रसिद्ध साधुपुरुष प्रापंचिक जनांच्या संन्निध राहूनही किती त्यागी, निरिच्छ व स्वावलंबी असतात याचा त्या सत्पुरुषाच्या वर्तनावरून स्पष्ट बोध होतो. तपश्चर्या करण्याकरितां घोर अरण्यांत गेलें पाहिजे अशी कोणाची समजूत असल्यास ती साफ चुकीची आहे. महान् सत्पुरुष जनसंमर्दात राहूनही कशी घोर तपश्चर्या आचरीत असतात याचा त्या साधुवर्यांच्या वागणुकीवरून उलगडा होतो. ते साधु श्रीवीरभद्र देवाच्या देवालयासमोर पेठेंतील शिव० तिप्पया हुग्गी नांवाच्या इसमाच्या घरांतील बाहेरच्या सोप्यांत राहात असत. यांचा संसार ह्मणजे अंगावरील हजार ठिगळांची एक गोधडी, भोपळ्याचा लोटा, एक फडकें व कमरेस लंगोटी इतका असे! ते दररोज पहाटे पांच वाजतां

उठून नदी स्नानास जात. तेथें प्रातर्विधि उरकून स्नान करून लोटा स्वच्छ धुऊन घेऊन श्रीवीरभद्रदेवाचें दर्शनास येत. देवदर्शन करून सोप्यापुढील अंगणांत येऊन श्रीवीरभद्र देवाकडे तोंड करून उभें राहून नंतर प्रथम जमिनीस डोकें लावून श्रीवीरभद्र देवास शंभर प्रणाम करीत; मग वायव्य, उत्तर, दक्षिण व पूर्व या चारी दिशांकडे तोंड फिरवून तितकेच प्रणाम प्रत्येक दिशेस करीत. नंतर आपल्या आसनावर जाऊन बसून थोडा वेळ ध्यान करीत. हें सर्व आटपण्यास सकाळचे १० वाजत. मग स्वारी भिक्षेस जाई. सर्व घरांना ते भिक्षेस जात. प्रत्येक घरीं भात, भाकरी, पोळी इत्यादि जें असेल तें फक्त एक घांसभर अन्न वाढून घेत. याची भिक्षा मागण्याची पद्धतही मासलेवाईक होती. ती अशी कीं, प्रत्येक घरापुढें जातांच ते उंबऱ्याजवळ हातांतील लोटा ठेवून मागें सांगितल्याप्रमाणें सारखे प्रणाम करीत रहात. एक घांसभर अन्न वाढून मिळेपर्यंत त्यांचा हा क्रम सारखा चाले. ओरडून किंवा बोलावून भिक्षा ते मागत नसत. या कारणानें पुढें पुढें साधुबुवा आपल्या घरीं भिक्षेस येण्याची लोक वाट पाहात बसत असत व त्यांना प्रणाम घालण्याची तसदी पडूं देत नसत. कोणाच्या घरीं एकादे दिवशीं प्रेमानें किंवा नजरचुकीनें पुष्कळ अन्न वाढून मिळालें कीं, जितके घांस जास्त वाढून मिळालें असतील तितके दिवसपर्यंत त्या घरीं भिक्षेस मुळींच जात नसत. त्यामुळें प्रत्येक घरवाला, साधूबुवा आपल्या घरीं दररोज भिक्षेस येणार नाहींत या भीतीने एका घासपेशां जास्त अन्न वाढीत नसे. अशा तऱ्हेनें हातांतील लोटा भरेपर्यंत भिक्षा मागून मग तें अन्न घेऊन ते नदीवर जात, तेथें ते सोबतच्या फडक्यांत घालून नदींत दहा वीस वेळ बुचकळून स्वच्छ धुऊन काढीत. शेवटीं पाणी पिळून फडक्यांत जो लगदा राही तो लोट्यांत वाढून घेऊन प्रथम सर्व दिशांस थोड-थोडें टाकीत. नंतर उरलेला आपण भक्षण करून वर पोटभर पाणी पीत; व लोटाभरून घेऊन घरीं येत. यानंतर पुनः दुसऱ्या दिवशीं त्या वेळेपर्यंत कांहीं खावयाचें अगर प्यावयाचें नाहीं असा त्यांचा नेम होता. हें जेवण आटो-

पतांच पुनः सोप्यांत येऊन बसत. अंगावरील गोधडी अगर लंगोटी-करितां कोणाकडेही याचना न करितां रस्त्यावर पडलेलीं जीर्ण फडकीं गोळा करीत, तीं स्वच्छ धुवून आणून त्यांतील तंतू उसवून त्यांचाच दोरा बनवीत, अशा दोऱ्यानें बाभळीच्या कांट्याच्या साह्यानें त्या सर्व चिंध्या एकास एक लावून शिवीत असत. अशा तऱ्हेनें तयार केलेली एक गोधडी एक लंगोटी व एक फडकें हीं त्यांजबरोबर होतीं. वस्त्र, द्रव्य, अगर इतर कोणत्याही वस्तूकरितां ते कोणापाशीं कधीं याचना करीत नसत, व कोणी आग्रहानें दिल्यास मुळींच स्वीकारीत नसत. ते अगदीं निर्व्यसनी होते; तथापि ते कधीं कधीं तंबाखू ओढीत असत. पण ती तरी दुसऱ्याकडून मागून घेऊन नव्हे निदान बिडी, काडी किंवा दुसऱ्यांनीं ओढलेला चुट्टा मागून घेऊनसुद्धां नव्हें तर जेथें पुष्कळ मंडळी जमलेली असे, त्याठिकाणीं जे लोक ज्या विड्या ओढून बाहेर फेंकून देत त्या सर्व टाकाऊ विड्या घेऊन त्यांच्या तळची अर्धवट जळालेली तंबाखू एका विडीपुरती जमल्यानंतर एकाद्या झाडाचें पान स्वतःच आणून त्याची विडी बनवून त्यांत ती तंबाखू भरीत; आणि लाह्या भाजण्याच्या भट्टयांतील विस्तव स्वतः घेऊन त्यानें ती विडी पेटवून ओढीत; व दुसऱ्या कोणास न देतां टाकून देत. इतक्या पराकाष्ठेचे निरिच्छ, स्वावलंबी व शुचिर्भूत असे हे साधु होते. हे आपण होऊन कोणाशीं बोलत नसत. व कोणास स्पर्श करीत नसत. सायंकाळच्या वेळीं जेव्हां लाह्याच्या भट्टीपुढें शेकत बसत व वरील-प्रमाणें तंबाखू ओढीत बसत तेव्हां त्यांच्याबरोबर केव्हां केव्हां येथील रामा पाथरवट या नांवाचा एक गरीब भाविक इसम बोलत बसे. हें भाषण तरी मोठें वेदांतपर असे असें मुळींच नाहीं. सदरील रामा अत्यंत गरीब असून त्याला मुलेंबाळें वगैरेचा मोठा प्रपंच होता. त्यामुळें तो आपल्या तुटपुंज्या प्रपंचाची ओढाताण कशी होत आहे याचा पाढा त्यांजपुढें वाचीत बसे. ‘ आज घरांत जोंधळे नाहींत, गुरांना चारच नाहीं; तेव्हां अशा अडचणींत काय करावें ? असे कांहींतरी प्रश्न तो त्यांना

वरचेवर करी. त्यावेळीं ते म्हणत ' रामा, देव तुमारा भला करेगा धीरसे चलना ' असें त्याचें समाधान करीत. हेंच त्यांचें स्वारस्याचें भाषण. रामानें व इतर कित्येकांनींही त्यांना आपण कोठले ? आपणास मुलेंबाळें आहेत कीं नाहींत ? इत्यादि अनेक प्रश्न विचारिले तरी ते कधीं आपली हकीकत सांगत नसत. फक्त मरणाच्या आदल्या दिवशीं संध्याकाळीं बोलत असतां ते रामास म्हणाले रामा, ' सबेरे हम् जायेंगे; ' तेव्हां रामा म्हणाला, ' आपण कोठें जाणार ? आणि आम्हांला सोडून दुसरीकडे कां जातां ? ' त्यावर त्यांनीं पुन्हा मागील वाक्यच उच्चारिलें. त्यामुळें पुढें रामानें कांहीं विचारिलें नाहीं; व त्यांनीं सांगितलें नाहीं. शिवाय बुवांचा स्वभाव रामास व इतरांस पूर्ण माहीत असल्यामुळें असे कितीही प्रश्न विचारिले असते तरी उत्तर आलें नसतें, व अशा निरुपद्रवी अप्रसिद्ध बुवांच्या जाण्यानें अगर राहण्यानें कोणाचें नफानुकसान थोडेंच होतें. म्हणून कोणास कांहीं वाटलें नाहीं. एकट्या रामाला थोडें वाईट वाटलें पण तेंही क्षणिकच. मागाहून त्याला घरच्या प्रापंचिक काळजीखालीं बुवाच्या जाण्याचा लवकर विसर पडला. पण चमत्कार हा कीं, दुसऱ्या दिवशीं आपल्या नित्य नियमाप्रयाणें बुवा श्रीवीरभद्र देवास नमस्कार घालीत असतांना शेवटच्या नमस्काराच्या वेळीं जे जमिनीवर पालथे पडले त्याचवेळीं त्यांचें प्राणोत्क्रमण झालें ! प्रथम १५।२० मिनिटें त्यांच्याकडे कोणाचें लक्ष गेलें नाहीं. कारण पेठेंतील सर्व मंडळींना त्यांचा नित्यक्रम माहीत होऊन, आंगवळणीं पडला असल्या कारणानें, तिकडे कोणी लक्ष देत नसत, तेव्हां रोजच्याप्रमाणें आजही ते नमस्कार घालीत असावेत असें वाटून ती सर्व मंडळी स्वस्थ होती. परंतु सुमारें अर्धातासपर्यंत बुवा जेव्हां उन्हांतून उठेनात, व कांहीं हालचाल करीनात; तेव्हां बरीच मंडळी हे आज असे कां पडले आहेत हें पाहण्याकरितां त्यांच्या भोंवतीं जमलीं. व त्यांना दुरून हाका मारून उठवूं लागली. पण बुवा अगदीं स्तब्ध. ते हूं का चूं करीनात; व जागचे हलेनात. तोंड व छाती

खालीं जमिनीवर टेकलेली असल्यामुळें ते जिवंत आहेत कीं मेले हें दुरून स्पष्ट कळेना व त्यांना ओंवळेपणीं स्पर्श करून पाहण्याचे जमेलल्या मंडळींतील कोणास धैर्य होईना. शेवटीं सर्वानुमतें त्यांपैकीं एक इसम पळत पळत नदीला जाऊन स्नान करून ओल्यानें आला; व त्यानें बुवास वर उचलिलें, तेव्हां तेथें काय होतें ? थंडगार झालेलं बुवांचें शवच हातीं आलें ! तेव्हां सर्वांस अत्यंत आश्चर्य वाटलें. व ते हळहळूं लागले. ही बातमी रामा पाथरवटास समजतांच तो धांवतच तेथें आला व ऊर बडवून घेऊं लागला. सर्वांनीं त्याची समजूत केली व वर्गणी करून मोठें विमान बांधून त्यांतून बुवांचें प्रेत वाजत गाजत मोठ्या समारंभानें गांवांतून मिरवीत आणून सदरहू जागीं त्याला मूठमाती देण्यांत आली. या स्मशानयात्रेस शेंकडों लोक आले होते. या वेळीं रामा प्रत्येकापुढें म्हणे कीं, काल संध्याकाळीं बावासाब 'रामा सबेरे हम जायेंगे' असें दोन तीनदां मजपुढें म्हणाले होते तें त्याचें जाणें हेंच होतें कांहो ? असें सांगून फारच हळहळूं लागला. मरणसमयीं बुवांचें वय साठ बासष्ट वर्षांचें तरी असावें; परंतु या उमरींतही पंधरा वीस वर्षांच्या त्यांच्या यड्डूर येथील वास्तव्यांत, त्यांना कधीं कोणताही रोग झाल्याचें कोणी पाहिलें नव्हतें ! बुवांच्या मरणानंतर लवकरच सदरील रामा पाथरवटास कुडची येथील सदर्न मराठा रेल्वेच्या कृष्णानदीवरील प्रख्यात पुलाच्या बांधकामांत दगड—पुरवठ्याचें मक्तयाचें काम मिळालें. व त्यांत त्यास चांगला फायदा मिळाला. आणि लागोपाठ अनेक फायदेशीर कामें त्याला मिळून त्याची गृहस्थिति चांगली सुधारली. तेव्हा हा सर्व साधुबुवांचा आशीर्वाद असें जाणून त्यानें मोठ्या कृतज्ञतेनें ही समाधि बांधून यांत त्यांच्या पादुका स्थापिल्या आहेत. पुढें दैववशात् सदरील रामाची बायको व पोरें सर्व मरून जाऊन तोही कालवश झाला. तेव्हां त्याची इष्टेट त्याच्या इच्छेप्रमाणें दुसऱ्या एका 'उन्हाळे' आडनांवाच्या येथील मराठा गृहस्थास मिळाली. तेच हल्लीं साधुबुवांच्या या पवित्र पादुकांची पूजा

अर्चा व उत्सव वगैरे करीत असतात. त्या पुण्यात्म्या साधुबुवांची निरिच्छता व पारलौकिक अधिकार किती मोठा होता. याविषयीं एक प्रत्यक्ष घडलेली आश्चर्यकारक विश्वसनीय गोष्ट सांगून हें प्रकरण आटोपतें घेऊं.

सदरहू साधुवर्य यड्डूरांत पुष्कळ वर्षें राहिले होते, तरी त्यांची कीर्ति विशेष झाली नव्हती. खुद्द यड्डूरांतील कित्येकांस त्यांची माहिती नव्हती; परंतु त्यांची पारमार्थिक योग्यता किती श्रेष्ठ दर्जाची होती हें पुढील हकीकतीवरून कळून येईल. ते साधु येथें येऊन राहिल्यानंतर कांहीं वर्षांनीं चिकोडी तालुक्याच्या मामलतीवर कोणा ' रघुनाथराव ' नांवाच्या मामलेदारांची नेमणूक झाली. त्यांच्या कडकडीत धार्मिक क्रियाकर्मांवरून व नीतियुक्त आचरणावरून त्यांना सर्व लोक ' देव मामलेदार ' असें म्हणत असत. ते निस्सीम दत्तभक्त असल्यामुळें प्रत्येक पौर्णिमेस न चुकतां दत्तदर्शनास्तव नृसिंहवाडीस जात. त्यांना देव-दयेनें कोणत्या गोष्टींची कमतरता नव्हती; पण निम्में वय होऊन गेलें, तरी अद्याप संतति झाली नसल्यामुळें त्याविषयीं रुखरुख लागली होती. तथापि ही गोष्ट मनुष्याच्या हातची नसून दैवाधीन असल्यानें ते देवधर्माच्या मार्गातच विशेष गढून जात. निस्सीम भक्ति पाहून लवकरच श्रीदत्तात्रेय प्रसन्न झाले असावे; कारण त्यांना एकदां असा दृष्टांत झाला कीं, ' तुम्ही यड्डूर क्षेत्रास जाऊन तेथील साधूचें दर्शन घ्या व सेवा करून त्यांचा आशीर्वाद ग्रहण करा, म्हणजे तुम्हांस संतति होईल. ' तेव्हां हा दृष्टांत शिरसा मान्य करून ते तावडतोब सहकुटुंब यड्डूर क्षेत्रास आले व त्यांनीं ' येथें कोणी प्रसिद्ध साधु राहतात काय ? ' असें गांवकामगारांना विचारिलें. व इतर पुष्कळांनाही असाच प्रश्न केला; पण सर्वांनीं ' येथें तसा प्रसिद्ध साधु कोणी नाहीं. ' असें सांगितलें. दृष्टांत खोटा असेल असें मामलेदारसाहेबांच्या ध्यानीं मनींसुद्धां येईना; व तसा कोणी प्रख्यात साधु-पुरुष यड्डूर क्षेत्रांतच काय पण आसपासच्या खेड्यांतही असल्याची बातमी लागेना ! तेव्हां त्यांचा बराच हिरमोड झाला; परंतु त्यांची मनोदेता त्यांना सांगे कीं, येथें साधु

असावेतच, त्यामुळें तें ज्याला त्याला 'येथें कोणी साधु वैरागी किंवा फकीर आहे काय ?' अशी पृच्छा करीत श्रीवीरभद्रदेवाच्या दर्शनास जाऊं लागले. मामलेदारसाहेब विचारीत असतां प्रत्येकांना असे वाटे कीं, यांनीं दर्शन घेण्याच्या लायकीचा येथें कोण साधु आहे ? अशी शंका येऊन सर्वांनीं 'कोणी नाहीं' असेंच उत्तर दिलें; परंतु त्यांची अशी आतुरता पाहिल्याबरोबर कोणा एका धीट इसमानें त्यांना म्हटलें 'रावसाहेब आपण म्हणतां तसा साधु, सत्पुरुष येथें कोणी नाहीं; पण पेठेंत कोणी एक गरीब बुवा राहत असतो.' असें ऐकतांच पेठेंत जाऊन त्यांनीं तपास केला. तेव्हां दुपारची वेळ असल्यानें मागें सांगितलेल्या सोप्यांत बुवांची स्वारी पथारीवर स्वस्थ पडून राहिली आहे असें त्यांना दिसून आलें. त्यास पाहातांच मामलेदारांना एकदम स्फूर्ण पटून त्यांनीं साष्टांग नमस्कार घातला. तें पाहून बुवा चटकन उठले व त्यांनीं उलट मामलेदारांस ते नको नको म्हणत असतांही साष्टांग नमस्कार केला ! याबद्दल कोणास आश्चर्य वाटेल पण त्या बुवांचा असा परिपाठच होता कीं, ते कोणाचा नमस्कार घेत नसत; तथापि एकाद्यानें केला तर ते लागलीच उठून त्याला पांच सात वेळ चांगला साष्टांग नमस्कार घालीत. त्यामुळें त्यांना नमस्कार करणारा इसम अगदीं खट्टू होत असे. यास्तव येथील कोणी इसम त्यांना नमस्कार करण्याच्या भानगडींत पडत नसे. हा नियम मामलेदारसाहेबांना माहीत नसल्यानें त्यांस फारच खट्टू व्हावें लागलें. हा प्रकार संपतांच मामलेदार साहेबांनीं आपल्यास श्रीदत्तात्रेयाचा दृष्टांत झालेली हकीकत बुवांस निवेदन केली व आपण आशीर्वाद द्यावा अशी विनंति करून नारळ, खारका, केळीं वगैरेसह उत्तम आपूस आंब्यांचा एक करंडा फराळाकरितां बुवांपुढें ठेवला व दक्षिणा म्हणून कांहीं रुपये ही ठेविले. ते सर्व जिन्नस व रुपये पुढें आलेले पाहतांच त्यांनीं तिरस्कार दर्शवून हे सर्व अगोदर माझ्यापुढून काढा म्हणून सांगितलें. त्यांनां त्रास होतो असें पाहून व लोकांच्या म्हणण्याकडे लक्ष देऊन

रुपये व नारळ यांशिवाय बाकीच्या जिनसा त्यांजपुढून काढून घेतल्या व राहिलेल्या जिनसांचा स्वीकार करा असें मामलेदार म्हणूं लागले; पण त्यांनीं तें कबूल केले नाहीं ते म्हणाले कीं, 'शंकरजीनें हमकू दया कमती करे है, नित्य आनंदमे रखदिया है' तेव्हां हें ऐकून त्यांच्या निरिच्छपणाची खात्री होऊन निरुपायास्तव त्यांना आशीर्वाद देण्यास विनविलें. मग बुवांनीं श्रीवीरभद्रदेवाकडे बोट दाखवून 'तुमकू हम दया देंगे ओ शंकरजी तुमारी इच्छा तृप्त करेंगे' असें म्हणून स्वस्थ बसले. मामलेदारांनीं ते रुपये काढून देवास दिले व 'तुम्हांस काय पाहिजे ?' असें बुवांस परोपरीनें विचारिलें, परंतु त्यांचें एकच उत्तर कीं, 'हमकू क्या कमती है ?' शंकरजीने हरवख्त यथास्थित और आनंदमे रखदिया है.' ही त्यांची निरपेक्षता पाहून मामलेदारसाहेबांची निराशा झाली. आणि जेव्हां जमलेल्या मंडळीनीं त्यांचा नित्यक्रम मामलेदारांना सांगितला, तेव्हां तो ऐकून बुवांच्या निस्पृहपणाचें व स्वावलंबनाचेंहि त्यांना अत्यंत आश्चर्य वाटलें. 'निस्पृहस्य तृणं जगत्' या न्यायानें अशा पराकाष्ठेच्या त्यागी सत्पुरुषापुढें हिऱ्यामाणकांचे ढीग घातले तरी ते तिकडे ढुंकून पाहणार नाहींत, अशी खात्रीं होऊन त्यांनीं तो नाद सोडून दिला व पुनः आशीर्वादाची याचना केली. आणि संततीच्या इच्छेनें आपल्यास शरण आलों आहों असें सांगितलें. तें ऐकून 'शंकरजी, तुमारी इच्छा पूर्ण करेगा' असें गंभीरवचनानें सांगून निरोप दिला. त्यांच्यासमोर असलेल्या कोणत्याही वस्तूला त्यांनीं स्पर्श केला नाहीं कीं ढुंकून पाहिलेंसुद्धां नाहीं. नंतर मामलेदार 'त्यांना कांहीं घेण्याची इच्छा झाल्यास विचारून कळवा व त्यांची बरदास्त उत्तम ठेवा' असें कुळकर्ण्याला सांगून देवदर्शन घेऊन चिकोडीस निघून गेले. आश्चर्य हें कीं, पुढें वर्षाच्या आंतच मामलेदार साहेबांना पुत्ररत्नाची प्राप्ति झाली. तेव्हां त्यांना परमानंद होऊन ते पुनः एकदां साधुवर्यांच्या दर्शनास आले व पुत्रास त्यांच्या पायावर घालून 'आपल्या आशीर्वादाचें हें फल होय' असें सद्गदित अंतःकरणानें बोलून

दाखवून बरोबर आणिलेल्या गांठोड्यांतील मुद्दाम त्यांच्याकरितां तयार करविलेली एक रुबाबदार कफनी बाहेर काढून ती बुवांपुढें ठेविली, व म्हटलें, ' महाराज, आपण दुसरें कांहीं घेत नाहीं तर ही कफनी स्वीकारून आम्हांस कृतार्थ करावें. ' परंतु बुवा किती निरिच्छ ! त्यांनीं तिकडे बिलकुल लक्ष न देतां मुलांकडे पाहून संतोषानें म्हटलें, ' बेटा, देव तेरा भला करेगा ' व पुढें ठेविलेला अहेर गोरगरिबांस देण्यास सुचवून श्रीवीरभद्र-देवाकडे बोट दाखवून ' ओ समर्थ परमात्माका यह प्रसाद है, मै तो क्षुद्र पामर हूं ' असें सर्वांस सांगितलें. शेवटीं मामलेदारांनीं देवालयांत प्रयोजन केलें होतें तेथें येऊन एकदां जेवून जाण्याचा बुवांस अत्यंत आग्रह केला, परंतु एक घांसभर पोळी काढून घेऊन स्वारी नित्यनेमास निघून गेली ! अशा प्रकारच्या त्यांच्या वर्तनावरून त्यांचा संन्यास किती प्रखर होता व त्यांची पारमार्थिक योग्यता किती उच्च दर्जाची होती हें समजून आलें. अशा त्यागमूर्ति परमहंसाची ही समाधि होय. या पवित्र समाधीचें दर्शन घेऊन आपण गांवांत गेलों कीं, गांवाच्या मध्यमार्गीं बरेंच मोठें ' श्रीपंच-लिंगेश्वराचें देऊळ व त्या देवळाजवळच श्रीचरमूर्ति स्वामींचा प्रसिद्ध मठ आहे.

## श्रीपंचलिंगेश्वराचें देवालय.

हें देवालय बरेंच मोठें असून याला पूर्व दिशेस एकच लहान द्वार आहे. याची लांबी सुमारें ३० फूट व रुंदी २०।२२ फूट आहे. चारी बाजूच्या भिंती भक्कम असून वर साधें शिखर आहे. आणि त्यावर उंचच उंच कळस आहे. या देवालयाची जमिनीपासून उंची सुमारें ४० फूट होईल. देवालयांत प्रवेश करितांच मध्यभागीं एक मोठें शिवलिंग व त्यापुढें नंदी असून चारी कोपऱ्यांजवळ चार लहान शिवलिंगें स्थापिलीं आहेत तीं दिसतात. अशा रीतीनें एकूण पांच लिंगें या एका देवालयांत आहेत, म्हणून या देवास पंचलिंगेश्वर हें सार्थ नांव पडलें आहे. या देवालयाच्या बांधकामावरून हें प्राचीन काळचें असावें असें दिसून येतें. हें देऊळ व मठ हीं

दोन्हीं समकालीन आहेत. या देवालयाची येथें स्थापना होण्याचें कारण असें आहे कीं, पुराणप्रसिद्ध लिंगांची नित्यपूजा केव्हांही थांबवितां येत नाहीं असें शिवलिंगपूजेचें मुख्य लक्षण असल्याकारणानें श्रीवीरभद्र-देवाची नित्य नियमानें पूजा करणाऱ्याना पावसाळ्यांत कृष्णा नदीस महा-पूर येऊन जेव्हां श्रीवीरभद्र देवालय जलमय होऊन जातें, आणि तेथील लिंगाची पूचा करणें अशक्य होतें; तेव्हां श्रीवीरभद्र देवाबद्दलची पूजा या पंचलिंगेश्वरास अर्पण करावयाची असते. ह्मणून श्रीवीरभद्र लिंगास पाव-साळ्यांत कृष्णेचा निरंतर अभिषेक घडतो तेव्हां त्या देवाची नित्याची त्रिकाल पूजा, नैवेद्य व पालखी-प्रदक्षिणा इत्यादि सर्व सोहळा या पंच-लिंगेशास अर्पण केला जातो. म्हणजे जितके दिवस श्रीवीरभद्रदेव पाण्यांत महाभिषेकांत असतील तितके दिवस श्रीपंचलिंगेश्वराची त्रिकाळ पूजा होते. महानैवेद्य ह्यासच दाखवितात, आणि नित्याची पालखी-प्रदक्षिणाही पंचलिंगेश्वराभोंवतीं करितात. हें देवालय पूर्वी हल्लींच्या दुप्पट मोठें होतें. हल्लीं दिसणाऱ्या देवळापुढें पूर्वीं एक मोठा सभामंडप होता असें सांगतात, परंतु महापुरानें तो नादुरुस्त होऊन पडून गेला. म्हणून सध्यां हें गर्भ-देऊळ तेवढें शिल्लक आहे. ज्यावेळीं हा सभामंडप दुरुस्त होता त्यावेळीं पावसाळ्यांत श्रीवीरभद्रदेवाची उत्सवमूर्ति व तिची पालखी त्या मंडपांतच ठेवीत असत. पण हल्लीं मठांत ठेवून तेथेंच पूजा वगैरे करितात. या पंचलिंगेश्वराचें दर्शन करून श्रीचरमूर्तिस्वामींच्या दर्शनाकरितां व आद्य श्रीकाडसिद्धेश्वराची पवित्र समाधि पाहण्याकरितां या देवालयाच्या पश्चिमेस असलेल्या प्रख्यात श्रीकाडदेवरू-मठाकडे जाऊं.

## श्रीकाडदेवरू स्वामींचा मठ.

हा प्रख्यात मठ जुन्या पद्धतीनें बांधलेला असून बराच विस्तीर्ण आहे. मध्य भागचा हा मठ व सभोंवताली या मठाच्या आवारांत वसलेलीं जंगम सेवकांचीं घरें व पंचलिंगेश्वराचें देऊळ मिळून ही या क्षेत्रांतील जंगमवाडीच होय. या जंगमवाडीनें क्षेत्र यड्डूरचा अर्धाअधिक भाग व्या-

पिला आहे. या वार्डांत पूर्व-पश्चिम असा एक रस्ता गेला आहे. या रस्त्याच्या उत्तरेस मठ आहे. वास्तविक पाहतां, या मठाच्या आवारांत पंचलिंगेश्वराचें देऊळ आहे, व या देवळापुढे पूर्वकाळीं या मठाचा किंवा जंगमवाडीचा महादरवाजा होता. तो हल्लीं पडून जाऊन दोहोंकडील भिंती मात्र राहिलेल्या या देवळासमोर दिसतात. म्हणून हल्लीं मठाला महाद्वार दिसत नाहीं. पंचलिंगेशाच्या देवळाच्या मागील भागीं, दक्षिनी बाजूस या मठाचा एक मोठा दिवाणखाना दृष्टीस पडतो. दिवाणखाना जुन्या पद्धतीचा असून धाब्याचा आहे. या दिवाणखान्यांत प्रसिद्ध पुरुषांचे फोटो, चित्र वगैरे लावून छत मारून बरीच आरास केलेली आहे. याच्या मध्यभागीं श्रीकाडदेवरूस्वामींचें सिंहासन ठेविलेलें आहे. त्यावर हल्लींचे स्वामी केव्हां केव्हां बसत असतात. या दिवाणखान्यास 'सदर' असेंही म्हणतात. या सदरेंत सिंहासनाजवळ मठाचे कारभारी व कारकून वगैरे बसत असतात. या सदरेशिवाय मठाचे आणखी देवघर, माजघर, स्वयंपाकघर, मधील चौक व पागा असे बरेच भाग असून पाठीमागें जनावरांचा गोठा व प्रशस्त परसू आहे. देवघर ही एक मोठी खोली असून तींत मठांतील देवांची पूजा होते, व श्रीचरमूर्तिस्वामी तेथेंच लिंगपूजेस बसत असतात. माजघर हें देवघरापेक्षां जरा मोठें आहे. त्यांत भक्तलोकांना लिंगपूजेस बसण्याची सोय आहे. शिवाय याच ठिकाणीं या मठाचे मूळ संस्थापक श्रीकाडदेवरू यांची समाधि आहे. स्वयंपाकघर फारच मोठें असून तेथें एकाच वेळीं शेंदीडशें लोकांची पंगत बसेल इतकी जागा आहे. त्या स्वयंपाकघराच्या पूर्वेस व दिवाणखान्याच्या उत्तरेस या मठांतील मधला चौक आहे, या चौकांतच मठांतील धान्यसामुग्री सांठविलेली असते. हा मधला चौक, दिवाणखाना व मागें सांगितलेलीं तिन्हीं घरें मिळून दक्षिणोत्तर सुमारें ८० फूट लांब व पूर्वपश्चिम ५० फूट रुंदीची एकच विशाल इमारत आहे. आणि ही सर्व इमारत धाब्याची आहे. ही बरीच जीर्ण झाली असल्याकारणानें हींतील निदान दिवाण-

खाना, देवघर व माजघर मिळून होणारा भाग दुरुस्त करून एक उत्तम दुमजली इमारत उठविण्याचा हल्लींच्या स्वामींचा विचार असून त्या कामाचा पायाही घातला आहे. मधला चौक व दिवाणखाना यांच्यामधील खोल्यांतून मठाचें दप्तर व खजिना असतो. मधील चौकाच्या पूर्वेस बाहेरचा मोठा चौक आहे. त्यांत मठांतील मेणा, पालखी, शेतकीचीं आउतें वगैरे ठेवितात. त्याच्या पूर्वेस बागा आहे. या बागेला पंचलिंगेश्वराच्या देवळाजवळ दक्षिणेकडे तोंड करून एक मोठा दरवाजा आहे. या बागेच्या उत्तरेस गोठा आहे, व या सर्वांच्या उत्तरेस लांबच लांब परसू आहे.

सध्यां मठांत श्रीचरमूर्तिस्वामी व त्यांचे २।३ खासगी नोकर आणि दोन तीन शेतकामाकडील गडी अशीं एकूण ७।८ माणसें असतात. स्वामींचे कारभारी निराळ्या घरांत राहतात. नोकर माणसें व श्रीवीरभद्र देवाचे व उत्सवमूर्तीचे पुजारी या सर्वांचें जेवण मठांतच होतें. मठांत हल्लीं जनावरें विशेष नाहींत. एक कोतवाल, घोडा दोन चार बैल, गाय व ह्मैस इतकीं जनावरें आहेत. पूर्वींच्या स्वामींनीं चार पांच अरबी घोडे, दहा वीस बैल व आठदहा दुभत्या गायी व ह्मैशी अशीं पुष्कळ जनावरें बाळगिलीं होतीं, आणि त्यांच्या बरदास्तीस व शेतकामास वीस पंचवीस नोकरही ठेविले होते; परंतु हल्लींच्या स्वामींनीं जरूरीपेक्षां जास्त असलेला परिवार काढून टाकून व शेती खंडानें लावून खर्च कमी केला; ह्मणून मठाची खालावलेली स्थिति सुधारली.

सदरहू मठास येथील व इतर गांवच्या जमिनींचें मिळून सुमारें पांच हजार रुपयांचें स्थाथिक उत्पन्न आहे. जुगूळ, मांजरी, कल्लोळ, नेज, कापशी, शाहापूर, सौंदत्ती, उमराणी, शेगुणशी, मुन्याळ, कलोती इत्यादि खेड्यांतून मठाच्या जमिनी आहेत. यड्डर गांवांतील दोन जमिनी आणि कल्लोळ व सौंदत्ती येथील एक एक जमिन अशा एकूण चार जमिनी श्रीवीरभद्रदेव व उत्सवमूर्ति यांच्या पूजा करण्याकरितांच मुख्यतः मिळाल्या आहेत. इतर ठिकाणच्या जमीनी खुद्द मठास इनाम आहेत. शिवाय

श्रीवीरभद्रदेवाचे व उत्सव मूर्तीचे श्रीस्वामी हे हक्कदार पुजारी असल्यामुळें त्या देवाकडील दरसालचें सर्व उत्पन्न यांनाच मिळत असतें. तें सुमारें हजार दीड हजार रुपयाचें असेल. श्रीचरमूर्ति स्वामी यांना मिळणारी दुसरी एक उत्पन्नाची बाब अशी आहे कीं, श्रीस्वामी हे बाळेहळ्ळी महा सिंहासनाखालील मठाचे अधिकारी असून, यांना या प्रांतांतील वीरशैवानां आहार-विहार-प्रायश्चित देण्याच्या जगद्गुरूचा अधिकार आहे. या बाबीपासूनही या मठाला बरेंच उत्पन्न आहे. कारण या मठाच्या पूर्वीच्या सर्व चरमूर्तिस्वामींनीं आपल्या या प्रायश्चित्त देण्याच्या अधिकारांची बजावणी वेळोवेळीं केली असून शिवाय बऱ्याच इतर जातींच्या लोकांना वीरशैव धर्माची दीक्षा देऊन पावन करून घेतलें आहे, व अद्यापही ते घेत आहेत. 'कोणत्याही धर्माच्या अगर जातीच्या लोकांना अहिंसातत्त्व पाळण्याची व शुचिर्भूत राहण्याची शपथ व हमी घ्यावयास लावून वीरशैव धर्माची दीक्षा देतां ये'.' हें जें वीरशैव धर्माचें अति उदात्त आद्य तत्व आहे; व जे पुण्यपावन श्रीबसवेश्वरांनीं वीरशैव-धर्मास ग्लानि आल्यावेळीं प्रचलित केलें तें उदात्त व उपयुक्त तत्व सदरहू मठाच्या स्वामींनीं आजच्या काळांतही अंशतः उपयोगांत आणलेलें पाहून त्यांना वीरशैव समाजानें जितके धन्यवाद द्यावे तितके थोडेच आहेत. सध्यां समाजाकडून मुळींच प्रोत्साहान मिळत नसल्याकारणानें ही शुद्धिकरणाची चळवळ अलीकडच्या स्वामींनीं मराठा, जैन वगैरे एकदोन जातींपुरतीच संकुचित केली आहे. इतर जातींचा व धर्मीयांचा उद्धार करण्याचें कृत्य हातीं घेण्यास श्रीस्वामींना समाजाकडून प्रोत्साहन नसल्यानें धैर्य होत नाहीं, हें समाजाचें दुर्दैव होय! योग्य रीतीनें समाजाकडून उत्तेजन मिळाल्यास कोणत्याही धर्माच्या व जातींच्या लोकांना वीरशैव धर्माची दीक्षा देऊन पावन करण्यास श्रीस्वामीमहाराजांची तयारी आहे. याकरितां हिंदुस्तानभर चाललेल्या शुद्धिकरणाच्या चळवळीला एका तऱ्हेनें मदत होण्यासारखं हें पूर्व-प्रचलित समाज-वृद्धीचें कार्य करण्याची संधि, सुशिक्षित वीर-

शैवांनीं व समाजधुरीणांनीं वायां दवडूं नये अशी आग्रहाची सूचना आहे. आपणा सर्वांस विदित आहेच कीं, हिंदुस्तानांतील सर्व प्रांतात निरनिराळ्या समाजाकडून अनेक प्रकारें शुद्धिकरणाच्या चळवळीचा सध्यां पुनरुद्धार होत असतांना ज्या समाजांत ती नवीन चालू करण्याची जरूर नसून परंपरेनें चालत येऊन रूढ झालेलीच आहे, अशा वीरशैव समाजानें, या वेळीं तींत देशकालपरिस्थित्यनुरूप योग्य फेरफार करून तिचा प्रसार करण्याचें सोडून किंवा करणाऱ्यांना विशेष प्रोत्साहन न देतां स्वस्थ बसणें हा शुद्ध आत्मघातकीपणा होय असें आम्हांस वाटतें. तरी या बाबतींत समाजानें लवकरच जागें होऊन येथील श्रीस्वामींच्या नेतृत्वाखालीं अथवा स्वतंत्रपणें एक संस्था स्थापून तिच्या द्वारें सदरहू कार्य करण्याची वीरशैव-समाज-पुढाऱ्यांनीं तयारी करावी. परंतु विशेष अश्चर्याची गोष्ट ही कीं, अशा प्रकारचें समाजोन्नतीचें कार्य करण्याचें बाजूसच राहून, वीरशैव समाजांतील कांहीं, स्वतःस योग्यता नसतांनाही लोकांनीं पूज्य मानावें असें म्हणणारे अदूरदृष्टि, पुराणप्रिय गृहस्थ व जंगम स्वामी हे आपण केवळ वीरशैवसमाज तारण्याकरितांच अवतार घेतला आहे असा आव आणून जंगम व भक्त हे जन्मतःच परस्पर भिन्न आहेत व जन्मतःच जंगम हे श्रेष्ठ आहेत असा जनतेंत समज पसरवून समाज विस्खळित करीत आहेत. हें समाजाचें दुर्दैव होय! तरी सत्तत्वाभिमानी समाज-हितचिंतकांनीं अशा कारस्थानी व आपमतलबी इसमांना खड्याप्रमाणें वेंचून दूर ठेवून समाजाचीं मूलतत्वें (वीरशैव धर्माचीं उदात्त तत्वें) अबाधित चालू ठेवणें आज अत्यंत जरूरीचें आहे. ह्मणून असा समाजघातकी प्रकार जेथें मुळींच नाहीं अशा श्रीक्षेत्र यड्डूर व श्रीक्षेत्र सिद्धगिरि इत्यादि गुरुमठांना म्हणजे ज्या ठिकाणीं भक्तांना पट्टाधिकारी बनतां येण्याची व्यवस्था आहे अशा तत्त्वनिष्ठ मठांना व त्यांतील गुरुस्थल मठाधीशांच्या श्रेष्ठ धर्मकार्याला स्वधर्मप्रेमी लोकांनीं प्रोत्साहन द्यावें असें आम्हांस वाटतें. असो वरील शुद्धिकरणाच्या बाबीपासूनही गुरुदक्षिणा म्हणून श्रीस्वामींना थोडीबहुत प्राप्ति होते. तिसरी उत्पन्नाची

-चाव म्हणजे कट्टी भिक्षा ही होय. कट्टीभिक्षा ह्मणजे फिरस्त्या जंगमांना मार्ग दाखविणें व त्यांजवर अधिकार चालविणें आणि नवीन इसमांना फिरतीची परवानगी देणें इत्यादि कामगिरीबद्दल श्रीस्वामींना जी दक्षिणा मिळते तीच कट्टीभिक्षा होय. याचें थोडेसें उत्पन्न मठास आहे.

या एकंदर उत्पन्नांतून मठाचा दरसालचा खर्च चालत असतो. उत्पन्नाच्या मानानें खर्चही बराच असल्यानें शिल्लक यथातथाच राहते. शिवाय येथील श्रीवीरभद्र देवाच्या पूजेसंबंधीं अलीकडचा शेंदीडशें वर्षांचा इतिहास असा आहे कीं, ५०।६० वर्षांत एकादा महत्त्वाचा खटला उद्भवून मठाची सर्व शिल्लक खलास व्हावयाची ! यामुळें उत्पन्नाच्या मानानें शिल्लक असणें व आज दिसणें शक्य नाहीं. या क्षेत्राचा हा एक विशेष आहे कीं, येथें कोणाचेंही वर्चस्व सतत चालत नाहीं. कांहीं काळ भर-भराटीचा गेला व तत्कालीन व्यक्तीला द्रव्यमद चढला कीं, लागलाच तो खालीं पडला असें समजावें ! द्रव्यमदानें धुंद होऊन लोकांवर वरचढ होऊं पाहाणारा इसम स्वतःच्याच कृतीनें अधःपात पावल्याचीं ताजीं उदाहरणें या क्षेत्रांत अनेक आहेत. मग पिढ्यान्‌पिढ्या वर्चस्व-परंपरा राहण्याची तर गोष्टच नको. या नियमाला येथील मठाचे श्रीचरमूर्ति स्वामी अगर वहिवाटदार किंवा देसाई इत्यादि मोठमोठे उत्पन्नदार लोकसुद्धां अपवाद ठरले नाहींत. तेव्हां समान्य लोकांविषयीं जास्त सांगणें नको. अशा प्रकारची ही रुद्रभूमि असल्यानें येथें कोणत्याही प्रकारचा मद टिकाव धरीत नाहीं. यावरून वर सांगितलेल्या उत्पन्नाच्या मानानें मठांत शिल्लक कां नाहीं हें समजून येईल.

या मठासंबंधीं संपूर्ण इतिहास पुढें श्रीआद्यकाडदेवरूआगमन या भागांत दिला आहे. म्हणून येथें इतकेंच सांगावयाचें कीं, या क्षेत्रांत सर्वांत अगोदर येऊन वस्ति केली असेल तर ती या मठाचें संस्थापक श्रीआद्यकाडदेवरू स्वामींनीच होय. त्यांनीं प्राचीन काळीं येथें असणाऱ्या निबिड अरण्यांत पर्णकुटी बांधून प्रथमतः वास्तव्य केलें. त्यानंतर त्यांच्या

व त्यांनीं जीर्णोद्धार केलेल्या श्रीवीरभद्रलिंगाच्या दर्शनार्थ येथें शिष्यगण येऊं लागला. व त्यांपैकीं कित्येक त्यांच्याजवळच येऊन कायमचे राहूं लागले. अशा प्रकारें त्यांचा परिवार जसजसा वाढत गेला तसतशीं झाडी तुटूं लागून पुढें लवकरच या सत्पुरुषवस्तीस गांवाचें स्वरूप प्राप्त झालें; आणि त्यानंतर हळूहळू वणी, उदमी वगैरे लोक येऊन कायम राहूं लागले. त्यामुळें त्यास हल्लींची स्थिति आली. तेंच हें श्रीक्षेत्र यड्डूर होय. अशा प्रकारें मठाच्या किंवा श्रीवीरभद्रदेवाच्या सेवेकऱ्यांच्या उत्पत्तीच्या इतिहासाशीं श्रीक्षेत्र यड्डूरचा इतिहास संलग्न झाला असल्या कारणानें त्या त्या वावींचा पृथक् इतिहास न देतां सर्वांचा समावेश यड्डूरच्या इतिहासांत करून एकाच ठिकाणीं सर्व माहिती संकलित केली आहे. म्हणून येथें पुनरुक्तिभयानें त्याचा निर्देश केला नाहीं.

येणेंप्रमाणें आकृतीनें छोट्या पण कीर्तीनें सर्वांत मोठ्या अशा या प्रख्यात क्षेत्रांतील स्थानिक देवता व देवालयांची चालू परिस्थितीची माहिती यथामति दिली आहे. यांशिवाय या गांवांत दुसरीं स्थळें सध्यां दिसत नाहींत. आतां यांतील पौराणिक देवदेवतांपैकीं प्रत्येकांचा परस्परांशीं काय संबंध आहे याविषयीं सविस्तर विवेचन पुढें पौराणिक कथाभागांत ( भाग ३ व ४ ) यांत केलें आहे. तें पहाण्याविषयीं वाचकांस सूचना देऊन, श्रीवीरभद्रदेवाचें व श्रीचरमूर्तिस्वामींचे पुनश्च दर्शन घेऊन क्षेत्राच्या या केंद्रस्थानांतून बाहेर पडूं. आणि यड्डूरक्षेत्राच्या ‘ पंचक्रोशी ’—प्रदक्षिणेस जाऊं.



श्रीविरूपाक्षलिंगाय नमः ।

# भाग दुसरा.

## पंचक्रोशी प्रदक्षिणा.

### (१) श्रीयडूर क्षेत्राची पंचक्रोशी

वरील मथळा वाचून आमचे कित्येक प्रिय वाचक अगदीं दुचकळ्यांत पडले असतील. ते आपल्या स्मरणशक्तीची पराकाष्ठा करून तर्कांत गर्क झालेल्या मनास ह्मणतील कीं, आह्मी आजपर्यंत दोन-चार-दहा वीसच काय पण शेंकडों वेळां यडूर क्षेत्राची वारी करून श्रीवीरभद्र देवाचें व तेथील मागें सांगितलेल्या इतर देवांचें व स्थळांचें दर्शन घेतलेलें आहे; परंतु ही पंचक्रोशी कोणती?ती किती लांबीची आहे ? तिचा आरंभ कोठें होतो? व शेवट कोणत्या ठिकाणीं झाला आहे? या विषयीं आजपर्यंत कांहींच बातमी कानीं पडली नसतांना यांनीं ही पंचक्रोशीची भलतीच भानगड, आपल्या कल्पना सृष्टीच्या कोणत्या कोपऱ्यांतून उपस्थित केली आहे कोण जाणे. पण सूज्ञ वाचकहो, जरा दमानें घ्या. इतके उतावीळ बनूं नका. श्रीक्षेत्र यडूरास पंचक्रोशी आहे किंवा नाहीं हा प्रश्न तूर्त जरा बाजूस ठेवून आपल्यास कांहीं प्रश्न विचारावे असें मनांत आहे; तर आपण तितके स्थिरचित्त झालांत ना? ऐका मगः—आपल्या या हिंदुस्तान देशांत प्रख्यात अशी जीं ‘ अयोध्या मथुरा माया काशी कांची अवंतिका। पुरी द्वारावती चैव सप्तैता मोक्षदायिकाः ॥ ’ इत्यादि मोक्षदायक क्षेत्रें आहेत. व इतरही ‘ पंढरपूर ’ वगैरे प्रसिद्ध स्थानें आहेत; त्यांना प्रत्येकीं पंचक्रोशी आहे कीं नाहीं? अशा प्रसिद्ध क्षेत्रा पैकींच श्रीक्षेत्र यडूर हें एक आहे यांची आपणांस

जाणीव आहे काय ? श्रीक्षेत्र यड्डूरास 'दक्षिणेकडील काशी क्षेत्र' असें ह्मणत असतात हें आपणास माहीत आहे ना ? असें जर आहे तर या प्रख्यात क्षेत्राला पंचक्रोशी असेल किंवा नाहीं ? अवश्य असलीच पाहिजे आणि आहेही. इतकेंच नव्हे तर, श्रीक्षेत्र चंदूरास जाऊन तेथून ' श्री कोपेश्वर-' दर्शनाकरितां खिद्रापुराला जाणारे भाविक यात्रेकरू न कळत एकप्रकारें ही अर्धी अधिक पंचक्रोशी प्रदक्षिणा करून परत श्रीवीरभद्र देवाच्या दर्शनास येत असतात ही गोष्ट सर्वांस ठाऊक आहे. शिवाय श्रीवीरभद्रदेवाच्या एकनिष्ठ भक्तांच्या हें पक्कें आठवणींत असेल कीं, विशाळी अमावास्येला तीर्थ-स्नानाकारितां व श्रीकोपेश्वर दर्शनाकरितां खिद्रापुरास जाऊन त्यांना तिकडून परभारें आपल्या गांवीं जातां येत नाहीं; तर तीर्थस्नान व कोपेश्वर दर्शन होतांच परत यड्डूर क्षेत्रास येऊन श्रीवीभद्र देवाचें दर्शन घेतलेंच पाहिजे, त्याशिवाय यात्रेची सांगता होत नाहीं. याचें कारण काय! हें आपण सांगू शकाल ! तर याचें दुसरें कांहीं कारण नसून ती अल्पप्रमाणांत होणारी ( संक्षिप्त ) पंचक्रोशी प्रदक्षिणाच आहे. मात्र ती आपण नकळत करितों, म्हणून तिचें महत्व वाटत नाहीं. शिवाय श्रीक्षेत्र यड्डूराची संपूर्ण पंचक्रोशी एकदम लक्षांत येण्यास अथवा पंचक्रोशीची संपूर्ण प्रदक्षिणा पूर्ण करण्याला मुख्य अडचण अशी आहे कीं, या प्रदक्षिणामार्गाचा जवळ जवळ तीनचतुर्थांश भाग कृष्णानदीच्या प्रवाहानुरोधानें गेला आहे; त्यामुळें, फक्त उन्हाळ्यांतील चार महिन्यांत हा सर्व मार्ग मोकळा असून ही प्रदक्षिणा पूर्ण करण्याला व मध्यंतरीं असणारीं पवित्र तीर्थें व स्थानें नीट पाहण्याला अनुकूलता असते. इतर दिवसांत, त्यांतही पावसाळ्यांत हा सर्व प्रदेश जलमय होऊन जात असल्यानें यांतून प्रवास करणें फार धोक्याचें असतें, शिवाय पवित्र स्थळें यावेळीं पाण्यांत असल्यामुळें तीं दृष्टीस पडत नाहींत. ह्मणून ही प्रदक्षिणा करून न केल्यासारखीच होय. याकरितां हा खटाटोप करण्याच्या भानगडींत बहुधा कोणी पडत नाहींत. ही पंचक्रोशी आजपर्यंत अप्रसिद्ध असण्याचें हेंच एक मुख्य कारण आहे.



श्रीकडबागिल वीराण्णाचें देवालय,
मांजरी जि० बेळगांव.

मनोरंजन प्रेस, मुंबई.

मांजरीजवळील—



वृंदावन ( बिरदावन. )

या पंचक्रोशींतील पवित्र स्थानें कोणतीं ? व तीं कोठें आहेत ? आणि ह्या प्रदक्षिणामार्ग किती लांबीचा आहे व त्याचा प्रारंभ कोठें होतो या गोष्टींचा आतां विचार करूं. शिवाय दुसरे कोणी यात्रेकरू ही प्रदक्षिणा करीत नसले, तरी आपण यड्डूर क्षेत्राची यात्रा संपूर्ण करण्याचा संकल्प केला असल्यामुळें आणि यात्रेचे हे दिवस उन्हाळ्याचे असल्यामुळें एक प्रदक्षिणा पूर्ण करण्यास हरकत नाहीं. म्हणून मागें वळून पुनः मांजरीजवळील यड्डूर क्षेत्राच्या महाद्वाराकडे जाऊं. व तेथून पंचक्रोशी-प्रदक्षिणेस प्रारंभ करूं:—

पंचक्रोशी-प्रदक्षिणा-मार्गाचा आरंभ मांजरीपासून होऊन तो नदी-कांठाकांठानें यड्डूर क्षेत्राच्या दक्षिण बाजूस वळसा घालून खिद्रापुरापर्यंत गेला आहे. तेथून नदीकिनारा सोडून जुगूळ किंवा शाहापूरजवळून शिरगुप्पीस जाऊन तेथून सडकेनें पुनः मांजरीपर्यंत आला आहे. या मार्गाची एकंदर लांबी सुमारें १५ मैल ( या भागांतील पांच कोस ) आहे. ह्मणून याला ‘ पंचक्रोशी ’ हें नांव यथार्थ लागू पडतें. पंच-क्रोशींतील क्षेत्रप्रदेशाचा आकार साधारण चौकोनी असून त्यांतील आग्नेय, नैर्ऋत्य, वायव्य या तीन कोपऱ्यांतून तीन प्रसिद्ध शिवलिंगें ( लिंगमुद्रा किंवा कोनशिलाच म्हणाना ) असून फक्त ईशान्यबाजू लिंगमुद्रेविरहित अशी सध्यां दिसते. ह्या लिंगमुद्रा अगर कोनशिला कोणत्या व इतर प्रसिद्ध स्थळें व पुण्यकारक तीर्थें कोणतीं हें प्रदक्षिणेच्या वेळीं प्रत्यक्ष दिसून येणा-रच असल्यानें येथें त्याचा विचार नको.

## ( २ ) पंचक्रोशी-प्रदक्षिणारंभ.

पूर्वीं सांगितलें आहे कीं, मांजरी गांवाजवळील कडिबागिल वीरण्णाचें देऊळ हें श्रीक्षेत्र यड्डूराचें महाद्वार होय. त्या द्वारांतून बाहेर पडून नदी-पलीकडे दक्षिणतीरीं आग्नेय कोनशिला जें वृंदावन तेथील शिवलिंगाचें दर्शन घेऊं. वृंदावनास हल्लीं लोक ‘ बिरदावन ’ असें म्हणतात. येथें एका विशाल पिंपळाच्या झाडाखालीं एका उंच दगडी चौथऱ्यावर एकापुढें

एक अशीं दोन मोठीं शिवलिंगें स्थापिलीं आहेत. यांपैकीं एका लिंगास 'मंजिरेश्वर' असें ह्मणतात. या मंजिरेश्वर लिंगासमोर नदींत मांजिरी तीर्थ आहे. या तीर्थांचें स्नान करून मंजिरेश्वर लिंगाची पूजा करणाऱ्यास एक कोटि मंजिरींनीं विष्णुपूजा केल्याचें फळ मिळतें. असें कृष्णामाहात्म्य या पुराणांत सांगितलें आहे. पूर्वकाळीं या मंजिरी तीर्थाजवळ असणाऱ्या उंचवट्यावर जिकडे तिकडे तुळशीचीं झाडें लागून गेलेलीं असावींत. म्हणून तुळशी मंजिरींनीं युक्त अशा रानाजवळ वसलेल्या गांवास मांजरी हें सार्थ नांव पडलें आहे. हल्लीं या वृंदावन उंचवट्यावर तुळशीचीं झाडें फारशीं नाहींत. पण त्या लिंगस्थानाच्या शेजारीं एक चांगल्याप्रकारें बांधिलेलें चुनेगच्ची तुळशीवृंदावन आहे. त्यावर दोन तीन तुळशीचीं झाडें आहेत. त्याशिवाय दुसरीकडे कोठें नाहींत. या मंजिरी-तीर्थांत स्नानकरून मंजिरेश्वर लिंगाचें दर्शन घेऊन नदीच्या दक्षिण तीरानें आपल्या प्रदक्षिणेस सुरवात करूं.

वृंदावन टेकडीपासून पश्चिमेस थोड्या अंतरावर हल्लीं एक चौथरा दिसून येतो. त्या ठिकाणीं नदीमध्यें मंजुळतीर्थ व मंजुळेश्वर या नांवाचें

---

१ हें तीर्थ उत्पन्न होण्याचें कारण असें आहे कीं, पूर्वकाळीं उत्तंक ऋषीनें यौवनेश्वरापासून समुद्रांत राहाणाऱ्या धुंधु नांवाच्या एका बलाढ्य राक्षसाचा वध करविला. त्या पापाच्या शांतीकरितां सह्याद्रि पर्वतापासून या तीर्थापर्यंत कृष्णा नदींत जीं तीर्थें आहेत, त्या सर्व तीर्थांत स्नान करून या तीर्थाजवळ कृष्णेच्या दक्षिण तीरीं पर्णकुटिका बांधून त्यांत तो ऋषि राहूं लागला. आणि येथें रोज तुळशीच्या मंजिरींनीं श्रीविष्णूची पूजा करून आपल्या कृतपापाचें क्षालन केलें. म्हणून ज्या तीर्थीं नित्यस्नान करण्यानें व मंजिरींच्या पूजेनें त्या ऋषीच्या पापाचें क्षालन झालें, त्याला मंजिरीतीर्थ हें नांव पडलें. व त्या ऋषीनें येथें जें लिंग स्थापन केलें त्याला मंजिरेश्वर हें नांव प्राप्त झालें.

२ या तीर्थाच्या उत्पत्तीची कथा अशी आहे:-प्रख्यात पाराशर मुनि एकदां कृष्णातीरीं आश्रमांत राहात असतां एके दिवशीं आपल्या भार्येसह ते नदीस्नानास गेले. तेथें प्रथम आपण स्नान करून आश्रमांत येऊन मृगाजिनावर बसून संध्यावं-

लिंग आहे. असें म्हणतात. या तीर्थांत स्नान करून जो पुरुष यथाविधि जप व दान करितो तो उत्तम गतीस जातो. या तीर्थापासून पश्चिमेस जवळच ज्या ठिकाणीं खारा ओढा नदीस मिळतो तेथें पाराशर तीर्थ व पाराशरलिंग आहे असें कृष्णामाहात्म्यांत सांगितलें आहे. व त्या तीर्थाजवळ पर्णकुटीमध्यें राहून पूर्वकाळीं पाराशर महामुनींनीं नारसिंहाची

---

दन, ब्रम्हयज्ञ व पूजा वगैरे करूं लागल. तोंपर्यंत त्याची पत्नी सत्यवती नदीच्या प्रवाहांत उतरून स्नान करूं लागली. त्यावेळीं पाण्यांत एक माशाचें जोंडपें आनंदानें क्रीडा करीत असतांना तिनें पाहिलें. तें पाहातांच ती कामातुर झाली. व तिच्या मनांत असा विचार आला कीं, माशाचा जन्म सुखावह असल्यामुळें आपणासही तो प्राप्त झाल्यास उत्तम होईल. या विचारतंद्रींत ती बराच वेळ पाण्यांत राहिली होती. नंतर भानावर येतांच उशीर झाला, असें पाहून लगबगीनें स्नान आटोपून ती आश्रमांत आली. तेव्हां इतका पुष्कळ वेळ तूं नदींत काय करीत होतीस? असें ऋषीनें तिला विचारतां ती निरुत्तर झाली. तें पाहून ज्ञानदृष्टीनें अवलोकन करितांच तिच्या मनांतील हेतु त्यांना समजून आला म्हणून ते म्हणाले, 'तुझें मन मत्स्यरतीस आसक्त झालें, तस्मात् तूं सुख भोगणाऱ्या मत्स्याचा जन्म पावशील '! मग ती भयभीत होऊन मुनींचे पाय धरून सद्गदित वाणीनें म्हणाली, ' माझ्या अपराधाची क्षमा करा; व मला शापापासून मुक्त करा. मजकडून अल्प अपराध घडला असतांना आपण ही मोठी शिक्षा केली. त्यातून मला तुमच्यावांचून कोण तारणार आहे ?' हें दीनवाणीचें भाषण ऐकून पाराशर ऋषि म्हणाले हे कल्याणि मी जें बोललों तें खोटें होणार नाहीं; परंतु मत्स्यगर्भींतहि तुला मनुष्यजन्म प्राप्त होईल ! नंतर सत्यवती पुन्हां म्हणते ' आपण श्रीविष्णूची आराधना करून तपःसामर्थ्यानें त्यांना प्रसन्न केल्यानंतर त्यांजपाशीं ' तूं माझा पुत्र हो ' असा जो वर मागून घेतला आहे, तो पुत्र आपणास मजपासून व्हावा, अशी माझी इच्छा आहे. ' तेव्हां संतुष्ट होऊन पाराशरांनीं ' तुझें मनोरथ पूर्ण होतील ' असा आशिर्वाद दिला. या आशिर्वादाप्रमाणें पुढें सत्यवतीस जो पुत्र झाला तोच प्रख्यात व्यास ऋषि होय. याप्रमाणें पाराशर मुनींनीं आपल्या पत्नीचें मंजुळ वाक्यांनीं यास्थळीं सांत्वन केलें म्हणून येथें मंजुळतीर्थ व मंजुळेश्वर या नांवाचें शिवलिंग उत्पन्न झालें. असें सदरी पुराणांत सांगितलें आहे.

आराधना करून त्यांना आपला पुत्र होण्याविषयीं वर मागून घेतला होता असें सांगतात. या पाराशर तीर्थांत स्नान करणारे श्रीनारसिंहास प्रिय होतात.

या तीर्थाच्या पश्चिमेस नदीमध्यें अगस्त्य--तीर्थ व अगस्त्येश्वरलिंग आहे. असें सदरहू पुराणांत सांगितलें आहे. येथून पुढें जाऊं लागतांच जुन्या यड्डूर गांवाजवळच्या गर्गेश्वरलिंगासमोर नदींत गर्गतीर्थ आहे. या गर्गेश्वरलिंगालाच हल्लीं लोक पवाडसिद्ध असें म्हणतात. हें मागें सांगितलें आहे. या ठिकाणीं मागें म्हणजे प्राचीन काळीं गर्गऋषीचा आश्रम होता असें म्हणतात.

येथून पुढें क्षेत्र यड्डूरच्या पाणोथ्यापर्यंत मध्यंतरीं बरींच तीर्थें आहेत तीं—मागें पहिल्या भागांत सांगितलेल्या गणपतीच्या देवळासमोर नदींमध्यें गणेशतीर्थ असून त्याला कोणी योगतीर्थ असेंही म्हणतात. याच्या पश्चिमेस नदीमध्यें रुद्रपादासमोर रुद्रतीर्थ आहे. आणि त्यानंतर श्रीवीरभद्र देवालयासमोर नदींत लिंगतीर्थ आहे. या लिंगतीर्थांत स्नान करून भक्तियुक्त अंतःकरणानें जो मनुष्य श्रीवीरभद्र लिंगाची पूजा करितो तो सायुज्य मुक्ति पावतो. श्रीवीरभद्र-लिंगाची उत्पत्ति कशी झाली आहे यासंबंधीं सविस्तर विवेचन पुढें श्रीवीरभद्र-अवतार या भागांत केलें आहे तें पहावें.

पूर्वकाळीं या लिंगतीर्थापासून थोड्या अंतरावर हल्लीं कल्लोळ खेडें आहे, त्या समोरच्या घाटापर्यंत नदीच्या दोहों तीरांवर मार्कंडेश्वर, शैलेश्वर, इत्यादि अनेक प्रसिद्ध लिंगें व कांहीं तीर्थें होतीं. आणि त्यांच्याजवळपास अनेक ऋषींचे आश्रम होते असें सदरी पुराणावरून समजतें.

हल्लीं कल्लोळचा जो घाट आहे त्या घाटाजवळ नदीमध्यें कहोळतीर्थ आहे. या तीर्थाला पापनाशनतीर्थ असें प्राचीन नांव होतें. परंतु

१ कहोळ ऋषींनीं पुष्कळ काळपर्यंत खडतर तपश्चर्या करून श्रीकृष्णेस प्रसन्न करून घेतलें. कृष्णा प्रसन्न होतांच तिनें ऋषीस विचारिलें कीं, 'हे मुने, तूं

त्याला पुढें कहोळ हें नांव प्राप्त झाले व त्या तीर्थाजवळ असणाऱ्या खेड्यास कल्लोळ हें नांव पडलें. जेथें हल्लीं खेडें वसलें आहे त्या ठिकाणीं पूर्वीं कहोळ ऋषींचा आश्रम होता, असें त्या पुराणांत लिहिलें आहे. वर सांगितलेला घाट सुमारें शंभर वर्षांपूर्वीं निपाणकर देसाई प्रख्यात श्रीमंत सिद्धोजीराव निंबाळकर यांनीं बांधविला आहे. घाटावरील ओंवऱ्या व देऊळ हीं त्यांनींच बांधविलीं आहेत. आणि घाटापासून कल्लोळ-पर्यंत खडी घालून पक्की सडक तयार करून तिच्या दोहों बाजूस हल्लीं दिसतांत तीं झाडें लावण्याचें कामही त्यांनींच केलेलें आहे. यामुळें या तीर्थापर्यंत येण्यास व स्नान, जप आणि श्राद्धादिक कर्में करण्यास फार उत्तम सोय झाली आहे. दरसाल विशाळी अमावास्येस या घाटावर मोठी यात्रा भरत असते.

घाटाच्या पश्चिमेस सुमारें अर्ध्या मैलावर ' गंधर्वतीर्थ ' असल्याचें समजतें. त्या तीर्थापासून मंजिरीतीर्थापर्यंत म्हणजे मांजरी गांवापर्यंत सुमारें तीन मैल नदीचा प्रवाह पूर्ववाही आहे. गंधर्व तीर्थाच्या वायव्येस अर्ध्या मैलावर ' दूधगंगा ' नदी जेथें कृष्णानदीस येऊन मिळते तेथें अत्यंत पुण्यकारक—

---

तप कां करितोस तुला जें इच्छित असेल तें माग ' हें ऐकून ऋषि म्हणाले, ' हे कृष्णे, तुझ्या दर्शनानें मी पुनीत झालों. आणि आज माझे पितर धन्य झाले! ज्या तुझ्या तरंगावरच्या तुसत्या वायुस्पर्शानें पुष्कळ लोक विष्णुपदास गेल त्या पुण्य-देही अशा तुला पाहून मला अत्यानंद होत आहे. तुझें माहात्म्य ऐकून लोकोप-कारार्थ मी ह्या स्थळीं तप केलें; तरी तुझ्या तीरीं येऊन स्नान, दान, जप, होम, श्राद्धादिक कर्म एकवार केलें असतां पापाचा क्षय व्हावा एवढेंच मी मागतों ' हें भक्तियुक्त भाषण ऐकून कृष्णाबाई संतुष्ट होऊन म्हणते ' हा वर तर तुला मी दिलाच शिवाय आणखी दुसरा असा वर देते कीं, हें तीर्थ तुझ्या नांवानें प्रसिद्ध होईल. या तीर्थांत स्नान करून मुंडण, उपवास व दुसऱ्या दिवशीं श्राद्ध जे करतील त्यांना महापुण्य घडेल ' असें दोन वर देऊन ऋषींच्या नांवानें या तीर्थाची प्रसि-द्धि केली. म्हणून त्यास कहोळ हें नांव पडलें.

## संगम

आहे. या संगमाच्या जवळभागीं प्राचीनकाळीं संगमेश्वर लिंग व लहान देऊळ होतें; व हेंच स्थान यड्डूर क्षेत्राची पवित्र नैर्ऋत्य कोनशिला (लिंगमुद्रा) होय. तथापि या संगमाच्या आसपास सध्यां इतका गाळ येऊन पडला आहे कीं, खुद्द दूधगंगेचा प्रवाह एका ओहोळा इतका आकुंचित झाला आहे! आणि या संगमाजवळ कृष्णा नदींत एक मोठा डोह झाला असून त्यांत भयंकर सुसरी इतस्ततः निर्भयपणें संचार करीत असतात. निसर्गाच्या अशा अनंत काळच्या घडामोडींत वर सांगितलेल्या ‘ संगमेश्वरलिंगाचा ’ व देवळाचा कोठें मागमूसही राहिला नाहीं, त्यांत आश्चर्य कसलें? याच कारणानें कृष्णानदीच्या तीरांवरील प्राचनिकाळीं प्रसिद्ध असलेली बरींच लिंगें भूमीच्या उदरात गडप होऊन गेलीं आहेत; तर दुसरीं कित्येक नदीच्या पात्रांत सांपडलीं असल्यानें कृष्णोदकाच्या निरंतरच्या अभिषेकांत निमग्न होऊन राहिलीं आहेत! या कारणानें कृष्णा-माहात्म्यांत वर्णिलेलीं पुष्कळ शिवलिंगें सध्यां दृष्टीआड झालीं आहेत. अशा गुप्त झालेल्या लिंगांत सदरहू संगमेश्वराची गणना होते. आणि गंधर्वतीर्थापासून संगमापर्यंत मध्यंतरीं असलेलें वायुतीर्थाजवळील ‘ वातेश्वरलिंग ’ व याच्या वरच्या (वायव्य) भागीं असणाऱ्या नागतीर्थाजवळचें ‘ नागेश्वर ’ नांवाचें सर्पभयनिवारक लिंग, यांचीही गणना वरील गुप्त झालेल्या लिंगांत झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. तथापि जरी संगमेश्वरालिंग अदृश्य झालें असलें तरी संगमाचें माहात्म्य कांहीं कमी होत नाहीं. कारण दूधगंगा नदी ही शक्तिस्वरूप असून कृष्णा ही शिवस्व-

---

१ संगमतीर्थाच्या माहात्म्यासंबंधीं सदरहू पुराणांत अशी कथा आहे.

### शिवशर्मा ब्राह्मणाची गोष्ट

सौरभ नामें नगरांत कोणी एक ब्राह्मण राहात होता. तो मोठा क्रूर, कपटी, दांभिक व बाहेरख्याली असून एका अनार्य जातीच्या अत्यंत हीन व अमंगल स्त्रीशीं रत होता. तो तिजबरोबर निःशंकपणें अन्नोदक व्यवहार व इतर अनेक

रूप आहे. अर्थात् या दोघींचा संगम अत्यंत पुण्यकारक होय. हें तीर्थ प्रयागाप्रमाणें श्रेष्ठ असून पुष्कर, गोमती, गोदावरी ह्या नद्यांमधील तीर्थेंसुद्धां याची बरोबरी करूं शकत नाहींत. संगमांत स्नान करून लक्ष गायत्रीमंत्राचा जप केला असतां सर्व मनोरथ पूर्ण होतात. सोमवतीस या संगमतीर्थांत स्नान केलें असतां समुद्रस्नानाचें फळ मिळतें. अशा प्रकारें हें तीर्थ फार पुण्यकारक आहे.

सध्यां कृष्णानदीच्या कांठीं 'टाकळी' म्हणून जें खेडें आहे. त्या खेड्याच्या पाणोथ्यापासून संगमापर्यंत नदी थेट दक्षिणवाहिनी झाली आहे. या उत्तरदक्षिण प्रवाहाची लांबी एक मैल आहे. संगमाच्या उत्तरेस थोड्या अंतरावर नदीच्या तीरीं पश्चिम दानवाडच्या बुवाचा मठ व त्या- जवळ नदीस लहान घाट आहे. या मठाच्या उत्तरेस थोड्या अंतरावर म्हणजे संगमापासून सुमारें अर्ध्या मैलावर नदीच्या उजव्या (पश्चिम) तीरीं 'रामालिंगक्षेत्र' आहे. तेथपर्यंतचा नदीकांठचा पश्चिमेकडचा सर्व प्रदेश

---

पापकर्में करीत काळ घालवीत असे. पुढें कांहीं वर्षांनीं तो मृत झाला. त्याचा पुत्र शिवशर्मा हा अत्यंत सालस वेदशास्त्र जाणणारा मोठा ज्ञानी होता. तो आपल्या वडिलांचीं पापें आठवून फार खिन्न होत असे. बापाच्या मरणानंतर त्याला अशी इच्छा झाली कीं, 'आपल्या वडिलांच्या कृतपापाचें क्षालन होऊन त्यांना मुक्ति घडावी असें कांहीं कृत्य आपण करावें.' तेव्हां तत्कालीन रूढीप्रमाणें वरील कार्य करण्याकरितां आपल्या वडिलांचीं हाडें घेऊन तो काशीयात्रेस निघाला. इतक्यांत त्याच्या घरास आग लागून त्याचे सर्व पुत्र जळून गेले ! म्हणून जाणें रहित केलें. पुढें एका वर्षानंतर तो पुनः काशीस जाण्यास सिद्ध झाला तों पुन्हां घर भस्मसात् झालें ! अशीं बारा वर्षें निघून गेलीं. तरी त्यास काशीस जाणें होईना. त्यामुळें आईबापाच्या पापाचा धिःकार करून तो अत्यंत खिन्न होऊन गेला. तथापि मनाच्या उत्कट प्रेरणेनें त्यानें पुनः एकदां प्रस्थान ठेविलें. व त्यावेळींही आलेल्या अनेक संकटांना न जुमानितां तो भार्येसह बाहेर पडून जातां जातां दैव- वशात् या संगमतीर्थाकडे आला. हें रम्य स्थान पाहून स्नान करण्याच्या उद्देशानें जवळचें वडिलांच्या हाडांचें गांठोडें नदीतीरीं ठेवून भार्येसह संगमांत स्नानास

हल्लीं कोल्हापूर संस्थानच्या हद्दींत आहे.' अर्थात् वर सांगितलेला मठही त्याच हद्दींत आहे. या मठांत थोड्या वर्षांपूर्वीं एक महंत राहत असे व मठाच्या आसपासचा नदीकांठच्या सर्व सुपीक प्रदेश मठास इनाम असे. त्यामुळें त्याचे दरसालचें तीन चार हजार रुपयांचें उत्पन्न त्या महंतास बिनधोक मिळत असे. त्यामुळें सदरहू महंताजवळ बरीच माया होती आणि घोडे, उंट इत्यादि सरदारी सरंजामही त्यानें बाळगला होता म्हणतात. या संपत्तीमुळें बुवांनें स्वतःच्या राजरोस कारभारास राजीनामा देऊन व्याजबट्याचा सट्टा करून मोठा सावकार बनून सदरील मठास शुद्ध सराफकट्टयाचें स्वरूप दिलें होतें असें समजतें. अर्थात् धनसंचयाच्या आश्रयानें सर्वदा असणाऱ्या कांहीं शेलक्या दुर्गुणांनीं बुवावर आपला पगडा पूर्ण बसविण्याचा घाट घातला होता असें दिसतें. तेव्हां अशा प्रकारच्या अनेक महंतांच्या कारभाराचा पूर्ण अनुभव घेतलेल्या कै० श्रीमच्छत्रपति शाहू महाराजांनीं एक वटहुकूम काढून तिच्या आधारें अशा महंतांचीं सर्व

---

उतरला. इकडे एका धूर्त कोल्ह्यानें कांहीं खाद्य पदार्थ असेल या समजुतीनें तें अस्थींचें गांठोडें लांबविलें. पण पाहतो तों तीं शुष्क हाडें! तेव्हां त्यानें तें गांठोडें रागानें पाण्यांत फेंकून दिलें. कर्मधर्मसंयोगानें तें गांठोडें संगमांतच जाऊन पडलें. शिवशर्मा व त्याची स्त्री स्नान करून बाहेर येऊन पाहतात तों तें गांठोडें नाहीं, तेव्हां त्यांस फार दुःख झालें; व दोघें फार खिन्न होऊन विचार करीत बसलीं; परंतु इतक्यांत असा चमत्कार झाला कीं, देवदूतांनीं तेथें एक दिव्य विमान आणिलें. तें विमान त्या ठिकाणीं उतरतांच शिवशर्म्याचे मृत आईबाप दिव्य देह धारण करून संगमांतून प्रकट झाले! आणि पुत्राच्या व सुनेच्या देखत त्या दिव्य विमानांत बसून देवलोकीं निघून गेले! त्यांना स्वर्गीं नेतेवेळीं देवदूतांनीं पुत्रास सांगितलें कीं, 'तुझ्या आईबापांचीं हाडें या संगमांत पडल्याकारणानें शिवकृपेनें त्यांच्या सर्व पापांचें क्षालन होऊन ते पवित्र झाले. म्हणून त्यांना आम्ही कैलासीं नेत आहों.' हें शिवदूतांचें भाषण श्रवण करून तो ब्राह्मण संतुष्ट झाला. व पुढें पर्णकुटिका बांधून या पवित्र संगमाजवळच राहिला; व कांहीं दिवसांनीं तोहि मुक्तीस गेला.

उत्पन्नें सरकारजमा करून त्यांना तहाहयात नक्त नेमणुका करून देऊन पन्हाळगडावरील पहाऱ्यांत सरकारचा पाहुणचार घेत स्वस्थ राहण्याची सुरेख सोय करून दिली! त्यांत सदरहू मठाच्या महंताचाही समावेश झाला असें सांगतात. कोल्हापूर दरबारानें या बाबतींत असा विचार केला असावा कीं, धार्मिक कार्याकरितां निरपेक्षपणानें झटण्यायोग्य, सर्वसंग परित्याग केलेल्या एकट्या संन्याशाला इतकें दोन चार हजाराचें सरदारी उत्पन्न काय करावयाचें? लोटा, छाटी व दंड या साधनसामुग्रीवर सर्व समाजास सन्मार्गास लावण्याचें ज्याचें कर्तव्य, अशा एका संन्यस्त वृत्तीच्या माणसाची बरदास्त व मिजास चालण्याकरितां इतकें उत्पन्न खर्च होणें अनाठायीं असून तेंच प्रजेच्या शिक्षणाकडे खर्च झाल्यास फार फायदेशीर व अत्यंत योग्य होईल. असें ठरवून अशीं सर्व उत्पन्नें करवीर सरकारनें खालसा केलीं असावीं या गोष्टीवरून आमच्या वीरशैव समाजांतील गृहस्थांच्या डोळ्यांत चांगलें अंजन पडत नाहीं काय? कारण आपल्यांतील विरक्त स्वामींचे मठ हे अशाच प्रकारच्या धर्म व शिक्षणप्रसाराच्या संस्था असून त्यांच्या उत्पन्नाचा विनियोग सध्यां किती यथार्थपणें होतो हें उघड दिसून येत आहे. अशा स्थितींत श्रीमंत शिरसंगीकर सरदेसाईसाहेबांनीं मागें सांगितल्याप्रमाणें समाजशिक्षणाप्रीत्यर्थ उदारपणें जसें सर्वार्पण केलें तसें वर सांगितलेल्या अस्सल जंगम मठाधिकाऱ्यांपैकीं कोणाएकट्या विरक्तानें तरी सर्वस्व अर्पण केलें आहे काय? यावरून भक्तकुलांत जन्मलेले सदरहू जगद्वंद्य सरदेसाईसाहेब श्रेष्ठ कीं हे विरक्तस्वामी श्रेष्ठ याचा प्रत्येक वीरशैवानें विचार करावा. असो. हल्लीं हा मठ व त्याकडे चालणाऱ्या जमिनी सरकारजमा आहेत म्हणून सदरहू मठ नादुरुस्त होऊन जात असून जमिनी कुळांनीं खंडानें केल्या आहेत. त्यापैकीं कांहीं शेतकरी मठाजळ राहात आहेत. या मठाच्या उत्तरेस सुमारें दोनशें कदमांवर नदीच्या उजव्या तीरीं—

# यज्ञकुंड व भस्माचा ढीग.

हे दिसून येतात. भस्माचा ढीग पुष्कळ दुरून दिसतो; पण जवळ गेल्याशिवाय यज्ञकुंड मुळींच दिसत नाहीं. या कुंडाजवळच राखेचा एक ढिगारा आहे तो भस्माचा ढीग होय. ही त्या यज्ञकुंडांतलि राख असावी. यज्ञकुंड तीस पसतीस फूट लांब रुंद आहे. परंतु हल्लीं तें सर्व बुजून जाऊन, त्यावर एक मोठें शेत तयार झालें आहे. भस्माचा ढीग सुमारें पंचवीस फूट उंच असून पायथ्याशीं घेर शंभर फूट आहे. या ढीगाच्या आसपास दीड दोनशें फूटपर्यंत जमीनींत ही यज्ञरक्षा दिसून येते. दरसाल या ढिगाऱ्यांतून पुष्कळ राख 'विभूति' अगर 'भस्म' म्हणून इकडे येणारे यात्रेकरू घेऊन जातात. ही विभूति पाण्यांत कालविल्याबरोबर पांढरी होते व भस्माप्रमाणें पुष्कळ दिवस तिचा उपयोग करितां येतो. यज्ञकुंडही या भस्मानें पूर्ण भरून गेलें आहे; पण वर मातीचा थर बसल्यामुळें त्यांतील भस्म काढण्यास बरेंच खोल खणावें लागतें.

इकडील कित्येक लोकांचा असा समज आहे कीं, शिवसती पार्वतीदेवीनें दक्षप्रजापतीच्या ज्या प्रख्यात यज्ञकुंडात उडी घेतली आणि ज्या कारणानें श्रीवीरभद्रदेवाचा अवतार झाला; त्या श्रीक्षेत्र यड्डूर येथील महायज्ञकुंडांतील ही राख असावी! त्यामुळें श्रीपार्वतीदेवीच्या अंगस्पर्शानें पुनीत झालेली ही रक्षा फारच पवित्र होय! परंतु हा समज बरोबर दिसत नाहीं. कारण दक्षप्रजाप्रतीचा हा महायज्ञच जेथें अपुरा राहिला तेथें त्यांतील रक्षा काढून ती यड्डूर क्षेत्राच्या सीमेबाहेर तेथून सुमारें तीन मैलांवर आणून टाकण्याची यातायात कोण करणार? तेव्हां हें म्हणणें योग्य वाटत नाहीं. तथापि ही त्या महायज्ञाची रक्षा नसली, तरी येथें त्यानंतर अलीकडच्या काळीं एकादा यज्ञ झाला आहे खास. कृष्णामहात्म्य या ग्रंथांत या ठिकाणीं मुद्गल ऋषीची यज्ञ-भूमि असून तो वारंवार यज्ञ करीत असे, असें म्हटलें आहे. तें बरोबर असावें. अथवा त्यानंतर कोणातरी क्षत्रिय राजाच्या कारकीर्दींत येथें एकादा मोठा यज्ञ-समारंभ झाला असला पाहिजे.

त्याशिवाय ही इतकी रक्षा सांचणें शक्य नाहीं. जवळच्याच भागीं असले- ल्या रामपूरच्या भरभराटीच्या काळांत केव्हां तरी हा यज्ञ झाला असावा. व त्याची ही रक्षा असावी असें वाटतें. या यज्ञकुंडाचें व भस्माच्या ढि- गाचें दर्शन घेऊन यांच्या उत्तरेस असलेल्या प्रख्यात—

## रामगया

या पुण्यकारक तीर्थाकडे जाऊं. रामगया हें अत्यंत प्रेक्षणीय स्थळ आहे. नदीप्रवाहाच्या अगदीं मध्यावर २० फूट लांब आणि १५ फूट रुंद असा सुमारें ४ फूट उंचीचा चुनेगची भक्कम दगडी चौथरा असून त्याच्या मधो- मध १३ फूट लांब व ८।९ फूट रुंद असें तीर्थकुंड आहे. त्या कुंडाच्या तळाशीं फरसबंदी केली असून तिच्या मध्यभागीं पादुका आहेत. यांना रामपाद असें म्हणतात. चैत्र वैशाख महिन्यांतील अत्यंत कडक उन्हाळ्या- च्या दिवसांत नदीचें पाणी अगदीं कमी होतें. त्या वेळीं मात्र या राम- पादांचें पुण्यदर्शन घडतें. तेव्हांसुद्धा दरवर्षी या चौथऱ्यावर फूट दीड फूट पाणी असतें. अलीकडे ३।४ वर्षें पाऊस अगदीं कमी पडत असल्या कारणानें उन्हाळ्यांत नदीचें पाणी फारच कमी होऊन जात असतें म्हणून हा तीर्थ-कुंडाचा चौथरा पाण्याच्यावर फूट दीड फूट राहून आंतील राम- पादांचें दर्शन करण्यास उत्तम सोय झाली होती. हल्लीं या तीर्थकुंडांत बरीच वाळू सांचलेली आहे. या रामगयेच्या सभोंवतीं नदीचें पाणी अगदीं कमी म्हणजे ४।५ फूट खोल असतें म्हणून कोणालाही अशा दिवसांत रामपादांचें दर्शन घडणें सुलभ असतें.

या रामगयेच्या समोर नदीच्या उजव्या तीरावर सुमारें ४० कदमांवर रामलिंगाचें भक्कम पण सुंदर देवालय आहे. देवालय लहानच म्हणजे सुमारें १५ फूट लांब रुंद असून उंची २५ फूट होईल. देवालयावर साधें शिखर आहे. या देवालयाला पूर्वेकडे एकच द्वार आहे. त्या दारासमोर एक मोठा नंदी आहे. देवळांत एकापुढें एक अशीं दोन मोठीं शिवलिंगें दिसतात. दर्शनी लिंग जरा ओबड धोबड असून तें मागाहून देवालयांत आणून ठेविलें

असावें असें दिसतें. त्याच्या मागचें मूळचें लिंग फार घाटदार आहे. त्याची पिंडी व जलहरी अगदीं प्रमाणबद्ध असून सुरेख घोटींव दगडाच्या आहेत, त्यामुळें हें लिंग अत्यंत उठावदार दिसतें. याची येथें कायमची स्थापना झाली असल्यामुळें हेंच प्रसिद्ध रामलिंग होय. या दोन्ही लिंगांच्या दर्शनानें फार समाधान वाटतें. नदीच्या दरसालच्या महापुरानें हें देवालय अर्धे अधिक गाळांत गाढलें गेलें आहे. परंतु दर्शनी बाजूचा गाळ काढून टाकून रस्ता मोकळा केलेला असतो. या रामलिंगाची नित्य पूजा-अर्चा करण्यास आणि नंदादीप-उत्सव वगैरेकरितां पूर्वकाळीं या देवालयाच्या पश्चिमेस टेकावर असलेलें रामपूर या नांवाचें खेडें या देवास अग्रहार होतें असें सांगतात. परंतु सन १८५३ च्या सुमारास कृष्णाबाईला जो भयंकर महापूर आला त्यांत या खेड्याची अगदीं धूळधाण उडून सर्व घरें पडून गेलीं. व शीरसलामत राहिलेले थोडे लोक दुसरीकडे निघून गेले. अर्थात् सध्यां हें अगदीं ओसाड खेडें आहे. अद्याप या खेड्याच्या खाणाखुणा म्हणजे भोंवतालचा तो लहानसा तट, तटाच्या आंत व बाहेर दिसणाऱ्या मोडक्या घरांच्या पडक्या भिंती आणि त्या सर्वांच्या पलीकडचे सभोंवतालचें गांवकुसूं हीं सर्व स्पष्ट दिसतात. परंतु या सर्व भागावर हल्लीं कालचक्रानें आपला काळा नांगर फिरविला असून दानवाडचे लोक येथें शेतें पिकवीत आहेत. हें पडकें खेडें पाहात असतांना मनांत अनेक तऱ्हेचे विचारतरंग उभे राहतात. नांदत्या काळांत या ठिकाणीं किती तरी लोकांची वस्ति असेल. इनामदार, वतनदार, पुजारी व इतर सुखवस्तु लोक येथें सुखानें राहात असतील. हा माझा वाडा, ही माझी जमीन, हें माझें दुकान अशा प्रकारची कितीतरी मनोराज्यें ते अनुभवीत असतील. त्यांच्या या अहंपणाच्या सर्व मनोभावना मातीमोल ठरवून मानवी जीवित व वित्त हीं किती क्षणभंगुर आहेत याचा प्रत्यय त्या आधिभौतिक आपत्तीनें क्षणांत आणून दिला असावा! नकाशावरील भूमीच्या मनुष्याच्या मीपणादर्शक भडक रंगाचा वाटेल तेव्हा बेरंग करून, मानवी मनावर स्वतःच्या अमर्याद सत्तेचा

व अगाध सामर्थ्याचा पक्का ठसा उमटविण्याला निसर्गाला निमिषार्धसुद्धां लागत नाहीं. याचें बरोबर चित्र हें खेडें पाहत असतांना दृष्टीसमोर उभें राहतें! कालाऱ्या विशाल उदरांत असे कितीतरी भीषण चित्रपट सृष्टि-देवीनें कोरून ठेविले असतील व आणखी कित्येक कोरण्याचें काम चाललें असेल. त्या भयानक संकटांत येथें जे लोक सांपडले असतील त्यांची किती दैना झाली असेल! त्यांच्या आर्तस्वरांनीं हा सारा प्रदेश त्या वेळीं दणाणून गेला असेल. त्या मृत्यूच्या दाढेंत सांपडलेल्या लोकांच्या करुणास्पद निराश्रित स्थितीचा देखावा या कालवश झालेल्या खेड्यांतील प्रत्येक पडक्या भिंतीच्या फुटक्या पाषाणावरही स्पष्ट उमटलेला आहे कीं काय, असें भांबावून गेलेल्या मनाला वाटूं लागतें. अशा भयदायक विचारांचें मनांत काहूर उठविणाऱ्या या नामशेष झालेल्या रामपुरास शेवटचा रामराम ठोकून राहिलेली पंचक्रोशी प्रदक्षिणा पुरी करण्यास पुढें जावें हें उत्तम.

रामपूरच्या विचारतंद्रींत गढून गेल्यामुळें श्रीरामालिंग व रामगया यांचें पौराणिक माहात्म्य काय आहे तें पाहाण्याचें आपण अजीबाद विसरून गेलों. रामगया हे अति पुण्यकारक तीर्थ असून संसार-तापानें संतप्त झालेल्या पुरुषाला ती तारिते. रामगयेस येऊन रामलिंगापुढें पितरांचें संतर्पण केलें असतां सर्व पितर मुक्त होतात. असें हें अत्यंत पुण्यप्रद तीर्थ आहे.

---

१ या रामगया तीर्थाच्या माहात्म्याविषयीं अशी कथा आहेः—पौराणिक काळांतील प्रसिद्ध परशुरामानें आपल्या सर्व शत्रूंचें निर्दालन करून नंतर त्या पापाच्या क्षालनार्थ व पितरांचें तर्पण करण्याकरितां तो पचनदतीरीं गेला. तेव्हां तेथील विद्वानांनीं त्याला अशी सल्ला दिली कीं, कृष्णावेणीच्या तीरीं प्रसिद्ध रामगया आहे म्हणजे रामलिंगापुढें तारक असें पद आहे, तीच रामगया होय. त्या ठिकाणीं सर्व तीर्थें येऊन राहतात. रामलिंग हें तारकलिंग आहे. त्या पुण्यतीर्थीच राम व सीतेच्या हातांतील वाळूचा पिंड मिळून दशरथ राजा उत्तम गतीस गेला. करितां, त्या तीर्थी जाऊन आपण पितृतर्पण करावें. असें त्यांचें भाषण ऐकून भार्गवराम येथें रामगयेस आला. आणि त्यानें पितरांचें संतर्पण केलें. तेव्हां त्याच्या पितरांना मुक्ति मिळाली. यावरून रामगया ही मोक्षदायक आहे.

रामगयेपासून टाकळी खेड्याचा पाणोथा उत्तरेस अर्ध्या मैलावर आहे. तेथपर्यंत एक दोन तीर्थें व लिंगें पूर्वीं होतीं. त्यांपुढें पूर्व दिशेस एक मैल अंतरावर 'प्रेतशिला' व 'प्रेततीर्थ' आहे.

टाकळीच्या थेट पूर्वेस दोन मैलांवर चंदूर खेडें आहे. तेथून टाकळी-पर्यंतचा नदीप्रवाह पश्चिम ( किंचित् नैर्ऋत्य ) वाही झाला आहे व या पश्चिमप्रवाहांत दोन गांवांच्या मधोमध, नदींत सदरहू प्रेतशिला आहे. म्हणून ही प्रेतशिला व प्रेततीर्थ यांपासून पूर्वेस एक मैलावर 'चंद्रतीर्थ' आहे. आणि या तीर्थाच्या दक्षिणेस नदीकांठीं प्रसिद्ध 'श्रीचंद्रेश्वर' अथवा 'अदृश्येश्वर' लिंग आहे. चंद्रतीर्थांत स्नान करून चंद्रेश्वराचें दर्शन केलें असतां पापांचा परिहार होतो. या चंद्रेश्वर लिंगाचें जें देऊळ तेंच प्रसिद्ध—

## श्रीचंद्रेश्वराचें देऊळ

होय. हें देऊळ बरेंच मोठें असून त्याचें गर्भदेऊळ व सभामंडप असे दोन मुख्य भाग आहेत. गर्भदेऊळ पूर्वकालचें भक्कम चुनेगच्ची असून त्यावर साधें पण उंच शिखर आहे. शिखरासह गर्भदेवळाची उंची

---

१ या शिलेचें महत्व असें सांगितलें आहे कीं, जें कोणी अग्नि व मंत्र यांच्या संस्कारांवांचून म्हणजे विषप्रयोगानें, फांसानें अगर बुडून किंवा इतर कोणत्याही प्रकारानें आकस्मिक प्रसगांत मृत झाले असतील ते येथें मुक्त होतात. पूर्वयुगांत कपिल महामुनीच्या शापानें भस्म होऊन गेलेले साठ हजार सगरपुत्र, त्यांचा नातु भगीरथ राजा यानें या प्रेतशिलेवर तर्पण करितां व गंगोदकानें उत्तम गतीस गेले. म्हणून या शिलेवर एक भरलेला घट फोडून, सपिंडश्राद्ध करून यथाशक्ति दान दिल्यास आपले पितर स्वर्गास जातात.

२ हे चंद्रतीर्थ उत्पन्न होण्याचें कारण असें सांगितलें आहे:—चंद्रास गुरुस्त्रीग-मनापासून जें महापाप घडलें होतें तें सदरहू तीर्थांत स्नान करण्यानें नष्ट झालें व तो मुक्त झाला. म्हणून या तीर्थास 'चंद्रतीर्थ' हें नांव पडलें. चंद्रानें पूजिलेलें जें लिंग तेंच चंद्रेश्वरलिंग होय.

चाळीस फूट होईल. व लांबी रुंदी प्रत्येकीं २० फूट आहे. गर्भदेवळापुढें जो सभामंडप आहे, तो अलीकडे बांधिलेला असून त्याचें सर्व काम लांकडी आहे, व वर मातीचा घुमट आहे. सभामंडपाची लांबी रुंदी प्रत्येकीं तीस फूट आहे, व उंची १०।१२ फूट होईल. महापुराचें पाणी देवळांत दरसाल शिरत असल्यानें व पुष्कळ वर्षांत नीट डागडुजी झाली नसल्यानें, हा सभामंडप हल्लीं बराच मोडकळीस आला आहे. या सभामंडपापुढें ८।१० वर्षांपूर्वीं एक सोपा उतरून त्यावर जस्ती पत्रे घातले आहेत, त्यामुळें दर्शनी भाग दुरुस्त व साजरा झाला आहे.

गर्भदेवळांत मध्यभागीं श्रीचंद्रेश्वर अथवा श्रीअदृश्येश्वर लिंग असून तें यड्डूर येथील श्रीअदृश्येश्वर लिंगाइतकेंच पण सुरेख असें आहे. याशिवाय गर्भदेवळांत दुसरे कोणते देव नाहींत. गर्भदेवळासमोर सभामंडपांत लहानसा नंदी आहे. या चंद्रेश्वरलिंगास अदृश्येश्वर हें नांव कां प्राप्त झालें, त्याचें कारण पुढें ४ थ्या भागांत सांगितलें आहे.

श्रीवीरभद्र देवाच्या नांवावरून ( यडवीर यावरून ) ज्याप्रमाणें यड्डूर हें नांव पडलें आहे. त्याप्रमाणें श्रीचंद्रेश्वर देवाच्या नांवावरून ‘ चंदूर ’ हें नांव पडलें आहे; आणि यड्डूर गांव जसा श्रीवीरभद्र देवास पूर्ण इनाम आहे. तसा चंदूर श्रीचंद्रेश्वरास सर्व इनाम असावा; इतकेंच नव्हे, तर यड्डूरांत श्रीवीरभद्र देवांची ज्याप्रमाणें दररोज त्रिकाल पूजा, महानैवेद्य व पालखी-प्रदक्षिणोत्सव हीं नित्य नियमानें होत असतात. तशींच नित्य श्रीचंद्रेश्वरासंबंधींही होत असावीं असा अनेक करणानें अजमास होतो; परंतु सध्यां येथें दररोज एक वेळ पूजा होण्याची व आठव्यांतून फक्त सोमवारीं सकाळीं पालखी-प्रदक्षिणा होण्याची मारामार पडते. हें असें कां व्हावें याचें कारण कळणें कठीण आहे. श्रीवीरभद्र देवास जसे हजारों भक्त येतात व त्यांपासून पुजाऱ्यांस कांहीं फायदा मिळतो तसा बहुतकरून येथील पुजाऱ्यांस मिळत नसावा. कारण येथें यात्रा होत नाहीं हें उघड दिसतें. शिवाय श्रीवीरभद्र देव ज्याप्रमाणें आपली पूजा, अर्चा,

नैवेद्य, पालखी-प्रदक्षिणा, नंदादीप इत्यादि बाबींत खो घालणाऱ्या मगरूरांची मस्ती तावडतोब जिरविण्याच्या कामीं अत्यंत जागृत आहे; तसा श्रीचंद्रेश्वर देव नसावा. कारण बोलून चालून भोळा सांबच तो! त्याजकडून अशा जागृतपणाची अपेक्षा करणेंच अज्ञानाचें द्योतक होय. श्रीचंद्रेश्वर देवालयाजवळ उजव्या बाजूस ( दक्षिणेस ) दिगंबर स्वामींचें समाधिमंदिर आहे. हें मंदिर दुमजली असून चुनेगची आहे. याची लांबी ६० व रुंदी ४० फूट होईल. या मंदिराचें सभामंडप व गाभारा असे दोन भाग आहेत. सभामंडप बराच मोठा व भव्य आहे. त्यांत पश्चि I बाजूस मधोमध स्वामींची समाधि असून तीवर पादुका ठेविल्या आहेत. या पादुकांची नित्य पूजा अर्चा होत असते. हें समाधि-मंदिर दुरुस्त असून तें कौलारू आहे. म्हणून या मंदिराच्या सभामंडपांतच श्रीचंद्रेश्वराची पालखी वगैरे ठेवितात. या समाधीचे पुजारी या मंदिराच्या पिछाडीस राहतात. हें मंदिर दिगंबर स्वामींच्या कोणा एका मोठ्या हुद्यास चढलेल्या शिष्यानें सुमारें २५ वर्षांपूर्वी बांधिलें. व त्यानेंच पूजेची वगैरे व्यवस्था केली आहे असें सांगतात. श्रीचंद्रेश्वराचें देवालय व दिगंबर स्वामींचें समाधिमंदिर यांशिवाय येथें दुसरें कांहीं पाहण्यासारखें नाहीं. याच्या सभोंवार चिंचेचें बन असून तें श्रीक्षेत्र यड्डर येथील बनाप्रमाणेंच विशाल आहे. किंबहुना यड्डरच्या बनापेक्षां हें फारच लांब म्हणजे सुमारें अर्धा मैल लांबीचें आहे. परंतु येथें यात्रा वगैरे होत नसल्यानें व नवीन झाडांच्या लागवडीकडे कोणाचें लक्ष नसल्यानें हें बन ठिकठिकाणीं तुटक झालें आहे म्हणून यड्डरप्रमाणें येथें सृष्टिसौंदर्य नाहीं. तथापि गांवठाणापासून हें बन व वरील देवळें सुमारें अर्धा मैल दूर पश्चिमेस असल्या कारणानें येथें लोकांची वर्दळ कमी असते. त्यास्तव हें स्थान अत्यंत शांत व रम्य वाटतें. यड्डरच्या यात्रेच्या वेळीं कडक उन्हाळ्याच्या दिवसांत प्रवास करून थकलेल्या व यात्रेंतील गर्दीस त्रासलेल्या मनुष्याला तेथून जवळच असलेल्या या प्रशांत स्थानीं येतांच मोठें समाधान वाटतें. व येथून लवकर हालावेंसें वाटत नाहीं. या रम्य स्थानापासून पूर्वेस सुमारें

अर्ध्या मैलावर चंदूर हें खेडें आहे. या खेड्यांत तेथील देशपांड्यांचा एक जुना वाडा असून त्याच्याभोंवतीं लहानशी तटबंदी आहे. चंदूरपासून यड्डूर क्षेत्र थेट दक्षिणेस फक्त १ मैलावर आहे. हें खेडें पाहून श्रीचंद्रेश्वराचें पुनश्च दर्शन घेऊन आपण पुढील मार्गास लागूं. चंदूरच्या पाणोथ्यापासून उत्तरेस सुमारें तीन मैलांवर खिद्रापूर हा गांव आहे. त्या खिद्रापुरापासून येथपर्यंतचा नदीप्रवाह साधारणतः दाक्षिणवाही आहे. या प्रवाहांत चंदूरच्या उत्तरेस सुमारें दोन मैलांवर म्हणजे यड्डूरवाडीहून खिद्रापुरास जो रस्ता गेला आहे त्या रस्त्याच्या उत्तर बाजूस अर्ध्या मैलावर या क्षेत्रां-तील सर्वांत श्रेष्ठ व पुण्यप्रद असें—

## शुक्लतीर्थ

आहे. हें तीर्थ फार प्रसिद्ध असून याची बरोबरी करणारें एकही तीर्थ दुस-रीकडे नाहीं असें याचें महत्व आहे. जो मनुष्य पौष वद्य ३० (विशाळी अमावास्या) दिवशीं शुक्लतीर्थांत स्नान करून पितृतर्पण, पुराणश्रवण, व श्रीकोपेश्वरास रुद्राभिषेक करून उपोषण, दानधर्म व रात्रौ जागरण करितो तो कृतकृत्य होतो. अन्य ठिकाणीं यज्ञयागादिकानें जें फळ मिळतें तें फळ शुक्लतीर्थांत फक्त स्नान करून श्रीकोपेश्वराचें दर्शन घेतल्यानें मिळतें. जो मनुष्य अनंत पापें करून भ्रष्ट झाला तो या तीर्थस्नानानें व श्रीकोपनाथदर्शनानें मुक्त होतो. या शुक्लतीर्थाच्या स्नानानें [1]महापातकी

---

[1] चौघा ब्राह्मणपुत्रांची गोष्ट.

मध्य देशांत (विदर्भ देशांत) कोणी एक वैदिक ब्राह्मण राहत असे. त्याला म्हातारपणीं चार पुत्र झाले. तीं मुलें लहान असतांनाच कांहीं वर्षांनीं तो ब्राह्मण मरण पावला. त्याची बायको तरुण असून अत्यंत रूपवान होती. ती लौकरच वाईट संगत लागून स्वेच्छाचारी बनली. त्यामुळें त्या देशांत राहणें तिला आवडेना. म्हणून एके वेळीं संधि साधून, ती त्या चौघा अर्भकांना त्या गांवीं सोडून देशत्याग करून कोंकणांत गेली, आणि तेथें राजरोस व्यभिचारकर्मास प्रवृत्त

लोक कसे उद्धरून जातात या विषयीं अनेक आश्चर्यकारक आख्या-
यिका ऐकण्यांत येतात. या तीर्थास पूर्वीं प्रभासतीर्थ असें नांव होतें. परंतु

---

होऊन एका वेश्येच्या घरीं राहिली. इकडे त्या मुलांच्या भाऊबंदांनीं व शेजा-
ऱ्यांनीं त्या सर्व मुलांचा प्रतिपाळ करून त्यांजकडून बराच विद्याभ्यास करविला-
तथापि ते मुलगे ब्रह्मकर्मांत प्रवीण न होतां मोठेपणीं वणिग्वृत्तीवर उदरनिर्वाह
करूं लागले; व ते स्वतः बुद्धिमान् असल्यानें आणि वडिलांची संपत्ति त्यांच्या हातीं
लागल्या कारणानें ते मोठ्या प्रमाणावर व्यापार करूं लागले. कोंकण प्रांताशींही
त्यांचा अनेक प्रकारें व्यापार चालत होता. एके वेळीं हजारों बैलांवर माल लादून
विक्रीकरितां ते कोंकणप्रांतीं येत होते. त्यावेळीं एके दिवशीं मार्गांत संध्याकाळीं
दुर्दैवानें एक लुटारूंची टोळी त्यांस भेटली. लुटारूंनीं बैलांभोंवतीं गराडा घातला.
तेव्हां त्या चौघांनीं प्रसंगावधान राखून, बोजड माल टाकून देऊन मोठ्या शिताफीनें
रत्नादिक मूल्यवान् जिनसा लपवून घेतल्या आणि त्या धांदलींतून निसटून राना-
तील एका वाटेनें पळून गेले. लुटारूंना बैलांवरील सर्व माल व पुष्कळ रोख रक्कम
बिनबोभाट मिळाल्याकारणानें ते आनंदांत गर्क झाले. त्यामुळें ते चौघे मालक
अचानक निसटले हें त्यांच्या ध्यानीं आलें नाहीं. इकडे या चौघा व्यापाऱ्यां-
नाही भुसार माल गेल्याचें तादृश दुःख न वाटतां भारी किंमतीच्या भांडवलासह
प्राणावरचें संकट मालावर निघून गेल्याबद्दल त्या दुःखांतही समाधान वाटलें.
रानावनांतून भटकत भटकत एके दिवशीं सायंकाळीं, कर्मधर्मसंयोगानें, ते ज्या
नगरांत त्यांची आई वेश्या होऊन राहिली होती, तेथें आले. आणि तिच्या वाड्या-
जवळून जात असतां तिनें हे द्रव्यवान् आहेत असें पाहून, त्यांना आपल्या वाड्यांत
बोलावून म्हटलें ' तुम्हीं फार दूर देशाहून आलेले दिसतां, तरी माझ्या घरीं उत-
रून विश्रांति घ्यावी. माझ्या येथें कांहीं कमी नाहीं. ' हें मधुर भाषण ऐकून
आणि त्यांनाही विश्रांतीची अगदीं जरूरी असल्यामुळें, ते तिच्या घरीं गेले. थोड्याच
वेळांत सर्वांचें जेवणखाण आटपतांच, तिनें त्यांना माडीवरील रंगमहालांत बोला-
वून नेलें. तेथें गेल्यानंतर त्यांनीं आपल्या जवळचीं कांहीं अमूल्य रत्नें त्या स्त्रीस
दाखविलीं. तीं पाहून तिला अत्यानंद झाला. मग तिनें सर्वांस विडे देऊन त्यांची
थट्टामस्करी चालविली. अशाप्रकारें सर्वजण आनंदांत गर्क असतां त्या चौघांत

याचें हें महात्म्य पाहून सर्व लोक या तीर्थास शुक्लतीर्थ असें म्हणूं लागले. या तीर्थीं दोनप्रहरीं कृष्णेचें पाणी नेहमीं वाढत असतें असें सांगतात. कारण त्या वेळीं तिला गंगा, यमुना इत्यादिक नद्या येऊन पहात असतात. यामुळें कृष्णा ही धन्य होय ! तसेंच हा देश व या तीर्थांत स्नान करणारे पुरुषही

---

विशेष चाणाक्ष असलेल्या धाकट्या भावानें सहज आपलें तोंड समोरच्या आरशांत पाहिलें. तों विड्यानें रंगलेलें त्या स्त्रीचें मुखकमल हुबेहूब आपल्या सारखेंच आहे हें चटकन् त्याच्या ध्यानांत आलें. आणि लहानपणीं लोक बोलत असत कीं, हीं मुलें आईच्यासारखींच असून तोंडावळा हुबेहूब तिच्यासारखाच आहे. हें म्हणणें त्याला आठवून तो एका भयंकर शंकेनें अगदीं खिन्न झाला. आणि क्षणार्धांत आपल्या भावाकडे वळून म्हणाला, ' धिक्कार असो तुम्हांला; अरे ही प्रत्यक्ष आपली आई आहे यांत बिलकूल शंका नाहीं. तेव्हां हिच्याशीं असें निंद्य कर्म करून नरकांत जाऊं नका. ' असें त्याचें धिक्कारयुक्त भाषण ऐकून सर्वांस विस्मय वाटला ! त्यांनीं तिला आपलीं नांवें व गोत्र सांगून तिची हकीकत विचारिली. तेव्हां सर्व उलगडा झाल्यानें ती फार खिन्न झाली. आणि कृतकर्माचा पश्चात्ताप होऊन दुःखातिशयानें तिचा कंठ दाटून आला. हें जाणून चौघांनीं उठून तिला साष्टांग नमस्कार घातला. नंतर सर्वांनीं मिळून विचार ठरविला कीं, या मानसिक पापाचा नाश ज्यायोगें होईल असें प्रायश्चित्त देऊन शुद्ध व्हावें. पंडितांस विचारतां ते म्हणाले ' अशा मानसिक पातकांचा नाश करणारीं अनेक तीर्थें आहेत, पण त्या सर्वांपेक्षां अंतःकरणशुद्धि हीच महत्वाची आहे. पश्चात्तापानें सर्व पापांचा निरास होत असल्यामुळें तेंच मोठें तीर्थ आहे. जलामध्यें स्नान केलें असतां त्याला खरें स्नान म्हणत नाहींत, कां कीं, त्यानें अंतःकरणशुद्धि होत नाहीं. अंगाचा मळ घालवून मन निर्मळ होत नाहीं; तर पापविचारांना मनांतून पूर्णपणें घालविणें हेंच खरें स्नान होय. ' असा पुष्कळ बोध केला. तो ऐकून ते म्हणाले ' आमचीं मनें शुद्ध करून आम्हांला व आमच्या मातेला पावन करा; नाहीं पेक्षां आम्हांस अधोगति प्राप्त होईल. आपण सत्पुरुष आहां, करितां आमच्या पापाची निवृत्ति कराच. ' ही त्यांची विनंति ऐकून पंडितांनीं सांगितलें,

धन्य होत. दोनप्रहरीं येथें स्नान करणाऱ्यांचीं ब्रह्महत्यादिक महापापें लयास जाऊन ते पावन होतात, म्हणून हा तीर्थराज होय. या तीर्थाच्या उत्तरेस श्रीकोपेश्वराच्या देवालयासमोर नदींत कोपेश्वरतीर्थ आहे. तेथ-पर्यंत एक मैल प्रवाहांत अनेक, तीर्थें आहेत. त्यांतील मुख्य पौलस्ति, कुब्जेश्वर व अश्व आणि शेवटीं कोपेश्वर हीं होत. कोपेश्वर तीर्थालाच ' मुक्ति-

---

' ज्यांना मनापासून पश्चात्ताप झाला त्यांना पापाचा स्पर्श होत नाहीं. तथापि तुम्हीं संशयग्रस्त आहांत म्हणून उपाय सांगतों, तो असाः—कृष्णावेणीच्या तीरीं श्रीकोपेश्वरलिंगाजवळ दक्षिण बाजूस प्रसिद्ध प्रभासतीर्थ आहे. त्या तीर्थांत स्नान करून तुम्ही श्रीकोपेश्वराचें दर्शन घ्या; म्हणजे पापरहित व्हाल यांत बिलकूल शंका नाहीं. आणि तुम्हीं निष्पाप झाल्याची खूण हीच कीं, तुम्ही हे काळे तीळ बरोबर घेऊन त्यांसह कृष्णावेणींत प्रत्येक तीर्थांत स्नानें करीत जा. ज्यावेळीं हे तीळ पांढरे होतील त्यावेळीं तुम्ही पापमुक्त झाला असें समजा. ' असें म्हणून प्रत्येकाजवळ थोडथोडे काळे तीळ देऊन त्यांना आज्ञा दिली. मग ते कृष्णावणीं-तीरीं आले. व जीं जीं तीर्थें त्यांस आढळलीं त्या सर्वांमध्यें मातेसहवर्तमान त्यांनीं स्नानें केलीं. पुढें ते प्रभासतीर्थीं आले. तेथें तीन स्नानें करून त्यांनीं तिळांकडे पाहिलें तों ते सर्व तीळ पांढरे झाले ! हें पाहून त्यांस परमानंद झाला. नंतर त्यांनीं भक्तिभावानें श्रीकोपेश्वराची पूजा केली. या तीर्थमाहात्म्यानें त्यांचीं सर्व पापें भस्म होऊन ते दिव्यदेही बनले. इतक्यांत देवदूतांनीं विमान आणिलें. त्यांत त्या सर्वांना बसवून त्यांनीं स्वर्गी नेलें ! तेव्हांपासून या तीर्थास **शुक्लतीर्थ** असें म्हणूं लागले.

१ याला मुक्तितीर्थ हें नांव पडण्याचें कारण असें कीं, कोणी एक पंगु मनुष्य घोड्यावर बसून प्रथम रायबाग येथील श्रीबंकेश्वरास गेला. तेथें भक्तिपूर्वक पूजा वगैरे करून तेथून निघाला. नंतर संकेश्वरास जाऊन तेथील श्रीशंकरलिंगाची यथा-विधि पूजा केली. मग तो खिद्रापुरास आला. व येथें त्यानें कोपेश्वरतीर्थांत स्नान करून श्रीकोपनाथाचें दर्शन घेतलें. त्यावेळीं चमत्कार असा झाला कीं, त्या मनुष्याचा घोडा मुक्तीस गेला. आणि पंगु तेथेंच राहिला. हें पाहून त्या पंगूस

तीर्थ' हें नांव आहे. सिद्ध श्रीशंकरेश्वर ( संकेश्वर ), श्रीवंकेश्वर या देवांना नमस्कार करून येऊन, भक्तीनें कोपेश्वरतीर्थी स्नान करून श्रीकोपनाथाचें दर्शन घेतल्यामुळें पुष्कळ लोक मुक्तीस गेले. म्हणून सदरी तीर्थास हें नांव पडलें आहे.

या मुक्तितीर्थापासून नदी दक्षिणवाहिनी झाली आहे. त्या तीर्थाच्या वर ( पश्चिम दिशेस ) नदी पूर्ववाहिनी आहे. तिकडेही अनेक तीर्थें असत्याचें वर्णन कृष्णामाहात्म्य यात आलें आहे. परंतु यड्रूर क्षेत्राच्या हद्दींतीं येत नसल्यानें त्यांचा या वर्णनाशीं कांहीं संबंध नाहीं, म्हणून त्यांची माहिती दिली नाहीं. याकरितां मुक्तितीर्थ हेंच यड्रूर क्षेत्राच्या पंचक्रोशींतील उत्तरेकडील शेवटचें तीर्थ होय. या तीर्थापासून नदीच्या वळणास आरंभ झाला आहे असें मागें सांगितलें आहे. येथून ही नदी वर वर्णन केल्याप्रमाणें वळणें घेत घेत संगमापर्यंत गेल्यावर तेथें पूर्ववाहिनी झाली आहे. पुनः मांजरीपासून पुढें ईशान्य व उत्तरवाहिनी होऊन शेवटीं उगार ( लहान अथवा खुर्द ) जवळ ती पुन्हा सरळ पूर्ववाहिनी झाली आहे. खिद्रापुरापासून उगारपर्यंत नदीच्या या सर्व वळणांची लांबी सुमारें २० मैल आहे. यामुळें यड्रूर क्षेत्राच्या बहुतेक सर्व बाजूस कृष्णाबाईनें वेढा दिला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. फक्त ईशान्यबाजू तेवढी मोकळी आहे. परंतु महापूर आल्यावेळीं यड्रूरवाडीपासून निघालेला ओत, (या ओतास या भागांतील लोक 'सरळ' असें म्हणतात ), भरून वाहूं लागला कीं, यड्रूर क्षेत्र हें बेट बनून जातें. म्हणून अशा पुण्यपावन कृष्णाबाईनें वेष्टिलेला हा प्रदेश अत्यंत पवित्र आहे. आतांपर्यंत या पवित्र क्षेत्रांतील अनेक तीर्थांच्या

---

मोठें आश्चर्य वाटलें. म्हणून तो याच क्षेत्रांत श्रीकोपनाथाची भक्तिपूर्वक पूजाअर्चा करून कांहीं दिवसांनीं तो मोक्षास गेला. ज्या ठिकाणीं घोडा मुक्त झाला तेथें अश्वतीर्थ असून जेथें पंगु मोक्षाप्रत गेला त्या ठिकाणीं कुब्जेश्वर तीर्थ आहे. म्हणून ज्या तीर्थाच्या स्नानानें दोघांस मुक्ति मिळाली त्यास मुक्तितीर्थ हें सार्थ-नांव पडलें.

नानानें व पुण्यस्थळांच्या दर्शनानें आपण पवित्र झालों. या क्षेत्रांत समाविष्ट होणारें फक्त एकच स्थळ दर्शनाशिवायें राहिलें आहे. तें खिद्रापूर येथील 'श्रीकोपेश्वरलिंग' होय. तेव्हां या परमपावन लिंगाच्या दर्शनाकरितां आपण श्रीकोपनाथाच्या प्रख्यात देवालयाकडे जाऊं.

## ( ३ ) श्रीकोपनाथाचें देवालय.

--हें प्रसिद्ध देवालय खिद्रापूर गांवाच्या मध्यभागीं आहे. या देवालयामुळेंच या गांवास महत्त्व आलेलें आहे. खिद्रापूर हा गांव संकेश्वर येथील श्रीशंकराचार्यांना इनाम मिळालेला असून तो करवीर इलाख्यांतील शिरोळ पेठ्यांत आहे. श्रीकोपेश्वर देवालयाजवळच आवारांत श्रीशंकराचार्यांचा मठ आहे. हें देवालय कृष्णानदीच्या दक्षिण तीरावर असून या देवालयाचें महाद्वार पूर्वाभिमुख आहे. नदींतून महाद्वाराकडे जाणाऱ्या रस्त्यावर देवालयाच्यासमोर वड, पिंपळ, चिंच इत्यादि विशाल व जुनाट वृक्षांची राई आहे, त्यामुळें हा भाग रमणीय दिसतो. या राईंतून जाऊन महाद्वारानें देवालयाच्या आवारांत प्रवेश करितांच नितांत सुंदर रमणीय व भव्य असें श्रीकोपनाथाचें मंदिर दृष्टीस पडतें. प्रथमच येथें जाणाऱ्या कोणाही मनुष्याला हें सुंदर देवालय दृष्टीस पडतांच, सानंदाश्चर्य वाटून त्याच्या तोंडून धन्योद्गार बाहेर पडल्याशिवाय राहत नाहींत, असें हें देवालय अत्यंत रमणीय आहे. हें देवालय इतकें सुंदर आहे कीं, या भागांतच नव्हे तर आसपास शंदीडशें मैलांच्या प्रदेशांत फक्त कोल्हापूरच्या जगदंबेच्या देवालयाखेरीज इतकें विशाल व रमणीय देवालय मुळींच नाहीं. हें देवालय म्हणजे या भागांतील किंबहुना दक्षिण महाराष्ट्रांतील शिल्पकलेचा उत्तम नमुना होय !

या विशाल देवालयाची पूर्वपश्चिम लांबी १०४ फूट व दक्षिणोत्तर रुंदी ६५ फूट असून शिखरावरील कळसापर्यंत उंची ५३ फूट आहे. याच्या भिंती नकशीदार कोरलेल्या काळ्या दगडांच्या आहेत. भिंतीच्या

बाहेर भागीं निलंग हेमाडपंती देवालयाप्रमाणें जेथें तेथें कोपरे आलेले आहेत. या विशाल देवालयाचे स्थूलमानानें चार भाग दिसतात. पहिला भाग गर्भ देऊळ हा होय. या मुख्य इमारतीच्या पुढें उंची खोदीव काम केलेले दोन सभामंडप जोडलेले आहेत, हेच दुसरा व तिसरा भाग होत. हे सभामंडप एकापुढें एक अशा दोन चौकांचे आहेत. या दोन्ही सभामंडपांपुढें वर्तुळाकार बिन छप्पराची 'स्वर्गमंडप' किंवा 'मुक्तिमंडप' या नावाची इमारत आहे. हीच चौथा भाग होय. या मंडपाचें शिल्प-काम अत्यंत बहारीचें आहे. हा मंडप वीस किरणांचा तारा जसा दिसावा तसा बांधिलेला आहे. किरणांचे जागीं मात्र चार चार दरवाजे आहेत. मंडपाच्या तळच्या फरसबंदींत मध्यभागीं तसि फूट घेराचा एकच वर्तुळाकार दगड बसविला असून, त्या वर्तुळ फरशीभोंवतीं बारा नकशीदार खांबांचें वर्तुळ आहे. आणि त्यावर वरच्या छतांत फरशीइतक्याच घेराचें वर्तुळ-द्वार ठेविलें आहे. त्यालाच 'मुक्तिद्वार' किंवा 'मोक्षद्वार' म्हणतात. वर सांगितलेल्या बारा खांबांच्या बाहेरील बाजूस सखल जोत्यावर सभोंवार ठेंगणे पण सुबक नकशीचे ३६ खांब आहेत. वर्तुळ आकारांत असलेल्या ह्या नकशीदार खांबाच्या अनेक रांगा, त्या सर्वांवरचें सुशोभित वर्तुळाकार मुक्तिद्वार व त्या द्वाराखालच्या प्रत्येक दगडावर कोरलेलें तें सुंदर कोरीव काम, यामुळें या मंडपाचा एकंदर देखावा फारच नयनमनोहर दिसतो. अनन्य भक्तीनें व बलवत्तर पूर्वपुण्याईनें मुक्त झालेले श्रीकोपेश्वराचे अनेक भक्त या द्वारानें कैलासास गेले असा भाविकांचा समज आहे. यामुळें ते या सुंदर द्वारास 'स्वर्गद्वार' किंवा 'कैलासद्वार' असें म्हणतात.

या रमणीय मुक्तिमंडपांत वरपासून खालपर्यंत जीं अनेक अप्रतिम चित्रें कोरिलीं आहेत तीं सहेतुक असून, त्या सर्वांना पौराणिक नांवें आहेत; किं-बहुना या देवालयांत सगळीकडे दिसून येणारीं सर्वच चित्रें, कांहीं विशिष्ट हेतूनें त्या त्या ठिकाणीं कोरिलीं असून, त्या प्रत्येकांचीं नांवें काय व तीं काय कारणानें तेथें आहेत, याविषयीं 'श्रीवीरभद्रचरित्र' यांत ग्रंथकर्त्यानें

सविस्तर विवेचन केलें आहे. तें पुढें कथानुरोधानें चौथ्या भागांत येणार असल्यानें येथें दिलें नाहीं.

मुक्तिमंडपाच्या दक्षिणदरवाज्यानें मोठ्या सभामंडपांत प्रवेश करितांच तेथील उंचच उंच अशा छतापर्यंत पोहोंचलेल्या नकशीदार व वर्तुळाकांत खांबांच्या रांगा, त्यांवरील तें सुशोभित दगडी छत, आणि सभोंवतालची सुबक चित्रांनीं सजविलेली उंच भिंत, या सर्वांच्या समुच्चयानें दृष्टीस पडणारा भव्य व रमणीय देखावा पाहून, पाहणारा आश्चर्यानें थक्क होऊन जातो. मर्मज्ञ चित्रकार व शिल्पी मनुष्याचें हृदय तर आनंदातिशयानें भरून जातें; आणि त्यास येथें त्याच्या कलेचीं अनेक मर्मस्थानें अचूक आढळून येतात !

या भव्य मंडपाला समोरासमोर चार दरवाजे आहेत. जमीन फरसबंदीची असून मध्यभागीं एक मोठी वर्तुळाकार फरशी बसविली आहे. या मंडपांत वीस नकशीदार दगडी खांब आहेत. शिवाय भिंतींत आणखी खांब आहेत ते निराळेच. प्रत्येक खांबांवर सुबक वेलबुट्टी व देवादिकांची लहान लहान सुंदर चित्रें कोरलीं आहेत. दक्षिण बाजूच्या भिंतीवर दरवाजाच्या दोहों बाजूंस अवाढव्य मनुष्याकृति चित्रें कोरलेलीं दिसतात. यांतील कांहीं चित्रें उभीं तर कांहीं बसलेलीं अशीं आहेत. या चित्रांची विशाल आकृति पाहून अज्ञलोक तीं प्राचीन काळच्या दैत्यांची मुलें आहेत असें म्हणतात. व हें देवालय ते दैत्य फक्त एका रात्रीं बांधवून तयार करीत होते, तेव्हां बहुतेक काम पुरें होऊन थोडेसें शिल्लक असलेलें काम पुरें करण्याच्या धांदलींत पहाट होतांच आपलीं हीं वर सांगितलेलीं मुलें येथेंच विसरून ते स्वस्थानीं निघून गेले! असाही त्या लोकांचा समज आहे. असो; हीं भव्य चित्रें, मध्यभागीं असलेले ते उंच चित्रयुक्त दगडी खांब आणि चारी दरवाज्यापासून येणारा मंद व प्रशांत प्रकाश यामुळें येथील एकंदर देखावा फारच आल्हादकारक दिसतो.

या रमणीय मंडपाला लागून दक्षिण बाजूस १२ खांबांचा दुसरा एक

लहानसा सभामंडप आहे. परंतु यांत विशेष नकशी काम नाहीं. शिवाय येथें बराच अंधेर आहे. या लहान सभामंडपाच्या पश्चिम बाजूचा विशाल दरवाजा म्हणजेच गर्भ–देवळाचें प्रवेशद्वार होय. गर्भ-देवळाचा आंतील भाग अवलोकन करण्याकरितां हें प्रवेशद्वार ओलांडून आंत जाऊं.

हा गाभारा आंतील बाजूनें सुमारें २०।२२ फूट लांबरुंद चौरसाकृति आहे. या गाभाऱ्याच्या मध्यभागींच प्रवेशद्वारासमोर पूर्वाभिमुख अत्यंत पवित्र अशा श्रीकोपेश्वरलिंगाची स्थापना झाली आहे. हें लिंग शाळुंके (जलहरी) सह सुमारें दीड फूट उंच आहे. पिंडी तांबूस वर्णाची असून सुंदर आहे. तिजभोंवतीं नेहमीं पितळेचा फणासह नाग घालून ठेविलेला असतो. परंतु या देवासंबंधाची आश्चर्याची गोष्ट ही कीं, बाहेरून या विशाल देवालयांत प्रवेश करणाऱ्या कोणाही भक्ताला पवित्र अशा श्रीकोपेश्वर लिंगाचें दर्शन प्रथम मुळींच होत नाहीं ! कारण हें लिंग व प्रवेशद्वार यांच्या मध्यतरीं या लिंगापासून पूर्व बाजूस दोन फूट अंतरावर दोन फूट उंचीचा काळाकभिन्न असा श्रीधोपेश्वर बसला आहे ! हा विचित्र 'धोपेश्वर' शाळुंकेशिवाय नुसत्या जमिनीवर स्थापित झाला आहे. दर्शनी बाजूसच हा धूपनाथ बसला असल्यानें, श्रीकोपेश्वराच्या दर्शनास जाणाऱ्या भक्तांस देवालयांत गेल्याबरोबर प्रथम त्याचेंच दर्शन होतें. पण येथील पुष्कळ लोक असें सांगतात कीं, ' प्रथम धूपनाथाचें दर्शन होणें अशुभ असल्यानें श्रीकोपेनाथाच्या दर्शनानंतरच त्याचें दर्शन घ्यावें. ' यात्रेच्या व इतर गर्दीच्या प्रसंगीं भक्तजनांच्या दाटीमुळें सहसा प्रथम धूपनाथाचें दर्शन होत नाहीं; परंतु नेहमीं अशी दाटी देवळांत असत नाहीं, त्यामुळें एरव्हीं श्रीकोपनाथाच्या दर्शनास जाणाऱ्या, वरील समजूत मनांत दृढमूल झालेल्या कित्येक भोळ्या व भाविक स्त्रिया व पुरुषसुद्धां महाद्वारांतून आंत येतांच आपले डोळे झांकून घेऊन एकाद्या लहान पोराचा हात धरून, अगर स्वतःच मधील दरवाजांस व खांबांस टक्करा देत देत, आंधळ्या कोशिंबिरीच्या खेळाप्रमाणें, श्रीकोपनाथाच्या पिंडीजवळ जाऊन ती पिंडी

हातानें धरितात व मग डोळे उघडून पाहातात. तेव्हां त्यांस समाधान वाटतें. धन्य त्या बिचाऱ्यांच्या भोळेपणाची ! असा समज पसरविणारे टगेही पण धन्य होत. ही कल्पना मूळची कोणातरी खिसेकापरू लफंग्याच्या सुपीक डोक्यांतून निघाली असावी ! यात्रेच्या वेळीं येथें प्रत्यक्ष देवळांत होणाऱ्या लहान सहान चोऱ्या व लबाड्या यांवरून आमच्या या वरील तर्कास दुजोरा मिळतो. वास्तविक पाहतां, असें करण्याची मुळींच जरूरी नाहीं. कारण, स्नान करून देवदर्शनास जातांना वाटेंत कित्येकदां ज्या पुष्कळ अशुभ वस्तु व गोष्टी आपल्या नजरेस पडत असतात, त्यांपेक्षां हा धूपनाथ अशुभ नाहीं खास. शिवाय बाहेरच्या अशा अशुभ दर्शनांची मुळींच फिकीर न बाळगणाऱ्या या भोळ्या बापड्यांना धूपनाथाचें भय कां वाटावें ? हा जर असा अशुभ असता तर परम पवित्र श्रीकोपेश्वरलिंगापुढें याची स्थापना कधीं तरी झाली असती काय ? तेव्हां हा समज अगदीं निराधार व पोरकट आहे. अशा खुळ्या कल्पना दृढमूल होण्याचें कारण आपल्या लोकांच्या हाडींमासीं खिळलेला अंधविश्वास होय. असो. हा धूपनाथ असा अशुभ मुळींच नसून प्रत्यक्ष नीलवर्ण, चक्रपाणि भगवान् श्रीविष्णु होय ! याची येथें स्थापना कां झाली आहे, याविषयींची कथा फारच बहारीची आहे. ती पुढें श्रीवीरभद्रावतार या भागांत दिली आहे ती पहावी. याच्या उत्पत्तिकथेचा विचार न करितां वर सांगितलेल्या लबाड व मतलबी लोकांनीं पसरविलेल्या भलभलत्या गप्पांवर विश्वास ठेवून फसणारे भोळे लोक बरेच आढळतात. तरी त्यांनीं यापुढें सावध व्हावें व हा धूपनाथ तसा अशुभ नसून तो अत्यंत शुभदायक व परममंगल असा

---

१ यांपैकीं पौराणिक कथांशीं भलत्याच तऱ्हेनें संबंध जोडून सांगितली जाणारी एक गप्प अशी आहे कीं, 'महासती श्रीपार्वतीदेवीनें दक्षयज्ञांत स्वतःच्या देहाचें हवन केल्याचा भयंकर वृत्तांत ऐकून श्रीशंकर अत्यंत क्रोधायमान झाले. व खवळलेल्या स्थितींत ते दक्षयज्ञाचा स्वतःच संहार करण्याकरितां कैलासाहून भूतलावर अवतरले. भूमंडळावर येतांच, त्यांचा क्रोधाग्नि भडकून ते आपल्या जटा

प्रत्यक्ष भगवान् विष्णुमूर्ति आहे म्हणून त्याचें दर्शन अशुभ तर नाहींच, उलट अत्यंत पुण्यकारक आहे, हें ध्यानांत ठेवावें श्रीविष्णुजवळील श्रीकोपेश्वरलिंग हेंच श्रीक्षेत्र यड्डूरची वायव्य दिशेची कोनशिला ( लिंगमुद्रा ) होय.

गर्भ देवळांत श्रीकोपेश्वर व धूपनाथ यांशिवाय दुसरे देव नाहींत. हें गर्भदेऊळ बरेंच उंच व प्रशस्त आहे. दोन्ही लिंगाच्या सभोंवार बरीच मोकळी जागा असल्यानें प्रदक्षिणा घालण्यास अडचण पडत नाहीं. या लिंगाच्या पश्चिमेस जवळच चार फूट उंचीची सहा फूट लांब अशी पक्क्या विटांची लहानशी भिंत बांधिली आहे. आणि तिच्या पलीकडून प्रदक्षिणेची वाट ठेविली आहे. या लहान भिंतीमागच्या भागीं मुख्य इमारतीच्या दगडी भिंतींत एक मोठी खोली आहे. तींत श्रीकोपनाथाची उत्सवमूर्ति ठेवितात. अशा आणखी दक्षिण व उत्तर बाजूंस दोन खोल्या आहेत. त्यांत पूजासाहित्य व नैवेद्य वगैरे ठेवितात. या गर्भदेवळांत प्रकाश फार कमी आहे. शिवाय देवळाची रिपेरी अगर आंतून सफेती देण्याची कामगिरीही अलीकडे बऱ्याच वर्षांत झाली नसल्यानें, सर्व

---

जमिनीवर आपटूं लागले. त्यांवळीं त्यांच्या जटेंतून प्रत्यक्ष क्रोधाचा पुतळाच असा ' श्रीवीरभद्र देव ' उत्पन्न झाला. उत्पन्न होतांच त्या वीरबाहु वीरभद्रानें जी भयंकर वीरगर्जना केली, त्यासरसे प्रत्यक्ष श्रीशंकरही दचकले व भीतीनें त्यांनीं जवळची मोठी धूपारती पुढें सारून तिच्यामागें ते जाऊन बसले. त्या धूपारतीचाच हा ' धोपेश्वर होय ! म्हणून तो अशुभ आहे. आणि श्रीशंकराच्या अंगांतून सर्व क्रोध श्रीवीरभद्रदेवाच्या रूपानें निघून गेल्याकारणानें त्या वेळेपासून भगवान् श्रीशंकर अगदीं भोळे झाले म्हणून तेव्हांपासून त्यांना ' भोळा सांब ' असें लोक म्हणूं लागले. ' अशी कथा या भागीं अशिक्षित भोळ्या लोकांमध्यें सांगितली जात आहे. यांत असंबद्धपणाची कमालच झाली आहे. स्वतःच्याच अंगांतून उत्पन्न झालेल्या श्रीवीरभद्रदेवाच्या गर्जनेस श्रीशंकर भितील कसे ? व धूपारती पुढें करितील वशाला ? सर्वच विचित्र !

गर्भ देऊळ धुरकटलेलें आहे. त्यामुळें येथील अंधेरास जास्तच मदत झाली आहे. वर सांगितलेल्या प्रदक्षिणा–मार्गावर ठिकठिकाणीं नंदादीपांतील तेल सांडून तो मार्ग बुळबुळीत बनला आहे. करितां या पवित्र देवळांतलि हा सर्व भाग नेहमीं स्वच्छ ठेवण्याची काळजी पुजारी घेतील तर बरें. असो. श्रीकोपेश्वराचें श्रीधूपनाथासह पुनश्च दर्शन घेऊन आपण देवळाबाहेर जाऊन बाहेरील बांधकाम पाहूं.

हें गर्भदेऊळच काय, पण सर्व देवालय बाहेरूनसुद्धा अत्यंत सुंदर चित्रांनीं सजविलेलें आहे. गर्भदेवळासभोंवतालचें शिल्पकाम फारच उत्कृष्ट झालें आहे. त्याच्या एका भागाचें चित्र सोबत दिलें आहे त्यावरून त्या शिल्पकौशल्याची साधारण कल्पना येईल. या देवालयाच्या पायथ्याचा बराच भाग रेतींत बुजून गेला आहे. हल्लीं वर जो भाग दिसतो त्यांत जमिनीपासून चार सहा इंच उंचीवर सभोंवार निरनिराळ्या तऱ्हेनें ऐटींत उभे राहिलेल्या हत्तींच्या सुंदर चित्रांची रांग दिसते. प्रत्येक हत्तीवर एकादें पुरुषाचें अगर स्त्रीचें सुबक चित्र बसविलें आहे. या सर्व चित्रांच्या वर सुबक वेलबुट्टी कोरलेल्या दगडांचे तीन फूट उंचीचे दोन गलथे आहेत. त्यांवर दुसऱ्या मजल्यांत तीन चार फूट उंचीचीं, वस्त्रालंकारांनीं सजलेलीं, निरनिराळ्या हावभावांनीं नटलेलीं व अंतःकरणांतील अनेक सुखोत्पादक कल्पना व्यक्त करणारीं, अशीं अत्यंत सुंदर चित्रें सहज मनोहर स्थितींत उभीं राहिलीं आहेत. त्यांचा हास्यविनोदयुक्त चेहरा, अंगाची नाजूक ठेवण, व विलक्षण हावभावाचे प्रकार पाहून, हीं पाषाणाचीं चित्रें नसून, खरोखर हे वसंतकालांत वनविहार करण्यास आलेले विलासी स्त्रीपुरुष आहेत कीं काय असा भास होतो! या चित्रांच्यावर तोरणापर्यंत सुबक वेलबुट्टीदार असे अनेक लहान मोठे गलथे दसविले आहेत. सर्वांत वरील तोरण आणि त्यावरचे सभोंवतालचे चवुत्रे हे तर फारच उठावदार साधले आहेत. सगळ्यांवर उंचच उंच व विशाल असें विटांनीं बांधिलेलें साधें शिखर आहे.



श्रीकोपनाथ देवालयाचा एक भाग.
( श्रीक्षेत्र खिद्रापूर. )



श्रीचंद्रेश्वराचें (अदृश्येश्वराचें ) देवालय
श्रीक्षेत्र चंदूर.

या चित्रांचें खोदकाम लक्षपूर्वक पाहिलें असतां त्यांच्या प्रत्येक अवयवाची ठेवण, अंगावर काढिलेले अनेक अलंकार, किरीट व वस्त्रें-सुद्धां उत्तम तऱ्हेनें वठविण्याची हातोटी आणि नाजूकपणा पाहून मन थक्क होऊन जातें. मनुष्याच्या मनांतील हास्यविनोदाचे चेहऱ्यावर उमटणारे सर्व सूक्ष्म मनोविकार पाषाणावर पूर्णपणें उतरविणारें तें कारागिरांचें विलक्षण हस्तकौशल्य पाहून धन्यता वाटते. या चित्रांच्या रचनेवरून तत्कालीन लोकांच्या वैभवाची व स्वभावाची अंधुक कल्पना येते. अशा प्रकारच्या असंख्य नयन-मनोहर चित्रांनीं बनविलेलें हें सुंदर देवालय म्हणजे सृष्टीच्या विशाल प्रदर्शनांत व्यवस्थित रीतीनें मांडून ठेविलेला उत्तमोत्तम चित्रांचा एक मोठा संग्रहच होय!

पण—वरील सगळया शृंगाररसवर्णनाच्या रंगाचा एकदम भंग करणारा हा 'पण, येथेंही हजर आहेच— अत्यंत दुःखाची गोष्ट ही कीं, हीं सर्व चित्रें फोडून विद्रूप केलेलीं आहेत! त्यांतील मनुष्याचें अथवा पशुपक्ष्याचें आंतलें अगर बाहेरचें एकही चित्र सध्यां शाबूत (सुरक्षित) स्थितींत असल्याचें दिसून येत नाहीं. अर्थात् अशा तऱ्हेची निंद्य व राक्षसी कृति करणारे नराधम किती पाषाणहृदयी असतील याची वाचकांनींच कल्पना करावी. हें निंद्य कृत्य करून स्वतःची नीच मनोवृत्ति जगजाहीर करणारें नरराक्षस कोण असतील याचा तर्क करण्यास निदान हिंदूंना तरी फारशी अडचण पडणार नाहीं. धर्मवेडानें माथेफिरू बनलेल्या व ऐश्वर्यमदानें धुंद झालेल्या कोणातरी गतकाळच्या असहिष्णु मुसलमानांचीच ही अधम कृति होय! हें नीच कृत्य करणारा नराधम कोण असावा याचा निर्णय, इतिहासभक्तांनीं अद्याप नक्की ठरविला नाहीं, तथापि सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धांत आदिलशाहीच्या अव्वल अमदानींत त्याच्या कोणा अधम सरदारानें हें कृत्य केलें असावें अशी येथील वृद्ध लोकांच्या सांगण्यावरून व येथें ऐकिवांत असलेल्या पुढील चमत्कारिक आख्यायिकेवरून कल्पना होते. या पुरातन

देवालयाच्या नासाडीविषयीं या भागीं अशी आख्यायिका प्रचलित आहे कीं, विजापूरच्या कोणा शहाची (हा बहुधा इ० स० १५६० च्या सुमारास कृष्णाकांठच्या प्रदेशांत आलेला मोठा इब्राहिम आदिलशहा असावा.) छावणी एकदां कृष्णाकांठीं हल्लींच्या शहापूर खेड्याच्या जवळभागीं पडली होती. त्यावेळीं त्याच्या एका प्रमुख सरदाराच्या आवडत्या बिबीसाहेब (पत्नी) हें श्रीकोपनाथ-देवालय पाहण्यास येऊन गुंग होऊन तहान-भूक विसरून सभामंडपांत स्वस्थ बसल्या. त्यामुळें नदीच्या, दुसऱ्या तीरावर असलेल्या छावणींत लवकर परत जाण्याचें त्यांना भान राहिलें नाहीं. इकडे त्यांची वाट पाहात छावणींत बसलेल्या सरदारसाहेबांना फार राग आला. त्यांतही आपली पत्नी एका हिंदूंच्या देवळांत जाऊन बसली असून, ती तेथून लवकर येत नाहीं असें दासींच्या तोंडून ऐकून तर त्यांना अत्यंत त्वेष चढला. एवढ्या क्षुल्लक कारणानें चिडून जाऊन तो मूर्ख सरदार आपल्या बायकोवरचा राग या देवळावर काढण्यास प्रवृत्त झाला, आणि रागाच्या भरांत त्यानें आपल्या शिपायांना हें देऊळ पाडून टाकण्याचा हुकूम फर्माविला! तेव्हां आधीच उल्हास असलेल्या त्या अविचारी अविंधांना अत्यानंद झाला हें सांगणें नकोच. त्यामुळें थोड्याच वेळांत कुदळी, खोरीं, पहारा इत्यादि आयुधांनीं सज्ज झालेल्या शेंकडों राक्षसांची टोळधाड या सुंदर देवालयावर येऊन पडली व मोडतोडीस प्रारंभही झाला! परंतु त्या काळचे आपले पूर्वज हल्लींप्रमाणें थंड्या रक्ताचे नसल्यामुळें, देवालयावर हल्ला होणार हें पाहतांच लागलीच सर्व हिंदूंनीं एकजुटीनें मोठ्या त्वेषानें त्या मुसलमान सैनिकांवर हल्ला चढविला. या चकमकींत शेंकडों मुसलमान ठार झाले. व कित्येक जखमी झाले. हिंदूंचीही बरीच नासाडी झाली. आदिलशहाच्या सैन्यांतील सर्व मराठे सरदारांनाही ही बातमी हां हां म्हणतां समजली व ते सर्व देवालयाच्या संरक्षणार्थ येण्यास सज्ज झाले. हा हलकल्लोळ शहाच्या कानीं येतांच व सर्व मराठे सरदार देवालयाच्या

संरक्षणास निघाले हें ऐकतांच पुढील, अनर्थपरंपरा लक्षांत आणून शहानें तावडतोब ' सर्व मुसलमान सैनिकांनीं देवालयांतून एकदम बाहेर पडावें ' असा सक्त ताकिदीवजा हुकूम सोडून सर्व मराठे सरदारांना परत बोलाविलें व त्यांची समजूत घातली आणि ज्याच्या उतावीळपणामुळें हा सर्व अनर्थ घडला त्या सरदारास खरमरीत ताकीद दिली हें सर्व ठीक झालें; परंतु देवालयावर हल्ला झाल्यानंतर थोड्या वेळानें हिंदूनीं प्रतिकार सुरू केला, यामुळें मूर्ति फोडून देऊळ पाडून टाकितां न आल्याकारणानें, चिडून गेलेल्या अधम अविंधांनीं इतक्या अल्पावधींतही देवालयाच्या सौंदर्याचा भंग केला ! आणि असें निंद्य कृत्य करून, वैभवशाली व गुणग्राही हिंदु-राजाच्या अवर्णनीय व नयनमनोहर अशा या धवलकीर्ति-देवमंदिरावर सौंदर्य-भंगाचा हा काळाकुट्ट डाग लावून त्या दुष्टांनीं आपला दुर्लौकिक जगजाहीर करण्याचें एक कायमचें स्मारक करून ठेविलें, यांत तिळमात्र संदेह नाहीं. यानंतर लवकरच आदिलशहा आपली छावणी उठवून त्या नीच सरदारासह विजापुराकडे निघून गेला. याप्रमाणें या देवालयावरील हें एक अरिष्ट थोडक्यांत टळलें. या शहाच्या नांवावरूनच त्यानें घात-लेल्या छावणीजवळच्या खेड्यास तेव्हांपासून ' शहापूर ' हें नांव पडलें, असें म्हणतात.

## देवालयाचा संक्षिप्त इतिहास

या विशाल देवालयाचा संगतवार इतिहास आज उपलब्ध नाहीं. तथापि हें देवालय फार प्राचीन आहे यांत संशय नाहीं. हें देवालय मूळचें जैनांचें होतें असें जैन लोक म्हणतात. या म्हणण्यास इमारतीच्या बांधकामावरून व मोठ्या सभामंडपातील विशाल चित्रांवरून, तसेंच बाहेरील भिंतींत ठिक-ठिकाणीं आसन मांडी घालून बसलेल्या अनेक नग्नमूर्ति कोरलेल्या आहेत त्यांवरून सबळ प्रमाणें आढळतात. शिवाय खालचें संगीन काम, दहाव्या अकराव्या शतकांत जैनांनीं बांधिलेल्या इतर जैन वस्तींच्याच धर्तीचें असून त्याचा वरील शिखर व घुमट यांशीं अगदीं मेळ नाहीं. त्याचप्रमाणें प्रत्येक

हिंदुदेवालयाच्या प्रवेशद्वाराच्या वरच्या उंबरठ्यांत ( गणेशपट्टींत ) गणपतीची मूर्ति कोरलेली असते, तशी या देवालयांत नाहीं. उलट खांबांखालच्या खुर्चीत व इतर भलत्याच ठिकाणीं गणपति, वलभीम इत्यादि हिंदु देवतांच्या लहान लहान मूर्ति चित्रांदाखल कोरलेल्या आहेत. या सर्व कारणांवरून पाहतां, हें देवालय मूळचें जैनलोकांचेंच होतें हें सिद्ध होतें. यावरून इसवी सनाच्या दहाव्या अगर अकराव्या शतकांत अथवा त्यापूर्वी शेंदीडशें वर्षें शिलाहार वंशांतील कोणा जैनधर्मी राजानें बांधिलेलें हें जिनमंदिर ( वस्ती) असावें असें अनुमान होतें तथापि त्यापूर्वी फार प्राचीन काळापासून याचठिकाणीं श्रीकोपेश्वरलिंगाची स्थापना झाली होती असें कित्येक पुराणग्रंथावरून अनुमान करण्यास आधार आहे. मग साहजिकपणें असा तर्क होतो कीं, पूर्वींच्या हिंदुदेवळाच्या जागीं जैनराजांनीं आपल्या भरभराटीच्या काळांत आपलें जिनमंदिर तयार केलें असावें. हा तर्क खरा वाटण्यास दुसरा एक पुरावा याच गावीं आहे. तो हाच कीं, दुसरें एक जिनमंदिर याच खेड्यांत आहे. इतकेंच नव्हे तर तेंही या देवालयाबरोबरच बांधिलें गेलें आहे असें त्याच्या बांधणीवरून दिसून येतें. त्याची भिंतही हेमाडपंती धर्तीची ताऱ्यासारखी गोल असून चित्रें वगैरेही हुबेहूब अशींच आहेत. व ही हल्लीं वस्तीच आहे. त्याचें देऊळ बनविलेलें नाहीं. हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. तेव्हां यावरून असें वाटतें कीं, पुनः ज्यावेळीं जैनधर्मी राज्य लयास जाऊन क्षत्रिय राजांचा अंमल सुरू झाला, त्यावेळीं त्यांनीं दोन्ही जिनमंदिरांना देवालयाचें स्वरूप न देतां फक्त श्रीकोपेश्वराच्या देवालयासच तेवढें शिवमंदिराचें रूप देऊन दुसरें जिनमंदिर तसेंच ठेविलें. असें कां ? त्यालाही शिवमंदिराचें रूप देणें त्यांना अशक्य होतें काय ? मुळींच नाहीं. यास्तव हेंच अनुमान खरें ठरतें कीं, स्वधर्माभिमानानें प्रेरित झालेल्या जैन राजांनीं ज्या ठिकाणांतून प्राचीन हिंदु देवतांची हकालपट्टी करून आपल्या विशाल जिनमंदिराची उभारणी केली, तेथूनच फक्त जिनेश्वराची हकालपट्टी करून हिंदूंनीं आपल्या पूर्वपरंपरागत देवतेची स्थापना केली व आपला हक्क स्थापिला.

नाहींपेक्षां, दुसऱ्या जिनमंदिराचा मुळींच उच्छेद केला नाहीं! ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. या एकाच उदाहरणावरून क्षत्रिय राजांच्या अंगच्या स्वधर्माभिमानाबरोबरच त्यांच्या ठिकाणीं वसत असलेली परमत-सहिष्णुता स्पष्ट दिसून येते! अगदीं अलीकडेसुद्धां क्षत्रियकुलावतंस महाप्रतापी श्रीमच्छत्रपति शिवाजी महाराजांनींही आपल्या आचरणानें हीच गोष्ट सिद्ध करून दाखविली आहे. त्यांनीं जिंकिलेल्या मुलखांतील कोणत्याही परधर्मीयांच्या देवस्थानांस अथवा त्यांचे प्रत्यक्ष शत्रू जे मुसलमान लोक त्यांच्या एकाही मशिदीस त्यांनीं यत्किंचित् त्रास दिला नाहीं! या वर्तणुकीनें एक मोठा परिणाम असा झाला आहे कीं, ते परधर्मीय लोक या बाबतींत तरी आपले शत्रु होत नाहींत, झाले तर मित्र मात्र होतात. हिंदूंच्या या एका अति उदात्त मनःस्थितीमुळेंच हिंदुस्तानांत अनेक परधर्मीयांना धुमाकूळ घालण्यास वाव सांपडला. ही गोष्ट सत्य असली तथापि, याच एका अद्वितीय गुणामुळें अत्यंत प्राचीन काळापासून हिंदुधर्म अशा अनेक परधर्मांच्या वावटळींना पुरून उरला आहे व उरणार आहे, ही गोष्टही तितकीच खरी आहे! हा बोध असहिष्णु परधर्मीयांनीं अवश्य ध्यानांत धरावा. ज्या ज्या वेळीं परधर्मीयांच्या स्वार्थमूलक चळवळींनीं हिंदुधर्म हतबल होतो व आतां तो खास नामशेष होणार अशीं सुखस्वप्नें अदूरदृष्टि अन्यधर्मीयांना दिसूं लागतात, त्या त्या अत्यंत आणीबाणीच्या वेळीं—

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्** ॥ गीता ४–७.

हें भगवंतानें सनातन, समंजस व सत्यवादी हिंदुधर्मास दिलेलें वचन सिद्ध केलें आहे. अशा वेळीं एकाद्या धर्मोद्धारकाच्या रूपानें अवतार घेऊन परधर्मांचें तें क्षुद्र पटल दूर सारून पुनश्च विश्वव्यापक वैदिक धर्माची घडी व्यवस्थित बसवून त्यानें आपलें वचन अनेकदां सिद्ध करून दाखविलें आहे, व यापुढेंही दाखवीलच. तरी असल्या क्षुल्लक वावटळींनीं हिंदुधर्मीयांनीं बावरण्याचें व परधर्मीयांनीं हुरळून जाण्याचें मुळींच कारण नाहीं.

अखेर हिंदू ते हिंदूच कायम राहून त्यांच्या मनावरील परधर्माचें क्षुद्र पटल तत्काळ निघून जाईल व शेवटीं ' स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ (गीता ३–३५), हेंच तत्व हिंदू मन प्रतिपादूं लागेल हें प्रत्येक अन्यधर्मीयांनीं पूर्ण लक्षांत ठेवावें. कारण, हजारों वर्षांपासून पूर्णत्वाप्रत पोहोंचलेल्या हिंदुधर्मांचे संस्कार ज्या मनावर झाले आहेत तें हिंदूचें मन, आधुनिक अन्य धर्मांच्या तत्वांनीं संतुष्ट होत नसून, तें आपल्या मूळ उदात्त धर्मतत्वांकडे नेहमीं ओढ घेत असतें. त्यामुळें परधर्माचा कोणताही लेप त्यावर कायम बसूं शकत नाहीं. म्हणून प्रतिकूल परिस्थितींत परधर्मांत गेलेला कोणीही इसम अनुकूल वेळ येतांच, पुनः आपल्या मूळच्या उदात्त धर्मांत येतोच येतो. त्याला परधर्मांत केव्हांही अशी शांति मिळत नाहीं. त्रिकालाबाधित सत्य कोणाही परधर्मानें विसरूं नये इतकाच तूर्त इषारा देऊन ठेविलेला बरा. असो.

देवालयाच्या स्थित्यंतरावरून सुचलेले हिंदुधर्माविषयींचे विचार, विषयांतर करून पुढें घुसविल्याप्रमाणें दिसतील; परंतु तसा प्रकार नसून ते ओघानेंच उत्पन्न होणारे आहेत हें उघड आहे. त्यांचा सर्वांनींच योग्य विचार करावा, एवढेंच सांगून मूळ विषयांकडे वळूं.

मागील एकंदर विवेचनावरून हें देवालय प्राचीनकाळीं हिंदूंचें होतें; नंतर इ० स० च्या दुसऱ्या शतकापासून कोल्हापूर किंबहुना सर्व दक्षिण महाराष्ट्रावर राज्य करणारीं आंध्रभृत्य, कदंब, चालुक्य, व शिलाहार इत्यादि राजघराणीं जैन मतांचीं होतीं त्यामुळें व त्यांतल्या शेवटच्या शिलाहार शाखेच्या राजांनीं कोल्हापूर हीच आपली राजधानी केली असून, यांची कुलस्वामिनी कोल्हापूरची महालक्ष्मी (हिला त्या वेळीं ' पद्मावती ' नांव होतें. पहाः—कोल्हापूर ग्याझेटीयर पृष्ठ ३२१–३२२) होती. म्हणून त्यांच्या अमदानींत इ० स० ९०० ते १२०० पर्यंतच्या काळांत केव्हांतरी हें श्रीकोपेश्वराचें देवालय बांधिलें गेलें आहे. याशिवाय याच राजांनीं आजरें, वाळवें इत्यादि बऱ्याच गांवींही अनेक देवालयें बांधि-

लेलीं आहेत. अर्थात् याच राजांनीं प्राचीन कोपेश्वराच्या देवळाचें जिनमंदिरांत रूपांतर करून त्याला अत्यंत भव्य व सुंदर वस्तीचें हल्लीं दिसणारें स्वरूप दिलें असावें. आणि यांत त्यांनीं कांहीं गैर केलें असें त्या काळच्या लोकांना वाटलें नसावें. अथवा वाटलें असलें तरी 'बळी तो कान पिळी' हें तत्व सर्वकाळीं सर्व राष्ट्रांत सारखेंच लागू पडत असल्याकारणानें त्यांच्या भरभराटीच्या काळांत त्यांनीं स्वधर्मप्रसारार्थ केलेल्या कृत्यास अडथळा करणें हिंदूंना शक्य झालें नसावें. कारण कांहीं असो, पण येथें स्थित्यंतर घडलें ही गोष्ट खरी. पुढें या शिलाहार वंशांतील शेवटचा जो दुसरा भोजराजा ( इ. स. ११७८ ते १२०९ ) त्याचा, देवगडच्या यादव वंशांतील दुसऱ्या सिंघणदेव राजानें इ. स. १२०९–१० च्या सुमारास पराभव करून त्याचा सर्व मुलूख जिंकून घेतला. याच प्रसिद्ध सिंघणदेव राजानें लिहून ठेवलेला ( शके ११३५ ) इ. स. १२१३ सालचा एक देवनागरी लिपींत लिहिलेला उत्कृष्ट शिलालेख या विशाल देवालयांतील मोठ्या सभामंडपाच्या दक्षिण दरवाज्याजवळ आहे; त्यांत श्रीकोपेश्वराच्या देवळाचा जीर्णोद्धार करून त्या देवाच्या पूजेकरितां मिरज प्रांतांतील 'खंडाळेश्वर' ( खिद्रापूर ) नांवाचा गांव दिल्याचा उल्लेख आहे. हा जीर्णोद्धार म्हणजेच श्रीकोपेश्वराचाही पुनरुद्धार होय! अर्थात् या राजानें जिनेश्वराऐवजी या देवालयांत पूर्वकाळच्या श्रीकोपेश्वरलिंगाची स्थापना केली असली पाहिजे; आणि त्याची पूजा, अर्चा व पालखी-उत्सव वगैरे यथास्थित चालण्याकरितां त्या एका गांवाचें सर्व उत्पन्न दिलें आहे. सदरहू खंडाळेश्वर गांव अखंडितपणें या देवाकडे किती दिवस चालला याविषयीं कांहीं माहिती लागत नाहीं. पुढें यादवांचें राज्य चौदाव्या शतकांत मुसलमानांनीं जिंकून घेतलें. तेव्हांपासून श्रीमच्छत्रपति शिवाजी महाराजांचा उदय होऊन त्यांनीं इ. स. १६५९ सालीं कोल्हापूरप्रांत आपल्या ताब्यांत घेईपर्यंत हा सर्व मुलूख मुसलमानांच्या अमलाखालीं होता. याच अवधींत मागें सांगितल्या प्रकारें या देवालयावर सौंदर्यभंगाचा दुर्धर प्रसंग केव्हांतरी ओढवला होता,

पण तो श्रीकोपेश्वराच्या कृपाप्रसादानें मोठ्या शर्तीनें कसा टळला हें वर सांगितलेंच आहे. शिवाजी महाराजांच्या वंशजांकडे खिद्रापूर हा गांव कायमचा आल्यानंतर लवकरच त्यांनीं हा व आणखी कित्येक गांव संकेश्वर मठाच्या श्रीशंकराचार्यस्वामीकडे देवस्थानदुमाला या नात्यानें धर्मकार्यार्थ दिले. तेव्हांपासून आजतागायत हा गांव श्रीशंकराचार्यस्वामीकडेच चालत आला आहे.

देवालयासभोंवतालच्या आवारांत जवळच श्रीशंकराचार्यांचा मोठा मठ आहे. व तेच हल्लीं देवालयाची सर्व देखरेख पहात असतात. येथील पुजाऱ्याकडे सुमारें चारशें रुपये उत्पन्नाची जमीन चालते. व सर्व सेवेकऱ्यांनाही लहानमोठ्या जमिनी आहेत. देवालयांत दर सोमवारीं सरंजामासह पालखी निघत असते. दरसाल पौष मासीं अमावास्येस (विशाळी अमावास्येस) यात्रा भरत असते. त्यावेळीं हजारों लोक यात्रेस येतात.

या सर्व विवेचनांत या देवालयांतील एका अत्यंत महत्वाच्या गोष्टीचा उल्लेख करण्याचें अजीबात राहून गेलें. ती सर्वांत आश्चर्याची गोष्ट ही कीं, हें प्रख्यात श्रीकोपेश्वरलिंगाचे (महादेवाचें) देवालय असून येथें ‘नंदी’ मुळींच नाहीं! याचें कारण काय? हें मोठें कोडेंच आहे; परंतु हें कोडें सोडवीत बसण्याला तूर्त सवड नाहीं. कारण आपण हें कोडें सोडवीत बसलों कीं, आपलें पंचक्रोशी प्रदक्षिणेचें घोडें येथेंच अडखळेल. करितां, पुढें श्रीवीरभद्रावताराच्या पौराणिक कथाभागांत हें कोडें सोडविलेलें आपणांस दिसून येणारच असल्यानें, पुराणप्रसिद्ध अशा या श्रीकोपेश्वरलिंगाचें व धूपनाथाचेंही पुन्हा एकवार दर्शन घेऊन आपण पुढील मार्गास लागूं.

## (४). पंचक्रोशी प्रदक्षिणासमाप्ति.

खिद्रापुराजवळ कृष्णानदी अर्धचंद्राकृति वळणानें वाहत आहे. या वळणाच्या आंतील भागीं बरोबर मध्यावर खिद्रापूर हें खेडें असून आहे-

रील फुगीर भागावर खिद्रापुराच्या ईशान्येस नदीच्या डाव्या तीरीं 'जुगूळ' व खिद्रापुराच्या थेट पूर्वेस नदीच्या डाव्या तीरावरच 'शहापूर' खेडें आहे. या तीन्हीं खेड्यांचे पाणोथे नदीच्या वळणावर जवळ जवळ आहेत. या वळणाच्या जागीं उन्हाळ्यांत नदीस चांगला उतार असतो. त्यावेळीं येथें फूट दीडफुटापेक्षां जास्त पाणी असत नाहीं; पण पाणी चांगलें वाहत असतें. खिद्रापुराच्या बाजूस नदीच्या पात्रांत मोठें वाळवंट आहे. त्यामुळें चिखल न होतां रहदारीस व स्नान करण्यास वगैरे फार सोय झाली आहे; परंतु पावसाळ्यांत आणि त्यांतही महापुराच्या वेळीं यांतील एका खेड्यांतून दुसऱ्या खेड्यास जाणें दुरापास्त होतें. शहापूर व जुगूळ या दोन्ही खेड्यांच्या पाणोथ्यापासून खिद्रापुरास जाण्यास गाडीरस्ता आहे. तो उन्हाळ्यांत नदीस उतार असेपर्यंत चालू असतो.

वर सांगितलेल्या दोन्ही खेड्यांत पाहण्यासारखें विशेष कांहीं नाहीं. जुगळास फक्त नदीकांठीं एक जुगुळादेवीचें स्थान आहे. हीं दोन्ही खेडीं खालसाहद्दीपैकीं म्हणजे अथणी तालुक्यापैकीं आहेत. जुगळापासून पश्चिमेस ५ मैलांवर नदीकांठीं शेडशाळ नांवाचें खेडें आहे. तेथपर्यंत इंग्रज सरकारचा मुलूख पाचरांप्रमाणें आहे. त्याच्या दक्षिणेस नदीच्या उजव्या तीरीं करवीर सरकारची मालकी असून डावीकडे सांगलीकरांचा मुलूख आहे.

आपण शहापुराजवळ नदी ओलांडून तेथून थेट पूर्वेस एका मैलावर शिरगुप्पी नांवाचें सांगली संस्थानच्या हद्दींतील खेडें आहे तेथें जाऊं. हें खेडें म्हणजेच श्रीक्षेत्र यड्डूरची ईशान्य कोनशिला होय. येथें हल्लीं कोणतेंही लिंग वगैरे असल्याचें दिसत नाहीं. कदाचित् पूर्वकाळीं स्थापित झालेलें हें लिंग, आज या क्षेत्रांतील हजारों लिंगें जशीं नामशेष झालीं आहेत, तसें भूमीच्या उदरांत गुप्त झालें असावें. तेव्हां येथून सडकेनें थेट दक्षिणेकडे तीन मैलांवर मांजरी गांव आहे. तेथें जाऊन, पुनः कडबागिल वीराण्णाचें दर्शन घेऊन, क्षेत्र यड्डूरांतील श्रीवीरभद्र देवालयांत गेलों कीं, आपली पंचक्रोशीप्रदक्षिणा पूर्ण झाली व आपली यात्रा सफल होऊन तिची सांगता झाली.

हा पंचक्रोशी–प्रदक्षिणा मार्ग एकंदर सुमारें ( मांजरी ते संगम ३ मैल, टाकळी १॥ मैल, चंदूर २॥ मैल, खिद्रापूर ३ मैल, शिरगुप्पी २ मैल, व पुनः मांजरी ३ मैल असे एकूण ) १५ मैल ह्मणजे या भागचे पांच कोस आहे. म्हणून याला ' पंचक्रोशी ' हें नांव यथार्थ दिसतें. चैत्र--वैशाख महिन्यांतील भर उन्हाळ्याच्या दिवसांत, जरा जलदीनें केल्यास, ही प्रदक्षिणा अवघ्या एका दिवसांत होईल व जरा सावकाशीनें केल्यास दोन दिवसांत पुरी करितां येते. तेव्हां प्रत्येक यात्रेकरूनें एकदां तरी ही प्रदक्षिणा करून धन्य व्हावें. या प्रदक्षिणेचें माहात्म्य किती आहे हें त्यांतील प्रत्येक तीर्थांच्या व लिंगस्थानाच्या वर्णनांत ठिकठिकाणीं सांगितलेंच आहे. करितां ही अत्यंत पुण्यप्रद अशी पंचक्रोशी महाप्रदक्षिणा केल्याशिवाय कोणीही राहूं नये असें सुचवून आपण प्रदक्षिणेची सांगता करण्याकरितां श्रीवरिभद्रदेवाच्या दर्शनास जाऊं.

श्रीवरिभद्रदेवालयांत येऊन शांतपणें वसून, येथें देवळांत चालणारा पूर्वीं सांगितलेला सर्व सोहळा व इतर सर्व व्यवस्था कशी सुरळीत चालली आहे हें अवलोकन करूं लागलों कीं, आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाहीं. यापूर्वीं या देवालयाइतक्याच पुरातन अशा आणखी श्रीचंद्रेश्वर व श्रीकोपेश्वर या देवालयांतील पूजाप्रकार व सेवा हीं आपण पाहिलीं आहेतच. त्यांतही विशेष हें कीं, या दोन्ही प्रख्यात देवांच्या वरील सर्व व्यवस्थेकरितां तें तें खेडें त्या देवाला यड्डूरप्रमाणेंच पूर्ण इनाम आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं, असें असतांना तेथील पूजा व उत्सवाचा प्रकार व क्षेत्र यड्डूरांत नित्य नियमानें त्रिकाळ होणारा पूजा व पालखीउत्सवाचा प्रकार पाहिला म्हणजे या दोहोंत जमीनअस्मानाइतका फरक आहे हें तत्काळ ध्यानांत येतें. म्हणूनच श्रीक्षेत्र यड्डूरांत येणारा यात्रेकरू येथील हा सुव्यवस्थित व नियमितपणें चाललेला पूजोत्सवाचा समारंभ पाहून विस्मित झाल्याशिवाय राहत नाहीं; व साहजिकच तो या सुव्यवस्थितपणाचें मर्म काय याची चौकशी करूं लागतो. या वहिवाटीस अनुसरून

आपणासही तें मर्म ओळखण्याची जिज्ञासा झाली असेल; तेव्हां त्याविषयीं खडाजूखडा माहिती मिळविण्याकरितां या सुयंत्रित चाललेल्या पूजोत्सवाचे घटक जे सेवेकरी त्यांची व्यवस्था कशी ठेवली गेली आहे याचा आपण विचार करूं म्हणजे त्या अनुरोधानें सर्वच गोष्टींचा उलगडा होईल.

## (५). सेवकऱ्यांची व्यवस्था.

मागें सांगितल्याप्रमाणें पूजा व सेवेचा अपूर्व सोहळा या देवालयांत अखंडित कसा चालला आहे? याचा खर्च कोण चालवितो? आजच्या भक्तिहीन व चिकित्सक काळांत याच ठिकाणीं नेहमीं घडून येणारा सोहळा भक्तिपूर्वक होतो कीं काय? व होत असल्यास येथंच हा भक्तिरसाचा पूर कोठून लोटला आहे, कीं आणखी कांहीं कारणें आहेत? असे अनेक प्रश्न विचारी अंतःकरणापुढें उभे राहतात. विचारांतीं ही व्यवस्था पाहून मन आश्चर्यानें थक्क होऊन जातें. वरील सर्व प्रश्नांचें, भोळ्या-भाविक जनांला पटणारें उत्तर थोडक्यांत असें देतां येईल कीं, 'सर्व जगाची सूत्रें इच्छामात्रें करून हलविणाऱ्या सर्वशक्तिमान् श्रीवीरभद्रदेवाला हा येथला सोहळा यथायोग्य चालविणें म्हणजे निमिषार्ध पुरणारें यत्किंचित् काम होय.' परंतु या उत्तरानें आधुनिक सुशिक्षित चिकित्सकांचें समाधान होणार नाहीं. हें आम्ही जाणून आहों. कारण मागें सांगितल्याप्रमाणें हजारों रुपये उत्पन्नाच्या देवालयांत अगर मठांत आठवड्यांतून फक्त एकवेळची सेवाही सरळपणें होत नाहीं हें आपण पाहतों; मग येथें अशी विशिष्ट योजना काय आहे कीं, ज्यायोगानें हा सर्व अवाढव्य कार्यक्रम सर्वकाळ सुयंत्रित चालावा? या सुयंत्रितपणाचें बीज कोठें आहे? हे प्रश्न साहजिकच पुढें येतात. या प्रश्नांचीं योग्य उत्तरें शोधून काढून मर्म ओळखण्याकरितां आपणास या देवालयासंबंधाचा थोडा पूर्वेतिहास अवलोकन करणें क्रमप्राप्त आहे. आतां या देवालयाचा इतिहास म्हणजे एकप्रकारें तो श्रीक्षेत्र यड्डरचाच इतिहास होय! तो सर्व येथें देणें अप्रासंगिक होणार असल्याकारणानें त्याची द्विरुक्ति न व्हावी म्हणून येथें फक्त पूजा व सेवेकरी यांची कोणती सोय कशी

केली आहे, म्हणून त्या दोन्ही ( पूजा व सेवा या ) गोष्टी निरंतर चालल्या आहेत, याच्यापुरताच विचार करूं. आजपर्यंत उपलब्ध झालेल्या साधनांवरून यडूर क्षेत्रासंबंधीं सविस्तर इतिहास पुढें पांचव्या भागांत श्रीकाडदेवरू-आगमन-प्रसंगीं यथाक्रम दिला आहे, तो पहावा.

ही पूजा व सेवेकऱ्यासंबंधीं व्यवस्था अवलोकन करण्यापूर्वी एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, यडूर हा गांव श्रीवीरभद्रदेवास ' सर्व इनाम ' आहे. म्हणजे या गांवचा श्रीवीरभद्रदेव हाच इनामदार आहे. या पूर्वपरंपरेस अनुसरून ब्रीटिश सरकारनेंही या प्रांतावर आपला अंमल स्थापित झाल्यानंतर इनाम कमिशनच्या वेळीं हा गांव येथील देवास सर्व इनाम असल्याचें पाहून, पूर्ण खात्री करून घेऊन, देवाच्या नांवानें इनाम घालून दिला. तेव्हां सध्यां या गांवासंबंधीं लोकलफंड व थोडीशी जुडी यांशिवाय विशेष उत्पन्न इंग्रज सरकारास मिळत नाहीं. हल्लीं यडूर गांवचा वसूल सुमारें २११२ रुपये असून पैकीं कदीम नेमणूक २२२ रुपये वजा जातां बाकी १८९० रुपये राहतात. यांतून सुमारें अडीचशें रुपये वसूली खर्च वजा जातां, जवळ जवळ सव्वासोळाशें रुपये निव्वळ राहतात. असें वहिवाटदार सांगतात. हे सर्व श्रीवीरभद्रदेवाकरितां खर्च झाले पाहिजेत. हा इनाम गांव असल्यानें अद्याप सर्व्हे झालेली नाहीं. म्हणून इनाम मिळाल्या वेळेपासून जें उत्पन्न येतें तेंच बहुतेक कायम आहे. ( लवकरच सर्व इनाम गांवांची मोजणी होणार असल्याची वदंता आहे. त्यावेळीं या गांवाचीही मोजणी होईलच. ) हें उत्पन्न देवीप्रात्यर्थ खर्च करण्याकरितां पूर्वकाळापासून एका ब्राह्मण ज्ञातीच्या ' वहिवाटदारा 'ची नेमणूक झाली आहे. त्यानें वरील सर्व उत्पन्न श्रीवीरभद्रदेवाकडे खर्च केलें पाहिजे अशी वहिवाट आहे; परंतु या खर्चासंबंधानें हल्लीं बरीच अळंटळं चालली आहे, असें या देवाचे पुजारी श्रीचरमूर्तिस्वामी यांच्या पक्षातर्फेचें म्हणणें आहे. वहिवाटदार यांच्यातर्फे याविषयीं असें उत्तर येतें कीं, ' वरील उत्पन्न ' खर्च कर-

ण्याच्या बाबतींत आमच्या भाऊबंदांत विभागणी होऊन निम्मी रक्कम आमच्या हातीं येत असून निम्मी आमचे भाऊबंद नेर्लीकर इनामदार यांना देण्यांत येत असते; आणि आमच्या हातीं येणारी बहुतेक सर्व रक्कम आम्ही पूर्वापार वहिवाटीस अनुसरून खर्चित असतों.' दोघांच्या खर्चासंबंधाच्या वाटाघाटींत पडण्याचें आम्हास प्रयोजन नाहीं व तादृश जरूरीही नाहीं; तथापि सदरहू गांव देवास इनाम आहे ही गोष्ट स्पष्ट असल्यानें अर्थात् आलेलें सर्व उत्पन्न दरसाल देवाकरितांच खर्च झालें पाहिजे हें उघड आहे. व ही गोष्ट दोन्ही पक्षांस पूर्ण मान्य आहे हेंच आपल्यास पहावयाचें होतें.

आतां या गांवाचें सर्व उत्पन्न श्रीवीरभद्रदेवाकरितांच खर्च झालें पाहिजे हें दोघांसही संमत आहे; तरी कोणत्या प्रकारें ती रक्कम खर्च व्हावी किंवा होत आहे हा वादग्रस्त प्रश्न होऊन बसला आहे. पुजारीपक्षाकडील लोकांचें याविषयीं असें म्हणणें आहे कीं, 'ज्या सनदेंत हा गांव श्रीवीरभद्रदेवास दिल्याचा उल्लेख आहे त्यांत तो पूजा, नैवेद्य, नंदादीप वगैरेकरितां दिला आहे असें स्पष्ट नमूद आहे. शिवाय वहिवाटदाराच्या पूर्वजांच्या इ०स० १८५२ सालीं इनाम कमिशनपुढें ज्या जबान्या झाल्या आहेत, त्यांतहीं त्यांनीं सदरहू गांव श्रीवीरभद्रदेवाची पूजा, नंदादीप, अभिषेक, नैवेद्य, अन्नछत्र व उत्सव वगैरे देवस्थानच्या खर्चाकरितां देवाकडे दिला असून त्याप्रमाणें आम्ही हल्लीं सर्व उत्पन्न देवस्थानाकडे खर्च करीत आहों असें कबूल केलें आहे. तेव्हां या दोन्ही पुराव्यांवरून पाहतां, या गांवचें सर्व उत्पन्न, श्रीवीरभद्रदेवालयांत होणाऱ्या पूजा, नैवेद्य, नंदादीप, उत्सव इत्यादि बाबींकडे मुख्यतः दरसाल खर्च झालें पाहिजे; याचप्रमाणें हल्लींच्या वहिवाटदारांना आम्ही समक्ष विचारिलें, तेव्हां त्यांनींही हें म्हणणें पूर्णपणें कबूल केलें; पण प्रत्यक्ष तसें अलीकडे घडत असल्याचें दिसत नाहीं तेव्हां सदरहू उत्पन्न वर निर्दिष्ट केलेल्या बाबींकडेच आणखी कोणत्या निराळ्या प्रकारें खर्च करितात हें श्रीवीरभद्रदेव जाणे.

दोन्ही पक्षांच्या म्हणण्यांवरून दोघांना संमत अशी एकच गोष्ट दिसून येते कीं, ‘ सदरहू गांव देवाला सर्वस्वीं इनाम दिला असल्यानें त्याचें दरसाल येणारें सर्व उत्पन्न श्रीवीरभद्रदेवाकरितां मुख्यतः खर्च व्हावयास पाहिजे’ तेव्हां हें तत्व दोघांना पूर्ण मान्य आहे. याकरितां वादविवाद करणारे हे दोन्ही पक्ष बाजूस ठेवून, हें उत्पन्न ‘श्रीवीरभद्रदेवाकरतां’ च म्हणजे कोणकोणत्या बाबींत कसकसें खर्च व्हावें याविषयीं या दोघांच्या वाटाघाटींतून व त्यासंबंधीं कागदपत्रांवरून काय बोध होतो याचा शांत चित्तानें विचार करूं.

सकृद्दर्शनीं आपणास ही गोष्ट कबूल केलीच पाहिजे कीं, श्रीवीरभद्रदेव हा जरी या गांवचा इनामदार असला तरी तो स्वतः अवतरून कांहीं या इनामी उत्पन्नाची विल्हेवाट करीत नाहीं ! कायद्याच्या भाषेंत बोलावयाचें झाल्यास आपणास क्षणभर असेंच गृहीत धरिलें पाहिजे कीं, श्रीवीरभद्रदेव हा अज्ञान असल्यानें त्यानें अज्ञानपालनदारामार्फत म्हणजेच वहिवाटदारामार्फत या सर्व उत्पन्नाची विल्हेवाट लाविली पाहिजे! सर्व जगाचीं सूत्रें हालविणारा भगवान् परमात्मा श्रीवीरभद्रदेव कधींतरी अज्ञान असणें शक्य आहे काय ? त्याला तसें म्हणणारे आम्हीच मात्र महामूर्ख असतों! परंतु कायदा तसें समजतो त्याला नाइलाज आहे. असो, याकरितांच देवाला वहिवाटदाराची जरूरी आहे. आतां क्षणभर अशी कल्पना करा कीं, आपल्या उत्पन्नाची हे लोक कशीकाय व्यवस्था ठेवितात हें पाहण्याच्या उद्देशानें अथवा स्वतःच त्याची विल्हेवाट लावण्याकरितां मुद्दाम श्रीवीरभद्रदेव या अवनीतलावर अवतरले. तर ते आपल्या या सर्व उत्पन्नाचा खर्च कसा करतील ? यावर उत्तर हेंच कीं, ‘ इतर हजारों मानव इनामदारांना आपल्या इनामी उत्पन्नाचा उत्तम प्रकारें व्यय करण्याची सद्बुद्धि ते देत असतात तशाच प्रकारें ते स्वतः खर्च करतील; ’ हें उघड आहे. यावरून इतर इनामदार ज्याप्रमाणें आपलें उत्पन्न, आपल्या सौख्याकरितां व आपल्या मुलाबाळांच्या व आप्त-इष्टांच्या परामर्षाकरितां आणि नोकर-चाकरांच्या निर्वाहाकरितां

योग्य प्रमाणांत खर्च करून तें सत्कार्यी लावतील व जास्त राहिलेला धर्मादायादि पुण्यकृत्यांत खर्च करून कीर्ति मिळवितील; हाच दृष्टांत जरा निराळ्या अर्थानें या ठिकाणीं लागू केल्यास जें उत्तर येईल, त्याप्रमाणेंच येथें खर्च व्हावयास पाहिजे हें कोणीही सांगेल. म्हणून विशेष पाल्हाळांत न पडतां श्रीवीरभद्र देवासंबंधाचें हें उत्पन्न कोणकोणत्या बाबींत खर्च होतें त्याचाच थोडक्यांत विचार पाहूं.

श्रीवीरभद्रदेवाचा स्वतःचा खर्च कोणता व त्याच्या परिवाराचा (सेवकांसंबंधीं व उत्सवमूर्तीसंबंधीं) खर्च कोणता याचा विचार केल्यास, पूजा, अभिषेक, नैवेद्य व नंदादीप या चार बाबी मुख्यत्वें श्रीवीरभद्रदेवाच्या स्वतःच्या खर्चांत समाविष्ट होतील. उत्सव ही बाब उत्सवमूर्तीच्या पूजेंत समाविष्ट होईल. आणि त्यांतच पालखीउत्सवाकरितां नेमिलेल्या सर्व सेवकांच्या निर्वाहाच्या बाबींचा समावेश होतो. आतां या प्रत्येक बाबीसंबंधानें येथें कसकसा खर्च चाललेला आहे, हें पाहिल्यास वर सांगितलेलें उत्पन्न कोणत्या रीतीनें खर्च व्हावें, त्याचा उलगडा आपोआप होईल. करितां श्रीवीरभद्रदेवासंबंधीं एकेक बाब घेऊन त्याविषयीं यथाक्रम विचार करूं.

प्रथमतः पूजा व अभिषेक ही बाब घेऊं. श्रीवीरभद्रदेव व उत्सवमूर्ति यांची दररोज त्रिकाळ षोडशोपचारें पूजा होत असते; हें मागें सांगितलेंच आहे. त्या दोन्ही देवांच्या पूजा करण्याकरितां पूजारी श्रीचरमूर्ति स्वामी यांना निरनिराळ्या जमिनी इनाम मिळालेल्या आहेत. अर्थात् दोन्ही देवांच्या पुजाऱ्यांच्या वेतनासंबंधाचा प्रश्न अलाहिदा सुटलेलाच आहे. आतां फक्त पूजेला लागणाऱ्या निरनिराळ्या वस्तूंच्या खर्चांविषयीं मात्र विचार केला पाहिजे. पूजेकरितां लागणाऱ्या जिनसा म्हणजे नेहमीं बेल, फुलें, अक्षता, गंध, तेल व तूप इत्यादि होत. पैकीं बेल व फुलें हीं फक्त आणून देण्याकरितां एका स्वतंत्र सेवकाची नेमणूक केली आहे. त्यानें वहिवाटदारानें देवाकरितां तयार केलेल्या बनांतील बागेवर देखरेख ठेवून नित्य त्रिकाळ त्यांतील बेल व फुलें, श्रीचरमूर्तिस्वामींच्या मठांत

व देवालयांतील दोन्ही ठिकाणीं नियमानें आणून दिलीं पाहिजेत. त्या बागेंत फुलें वगैरे नसल्यास वहिवाटदारानें दाखविलेल्या जवळपास कोस-दोन कोसांच्या अंतरावरील कोणत्याही ठिकाणापासून ताजीं फुलें व बेल आणून दिलीं पाहिजेत. याप्रमाणें नित्य लागणाऱ्या बेल व फुलांचा भरपूर पुरवठा करण्यांत आला आहे. याशिवाय केव्हां केव्हां भक्त लोकही आणून देत असतात तीं निराळींच. पूजेकरितां अक्षता विशेष लागत नाहींत व गंधाची बाबही तशीच आहे. परंतु श्रीविरभद्र देव व उत्सवमूर्ति ह्यांजपुढें दररोज त्रिकाळ एकारती, पंचारती, काकड आरती ह्या तुपाच्या लावाव्या लागतात. त्याना तिन्ही वेळां मिळून सुमारें २ नवटाक तूप लागतें आणि तेल फक्त पूजेकरितां ह्मणून अगदीं कमी लागतें. त्याचा समावेश नंदादीप या बाबींत करितां येईल. शिवाय मोठमोठ्या प्रत्येक सणावाराच्या दिवशीं श्रीविरभद्रदेवास रुद्रानुष्ठान केलें पाहिजे. त्या करितां लागणारीं सर्व सामुग्री व दक्षिणा हीं द्यावीं लागतात. आणि महापूजा करतेवेळीं लागणारीं अत्तरें व सुगंधी तेलें ह्याही बाबी पूजा व अभिषेकांतच समाविष्ट होतात. या सर्वांकरितां दरसाल जो कांहीं खर्च होतो तोच पूजा व अभिषेकाचा खर्च होय.

दुसरी बाब नैवेद्य ही होय. या देवालयांत त्रिकाळ पूजा होत असल्याकारणानें त्या तिन्ही पूजेच्या वेळीं तीन वेळ महानैवेद्य दाखवावा लागतो. हा महानैवेद्य प्रत्येक वेळीं एक शेर भाताचा करितात. तेव्हां दररोज ३ शेर तांदूळ लागत असतात. व थोडेसें तूप लागतें तें निराळेंच. शिवाय श्रावणमासांत मागें पहिल्या भागांत सांगितल्याप्रमाणें सकाळचा महानैवेद्य मिष्टान्नाचा करावा लागतो. त्याकरितां महिनाभर लागणाऱ्या गहूं, गूळ, दूध, तूप व साखर इत्यादि जिनसांचा खर्चही नैवेद्य या सदरांत येतो. येणेंप्रमाणें हा एकंदर नैवेद्याचा खर्च आहे.

तिसरी बाब नंदादीप. श्रीवीरभद्रदेवापुढें देवालयातर्फेचे सदोदित असणारे दोन नंदादीप व श्रीउत्सवमूर्तीपुढें दोन नंदादीप मिळून चारी नंदादी-

पांस, आणि या विशाल देवालयांत दररोज सायंकाळीं सहा सात ठिकाणीं रात्रभर जळणाऱ्या सांजवाती लावाव्या लागतात, त्यांस मिळून एकंदर दिव्यांना लागणारें गोडें तेल पाहिजे असतें. दररोज या सर्व दीपांना मिळून १ घडाभर तेल लागतें. तसेंच रात्रीं उत्सवाच्या वेळीं पालखीपुढें दोन मशाली लावाव्या लागतात त्यांना रोजीं १ पासरीभर तेल लागत असतें. शिवाय कार्तिकमासीं दोन्ही देवांपुढें संध्याकाळच्या आरतीच्या वेळीं दीपोत्सव करण्यास आणि कार्तिक वद्य अमावास्येदिवशीं रात्रीं दोन्ही दीपमाला लावून सर्व देवालयभर शेंकडों दिवे लावून दीपोत्सव करावा लागतो त्यास दरसाल सुमारें दोन मण तेल लागतें. शिवाय आश्विनमासीं नवरात्रांत दोन्ही देवांपुढें व इतरत्र दोन चार ठिकाणीं देवालयातर्फें वाती घालाव्या लागतात. त्यांना दहा दिवसपर्यंत सुमारें २।३ मण तेल अवश्य लागतें. या सर्व तेलाचा खर्च नंदादीप या सदराखालींच येतो.

पालखीउत्सव ही चौथी बाब होय. ही बाबही बऱ्याच खर्चाची आहे. श्रीउत्सवमूर्तीची पालखी नादुरुस्त झाल्यास ती तावडतोब दुरुस्त झाली पाहिजे. त्या पालखींतील व उत्सवमूर्तीच्या देवळांतील गाद्या-गिरद्या तक्के यांना दरसाल नवीन अभ्रा घातला पाहिजे. शिवाय श्रीउत्सवमूर्तीच्या दोन व श्रीवीरभद्र देवाच्या दोन मिळून दरसाल ४ गवसण्या रेशमी अगर लोंकरी वस्त्राच्या तयार कराव्या लागतात. त्याकरितां होणारा खर्च उत्सव या सदरांत येतो. शिवाय सेवेकऱ्यांचा खर्चही याच सदरांत समाविष्ट करणें योग्य होईल. त्यासंबंधीं सेवेकऱ्यांचें असें ह्मणणें आहे कीं, दरसाल एकदां वर्ष प्रतिपदेदिवशीं आह्मां सर्व सेवेकऱ्यांना पोषाख मिळाला पाहिजे. व मागें सांगितल्याप्रमाणें फाल्गुनमासीं नऊ ढेपा गूळ पुजाऱ्यासह सर्व सेवकांस मिळत असतो. शिवाय बलिप्रतिपदा, महाशिवरात्रि वर्षप्रतिपदा यांशिवाय नागपंचमी, भाद्रपद शुद्ध १ आणि गणेशचतुर्थी या सणांच्या दिवशीं सर्व सेवेकऱ्यांना देवालयातर्फें मिष्टान्नभोजन मिळून वरती योग्य दक्षिणा मिळावयाची असते. आणि

बलिप्रतिपदा वरीलपैकीं आणखी मकरसंक्रांति, विजयादशमी, व नरकचतुर्दशी मिळून एकंदर पांच सणांच्या दिवशीं सर्व सेवेकऱ्यांना व पालखीबरोवर त्या त्या वेळीं हजर असलेल्या इतर सर्व भिक्षुकांना योग्य दक्षिणा मिळते. दोन्ही प्रतिपदांच्या दिवशीं पंचागपूजेकरितां होणारा सर्व खर्च व त्यावेळीं जंगमांस व ब्राह्मणांस द्यावी लागणारी दक्षिणा या बाबींचा खर्चही सेवेकऱ्यांच्या खर्चांतच सामील करणें रास्त होईल. याप्रमाणें सेवकांचा एकंदर खर्च, उत्सव या सदरांत समाविष्ट करितां येईल.

पालखी वगैरेची दुरुस्ती व सेवेकऱ्यांचा खर्च या दोहोंशिवाय उत्सव या बाबीस तिसरें एक महत्वाचें अंग आहे. तें देवालयाची पडझड दुरुस्ती हें होय. श्रीवीरभद्रदेवालयाची कोठें मोडतोड अगर पडझड होऊन तीमुळें देवाच्या त्रिकाळ सेवेस अथवा पूजेस अडथळा होऊं लागल्यास त्याची उपेक्षा करून चालत नाहीं. त्यामुळें त्या त्या नादुरुस्त भागांची तावडतोब दुरुस्ती करून अडथळा दूर करावा लागतो. ही दुरुस्ती तावडतोब होण्याकरितां एका पाथरवट सेवेकऱ्याची मुद्दाम योजना करून ठेविली आहे. मात्र त्याला लागणारा दगड, चुना, मजूर इत्यादिकांचा खर्च त्यास वेगळा मिळावा लागतो. तो घेऊन त्यानें ती पडझड लागलींच दुरुस्त केली पाहिजे. अशी व्यवस्था असल्याचें दिसून येतें. अर्थात् या बाबीचा समावेश उत्सव या मुख्य सदरांत होऊं शकेल.

श्रीक्षेत्र यड्डूरास जे बावा, बैरागी, संन्यासी, फकीर वगैरे मुशाफर लोक येतात त्यांच्याकरितां आणि आंधळे, पांगळे, बहिरे, मुके इत्यादि अनाथ लोक येऊन जात असतात, अशा लोकांना अन्नोदक मिळावें, ते उपाशी राहूं नयेत म्हणून या क्षेत्रांत निरंतर अन्नछत्र व सदावर्त चालविण्याकरितां श्रीमंत वंटमुरीकर सरदेसाईसाहेबांनीं निराळी एक जमीन इनाम देऊन ठेविली आहे. तिला 'अन्नछत्र जमीन' हेंच नांव पडलें आहे. तेव्हां या जमिनीच्या येणाऱ्या सर्व उत्पन्नांतून निरंतर अन्नछत्र व सदावर्त हीं उत्तम प्रकारें चालण्याचीही व्यवस्था करून ठेविलेली असावी; परंतु

सध्यां यहूर क्षेत्रांत कोठें अन्नसत्र चालू असल्याचें दिसून येत नाहीं. असो. वर दर्शविल्याप्रमाणें मुख्य बाबींविषयीं खर्च कसा कसा होतो हें आपण पाहिलें. आतां यांच्या आनुषंगिक अशा आणखी कित्येक किरकोळ बाबी आहेत, त्यांचाही जातां जातां, उल्लेख करणें अप्रासंगिक होणार नाहीं. कारण त्या जरी वरील बाबींच्या मानानें किरकोळ असल्या, तथापि देवालयाची एकंदर व्यवस्था, स्वच्छता व शिस्त या दृष्टीनें पाहतां, महत्त्वाच्याच ठरतील. त्या गोष्टी ह्या होतः—

देवालयाची स्वच्छता ठेवणें—गर्भदेवळाजवळच्या तीर्थकुंडांतील देवाच्या अभिषेकाचें जमा होणारें सर्व पाणी, व नारळाचें पाणी आणि पावसाळ्यांत यज्ञकुंडांत सांचणारें पावसाचें पाणी याचा ज्या त्या वेळीं (दररोज एकदां) उपसा झाला पाहिजे; जर उपसा न होईल, तर यज्ञकुंडांत अत्यंत घाण सुटते. ती सुटून देवाच्या पूजेस अडथळा होऊं नये म्हणून त्याचा वेळच्या वेळीं उपसा होऊन यज्ञकुंड स्वच्छ ठेवण्याविषयीं जपावें लागतें.

त्याचप्रमाणें यज्ञकुंडांतील अरुंद प्रदक्षिणामार्ग व त्या सभोंवतालच्या सर्व लहान ओंवऱ्या आणि त्यांवरचा प्रदक्षिणामार्ग, दोन्ही सभामंडप आणि पटांगणापलीकडील सभोंवार असलेल्या मोठ्या ओंवऱ्या यांतील जमीन दररोज सकाळ सायंकाळ स्वच्छ लोटून, केर काढून देवालयाबाहेर दूर टाकून दिला पाहिजे. हें काम करण्यास व वर सांगितलेल्या सर्व ठिकाणचें पाणी काढून टाकण्यास एक निराळा पगारी नोकरच पाहिजे. ही दोन्हीं कामें आपणच करीत असल्यासंबंधानें येथील वहिवाटदारांनीं देवालयाच्या स्वच्छतेसंबंधानें मे. डि. डे. कलेक्टरसाहेब उत्तरभाग जि. बेळगांव यांजपुढें सन १९२० सालीं दिलेल्या जबाबांत कबूल केलें आहे. याशिवाय राहिलेली जागा म्हणजे देवालयांतील मोठें पटांगण व बाहेरील २५ हात पर्यंतची जागा स्वच्छ ठेवण्याच्या कामाकरितां दोघां सेवकांची मुद्दाम नेमणूक केली आहे. आंतील पटांगण लोटणारा इसम जंगम असून बाहेरील राजांगण लोटणारा सेवक महार आहे. या दोघांना ‘ राजांगळी ’

असें नांव आहे. म्हणून या कामाचा वर सांगितलेल्या वहिवाटदारानें कर-विणेच्या कामांशीं कांहीं संबंध नाहीं.

शिवाय ज्यावेळीं कृष्णानदीस महापूर येऊन देवालयांत पाणी शिरतें व देवास अभिषेक होतो त्यावेळीं श्रीउत्सवमूर्ति मठांत ठेवून श्रीपंचलिंगेश्वरास श्रीवीरभद्र देवाबद्दलची दररोजची त्रिकालपूजा अर्पण करून त्याच्या देवळां भोंवतींच पालखी-प्रदक्षिणोत्सव होत असतो. ही सर्व व्यवस्था करून, पुराचें पाणी उतरल्याबरोबर गांवांतील इतर भक्तांस बोलावून आणून त्यांसह यज्ञकुंडांतील पाणी काढून टाकून गर्भदेऊळ मोकळें करून देण्याचें महत्वाचें कामही वर सांगितलेल्या पगारी नोकराकडेच येतें.

देवालयांतील कामांची व्यवस्था ठेवणें—वरील कामांशिवाय दोन्ही देवांच्या पुजाऱ्यांच्या हातांखालील कामें करण्यासही एका पगारी नोकराची जरूरी आहे. तीं कामें हीं:— तिन्ही वेळचा महानैवेद्य तयार करणें, सांज वाती लावणें, एकारती, पंचारती, नीरांजनें, व धूपारती हीं सर्व दररोज स्वच्छ पुसून तिन्ही वेळ तीं वाती वगैरे घालून तयार करून देणें, दोहों ठिकाणच्या नंदादीपाच्या सर्व समया धुऊन घासून स्वच्छ करणें इत्यादि कामें करून, सायंकाळीं आरतीच्या वेळीं सोवळ्यांत असलेल्या पुजाऱ्यांस धूप घालण्यास विस्तव आणून देणें, आरतीनंतर प्रसाद वांटण्याकरितां नारळ, साखर वगैरे आणून देणें, तसेंच आरतीच्या वेळीं लागणारे धूप, कापूर वगैरे जिन्नस वक्तशीर आणून देण्याचें कामही त्यानेंच केलें पाहिजे. अर्थात् या कामाच्या स्वरूपाकडे पाहतां हा नोकर जंगम जातीचा निदान वीरशैवच असला पाहिजे. इतर जातीचा असून चालत नाहीं. या नोकराचें आणखी एक काम आहे. तें असें—पालखी उत्सवाच्या वेळीं नेहमीं तिच्याबरोबर हजर राहून सर्व सेवेकरी नियमितपणें सेवा करण्यास हजर झाले आहेत कीं नाहींत हें पाहणें; व एकाद्यास उशीर झाल्यास त्यास बोलावून आणणें, सेवेच्या वेळीं कोणतेंही वाद्य नादुरुस्त झाल्यास तें दुरुस्त करून आणणें, हीं कामें केलीं पाहिजेत. परंतु या नोक-

राच्या सर्व कामास लागणाऱ्या खर्चाची जबाबदारी मात्र त्याजवर नसून तो फक्त सांगकाम्या असतो.

याप्रमाणें दोघे पगारी नोकर नेहमीं देवालयांत पाहिजे असतात. याशिवाय या देवालयाच्या बरदास्तीकरितां आणखी पुढील गोष्टी होत असतात. देवालयांत चौघडा असून तो नित्य त्रिकाळ वाजत असतो.

देवांच्या पूजेस नेहमीं बेल व फुलें लागतात त्यांचा पुरवठा वनांतील बागेंतून होत असतो असें मागें सांगितलें आहे. तशी एक बाग तयार करण्याची जमीन किंवा पूर्वीची बागच वनामध्यें दिसून येते. त्या बागेस पाणी घालण्याकरितां मोट लादण्यास एक बैल अगर रेडा ठेवावा लागतो व बागेच्या व्यवस्थेकरितां एका माळ्याची जरूर असल्यानें, तो एक वतनदार सेवेकरीच नेमिला आहे. हें काम वास्तविक फुलारी या सेवेकऱ्याचेंच होय.

चैत्रमासांत, उन्हाळ्याच्या दिवसांत यात्रा भरत असल्यामुळें, त्यावेळीं दिवसा उन्हानें नदीकिनाऱ्यावरील वाळू तापून पाय भाजतात, यास्तव उन्हाळ्यांत महाशिवरात्रीपासून चैत्री पौर्णिमेपर्यंत दररोज सकाळीं आठ वाजण्याच्या आंत नदीच्या पाणोथ्यावर किनाऱ्यापासून देवालयाच्या दक्षिण दरवाज्यापर्यंत, आणि प्रत्येक सोमवारीं आणखी देवालयामागील बाहेरच्या प्रदक्षिणामार्गावर पाणी ओतून पाय भाजणार नाहींत अशी एक पाऊलवाट तयार करण्याकरितां येथील एका कुंभोजकर नांवाच्या ब्राह्मण घराण्यास साडेसात बिघे जमीन इनाम चालत आहे. त्यानें आपलें काम त्या दिवसांत केलें पाहिजे. हाही श्रीवीरभद्र देवाचा एक प्रकारचा सेवकच होय.

त्याचप्रमाणें यात्रामहोत्सव होत असल्यावेळीं, वहिवाटदारानें स्वतः त्यावेळीं बंदोबस्तास हजर राहून शिवाय आपल्या मदतीस पुढील आणखी सहा इसम घेऊन यात्रेच्या वेळचा पूर्ण बंदोबस्त ठेवण्याची कामगिरी बजावण्याची वहिवाट होती. ते १ श्रीमंत सरदेसाईसाहेब वंटमुरी. २ श्री. नणदीकर देसाई ३ श्री. नेर्लीकर इनामदार ४ श्री. मलिकवाडकर ५ पाटील कुलकर्णी यड्डर (हे म्हणजे यांचे तर्फे इसम मदतीकरितां आल्यास) यांच्या

बरदास्तीसाठीं यात्रेच्या उत्पन्नांतलि कांहीं भाग खर्च करण्याची वहिवाट होती असें दिसतें.

एकंदरींत देवाच्या निरंतर चालणाऱ्या त्रिकालपूजेस व पालखी–सेवा आणि यात्रा-महोत्सवास कोणत्याही कारणानें क्षुल्लक बाबींतसुद्धा यत्किंचित् नड पडूं नये अशी व्यवस्था करण्यासाठीं ज्या ज्या तजविजी करणें अवश्य आहेत त्या त्या सर्व पूर्ण विचारपूर्वक केल्या असल्याचें दिसून येईल. तेव्हां ही व्यवस्था करणाऱ्यानें किती बारकाईनें विचार करून या विशाल कार्यक्रमाचा उत्तम पाया घातला आहे, हें पाहून अत्यंत आश्चर्य वाटतें! या प्रकारची या देवालयांतील एकंदर व्यवस्था पाहून तटस्थवृत्तीनें विचार करणाऱ्या कोणाही सरळ मनाच्या गृहस्थास असें खास वाटतें कीं, ही सर्व व्यवस्था यथाक्रम विनबोभाट चालण्याकरितांच या गांवचें सर्व उत्पन्न देवाकरितां दिलें असलें पाहिजे. वरील सर्व व्यवस्था वर्षानुवर्ष व्यवस्थित रीतीनें चालण्यास दरसाल कमींत कमी दीड दोन हजार रुपये सहज पाहिजेत. अर्थात् याच कार्यासाठीं हें उत्पन्न दिलें असावें. आणि या कार्यक्रमास अनुसरून देवाकरितां मिळालेल्या सनदेंत पूजा, अभिषेक, नैवेद्य, नंदादीप व उत्सव इत्यादि शब्द असावेत. नाहींपेक्षां या शब्दांचा निराळा काय अर्थ असणार? यावरून या गांवचें सर्व उत्पन्न, वहिवाटदारानें वरील कार्याकरितांच खर्च करणें रास्त होईल असें आम्हास वाटतें. वरील उत्पन्नापैकीं थोडी रकम जरी अन्य कार्यीं खर्च होत असेल; तर तो देवालयाच्या द्रव्याचा अपहार होय. अर्थात् हे उत्पन्नरूपी शिवनिर्माल्य आपल्याकडे ओढण्याचा स्वार्थपर प्रयत्न वहिवाटदारांनीं मागें केव्हां केला नाहीं व पुढेंही केव्हां करणार नाहींत याची सर्वांस खात्री आहे. तरी दुसऱ्या पक्षाच्या म्हणण्याप्रमाणें मध्यंतरीं कांहीं काळ यदाकदाचित् थोडें दुर्लक्ष झालें असलें तरी तें मनास न आणतां, यापुढें पूर्वापार वहिवाटीप्रमाणें वरील कार्यक्रमांत योग्य रीतीनें दोघांच्या संमतीनें वरील उत्पन्न खर्च करीत जावें, हेंच दोघांस श्रेयस्कर होय. आणि अशी बुद्धि श्रीवीरभद्रदेव त्यांना देवो अशी इच्छा करून पुढें जावें हेंच बरें.

वरील एकंदर विवेचनावरून वर लिहिलेलें उत्पन्न योग्य रीतीनें खर्च करणारा सदरहू वहिवाटदार हा एक वडा सेवकच होय. या सेवकावर सदरी उत्पन्न खर्च करण्याची किती जबाबदारी आहे हें दिसून येईल. वर सांगितल्याप्रकारें श्रीवीरभद्रदेवाचा एकंदर राजविलासी पूजाप्रकार उत्तम तऱ्हेनें चालण्याकरितां प्रत्येक लहान मोठ्या सेवकांस स्वतंत्रपणें मोठमोठ्या उत्पन्नाच्या जमिनी इनाम दिल्या असूनही, त्यावर सर्व गांवचा वसूलसुद्धां देवास अर्पण करून टाकिला आहे तो उगाच नव्हे. यांतच हल्लीं यात्रेंत येणाऱ्या दुकानदारांकडून वसूल होणाऱ्या भाड्याच्या रकमेची भर पडली आहे. हें उत्पन्नही देवाकरितांच खर्च व्हावयास पाहिजे. हा सर्व वसूल यथाप्रकार खर्च करण्याची मोठी जोखीम वहिवाटदाराच्या शिरावर असून ती ते जबाबदारीनें पार पाडीत असतात. या वड्या सेवकाचें काम काय याचा आतांपर्यंत सविस्तर विचार केला. श्रीवीरभद्रदेवाच्या व उत्सवमूर्तींच्या खर्चासंबंधींच्या सर्व बाबी हे वहिवाटदार मुखत्यारीनें निभावून नेत असतात. अर्थात् तेंच त्यांचें मुख्य काम होय, हें निराळें सांगणें नको. तथापि हें काम त्यांच्यामागें लावून टाकणाऱ्या या गांवच्या इनामदार श्रीवीरभद्रदेवानें त्यांच्या पोटापाण्याची काय व्यवस्था केली आहे तेंही पाहिलें पाहिजे. या वड्या सेवकानें गांवचा एकवीसशें रुपये वसूल वरील कार्याकरितां देवाप्रीत्यर्थ खर्च करून, गांवांतील हक्कदार व वतनदार रयतांशिवाय ज्या जमिनी राहतात त्यांचें सर्व मिराशी उत्पन्न आपल्या प्रपंचाकडे खर्च करीत असावें. गांवच्या वसुलांतील एका दमडीचाही अभिलाष धरूं नये, तर आलेलें सर्व उत्पन्न वरीलप्रमाणें देवाकरितांच खर्च केलें पाहिजे, अशी ही एकंदर रचना आहे.

याप्रमाणें या वड्या सेवकाच्या कारभाराची व प्रपंच–खर्चाची रूपरेषा आपण पाहिली. तीप्रमाणें पूर्वीपासून वहिवाट चालत आलेली आहे. परंतु अलीकडे हा खटला ब्राह्मणाविरुद्ध निकाल झाल्यावेळेपासून त्यामध्यें जरा टंगळमंगळ होत आहे असें समजतें; परंतु आम्हांस हें खरें वाटत नाहीं.

आणि वाटणार तरी कसें ? कारण वहिवाटदार हे श्रीवीरभद्र देवाचे एकनिष्ठ भक्त आहेत. अशा स्थितींत आपल्या या पूज्य दैवतासंबंधीं आपल्यावर सोंपविलेली कामगिरी करण्यांत ते हलगर्जीपणा करीत असतील हें आम्हास मुळींच खरें वाटत नाहीं. आणि देवासंबंधींच्या कामांत कुचराई करण्यानें आपलें कधींही कल्याण होणार नाहीं हें इतरांपेक्षां वहिवाटदारच पूर्ण जाणून आहेत. तेव्हां वरील प्रकारचा संशय घेणें बरोबर होणार नाहीं. शिवाय चालू खटल्याचा व देवस्थानसंबंधींच्या खर्चाचा अर्थाअर्थी कांहींच संबंध नाहीं. चालू खटला, या देवाचे पूर्वपरंपरागत हक्कदार पुजारी श्रीचरमूर्तिस्वामी आणि यड्डूर क्षेत्रांतील कांहीं भट–ब्राह्मण यांच्यामध्यें झालेला आहे. तो कोणत्याही पक्षातर्फे निकाल झाला तरी त्याविषयींचें नफानुकसान वहिवाटदाराला मुळींच नाहीं. अशा परिस्थितींत खटल्याच्या निकालापासून देवस्थानच्या खर्चाच्या व्यवस्थेवर कांहीं परिणाम होईल असें म्हणवत नाहीं. कांहीं असो; देवाच्या कामांत आपल्या प्राप्त कर्तव्यांत कोणीही कुचराई करूं नये व तशी गोष्ट येथील कोणत्याही सेवकरून होऊं नये अशी सुबुद्धि तोच देवाधिदेव त्यांना देवो, अशी आशा करून पुढील मार्गास लागूं.

वर सांगितलेल्या वड्या सेवकाप्रमाणेंच पुढें सांगितले जाणारे सर्व छोटे सेवेकरी चालू खटल्यानंतर चुकवाचुकवी करितात कीं काय अशी कोणास शंका असल्यास ती अगदीं निराधार ठरेल. हे सर्व सेवेकरी देवाच्या कामांत सदा तत्पर असतात, इतकेंच नव्हे, तर तें काम हे मोठ्या भक्तीनें व शुचिर्भूतपणानें करितात, असा कोणासही येथें सध्यां प्रत्यय येईल. या प्रत्येक सेवकाचें नित्याचें काम काय याची चौकशी करण्यापूर्वी या छोट्या सेवेकऱ्यांच्या पोटापाण्याची व्यवस्था येथील इनामदार श्रीवीरभद्रदेवानें कशी केली आहे तें पाहूं. कारण सध्यांच्या काळीं कोणत्याही व्यवहारांत ‘ आधीं पोटोबा मग विठोबा ’ हें साधें तत्व सर्रास चालत असल्यामुळें, भरपूर पोटास मिळाल्याशिवाय क्षुल्लक कामही सरस वठत नाहीं. मग येथील सेवेचें काम तर अत्यंत कठीण व आंगमेहन-

तीचें असूनही तें अत्यंत भक्तीनें व सोंवळेपणानें करावें लागतें. तेव्हां असें जबाबदारीचें काम निरलसपणें निरंतर करीत राहण्यास त्याच मानानें मोठें वेतनही मिळत असलें पाहिजे. नाहींतर ही यातायात कोण करील ? यावर कोणी म्हणतील कीं, देवासंबंधींची पारलौकिक हिताची कामगिरी सहजगत्या घडत असल्यास ती कोण नाकारील ? आपल्याकडून देवाची कांहींतरी सेवा निरंतर घडावी म्हणून कित्येक पुण्यात्मे आपल्या सर्व प्रपंचाचा त्याग करून अशा पुण्यपावन क्षेत्रांत मुद्दाम येऊन राहतात. मग ज्यांना अनायासें ही कैवल्यपदप्राप्तीची पुण्य कामगिरी लाभली आहे, ते ते केवळ मजुरीकडे लक्ष देऊन वेठीनें करीत राहतील काय ? या देवाची ही पवित्र सेवा फुकट करण्यासही कित्येक भक्त अनमान करणार नाहींत. यावर अशा भोळया भाविकांना इतकेंच म्हणतां येईल कीं, बाबांनो, हल्लीं या रीतीनें परलोकची पायरी चढण्यास परम उत्सुक झालेले तुकाराम, रामदासासारखे पुण्यवान् सद्भक्त हजारांत नव्हे लाखांत एकादा सांपडण्याची मारामार पडते. मग येथें यड्डूर क्षेत्रांत देवाकरितां सर्वस्व अर्पण करणाऱ्या किंवा जन्म घालविणाऱ्या सत्पुरुषांचें पेंव कोठून फुटेल ? सध्यां समाजांतील पुष्कळ मनुष्यांची स्थिति अशी झाली आहे कीं, त्यांना देव, धर्म, कीर्तन, प्रवचन म्हटल्याबरोबर डोक्यांत तिडीक उठते. व त्यांऐवजीं नाटकें, सिनेमा, कादंबऱ्या, कुचेष्टा ह्या बऱ्या वाटतात. अशा परिस्थितींत येथें यड्डूर क्षेत्रांत निरिच्छपणें देवाची निरंतर सेवा करणारे नोकर कोठून सांपडणार ? अर्थात् येथील सर्व सेवेकरी फुकटे नसून वतनदार आहेत; आणि त्याजकडे मोठमोठ्या उत्पन्नाच्या वतनी जमिनी चालत आल्या आहेत. व त्यासंबंधानें प्रत्येक सेवेकऱ्यास समरी सेटलमेंट प्रकरणीं सनदाही मिळाल्या आहेत. व तें उत्पन्न घेऊन त्याऐवजीं या देवाची सेवा हे सेवेकरी निरंतर करीत असतात.

असें असतांही या सर्व सेवेकऱ्यांची कायदेशीर नागवणूक करून व त्यांना देशोधडीस लावून देवाच्या सुरळितपणें चाललेल्या सेवेंत विघ्न उपस्थित करण्याचा व अशा प्रकारें उत्सवमूर्तीच्या तोंडास पानें पुसण्याचा

एक कपटी कावा अगदीं अलीकडील काळांतही कसा केला, याचें अगदीं ताजें ठळक उदाहरण येथें वाचकांस विदित करणें अस्थानीं होणार नाहीं.

इंग्रज सरकारची सत्ता या प्रांतांत दृढमूल झाल्यावर या भागांतील देशमूख, देशपांडे, पाटील, कुलकर्णी इत्यादि सर्व वतनदार लोकांची, त्यांजकडे चालत असलेल्या जमिनींवरील मालकी कायदेशीर आहे कीं नाहीं, याची जुन्या कागदपत्रांवरून पूर्ण चौकशी करून, त्यांना स्वतःच्या शिक्क्याच्या सनदा करून देण्याकरितां त्यांनीं इ. स. १८५० च्या सुमारास एक कमिशन नेमलें होतें; त्यास 'इनाम कमिशन' अथवा 'इनाम कमिटी' असें म्हणतात. त्या कमिशननें या इलाख्यांत सगळीकडे फिरून प्रत्यक्ष पाहणी करून तत्कालीन मालकांचे जाबजबाब घेतले व मागील राजेरजवाड्यांनीं दिलेल्या सनदादिकांवरून व इतर साक्षीपुराव्यांनीं पूर्ण खात्री करून घेऊन, अशा सर्व हक्कदारांना सन १८५२ इसवीपासून ब्रिटिश शिक्क्यांच्या हजारों सनदा दिल्या आहेत. याच काळांत येथील सर्व सेवेकऱ्यांना व वहिवाटदारास तशा सनदा मिळाल्या आहेत. परंतु त्यावेळीं व आजच्या घटकेसुद्धां वहिवाटदार व त्याचे कांहीं जातभाई यांशिवाय बाकीचे सर्व सेवेकरी अगदीं अक्षरशत्रु आंगठेबा असल्यामुळें, त्यांच्या अज्ञानाचा पूर्ण फायदा घेऊन वहिवाटदारांच्या पूर्वजांनीं व त्यांचे यगलबचे कुलकर्ण्यांनीं मिळून संगनमत करून आणि तत्कालीन अर्धशिक्षित पाटलास बगलेंत मारून असें कसब लढविलें कीं, या सर्व सनदा मिळालेल्या व त्यामुळें स्वतंत्र खातें घालण्यास सर्वतोपरी लायक असलेल्या जमिनींचा समावेश वहिवाटदाराच्या खात्यांतच करून वट्ट एकंदर सेवकांसह 'श्रीवीरभद्रदेव वहिवाटदार—मुतालिक देसाई' असें एकच खातें ठेवून त्याच्या पोटीं सेवकांचीं खातीं घालून त्यांना पोटखातेदार बनविलें. आणि अशा प्रकारें वहिवाटदाराच्या विशाल उदरांत या सर्व स्वतंत्र वतनी जमिनींचा स्वाहाकार करण्याची विलक्षण युक्ति योजून ठेविली. या कपटी कृत्याचा पाया सुमारें ४०।४५ वर्षांपूर्वी इ. स. १८८० च्या सुमारास

घालून ठेविला. उद्देश हा कीं, हीं पोटखातीं घालण्याची वहिवाट आणखी कांहीं वर्षें निर्विवाद चालली असती तर पुढें वहिवाटदार काय करणार होते हें पुढील 'सेवेकऱ्यावरील देखरेख' या प्रकरणांत दिलेल्या कलवंतिणीवरील दाव्यावरून दिसून येतें; अर्थात् त्याचा उद्देश या सर्व खटपटीवरून या सर्व वतनी सेवेकऱ्यांना, त्यांच्या जमिनींतून अचानक उचलून कायदेशीरपणानें गचांडी देऊन घालवून देतां यावें असाच होता यांत काय संशय! परंतु दुर्दैव बिचाऱ्या वहिवाटदाराचें व सुदैव सेवकांचें! म्हणून याच संधीस या आपल्या चिकोडी तालुक्याच्या मामलतदाराच्या जागेवर निःपक्षपाती, परमदयाळू आणि खरोखर रयतेचें व सरकारचें! कल्याण करणारे असे सुप्रसिद्ध 'वडेयर' मामलेदारसाहेबांची देवदयेनें नेमणूक झाली, त्यांनीं फिरतीवर असतां एकदां यडूरास भेट देऊन श्रीवीरभद्रदेवालयांतच मुक्काम केला. त्यावेळीं गांवचें दप्तर तपाशित असतां सुरवातीसच 'सेवेकऱ्यांचीं खातीं अशीं वहिवाटदाराच्या पोटशीं कां घातलीं आहेत?' असा कुलकर्णीदादास रोख ठोक सवाल केला. तेव्हां त्यानें तशी पूर्वीपासून वहिवाट आहे.' असें वहिवाटींतलेंच उत्तर दिलें; पण या उत्तरानें मे० वडेयर साहेब स्वस्थ बसणार थोडेच. त्यांनीं पुनः 'ह्या जमिनी वतनी कीं रैतावा आहेत? या सेवेकऱ्यास कोणी दिल्या. वतनी असल्यास सनदा कोणी दिल्या? त्यांच्या दोन चार सनदा तावडतोब हजर करा.' असा प्रश्नांचा व हुकुमांचा मारा करितांच कुलकर्णीअप्पाची वहिवाटीची वटवट बंद पडली व त्यांनीं कांहीं सनदा हजर करविल्या त्या समरी सेटलमेंट सनदा दृष्टीस पडतांच मामलेदारसाहेबांना अत्यंत आश्चर्य वाटलें व त्याबरोबर रागही आला. त्यांनीं 'सर्व सेवकांकडे अशाच सनदा आहेत काय? आणि असें असतां तुम्ही यांचीं खातीं वहिवाटदारांच्या पोटीं कां घातलीं! असें पुनश्च रागानेंच विचारिलें. तेव्हां कुलकर्णी म्हणाला 'आपण सांगाल तशीं त्यांचीं खातीं घालीत जाऊं. परंतु वहिवाटदारांची तक्रार येणार, तरी तसा मला लेखी हुकूम पाहिजे' असें ऐकतांच त्याच बैठकीस तीं खातीं 'श्रीवीरभद्रदेव सेवेकरी'-अशा

क्रमानें कशीं ठेवावीं, तें सांगून तसा लेखी हुकूम दिला. व त्याप्रमाणें स्वतंत्र खातीं घालावयास लावून मग दुरुस्ती झाल्यानंतर दप्तर तपासणी केली ! यावर इलाखेसाहेबांकडे वहिवाटदारानें अपील केलें. त्यांत मामलेदारसाहेबांनीं दिलेला हुकूम कायम झाला. इतकेंच नव्हे तर त्यांनीं ' श्रीवीरभद्र सेवेकरी ' अशीं सेवकांची खातीं न घालतां लँड 'एलिनेशन बुकास ' अनुसरून ' श्रीवीरभद्रदेव मॅनेजर ' अशीं खातीं घालण्यास हुकूम दिला ! अर्थात् हे सेवेकरी नुसते देवाचे सेवक नव्हत; तर ते देवाचे ' मॅनेजर ' होत. व वहिवाटदारास म्यानेजमेंटचा सर्व कामांत जितका हक्क आहे तितकाच हक्क प्रत्येक सेवेकऱ्यास आहे. ही जाणीव या हुकमानें सर्व सेवकांना करून दिली. याला म्हणतात जनहित-दक्षता. नाहींतर यांच्यापूर्वीं या तालुक्यावर अनेक मामलेदार आले असून त्यांनीं हेंच दप्तर दरसाल दोन चार वेळ तपसलेंहीं असेल; परंतु एकाही अधिकाऱ्यानें, या सर्व सेवेकऱ्यांच्या वतनी जमिनींचीं खातीं अशीं कां ठेविलीं आहेत ? असा नुसता संशयसुद्धां घेतला नाहीं! हे सर्व सेवक ब्राह्मणेतर आहेत, हेंच कदाचित् असें होण्याचें कारण असेल काय? देव जाणे. म्हणूनच हल्लीं सरकारी नोकरींत शेंकडा ९५ नोकर ब्राह्म-णेतर पाहिजेत अशी जोराची मागणी ब्राह्मणेतर लोक करीत असावेत. यावरून या तालुक्यावर आलेले पूर्वींचे सर्वच मामलेदार पक्षपाती होते असा आमच्या म्हणण्याचा कोणी अर्थ करीत असतील, तर तो अगदीं चुकीचा होय. तसें म्हणण्याचें धाडस आम्ही केव्हांही करणार नाहीं. या बाबतींत मामलेदारसाहेबांपेक्षां या गांवचे कुलकर्णी व वहिवाटदार हेच सर्वस्वीं चुकीस पात्र आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण आश्चर्य हें कीं, त्या दोघांच्या हातचलाखीनें झालेली ही धडधडीत अन्यायाची गोष्ट इंग्रज सरकारच्या राज्यांत दोन चारच नव्हत तर चाळीस पंचेचाळीस वर्षे उघडकीस आली नाहीं ! हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. मामलेदारसाहेबांसारख्या मोठ्या व जबाबदार हुद्देदाराला चकविणें ही

खरोखर सामान्य गोष्ट नव्हे; पण अशा गोष्टी म्हणजे ज्यांच्या हातचा मल होय असे स्वार्थी लोक सामान्य शेतकऱ्याला कसे देखतां देखतां नागवीत असतील हें सांगण्यास कोणी ज्योतिषी नको.

सुदैव बिचाऱ्या सेवेकऱ्यांचें म्हणून त्यांची या कृष्णकारस्थानांतून सुटका झाली; व श्रीवीरभद्रदेवाची सेवा सुरळीत चालली. आम्हांस तर असें वाटतें कीं, श्रीवीरभद्रदेवानेंच ऐन वेळीं सरकारच्या मनांत प्रेरणा करून त्या शांतस्वरूपी शांतवीरस्वामी वडेयर रावसाहेबांची येथील मामलतीवर नेमणूक करविली ! कांहीं असो, एवढी गोष्ट खरी कीं, या सेवेकऱ्यांच्या जमिनींचें ग्रहण एकदांचें सुटलें. व तेही आतां चांगले शुद्धीवर आले. या धक्यानें तरी ते शहाणे होवोत व त्यांच्यात आंगठेवा न दिसोत. असो.

या देवालयांतील बहुतेक सर्व सेवेकऱ्यांकडे जीं कामें आहेत तीं पाहिल्यास निदान निम्यांहून जास्त सेवेकरी फक्त श्रीउत्सवमूर्तींच्या सेवेकडे लाविले आहेत. असें म्हणण्यास हरकत नाहीं. बाकीचे दोन्ही देवांकडे आहेत. यांची प्रारंभीं निवड करून नेमणूक करणाऱ्या धोरणी सत्पुरुषानें किती दूरदृष्टि ठेविली होती; हें येथील सेवेकऱ्यांच्या जातींवरून व कामावरून दिसून येतें. सेवेकऱ्यांमध्यें तत्कालीन सर्व जातींचे इसम योग्य प्रमाणांत निवडलेले दिसून येतात. आणि त्यांच्याकडील कामांवरून देवाच्या ऐश्वर्ययुक्त षोडशोपचार पूजेस यत्किंचित् अडथळा येऊं नये अशी उत्तम व्यवस्था केली आहे. पुढील पृष्ठावरील कोष्टकांतील माहिती व तिचा खुलासा वाचिल्यास ती व्यवस्था पूर्णपणें ध्यानांत येईल.

या विवेचनावरून देवाचे एकंदर वतनी सेवक वहिवाटदारासह २५ आहेत. आणि कोणत्याही महत्वाच्या सेवकास दहा एकरांपेक्षां म्हणजे हल्लीं सुमारें दोनशें रुपयांनेक्षां कमी उत्पन्न नाहीं. वर दिलेलें अंदाजी उत्पन्न अगदीं कमी प्रमाणानें ( एकरीं २० रुपये असें ) धरलें आहे;

## श्रीवीरभद्र देवाच्या सेवेकऱ्याविषयीं माहितीचा तक्ता.

| अनु-क्रम. नंबर. | सेवेकऱ्याचें नांव. | जात. | काम. | त्याजकडे चालत असलेली जमीन: विघे (माजी) | त्याजकडे चालत असलेली जमीन: एकर गुंठे | आतांचें अंदाजी उत्पन्न रुपये. | शेरा. |
| --- | --- | --- | --- | --- | --- | --- | --- |
| | श्रीचरमूर्तिस्वामी काडदेवरू मठ यड्डूर यांचेंतर्फे | | | | ९८३५ | कल्लोळ १०० | |
| | | | | | ६८२१ | सौंदत्ती १०० | हल्लीं |
| १ | श्रीविरभद्रदेव पुजारी व | लिंगायत जंगम. | पूजा करणें. | | १६८१६ | १०० | वहिवा- |
| २ | श्रीउत्सवमूर्ति पुजारी. | लिंगायत जंगम. | ,, ,, | ५ | ५८३९ | | टींत |
| | | | | ७॥ | ६८३२ | | नाहीं. |
| | | | | १२॥ | १२८३१ | २५० | एकरीं |
| ३ | पालखी भोई. | लिंगायत गुरव. | पुढें पालखी वाहणें. | १२॥ | १२८२७ | २५० | २०रु. |
| ४ | पालखी भोई. | लिंगायत जंगम. | मागें पालखी वाहणें. | १० | ११८१ | २२५ | लागण |
| ५ | करडी. | ,, | पालखीपुढें व देवापुढें करडी वाजविणें | ७॥ | १०८३७ | २२० | धरून. |
| ६ | ढोलवाला. | लिंगायत गुरव. | पालखीपुढें व देवापुढें ढोल वाजविणें. | ७॥ | १०८३६ | २२० | |
| ७ | रुगरुग्या. | ,, | पालखीपुढें व देवापुढें रुगरुगी वाजविणें. | ७॥ | ११८९ | २२५ | |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ८ | नैपेरी. | लिंगायत जंगम. | पालखीपुढें व देवापुढें नेपेरी वाजविणें. | ७॥ | ११८२९ | २३० | |
| ९ | वाजंत्री. | मराठा घडशी | पालखीपुढें व देवापुढें सूर व सनई वाजविणें. | १० | १३८२४ | २७५ | |
| १० | भृंगी. | लिंगायत जंगम. | पालखीपुढें व देवापुढें वचन म्हणणें. | १० | १४८२३ | २९० | |
| ११ | गुरव—मृदंग्या. | ,, | भृंगी याजबरोबर मृदंग वाजविणें. | १०<br>५ | ९८१२<br>५८२ | | |
| | | | | १५ | १४८१४ | २९० | |
| १२ | नायकिणी. | मराठाकलावंत. | पालखीपुढें व देवापुढें नृत्य-गायन करणें. | ७॥ | ११८२३ | २३० | |
| १३ | ,, | ,, | ,, | ७॥ | ५८२५ | ११० | |
| १४ | ,, | ,, | ,, | ७॥ | ६८९ | १२५ | |
| १५ | ,, | ,, | ,, | ७॥ | ११८४ | २२५ | |
| १६ | शमनमृदंग्या. | मुसलमान. | नायकिणीबरोबर तबला वाजविणें. | ५ | ४८१४ | ९० | * |
| १७ | सांजिंद्या. | मुसलमान ? | नायकिणीबरोबर सारंगी वाजविणें. | १० | ८८२४ | १७५ | * |
| १८ | तालधारी. | लिंगायत गुरव. | नायकिणीबरोबर ताल ध. | ७॥ | ५८३० | १२० | * |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १९ | दिवस्या. | लिंगायत जंगम. | पालखीपुढें दिवस्या धर. | ७॥ | १०८३३ | २२० | * |
| २० | राजांगळी. | लिंगायत जंगम. | देवळांतील पटांगण लो. | २॥ | २८३ | ५० | |
| २१ | म. राजांगळी. | महार. | देवालयाबाहेरील पटांगण लोटणें. | ५ | ४८३१ | १०० | |
| २२ | फुलारी. | लिंगायत. | दोन्ही देवांस व मठांत बेल फुलें आणून देणें. | १० | १२८३७ | २५० | |
| २३ | पाथरवट. | पाथरवट. | देवालयाची दुरुस्ती करणें. | ५॥ | ४८३३ | | |
| | | | | ३ | १८७ | | |
| | | | | ८॥ | ६ | १२५ | |
| २४ | फुलबागवाला. | माळी ? | बाग तयार ठेवणें. | ३ | ८२० | २५ | * |

* या पांच सेवेकऱ्यांचीं घराणीं इनाम कमिशन येण्यापूर्वीं नष्ट झालीं होतीं; म्हणून त्यावेळीं कमिशननें त्यांच्या जमिनी त्यांच्या सेवा अखंड (पूर्वीप्रमाणें) चालविण्याच्या करारानें वहिवाटदाराकडे दिल्या. व त्याप्रमाणें त्यास सनदाही करून दिल्या; परंतु वहिवाटदारानें नंबर १७।१८।२४ यांचीं कामें यथातथा चालवून दोघा मृदंग्यांचीं कामें नीट न चालल्यास सर्वच सेवेला अडथळा येतो, म्हणून थोडीशी जमीन देऊन एका मराठा इसमास शमनमृदंग्याची नोकरी लाविली आहे व ती कायमपणें चालविली आहे. गुरव मृदंग्याच्या बदली एक जंगम इसम नेमला आहे. परंतु त्याच्या नोकरीची टंगळमंगळ होत असते, कारण वेतन भरपूर मिळत नाहीं. आणि नं० १८ तालधारी या सेवकाऐवजीं त्याची जमीन देऊन एका गुरव जातीच्या शिंग्याची नेमणूक केली आहे. एकंदरील या पांचही नोकऱ्याविषयीं थोडासा हलगर्जीपणा झाला आहे.

परंतु येथील जमीन अत्यंत सुपीक असल्याकारणानें सुबत्तेच्या काळीं केव्हां केव्हां प्रत्येक एकरीं तीस चाळीस रुपयांपर्यंतही उत्पन्न येऊं शकतें. अर्थात् सरासरीच्या मानानें कमींत कमी येणारें दरसालचे दोनशें रुपयांचें उत्पन्न सामान्य सेवकांना आहे. आणि इतक्या उत्पन्नावर खेडे-गांवांत एका कुटुंबाचें पोषण चांगल्या प्रकारें होऊं शकतें. म्हणून निश्चि-तपणें पोटाला मिळत असल्या कारणानें देवाची सेवा भक्तिपूर्वक निरंतर चाळण्यास हरकत येत नाहीं.

सेवकांच्या जातींकडे लक्ष दिल्यास, त्यांत सगळ्या जातींचे लोक गांवच्या त्या काळच्या लोकसंख्येच्या प्रमाणांत आहेत, असें दिसून येईल. वहिवाटदाराशिवाय फक्त ब्राह्मण ज्ञातीचा सेवेकरी त्यांत कोणी नाहीं. याचें कारण ही सेवेची व्यवस्था ज्यावेळीं अमलांत आली, तेव्हां या गांवांत कोणीच स्थायिक ब्राह्मण नसावा; किंवा असला तरी हीं अंगमेहन-तीचीं कामें करण्यास तयार नसावा; अथवा त्याला कमीपणा वाटला असावा. तथापि पूर्व काळीं यड्डूर क्षेत्रांत ब्राह्मणवस्ति फारशी नव्हती, हेंच खरें. या विषयासंबंधानें ब्राह्मण लोकांचें म्हणणें असें आहे कीं, श्रीशंकराच्या लिंगपूजनास व त्याची कोणत्याही प्रकारें सेवा करण्यास ब्राह्मणांना प्रतिबंध नाहीं. परंतु त्यांनीं श्रीशिवाची किंवा शिवावतारी श्रीवीरभद्रदेवा-च्या साकारमूर्तीची केव्हांही पूजा अगर सेवा करूं नये अशी शास्त्राची आज्ञा आहे; आणि येथील सेवा मुख्यत्वें उत्सवमूर्तीसंबंधानें असल्यामुळें त्यांत ब्राह्मणांनीं भाग घेतला नाहीं; परंतु हें म्हणणें युक्तिवादास धरून नाहीं. कारण हें म्हणणें 'द्राक्षें आंबट आहेत' या कोल्ह्याच्या उक्तीप्रमा-णेंच आहे. कां कीं, मागील खटल्याच्यावेळीं (इ. स. १८६८।१८७०) त्यावेळच्या वहिवाटदारानें श्रीवीरभद्रदेवाच्या सेवकांना देवळांतून हांकून लावून पालखी आपल्या कबजांत घेऊन आपल्या ब्राह्मण सेवकांकरवीं पालखी प्रदक्षिणोत्सव करण्याचा घाट घातला होता; परंतु तेव्हां मठांत असलेल्या

श्रीचरमूर्तिस्वामींनीं मे. मामलेदारसाहेबांकडे दाद मागून व मुनसफ कोर्टांत दावा वगैरे करून ती वहिवाटदाराची नीच 'टोळधाड' कशी परतविली याचा हृदयस्पर्शी इतिहास पुढें उत्तरार्धांतील सातव्या भागांत दिला आहे तो पहावा. या लेखी पुराव्यावरून पाहतां वरील म्हणण्यांत कितपत तथ्य आहे; हें उघड आहे आणि हा पुरावाही बाजूस ठेवून जरी श्रीउत्सवमूर्तींच्या पूजेस व उत्सव करण्यास वरील शास्त्राधारें प्रतिबंध असला तरी श्रीवीरभद्रलिंगासंबंधानें पुष्कळ कामें त्यांना करावयाजोगीं होतीं. त्यांतसुद्धां त्यांनीं कां भाग घेतला नसावा हें समजणें कठीण आहे. असो.

सेवेकऱ्यांत बहुतेक सर्व जातींच्या लोकांचा भरणा असल्यामुळें, देवाच्या घरीं सर्व जाती व धर्म हीं समान योग्यतेचीं आहेत. ही उदात्त विचारसरणी येथें प्रत्यक्ष व्यवहार्य करून दाखविण्याची कामगिरी आद्य सेवा प्रवर्तकानें केली आहे. तिच्या योगानें असा उत्तम परिणाम झाला आहे कीं, येथें नांदणाऱ्या सर्व जातींच्या लोकांमध्यें एक प्रकारचा प्रेमभाव उत्पन्न झाला आहे. आणि त्यामुळें, सर्वच लोकांना या देवासंबंधीं आपलेपणा वाटतो. आणि पक्षपात दृष्टीची वार्तासुद्धां येथें ऐकूं येत नाहीं. या गोष्टीचाही निरंतर सेवा चालण्याच्या कामीं फार उपयोग झाला आहे.

आतां सेवेकऱ्यांच्या कामासंबंधानें थोडासा विचार करूं. या देवालयांतील मुख्य काम म्हणजे दररोज त्रिकाळची पूजा व पालखीमहोत्सव हें होय. याचें महत्व किती आहे याविषयीं मागें विवेचन केलेंच आहे, म्हणून या महत्वाच्या कामाकडेच बहुतेक सेवेकरी गुंतविले आहेत. नंबर २ उत्सवमूर्तीचा पुजारी याशिवाय नंबर ३ ते १८ पर्यंत आणखी १६ सेवेकरी सकाळच्या सेवेच्या वेळीं हजर असतात; व रात्रीं सेवेच्यावेळीं नंबर १९ चा म्हणजे दिवट्या धरण्याची सेवा करण्यास दोघे मशालजी जास्त असतात. आणि हे सेवेकरी पुढील प्रमाणें कामें करीत असतातः—

नंबर २ चा पुजारी श्रीउत्सवमूर्ति पालखींत आणून बसविणें व सेवा संप-

तांच पुन्हां देवळांत नेऊन ठेवणें व सेवा चालू असेपर्यंत पालखीजवळ हजर राहणें हीं कामें करितो; व मागें सांगितल्याप्रमाणें श्रीउत्सवमूर्तीची पूजा तो करीत असतो हें निराळेंच. नंबर ३ चा करडी हा सेवेकरी करडी या नांवाचें चर्मवाद्य वाजवीत असतो. हें वाद्य ढोलग्यासारखेंच असून तें दोन्हकिडून दोन लांकडी वीत वीतभर कांडक्यांनीं वाजवावें लागतें. त्याचा आवाज खणखणीत असा निघतो. त्याच्या जोडीस ढोल-वाला व रुगरुग्या हे आपलीं वाद्यें वाजवीत असतात. हीं दोन्ही वाद्येंही दिसण्यांत करडीप्रमाणें असून चर्मवाद्येंच आहेत. परंतु हीं उजवीकडून लांकडाच्या वीतभर कांडक्यांनें व डावीकडून हातानें अगर कामट्यानें वाज-वावयाचीं असतात. नंबर ९ चा वाजंत्री हा करडी-ढोलवाल्यांबरोबर सूर-सनई वाजवीत असतो. नेपेरी हा आपलें नेपेरें मधून मधून वाजवीत असतो. नेपेरें हें वाद्य इंग्रजी बिगुलप्रमाणें एकदोन वेटाळ्याचें पितळेचें फुंकून वाज-वावयाचें वाद्य आहे. याचा आवाज कांहींसा शिंगासारखा असतो. नं. १० चा भृंगी हा सेवेकरी मागें सांगितल्याप्रमाणें भविष्य वचनाचीं गाणीं म्हणत असतो. व त्यावेळीं हातांनीं टाळ वाजवीत असतो. त्याबरोबर पूर्व काळीं गुरव मृदंग्या हा मृदंग वाजवीत असे असें सांगतात. पण हल्लीं त्या ऐवजीं एक जंगम इसम तबला वाजवीत असतो. नं० १२ ते १५ पर्यंत चारी नायकिणी दोन्ही वेळीं पालखीउत्सवास हजर असतात. व होतां होईल तों देवांविषयींची गाणीं म्हणत असतात. नायकिणींबरोबर तबला वाजवि-ण्यास शमन-मृदंग्या आणि सारंगी वाजविण्यास साजिंद्या हे सेवक असतात. पूर्वीं नायकिणींबरोबरसुद्धां तबल्याऐवजीं मृदंग वाजवीत असावेत असा 'शमन-मृदंग्या' या नांवावरून समज होतो व तो खरा आहे. हे दोघे असून शिवाय त्यांबरोबर नं. १८ चा तालधारी हा सेवक पूर्वीं झांज़ेसा-रखी एक तऱ्हेची रम्य ताल वाजवीत होता असें सांगतात. हल्लीं ही ताल सोडून तो 'शिंग' हें बेताल वाद्य वाजवीत असतो. ताल सोडून बेताल झाल्या कारणानें शिंगासारखें बेताल वाद्य त्याच्या बोकांडीं बसलें असावें!

श्रीवीरभद्रदेवानें त्याच्या बेतालपणाबद्दल ही शिक्षाच केली असावी असें दिसतें. तसेंच हल्लीं शमन-मृदंग्या व साजिंद्या या सेवकांचीं कामें मराठा जातीच्या गृहस्थांकडे आहेत. अर्थात् हेच नायकिणींबरोबर साथ करीत असतात. नं० १९ च्या सेवकाचें दिवसा कांहीं काम नाहीं, म्हणूनच कीं काय रात्रीं पालखीच्या दोहों बाजूस दोघांनीं दोन दिवट्या अगर मशाली धरून एकच सेवा करावी लागते. अर्थात् दिवसा मिळालेल्या सुटीची भर एकच सेवेला दोन माणसें गुंतवून रात्रीं करावी लागते. नं.२० चा जंगम राजांगळी हा देवालयांतील विशाल पटांगण आणि पूर्व व दक्षिण दरवाजांतील उंबरठ्यापर्यंतचा भाग स्वच्छ लोटून दोन्ही वेळ केरं काढून तो देवालयाबाहेर पंचवीस हातांपलीकडे नेऊन टाकीत असतो. एकंदरींत आंतील पटांगण नेहमीं स्वच्छ ठेवण्याची कामगिरी त्यानें बजाविली पाहिजे. पालखीसेवेच्या वेळीं वास्तविक या सेवेकऱ्याचें पालखीपुढें कांहीं काम नाहीं. परंतु सध्यां तो स्वखुषीनें रुप्याची वेताची काठी धरून चोपदारा-प्रमाणें पुढें चालत असतो. यांवरून हल्लीं तो वेत्रदंडधारी भाट बनला आहे! नंबर २१ महार राजांगळी हा देवालयाबाहेरील सभोंवतालची २५ हातांपर्यंतची जागा दररोज लोटून स्वच्छ ठेवीत असतो. शिवाय यानें सोमवारीं ज्या रस्त्यानें पालखी मठास जात असते तो सर्व रस्ता व मठा-पुढील आणि पंचलिंगेश्वरापुढील सर्व जागाही लोटून स्वच्छ केली पाहिजे. या स्वच्छतेपैकींच याचें दुसरें काम म्हणजे दक्षिण दरवाज्याबाहेरील देवा-लयांतील सर्व सांड पाणी वाहून जाणारें मोठें गटार, त्यांतील गाळ काढून पाणी पूर्ण वाहून जाईल व वाहत राहील असें स्वच्छ ठेविलें पाहिजे. हें पाणी तुंबून राहिल्यास फारच दुर्गंधी सुटत असल्याकारणानें वेळच्या वेळीं हें काम करण्याची फारच खबरदारी घ्यावी लागते व तशी घेतली जाते. सर्व सेवेकऱ्यांपेक्षां जरा सुलभ व स्वच्छतेचें काम फुलारी या नं० २२च्या सेवेकऱ्याचें आहे. त्यानें वहिवाटदारानें तयार केलेल्या बागेंतील ताजीं फुलें व बेल हीं नित्य त्रिकाळ देवालयांत व मठांत दिलीं पाहिजेत

शिवाय हा नेहमीं जात येत असल्यानें त्या बागेवर देखरेख ठेवण्याचें कामही साहजिकच त्याजकडे असतें. चार सहा वर्षांपूर्वी वहिवाटदारानें लाविलेल्या बनांतील बागेंत बरींच फुलझाडें होतीं, परंतु हल्लीं जरा दुर्लक्ष झालें असावेंसें वाटतें; त्यामुळें हल्लीं फारशीं फुलें निघत नाहींत. म्हणून येथील बेल व दुसरीकडील फुलें आणून तो नित्य देत असतो.

श्रीवीरभद्रदेवालय व यल्लूरांतील लहान मोठीं प्राचीन देवळें व पवित्र स्थळें ह्यांची पडझड दरसाल दुरस्त करणें हें नं. २३च्या पाथरवट या सेवकाचें काम आहे. देवालयाच्या दुरुस्तीस दगड, चुना इत्यादि जें सामान लागेल तें व मजूर लागल्यास त्यांची मजुरी वहिवाटदारानें दिली पाहिजे, अशी वहिवाट आहे. व त्याप्रमाणें दुरुस्ती होत आहे. तथापि यापेक्षां विशेष लक्ष देणें जरूर आहे. शेवटच्या फुलबागवाल्याचें काम बागेची मशागत करणें हें होय. बनांत जी बाग आहे म्हणून वर सांगितलें, त्यांतील फुलझाडाची निगा राखून वहिवाटदारानें बागेकरितां ठेविलेल्या बैलाकडून अथवा रेड्याकडून नदींतील पाणी आणून तें बागेंतील झाडांना घालावयाचें असतें. हल्लीं बागेची व्यवस्था यथातथाच असल्यानें पाणी आणणारा स्वतंत्र बैल असल्याचें दिसत नाहीं.

## (७). सेवकऱ्यांवरील देखरेख

वर सांगितलेल्या सर्व सेवेकऱ्यांकडे प्रत्येकीं फक्त एकेकच काम आहे. व तेंच त्यानें निष्ठापूर्वक करावें अशी सेवासंस्थापकाची योजना आहे. म्हणून त्यानें कोणालाही दुहेरी कामें दिलीं नाहींत. आणि दिलेल्या कामाच्या मगदुराप्रमाणें कमीजास्त उत्पन्नाची जमीन देऊन ठेविलेली आहे. इंग्रज सरकारनें दिलेल्या सनदांतून सुद्धां त्या त्या सेवकांचीं कामें स्पष्ट नमूद करण्यांत आलीं आहेत. व ती ती सेवा निरंतर चालण्याकरितां सदरहू जमीन तुमच्याकडे इनाम चालविली जाईल असा खुलासा करून ही सेवा करण्यांत तुम्ही अगर तुमच्या वंशजांकडून अंतर पडेंपर्यंत तुमचा हक्क सदरहू जमिनीवर अबाधित राहील. असें बजाविण्यांत

आलें आहे; आणि याचप्रमाणें वहिवाटदाराच्या पूर्वजांना श्रीवीरभद्रदेवाच्या पूजा, नैवेद्य, नंदादीप वगैरेकरितां पेशव्यांनीं या गांवची सनद दिली आहे असा इनामकमिशनचा ठराव झाला आहे. इनामकमिशनानंतर कांहीं वर्षांनीं बेळगांव जिल्ह्याच्या कलेक्टरसाहेबांच्या सहीनें सर्व सेवेकऱ्यांना अशा नोटिशी देण्यांत आल्या आहेत कीं, सनदांत नमूद केलेली सेवा करण्यांत ज्यावेळीं तुमच्याकडून अगर तुमच्या वंशजांकडून कसूर होईल अथवा त्यांत अंतर पडेल, त्या वेळीं सरकारला तुमचा हक्क नष्ट करून दुसरा सेवेकरी नेमितां येईल. यावरून वहिवाटदारासह सर्व सेवेकऱ्यांवर राज्यकर्त्या इंग्रज-सरकारची हुकमत चालते, हें स्पष्ट दिसतें; परंतु प्रत्यक्षतः नित्य देखरेख करण्याचें काम, कलेक्टर साहेबांकडून होणें अशक्य असल्यामुळें, त्यांच्या तर्फे या सर्वांवर देखरेख करण्याचें काम, या देवाचे हक्कदार पुजारी श्रीचरमूर्तिस्वामी हेच पूर्वीपासून करीत आले असावेत असें वाटतें. आणि पुष्कळ सेवेकऱ्यांनींही निरनिराळ्या प्रसंगीं जाबजबाब देतेवेळीं तसें सांगितलेलें आहे. शिवाय दोन्ही देवांच्या पूजेच्या बाबी श्रीचरमूर्तिस्वामीकडेच असल्या कारणानें आणि पुजाऱ्याशिवाय या देवालयाच्या कोणत्याही कामांतील पानसुद्धां हालत नसल्यानें हेच स्थानिक व्यवस्थापक असावेत असें दिसतें. तथापि यांना कोणत्याही सेवकाला अजीबाद काढून टाकण्याचा अगर दंड शिक्षा वगैरे करण्याचा कोणताच अधिकार नसावा. फक्त वेळच्या वेळीं सेवेचें काम घेणें व प्रसंग विशेषीं सेवेकरितां बदली इसम घेऊन परगांवीं वगैरे जाण्यास परवानगी देण्याचा यांना हक्क असून, एकादा सेवेकरी फारच उद्धटपणानें वागूं लागल्यास त्याला ताकीद देणें अगर मे. कलेक्टरसाहेबांच्या मार्फत त्याला ताळ्यावर आणून बेताल वर्तन करूं न देण्याची व्यवस्था करण्याचा त्यांना अधिकार असावा. शिवाय दुसरी एक गंमत अशी आहे कीं, हे सर्व सेवक श्रीवीरभद्रदेवाचे सेवेसंबंधींच्या कामाचे म्यानेजर आहेत. ह्मणून त्यांनीं आपआपसांत परस्परांवर देखरेख करून देवस्थानची व्यवस्था सुरळीत चालवावी असाही एक हुकूम

मागें सांगितलेल्या सेवकांची खातीं स्वतंत्र होण्याच्या वेळीं मोघमपणानें होऊन गेलेला आहे. परंतु एकच प्रकारचें काम करीत असलेले सेवक आपआपला गिल्ला किंवा चुकारतट्टूपणा सरकारच्या कानापर्यंत नेतील अशी गोष्ट घडणें शक्य नसल्यामुळें, या सर्वांवर कोणा एकाचीच देखरेख असणें सार्वजनिक कार्याच्या दृष्टीनें इष्ट असल्यामुळें, हा देखरेखीचा स्थानिक अधिकार, त्यास सर्वतोपरी लायक असलेल्या निरपेक्ष अशा श्रीचरमूर्ति-स्वामीकडे दिला गेला असावा असें म्हणण्यास हरकत नाहीं. तथापि सेवकांच्या तक्रारीसंबंधानें मेहेरबान कलेक्टरसाहेबापर्यंत जाण्याचा प्रसंग अद्याप केव्हां आला नाहीं व येणें शक्य नाहीं. भक्तीनेंच जेथें सर्व व्यवहार अनादि कालापासून सलोख्यानें चालत आला आहे तो तसाच पुढें चालणार यांत संशय नाहीं. तेव्हां येथें शक्तीचा अगर कायद्याचा प्रश्न येऊं शकणार नाहीं.

सेवेकरी व त्यांजवरील स्थानिक व्यवस्थापक श्रीचरमूर्तिस्वामी यांच्या-मध्यें परस्पर सलोख्याचा क्रम येथें पूर्वापार चालत आलेला असतांना अलीकडे कांहीं वर्षांपूर्वीं येथील वहिवाटदारांनीं, श्रीचरमूर्तिस्वामी विशेष लक्ष घालत नसल्याचें पाहून बाकीचे सर्व सेवेकरी देवाच्या सेवेकारितां नसून आपल्याच लहरीकारितां आहेत अशी समजूत करून घेतली होती असें समजतें. त्यामुळें तेव्हां ते सेवकांना देवाच्या सेवेशिवाय स्वतःची सेवा करण्यास सुद्धां भाग पाडीत असें सांगतात. सेवेकऱ्यांचे खरे व्यवस्थापक श्रीचरमूर्तिस्वामी हे स्वस्थ असत. त्यांना सेवेकऱ्यांवर देखरेख करण्याचा हक्क असूनही त्याची कधीं बजावणी ते करीत नव्हते; परंतु ह्या वहिवाट-दारांस तसा कांहींच हक्क नसतांना ते स्वतःच्या घरच्या गणपती—उत्स-वास, गौरी व कृष्णाबाईच्या उत्सवास, तुलशीविवाहासही या सेवे-कऱ्यांना बोलावीत व मजूराप्रमाणें राबवून घेऊनही मोकळे सोडीत नसत. अगदीं अलीकडेसुद्धां.हल्लींचे श्रीचरमूर्तिस्वामी यांना पट्टाभिषेक झाल्यानंतर पुष्कळ वर्षें वहिवाटदारांच्या वरील नसत्या हक्काचें पिशाच्च

सेवेकऱ्यांच्या बोकांडीं बसलें होतें. यावेळीं एकाद्या सेवकांकडून नित्याच्या सेवेस दहा वीस मिनिटें उशीर झाल्यास अथवा सुगीच्या दिवसांत एकाद्या वेळीं सेवेस येतां न आल्यास, त्या सेवकास वाड्यांत बोलावून नेऊन त्याची कणीक चांगली मऊ केली जाई. त्या वेळीं त्यानें कितीही गयावयां केली तरी बिलकुल क्षमा मिळत नसे असें सांगतात. इतकेंच नव्हे, तर हा नसता हक्क बजाविणारे वहिवाटदार सेवकांच्या वतनी जमिनीवर-सुद्धां आपला हक्क सांगूं लागले होते. आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, या नसत्या हक्काची सरकारांत कोर्टामार्फत शाबिती करण्याकरितां सेवेकऱ्यां-पैकीं ज्या एका कलावंतिणीनें आपल्यास संतति नसल्यामुळें, देवाची नोकरी चालण्याकरितां व आपल्या संरक्षणाकरितां एका मुलीस दत्तक घेतले होतें, त्या रमासानी आई भवानीसानी कलावंत या नांवाच्या देवाच्या सेवक कळवंतिणीवर चिक्कोडी कोर्टांत चार वर्षांपूर्वी खालील मुद्यांचा दावा केला होता ते मुद्दे हे. १ दत्तक विधान-पूर्वक झाला नाहीं. २ सदरी नोकरी जमीन चालविण्याचा हक्क आपला आहे. या दोन-मुद्द्यांवर सदरी कोर्टानें असा निकाल दिला कीं, 'ह्या दोनही हक्कांस वहिवाट दाराचा कांहींच संबंध नाहीं.' असा निकाल मिळाल्या वेळेपासून, त्यांचें डोकें ताळ्यावर आलें! पूर्वी श्रीचरमूर्तिस्वामींना, वहिवाटदारांनीं सेवकांकडून करविलेली राबणूक पाहून वाईट वाटे; पण ते कांहीं इलाज करीत नसत अथवा करण्यासारखी परिस्थिति नव्हती; परंतु हल्लींच्या खटल्याच्या सुरवा-तीपासून सेवकांना आपले खरे व्यवस्थापक कोण व फुकटे कोण हें पूर्ण कळून आल्यामुळें व श्रीचरमूर्तिस्वामींनाहीं स्वावलंबनाचा मार्ग प्रशस्त वाटल्यामुळें, त्यांनीं सेवकांच्या मदतीनें वरील फुकट्या हक्कांचीं सेवकांच्या मानगुटीवर बसलेलीं भुतें हुसकून लावून सेवकांना निर्धास्त केलें. या कामगिरीबद्दल सर्व सेवेकऱ्यांनीं त्यांचे उपकार मानिले पाहिजेत.

या २५ सेवेकऱ्यांशिवाय उन्हाळ्यांत नदीपाणोठ्यावर पाणी घालून पाऊल-वाट तयार करण्याच्या विशेष कामगिरीकरितां येथील एका ब्राह्मण

घराण्यास साडे सात बिघे जमीन मिळाली आहे. व ही जमीन वहिवाट-दारांच्या पूर्वजांनीं सदरहू घराण्यास दिली आहे; हें मागें सांगितलें आहेच.

या एकंदर व्यवस्थेवरून पाहतां येथील ह्या विशाल व सुव्यवस्थित कार्य-क्रमाचा पक्का पाया बसविणाऱ्या सत्पुरुषानें किती दूरदृष्टि व धोरण ठेविलें होतें तें स्पष्ट दिसून येतें. अशा पुण्य-पुरुषाचे धन्यवाद गावे तितके थोडेच होत. अशा प्रकारची ही उत्तम व्यवस्था येथें कोणी केव्हां सुरू केली या-संबंधीं सविस्तर उहापोह पुढें उत्तरार्धांतील १ ल्या भागांत केला आहे तो पहावा.

या सेवेकऱ्यांच्या व्यवस्थेसंबंधीं प्रकरण वास्तविक पहिल्या भागांतील ' श्रीवीरभद्र देवालय ' या प्रकरणांत सेवेची व पुजेची व्यवस्था सांगि-तल्याबरोबर द्यावयास पाहिजे होतें; परंतु या प्रकरणांत अलीकडील कांहीं चिल्हर खटल्यांची व इतर किरकोळ विषयांची माहिती येणार अस ल्या कारणानें, भक्तिभावानें क्षेत्रांतील देवादिकांच्या दर्शनास आलेल्या भाविक सद्गृहस्थांचीं मनें व्यग्र होऊं नयेत. म्हणून क्षेत्रस्थ सर्व देवांचीं दर्शनें व तीर्थांचीं स्नानें आटपल्यानंतरच या खटल्याखोकल्याच्या वाळल्या उठाठेवीचें उगेंच थोडें दिग्दर्शन केलें आहे. असो.

आतां शांतमनःस्थितींत व्यग्रता उत्पन्न करणारें श्रीवीरभद्रदेवालयां-तील जमाखर्चाचें व हक्कादिकांच्या तंट्याचें संपूर्ण प्रकरण तूर्त बाजूस ठेवून, ज्या प्रख्यात क्षेत्राच्या दर्शनेच्छेनें आपण येथें आलों आहों, तें अत्यंत पवित्र क्षेत्र केव्हा व काय कारणानें उत्पन्न झालें हें जाणणें आपलें आद्य कर्तव्य होय. याकरितां या क्षेत्रांतील मुख्य देव जो श्रीविरभद्रदेव व इतर देवदेवता यांच्या उत्पत्तिकथांचें श्रवण आपणांस घडणें अवश्य आहे. तत्पूर्वीं श्रीवीरभद्रदेवाचा अवतार होण्यास त्रेतायुगांतील जो प्राचेतस दक्ष-प्रजापतीचा महायज्ञ कारणीभूत झाला; आणि ज्या महायज्ञानें ही पुण्यभूमि पवित्रतम पुण्यक्षेत्र बनलें आहे, त्या महायज्ञाचें महत्व काय आहे, हें सम-जून घेणें जरूरीचें आहे. म्हणून पुढील भागांतील स्कंद–पुराणांतर्गत दक्षयज्ञ–वर्णनाकडे आपण पूर्ण लक्ष पुरवूंया

———

श्रीविरूपाक्षलिंगाय नमः ।

# भाग तिसरा.

## दक्ष प्रजापति व त्याचे यज्ञ.

### [ १ ] दक्ष प्रजापतीचें श्रेष्ठत्व.

प्राचीनकाळीं देवतांना संतुष्ट करून इष्ट वर प्राप्ति करून घ्यावयाची असल्यास त्या त्या देवतांप्रीत्यर्थ निरनिराळ्या प्रकारचे यज्ञ करणें हा एक राजमार्ग ठरून गेला होता. हे यज्ञ अनेक प्रकारचे होते. ज्ञानयज्ञ, तपोयज्ञ इत्यादि अहिंसात्मक यज्ञांपासून तों अश्वमेधादि हिंसात्मक प्रकारांपर्यंत सर्वांचा यज्ञप्रकरणांत समावेश होत होता. प्राचीन ऋषींनीं वर्णिलेले आणखी कित्येक यज्ञप्रकार तर इतके किळसवाणे आहेत कीं, त्यांचें नुसतें वर्णन वाचतांनासुद्धां हल्लींच्या लोकांना कंटाळा यावा! मग प्रत्यक्ष पाहण्याची गोष्ट कशाला! उलट कित्येक प्रकारचे यज्ञ इतके उदात्त हेतूनें करावयाचे होते कीं, त्या प्रकारांनीं यज्ञ करणाऱ्यांची सर्वांगीण उन्नति होऊन तो नराचा नारायण बनावा! आमच्या पुराणग्रंथांतून ज्या ज्या यज्ञांची सविस्तर माहिती दिली आहे, त्या सर्वांचा विचार करितां, असें दिसून येतें कीं, यांपैकीं प्रत्येक यज्ञ कांहीं तरी उद्देश मनीं धरून त्याच्या पूर्ततेसाठीं केला आहे. कित्येकांनीं धर्मरक्षणाकरितां, तर कित्येकांनीं राज्यप्राप्तीकरितां, कित्येकांनीं पुत्रप्राप्तीकरितां, तर आणखी कित्येकांनीं कनक-कामिनीच्या लालसेनें यज्ञ केले आहेत. आणि या प्रत्येक यज्ञकर्त्यांचा संकल्प, यज्ञसमाप्तीच्या वेळीं, किंवा पुढें लवकरच सिद्धीस गेल्याचें वर्णन आढळून येतें. दक्षप्रजापतीनेंही याच राजमान्य यज्ञमार्गाचा

अंगिकार करून अनेक वेळां अनेक ठिकाणीं पुष्कळ प्रकारचे यज्ञ केले होते. आणि अनेक पुत्र व कन्यारत्नांचा लाभ करून घेतला होता. यांपैकीं ज्यांचा आपल्या कथाभागाशीं संबंध येतो अशा एक दोन यज्ञप्रसंगाचें वर्णन पुढें केलें आहे. शिवाय शेवटच्या ज्या पुत्रकामेष्टि ( पुत्र होण्याची इच्छा पूर्ण करणारा ) यज्ञांत दक्षप्रजापतीचा गर्वपरिहार झाला आणि ज्याकरितां भगवान् श्रीवीरभद्रदेवाचा अवतार झाला. त्या महायज्ञाची संपूर्ण माहिती पुढें यथाक्रम दिली आहे ती पहावी. तथापि या सर्व यज्ञांचें वर्णन वाचण्यापूर्वी आपणांस त्यांचा कर्ता जो महाबलवान् दक्षप्रजापति त्याची व त्याच्या श्रेष्ठत्वाची यथार्थ कल्पना असणें अत्यंत अगत्याचें असल्यानें, त्याची थोडी ओळख करून देणें जरूर आहे.

पूर्वकल्पांत विश्वकर्ता ब्रह्मदेव सृष्टि कशी उत्पन्न करावी याचा विचार करीत असतां, त्याच्यापासून प्रथम तमोरूपी मोह उत्पन्न झाला. हा पांच प्रकारचा होता. ब्रह्मदेवास ही सृष्टि निरुपयोगी आहे असें समजून येतांच, वाईट वाटलें व त्यानें दुसरी सृष्टि निर्माण केली त्यास सर्ग म्हणतात. या सर्गांचे नऊ प्रकार होते. तथापि ब्रह्मदेवाला समाधान न होतां, त्यानें आपल्या मनापासून आपल्यासारखे सामर्थ्यवान् असे पांच मानसपुत्र उत्पन्न केले. ते सनक, सनातन, सनंदन, सनत्कुमार व ऋभु हे होत. हे सर्वजण मोठे योगी होते. त्यांस इतर कोणत्याही गोष्टींची आवड नसून ते सर्वदा फक्त ईश्वराचें ध्यान करण्यांत गढून राहिले. त्यांनीं सृष्टि-उत्पन्न करण्याच्या कामीं मुळींच लक्ष घातलें नाहीं. ते मानसपुत्र अशा रीतीनें योगाभ्यासांत गढून गेल्यावर ब्रह्मदेवास खेद वाटला व त्यानें श्रीशंकराचें स्तवन करून 'मला सृष्टि उत्पन्न करण्याच्या कामीं आपण साह्य करावें ' अशी प्रार्थना केली. ही विनंति मान्य करून महादेवानें ' या पुढें तुझी सृष्टि निर्विघ्नपणें चालेल तरी आपल्या कामास लाग ' अशी आज्ञा केली. ही आशीर्वचनपूर्वक केलेली आज्ञा ऐकून ब्रह्मदेवास संतोष वाटला. व त्यानें पुढें आणखी प्रजा उत्पन्न केल्या. त्यांत

प्रथम मरीचि, भृगु, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, क्रतु, अत्रि, वसिष्ठ व नववा दक्षप्रजापति आणि दहावा नारद हे दहा मानसपुत्र मनापासून उत्पन्न केले. नारदाशिवाय हे सर्व पुढें गृहस्थश्रमी झाले व यांच्यापासूनच सर्व सृष्टीचा विस्तार झाला. यापूर्वीही ब्रह्मदेवानें श्रीशिवाच्या आज्ञेनें मनुष्यमात्र चराचर सृष्टि उत्पन्न केली होती; परंतु त्या सर्वांत एक न्यूनता अशी होती कीं, ही प्रजा स्त्रीजातिविरहित असल्यानें त्यांत परस्पर प्रजावृद्धि होण्याचें साधन नव्हतें. ब्रह्मदेवास स्त्रीजाति उत्पन्न करण्याचें सामर्थ्य येईना; ह्मणून त्यानें पुनः शक्तिसहित श्रीशंकराचें ध्यान करून श्रीशंकरपार्वतीस प्रसन्न केलें आणि पार्वतीदेवीस आपली अडचण सांगून स्त्रीजाति उत्पन्न करण्याचें सामर्थ्य देण्याविषयीं विनंति केली. तेव्हां पार्वतीदेवीनें भ्रूमध्यांतून आपल्यासारखीच अंगकांति असणारी एक शक्ति उत्पन्न केली. त्या शक्तीकडे पाहून देवाधिदेव श्रीशंकर हंसत म्हणाले ' अगे ' तू तपश्चर्या करून या ब्रह्मदेवाचें आराधन कर आणि त्याची जी इच्छा असेल ती पूर्ण कर ' ही त्यांची आज्ञा मान्य करून ती शक्ति ब्रह्मदेवाच्या इच्छेप्रमाणें त्यास स्त्रीजाति उत्पन्न करण्याचें सामर्थ्य देऊन आपण अंतर्धान पावली.

ह्याप्रमाणें श्रीशंकरपार्वतीपासून चिरकाल राहणारी शक्ति प्राप्त झाल्यावर ब्रह्मदेवानें संयोगापासून होणारी व परस्पर वृद्धिंगत होणारी सृष्टि निर्माण केली. त्यानें प्रथम आपल्या शरीराच्या दक्षिणांगापासून विराजास उत्पन्न केलें. तोच मूळचा स्वायंभुव पुरुष होय. त्यालाच स्वायंभुवमनु म्हणतात. नंतर आपल्या शरीराच्या वामांगापासून त्यानें शतरूपा नांवाची स्त्री उत्पन्न केली. तिला कोठें कोठें सरस्वती किंवा अनंती असेंही म्हटलेलें आहे. ती देवी शतरूपा अतिशय उग्र तपश्चर्या करून त्या स्वायंभुव मनूचीच पत्नी झाली. त्या स्वायंभुव मनूपासून शतरूपेला प्रियव्रत व उत्तानपाद असे दोन मुलगे झाले. हे दोघे पुत्र अत्यंत श्रेष्ठ होते. यांशिवाय शतरूपेला आकूती, देवहूती व प्रसूति या तीन मुली झाल्या. स्वायं-

भुव मनूनें आपली कन्या आकूती ही ऋभु नांवाच्या प्रजापतीस दिली व दुसरी देवहूती कर्दम प्रजापतीस आणि तिसरी प्रसूति[1] ही दक्षप्रजापतीस दिली. याप्रमाणें दक्षप्रजापति हा प्रत्यक्ष सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाचा मानसपुत्र असून त्याची स्त्री ही स्वायंभुव मनूची कन्या होती. अशा जगद्वंद्य परमेष्ठी दक्षप्रजापतीला गर्व कसा झाला व त्यामुळें त्याजवर कसें घोरतर संकट ओढवलें त्याचा अत्यंत चमत्कृतिपूर्ण अद्भुत वृत्तांत पुढें दिला आहे तो वाचकांनीं एकाग्र मनानें वाचावा.

## (२) दक्षप्रजापतीचें राज्यारोहण व त्यास गर्वाची बाधा

मागें सांगितल्याप्रमाणें महासमर्थ दक्षप्रजापतीचा प्रसूतीशीं विवाह झाल्यानंतर ब्रह्मदेवानें क्षिप्रागंगेच्या कांठीं बृहस्पतीपूर नगरामध्यें त्यास राजाधिराज केलें. तेथें आनंदानें कालक्रमण करीत असतां, पुत्रप्राप्त्यर्थ एकदां यज्ञ करावा असें त्याच्या मनांत आलें व लवकरच कुलगुरु दधीचिऋषीच्या अनुमतीनें त्यानें अग्नीची आराधना केली तेव्हां त्यास अनेक कन्या झाल्या त्यांत एकावन्न विख्यात होत्या. त्या सर्व कन्या वयांत आल्यावर त्यांचें स्वयंवर करून त्यांच्या त्यांच्या इच्छेप्रमाणें योग्य पतींशीं विवाह करून दिले. यांपैकीं तेरा मरीचिसुत कश्यप यास दिल्या. अदिति, दिति, दनुकाला दयानु, सिद्धकामुनि, नृपाळा, क्रोधा, प्राधा, वरिष्ठा, विमला, विनिता, कपिला, आणि कद्रु ह्या तेरा कश्यपाच्या स्त्रिया होत. यांपासून संपूर्ण सृष्टि जन्मली. म्हणून देव, दैत्य इत्यादि सर्वत्रांचा जन्म कश्यपापासूनच झाला आहे. अश्विनीपासून रेवतीपर्यंत सत्तावीस कन्या दक्षानें चंद्रास दिल्या. दहा कन्या धर्मास ( यमास ) धर्मवृद्धीकरितां दिल्या. आणि सर्वांत वडील व श्रेष्ठ अशी जी दाक्षायणी ( गौरी ) ती नारदादिकांनीं दक्षप्रजापतीस बोध करून तीन्ही देवांमध्यें श्रेष्ठ असा जगदात्मा, जो कैलासपति श्रीशंकर

---

१ प्रसूति ही स्वायंभुव मनूची कन्या नसून ती ब्रह्मदेवाच्या वामांगुष्ठीं जन्म पावली. व दक्षिणांगुष्ठीं उद्भव झालेल्या दक्षप्रजापतीशीं तिचा योग झाला. असेंही कांहीं ठिकाणीं लिहिलें आहे.

त्यास देण्यास सांगितलें. तेव्हां परमज्ञानी दक्षानें कैलासनायक श्रीशंकराला मोठ्या सन्मानानें बोलावून त्याची षोडशोपचारें पूजा करून आपली कन्या दाक्षायणी त्यास अर्पण केली व आपण कृतकृत्य झाला. यामुळें भोळा चक्रवर्ति श्रीसांब संतुष्ट झाला व त्यानें दक्षास 'चिरंजीव पद' दिलें व त्यास त्रैलोक्यराज्यही दिलें. त्यामुळें दक्षप्रजापतीचें वैभव अतोनात वाढलें. असें ऐश्वर्य प्राप्त झाल्यावर पुत्रप्राप्ति व्हावी अशी साहजिकच इच्छा झाली. म्हणून दक्षप्रजापतीनें पुष्कळ काळ तपश्चर्या केली; परंतु त्यापासून त्याची इच्छा पूर्ण झाली नाहीं. त्यामुळें त्यास असें वाटलें कीं, आपला आराध्य देव जो भगवान् नारायण तो यज्ञकर्मांचा भोक्ता असल्यानें यज्ञ करून त्यास प्रसन्न करून घ्यावा. यास्तव यज्ञ करण्याचा विचार ठरवून त्यानें तपश्चर्या रहित केली. व पुत्रकामेष्टि यज्ञ करण्याचा आपला विचार दधीचि ऋषींना कळवून त्यांजकडून त्याविषयीं सर्व व्यवस्था करविली.

परंतु त्या यज्ञाच्या पूर्वीं अशी गोष्ट घडली कीं, एके वेळीं सदाशिव दाक्षायणीसह भूतळीं पवित्र अशा नैमिषारण्यांत आले; तेव्हां त्यांना आदरानें नमस्कार करण्याकरितां आपल्या सर्व वैभवानिशीं सर्व देवांसह सुरपति आला. हें पाहून सर्व ऋषिसमुदाय, राजे लोक हेही आले. ब्रह्मदेवही अनेक ऋषिजनांसह आले. व हे सर्वही श्रीशंकरपार्वतींना नमस्कार करून अत्यानंद पावले. आणि सर्व देव व ऋषि निरनिराळ्या प्रकारांनीं श्रीशंकरपार्वतीचें स्तवन करूं लागले. अशा प्रकारें मोठा आनंदीआनंद चालला असतां, तेथें तो सोहळा पाहण्याकरितां दक्षप्रजापति आपल्या सर्व सेवकजनांसह मोठ्या वैभवानें आला. सर्व देव व ऋषीश्वर श्रीशंकरास प्रणाम करून अनेक स्तोत्रमंत्रांनीं स्तवन करीत असलेले पाहत असतांही, वेदवेत्त्या दक्षप्रजापतीनें तिकडे बिलकुल लक्ष दिलें नाहीं व श्रीशंकरास नुसता नमस्कारही केला नाहीं. त्यावेळीं त्यास मोहामुळें असा भ्रम झाला होता कीं, त्रैलोक्यांत मजहून श्रेष्ठ कोणी नाहीं. कारण इंद्रादि देव कश्यपासून अदितीच्या पोटीं जन्मलेले असल्यानें ते माझे

नातू असून माझ्या कृपेनेंच ते हें स्वर्गसुख भोगीत आहेत. दितीपासून जन्मलेले हिरण्याक्षादि महाबलाढ्य दैत्य व सर्व दानव राजे, हेही आपले नातू असून आपल्या कृपेनें ऐश्वर्य भोगीत आहेत. तसेंच कद्रूपासून झालेले शेषादिक सहस्रावधि सर्प अर्थात् सर्व पाताळ लोक आपल्याच कृपेनें सुख भोगीत आहे. मृत्यु-लोकींचे गरुड, अरुण इत्यादि सर्व बलाढ्य पक्षी-जाति दक्षकन्या विनता इत्यादिकांपासून झालेल्या असल्यानें त्याही आपल्याच कृपेनें सुखांत आहेत. अशा प्रकारें सर्व त्रिभुवन माझ्या कन्यापुत्रांनीं (पौत्रांनीं) व्यापिलें असून ते सर्व माझ्यामुळें अति सौख्य भोगीत आहेत., हा श्रीशंकरही माझा जामात आहे. तेव्हां मजहून त्रैलोक्यांत श्रेष्ठ कोणी नाहीं, असें त्याच्या मनांत आलें व त्यास अत्यंत गर्व झाला. शिवाय लक्ष्मीचा हा स्वभाव आहे कीं, तिचा वरदहस्त ज्याच्यावर असेल त्यास गर्वाची बाधा न झाली तरच आश्चर्य! या नियमाला दक्षप्रजापति तरी कसा अपवाद ठरेल? या संपत्तिमदानें तो मदोन्मत्त होऊन वाटेल तसें वेदबाह्य आचरण करीत होता. त्यामुळें त्यास या प्रसंगीं श्रीशंकराला नमस्कार करण्याचेंसुद्धां भान राहिलें नाहीं. उलट श्रीशंकर-पार्वती या दोघांनीं आपणास यथोचित मान दिला नाहीं, असें तो म्हणूं लागला. व श्रीशिवाची निंदा करूं लागला. अथवा यांत आश्चर्य कसलें ? त्याचें पूर्वकर्म प्रबळ झालें व कालात्मा सर्वेश्वर अंतरीं कोपला. त्यामुळें दक्ष हा परम ज्ञाता असूनही या प्रसंगीं त्यास अहंकार चढला व या अहंकारानेंच त्याचा ऐश्वर्यमद वाढला, बुद्धिभ्रंश झाला, अंगीं दोष वाढून तो मृत्युभय विसरला; आणि परनिंदा करण्यास प्रवृत्त झाला. वास्तविक परनिंदेसारखें महत्पाप नाहीं. परनिंदेनें आपलें पवित्र मन भ्रष्ट होतें; व सर्व शरीर दोषयुक्त होऊन काळास वश होतें. यास्तव सत्पुरुषाचें मुख्य लक्षण हेंच कीं, ते प्राण गेला तरी परदोषांचा उच्चार करावयाचे नाहींत. तेव्हां परदोषांचा एकही शब्द आपल्या तोंडांतून कधीं निघूं नये; परंतु तेथें तर सर्व विपरीतच प्रकार झाला. कारण मदोन्मत्त झालेला दक्षप्रजापति

हें सत्यवचन झुगारून देऊन निर्दोष व सर्वमंगल अशा परमकारुणिक श्रीशंकराची निंदा करण्यास कचरला नाहीं. अर्थात् त्याचें फळ विनाश हेंच होय असें सर्व देव व ऋषीश्वर म्हणूं लागले. तिकडे तिळमात्र लक्ष न देतां दक्ष म्हणतो. 'अहाहा! काय हा ईश्वराचा अवतार? नेहमीं भूत पिशाच्चांचा मेळा सभोवतीं बाळगून भणंगभिकाऱ्याप्रमाणें रानोमाळ भटकणारा व स्मशानामध्यें विश्रांति घेणारा आणि नरकपाल हातीं घेऊन दारोदार भीक मागणारा, दिगंबर, दरिद्री हा देव कसला? हा वेदबाह्य, वर्णहीन व अतिनिंद्य असून अशाला तुम्ही नमस्कार करितां; तेव्हां धिःकार असो तुम्हाला!' हें शिवनिंदेचें धिःकारयुक्त भाषण ऐकून परम साधु नंदीस कोप आला व तो दक्षास म्हणाला. 'अरे अधमा दक्षा, तूं माझा स्वामी जो समर्थ श्रीशंकर त्याला यज्ञबाह्य, वेदबाह्य कसा म्हणतोस हेंच अद्भुत वाटतें! अरे, ज्याचे स्मरणमात्रेंच सर्व यज्ञ पूर्ण होतात व त्यांतील न्यूनता निःशेष निघून जाते, असा यज्ञकर्ता, यज्ञभोक्ता, यज्ञरूप परमात्मा श्रीसदाशिव यज्ञबाह्य कसा? शिवाय ज्याच्या नुसत्या नामस्मरणानें असंख्य पापजिनांचा उद्धार होतो. व ते साक्षात् शिवरूप होऊन जातात. तो निंद्य कसा? अरे, शिवनामानें कोट्यानुकोटि प्राणी, (पशुपक्षी, मृग, सिंह, व्याघ्र, कृमिकीटकादि सर्व जीव) तरून जातात. श्रीविष्णु अहर्निश श्रीसदाशिवाचें ध्यान करितो. व सहस्र कमळानें पूजा करितो म्हणून प्रसन्न होऊन परमेश्वरानें त्यास 'सुदर्शन' चक्र दिलें. असें असतां, अमर्यादपणें तूं ईश्वरनिंदा करितोस. जो ईश्वरनामाची निंदा करितो तो ब्राह्मणाधम चांडाळ होय;' हें ऐकून दक्षासही अति त्वेष आला व तो पुनः श्रीशिवाची व शिवगणांची निंदा करूं लागला. परंतु इतक्यांत श्रीशंकर मधुरवाणीनें नंदीस म्हणाले, हे नंदि, इतका राग सर्वथा उपयोगी नाहीं. सहनशीलता अंगीं असली पाहिजे. एकाद्याचें न्यूनाधिक आम्ही सहन केलें पाहिजे करितां स्वस्थ असावें.' हा उपदेश ऐकून नंदी स्वस्थ राहिला. सर्व देवांसही आनंद झाला. व ते श्रीशं-

करास नमन करून आनंदानें आपापल्या स्थानीं निघून गेले. दक्षराजाही आपल्या लोकांसह स्वस्थानीं चालता झाला; परंतु या प्रकारासंबंधीं त्याच्या मनास चटका लागून राहिला. व श्रीशिवानें आपला मोठा अपमान केला असें तो समजूं लागला; आणि त्याचा एकाद्या प्रसंगीं चांगला पाण-उतारा करावा असें त्यानें मनाशीं ठरविलें. त्याचा परिणाम काय झाला तें पुढें सांगितलें आहे.

## (३). दक्षप्रजापतीचा प्रथम पुत्रेष्टि (यज्ञ.)

दक्षप्रजापतीस अनेक कन्या झाल्याचें व त्यांचे स्वयंवर करून दिल्याचें मागें सांगितलें आहे. त्या सर्व कन्या पतिगृहीं निघून गेल्यानंतर दक्ष-राजास आपलें गृह पुनः शून्य भासूं लागलें. त्यामुळें पुत्रप्राप्तीची इच्छा त्र्ळावली. कारण कन्या ह्या केव्हांही परक्यांच्या घरीं जाणाऱ्या असल्यानें अर्थात् परधन असल्यानें, त्या हजारों असल्या तरी त्या पतींच्या घरीं जातांच आपलें घर शून्यवत् होणार ! यास्तव पुत्रसंततीशिवाय संसार व्यर्थ होय. असा विचार करून, पुढें कांहीं दिवसांनीं दक्षराजानें कुलगुरूच्या आज्ञेनें पुत्रप्राप्तीकरितां पुत्रेष्टि करण्याचें ठरविलें. व लागलीच सर्व सिद्धता करून यज्ञास प्रारंभही केला.

या यज्ञसमारंभाकरितां नैमिषारण्यांत क्षिप्रागंगेच्या कांठीं एक मोठा विस्तीर्ण मंडप घातला होता. यज्ञास येण्याविषयीं ब्रह्मा, विष्णु, महेश व इंद्रादिक सर्व देव महान् ऋषि, गंधर्व, सर्व दानव, नागलोक, मोठ मोठे राजे इत्यादि सर्वांस आमंत्रणें गेलीं होतीं. त्या आमंत्रणाप्रमाणें सर्वजण जमा झाले. श्रीशंकरासह दक्षप्रजापतीचे सर्व जामातही आले. या सर्व महाश्रेष्ठांच्या आगमनानें तो सभामंडप फुलून गेला. व अत्यंत शोभा दिसूं लागली. सभा भरल्यावर, मुख्यस्थानीं साहजिक श्रीशंकर बसले होते; व सर्व देव, दानव, ऋषि, वगैरे आपापल्या जागीं स्थिर झाल्या-नंतर अप्सरांनीं नृत्य गायन सुरूं केलें. त्या यज्ञाचें आचार्यत्व ब्रह्मदेवानें स्वीकारिलें होतें. सर्व सिद्धता झाल्यानंतर अग्नि प्रदीप्त करून ऋषींनें

हवनास प्रारंभ केला. अंगिरा, वसिष्ठ, मरीचि, भार्गव हे ऋषि अवदानें देत होते. होमाच्या ज्वाळा ध्रुवमंडळास जणूं भिडल्या होत्या; व 'स्वाहा' शब्दानें आकाश दुमदुमून गेलें होतें. या यज्ञांत यज्ञदीक्षा अत्रिऋषींनें घेतली असून, खुद्द दक्षप्रजापतीनें दानधर्म करण्याचें काम आपल्याकडे घेतलें होतें.

अशा अपूर्व थाटानें यज्ञसभारंभ चालला असतां, प्रारंभीं सर्व पाहुण्यांच्या स्वागतार्थ दक्षप्रजापति स्वतः एकदां मंडपांत सर्वत्र फिरून जाण्यास्तव सभास्थानीं आला. तों मुख्य व पूज्य सिंहासनावर स्वतःचें अधिदैवत जो श्रीविष्णु त्याची स्थापना झाली नसून तेथें श्रीशंकर अधिष्ठित झालेले पाहतांच त्यास अत्यंत राग आला. शिवाय त्याचे इतर सर्व जामात आपापल्या स्त्रियांसह वस्त्रालंकारांनीं विभूषित होऊन आलेले असून श्रीशंकर हे नेहमींच्या वेषानेंच आले होते. व त्यांच्याजवळ श्रीभवानीदेवीही तेथें त्यास दिसली नाहीं. या सर्व कारणानें तर त्यास अत्यंत कोप येणें साहजिक होतें; आणि मागील एका प्रकरणीं लिहिल्याप्रमाणें त्या प्रसंगीं अपमान झाल्याचें शल्य त्याच्या मनास बोंचत होतें. या सर्व मनःसंतापदायक गोष्टींच्या समुच्चयानें दक्षपजापति क्रोधभरानें अगदीं बेभान झाला. त्यामुळें मागचा पुढचा विचार न करितां त्यानें श्रीशंकरावर तोंड सोडिलें. तो म्हणालाः—' माझे इतर सर्व जांवई व सर्व आमंत्रित श्रेष्ठ देव वगैरे आपापल्या परिवारासह ऐश्वर्यानें येथें आले आहेत; परंतु हा भणंग भिकारी शंकर पहा कसा विचित्र वेषानें आला आहे. आणि या उच्चासनावर बसण्यास सर्वतोपरी योग्य असे अनेक देव येथें आले असतांना, हा निर्लज्जपणें येथें बसला आहे. माझ्या त्या सुंदर कन्येच्या कपाळीं हाच कोठून पडला कोण जाणे ! जटा वाढवून स्मशानांत सर्व काळ राहणाऱ्या या पिशाच्चाचें ध्यान तरी किती विचित्र पहा ! जगतीतलावरील बहुतेक प्राण्यांस डोळे दोन आणि ह्याला पहावें तों डोळे तीन ! याला लोक शंभु, महेश, ईश्वर असें ह्मणतात; पण ह्याचा देश कोणता, गांव कोणतें, गुरु

कोण ? अधिकार किती याचा मुळींच पत्ता लागत नाहीं. याला यज्ञाचा भाग मुळींच देऊं नका. हा धड संन्यासी नाहीं कीं धड दिगंबर नाहीं. याला विरक्त म्हणावा, तर मदनाची पीडा होते. सुंदर म्हणावा तर याला तोंडें पांच. प्रलयकाळीं तर हा त्रिभुवनाचा शत्रु. याला क्षत्रिय म्हणावा तर हातात विशेष शस्त्रें नाहींत. शिवाय हा शूरांप्रमाणें घोड्यावर बसावयाचें सोडून शेंदाडासारखा बैलावर बसून हिंडत असतो! याला ब्राह्मण म्हणावा तर वेदाध्ययन नसून हा अगदीं वेदबाह्य आहे. बरें हा शूद्र म्हणावा तर सर्पाचें जानवें गळ्यांत अडकविलें आहे. अंगास सुवासिक चंदनाची उटी लावावयाचें सोडून हा राख (चिताभस्म) फांसून घेतो! याला धोत्र्याच्या पानाफुलांची अत्यंत आवड, काय पण सुवासिक पुष्पं वेंचून काढिलीं आहेत! हा गृहस्थ म्हणावा तर स्मशानांत राहतो, आणि ब्रह्मचारी म्हणावा तर लग्न झालें आहे. याच्या ठावठिकाणांचा व आई-बापाचा तर पत्ताच नाहीं. यानें सर्व देवदैत्यांनीं झिडकारून टाकिलेलें हालाहल विष पिऊन उगाच गळा मात्र निळा करून घेतला आहे. हा दिसण्यांत पहा कसा अगदीं भुतासारखा दिसतो व भुतांप्रमाणेंच वस्त्रां-ऐवजीं वाघाचें व हत्तीचें कातडें पांघरतो. आणि नररुंडमाला गळ्यांत घालितो. याच्या अंगावरच्या या शंख, शिंपा, रुद्राक्षांच्या माळा हे अलंकार तरी किती मूल्यवान् म्हणून सांगावे! याला नांवें देखील सुकाळां-चींच आहेत. असा हा अत्यंत अमंगल अपवित्र असतां त्रैलोक्य उगीच याच्या नादाला लागलें आहे. या भिकारड्याला येथें येण्यासाठीं कोणीं बोलाविलें आहे? व येथें उच्चासनावर बसण्यास कोणी सांगितलें? अशा निर्लज्जाला ऋषि, व इंद्रादिक देव हे व्यर्थ आपला स्वामी म्हणत असतात. हा कोणत्या गुणांमुळें सर्वश्रेष्ठ समजावा? हा गर्वानें अतिशय फुगून निला-जऱ्यासारखा वर मान करून या सर्वश्रेष्ठ सिंहासनावर बसला आहे. इतक्या बोलण्यानें तरी याला कांहीं लाज वाटते काय पहा. ‘संगतिसंग-दोषेण’ या न्यायानें याच्या सहवासानें हा चंद्रदेखील निलाजरा बनला

आहे. ह्याला बायका सत्तावीस यानें आमच्यासारख्या वडीलधाऱ्या मंडळीचीच नव्हे; तर प्रत्यक्ष विद्यादाता जो सर्वश्रेष्ठ गुरु, त्याचीसुद्धां भीड मर्यादा मुळींच ठेविली नाहीं! अशा या लफंग्या चंद्राला या भिकाऱ्या शिवानें आपल्या डोक्यावर चढवून ठेविलें आहे! या चंद्रानें आपली सुंदर पतिव्रता स्त्री कृत्तिकेचा अव्हेर करून रोहिणीवर प्रेम ठेविलें; यामुळें मी त्यास शाप देऊन कलंक लाविला आहे! याचप्रमाणें मी ह्या शंकराची दशा करून सर्व देवांमध्यें याची चांगली मानखंडना करीन. तोंपर्यंत माझा भडकलेला क्रोध शांत होणार नाहीं.'

याप्रमाणें त्या यज्ञमंडपांतील भर सभेंत जसें मन मानेल तशीं दुर्वचनें बोलून त्या दुष्ट दक्षानें श्रीशंकराची फारच विटंबना केली. श्रीशिवाचा असा अपमान झालेला पाहून नंदीस अतिशय राग आला. तो दक्षाचा धिःकार करून त्वेषानें म्हणाला. 'अरे क्षुद्रा दक्षा, तूं थोरपणाची आढ्यता धरून गर्वानें फुगून गेला आहेस. तुला ऐश्वर्यमदानें ही जी धुंदी चढली आहे व तूं अति निंद्य वर्तणूक केली आहेस त्यामुळें तुझा विनाशकाळ जवळ आला आहे खास. अरे ब्राह्मणाधमा दक्षा, श्रीशंकराचा भाग वगळून तुझा यज्ञ सफल होईल काय? याचा भाग न देतां यज्ञफलाची आशा करणारा असा प्रबळ पुरुष या त्रैलोक्यांत मला कोणी दिसत नाहीं. श्रीशंकरास यज्ञभाग न देतां ज्या ज्या देवांस आहुति दिल्या त्या प्रत्येकाची ती आहुति परत ओकवीन अशी धमक माझ्यामध्यें आहे. तूं व्यर्थ फुशारकी मारूं नको. शिवाय तूं श्रीशिवापेक्षां विष्णु श्रेष्ठ असें मानून हरिहरांमध्यें भेद करीत आहेस, यामुळें तुला अत्यंत पाप लागेल. अमर्यादपणें तूं ईश्वराची निंदा करीत आहेस, तस्मात् तूं मूर्ख, अधम, दुराचारी आहेस. श्रीशंकराचा महिमा व वर्म नकळतां तूं भलभलतेंच बडबडत आहेस, म्हणून तूं चांडाळ ब्राह्मणाधम आहेस.' नंदीचें हें मर्मभेदक भाषण ऐकून दक्षप्रजापति अत्यंत संतप्त झाला. आणि क्रोधभरांत म्हणाला 'अरे, तृणचरा, तुम्ही सर्व शिवगणही त्याच्याप्रमाणेंच वेदबाह्य, अति नीच, जातिहीन,

वर्णहीन, अमंगळ, असत्यवादी, परनिंदक, पाखंडी, निष्ठुर व ऋषीजनांची निंदा करणारे अधमाधम आहांत. तुम्ही सर्व कपाळीं भोजन करणारे व अपेयपान करणारे राक्षस आहांत. तुम्ही सर्व गण काळमुखी, अधम, महापापी, व अनेकप्रकारें अवलक्षणी बनाल असा तुम्हां सर्वांस माझा शाप आहे.' हें शापवचन ऐकून नंदी भयंकर संतापला. दक्षानें दिलेला शाप अंगिकारून त्याचें श्रीशंकरनामस्मरणानें निरसन केलें; व नंतर क्रुद्ध स्वरानें तो दक्षप्रजापति व तत्पक्षीय सर्व शिवनिंदा उत्सुकतेनें ऐकणाऱ्या ऋषिजनांस शापवाणी वदला ती अशीः— 'अरे नीचा दक्षा, आणि अधम ऋषीगणहो, तुम्ही अवघे माझा शाप घ्या. दक्षप्रजापति हा अति अधम होईल. त्याचप्रमाणें तुम्ही सर्व पापी, हीन-जन्म, अधम होऊन नरकीं जाल. तुम्ही पतित, उन्मत्त, वेदवादी होऊन त्यायोगें अगदीं दरिद्री बनाल. दारिद्र्यदुःखानें पाप करून पुनः कंगाल स्थितींत जन्म पावाल व अत्यंत दुःख भोगाल. तुमचे कुळीं जे ब्राह्मण होतील तेही वेदवादेंकरून अति दरिद्री होतील. त्या दारिद्र्यानें दुःख होईल, पुण्याचा क्षय होईल, वंशाचा नायनाट होईल. तुम्ही अति निंद्यकर्म आचराल. अधम, निंद्य, पातकी अश्रद्धावान् लोकांस शुद्ध ज्ञानाचा विक्रय कराल; व अनीतिमूलक द्रव्य घेऊन त्यानें कुटुंबपोषण कराल. खरें ब्रह्मकर्म बाजूस ठेवून नीचकर्म हर्षानें कराल. त्यायोगें नरकाचे धनी व्हाल. तसेंच तुम्ही विषयासक्त होऊन अज्ञानमोहानें गुरफटून जाल. तुमच्या कुळांत वेदशास्त्राचा गौरव न होतां त्याची निंदा सुरू होईल. त्यामुळें अनेक ब्रह्मराक्षस जन्म घेतील!' हें नंदीचें शापवचन ऐकून दक्षप्रजापति अत्यंत क्रोधायमान् झाला व त्यास दारुण दुःख झालें. हें पाहून त्याचा तामसी भाऊ भृगु यास क्रोध आला, तेव्हां संतापानें तो नंदीस म्हणाला, 'हे मूर्ख पशो, दक्षराजास व सर्व ऋषिवर्गास तूं निष्कारण शाप देतोस काय? अरे, माझ्या तडाख्यांतून तुम्हां शिवगणांस पळतां भुई थोडी होईल. हा याग बंद करण्याचें व हविर्भाग परत घेण्याचें तुमच्या अंगीं सामर्थ्य आहे काय पाहूं दे. आणि ज्याअर्थी तूं दक्षासारख्या महात्म्यास

व्यर्थ शाप देण्यास प्रवृत्त झालास, त्याअर्थीं मीही तुला शाप देतों कीं, 'तूं गवत खाऊन भारभूत होऊन पृथ्वीतलावर भार वाहत फिरशील.' भृगूचें हें शापवचन ऐकून नंदी खवळून उठला. त्याला पाहून शैलादि शिवगण चिडून तेही क्रुद्ध झाले. व सर्वांनीं म्हटलें कीं, 'श्रीशंकराची निंदा व अपमान करून आणि शिवगणांस शाप देऊन तुम्ही आमचें शत्रुत्व संपादिलें आहे. व स्वतःस हृद्रोग लावून घेतला आहे हें पक्कें समजा. या यज्ञांतून श्रीशिवाचा भाग वगळल्यानें या नीच दक्षासह तुमची जी भयंकर अवस्था होईल तीपासून तुम्हांस सोडविणारा कोण समर्थ आहे पाहूं? या अयोग्य कृतीचा शेवट खास असाच होईल कीं, दक्षप्रजापतीसह तुम्हां सर्वांचा शिरच्छेद होऊन तुमच्या रक्तमांसानें पुढें लवकरच यज्ञाची पूर्णाहुति होईल!' नंदिकेश्वरादि शिवगणांचीं व भृगु आदि करून ऋषीश्वरांचीं हीं परस्पर शापयुक्त भाषणें ऐकून आतांपर्यंत मौन धरून बसलेल्या श्रीशंकरानें नंदीस बोलावून म्हटलें, 'हे नंदि, तुम्ही सर्वांनीं मोठ्या क्रोधानें द्विजांना शाप दिलात; परंतु द्विज हे सर्वांस पूज्य व अग्रगण्य आहेत, त्यांना उतावीळपणानें असा शाप देणें योग्य नव्हे. कारण द्विजापाशीं मनोहर सूक्तें, वेदमंत्र व मंत्रदेवता असून त्यांहींकरून परमात्मा संतुष्ट होतो. सूक्तांनींच मनुष्य ज्ञानी होतो व त्यास ईश्वराची ओळख पटून चैतन्यमय आत्म्याचें दर्शन घडतें. मी ईश्वर सर्वव्यापी आहे. माझ्या सर्वव्यापित्वाची साक्ष, या सूक्तांमुळें प्राणप्रतिष्ठेनें मूर्तिद्वारां माझ्या भक्तांच्या अनुभवास येतें म्हणून लिंगदेवतेची शुद्धि व तत्त्वदर्शन होण्यास वेदमंत्र मुख्य होत. या मंत्रांनीं द्विज पूज्य होय. मी यज्ञाचा भोक्ता असून यज्ञामध्यें खरोखर मीच असतों हें जो जाणत नाहीं तो मूर्ख होय. जे मला ओळखून अहर्निश कर्में करितात, ते वेदमार्गानें मजपाशीं येतात. व मायामोहांतून तरून जातात. मला न जाणतां प्रपंचांत दृढ प्रेम धरून असतात ते

१–मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ।
अभक्ता ये महाबाहो मम श्रद्धाविवर्जिताः ॥(शिवगी. अ १४-३८).

असाधु वेदबाह्य होत. त्या असाधूंचें मुख्य लक्षण माझी निंदा व मजशीं मत्सर करणें हेंच होय. मोहानें ग्रासल्यामुळें हे माझी निंदा करितात; परंतु यांना हें समजत नाहीं कीं, माझी निंदा म्हणजे ती वेदांचीच निंदा होय. कारण चारी वेद हे माझीच स्वरूपें होत. पण यावर तूं कदाचित् असें म्हणशील कीं, प्रत्यक्ष परब्रह्म जे आपण त्या आपली निंदा करितात तर हे ब्राम्हण कसले ? परंतु हे नंदि पूर्वजन्मीच्या वाईट कर्मसंचयामुळें ब्रह्मपद व ब्राह्मणत्व यापासून अधःपात करणारी एकादी वृत्ति उत्पन्न होते व तीमुळें असा प्रमाद घडतो; तर अशावेळीं त्यांचें अधःपतन होऊं न देतां त्यांचें मोहपटल दूर करून त्यांना सन्मार्गगामी करणें हें माझें कर्तव्य आहे. म्हणून हे नंदि, आपण कोणास निष्ठुर बोलूं नये व द्विजांचा अपकार सहन करावा. द्विजरक्षणाकरितांच आम्हा हरिहरांस अवतार घेऊन वारंवार पृथ्वीवर यावें लागतें; म्हणून जे ब्रह्ममूर्ति ब्राह्मण ब्रह्मस्वरूप ओळखून असतात, त्यांच्या सात्विक गुणांचा जगांत विस्तार होण्याकारितां त्यांचें रक्षण केलें पाहिजे; म्हणून कामक्रोधादि षड्विकार टाकून ज्यांना शुद्ध ज्ञान झालें आहे ते ब्राह्मण मला सर्वदा प्रिय आहेत. त्यांजवर क्षोभ करूं नये, त्यांचें न्यून आम्ही सहन करावें.' असा नंदीला श्रीशंकरांनीं बोध करून त्यास शांत केलें.

इतकें होत आहे तोंच यज्ञसमाप्ति होऊन सर्व देवांनीं दक्षास आशीर्वाद दिला कीं, ' तुला शंभर पुत्र होतील तथापि श्रीशंकराचा तूं अपमान करून त्याला यज्ञभाग अर्पण केला नाहींस. ही निंद्य गोष्ट त्वां जाणून बुजून केली; तस्मात् इतके पुत्र झाले तथापि त्यांच्यापासून तुला मुळींच सुख होणार नाहीं. व ते तुझ्याजवळ राहणारही नाहींत. ' हें ऐकून दक्षराजास फार वाईट वाटलें. शेवटीं सभा विसर्जन होऊन यज्ञाक-

---

१ ऋग्वेदोहं यजुर्वेदः सामवेदोऽहमात्मभूः
अथर्वणश्च मंत्रोऽहं तथाचाङ्गिरसो वरः ॥
( शिवगी. अ. ६-१७ )

रितां जमलेली मंडळी आपापल्या स्थानीं निघून गेली. श्रीशंकरही वृष-भारूढ होऊन आपल्या गणांसह कैलासास निघून गेले.

देवांच्या वरप्रभावानें लवकरच दक्षराजास शंभर पुत्र झाले. तेव्हां त्यास परमानंद होऊन त्यानें महोत्सव केला; ते मुलगे मोठे झाल्यावर पुढें एके वेळीं नारदमुनि दक्षास भेटावयास आला. त्यावेळीं त्याचा आदरसत्कार करून त्याची त्यानें पूजा केली. नंतर ते सर्व पुत्र आणून त्यास दाखविले आणि त्यांना मंत्रोपदेश करण्याविषयीं दक्षराजानें नारदास विनंति केली. ती विनंति मान्य करून नारदानें त्या सर्वांस मंत्रोपदेश दिला व स्वारी निघून गेली. हा मंत्रोपदेश सर्वसंगपरित्यागाचा अर्थात् संन्यासाचा असल्यामुळें, याचा परिणाम असा झाला कीं, नारद निघून गेल्यानंतर थोड्या दिवसांत ते सर्व दक्षपुत्र राज्यवैभवाचा व राजधानीचाही त्याग करून अनुष्ठान करण्यासाठीं ब्रह्मारण्यांत निघून गेले ! नारदाच्या या विचित्र उपदेशानें सर्व पुत्रांचें मन संसारांतून उठून योगमार्गीं निमग्न होऊन ते सगळे नगरांतून निघून गेल्याचें पाहून दक्षराजास फार वाईट वाटलें; व शिवगणांनीं दिलेल्या शापाचें स्मरण होऊन पुढें आपली अवस्था कशी होईल असें किंचित्काळ त्यास भय वाटलें. परंतु पुढें लवकरच त्या गोष्टीचा त्यास विसर पडला. तथापि इतके पुत्र होऊनही आपणास त्यांपासून पुत्रसुख मुळींच न मिळतां व्यर्थ झालें, हें मनांत येऊन त्याची चित्तवृत्ति उदास झाली. दक्षराजा अशा उदास मनःस्थितींत असतां एके प्रसंगीं नारदाची स्वारी बृहस्पति-पुरास पुनः आली तेव्हां दक्षराजा त्यास म्हणाला. ' तूं मोठा कपटी आहेस; माझे सर्व पुत्र तुझ्या उपदेशानें संसारास व राज्यास मुकून संन्यासी बनले. विश्वासानें योग्य उपदेश करण्यासाठीं तुजकडे पाठविलेल्या पुत्रांस असा भलताच उपदेश करून तूं माझा घात केलास, तस्मात् ' तूंही माझ्या पुत्रांप्रमाणेंच संन्यासी होशील; व त्रैलोक्यांत भ्रमण करीत राहशील. '

१ काशीखंड अध्याय ६७ ते ७०.

असा तुला माझा शाप आहे.' हें कठोर भाषण व शापवाणी ऐकून नारदासही अति त्वेष आला. तो उलट दक्षास म्हणाला. 'त्या तुझ्या सर्व पुत्रांस उत्तमगति प्राप्त होण्यास्तव मी त्यांस योगमार्गाचा बोध करून संन्यासदीक्षा दिली. माझ्या उपदेशानें त्यांना दिव्य ज्ञान प्राप्त होऊन ते सर्व ब्रह्मपदीं लीन झाले व त्यांचें शाश्वत कल्याण झालें. यांत कांहींच वावगें नसतां, त्वां मला विनाकारण शाप दिला. म्हणून मीहि तुला असा शाप देतों कीं, 'तुझी सर्व सत्ता नष्ट होऊन तूं प्रेतरूप पावशील. अरे मूढा दक्षा तुझा विनाशकाल जवळ आला असल्यानें तुझी बुद्धि भ्रष्ट झाली आहे म्हणून तूं असें भलभलतें बडबडत आहेस.' याप्रमाणें दक्षराजाचा धिःकार करून नारदाची स्वारी संचारार्थ निघून गेली.

## (४) महायज्ञ करण्याचा विचार व स्थलनिर्णय.

मागें सांगितलेल्या गोष्टी घडून जाऊन पुष्कळ काळ लोटल्यानंतर दक्षप्रजापतीला त्यांचें बरेंच विस्मरण पडलें व त्याविषयीं मनास लागलेला चटकाही कमी झाला. व त्यानें पूर्वींप्रमाणें अनेक प्रकारचे लहान मोठे यज्ञ करून देवतांना अत्यंत संतुष्ट केलें; परंतु अद्यापही पुत्रसुखाची त्याची लालसा तृप्त झाली नसल्यानें व श्रीशंकरावरचा क्रोध कमी झाला नसल्यामुळें त्याच्या मनास कांहीं केल्या शांति प्राप्त होईना. पुष्कळ वेळां त्यास असें वाटे कीं, माझ्यासारखा दानशूर राजा त्रैलोक्यांत सांप्रत एकही नाहीं. सर्व लोकांत माझ्याप्रमाणें बलाढ्य असाही कोणी नाहीं असें असतांना मी ज्या ज्या वेळीं एकाद्या यज्ञास आरंभ करितों तेव्हां सर्व देवांस संतुष्ट करितों; परंतु त्या भस्मधारी स्मशानवासी शंकरास बोलाविलें कीं त्यांत विघ्न रोकडें ठेविलेलेंच! असें कां व्हावें? अशा प्रकारचे अनेक विचार महाप्रतापी दक्षराजाच्या मनात घोळूं लागले. शेवटीं त्याच्या मनाचा असा निश्चय ठरला कीं, आणखी एकदां पुत्रप्राप्तीकरितां एक मोठी पुत्रेष्टि करावी; परंतु त्या यज्ञाला विघ्नसंतोषी सदाशिवाला मुळींच बोलावूं नये. अशानें त्याचा अनायासें पाणउतारा होऊन आपला यज्ञ

निर्विघ्नपणें पार पडेल. हा विचार मनांत येतांच दक्षराजानें आपला कुलगुरु जो दधीचि ऋषि त्यास बोलावून आणून त्यास आपला हेतु कळविला; तेव्हां पुत्रप्राप्तीस्तव पुन्हा एकदां मोठा यज्ञ करण्याचा हेतु स्तुत्य असून तो लवकरच करावा. असा दधीचि ऋषीचा अभिप्राय पडला. तेव्हां दक्षराजास अत्यानंद होऊन तो त्या उद्योगास लागला. हाच दक्षप्रजापतीच्या सर्वनाशाचा शेवटचा पुत्रप्राप्तीचा महायज्ञ होय.

या यज्ञसमारंभाकरितां सर्व देव, ऋषि, राजे, दैत्य इत्यादि सर्वांस बोलवावयाचें, परंतु श्रीशंकरास मात्र मुळींच आमंत्रण द्यावयाचें नाहीं; अथवा प्रत्यक्ष आपली कन्या जी शिवपत्नी दाक्षायणी तिलासुद्धां आणावयाचें नाहीं, असा दक्षानें आपला निश्चय ठरविला; व तो आपल्या गुरुजनांना कळविला. व शेवटीं ज्याच्या प्रीत्यर्थ यज्ञ कारवयाचा तो आपला मुख्य देव भगवान् श्रीविष्णु त्यास विदित करून त्याचा सल्ला घेण्याकरितां त्यास मोठ्या भक्तिभावानें त्यानें पाचारण केलें. त्याप्रमाणें दक्षाच्या राजधानीस—

---

१ दक्षप्रजापतीचा हा शेवटचा महायज्ञ दंडकारण्यांतील पुण्यकारक व परम पवित्र अशा कृष्णानदीच्या, उत्तर तीरीं मोक्षदायी अशा या यड्डूर महाक्षेत्रीं झाला असा पुष्कळ विद्वानांचा व हजारों भाविकांचा विश्वासपूर्ण समज आहे **श्रीकृष्णमाहात्म्य** या प्राचीन ग्रंथांत श्रीवीरभद्रलिंगाची उत्पत्तिकथा सांगतांना दक्षप्रजापतीचा शेवटचा महायज्ञ येथेंच यड्डूर क्षेत्रीं झाल्याचा उल्लेख आहे. शिवाय सुमारें दोनशें वर्षीपूर्वी चित्रकूट ( चिकोडी ) गांवीं राहणाऱ्या कोणा 'मोरेश्वर' नांवाच्या विद्वान् ब्राह्मणानें श्रीवीरभद्रदेवाच्या उत्पत्तीविषयीं व दक्षप्रजापतीच्या महायज्ञाविषयीं स्कंदपुराणांतील केदारखंड, सिंहाद्रि (सह्याद्रि) खंड काशीखंड इत्यादि प्राचीन सर्वमान्य पुराणखंडांमधील कथाभागांचा व इतर पुष्कळ प्राचीन ग्रंथांचा आधार घेऊन व त्या त्या ग्रंथांमध्यें आलेल्या स्थलविषयक उल्लेखांशीं या क्षेत्रांतील निसर्गरचनेचा मेळ पाहून, व या क्षेत्रांतील अन्य देवतांचा व तीर्थस्थानांचा त्या त्या पुराणांतील गोष्टींशीं संबंध जुळतो काय याचाही पूर्ण विचार करून दक्षप्रजापतीचा

## श्रीविष्णूचें आगमन.

झालें. तेव्हां दक्षप्रजापतीनें त्याजपुढें मागील सर्व यज्ञप्रसंगांतील हकिकतीचा पाढा वाचून " हा सर्व विघ्नसंतोषीपणा त्या अमंगल शंकराचाच असल्यानें त्याला यावेळीं मुळींच बोलावूं नये, असें मला वाटतें. शिवाय हे प्रभो, तूं सर्व देवांचें आदिदैवत, आदिमूर्ति व जगन्नाथ आहेस. सर्व जगताचा अंतरात्मा, सर्व भूतांचा भूतात्मा आहेस, तूं तेजोरूपी षड्गुणैश्वर्यसंपन्न आहेस, तूं वायुरूपी असून त्या रूपानें ब्रह्मदेवापासून तों चराचरापर्यंत सर्वांमध्यें व्यापून उरला आहेस. या ब्रह्मांडमंडळांत ज्याप्रमाणें आकाश सर्वत्र व्याप्त आहे तसा तूं श्रीअनंत पंचभूतींचा भूतात्मा आहेस. तूं परा वाचेचा स्वामी असल्याकारणानें तुला लोक ' परात्पर ' असें म्हणतात. तूंच सर्व जगाचा जनक, प्रतिपालक व ईश्वररूपें संहारकर्ता आणि उद्धारकर्ताही आहेस. ब्रह्मा, विष्णु, महेश हीं तीन्ही तुझींच रूपें असून तुझें वर्णन करितां करितां वेदशास्त्रें, ' नेति नेति ' म्हणून कुंठित झालीं. असा तूं सर्वसमर्थ असतांना तुजपुढें शंकराची काय

---

हा महायज्ञ येथें दक्षिणापथीं दंडकारण्यांत यड्डूर क्षेत्रांत झाला आहे असें विचारांतीं ठरविलें; आणि त्यानें त्या सर्व ग्रंथांच्या आधारांवरून ' श्रीवीरभद्रचरित्र-या नांवाचें एक विस्तृत पण अत्यंत सुरस अथें वीररस-प्रधान पुराण रचिलें. हा पुराणग्रंथ जुन्या मराठी भाषेंत लिहिला असून तो ओंवीबद्ध आहे. याचे ५२ अध्याय आहेत. या क्षेत्रवर्णनाचें हेंच पवित्र पुराण होय. यांत या यड्डूर महाक्षेत्रासंबंधीं सर्व पौराणिक माहिती आली असून, दक्षप्रजापतीचा सदरहू महायज्ञ व त्याच्या विध्वंसनार्थ श्रीवीरभद्रदेवानें केलेला महापराक्रम यांचें संपूर्ण व रसभरित वर्णन केलें आहे. या पुराण-ग्रंथावरूनही हा महायज्ञ येथेंच झाला असावा असें वाटतें.

अथवा हे सर्व पुराण—लिखित पुरावे बाजूस ठेवून या क्षेत्रांतील प्राचीन देवदेवतांच्या उत्पत्तीचा विचार केला, तरी हा यज्ञ येथें झाला असावा असें दिसतें. असें तें पुढें दिलेलें यज्ञवर्णन व त्यांत केलेलें या क्षेत्रांतील देवताविषयक वर्णन पहावें.

योग्यता आहे ? पण तूं त्याचा नित्य जप करतोस याचें कारण काय ? त्या कैलासवासी सदाशिवाला जाति नाहीं, कूळ नाहीं, आश्रम नाहीं अशाला देव मानितोस हें कसें ? तो सर्वदा अमंगल, क्रियाहीन, विरूप विलक्षण, दिगंबर, नररुंडमालधर, नागभूषण, सर्वांग भस्मोद्धूलित, जटाधारी, विषभक्षक, गजचर्मधारी, भूत, पिशाचवेष्टित आहे. अशा सदाशिवाला देवत्व कोठून आलें ? याकारितां मी त्याला यज्ञाला बोलावीत नाहीं आणि यज्ञभाग ही मुळींच देत नाहीं. कां कीं, हे भगवान् तुजवांचून आम्हास दुसरें दैवत नाहीं. तुझ्यासारखें मुख्य दैवत असतांना आम्ही शंकराची भक्ति कां करावी ? शिवनामानें आजपर्यंत कोणास काय फळ मिळालें ? व कोण उद्धरून गेला आहे ? शंकर हा स्वतःच नेहमीं दरिद्री आहे, अर्थात् तो दुसऱ्यास ऐश्वर्य कोठलें देणार ? फार तर स्वतःच्याच भिक्षेची वांटणी, व स्मशानांतली थोडी राख तो देईल. याहून त्याजकडून जास्त काय मिळणार ? अर्थात् तूं स्वतः व इतर ऋषि त्याची अहर्निश भक्ति करितां ती कोणत्या इच्छेनें ? तुम्हांस आज काय

---

श्रीआद्यकाडदेवरु–उत्पत्ति–कथा व लीलांचें वर्णन करून त्यांच्या मठांचा इतिहास समजून देणारी एक लहानशी बखर उपलब्ध आहे, तींत आरंभींच या यडरक्षेत्रीं फार प्राचीन काळीं दक्षप्रजापतीनें यज्ञ केल्याचें व त्या महायज्ञ-कुंडांत व श्रीवीरभद्र- लिंगाची स्थापना केली असल्याचें लिहिलें आहे. या सर्व प्राचीन व अर्वाचीन पुराव्यांवरून हा यज्ञ येथेंच झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आतां हा महायज्ञ उत्तर हिंदुस्थानांत, हिमालयाच्या पायथ्याशीं गंगानदीच्या पवित्रतीरीं हरिद्वारच्या उत्तरभागीं पूर्वकाळीं 'नैमिषारण्य' नांवानें प्रसिद्ध असलेल्या भागांत कोठेंतरी झाला असावा, असा कित्येकांचा तर्क आहे. पण दक्षप्रजापतीनें शेंकडों वर्षें अनेक यज्ञ केले असल्याचें पुराणांतरीं वर्णन असल्यामुळें त्याचा अमका यज्ञ अमूक ठिकाणीं झाला हें निश्चित सांगणें फार कठीण आहे. तथापि शेवटच्या यज्ञाचीं आजपर्यंत राहिलेलीं स्मृतिचिन्हें जीं– पवित्र असें यज्ञकुंड, व त्यांतील परमपावन श्रीवीरभद्रलिंग; आणि श्रीकांपेश्वरदेव इत्यादि

कमी आहे अथवा कोणता मोक्ष मिळवावयाचा आहे ? माझा तर दृढनिश्चय असा आहे कीं, स्वर्गादि सर्व सुखें देणारा, व त्रैलोक्य राज्यवैभव देणारा, अग्रगण्य स्वामी तूंच आहेस. म्हणून मी तुझेंच नामस्मरण करीन. तुलाच यज्ञभाग देईन. त्या शिवाच्या आराधनेनें आजपर्यंत कोणाचें कल्याण झालें नसून उलट त्याच्यावर विश्वास ठेवून कित्येक, असुर, दैत्य राक्षस हे शिवगणांकडून व्यर्थ नाडले गेले आहेत. यास्तव त्यावर माझा मुळींच भरवसा नाहीं. " हें शिवनिंदेचें आढ्यतेचें भाषण ऐकून विष्णु संतापला. आणि म्हणाला—हे दक्षा,

श्लोक—अहमाराधये नित्यं शिवं साक्षाज्जगद्गुरुम् ।
मम मूर्त्यंतरं शंभुं मम देवं परेशयं ॥
परब्रह्म शिवं साक्षात्सर्वदेवेशमीश्वरं ।

---

साधनें येथें आहेत. या प्राचीन व पुराणप्रसिद्ध साधनांवरून हा यज्ञ येथें झाला असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. हें अनुमान खरें वाटण्याचें दुसरें एक कारण असें आहे कीं, अशीं पुराणप्रसिद्ध प्राचीन स्मृतिचिन्हें उत्तरहिंदुस्थानच्या वर निर्दिष्ट केलेल्या भागीं असल्याचें कोठें ऐकिवांत नाहीं. अर्थात् यावरूनही आमच्या अनुमानास बळकटी येते.

आतां आणखी थोडी शंका राहते ती ही कीं, महाप्रतापी दक्षप्रजापति उत्तर हिंदुस्थानांतील आपलें राज्य सोडून इकडे इतक्या दूर अंतरावर दंडकारण्यांत या यज्ञाकरितां कसा येईल ? त्याला तिकडे अशी प्रशस्त जागा मिळत नव्हती काय ?

पण ब्रह्मदेवाच्या प्रत्यक्ष मानस पुत्राला ( आमच्या दृष्टीनें वाटणाऱ्या ) इतक्या दूरच्या प्रदेशांतही या यज्ञाकरितां येणें ही गोष्ट तितकी असाध्य नव्हती. शिवाय दुसरेंही एक कारण असावें कीं, त्या प्रदेशांत केलेल्या मागील अनेक यज्ञांना विघ्नें आल्यानें तो प्रदेश योग्य न वाटल्यामुळें त्यानें हें श्रीशंकराचें निवासस्थान जें कैलासपर्वत त्यापासून जरा दूरचें पण रम्य व पवित्र स्थळ पसंत केलें असावें. असें वाटतें.

त्रैलोक्यैकं परं देवं नित्यं पूजयते च यम् ॥
यस्यार्चनपदं लाभे ब्रह्मा ब्रह्मत्वमाप्तवान् ।
यस्यार्चनपदं मह्यं लब्धं विष्णुत्व शाश्वतं ॥
( श्रीवीरभद्रदेवचरित्र अ. ५–६७ ते ६९. )

( भावार्थ–मी विष्णु प्रत्यक्ष जगद्गुरु श्रीसदाशिवाची पूजा करितो. व त्रैलोक्यांतही त्याची नित्य पूजा होते. त्याच्या आशीर्वादानें मला विष्णुत्व व ब्रह्मदेवास ब्रह्मत्व प्राप्त झालें. ) हे दक्षप्रजापते, तूं अहंकारानें अंध होऊन गेला आहेस म्हणून तूं श्रीशंकराचा महिमा जाणत नाहींस; करितां तुला सदाशिवाचें माहात्म्य काय आहे तें थोडक्यांत सांगतों ऐक. जे अहंकारानें कर्म करितात ते पापी होत, निरभिमानपूर्वक सर्वदा एकविध भक्ति करावी हें उत्तम, पण अभिमान किंवा अहंकारमद अंगीं चढला कीं, त्यापासून कोणते अनर्थ घडतील याचा नेम नाहीं. या वृथाभिमानानेंच असुरांचा नाश झाला. अभिमान उत्पन्न झाल्याबरोबर देवादिकांचासुद्धां अधःपात झाला आहे. तो कधींही चुकत नाहीं. महाबलाढ्य दैत्य व सार्वभौम राजेही अभिमानानें स्वकुलासह समूळ नाश पावले आहेत. सर्वसमर्थ ईश्वर, अभिमानी जनांचा नाश करून, न्यायान्यायाचें निरीक्षण करीत काळरूपानें सर्वदा आपणासंनिध उभा आहे. असा न्यायी परमेश्वर अन्यायी आहे असें मानून त्याचे अन्याय त्याला दाखविण्याचा तूं आव आणीत आहेस याला काय म्हणावें ? तुला ऐश्वर्याचा मद चढला असल्यानें त्या भाग्यमदाच्या आवेशांत ईश्वराची अवहेलना करून त्याशीं दीर्घद्वेष करीत आहेस. या निंद्य वर्तनानें तुझा पुण्यक्षय होऊन तूं अधोगति जवळ करीत आहेस. अशाच प्रकारें अहंकारानें पूर्वकाळीं महादैत्य शंकासुर कसा नाश पावला तें श्रवण कर. दितीपासून उत्पन्न झालेल्या शंकासुर महादैत्यानें एके काळीं निराहार, निरोदक, एकांगुष्ठीं राहून घोर तपश्चर्या केली. तेव्हां श्रीशंकर प्रसन्न होऊन वर माग म्हणाले. तें ऐकून दैत्यानें 'मला त्रैलों-

क्यवैभव मिळावें व कोणापासून मृत्यु नसावा. ' असा वर मागितला. तो देऊन श्रीशिवानें त्याची मनकामना पूर्ण केली. या वरप्रभावानें त्या दैत्यानें लवकर स्वर्ग, मृत्यु, पाताळ तीन्ही लोक जिंकून घेतले. त्याच्यासमोर कोणाचाही निभाव लागेना. त्यामुळें त्यास अति गर्व चढला. त्यानें अधर्म, अन्याय आरंभिला. म्हणून त्याचा बुद्धिभ्रंश होऊन पुण्यक्षय झाला. जेव्हां त्याचा अधःपात जवळ आला, तेव्हां ब्रह्मदेवापासून चारी वेद हरण करून घेऊन स्वतःच सृष्टिकर्ता बनावें असा विचार त्याच्या मनांत आला व तो ब्रह्मलोकीं गेला. तेथें ब्रह्मदेवाचा पराभव करून त्यापासून त्यानें चारी वेद हिरावून घेतले. तेव्हां त्यास अत्यानंद झाला; परंतु त्या मूर्खाला वेदांचें रहस्य काय समजणार व सिद्धि कशी मिळणार ? इकडे वेदावांचून ब्रह्मदेवाचें कार्य चालेना म्हणून मला अवतार घेणें भाग पडलें. माझा अवतार होणार हें जाणून तो महादैत्य सागरांतरीं जाऊन दडून बसला तेव्हां मी श्रीशिवाच्या इच्छेनुरूप त्याच्या आज्ञेनें मत्स्यरूप धरून त्याला सागरांतून शोधून काढिला; व त्याचा वध करून त्यापासून वेद हिरावून घेऊन ते ब्रह्मदेवास दिले; आणि त्या दैत्याचा जो देह शंखरूपानें मी अंगिकारिला तोच हा पांचजन्य होय. अशा रीतीनें दुष्टांचें निर्दालन करून धर्मरक्षण करण्याकरितां आम्हां हरिहरांना अवतार घेणें भाग पडतें.

मधुकैटभ हे महादैत्यही एके काळीं मदोन्मत्त होऊन अतिशय अन्याय करूं लागले. त्याकाळीं सर्व सृष्टि जलमय असून मी ' बालमुकंद ' या नांवानें शेषशायी होतों. निरुपमाशक्ति रमा पादसंवाहन करीत असून नाभिकमलोद्भव ब्रह्मा स्वयंतेजानें शोभत होता. त्या समयीं ते मधुकैटभ महादैत्य भयंकर मुख पसरून ब्रह्मदेवास गिळण्याकरितां धावून आले. तेव्हां विधाता भय पावून माझें स्तवन करूं लागला म्हणून त्यास मी शिवरहस्य सांगून त्याचा जप करण्यानें तुझें संकट निवारण होईल असें अश्वासन देतांच ब्रह्मदेवानें शिवनामाचा दहासहस्र वेळां जप केला. त्यायोगें त्याची शक्ति वाढून त्यास श्रीशंकर प्रसन्न झाले. पुढें त्या दोघांचा

श्रीशंकरांनीं संहार केला व ब्रह्मदेवास निर्भय केलें. त्या दैत्यांचा मेद व मांस जलाशयांत पडून तेथून पाणी मागें हटलें. व त्यापासूनच भूमि उत्पन्न झाली म्हणून तिला ' मेदिनी ' म्हणतात. त्यांच्या अस्थींपासून महापर्वत निर्माण झाले. जें जल शिल्लक राहिलें त्यापासून क्षार, युक्ष, सुरा, घृत, क्षीर, दधि व शुद्धनीर असे सात समुद्र उत्पन्न झाले. असा सर्वसमर्थ, सर्वोत्तम श्रीशिव आहे. माझ्या ज्या प्रतापाची तूं वाखाणणी करितोस तो प्रतापही शिवकृपेनेंच मला प्राप्त झाला आहे. माझें हें विष्णुपद व वैकुंठ मला प्रत्यक्ष श्रीशंकरानें दिलें आहे. हें तूं जाणत असून अंधपणानें तूं अभिमान बाळगीत आहेस. अरे दक्षा, मागें मीं भूतळीं बद्रिकाश्रमीं अनेक वर्षें अनुष्ठान केलें तेव्हां श्रीशंकर प्रसन्न होऊन त्यांनीं निर्गुणस्वरूप दाखविलें व मला षड्गुणैश्वर्यसंपन्न सगुण विष्णुपद देऊन वैकुंठस्थानही दिलें. शिवाय लक्ष्मीसारखी स्त्री व इतर सर्व पुत्रपौत्र श्रीशिवकृपेनें मला प्राप्त झाले आहेत. असें असतां, अरे अधमा, कुलघातका, मदोन्मत्ता, काळमुखा, ब्रह्मपुत्रा, तूं कोणाच्या बळें इतका उन्मत्त झाला आहेस? प्रत्यक्ष मी विष्णु वैंकुंठभुवनीं नित्य राहत असतांही सहस्रकमळांनीं श्रीशंकराची कैलासांत जाऊन मी पूजा करीत होतों. परंतु एकदां मला असा गर्व झाला कीं, माझ्यावर ईश्वराची पूर्ण कृपा असल्यानें मजसमान कोणी नाहीं. तेव्हां माझी निष्ठा पाहण्याकरितां एके दिवशीं ईश्वरानें सहस्रकमळांतील एक कमळ लपवून ठेविलें. अर्थात् मी सहस्रनामाचा जप करीत प्रीतीनें कमळें वाहत असतां त्यांत एक पुष्प कमी पडलें. तेव्हां मी फार भय पावलों, माझा अभिमान पार निघून गेला व शुद्धज्ञान झालें. मी मनीं विचार केला कीं, देहाचा मुख्य व महत्वाचा अवयव जो नेत्र तोच कमळाच्या अभावीं ईश्वरास वाहणें युक्त होय. असा विचार मनीं येतांच तत्काळ मी नखानें उजवें नेत्रकमळ

---

१-हरस्ते साहस्रं कमलबलिमाधाय पदयोर्
यदेकोने तस्मिन् निजमुदहरन्नेत्रकमलम् ॥

काढून ईशचरणीं अर्पण करितांक्षणीं दयाघन परमात्मा सदाशिव कळवळला व मला पूर्ण पारमार्थिक ज्ञान सांगून मोठ्या प्रेमानें ' सुदर्शन चक्र ' दिलें. त्यामुळें माझें सामर्थ्य वृद्धिंगत झालें व त्यावरील अत्युच्च भक्तीमुळें मला त्याच्या शुद्ध निर्गुणस्वरूपाचें ज्ञान झालें; तेव्हां साक्षात् विश्वंभर, विश्ववरद कर्पूरगौर, गुणातीत श्रीशंकर हेच सायुज्यमुक्तीचें स्थान व सनातन पूर्ण ब्रह्म होत असा माझा निर्धार आहे. म्हणून—

श्लोक—आराध्येयं शिवं देवं त्रिगुणातीतमव्ययं
यस्याज्ञया इदं विश्वमोतप्रोतं चराचरं ॥
सृष्टिस्थित्यंतकं रुदं न देवं किं वदंति ते
सशिवं विष्णुरूपेण विष्णुरूपं परं शिवं ॥
मद्भक्तः शंकरद्वेषी मद्वेषी शंकराप्रियः
ता उभौ नरकं यांति सत्यं मे वचनं मम ॥
प्रजाधीश सुधी त्वं हि सर्वदेवगुणैर्युतं
किं यज्ञे देवमीशस्य द्वेषबुद्धिः शिवःसह ॥
( श्रीवरिभद्रदेवचरित्र अ. ५ श्लो. ७० ते ७३. )

(भावार्थ- मी त्रिगुणातीत श्रीशिवाची आराधना करीत असतों. ज्याच्या आज्ञेनें, हें चराचर विश्व ओतप्रोत भरून राहिलें आहे व जो जगाच्या उत्पत्ति-स्थिति-लयाला कारण आहे त्या रुद्राला जे देव समजत नाहींत आणि शिव हाच विष्णु आहे व विष्णु हाच शिव आहे असें असतां-ही आम्हांमध्यें जे भेद करितात किंवा माझी भक्ति करून शिवाची निंदा अथवा शिवाची भक्ति करून माझी निंदा करितात, त्यांचा नाश होतो. करितां हे दक्षप्रजापति, तू यज्ञकार्यांत श्रीशिवाशीं कां द्वेषबुद्धि करितोस ?

---

गतो भक्त्युद्रेकः परिणतिमसौ चक्रवपुषा
त्रयाणां रक्षायै त्रिपुरहर जागर्ति जगताम् ॥
( महिम्न श्लोक १९ ).

हे दक्षप्रजापते, परमात्मा श्रीशिवाला नीट ओळखून जो कर्म करितो त्याचा सर्व भ्रम निरसून तो सायुज्य-धामास जातो. श्रीशिव हा दीनानाथ असून तो आपल्या भक्तांचें महत्व वाढवीत असतो. याविषयीं एक दृष्टांत तुला सांगतों. त्रिपुरासुर या नांवाचा महाबलाढ्य दैत्य पूर्वकाळीं त्रैलोक्यास फार त्रास देऊं लागला. त्याच्या त्रासानें सर्व लोक, ऋषि, ब्रम्हा-इंद्र हे अत्यंत कष्ट पावले व ते सदाशिवास शरण आले व सर्वांनीं त्रिपुरासुर हा किती विश्वासघातकी, ब्रम्हद्वेषी, महापातकी आहे, व त्यानें सर्वांचा किती छळ केला हें श्रीशंकरास निवेदन केलें. तेव्हां शंकरास अत्यंत क्रोध आला व ते त्याचा वध करून सर्वांना सुखी करण्याकरितां युद्धार्थ निघाले. त्यांनीं पृथ्वीचा रथ* केला, मेरूपर्वताचें धनुष्य व ब्रह्मदेवास सारथी केलें. मज विष्णूला बाण केला, सूर्य व चंद्र ह्या दोघांना त्या रथांचीं चक्रें बनविलीं. अशा तयारीनें त्या त्रिपुरासुरावर चाल करून जाऊन त्या भयंकर दैत्याचा निमिषार्धांत संहार केला. असें सदाशिवाचें अद्भुत सामर्थ्य आहे. त्या सर्वसमर्थ शिवाची तूं निंदा करितोस, अशानें तुझा ऐश्वर्यनाश होऊन अधःपात होईल. तुला वाटत असेल कीं, देव, दानव- यक्ष, किन्नर हे सर्व माझें पौत्र आहेत त्यांचा मला आधार आहे; पण तुझे ते सर्व नातु–पणतु दैत्य, दानव; गंधर्व, हे श्रीशिवाचे दास असून ब्रह्मादि सर्व सुरासुर लोकपाळ; सूर्य चंद्र अष्टवसु, गंधर्व, सिद्ध, यक्ष, किन्नर, मरुद्गण हे सर्व परमेश्वर श्रीसदाशिवाची पूजा करीत असतात, तसेंच चौदा मनु, सप्तऋषि, योगेश्वर, सनत्कुमार हेही शिवार्चन करीत असतात. हे सर्व मनोनिग्रही, परमज्ञानी, महाथोर पुरुष शिवाचें आराधान करण्यांत गढून गेले असतांना, तूं मंदमति त्याचा द्वेष करितोस. असा सुरासुरास वंद्य, माझा स्वामी श्रीशंकर ज्ञानरूप असून तोच विश्वाचा आधार आहे, असें सर्व

---

१ रथः क्षोणी यंता शतधृतिरगेंद्रो धनुरथो ॥ रथांगे चंद्रार्कौ रथचरणपाणिः शर इति ॥ दिधक्षोस्ते कोऽयं त्रिपुरतृणमाडंबरविधिर्–विधेयैः क्रीडत्यो न खलु परतंत्राः प्रभुधियः ॥ ( महिम्न श्लो. १८. )

वेदशास्त्रें सांगत आहेत. अशा परमात्म्याच्या निंदेनें तुझी अपकीर्ति होऊन तुझ्या सर्वस्वाचा नाश होईल. ”

हा श्रीविष्णूचा अमृतमय उपदेश वृथाभिमानानें मदांध बनलेल्या त्या दक्षप्रजापतीला मुळींच रुचला नाहीं. उलट आगींत तेल ओतल्याप्रमाणें त्याचा क्रोधावेश दुणावला व तो संतापानें तप्त झाला. त्यानें विष्णुवचनाचा पूर्ण अव्हेर केला. आपल्या वचनाचा अव्हेर झालेला पाहून श्रीविष्णु विमानारूढ होऊन ते ऋषिगणांसह वैकुंठीं निघून गेले. त्यावेळीं सर्वांना अत्यंत विषाद वाटला. दक्षप्रजापतीचा विनाशकाळ जवळ आला असें सर्वांस वाटलें, म्हणून पार्वतीपरमेश्वराची स्तुति करून दक्षाचा नाश होऊं देऊं नका असें सर्वांनीं श्रीविष्णूस विनविलें; परंतु त्यांनीं तिकडे बिलकुल लक्ष दिलें नाहीं व सत्वरं निघून गेले.

## ( ५ ) महायज्ञाची सिद्धता.

श्रीविष्णुआदि देवगणांनीं व इतर ऋषिजनांनीं परोपरीनें दक्षराजास बोध केला; परंतु त्यानें तिकडे बिलकुल लक्ष दिलें नाहीं. या उपदेशांनीं त्या अभिमानी दक्षास उपरति तर झाली नाहींच; पण उलटा तो आपल्या यज्ञाच्या तयारींत गढून गेला. त्यानें विचार केला कीं, पृथ्वीवरील थोर थोर राजे, देव, दैत्य हे सर्व आपल्या साह्यास बोलवावे. नानाप्रकारें विनवणी करून श्रीविष्णु व ब्रह्मदेव यांसही बोलावून आणावे व यज्ञास आरंभ करावा. सप्त पाताळांतील अनंत, शेष इत्यादि बलाढ्य नाग, चौदा भुवनांतील सर्व सुहृदांचा मेळ जमवावा. पृथ्वीवरील सर्व राजे व क्षत्रिय वीर यांना प्रेमानें पाचारण करावें व मोठ्या समारंभानें यज्ञ करावा. असा विचार ठरवून प्रधान, पुरोहित व इतर आप्तजन यांना बोलावून त्यास दक्षराजा म्हणाला, ‘दक्षिणापथीं सह्यपर्वताच्या जवळभागीं महायज्ञ करावयाचा आहे; करितां आपण तीन्ही लोकांतील सर्व आप्तजनांस आमंत्रणपत्रें लिहून तीं हत्ती, घोडे, रथ व विमानांतून त्वरेनें पाठवावीं. व सर्वांना आपापल्या सर्व परिवारासह बोलवावें. आणि सर्व यज्ञसामुग्रीसह दक्षिणापथीं

सर्वांनीं चलावें ' ही आज्ञा होतांच त्याप्रमाणें सर्वत्रांस (सदाशिवाशिवाय) आमंत्रणपत्रें रवाना झालीं. आणि विजयभेरी वाजूं लागल्या. सर्व सैन्य, व यज्ञसामुग्री लादलेले हजारों हत्ती, घोडे दक्षिणेंत येण्यास निघाले आणि परमपावन कृष्णानदीच्या तीरीं येऊन दाखल झाले. या स्थळीं त्या सामुग्रीचे पर्वतप्राय ढीग पडले. आणि दक्षप्रजापतीच्या कीर्तिरूपी विजय-दुंदुभींच्या नादानें त्रैलोक्य दुमदुमून गेलें.

दक्षिणापथीं दंडकारण्यांत ज्या ठिकाणीं हा यज्ञ करण्याचें योजिलें होतें तें

## क्षेत्रस्थान.

व त्याचें माहात्म्य अगाध होतें तें असें कीं, गृहीं स्नान करण्यापेक्षां विहिरींत स्नान करणें दसपट पुण्यप्रद आहे. तलावांत शंभरपट, सरोवरांत हजारपट आणि नदींत स्नान करणें दशसहस्रपट पुण्यदायक होय. याहून जास्त फल सागरसंगमीं स्नानाचें असून, महानद्यांचा जेथें संगम झालेला असतो तेथील स्नान व दान सर्वश्रेष्ठ होय. त्याचा महिमा वर्णन करणेंच अशक्य. अशा प्रकारचें सर्वांत श्रेष्ठप्रतीचें हें संगमाचें स्थान होय. त्यांतही साक्षात् शिवस्वरूप कृष्णानदी व शक्तिस्वरूप वेदगंगा या दोन्ही महानद्यांचा संगम अत्यंत पवित्र होय. याविषयीं ' कृष्णामाहात्म्यांत ' विस्तारपूर्वक वर्णन आलें असून त्याचा सारांश मागें दुसऱ्या भागांतील एका प्रकरणांत दिला आहे तो पहावा. अशा या पुण्यसंगमाजवळचें उत्तम स्थान यज्ञाकरितां पसंत केलें होतें. शिवाय सह्यपर्वत हा पवित्र. त्यांतील नद्या त्याहून पवित्र व त्यांचा या प्रदेशांत झालेला संगम अत्यंत पुण्यप्रद होय. या पवित्र प्रदेशांत सगळीकडे दऱ्यांखोऱ्यांतून, आम्र, बिल्व, निंब, चंदन, पारिजातकादि प्रचंड वृक्ष अतोनात असून जाई, जुई, बकुळ, केतकी, दवना, तुळसी इत्यादिकांचीं वनें लागून गेलीं होतीं व त्यांच्या सुवासानें सर्वत्र घमघमाट सुटला होता. शिवाय कळंब, मधुपिंपळ, शिरस, पलाश, औदुंबर, बदरी, आवळी, शाल्मली, करवंदी, जांभळी,

शमी, बाभळी, खदिर, चिंच, गुगळी. इत्यादि अनेक वृक्ष येथें लागून गेले होते.

अशाप्रकारें गगनचुंबित वृक्षांनीं आच्छादिलेल्या व परमपावन नद्यांनीं गजबजलेल्या पवित्र प्रदेशांत सर्व समुदायासह येऊन दक्षराजानें आपल्या सचिवांकरवीं यज्ञसमारंभाची तयारी चालविली, या महायज्ञाकरितां यापूर्वीं सर्वांना आमंत्रणें गेलीं होतीं. त्या आमंत्रणाप्रमाणें पृथ्वीवरील या दंडकारण्यांतील पवित्र प्रदेशांत त्रैलोक्यांतील सर्व लोक व देवादिक आले. देवेंद्र आपल्या परिवारासह आला. असंख्य ऋषि आले. देव व ऋषी-मंडळींच्या विचारें येथें कृष्णातीरीं विस्तीर्ण व भव्य असा

## यज्ञमंडप तयार झाला.

या मंडपाचा परिघ पांच कोस होता. या मंडपाचे खांब रत्नखचित सुवर्णाचे होते. या सुवर्णस्तंभावर कलाकुसरीच्या नकशीदार तुळ्या घातल्या होत्या. मंडपाच्यावर शिखरें तयार केलीं असून त्या शिख-रांवरील सुवर्णमय रत्नखचित कळस विजेप्रमाणें चकाकत होते. त्यांवर लाखों पताका आकाशांत फडकत होत्या. मंडपाच्या छतास सगळीकडे हिरे, माणकें व मोत्यांच्या हजारों माळा लटकत होत्या. असा हा सुंदर रत्नखचित मंडप पाहून सर्व लोकांना अत्यंत आश्चर्य वाटलें.

या मंडपांत अनेक शोभायमान वाडे तयार केले होते. त्यांतील ज़मीन स्फटिक-शिलांनीं तयार केली असून, भिंती हिरेजडित होत्या. या मंडपांतील मध्यभागाची यज्ञभूमि अत्यंत कुशलतेनें शृंगारलेली होती. या यज्ञभूमींत अति विचित्र व विशाल अशीं तीन यज्ञकुंडें तयार केलीं होतीं. आवहनीय, गार्हपत्य व दक्षिणाग्नि अशीं तीं तीन कुंडें होतीं. पैकीं दक्षि-णाग्निकुंड हें जेथें हल्लीं कृष्णाकाठीं बनांत मोठा अश्वत्थ (पिंपळ) वृक्ष आहे तेथपर्यंत होतें. तसेंच या यज्ञशालेंतील आहवनीय (पूर्व दिशेचें) अग्निकुंड हल्लींच्या रुद्रपादापासून दूर असून रुद्रपादाजवळ पूर्ववेदिका होती. आणि हल्लीं जेथें श्रीवीरभद्रदेवालय आहे. तेथें मुख्य मध्यकुंड होतें.

अशीं ही अतिशुद्ध, परमपवित्र कुंडें व सभोवतालची अष्टकोणाकृति सुरम्य यज्ञशालाही रत्नभूषणांनीं उत्तम श्रृंगारली होती.

## यज्ञ समारंभाकरितां आलेली महान् पाहुणे मंडळी

या यज्ञसमारंभाकरितां कोण कोण मंडळी आली होती तें थोडक्यांत सांगणें जरूर आहे. दक्षप्रजापतीच्या आमंत्रणाप्रमाणें सर्व देवतांसह स्वतः इंद्र आला होता. वृषपर्वा, हिरण्यकश्यप, हिरण्याक्ष, हे दैत्यनाथ सहपरिवार आले. दुंदुभि आदि दानवगण, यक्षराजे सैन्यासह आले. सत्यलोकनाथ, सृष्टिनिर्माणकर्ता ब्रह्मदेव सर्व ऋषिगणांसह आला. शिवाय दक्षप्रजाप्रतीनें परोपरीनें विनवणी करून मोठ्या आग्रहानें वैकुंठनायक श्रीविष्णु यांसही बोलाविलें. ते पुढील भविष्य जाणूनही आपल्या लक्ष्मी व धरणी या दोन्ही स्त्रियांसहवर्तमान यज्ञास आले. त्यांची दक्षराजानें कृष्णेसमीप पश्चिमभागीं नित्य नियमानें अग्रपूजा कारितां यावी या इच्छेनें जवळच उत्तम आसनावर स्थापना केली. ( म्हणून हल्लीं दक्षिणदरवाज्याच्या पश्चिमभागीं श्रीविष्णूची स्थापना झाली असून व त्याच्या जवळभागीं ब्रह्मदेवाचें देऊळ आहे.) शिवाय मुख्य अष्टनायक, व जयविजय हे आपापला सर्व परिवार घेऊन आले. ( हल्लीं देवालयाच्या शिखरावर या सर्वांची जी स्थापना झाली आहे ती याचकरितां होय. ) अष्ट दिक्पालकांची स्थापना केली ती अशीः—पूर्वदिशेचा स्वामी जो इंद्र त्याची शचीसह गजारूढ स्थापना केली. आग्नेयकोनीं द्विमुख व सप्तहस्ताच्या मेषारूढ अग्निनाथाची स्वाहा, स्वधा या दोन्ही स्त्रियांसह स्थापना केली. दक्षिण दिशेस कालदंडधारी, महिषारूढ यमधर्माची स्वशक्तिनामें स्त्रीसह स्थापना केली. नैर्ऋत्यकोनीं आपल्या नैर्ऋत्यनामा स्त्रियेसह प्रेतवाहन नैर्ऋत्यनाथ स्थापिला. पश्चिम दिशेस वारुणीनामें स्त्रीसह मत्स्यवाहन वरुणाची स्थापना झाली. त्याच्या समागमें असंख्य जलचरगण आले होते. वायव्य कोनांत शशांक ( ससा ) वाहन शक्तिमूर्ति वायुदेवाची स्थापना करून, उत्तर दिशेस विश्वश्रव्याचा पुत्र धनपति कुबेर या नरवाहन शोभाय-

मान तेजस्वी मूर्तीची स्त्रीसह स्थापना केली. आणि ईशान्य दिशेस, कैलासांत पार्वती देवीच्या ईशान्य भागीं वास करणारे जे रुद्रमूर्ति ईशान्य याची वृषभारूढ मूर्ति स्थापिली होती. येणेप्रमाणें अष्ट दिक्पालकांची त्यांच्या त्यांच्या वाहन व स्त्रिया व इतर परिवारांसह स्थापना केली. (हीच हल्लीं शिखरावर दाखविली आहे.) जय विजय हे दोघे श्रीविष्णुसमीप द्वारभागीं राहिले.

दक्षप्रजापतीच्या सर्व कन्या व जामात ससैन्य आले होते. यांशिवाय मूर्तिमंत अष्टवसु, कार्याधिकारी अकरा रुद्र, प्रकाशमान द्वादशादित्य हे आपापल्या स्त्रियांसह ससैन्य आले. सूर्य व मनु हे छाया व त्वष्टि या आपपल्या स्त्रियांसह आले. अश्विनी ते रेवतीपर्यंत सत्तावीस स्त्रिया व योगिणीसमवेत चंद्रमा आला. पृथ्वीवरील मोठमोठे राजे सहपरिवार आले, सप्त पाताळांतील शेष, वासुकी इत्यादि सर्व महाबलाढ्य नाग आपापल्या नागलोकींच्या सैन्यासह आले. मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि राहु व केतु हे ग्रह आपापल्या गणांसह आले. चित्ररथादि गंधर्व आपल्या हजारो स्त्रियांसह आले. रंभा, उर्वशी, मेनका, सुलोचना, इत्यादि दिव्य अप्सरा आल्या. अंतरिक्षांतील यक्ष, सिद्धादिक महाऋषि, चारण व मरुद्गण हेही आले. ब्रह्मदेवाचे मानसपुत्र मुख्य व पवित्र असे सनकादिक ऋषि आणि अत्रि, वसिष्ठ नारदादि ऋषीश्वर आले. तसेंच गालव, जैमिनी, जाबालि, गौतम, भरद्वाज, कौंडिण्य, गार्ग्य, पराशर, व्यास, शुक, दालभ्य पौलस्त्य, दुर्वासादिक महामुनि आपापल्या हजारों शिष्यपरिवारासह यज्ञास आले. पूर्ण ज्ञानी कपिलाचार्य महामुनि व दधीचि इत्यादि प्रमुख ऋषि पुढें अपूर्व यज्ञकार्य होणार हे जाणून यज्ञमंडपीं पातले.

याप्रमाणें एकंदर देवसमूह आपापल्या स्त्रिया व सैन्यपरिवारासह मोठ्या ऐश्वर्यानें आला, दक्षप्रजापतीच्या सर्व कन्या आपापल्या प्रिय पतिपुत्रांसह अत्यानंदानें यज्ञाकरितां आल्या. दक्षप्रजापतीनें आलेल्या सर्व पाहुण्याचें आदारातिथ्य अति उत्तम रीतीनें ठेविलें होतें. देव, दैत्या-

दिकांना अपार वस्त्रें भूषणें दिलीं. द्रव्याच्या राशी देऊन ऋषीश्वरांना संतुष्ट केलें. तसेंच सर्व देवांचें व ऋषिवर्यांचें अर्घ्य-पाद्यादिकांनीं पूजन करून अत्यंत गौरव केला. हें पाहून श्रीविष्णु संतोषित झाले; परंतु त्यांच्या मनीं चिंता वाटे कीं, हा यज्ञ शेवटास जाण्याच्या आंत दक्षाचा प्राणांत होणार हें निश्चित असल्या कारणानें, त्याचा परिहार होऊन भूभार उतरविणेसाठीं या संकटकालीं आह्मांसही त्याला साह्य होणें प्राप्त आहे. या दक्षप्रजापतीबरोबरच सर्व देव, दैत्य, राक्षगणांसही बरीच आढ्यता उत्पन्न झाली असून ऋषिसमुदायही चंचलवृत्ति बनला आहे. पृथ्वीवरील राजे व क्षत्रिय हेही मदोन्मत्त झाले आहेत. दुराचार प्रबळ झाला असून सदाचाराचा अभाव झाला आहे. हा भूभार कमी करण्याकरितांच अवतार होणें जरूर झालें आहे. ह्मणून सर्व अनाचार नष्ट करून सदाचाराची वृद्धि करण्याकरितां या यज्ञाचें निमित्य पुढें करून श्रीशंकराचा अवतार होऊन सर्व दुष्टांचा संहार होईल यांत तिळमात्र संदेह नाहीं. कारण, सांप्रत, भूतळीं काम, क्रोध व स्वार्थ हे दुर्गुण अत्यंत बळावले आहेत. निष्काम कर्माचें सध्यां नांवही ऐकूं येत नसून यज्ञयागादि कर्में भोगार्थ केलीं जात आहेत. अतिसुंदर स्वर्गांगना भोगण्यास मिळाव्या, अनेक सुखें प्राप्त व्हावीं एतदर्थच ज्ञानी पुरुषसुद्धां स्वर्गाची इच्छा करीत आहेत. दुर्विषयांचा त्याग करून मन निर्विषय करण्यास्तव उत्तम वेदमार्ग सांगितला आहे; परंतु तो एकीकडे राहून मद्य, मांस व स्त्रीसेवन हींच मनुष्यांस अति प्रिय होऊन राहिलीं आहेत. नीतिधर्माचा विध्वंस होऊन नीति–अनीतींचा संकर झाला आहे. आणि हा संकर मुख्यतः मद्यमांसभक्षण व परस्त्रीसेवनार्थच झाला असल्यानें यांपासून ते सर्व प्राणी निश्चयेंकरून अधोगतीस जातील. अशा अनीतिमार्गानें वर्तन करणाऱ्या लोकांना शासन घडावें म्हणून यमधर्मानें त्यांच्या मागें आधिभौतिक, आधिदैविक आणि अध्यात्मिक हे त्रिविध ताप लाविले आहेत. महाज्ञानी व्यासऋषीनें वेद, शास्त्रें व पुराणें रचून लोकांत शुद्धभावना व सत्कर्म-

वृद्धि व्हावी व त्यांच्यातील अशुभ कर्मांचा नायनाट व्हावा अशी उत्तम व्यवस्था करून ठेविली आहे. वेदशास्त्रांना अनुसरून वागणारा मनुष्य चारी मुक्ति साधून जन्ममरणाच्या गुंतागुंतींतून पार होतो. असा प्राणी खरोखर धन्य होय; आणि हेंच मनुष्य देहाचें मुख्य लक्षण आहे. परंतु असें न करितां मन द्रव्य–दारादि विषयांतून आसक्त झाल्यास कालचक्राच्या भक्षस्थानीं अचुक पडावें लागतें. ह्मणून हा त्रिविध ताप व कालचक्राचा अनर्थ चुकविण्याकरितां सर्वांनीं सन्मार्गगामी व्हावें; पण सांप्रत पहावें तों दक्षप्रजापति हा मूढ बनला असून, तो कर्माकर्मांचा विचार न करितां, स्वर्गसुखाची इच्छा धरून अविहित कर्मास प्रवृत्त झाला आहे. त्याचा मृत्यु सन्मुख आला असल्यानें, तो त्याच्या बुद्धीस भ्रम पाडीत आहे; परंतु या भयंकर मोहांत गुरफटून त्याच्या द्वेषवुद्धीचें लक्षण न ओळखतां त्यावरोवर हे मूढजन अगम्य काळचक्राच्या भ्रमांत सांपडून अघोर संकटीं पडत आहेत. दक्षप्रजापतीच्या संसर्गानें तेही अत्यंत दुरभिमानी बनले असल्यानें आम्ही केलेला शुद्ध बोध त्यांना रुचावा कसा? तेव्हां या दुर्बुद्धि, दुरभिमानी, दुराचारी, पापी प्राण्यांचा अंतकाळ सन्निध आला आहे, ह्मणून हे सर्व एकत्र जमून तदनुसार अन्यायानें वागत आहेत. यांच्या पापांच्या पर्वतांचा भूमीला झालेला असह्य भार या यज्ञनिमित्तानें उतरून जाणार आहे. या प्रसंगांत पापी दक्षालाच आम्ही व इंद्रादिक देवांनीं साह्य करणें आहे, तथापि आपणच होऊन या यज्ञकार्याला विघ्न येऊन सर्वनाश होईल. हें भविष्य ओळखून श्रीविष्णु स्वस्थ बसले.

## यज्ञमंडपांतील व्यवस्था

मागें सांगितल्या प्रकारें देव, ऋषि, राजे, इष्टमित्र, प्रधान व पुत्रपौत्रांसहित दक्षराजा यज्ञकार्य करण्यास सिद्ध झाला होता. यज्ञसभारंभाकरितां ( कृष्णानदीच्या तीरीं यङ्गुरक्षेत्र–प्रदेशांत ) सुंदर व विस्तीर्ण मंडप घातला असून त्यांत वेदोक्त विधि-विधानपूर्वक तीन यज्ञकुंडें व वेदिका केल्या होत्या. त्या महायज्ञमंडपांत सगळीकडे एके वेळींच अनेक प्रका-

र्वीं रम्य वाद्यें वाजत होतीं. दुंदुभींचा महानाद व भेरी मृदंगादिकांची गर्जना, या अनेकपरी वाद्यांच्या गजरानें आकाशमंडळ दणाणून गेलें. अशा वाद्यांचा गजरांत सर्व ऋषि--ऋत्विजगण मिळून त्यांनीं यज्ञांतील कार्यभाग अधिकाराप्रमाणें नेमून घेतला. आणि यथाप्रकार यज्ञकार्यास सिद्ध झाले. दक्षप्रजापतीनें श्रीविष्णूची षोडशोपचारें पूजा करून त्याची रत्नखचित मुख्य सिंहासनावर स्थापना केली. नंतर देवेंद्रादि देवगणांची व अष्टदिक्पालांची यथायोग्य पूजा व मानपान करून त्यांची अष्ट दिशांत अष्टस्थानीं स्थापना केली. दक्षप्रजापतीच्या या महायज्ञमंडपाचा विस्तार पांच कोस असल्याचें व तो सुवर्णमय असून अनेक रत्नांनीं सुशोभित असल्याचें मागें सांगितलें आहे. या मंडपाचीं तीन आवरणें ( भाग ) केलीं होतीं. सर्वांत बाह्यभागीं, महाबलाढ्य हिरण्याक्ष, हिरण्यकश्यपेश्वर, सहस्रनेत्र सहस्रभुज असा प्रख्यात सहस्रार्जुन, पाताळवासी शेष, वासुकीसारखे विशालदेही महा भयंकर असे समग्र सर्पवंशीचे कोट्यानुकोटि सर्पगण, जे पाताळभुवनं सोडून दक्षयज्ञास साह्य करण्याकरितां मुद्दाम आले होते त्या सर्वांची स्थापना झाली होती. दुसऱ्या आवरणांत वरील शिवाय दितीचे असंख्यात विष्णुद्वेषी दैत्यपुत्र, दक्षाकरीतां यज्ञास आले असल्यानें ते व त्या दैत्याप्रमाणें बलसंपन्न दनुपुत्र, असंख्य दानवगण आणि दानवांप्रमाणें उग्र असे काळीचे पुत्र क्रूर काळिकेय दैत्य, व मानव राजे व वीर यज्ञमंडपीं कोट्यानुकोटि बसले होते. प्रथमावरणांत अदितिसहित सर्व देव आपल्या सर्व वैभवासह बसले असून तेथेंच मातामह प्रजापति, कांता-पुत्रांसह चंद्रमा, सर्व ग्रह, दक्षाच्या सर्व कन्या आपापल्या पतींसह दिसत असून, अत्रि, कश्यपादि थोर थोर महाऋषिसमुदायासमवेत दक्षप्रजापति तेथें बसला होता. अंतरिक्षांत विमानांतून यक्ष, गंधर्वादि गण राहिले होते.

या महायज्ञमंडपांत सर्वांची जेवणाची व्यवस्थाही उत्तम ठेविली होती. या मंडपांत देव, दानव, मानव, सर्प इत्यादि, सर्व समान दर्जानें एकरूपपणानें वागत होते; त्यांत भेदभावास यत्किंचित वाव नव्हता. या सर्वांचें

कृष्णावेणींत नित्य सुगंध लेपांनीं तैलाभ्यंग मंगलस्नान होई. मग दिव्य वस्त्राभरणें परिधान करीत. आणि भोजनशालेंत मन मानेल त्या ठिकाणीं समुदायानें पंक्तीस बसून सुग्रास भोजन करीत. सर्वांच्या बरदास्तीस अगणित सेवक ठेविले होते, ते सर्वदा प्रीतीनें सर्वांची सेवा करीत व निष्कामपणें नित्य राबत होते.

या विस्तीर्ण यज्ञमंडपाभोंवतीं यज्ञरक्षणाकरितां सैन्य ठेविलें होतें त्यांच्याही तीन रांगा होत्या. सर्वांत बाह्य भागीं अश्व, गज, रथ व पदाति अशी चतुरंग सेना सज्ज होती. ती सर्वकाळ सावध राहून यज्ञरक्षण करीत होती. अंतरिक्षांत विमानांतरीं दुंदुभि वाजवीत देव गंधर्व व यक्षादिकांचें सैन्य सज्ज होतें, त्यांच्या दुंदुभींचा नाद अहोरात्र चालला होता. शिवाय यांच्या साह्यास अंतराळांतच सिद्ध, चारण हे तत्पर होते. हे आपापल्या सैन्यासह दक्षतेनें यज्ञरक्षण करीत होते. या रांगेच्या आंत दुसऱ्या रांगेंत चौसष्ट योगिनी, अष्टमातृका, व भैरवगण उभे राहून रक्षणकार्य करीत होते. पहिल्या रांगेंत खुद्द दक्षप्रजापतीचें निवडक सैन्य व महापराक्रमी दैत्यगण सर्वकाळ सावध राहून यज्ञरक्षण करीत होते.

अशा सैन्यसागराच्या मध्यभागीं सुशोभित यज्ञमंडप होता. या मंडपाच्या मध्यभागीं तीन मनोहर यज्ञकुंडें व वेदिका तयार केल्याचें मागें सांगितलेंच आहे. तेथील सर्व बांधकाम रत्नखचित असल्याकारणानें तें झळकत होतें. यांच्या जवळ उत्तम सुवर्णपीठावर रत्नखचित सिंहासन तयार केलें होतें. पूर्वद्वारीं सर्व देव बसले असून तेथेंच पशुहत्येची जागा होती. याच्या पश्चिमभागीं मुख्य आहवनीय यज्ञकुंड होतें. या कुंडाजवळ वेदवेदांगें व सूत्रसंज्ञा जाणणारे, सर्वशास्त्रपारंगत, अनुभविक व सर्वसमर्थ असे सोळा ऋत्विज ब्राह्मणऋषि यज्ञाहुति टाकण्याकरितां आहुतियुक्त बसले होते. या मुख्य आहवनीय यज्ञकुंडाचें मुख अति विशाल असून त्यांत आहुति प्रासावयासाठीं प्रचंड व प्रज्वलित अग्नि सिद्ध केला होता. याच मुख्य कुंडाजवळ स्वतः दक्षप्रजापति अग्नीचें पूजन करून यज्ञकार्यास प्रारंभ करण्याकरितां येऊन बसला होता.

# [ ६ ] महायज्ञाचा प्रारंभ.

अशी सर्व सिद्धता झालेली पाहून दक्षप्रजापतीनें आपली प्रिय भार्या प्रसूतीसह मंगलस्नान केलें. व मुख्य विशाल अशा आवहनीय अग्निकुंडापाशीं येऊन त्यानें त्या प्रचंड अग्नीची षोडशोपचारें पूजा केली. नंतर महाप्रलयाग्नीला आव्हानून ऋषि ऋत्विजांसह त्या महाप्रलयाग्नीचें स्तवन आरंभिलें, तें असें—

जयजय श्रीमेषवाहना। चत्वारिश्रृंगा त्रिचरणा।
दोन मस्तकें द्विवदना। दोनि नाशिका नयन चारी ॥ १॥
चार कर्ण विचित्र वर्ण। सप्त हस्तांचा देव पूर्ण।
आरूढावया मेषवाहन। ऐसें ध्यान चिंतित॥ २ ॥

याप्रमाणें अनेक प्रकारें वन्हिनाथाचें स्वाहा-स्वधा या उभय स्त्रियांसहित स्तवन करून त्यास आव्हानिलें. तेव्हां अग्नि प्रदीप्त झला. तो महाप्रलयकारी, चराचर भक्षणकर्ता वैश्वानर जेव्हां प्रकट होऊन अत्यंत क्षोभला, तेव्हां त्याच्या वदनांत समुद्रप्राय घृत ओतून आणि अनेक मंत्रोच्चारानें त्या अग्निमूर्तीचें ध्यान करून तो तृप्त व शांत केला आणि यज्ञकार्यास सुरवात केली. नंतर गार्हपत्याचें स्तवन करून त्याला संतोषविलें. मग उत्तर महाकुंडापाशीं येऊन सर्वांनीं त्याची पूजा केली. दक्षप्रजापति त्याच कुंडापाशीं स्वतः बसला. त्याच्या जवळपास सर्व श्रेष्ठ ऋषि, सुरासुर येऊन अहोरात्र सावधान राहून साहित्य पुरवूं लागले. याप्रमाणें तो यज्ञमंडप अत्यंत शोभायमान दिसूं लागला. यावेळीं दक्षप्रजापतीसमीप त्याची महापतिव्रता सती प्रसूति ही बसली असून तिच्या सर्व कन्याही तेथें आल्या होत्या; परंतु त्यांत मुख्य गौरी मात्र दिसत नसल्यामुळें प्रसूति चिंतातुर झाली होती.

या यज्ञमंडपांत सर्वांच्या जेवणाची उत्तम सोय केली होती. सर्वांना सोन्यारुप्याच्या ताटवाट्यांतून नेहमीं हरतऱ्हेचीं पक्वान्नें वाढिलीं जात होतीं. पंक्तीमधून रत्नांच्या समयांतून दिवे लाविले होते. ज्यांना जें इच्छित

असेल तें वाढतां यावें, अर्थात् सर्वांना इच्छाभोजन मिळावें. अशी सर्व सिद्धता तेथें होती. हीं अत्युत्तम पंचपक्वान्नें झोडून आपलें जिव्हालौल्य पुरविण्यासाठीं प्रत्यक्ष गजाननमहाराजाची स्वारी तेथें मुद्दाम आली होती ! भोजनांत पिण्यासाठीं सुवर्णकलशांतून वाळा घालून थंडगार केलेलें पाणी सर्वांना दिलें जाई. आणि जेवतांना जे भागले त्यांना वाळ्याच्या पंख्यांनीं वारा घालीत हजारों सेवक हिंडत होते. अशा थाटानें सर्वांचें जेवण होतांच त्यांना तांबूल देत आणि मग अपार दक्षिणा देऊन संतुष्ट केलें जाई. याप्रमाणें देव, दैत्य, यक्ष, नाग, मानव इत्यादि सर्वांचें समभावें भोजनादिक होत असून नाना वस्त्रालंकार देऊन दक्षप्रजापति सर्वांना सुखी करीत असे. अशा सर्वतोपरी अपूर्व थाटानें हा यज्ञसमारंभ चालला होता. या सर्वश्रेष्ठांच्या महायज्ञास प्रारंभकालींच एक अपशकुन झाला तो असाः—

या यज्ञाकरितां भृगु अंगिरसादि महान् महान् लक्षावधि ऋषि आले होते व ते यज्ञकर्मांत तत्पर होते. त्यांत शिवभक्तिपरायण असेही अनेक होते. ईश्वरभक्तिपरायण ऋषींमध्यें दधीचि नामा ऋषीश्वर प्रख्यात होता. त्यानें जेव्हां या यज्ञास श्रीशंकर आले नसून त्याच्याशिवाय या यज्ञास प्रारंभ झाला असें पाहिलें; व पुढेंही श्रीशंकराचें आगमन होईल, अगर दक्षप्रजापति त्यांस बोलावील असें दिसेना आणि यासंबंधानें त्या ठिकाणीं आलेले मुख्य देव श्रीविष्णु, ब्रह्मा हेसुद्धां दक्षास कांहीं न बोलतां त्याच्या तंत्रानेंच वागतातसें पाहिलें, तेव्हां त्यास निश्चयपूर्वक असें वाटलें कीं, हा यज्ञ नसून हें प्रत्यक्ष विघ्नच होय. सर्व शिवभक्तांच्या मनांतही हाच विचार घोळत असल्याकारणानें, त्या ठिकाणचे सर्व शिवभजक ऋषि यासंबंधीं विचार करण्यासाठीं एकत्र जमले आणि दधीचि ऋषिवर्याला पुढें करून त्याजकडून दक्षप्रजापतीस, ‘ श्रीशंकराला तात्वडतोब यज्ञास बोलवावें आणि ते येईपर्यंत त्यांचा भाग ईशान्य दिक्पालास देऊन यज्ञ-कार्य चालवावें ’ अशी विनंति करण्याचें ठरविलें. त्या सर्व ऋषींचें हें

रास्त म्हणणें दक्षापुढें निवेदन करण्यास दधीचि ऋषि सिद्ध झाला व त्या सर्व ऋषिगणांसह दक्षप्रजापतीजवळ जाऊन त्यानें विनंति केली कीं, ' हे दक्षप्रजापते, या तुझ्या महायागास्तव विष्णु, ब्रह्मादिक सर्व देव आणि ऋषिश्रेष्ठ आले आहेत; परंतु कैलासपति श्रीशंकर आले नसल्यानें, हा यज्ञ-समारंभ विशोभित दिसत आहे. हे प्रजानाथा तूं परम धर्मज्ञ असा यज्ञाचा दीक्षित आहेस. या लोकीं तुजसमान यज्ञकर्ता कोणी नाहीं. तुझा पूर्ण भाग्योदय झाला असून तूं विष्णुतोषणार्थ हा याग करीत आहेस. या महोत्सवास तुझ्या सर्व कन्या, कुमार, इष्टमित्र, सहोदर आले असून तुझी श्रेष्ठ कन्या दाक्षायणी व श्रीशंकर मात्र आले नाहींत. या दोघांविरहित हा तुझा यज्ञ शोभत नाहीं. म्हणून श्रीशंकराची प्रार्थना करून त्यांना येथें घेऊन यावें म्हणजे तुझा यज्ञ पूर्ण होईल. करितां श्रीविष्णु, देवेंद्रादि सर्व देव, मुनि आणि नृपाळ या सर्वांसह जाऊन श्रीशंकराची प्रार्थना करून त्यांना लवकर घेऊन यावें. श्रीशंकर हे सर्व अमंगलाचा निरास करून पूर्ण मंगल करणार समर्थ आहेत; तस्मात् दाक्षायणीसह श्रीशंकर येथें येतांच तुझा यज्ञ निर्विघ्न पार पडून तुझे मनोरथ पूर्ण होतील. त्यांशिवाय जर यज्ञकार्य पुढें चाल-विशील; तर खात्रीनें तुझा नाश होईल. तसा तुझा नाश न व्हावा आणि तुझें कल्याण व्हावें म्हणून आम्ही तुला आग्रहपूर्वक सांगत आहों ' हा त्या ऋषिजनांचा हितकारक उपदेश त्या दक्षप्रजापतीला मुळींच मानवला नाहीं. उघडच आहे कीं, 'अप्रियस्यापि पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः' या न्यायानें सर्वतोपरि हितकारक परंतु न आवडणारें ( प्रारंभीं कटु वाट-णारें पण परिणामीं हितकारक) असें सांगणें ऐकणारे सर्वकाळीं दुर्लभच अस-ल्यानें हा दक्षप्रजापति तरी याला अपवाद कसा ठरेल ? उलट ऋषिजनां-चें हें भाषण ऐकून त्याला अत्यंत क्रोध आला व तो खवळून त्यांना म्हणाला—' अहो ऋषिश्रेष्ठहो, शंकराचें येथें काय काम आहे ? आम्ही विष्णुभक्त आहों आणि विष्णुतोषणाप्रीत्यर्थच हा यज्ञ होत असल्यानें त्या भगवान् विष्णूची प्रार्थना करून त्याला तेथें बोलाविलें आहेच आणि तो यज्ञ

सामुग्रीसह आम्हास मनःपूर्वक साह्य करण्यास सिद्ध असतांना, शिवाय आम्ही त्याच एका मुख्य देवाला सर्वव्यापी सर्वसमर्थ परमात्मा समजत असतांना, त्याशिवाय इतर देवांची मनधरणी करण्याचें आम्हांस काय कारण आहे ? त्यांत शंकर हा केवळ अविचारी, अवलक्षण, निंद्य असून त्याला मी यज्ञबाह्य करणार आहें. या यज्ञामध्यें त्याला एकही आहुति मी देणार नाहीं आणि तो स्वतः आपण होऊन येथें आला तरी कोण-त्याही कार्यांत भाग घेऊं देणार नाहीं. या यज्ञाकरितां सत्यलोकाहून ब्रह्मदेव मंत्रशास्त्र घेऊन स्वतः येथें आला असून श्रीविष्णुही इंद्रादि सर्व देवगणांसह सर्वकाळ आम्हांस साह्य आहे. करितां त्या अविचारी ईश्व-राला मी येथें मुळींच आणणार नाहीं. यास्तव हे ऋषिश्रेष्ठां, तूंही साह्य होऊन निश्चिंत मनानें यज्ञकार्य कर. तुम्हां सर्वांच्या बळावर या यज्ञास मी प्रारंभ केला असून, तो पूर्ण करून आम्हांस यश देणें तुमच्या हातीं आहे. तुम्ही मागाल तितकी दक्षिणा मी देईन व सांगाल तसें मी करीन. मात्र पुन्हां अमंगल सदाशिवाचें नांवसुद्धां घेऊं नका. त्याचा मला अत्यंत तिटकारा आहे. कारण—माझी अति सुंदर, अति उदार व गंभीर स्वभावाची मंगल कन्या, दाक्षायणी ही ब्रह्मा व नारदादिकांनीं मला बोध करून त्या शंकरास देवविली; त्यावेळीं मी खरोखर कांहीं विचार केला नाहीं. त्याला कुलगोत्र नाहीं, माता पिता नाहींत, तो एका स्थळीं स्थिर नाहीं. त्याच्यासभोंवतीं नेहमीं भूत प्रेत पिशाच्चांचा मेळा जमलेला असून त्यांचा हा अघोर स्वामी आहे. नीच व पापी लोकांचा समुदाय सर्वदा जवळ बाळगणारा हा शंकर त्यांच्याप्रमाणेंच मत्सरी व आत्मविचारहीन बनला आहे. याप्रमाणें तुमचा तो भूतेश्वर अति निंद्य व असंबद्ध आहे. त्याच्या नांवाचा पुनः येथें उच्चारसुद्धां करूं नका. तुम्ही ज्ञाते सर्वज्ञ व समर्थ आहां. तुमचें इच्छित असेल तें सर्व मी देईन, करितां मला क्षमा करा, पण या यज्ञाचा अभिमान धरून त्यांत मला यशस्वी करा. याप्रमाणें नाना प्रकारें बोध व विनवण्या करून आणि आमिष दाखवून तुम्ही कोणीही आतां शंकराचें नांव मुळींच न घेतां यज्ञ-

कार्यांत रत व्हावें अशी प्रार्थना केली. त्या अधम दक्षाचें हें अशुभ व कर्णकटु भाषण ऐकून दधीचि मुनि संतापला आणि सर्व ऋषिगणांसमक्ष दक्षाचा धिःकार करून क्रोधानें म्हणाला. 'हे दक्षाधमा, आणि सर्व ऋषि, देव, दानव, गंधर्वहो, जेथें देवाधिदेव श्रीसदाशिवाविषयीं पूज्यभाव नाहीं उलट त्याची निंदा होते आणि पूजनीयांची अमर्यादा केली जाते अशा या महायज्ञाचें कोणाकडूनही रक्षण होणार नाहीं, हा निश्चय होय. आणि यामुळें दक्षासहित तुम्हा सर्वांस अनर्थ घडेल. कारण नीच पुरुषाला राज्यवैभव प्राप्त झालें तर तो मन मानेल तसें वागूं लागतो. त्यामुळें अधर्मवृद्धि होऊन त्या सर्व राज्याचा सत्यानाश होतो. अथवा राजा उत्तम धर्मशील व न्यायनीतिनें वागणारा असूनही त्यानें नीचांस प्रधानपद दिलें, तरी त्यायोगें राजाचा बुद्धिभ्रंश होतो व तोही अबद्ध वागूं लागतो, ' आपणासारिखें करिती तात्काळ । नाहीं काळ वेळ तयालागीं ॥ या सत्पुरुषोक्तीप्रमाणें स्थिति होऊन तत्काळ अनर्थास कारण घडतें.

तेव्हां जेथें ज्ञानसंपन्न सत्पुरुष, वडील मनुष्यें, देव, द्विज यांचा अपमान होतो. साधूंचा उच्छेद व दुर्जनांचा परिपोष होतो, तेथें त्या सर्व दुष्टांचा प्राणवध होणार असें निःसंशय समजावें. आणि अशा अन्यायी जनांची वस्ति जेथें असेल त्या देशांत दुर्भिक्ष, मरणादिकांचें महाभय सर्वदा असणारच. आणि त्यांच्या कुळाचा नायनाट होऊन ते स्वतः नरकवासी बनतात. हा मूर्ख दक्षप्रजापति स्वतःचा अधिकार न ओळखितां सर्व समर्थ महादेवाची अवज्ञा करीत आहे. याचा परिणाम खास असाच होईल कीं, या यज्ञाची पूर्णाहुति होण्याच्या आंत याचा नाश होईल, दक्षाचा संहार होईल आणि येथें असणाऱ्या सर्वत्रांस अरिष्ट भोगावें लागेल.' असें म्हणून क्रोधानें तप्त झालेला तो महामुनि दधीचि उठला. त्याबरोबर तेथें जे शिवभक्त ऋषि, व द्विज होते ते सर्व सभेंतून उठले आणि 'शिवनिंदा ऐकूं नये, जे ऐकतील त्याला अनिष्ट घडेल' असें म्हणत यज्ञमंडपाबाहेर निघाले. त्या जाणाऱ्या महा महा मुनिजनांना उद्देशून दक्षराजा म्हणतो—

' आपण यज्ञकर्मास प्रारंभ करून तें अर्धेच टाकून निघाला हें योग्य नव्हे. या यज्ञकाळीं तरी आपण जाऊं नये. तो तुमचा शंकर वेदबाह्य, अतिनीच, अमंगल आहे म्हणून त्याचा मी अव्हेर केला आहे. मी श्रीविष्णुतोषणानिमित्त यज्ञ करीत आहें; हें आपणांस माहीत असतांना येथें त्या शिवाला आणण्याचा आग्रह आपण सर्वजण मला कां करीत आहां ? कारितां वृथाभिमानास बळी पडून आपण यज्ञकार्यांचा त्याग न करितां अत्यानंदानें यज्ञ करा. तुम्ही सर्व वेदमूर्ति आहां, सबब यज्ञपूर्ति करून अपरिमित द्रव्य-दक्षिणा घेऊन संतुष्ट व्हावें. ' ही त्या दक्षाची दर्पोक्ति ऐकून त्यांचे कान बधिर झाले, त्यामुळें तत्काळ यज्ञमंडप सोडून ते आपापल्या आश्रमीं निघून गेले. निरपेक्ष, शांत व निस्पृह अशा त्या तपोधनांना दक्षाची धनसंपदा काय होय ! तेव्हां त्या दक्षिणारूपी आमिषावर लाथ मारून ते सर्व चालते झाले.

ते सर्व महान् तपोनिधि मुनिवर्य निघून गेल्यावर त्या ठिकाणीं स्वार्थपरायण, विषयलंपट, पोटार्थी व नामधारी विष्णुपर ऋषि राहिले. अर्थात् अनिर्वाहपक्षीं त्यांनाच यथेच्छ दक्षिणा देऊन दक्षप्रजापतीनें यज्ञाधिकारी ऋत्विज बनविलें. आणि आपलें यज्ञकार्य पुढें चालविलें.

## ( ७ ) देवी दाक्षायणीचें [पार्वतीचें] आगमन.

इकडे भूतलावर अशा ब्रह्मघोटाळ्यानें परंतु बाह्यात्कारी मोठ्या थाटामाटानें दक्षप्रजापतीचा महायज्ञसमारंभ चालला असतांना, तिकडे एके दिवशीं श्रीशिवभवानी एका दिव्य विमानांत बसून आपल्या गणांसहित कैलासाहून निघून गंधमादन पर्वतावर आली. व तेथें देवी भवानी सरोवरांत सखींसह जलक्रीडा करूं लागली. त्यावेळीं शेकडों चेंडू ती पाण्यावर फेंकून देत होती व तिच्या सख्या ते तिला परत आणून देत होत्या त्यावेळीं तिच्या अंगावर नानाप्रकारच्या सुवासिक पुष्पांचे हार शोभत होते. त्यांत तिच्या सख्या आणखी भर घालीत होत्या. अशा रीतीनें अत्यानंदानें क्रीडा चालली असतां तेथें अकस्मात् सुंदर स्त्रीपुरुषांचा समुदाय येऊन थबकला. त्यांत चंद्रमा मुख्य असून तो रोहिणी वगैरे आपल्या

सर्व स्त्रिया व पुत्रांसह मोठ्या थाटमाटानें भूमंडळावर दक्षप्रजापतीच्या यज्ञसमारंभास जात होता. त्यास पाहतांच, शिववल्लभा गौरीनें विचारिलें, ' या सुप्रभातीं सहकुटुंब सहपरिवार मोठ्या हर्षानें तुम्हीं कोठें कोणत्या कार्यास्तव जात आहां ? ' तेव्हां चंद्रानें उत्तर दिलें ' देव, दानव, दैत्य ऋषि, यक्ष, गंधर्व, राजे इत्यादि सर्वही दक्षयागाकरितां गेले व जात आहेत; यास्तव आम्ही तिकडे जात आहों. आपणही लवकरच निघणार असालच. ' हें ऐकून व तो सर्व समारंभ मोठ्या आनंदानें तिकडे जात असलेला पाहून दाक्षायणीला परम संतोष वाटला. परंतु अशा महोत्सवानें यज्ञसमारंभ चालला असतांना त्याविषयीं अद्याप आम्हांस गंधवार्ताही कां नसावी ? आम्हांस आमंत्रणपत्र पाठवावयाचें विसरून राहिलें असेल काय ? अथवा आम्हा शिवभवानींना न बोलवितांच दक्षप्रजापति यज्ञ करणार आहे, म्हणून पत्र पाठविलें नाहीं ? अशी तिच्या मनांत शंका आली. तथपि माझा पिता पत्रच पाठविण्यास विसरला असावा, असें जाणून तिनें यज्ञास जाण्याचा विचार ठरविला. व मग तिनें मोठ्या हर्षानें त्यावेळीं स्वतः नानाप्रकारचे अलंकार अंगावर घालून व उंचीं वस्त्रें नेसून उत्तम शृंगार केला. अशीं दिव्य वस्त्राभरणें मागें तिनें कधीं अंगावर घातलीं नव्हतीं व असा शृंगार केला नव्हता. असो, अशाप्रकारें नटून श्रीशिवाकरितांही दिव्य वस्त्राभरणें बरोबर घेऊन अत्यानंदानें ती श्रीशंकरापाशीं आली; आणि सख्यांना बाह्यभागीं ठेवून आपण एकटीच मोठ्या प्रीतीनें श्रीशंकराजवळ येऊन पित्याच्या महायज्ञसमारंभास जाण्याकरितां आपण निघावें असें मोठ्या लडिवाळपणानें ती त्यांना सांगूं लागली. त्यावेळीं श्रीशंकराचें मुख दिव्य तेजानें व्याप्त असून त्यांची ती सच्चिदानंद मूर्ति अत्यंत प्रसन्न दिसत होती. ज्याप्रमाणें सूर्योदय होतांच कमळें विकास पावतात त्याप्रमाणें त्या तेजोमय भगवान् श्रीशंकरांना पाहतांच देवीचें मुखकमल प्रफुल्लित दिसूं लागलें. यावेळीं अनेक शिवगण तेथें हात जोडून स्तवन करीत उभे होते, त्यांत मुख्य पूर्णप्रतापी चंड, मुंड

व बाणासुर हे परमशिवभक्त आज्ञाधारक दैत्य शिवासमोर उभे होते. शृंगी, भृंगी हेही तेथें असून संनिध नंदीही होता. पूर्ण तापसी शैल्यादि शिवगण आणि त्याचप्रमाणें थोर थोर पार्षदगणही राहिले होते. अतिकोपिष्ठ व भयंकर असे धूम्राक्ष, धूम्रकेतु, धूम्रपाद, आणि अति शांतस्वरूपी ध्रुव, बभ्रू, श्वेतकेतु हेही तेथें होते. शिवाय करहीन, पादहीन, चक्षुहीन असे अनेक प्रकारचे सहस्रावधि भूतगणही तेथें होते. त्यांत कित्येक शिरविरहित, द्विपाद, त्रिपाद, एकपाद असेही होते; परंतु त्या सर्वांनीं रुद्राक्षधारणा केली असून जटा वाढविल्या होत्या. अशा सहस्रावधि गणांसमवेत श्रीशंकर तेथें गंधमादन पर्वतीं बसले असतां मागें सांगितल्याप्रमाणें भवानीनें उत्साहयुक्त अंतःकरणानें समीप येऊन मोठ्या प्रीतीनें त्यांना साष्टांग नमस्कार केला. दिव्यवस्त्रालंकार अंगावर घालून उमेनें सुंदर शृंगार केला असल्यानें तिचें मुखकमल अत्यंत मनोहर दिसत होतें. त्या प्रफुल्ल मुखमंडलाकडे अवलोकन करितांच सदाशिवासही संतोष वाटला त्यांनीं प्रेमानें तिला आलिंगन देऊन; आवडीनें अंकावर बसवून घेतलें; मग प्रीतीनें चुंबन घेऊन नंतर आपली इच्छा काय आहे? असें तिला विचारिलें. याप्रमाणें श्रीशंकरांनीं बहुमानपुरस्सर विचारितां, भवानीनें मोठ्या आदरानें त्यांची प्रार्थना करून मंजुळ वाणीनें म्हटलें, ‘ स्वामी, मी आज एक अपूर्व वर्तमान ऐकिलें तें आपणास सांगतें. माझा पिता दक्षप्रजापति हा भूतळीं यज्ञ करीत आहे. त्या यज्ञाला ब्रह्मादिक सर्व देव, दैत्य, दानवानुज, सर्प, गंधर्व, ऋषि, राजे इत्यादि सर्व लोक मोठ्या वैभवानें आले आहेत. शिवाय चंद्रासहित नक्षत्र, योगिनी इत्यादि माझ्या सर्व बहिणी आणि देवपत्न्या विमानांतून त्या यज्ञास जात असल्याचें आतांच मीं पाहिलें ’ असें म्हणून दक्षयज्ञाचा सर्व साद्यंत वृत्तांत तिनें श्रीशंकरास सांगितला. शेवटीं ‘ आपणासमवेत मलाही त्या यज्ञास जाण्याची इच्छा झाली आहे. आम्ही अगदीं जवळचे आप्तजन असल्याकारणानें या यज्ञकार्यी आम्हांस आमंत्रण देण्याचा माझ्या पित्याला विसर पडला असेल;

तरी सत्वर जाऊन यज्ञकार्य पहावें. जिव्हाळ्याच्या सुहृदांनीं आप्त स्वकीयांनीं बोलाविलें नसतांही आपण होऊन जाऊन त्यांच्या कार्यास साह्य करावें. त्यांची न्यूनता पाहूं नये, हेंच आप्तपणाचें लक्षण होय, असें नीतिवचन आहे. याकरितां यावेळीं आपण जाण्यास्तव लवकरच निघावें अशी प्रार्थना आहे.' 'कृष्णामहात्म्यां' त या प्रसंगाविषयीं जरा निराळें वर्णन आहे तें असें– देवर्षि नारदमुनि मृत्युलोकाहून निघून कैलासभुवनीं जेथें श्रीशिव भवानी. सहवर्तमान मनोधर्मे क्रीडा करीत अनंत काळ बसले होते तेथें आला; आणि पहातो तों ईश्वराचे अंकीं भवानी बसली असून संनिध सहस्रावधि शिवगण व भूतपिशाच्च गणही होते. त्या शिवसभेंत प्रवेश करून नारदमुनीनें शिवभवानींस साष्टांग नमस्कार केला आणि आदरानें उभा राहिला. श्रीशंकरानीं त्याकडे कृपादृष्टीनें पाहून, प्रेमानें जवळ बोलावून कुशलवर्तमान विचारिलें व मग म्हटलें कीं, 'नारदमुने' तुझें कोणत्या लोकाहून येथें आगमन झालें ? तुझा त्रिभुवनांत सर्वदां स्वैरसंचार होत असल्यानें तीन्ही लोकांतील नवल विशेष काय असेल तें कथन करावें. त्यांतही भूमंडळांतील वृत्तांत प्रथम सांगावा.' असें मोठ्या आवडीनें विचारितांच नारदऋषि म्हणतो–'हे त्रिलोचना, देवाधिदेवा, उमारमणा. जगन्नायका, श्रीशंकरा, तूं परात्पर परब्रह्म सच्चिदानंद असून तुझा महिमा अपार आहे. ब्रह्मा, विष्णु आदि देव तुझ्या पदीं वंदन करितात, भक्तजनांचा उद्धार करण्याकरितां सर्वदा अवतार धारण करणाऱ्या विश्वनाथा, तूंच सर्वांचा सर्वात्मा आहेस. असा तूं सर्वसमर्थ जगन्नाथ असतांना, तुझा महिमा न जाणून, भूतळीं दक्षप्रजापति तुझी निंदा करीत आहे. विष्णु इंद्रादिकांनीं परोपरीनें बोध केला, तथापि तो न ऐकतां, तो दुराग्रहानें व मदोन्मत्तपणें वागत आहे. तेथें अनेक राजे, थोर थोर ऋषि, देव, असुर सर्व सहपरिवार आले आहेत. त्यांनीं दक्षप्रजापतीचा हा दुराग्रह पाहून असा विचार केला कीं, येथें गौरीपति भगवान् श्रीशंकर आले नसल्यानें हा महायज्ञ पूर्ण होणार नाहीं. याला विघ्न येणार खास; करितां दधीचि सनकादिक थोर थोर ऋषीश्वरांना पुढें करून त्यांजकडून दक्षप्रजापतीला

अत्याग्रहाची विनंति केली. त्यांनीं म्हटलें– 'त्रैलोक्यनाथ श्रीमहादेव व मुख्य कन्या दाक्षायणी यांना न बोलवितां तूं कोणाच्या आधारानें यज्ञ करीत आहेस ? आणि उत्सव तरी कसला करितोस ? तरी असा भलता अविचार न करितां सर्व देवादिवादिकांसह व मुनिवर्यांसह जाऊन श्रीसदाशिवाची प्रार्थना करून त्यांना येथें घेऊन ये; म्हणजे तुझ्या यज्ञमंडपाला व यज्ञकार्याला शोभा येईल.' याप्रमाणें त्या सर्व देव व ऋषिश्रेष्ठांनीं परोपरीनें सांगितलें असतांही तो दुराचारी दक्षराजा, आपला दुराग्रह न सोडतां भर सभेंत शिवनिंदा करूं लागला. ती ऐकून दधीच्यादि जे महान् शिवभक्त ऋषि होते ते तेथें क्षणभरही न राहतां तत्काळ यज्ञमंडप सोडून चालते झाले. जेव्हां ते सर्वसमर्थ ऋषिश्रेष्ठ यज्ञमंडपांतून उठून जाऊं लागले तेव्हां तो मूर्ख दक्षप्रजापति जरा शुद्धीवर आला, त्याला किंचित् खेद वाटला आणि त्यानें त्या सर्व ऋषिवर्यांची अत्यंत मनधरणी केली, संपत्तीची लालूच दाखविली; परंतु ती विनवणी न ऐकतां त्यांनीं त्याच्या द्रव्यमदाचा धिःकार केला व ते सर्व तडक यज्ञागारांतून निघून आपापल्या आश्रमीं गेले. हे सर्व महासमर्थ महातेजस्वी शिवपर ऋषीश्वर निघून जातांच तेथें जे नामधारी विष्णुपर ऋषि राहिले त्यांची विनवणी करून त्यांना दक्षराजानें त्या ठिकाणीं यज्ञाधिकारी नेमिले. आणि देव, दानव, दैत्य, मानव, असुर या सर्वांचें साह्य घेऊन यज्ञकार्य पुढें चालविलें आहे. ही बातमी आपणास कळविण्याकरितां मी त्याच यज्ञमंडपांतून सत्वर इकडे आलों आहें.' असें श्रीशंकरास सांगून नंतर नारद भवानीस म्हणतो, 'तुझा पिता महायज्ञ करीत आहे तेथें मोठा उत्सव होत आहे आणि तूं येथें स्वस्थ का बसली आहेस ? तरी सत्वर जाऊन त्यां तो याग पहावा.' हें नारदाचें भाषण ऐकून दाक्षायणी सास्मित वदनानें श्रीसदाशिवाची प्रार्थना करून त्या परमकरुणाघन पतीस दीनवचनेंकरून यज्ञसमारंभास जाण्याविषयीं विनवूं लागली. तें तिचें सुहास्यवदनांतील विनयवचन ऐकून ईश्वर म्हणतात. 'हे कल्याणि, तुझा पिता

दक्षप्रजापति हा महा गर्विष्ठ आहे, कारितां तेथें आपण जाऊं नये हेंच बरें. ज्यानें समस्त देव, ऋषीश्वर, दैत्य, दानव, नृपवर, इत्यादिकांचा हितोपदेश तुच्छ मानिला आणि जो त्या सर्वांदेखत आमची निंदा करण्यास प्रवृत्त झाला. त्या महागर्वी दक्षप्रजापतीच्या यज्ञास आम्ही जाणें अति अनर्थकारक होय. शिवाय जेथें आदर होणार नाहीं त्या परगृहास शहाण्यानें कधीं जाऊं नये. परसदनीं महोत्सव झाला आणि आदर नसतां आपण तेथें गेलों कीं, आपला अवमान होणार, यांत मुळींच संशय नाहीं. तुला वाटत असेल कीं, प्रत्यक्ष आपले जन्मदाते मातापिता तेथें असतांना अपमान होण्याची भीति आम्ही कां बाळगावी! पण हा तुझा भ्रम आहे. मातापितर म्हणून तूं तेथें जाशील तर तुझा अपमान व धिःकार होईल. आणि 'संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ।' या न्यायानें तुला त्या अपमानापेक्षां मृत्यु शतपट उत्तम वाटून तूं खरोखर प्राणत्याग करशील. कारण अवमान हा मृत्यूचें मूळ असल्यानें त्यायोगें उभयकुळांचा नाश होईल. हें तुला आम्ही सांगितलें पाहिजे असें नाहीं. यावरून तेथें तुझ्या जाण्यानें तो दुष्ट दक्ष तुझी निंदा करील, त्यामुळें तूं तत्काळ प्राणत्याग करशील, यज्ञाचा विध्वंस होईल, अशी अनर्थपरंपरा ओढवतांच आम्हांस क्रोध येईल, आणि आम्हांस क्रोध आला कीं त्रैलोक्याचा संहार होण्यास क्षणाचाही अवधि नको. असें भविष्यचिन्ह आम्हांस दिसत आहे. कारितां त्वां आतां न जावें हेंच योग्य होय.' अशी परोपरीनें श्रीशंकरांनीं अंबेची समजूत केली; पण व्यर्थ. तिचा निश्चय कांहींकेल्या बदलेना. उलट श्रीशिवाचा वरील हितोपदेश ऐकून तिला बराच राग आला. आणि त्या क्रोधावेशांत ती भगवती- श्रीशंकरास म्हाणाली. 'महाराज, नसत्या शंका कुशंका काढीत बसणें आपणांसारख्यास उचित नव्हे. तसें आपल्यास वाटत असल्यास मला एकटीला जाण्यास आज्ञा द्यावी म्हणजे मी तरी माझ्या पित्याच्या गृहीं यज्ञसमारंभास आतां निघून जाईन. होणार तें होईल, कदापि चुकावयाचें नाहीं.' असें बोलून

अनुल्लंघनीय असें पतिवचन तिनें उल्लंघिलें आणि म्हणाली. 'आपण मला आज्ञा द्यावी मी जाईन.' ही तिची दीन विनवणी आणि स्फुंदस्फुंदून रडणें पाहून करुणासागर परमात्मा श्रीशिव द्रवले. नंतर त्यांनीं लडिवाळपणें गौरीला अंकावर घेऊन तिची समजूत केली. व भविष्यकाळचा खेदयुक्त प्रसंग जाणत असतांही त्यांनीं 'भद्रे, तूं क्षणाचाही विलंब न करितां सत्वर यज्ञास जा' असें ह्मणून नंदीस आज्ञा केली कीं, 'तूं आणखी थोडे शिवगण बरोबर घेऊन भवानीबरोबर जाऊन तिला दक्षयज्ञस्थळीं पोहोंचीव.' ही शिवाज्ञा शिरसा मान्य करून नंदीनें महाबलवान् असे सहस्त्रावधि शिवगण आपल्याबरोबर घेतले आणि तो त्या दक्षबालिका भवानीस पोहोंचाविण्यास निघाला.

---

१ येथें स्कंदपुराणांतर्गत काशीखंडांत ( आणि कथासारांत ) निराळीच कथा प्रचलित आहे ती संक्षेपतः येथें सांगणें अप्रासंगिक होणार नाहीं. ती अशी, —भूमंडळीं मोठ्या उत्साहानें दक्षप्रजापतीचा महायज्ञसभारंभ चालला असतां, त्या समारंभांत न्यून पाहत असलेल्या कलहप्रिय नारदानें श्रीशंकर भवानीसह या यज्ञास आले नाहींत. हें पाहतांच लागलाच तर्क केला कीं, हा प्रसंग श्रीशिवास राग आणण्यास व त्यांजकडून या मगरूर दक्षाची खोड मोडण्यास उत्तम आहे, असें समजून तत्काळ त्याची स्वारी तेथून जी निघाली ती कळ लावण्याकरितां थेट कैलासपर्वतावर पोहोंचली. तेव्हां श्रीशंकर कैलासांत नव्हते ते निरंजनवनात ध्यान करण्यास निघून गेले होते. हें एकपरी नारदाच्या पथ्यावर पडलें. मात्र योगमाया महासती दाक्षायणी आपल्या मंदिरांत सख्यांसह आनंदानें सारीपाट खेळत बसली होती. अशा करमणुकीच्या वेळीं अकस्मात् त्रैलोक्यसंचारी नारदाची स्वारी तेथें आलेली पाहतांच भवानीस परमानंद झाला. तिनें त्याला सत्कारपूर्वक एका आसनावर बसावयास सांगून त्रैलोक्यांत संचार करीत असतांना कोठें एखादा विशेष चमत्कार नजरेस पडला असल्यास सांगण्याची आज्ञा केली. ह्याला तरी तेंच पाहिजे होतें. ही संधि बरी आहे असें पाहून त्यानें म्हटलें, 'महादेवी, तूं वेडी तर नाहींस? तिकडे तुझ्या पित्याच्या घरीं यज्ञसमारंभ किती उत्साहानें चालला

याप्रमाणें श्री शिवाची आज्ञा घेऊन नंदीवर आरूढ होऊन देवी भवानी यज्ञसमारंभास निघाली. तेव्हां त्या आदिमातेनें आपल्या अंगावर रुद्रभूषणें धारण केलीं होतीं व रौद्ररूपें धारण केलेले असंख्य शिवगण

---

आहे आणि तुला पहावी तर तूं इकडे सख्यांसह खुशाल गोष्टी करीत बसली आहेस. या तुझ्या भोळेपणाला म्हणावें तरी काय ? मी आतांच दंडकारण्यांतील त्या महायज्ञमंडपांतून थेट येथें आलों. त्या यज्ञसमारंभाचा थाट काय वर्णावा? अशा प्रकारचा मोठा यज्ञ आजपर्यंत कधीं झाला नाही व पुढें होणार नाहीं. तेथें ब्रह्मा, विष्णु, इंद्रादिक सर्व देव, असंख्यात ऋषि, दैत्य, दानव, यक्ष, राक्षस, वगैरे त्रैलोक्यांतील यच्चावत् लोकसमुदाय जमला असून फक्त तुम्ही उभयतां पतिपत्नी मात्र तेथें मला दिसला नाहीं. तुझ्या सर्व बहिणी आपापल्या पतींसह मोठ्या ऐश्वर्यानें यज्ञमंडपांत मिरवत असतां तूं येथें स्वस्थ बसली आहेस हें मला अगदीं योग्य दिसत नाहीं. तुम्ही नसल्यामुळें तुझी माता प्रसूति अगदीं खिन्न झाली आहे. तरी आतांच पित्याच्या घरीं जाऊन तो अपूर्व समारंभ अवश्य पहा.' यावर भवानी म्हणते, 'नारदा, तो यज्ञसमारंभ कितीहि थाटानें चालला असला तरी त्यासंबंधानें आम्हांस जर आमंत्रण अक्षताच आली नाहीं, तर तेथें आमंत्रणाशिवाय आगंतुकासारखें जाण्यांत काय प्रेम आहे ? असें जाणें आम्हांसारख्यांना शोभतें काय ? हें तूंच पहा. शिवाय ज्याअर्थीं बुद्धयाच आमंत्रण दिलें नाहीं, असें उघड दिसतें, त्याअर्थीं आपण होऊन तेथें जाण्यानें मान न मिळतां उलट अपमान होईल. म्हणून तेथें जाण्याची माझी इच्छा नाहीं.' यावर पुनः नारद आग्रहपूर्वक म्हणतो. 'दाक्षायणी तू सूज्ञ आहेस. तुला आपल्या माहेरीं जाण्यास अशा आमंत्रणाची आवश्यकताच आहे काय ? तुझ्या मातापित्यांना गडबडींत तुमच्यासारख्या अगदीं जवळच्या आप्तांना आमंत्रण देण्याची कदाचित् विस्मृति झाली असेल. तशांत यापुढें दक्षराजा असा महायज्ञ करील कीं नाहीं याची वानवाच आहे. शिवाय तेथें आतां गेल्यानें तुला आपल्या सर्व बहिणींची अनायासें भेट होईल व तुझ्या प्रेमळ मातेचा सहवासही घडेल, व त्या सर्वांच्या संगतींत तो काळ आनंदांत जाईल. आतां तूं म्हणतेस त्याप्रमाणें तुम्ही आमंत्रणावांचून एकादे वेळ तेथें

बरोबर घेतले होते. ही सर्व मंडळी रुद्रनामाचा जयजयकार करीत दक्ष-यज्ञाकडे निघालेली पाहतांच श्रीशंकरानीं मनांत म्हटलें कीं, ही दाक्षायणी यज्ञास जात नसून प्रत्यक्ष सर्वनाशच यज्ञमंडपाकडे जात आहे. दक्षप्रजा-

---

गेलांत, म्हणून जन्मदात्या आईबापापासून प्रत्यक्ष स्वतःच्या मुलीचा व जांवयाचा अपमान होणें शक्य तरी आहे काय ? करितां या प्रसंगीं मानापमानाकडे लक्ष न देतां श्रीशंकरांना बरोबर घेऊन तूं खुशाल माहेरीं यज्ञास जा. ही संधि वायां दवडूं नको.' मायाळू मातापिता व प्रेमळ भगिनींची व त्यांबरोबर माहेरची आठवण निघतांच, दाक्षायणीचा आपल्यास आमंत्रण न दिल्याबद्दल आईबापाविषयीं आलेला राग क्षणांत पार मावळून गेला; व ती नारदाच्या सांगण्याप्रमाणें यज्ञास जाण्यास सिद्ध झाली. 'वृद्धापकाळ झाला तथापि स्त्रियांचा माहेरचा मोह मुळींच सुटत नाहीं ' म्हणतात तें खोटें नाहीं. स्त्रियांच्या या निसर्गसिद्ध मनोरचनेला देवी भवानी तरी कशी अपवाद ठरेल ? अर्थात् तिनें महायज्ञास जाण्याचा निश्चय केला. यांत कांहीं आश्चर्य नाहीं. जगन्माता भवानीसारख्या पूर्णज्ञानी योगमायेला-सुद्धां ज्याअर्थीं जाणून बुजून या महायज्ञास जाण्याची बुद्धि झाली, त्याअर्थीं दक्ष-प्रजापतीच्या अपराध-शतकाची पूर्ण भरती झालीच असली पाहिजे नाहींतर दाक्षायणीला अशी बुद्धि झाली नसती. असो मग ही वार्ता श्रीशंकरास कळवून दक्ष-प्रजापतीच्या महायज्ञसमारंभास निघण्याविषयीं त्यांचें मन वळविण्याकरितां देवी महेश्वरी निरंजनवनाकडे निघून गेली. आपलें काम झालें. असें पाहून नारदमुनिही सत्यलोकास चालता झाला.

निरंजन वनांत जाऊन पाहते तों श्रीशिवाचें ध्यान विसर्जन होऊन ते परत येण्यास निघाले होते. इतक्यांत तेथें मोठ्या उत्सुकतेनें आपलीच वाट पहात उभी असलेल्या देवी भवानीस समोर पाहून त्यांना अत्यंत आश्चर्य वाटलें. त्यांनीं मोठ्या ममतेनें तिला जवळ बोलावून प्रेमळपणानें विचारिलें 'देवि, यावेळीं येथपर्यंत त्वरित येण्याचें कारण कोणतें? अशा कोणत्या महत्कार्याचा विचार तूं आतां करीत आहेस? ' तव्हां ती म्हणते, ' महाराज, आपण सर्व जाणतच आहां. मी सांगितलें पाहिजे असें नाहीं तथापि विचारीत आहां म्हणून सांगणें प्राप्त आहे.' असें म्हणून

पति हा केवळ अज्ञान असून त्याच्या देहीं अभिमान फार वाढला आहे. या वृथाभिमानाचें फळ सर्वस्वनाश हाच असणार. माझी प्राप्ति ज्याला करून घ्यावयाची आहे अशा पुरुषानें निरभिमान, समत्व, सत्य व शुद्धाच-

---

भवानीनें आपल्या पित्याच्या यज्ञासंबंधीं सर्व हकिकत त्यांना सांगितली आणि मग आग्रहानें म्हटलें कीं, याप्रमाणें माझ्या पित्याकडे मोठा यज्ञसमारंभ चालला आहे तर आपण उभयतां तेथें जाऊन तो समारंभ पाहूं. तशांत मला माझ्या प्रसूति मातेला भेटून बरेच दिवस झाले आहेत. या निमित्तानें तिचीही भेट होईल. आणि अनायासें सर्व बहिणीसुद्धां एके ठिकाणीं पहाण्यास मिळतील ! यावर श्रीशंकरांनीं युक्तिप्रयुक्तीनें तिची समजूत करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. ते म्हणाले, ' हे देवि, तुझा पिता आमचा अत्यंत द्वेष करितो. त्याचा आमच्यावर मुळींच लोभ नाहीं. त्यामुळें आपल्या जाण्यानें त्यास समाधान होण्याचें बाजूस राहून उलट तो रागावेल व आमची अप्रतिष्ठा करील. त्या अपमानानें आम्हास राग येईल मग त्याचा परिणाम काय होईल हे तुला सांगणें नको. मागें अनेक प्रसंगीं मुद्दाम आमंत्रण देऊन बोलावून घेतलेल्या यज्ञप्रसंगांतून त्यानें आमचा अपमान केला असूनही तो आम्हीं परिणामाकडे लक्ष देऊन सहन केला आहे हें तूं जाणतेसच. शिवाय या यज्ञाचें आमंत्रणसुद्धां आम्हास आले नसतां, आमंत्रणाशिवाय तेथें जाणें आम्हांस योग्य वाटत नाहीं. म्हणून आम्हीं सांप्रत न जाणें हेंच उचित होय ? असा अनेकप्रकारें तिला बोध केला. तथापि तिच्या मनांत नारदाचें भाषण घोळत असल्यानें गेलेंच पाहिजे असें तिला वाटत होतें. म्हणून त्यांना निघण्याविषयीं ती फारच आग्रह करूं लागली. आणि भवितव्यता तशी असल्यानें तीच दाक्षायणीला तिकडे नेत होती असें म्हटलें पाहिजे. भवानी लडिवाळपणें पुनः म्हणाली, ' आपल्यास मातापित्यांच्या मायेची कड माहीत नाही. आपल्या मनांत यावयाचें नसल्यास निदान मला तरी जाण्याची अनुज्ञा असावी. भलत्याच शंका बाळगण्याचें मला तरी कारण दिसत नाहीं. मातापित्यांच्या मायेचा कळवळा किती असतो तो मला व्यक्त करून दाखवितां येत नाहीं. आपण त्या दुःखापासून अलिप्त आहां. पण माझी गोष्ट तशी नाहीं.

रणाचा निर्धार करून तदनुरूप वर्तणूक निश्चयानें व भक्तीनें करावी म्हणजे माझा साक्षात्कार तत्काळ होईल. याप्रमाणें विचार करीत ते स्वस्थ बसले.

## ( ९ ) दाक्षायणीचा अपमान.

इकडे दाक्षायणी त्या सर्व शिवगणांसह लवकरच दंडकारण्यांत आली. येथील दिव्यपर्वत, निसर्गसुंदर वनश्री, पवित्र कृष्णातीर पाहून तिला उल्हास वाटला. इतक्यांत यज्ञ-मंडपाचें दुरून दर्शन होतांच तिला अत्यानंद झाला. तो यज्ञमंप उंचचउंच जणू काय आकाशाला जाऊन भिडला आहे असा भव्य दिसत असून त्यावर जे ध्वज आणि ज्या पताका लाविल्या होत्या त्या विद्युल्लतेप्रमाणें गगनोदरीं लकाकत होत्या. त्या सर्व पताका वाऱ्यानें जेव्हां फडकत तेव्हां समुद्रावर लाटा उसळल्याप्रमाणें दिसत होत्या. त्यांच्या योगानें मंडपाचा वरचा भाग फार शोभादायक दिसत होता. त्या मंडपाच्या सभोंवर जे अनेक हुडे बांधिले होते ते किल्ल्याप्रमाणें दिसत

---

म्हणून माझ्या विनंतीला मान द्यावा.' तिचा तो निश्चय पाहून व पुढील भविष्य जाणून श्रीशंकरास तिला जाण्यास आज्ञा देववेना व तिचें मनहीं दुखवितां येईना. शेवटीं निरुपायास्तव त्यांनीं सांगितलं कीं, 'तूं मातापित्यांच्या ममतेवर विश्वास ठेवून आतां जाण्याचा आग्रह धरीत आहेस; पण तुझा पिता अत्यंत द्वेषी आहे; तो तुझा आदर मुळींच ठेवणार नाहीं तुला तो अपमान मरणतुल्य वाटेल. तूं समजून उमजून बळेंच अपमानरूपी द्वेषाग्नींत उडी घेत आहेस असो. त्वां आतां त्वरित यज्ञास जावें. मात्र तूर्त तरी हीच तुझी शेवटची भेट! पुन्हां कधीं भेटीचा योग येईल तो येवो, असें बोलून त्यांनीं तिला जाण्यास आज्ञा दिली. आणि नंदीबरोबर मोठ्या लवाजम्यानिशीं तिची माहेरीं दक्षयज्ञास रवानगी केली. नंदीशिवाय अष्टभैरव, भूतगण व इतर सहस्रावधि शिवगणही तिजबरोबर गेले त्यांना तर यज्ञास जाण्याचा परमानंद झाला मात्र भवानीचा वियोग झाल्यामुळें श्रीशिवास कैलासास जाववेना म्हणून ते त्या निरंजन वनांतच राहिले.

होते. त्या सर्व हुड्यांतून यज्ञरक्षणार्थ चतुरंग सेनेसह दिशापति सज्ज होते. त्या दिव्य मंडपाच्या अनुरोधानें देवीभवानीसह ते सर्व शिवगण येऊन पूर्व महाद्वारासमोर उभे राहिले. मंडपाची आंतील शोभा अवर्णनीय होती. अंतर्भागीं जिकडे तिकडे रत्नमय दिव्यांचा चकचकाट झाला असून, त्या प्रकाशानें देदिप्यमान दिसणारा तो मंडप विशालदेही रत्नाकरानें आपला जामदारखाना रिकामा करून तेथील सर्वच्च रत्नें या मंडपाकरितां देऊन हा तयार करविला आहे कीं काय असा दिसत होता. या विशाल सुवर्णकांतिमय दिव्य मंडपाच्या मध्यभागीं सुंदर अशा सुवर्णपीठावर रत्नखचित सिंहासन ठेविलें असून त्यावर श्रीविष्णूची स्थापना केली होती. ती पाहतांच शिववल्लभा महासती भवानी रागानें लाल झाली. शिवाय उत्तरमहाद्वारीं कुबेर व पूर्वमहाद्वारीं इंद्रादिक देवगण सहपरिवार असून अग्नि, यम, नैर्ऋत्य, वरुण, वायु इत्यादि आणखी पांच दिक्पाळ पांच दिशांस सहपरिवार स्थापिले होते, आणि या मंडपांत सर्व त्रैलोक्यांतील जनता संपूर्ण वैभवानें दिसत होती. पण ईशान्य दिशा ओस पडली असून तेथें शिवद्रोही, अतिनिंद्य असे अनेक असुर आपापल्या सैन्यासह सावधपणें यज्ञरक्षण करीत राहिलेले दिसत होते. ही व्यवस्था पाहून दाक्षायणीला अत्यंत क्रोध आला. ती म्हणते सर्वत्रांची बुद्धि भ्रष्ट झालेली दिसते. या भ्रष्ट-बुद्धि लोकांचा पुण्यमय श्रेष्ठ भूमीला अतिशय भार झाला आहे. तिला हा परमाधमांचा पापी भार सहन होईना, म्हणून तो उतरविण्याची इच्छा झाली असावी. येथील सर्व श्रेष्ठ देवांची बुद्धि तरी ठिकाणावर आहे कां? नाहीं. तसें मुळींच दिसत नाहीं. यांचें चित्त थाऱ्यावर असतें तर ते दक्षाच्या सांगण्याप्रमाणें वागून त्याचे दास बनून राहिले नसते. शिवाय मला आश्चर्य वाटतें कीं, माझे परम प्रीतींतले पुत्र, उत्तराधिपति कुबेर, आणि दुसरा गणेश हेसुद्धां दक्षाचे दासानुदास बनून त्याच्या अनुमतीनें वागत आहेत. या सर्वांच्या मूर्खपणाला म्हणावें तरी काय? असे अनेक क्रोधजनक विचार मनांत

घोळत असतांनाच बरोबर असलेल्या सहस्त्रावधि शिवगणांसह ती शिवसती महामाया देवी भवानी मंडपांत प्रवेश करण्याकरितां पूर्वमहाद्वाराजवळ आली. तों तेथें एक विपरीतच प्रकार तिच्या दृष्टीस पडला तो असा कीं, तेथील द्वारपाल या शिवगणांतील कोणालाही आंत जाऊं देईनात! ते म्हणाले, ' दक्षप्रजापतीची आज्ञा झाल्यास तुम्हांला आंत सोडूं, त्याशिवाय तुम्हांपैकीं कोणालाही आंत जातां येणार नाहीं ' त्यानीं असें सांगितलें तेव्हां भवानीनें त्यांना म्हटलें कीं ' मी प्रत्यक्ष दक्षकन्या दाक्षायणी असून पित्याला भेटण्यास्तव येथें आले आहें.' यावर द्वारपालांनीं उत्तर दिलें ' हे महाशक्ति देवी, आम्हांला प्रजापतीची अशी सक्त ताकीद आहे कीं, कोणाही शिवगणाला मुळींच आंत सोडूं नये म्हणून आपणांस आंत सोडितां येत नाहीं.' असा प्रतिबंध होतांच तिला वाईट वाटलें. मग तिनें द्वारपालांस म्हटलें, ' या सर्व शिवगणांस येथेंच ठेवून फक्त मला एकटीला तरी आंत सोडावें, म्हणजे मी पित्याची आज्ञा घेऊन येईन मग यांना आंत सोडा.' ही तिची विनंति द्वारपालांनीं मान्य केली; तेव्हां त्या सर्व शिवगणांना महाद्वाराबाहेर ठेवून फक्त भवानी एकटीच नंदीवर आरूढ झालेली तशीच मंडपांत प्रवेश करून मंडपाच्या मुख्य मध्यभागाजवळ ( तृतीय आवरणाजवळ ) आली. मध्यंतरीं, देवी भवानीनें व नंदीनेंही अत्यंत कृश व दीन रूप धारण केलें. मुख्य भागानजीक येतांच तेथें प्रवेश द्वाराजवळ ती नंदीवरून खालीं उतरली व त्यास तेथेंच बसण्यास सांगितलें आणि आपण एकटीच आंत गेली. (जेथें नंदी यावेळीं बसला त्याच ठिकाणीं हल्लीं या क्षेत्रांतील मुख्य नंदीचें देवालय आहे. श्रीवीरभद्रलिंगापुढें मुख्य नंदी नसण्याचें व तो त्या लिंगापासून दूर असण्याचें हेंच कारण आहे. आतां तो वायव्य दिशेकडे कां पाहतो त्याचें कारण पुढील भागांत सांगितलें आहे.

ती दीनरूपा, एकाकी अशी शिवसती महादेवी निःशंक मनानें यज्ञमंदिरांत गेली व तिनें तेथील अपूर्व शोभा पाहिली; तेथें तिच्या सर्व बहिणी

मोठ्या ऐश्वर्यानें आलेल्या तिला दिसल्या; परंतु त्या कृशांगी, दीनवदनी, महादेवी भवानीला पाहून त्या सगळ्याजणींना परम आश्चर्य वाटलें. त्यापैकीं एकटीसुद्धां तिजबरोबर बोलेना. इतक्यांत सर्वानिपुण अशा प्रसूति मातेचें लक्ष तिजकडे गेलें. आपली श्रेष्ठ कन्या देवी भवानी हिचें तें दीन स्वरूप पाहून तिला अत्यंत कळवळा आला, तिनें धांवत येऊन दाक्षायणीला कडकडून आलिंगन दिलें. तेव्हां दोघींना परमानंद झाला. प्रसूतीनें आनंदानें तिला आपल्याजवळ बसवून घेऊन तिचा सर्व वृत्तांत विचारिला. आनंदाचा पहिला उमाळा ओसरून जातांच, त्या माउलीनें भवानीच्या वस्त्रालंकाराकडे निरखून पाहिलें तेव्हां ती मनांत अत्यंत खिन्न झाली तिला दुःखातिशयानें हुंदका आला. स्त्रियांचें अंतःकरण कोमल असल्या कारणानें आपल्या कन्येचें दीनवदन पाहून प्रसूतिमाता गहिंवरली यांत आश्चर्य नाहीं. तिनें तत्काळ आपल्या हातांतील जडावाचीं कांकणें काढून तिच्या हातांत घातलीं व उंची वस्त्रें आणण्यास्तव दासींना सांगून ती पुन्हां भवानीपाशीं आली तों आदिशक्ति महादेवीनें तिला आपलें विशाळ रूप दाखविलें. सहस्त्रावधि चंद्र-सूर्यांचा प्रकाश जिच्या नखाच्या प्रभेच्या पासंगासही लागणार नाहीं असें तें आदिमायेचें दिव्य रूप पाहून प्रसूतिमातेचें हृदय आनंदानें भरून गेलें. ती म्हणते, ‘ बाळे, तुझें हें दिव्य स्वरूप न कळल्याकारणानें आणि बाह्यतः दिसणारी तुझी दारिद्र्यावस्था पाहून मला अत्यंत खेद झाला; परंतु तो माझा भ्रम त्वां निरसून आपल्या पूर्ण स्वरूपाचें मला ज्ञान करून दिलेंस; त्यामुळें माझा मायामोह दूर होऊन तूं फक्त माझी वडील कन्याच केवळ नाहींस तर चराचर विश्वाची आदिमाता आहेस. श्रीशिवाची मायाशक्ति तुजमध्यें पूर्ण प्रतिबिंबित झाली असून ह्या माझ्या इतर सर्व कन्या तुझ्या दास्यत्वालाही लायक नाहींत, असें मला वाटूं लागलें आहे. ’ असा त्या प्रसूतिमातेनें आपला दृढ विश्वास व्यक्त करून तिच्या भगिनींना तिनें ‘ अंबेस भेटा ’ असें सांगितलें व आपण दुसऱ्या कामास लागली.

तिच्या इतर बहिणी शृंगार करून आपापल्या सुंदर कन्यापुत्रांसह थाटामाटानें बसल्या होत्या. त्यांना त्या आदिमायेच्या पूर्ण स्वरूपाचें

ज्ञान कोठून असणार ? जड दृष्टीस दिसणारीं तिची तीं भगवीं वस्त्रें, ताडपत्राचे व स्फटिकाचें कानांतील दागिने, गळ्यांतल्या रुद्राक्षांच्या माळा व शंखांचे व सर्पांचे हार, कपाळीं भस्म आणि केसांच्या जटा वाढलेल्या अशाप्रकारचें तिचें विचित्र ध्यान पाहून सर्वजणीं आश्चर्यानें थक्क झाल्या. आणि म्हणूं लागल्या कीं,' हिच्या भगव्या वस्त्रांचा गेरू लागून आमचीं उंची वस्त्रें मलिन होतील ! हिला आलिंगन द्यावें तर हिच्या विभूतीचे हात लागून आमचे अमूल्य अलंकार खराब होतील! शिवाय आमच्या सुंदर कन्या-कुमाराना या निपुत्रिक दरिद्री अवदशेची दृष्ट लागणार ! हिच्या पोटीं संतति नसल्यानें ह्या निपुत्रिक दाक्षायणीचें तोंड पाहणें अति अपवित्र होय.' अशी तिची निर्भर्त्सना करूं लागल्या. इतक्यांत त्यांतील तिची बहीण अदिती भवानीपाशीं येऊन तिचा हात धरून म्हणते, 'तूं आम्हा सर्वांची वडील बहीण आहेस; तर आम्हां धाकट्या बहिणींकरितां कोणत्या वस्तु आणिल्या आहेस ? ' असें विचारून नंतर 'अगे ताई, तुझी अशी दशा कां झाली आहे ? तुझ्या जामदारखान्याचा अधिकारी प्रत्यक्ष धनपति कुबेर असतां तुझ्या अंगावर हे शंख, शिंपा, स्फटिक मण्यांचे दागिने कां आहेत ? तुजकडे कल्पवृक्ष असतां वस्त्रांस गेरू कां ? आणि इच्छितफल देणाऱ्या कामधेनूंचा कळपच तुझ्या येथें असतांना तूं अशी वाळलोस कशानें ? ' अशाप्रकारें ती टोंचून विचारीत आहे तोंच कद्रू तिला म्हणाली. 'अगे अदिती, तूं तिला असल्या गोष्टी काय विचारीत आहेस ? हिच्याविषयीं तुला अद्याप चांगली माहिती नाहीं ! ऐक तर नीट. नित्य भस्म लागतें म्हणून शेणासाठीं त्या कामधेनु पाळिल्या आहेत ! स्मशानांत हिंडून शीण होत असल्यानें सावलींत बसण्यासाठीं कल्पवृक्ष आहेत ! घरोघर भिक्षा मागून पोट भरणारी ही ! आणि तूं तिला विचारितेस कीं काय वस्तु आणिल्या म्हणून ! ' नंतर दिती व षण्नेत्रा म्हणाल्या. 'ही काय पाहून त्या भिकारड्या शंकराला भाळली कोण जाणे ! तो गज-व्याघ्रादिकांचें चर्म पांघरतो, स्मशानांत राहतो,

घरांत खाण्यापिण्याचे हाल होतात म्हणून कंदमुळें खातो. वेळेवर कांहीं न मिळालें पर नरमांससुद्धां भक्षण करितो ! असा तो खादाड भूतेश्वर आहे. पण ‘ शंकर ’ ‘ ईश्वर ’ ‘ महादेव ’ अशीं नांवें मात्र भलीं थोरलीं ठेवून घेतलीं आहेत. म्हणतात ना–‘ नांव मोठें पण लक्षण खोटें ’ तशां-तली गत. अगे, ज्याला स्वतःचें कल्याण करून घेण्याची अक्कल नाहीं, तो जगाचा ‘ शंकर ’ ( शं + कर = कल्याणकर्ता ) कसला ? आणि पिसा-टांचा मेळा अक्षयीं जवळ बाळगणारा हा ‘ ईश्वर ’ कसला ? वडें भूत किंवा भूतेश्वरच हा ! ’ यांची कुचेष्टा संपते न संपते तोंच हिरण्यगर्भा पुढें येऊन म्हणते, ‘ हिनें येथें येऊन या मंडपशोभेस काळिमा मात्र आणिला. हिची धिंडका येथें आल्यानें सर्व देवमंडळात दक्षप्रजापतीला लाजेनें खालीं पहावें लागलें. आमच्यांत हीच एवढी कंगाल कशी झाली कोण जाणे ! ’

अशा रीतीनें त्या सर्व बहिणींनीं तिची कुचेष्टा चालविली. तेव्हां देवी भवानी खालीं मान घालून उभी राहिली होती व तीं सर्व निंदायुक्त दुरुत्तरें तिनें मुकाट्यानें ऐकून घेतलीं. वर तोंड करून बोलण्याससुद्धां त्या तिला वाव देत नव्हत्या. यावेळीं देवीला श्रीशंकरांनीं सांगितलेल्या हितप्रद उपदेशाची आठवण झाली; आणि आपण कोठून या अप्रतिष्ठेत येऊन पडलों असें तिला वाटूं लागून पतीच्या आज्ञेचें उल्लंघन करण्यानें कसें प्रायश्चित मिळतें, याची थोडी प्रचीति आली.

अशा प्रकारें आपल्या प्रिय भगिनींकडून झालेली शोभा निमूटपणें सहन करून, परंतु अंतरीं संतापानें लाल होऊन पुढें ती शिवसती दाक्षायणी यज्ञ-कुंडाकडे आपला पिता दक्षप्रजापति जेथें बसला होता तिकडे त्याची भेट घेण्याकरितां चालली. जेव्हां ती यज्ञदीक्षा घेतलेल्या दक्षप्रजापतीजवळ जाऊन नम्रपणें साष्टांग नमस्कार करून उभी राहिली, तेव्हां पुष्कळ दिवसा-नंतर आपल्या प्रिय कन्येचें दर्शन झालेलें पाहून त्याला परमानंद झाला; परंतु तिचें हीनरूप पाहून त्याला अत्यंत कळवळा आला. त्यानें तिला

प्रीतीनें कुरवाळून जवळ बसवून घेतलें. तिची ती दीनावस्था अवलोकन करून त्याचा कंठ दाटून आला व ब्रह्मदेवादिकांच्या सांगण्यावरून अशा या सुंदर सद्‌गुणसंपन्न प्रिय बाळेला त्या दिगंबर गोसावड्याच्या स्वाधीन केली, ही अत्यंत घोडचूक झाली असें वाटून त्याला फार पश्चात्ताप झाला. इतक्यांत देवी भवानीनें तेथील तो सर्व यज्ञप्रकार सूक्ष्मदृष्टीनें अवलोकन केला. तेथें अपार द्रव्यदक्षिणा देऊन संतुष्ट केलेले ते सर्व यज्ञकर्ते ऋषि व विप्र यथाप्रकार वेदघोष करीत व सर्व देवांना यज्ञाची आहुति देत बसले होते; परंतु त्या सर्वांत श्रेष्ठ अशा श्रीशंकराचें अवदान मात्र तेथें खरोखर कोणीच घालीना. तें पाहतांच देवीला कंटाळा आला व ती अतिशय क्रुद्ध झाली; तिच्या अंगीं रुद्रकोप प्रगटला. तेव्हां कोट्यवधि सूर्यांचा प्रकाश एकवटावा तसें तिचें मुखमंडळ दिव्य तेजानें उग्र दिसूं लागलें. नंतर क्रोधावेशानें ती पित्याला अनुलक्षून म्हणते, ' हे पितया, माझा नाथ श्रीशंकर हा त्रैलोक्यनायक असून त्याला न मानितां जर तूं त्याची अवज्ञा करिशील तर तत्काळ विनाश पावशील. माझा पति यज्ञभोक्ता, यज्ञाचा स्वामीच आहे हें तूं जाणत नाहींस काय ? अथवा हें समजत असूनही तूं दुराग्रहानें हा यज्ञ मांडिला आहेस, त्यामुळें तुझा नाश होईल तो होऊं न द्यावा म्हणून मी मुद्दाम सत्वर येथें आलें आहें. तुम्ही सर्व आपला संहार करून घेऊन भूमीचा भार हलका करण्याकरितांच हा वेदबाह्य यज्ञ आरंभिला आहे काय ? देवाधिदेव श्रीसदाशिव हा सर्वश्रेष्ठ असून त्याच्या मंगल नाममालें जगाचा उद्धार होतो. असा त्याचा अपूर्व महिमा असतां कोणत्या बलिष्ठ देवाच्या बळावर तूं इतका गर्व करितोस ? व महादेवाचा भागसुद्धां न देतां यज्ञ करितोस याचें आश्चर्य वाटतें. ' दाक्षायणीचें हें भाषण ऐकून दक्ष ह्मणतो. ' हे बाळे दाक्षायणी, तूं न बोलावितां, या ठिकाणीं आलीस कां ? व येथें येऊन स्वस्थ न बसतां हें भलभलतेंच काय बडबडत बसली आहेस ! मी विष्णुभक्त श्रीविष्णु-तोषणाकरितां हा यज्ञ करून त्याला संतुष्ट करीत आहें. तुझा पति महाद-

रिद्री, रूपहीन, अतिभयंकर व अपवित्र आहे. त्याचें येथें बिलकुल काम नाहीं.' हें त्या दक्षेश्वराचें उर्मटपणाचें, कर्णकटु शिवनिंदापर भाषण ऐकून देवी भवानी संतापातिशयानें लाल झाली आणि दुर्धर वाणीनें म्हणते. ' हे दक्षप्रजापते, हा तुझा यज्ञ मुळींच सिद्धीस जाणार नाहीं. त्रैलोक्यवंद्य अशा श्रीशिवाचा भाग तूं अभिमानानें या यज्ञांतून काढून टाकिलास यामुळें हा यज्ञ अत्यंत त्याज्य व निष्फळ होय. अहो, सिंहाचें भक्ष्य कोल्हा कधीं पचवील काय ? त्वां विधियुक्त यज्ञास प्रारंभ केला नाहींस व श्रीशिवाची यथेच्छ निंदा केली; असे तूं अनंत अपराध केले आहेस, त्यांचें फळ तुला लवकरच मिळेल या अविचारानें तुझा विनाशकाळ जवळ आला हें पक्कें समज.' असें दक्षराजास बोलून नंतर तेथें जमलेल्या सर्व देव, दानव, ऋषिगणांस उद्देशून ती क्षुब्ध होऊन म्हणाली. ' तुम्ही सर्वजण जणू स्वतःच्याच मरणाचें हें सत्र आरंभिलें आहे. हे विष्णु, तूं स्वतः ज्ञाता आहेस आणि श्रीशिवस्वरूपाचें नित्य ध्यान करीत असल्यामुळेंच श्रीशंकरांनीं प्रसन्न होऊन तुला सुदर्शनचक्र व वैकुंठभुवनाचें वैभव दिलें, त्याचा तुला इतक्यांत विसर पडला काय ! अशा समर्थ सदाशिवाला वगळून त्वां यज्ञाचा भाग कसा घेतला ? तूं समक्ष येथें राहून सर्वसमर्थ त्रिलोचनाशीं भिन्नता उत्पन्न करीत आहेस. तस्मात् तूंच या सर्वनाशाचें मूळ कारण आहेस. तुजकडूनच माझ्या पित्याचा घात होत आहे. असें जर नसतें तर माझा पिता दक्षप्रजापति हा सर्व मंगलकारक श्रीशंकराची शांति करावयाचें सोडून त्याला अजीबाद वगळून आत्मघातकी अशी तुझी भक्ति तुजदेखत करतां काय ? अर्थात् हा सर्व खरोखर तुझाच खेळ आहे. आणि हे भृगो, तूंही माझ्या पित्याप्रमाणेंच ब्रह्मपुत्र ब्राह्मण असून ईश्वराचें गुणानुगुण पूर्ण जाणत आहेस असें असतां श्रीशंकराला वगळून तूं यज्ञ कसा पूर्ण करितोस ! या कृत्यानें तुझी गति काय होईल हें कळत असतांना द्रव्यादि विषय–स्वार्थी-लपट होऊन शिवमाहात्म्य दृष्टिआड करून आपला घात आपण होऊन कां करून घेत आहेस ? व माझ्या पित्यास भ्रमांत कां पाडीत आहेस ? हे ब्रह्मदेवा, तूं सर्व गुणसं-

पन्न आहेस व परमेश्वराचा महिमा पूर्ण जाणत आहेस. तेव्हां आपल्या मानसपुत्राला बोध कां करीत नाहींस? श्रीविष्णूच्या प्रार्थनेवरून तुझें पांचवें मुख छेदून महादेवानें तुझा अभिमान घालवून तुला चतुर्मुख करून ठेविलें. आणि मधुकैटभ दैत्यांच्या भयानें जेव्हां तूं त्रस्त होऊन श्रीशिवास शरण गेलास, तेव्हां त्यांचा त्रास दूर करून तुला सत्यलोकीं स्थापून निर्भय केला. हें सर्व तूं जाणत असूनही कोणाच्या सामर्थ्यावर तूं हें यज्ञकार्य करण्यास प्रवृत्त झालास? यावरून तूंच दक्षप्रजापतीच्या सर्वस्व-नाशास मूळ कारण आहेस. देव, दानव, गंधर्व, यक्ष, राजे, महाराजादिक सर्व जनहो, आतां तुम्हीं दक्षप्रजापतीचें रक्षण करण्यास समर्थ आहां काय? या महासंकटांत त्याचें रक्षण कराल तर तुम्ही समर्थ होय. अहो अत्रि, वसिष्ठ, कश्यप, कण्वादिक ब्रह्ममूर्ति ऋषिगणहो, तुम्हांस समजत नाहीं काय? कीं, श्रीशिवाचें नामस्मरण हेंच जन्ममरणाचा फेरा चुकविण्यास समर्थ आहे तें! आणि तुमचे ते वेद, शास्त्रें व पुराणें कंठशोष करून हाच उपदेश करीत असतां, तो सांच कीं मिथ्या हा भ्रम तुम्हास पडावा काय? मग त्यांचा तो कंठशोष केवळ अरण्यरुदनच काय? तुम्ही श्रीशिवाला वेदबाह्य करून इतरांना अवदानें देत आहां. त्यास्तव याच ठिकाणीं लवकरच तुम्हां सर्वांचा संहार होईल. मला आश्चर्य वाटतें तें हेंच कीं, इतक्या सर्वांना एका काळींच कशी भूल पडली? नवग्रहांचा संबंध सुटून तुमचें प्राक्तन आतांच तुम्हाला अधोगतीस नेत आहे. मला आतांच ही यज्ञभूमि तुमच्या रक्तानें न्हाऊन गेलेली दिसत आहे. तुम्ही ज्या विश्वव्यापी सदाशिवाला वेदबाह्य ठरवून आपल्या मनोमंदिरांतून घालवून देऊन पूर्ण निरीश्वरवादी बनला आहां, त्या श्रीमहादेवाचें माहात्म्य किती आहे तें एकदां नीट ऐका. परमात्मा श्रीसदाशिव सर्वांतर्यामीं पूर्ण भरला असून सर्वाला तोच मूळ कारण आहे. त्याचा जे तिरस्कार करितात ते सर्व नरकीं जातात. येथें सध्यां कालि निर्माण झाला असून, तुम्हां सर्वांचा नाश करावयास तो टपला असल्यानें तुम्हां

सर्वांचा अधःपात होईल, हाच निश्चय होय.' असें बोलत असतां तिच्या अंगीं रुद्रक्षोभ भरला व ती रौद्रावतारी महादेवी भयंकर संतप्त झाली.

हें तिचें तीक्ष्ण भाषण ऐकून दक्षप्रजापतीसही संताप आला. तो क्रुद्ध स्वरानें तिला म्हणतो ' अगे मुली, तूं उगी बैस, मूर्खासारखी ही काय बडबड लाविली आहेस. तुझा तो गोसावडा नवरा मूर्ख व व्यंग आहे म्हणूनच त्याला येथें आणिला नाहीं. खरोखर मीच अज्ञानी म्हणून जाति गुण, कुल, वर्ण यांचा मुळींच विचार न करितां म्यां त्यास कन्यारत्न अर्पिलें. खरोखर हें मर्कटाला सुपुष्प अर्पणच झालें आहे! आतां त्या मर्कटाचाच गुणगौरव तूं करीत आहेस तस्मात् आतां तुझाही मी त्याग केला आहे. याउपर तूं माझी कन्या नाहींस. तुझा पति भ्रष्ट मानिल्या-कारणानें साहाजिकच तो वेदहीन व सर्वस्वीं अमंगळ झाला आहे.' असें म्हणून तो महाअभिमानी दक्षराजा थोर थोर ऋषीश्वरांकडे वळून म्हणतो ' शंकर हा वेदबाह्य, अतिपामर, कुळहीन, जातिहीन, वर्णहीन, कर्महीन, मंदमति, निर्लज्ज असा भूत-प्रेत-पिशाचपति आहे. त्या स्मशानवासी राक्ष-साबरोबर सदा भूतें असतात म्हणून त्याला आम्हीं महाभूत हें नांव ठेविलें आहे. त्याच्यांत देवत्व कोठून असणार? यास्तव तुम्ही तिच्या बडबड-ण्याकडे मुळींच लक्ष न पुरवितां स्वस्थ चित्तानें यज्ञकार्य करा.'

त्या अविचारी दक्षाची ही कर्णकटु शिवनिंदावाणी ऐकून दाक्षायणीचा क्रोधाग्नि अधिकच भडकला. ती खदिरांगाराप्रमाणें लाल झाली. आणि दक्षप्रजापति व सर्व देव, ऋषिगणांना उद्देशून गर्जना करून म्हणते. ' येथें श्रीशिवाची अत्यंत तिरस्कारयुक्त निंदा होत असून त्यांना आहुति न घालितां अति अन्यायानें यज्ञ होत आहे. जेथें मम प्रियपति महादेवाचा अवमान होत आहे. तेथें माझा अपमान न झाला तरच आश्चर्य. तेव्हां अपमानरूपी विषानें काळवंडून गेलेलें हें शरीर जिवंत ठेवून काय उपयोग? शिवाय श्रीशिवनिंदक, महापापी, अधम दक्षापासून प्राप्त झालेला हा निंद्य देह आतां न ठेवितां अग्नींत दहन करून टाकितें. तुम्ही मूर्खपणानें ज्या

अहंकाराचा आंगिकार केला आहे तोच साक्षात् कालि होय. त्याचा संहार परमेश्वर करील. प्रलयकाळीं सर्व ब्रह्मांडाचा क्षणांत संहार करणाऱ्या सर्व-समर्थ ईश्वरापुढें ह्या क्षुद्र प्रजापतीचा काय पाड ? पण याच्या या अवि-चारी वर्तनानें मी मात्र सध्यां माझ्या प्रिय सदाशिवाला सर्वस्वीं अंतरलें. अरे दक्षा, ज्या मज मानिनीचा तूं अपमान केलास तें माझें तुमच्या कु-चेष्टेनें काळवंडलेलें काळें तोंड महादेवास दाखविण्यापेक्षां अग्नींत देहाचा होम करावा हेंच उत्तम. या माझ्या अवमानपीडित देहानेंच तुझ्या यज्ञाची पूर्ति होऊं दे. अरे, पापी दुराचारी जनहो, श्रीशिवनिंदा ऐकणारे तुम्ही सर्व अघोर नरकीं बुडाल. सर्वांत श्रेष्ठ अशा सर्वेश्वराचा भाग न देतां, त्याची यथेष्ट निंदा करणारे तुम्हीं महाघोर संकटीं पडाल. आणि मूर्खा दक्षा, इतका वेळ मी जीव तोडून बोध करीत असतांही त्याचा तुजवर मुळींच परिणाम न होतां, तूं पाषाणाप्रमाणें स्तब्ध बसलास त्याअर्थीं लव-करच तुला पाषाणस्वरूपच प्राप्त होईल.'

अशा प्रकारचें देवीचें निर्धाराचें निंदाव्यंजक भाषण ऐकूनही त्याचा दक्षाच्या मनावर कांहीं परिणाम झाला नाहीं. त्यानें तिकडे अगदीं दुर्लक्ष केलें; परंतु देवी भवानीचें त्यावेळचें तें उग्र स्वरूप पाहून सर्व ऋषि गर्भगाळित झाले, त्यांचे हातपाय लटपटूं लागले. सर्व देवही तटस्थ झाले आणि ऋषि–मुनींचें हवनकार्य बंद पडलें !

## (९) अग्नीस देवीचें देहार्पण.

मागें सांगितल्याप्रमाणें संतापातिशयानें भडकून तप्त झालेल्या देवी भवानीनें जवळपासचीं यज्ञाचीं भांडीं भिरकावून व पायांनीं लाथाडून विध्वंसून टाकिलीं. मग मुख्य व महाविशाल अशा भयंकर ज्वाळा निघत आलेल्या आहवनीय अग्निकुंडाच्या समीप भागीं, पापी दक्षापासून प्राप्त झालेला निंद्य देह अग्नीस समर्पण करून आपण शुभ कल्याण पावावें. असा विचार करून निर्वाणसमर्याचें योगासन घालून ती बसली. आणि ईश्वरप्राप्तीचा निश्चय करून तिनें मनांत विचार केला कीं, हा दृश्यमान्

देह, पंचमहाभूतरूपी कर्दमानें सत्व, रज, तमोगुणांनीं युक्त असा, माता पित्याच्या संयोगानें मायामोहापासून उत्पन्न झाला आहे. तर याचा नाश करणें अवश्य आहे. कारितां, आतां या मायामोहाचें निरसन, करून शुद्ध-स्वरूपाचें ध्यान केल्यास मी पूर्ण शिवस्वरूपी होईन. ईश्वरपदाचा विचार करणें असल्यास निर्विकार अशा शुद्ध ज्ञानाचा आपल्या अंतःकरणांतच शोध करावा. कारण आत्मा अविनाशी आहे आणि तो निर्लेप, सर्वत्र परिपूर्ण व सच्चिदानंदस्वरूप आहे. तो कधीं जन्माला येत नाहीं व कधीं मरत नाहीं. त्याला सुखदुःखादि विकार कधीं होत नाहींत. ज्याप्रमाणें सूर्य हा सर्व लोकांच्या नेत्रांत नेत्रेंद्रियरूपानें राहिला आहे. तथापि अंधत्वादि नेत्रदोषानें तो कधींच लिप्त होत नाहीं. तसाच आत्मा हा निरंतर अनेक प्रकारच्या देहांना परिपूर्ण व्यापून राहतो, म्हणून देहासंबंधानें त्याला अनेकत्व भासतें, परंतु वस्तुतः तो एकरूपच आहे. ह्याच कारणानें देहाचा नाश झाला तरी आत्मा मरत नाहीं. हा स्थूल देह नाशवंत आहे. अर्थात् त्याचे भागही ( अवयवही ) अशाश्वत आहेत. तथापि हे सर्व मनाच्या स्वाधीन आहेत. मन हें संकल्प-विकल्पात्मक आहे. आणि यापासूनच स्थूलदेहाकडून इंद्रियद्वारें पाप-पुण्यादि सर्व व्यवहार होत असतात. स्थूलदेहाचा नाश होतांच, त्याच्या सर्व चित्रविचित्र पापमय कर्मांचा भोग दुःख व दुर्धर रोगरूपांनीं लिंगदेहाला भोगावा लागतो; आणि जर पुण्यमय कर्में जास्त झालीं असतील तर स्वर्गभोग प्राप्त होतो. आणि ' क्षीणे पुण्ये मृत्युलोकं विशंति । ' या नियमानें पुण्यसंचय संपतांच तो लिंगदेही पुन्हा भूमीवर स्थूलरूपानें प्रकट होतो. मूळचाच पापात्मा अपार दुःख भोगण्यासाठींही पुन्हा जन्म घेतो. अनेक जन्मांतील पाप-संचयानें दुष्ट योनींतच तो जन्म घेतो. नीच योनींतील प्राणी यामुळेंच अनेक जन्मीं दुःखें सोशीत त्या पतित देहानें वावरत असतात. पुढें जेव्हां अनुताप पावून सन्मार्गाकडे त्यांची प्रवृत्ति होते, तेव्हां कालांतरानें त्याला शुद्ध ज्ञान होतें. नंतर त्याला निर्गुण भगवत्पदाची प्राप्ति होते. सत्व-गुणात्मक पुण्याधिक्यानें शुद्ध--सत्वाची वृद्धि होते; व शुद्धसत्वानें ज्ञान

होतें. त्या ज्ञानापासूनच वैराग्य येतें. शुद्धज्ञान तीच समाधि होय. आणि समाधिस्थितींतून सगुण उपाधींचा निरास करून आपण निर्गुणाचे प्रतिपादन करूं लागलों कीं, तेंच ईश्वराचें स्वरूप होय. अशा ईश्वरस्वरूपीं मी शुद्धमन ठेवून चिंतन करितां सद्‌गुरुकृपेनें मी निर्विकल्प समाधि पावलें. व त्या निर्विकल्प समाधीपासून जें शुद्ध ज्ञान घडलें त्यायोगें मी नित्य, निर्मल, निरंजन असें पूर्ण स्वरूप पावलें. आतां हें दक्षाचें वासनात्मक, निंदापर शरीर मी आज अग्नीस अर्पून टाकितें; असा देवीनें दृढ विचार केला. शुद्धज्ञान प्राप्त होऊन जे निर्विकल्प समाधीस पोहोंचलेले असतात ते देही असूनही देहातीत असतात. त्यांनीं स्वच्छेप्रमाणें देह विसर्जन केल्यास, त्यांना आत्महत्येचा प्रमाद बंधनकारक होत नाहीं. म्हणून शिवसतीनें लौकिकरीत्या पापात्म्यापासून प्राप्त झालेलें निंदायुक्तशरीर श्रीशंकरास कसें दाखवूं असा भाव प्रकट केला. तथापि अंतरीं निर्गुण परमात्म्याला आपले गुण अर्पून आपण तद्रूप होऊन जाण्याचा निश्चय केला. व ती त्या परमात्म्याची स्तुति करूं लागली. आणि आपण निर्गुण मुक्ति साधण्याकारितां ईश्वरस्वरूपीं अनुसंधान लाविलें, म्हणजे योगसमाधि लावून तिनें निर्गुणस्वरूपाचें ध्यान केलें. तें असें--
* हे शरणागत दुःखनाशका, हे विश्वेश्वरा, हे विश्ववंद्या, गंगाधरा, हे चंद्रशेखरा शंभो, जसें भूमीवर वृक्षलतादि उत्पन्न होतात तसें हें जगत् तुझ्यापासून उत्पन्न झालें. तें नित्य तुझ्याठायीं राहतें व तुझ्याठायींच लय पावतें ब्रह्मदेव, इंद्र, एकादश रुद्र, मरुद्गण, गंधर्व, यक्ष, असुर, सिद्ध, गंगादि

---

* त्वत्तोहि जातं जगदेतदीश त्वय्येव भूतानि वसंति नित्यम्
त्वय्येव शंभो विलयं प्रयांति भूमौ यथा वृक्षलतादयोऽमी ॥१॥
ब्रह्मेंद्ररुद्राश्च मरुद्गणाश्च गंधर्वयक्षासुरसिद्धसंघाः
गंगादिनद्यो वरुणालयाश्च वसंति शूलिंस्तव वक्त्रमात्रे ॥२॥
त्वन्मायया कल्पितमिंदुमौले त्वय्येव दृश्यत्वमुपैति विश्वम्
भ्रात्या जनः पश्यति सर्वमेतच्छुक्तौ यथा रूप्यमहिं च रज्जौ ॥३॥

नद्या व समुद्र हे सर्व तुझ्यापासूनच निर्माण झाले आहेत. हे भालचंद्रा, तुझ्या मायेनें कल्पिलेलें हें विश्व तुझ्याच स्वरूपीं प्रतीतीला येतें. हे देव-देवा, तूं आपल्या तेजानें सर्व जगत् व्यापून तें प्रकाशित करतोस, तुझ्या प्रकाशावांचून तें क्षणमात्रही दिसणार नाहीं. तसेंच जें तुझें शरीर जग-ताला आधारभूत दिसत आहे तेंही विचारदृष्टीनें पाहूं लागलें असतां, माझ्या अज्ञानानेंच कल्पिलेलें आहे कारण तूं सच्चिदानंदस्वरूप असून, सर्वत्र परि-पूर्ण आहेस. अज्ञानानें मूढ बनलेले पुरुष, पूजा, यज्ञ, दानाध्ययनादि बाह्य कर्मांनीं भगवान् श्रीशंकर संतुष्ट होतो असें प्रतिपादन करितात; तें मिथ्या आहे. कारण, तुला देहच नाहीं, अर्थात् विषयभोगेच्छा तरी कोठून असेल ? एक पुराणपुरुष जो तूं, तोच पुरुषरूपानें दिशा-विदिशा सर्व विश्व व्यापितोस; परंतु घट नष्ट झाला तरी घटाकाशाचा जसा नाश होत नाहीं. तसें हें जगत् नष्ट झालें, तथापि तुझा नाश होत नाहीं. जसें आरशांत असणारें सूर्यबिंब एकच असून उदकानें पूर्ण अशा अनेक पात्रांत प्रतिबिंबरूपानें अनेकत्व पावतें, तसा तूं एकरूप असून अंतःकरणाच्या अनेकत्वामुळें अनेकत्व पावला आहेस. विश्वाची उत्पत्ति करणें, रक्षण करणें व नाश करणें ह्यांपासून तुला कांहीं कर्तव्य नाहीं. तथापि अनादिसिद्ध अशीं जीं प्राण्यांचीं प्रारब्धें त्यांना सहाय्य घेऊन सर्व स्वप्नवत् करितोस. जीव आणि ईश्वर ह्यांस बिंब आणि प्रतिबिंब इतकाच भेद आहे. स्थूल आणि सूक्ष्म अशा ह्या जडरूप देहद्वयांत आत्मतत्त्वा-वांचून दुसरा चैतन्यांश नाहीं. म्हणून त्या देहद्वयापासून होणारीं जीं सुखदुःखें त्यांचा तुझ्या ठिकाणीं श्रुति केवळ आरोप मात्र करितात; वास्त-विक तसें नाहीं. तस्मात् हे भगवान् सच्चिदानंदरूप, कालस्वरूप, नीलकंठ, सर्वसाक्षी परमात्मन् तुला माझा नमस्कार असो. असें ध्यान करून

---

१ तेजोभिरापूर्य जगत्समग्रं प्रकाशमानः कुरुषे प्रकाशम्
विना प्रकाशं तव देवदेव न दृश्यते विश्वमिदं क्षणेन ॥४॥
अज्ञानमूढा मुनयो वदंति पूजोपचारादिबहिःक्रियाभिः
तोषं गिरीशो भजतीति मिथ्या कुतस्त्वमूर्तस्य तु भोगलिप्सा ॥५॥

नंतर योगाग्नि प्रदीप्त केला. तोंच तीन्ही अग्नि शरीरीं चेतून तिच्या नाका-डोळ्यांतून अग्नीच्या भयंकर ज्वाळा भडकल्या आणि तिचा सर्व देह तप्त सुवर्णाप्रमाणें लाल झाला. यावेळीं सर्वत्र भयानक देखावा दिसूं लागला. इतक्यांत त्या आदिमाया महादेवीनें आपलें योगाग्नीनें देदीप्यमान झालेलें दिव्य शरीर सर्वांच्या समक्ष कापराप्रमाणें जाळण्यास सुरवात केली! तोंच तिच्या शरीराच्या त्या दिव्य ज्वाळा महायज्ञकुंडांत प्रदीप्त झालेल्या

---

यथैकमाकाशगमर्कबिंबं क्षुद्रेषु पात्रेषु जलान्वितेषु
भजत्यनेकप्रतिबिंबभावं तथा त्वमंतःकरणेषु देव ॥६॥
नमः सच्चिदंभोधिहंसाय तुभ्यं नमः कालकंठाय कालात्मकाय
नमस्ते समस्ताघसंहारकर्त्रे नमस्ते मृषाचित्तवृत्त्यैकभोक्त्रे ॥७॥
( शिवगी. अ. ७ )

१ देवी भवानीची ही कृति, कांहीतरी पुराणांतील अतिशयोक्तीची गप्प या सदरांतली नसून योगशास्त्राच्या नियमानुसार योग्याची निर्वाणसमयीं होणारी आत्यंतिक श्रेष्ठ स्थिति होय. या सर्वश्रेष्ठ अवस्थेविषयीं पातंजल महामुनींनीं आपल्या योगशास्त्रांतील सूत्रांत उल्लेख केलेला आहे तो असाः—

सूत्रम्— समान जयाज्ज्वलनम् ।

पातंजलयोगसूत्रम्-विभूतिपादः-४०

सूत्रार्थ-समानवायूचा संयमानें जय केल्यानें योगी अग्नीसारखा देदीप्यमान् दिसतो.

भाष्यम्—जितसमानस्तेजस उपध्मानं कृत्वा ज्वलति ॥ ४० ॥

भाष्यार्थ—नाभीच्या जवळ असणारा जो जठराग्नि त्याच्याभोंवतीं व्यापून ( वेढून ) असणारा जो समानवायु त्याला संयमानें जिंकिलें असतां, जठराग्नीचें तेज वाढून योगी अग्नीप्रमाणें प्रदीप्त दिसतो. अथवा अग्नीचें तेज वाढवून योगी आपलें शरीर सती ( पार्वतीदेवी ) प्रमाणें जाळितो. ॥ ४० ॥

यावरून योगसामर्थ्यानें निर्वाणसमयीं शिवयोगी महात्म्यांना ( कित्येक प्रसंगीं ) आपला हा नश्वर देह योगाग्नीला ( ब्रह्माग्नीला ) समर्पण करून भस्मसात करितां येतो. ही गोष्ट अगदीं सत्य आहे. पौराणिक कालांत महासती देवी दाक्षय-

भयंकर अग्निज्वाळांत समरस होऊन जाऊन सतीचा देह क्षणार्धांत दग्ध झाला ! महायज्ञकुंडांत ज्या ठिकाणीं सतीनें आपला देह दग्ध केला त्याच ठिकाणीं पुढें श्रीवीरभद्र लिंगाची स्थापना झाली. तेथेंच हल्लींचें श्रीवीरभद्रलिंग आहे. असो.

श्रीशिवनामाच्या स्मरणानंतर देवी दाक्षायणीनें जेव्हां योगाग्नि प्रदीप्त करून आपला दिव्य देह दग्ध केला आणि जेव्हां तिच्या पवित्र देहाग्नीच्या

---

णीनें दक्षप्रजपतींच्या महायज्ञसमयीं त्रैलोक्यांतील महान् जनपदापुढें दाखविलेली यौगिक तेजस्वी सामर्थ्यवान् कृति मिथ्या नसून त्रिवार सत्य आहे; ही गोष्ट आधुनिक अविश्वासी जनदृष्टीपुढें आणण्यासाठींच कीं काय जगन्नायक श्रीसदाशिवानें आपल्या एक योगसामर्थ्यवान् भक्तश्रेष्ठामार्फत अगदी अलीकडे ( एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत) या प्रियतम भरतभूमींतच हुबेहुब तशीच एक गोष्ट घडवून आणून जनमनावरील योगसामर्थ्याविषयींचा अविश्वास पार धुडकावून लाविला. आणि योगशास्त्राविषयींच्या सर्व भ्रमाचा निरास केला ! ती चमत्कृतिपूर्ण अत्यद्भुत पण विश्वसनीय गोष्ट येथें थोडक्यांत सांगितल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. ही गोष्ट दुसऱ्या कोणाची नसून जगप्रसिद्ध योगसामर्थ्यवान् महात्मा पव्हारीबाबा यांच्या निर्वाणसमयींची होय. ती अशीः—

**पव्हारीबाबा**—बंगाल प्रांतांतील जौनपूर ( जवानपूर ) जिल्ह्यांत प्रेमपूर नांवाच्या गांवीं अयोध्यानाथ नांवाच्या गृहस्थास सन १८४० सालीं 'हरभजन' नांवाचा पुत्र झाला. लहानपणापासूनच या हरभजनाचें लक्ष धर्ममार्गाकडे होतें. उपनयनसंस्कार झाल्यानंतर त्याचा दोघां तिघां पंडितांपाशीं ज्योतिष, व्याकरण इत्यादि विषयांचा अभ्यास झाला. नंतर चुलत्यानें त्याचें संगोपन केलें. पुढें गोपाळपंडित नांवाच्या एका विद्वानाजवळ त्यानें तत्वज्ञानाचा अभ्यास केला सन १८५६-५७ सालच्या सुमारास त्याचा काका स्वर्गस्थ झाल्यावर त्यानें स्वगृहाचा त्याग केला आणि पादचारी होऊन तो तीर्थाटनास निघाला. व त्यानें सर्व हिंदुस्थानचा प्रवास केला. या तीर्थाटनांत बहुतेक सर्व प्रसिद्ध तीर्थस्थानांचें त्यानें दर्शन घेतलें. गिरनार पर्वतावर त्यानें एका सिद्ध सत्पुरुषापासून योगाभ्यासाचें ज्ञान

ज्वाळा यज्ञकुंडांतील अग्नीशीं समरस झाल्या. तेव्हां तो आवहनीय अग्नि भयंकर चेतला. त्याच्या ज्वाळा अंतराळांत उसळून आकाशास जणूं भिडल्या. त्या अग्नीनें सर्वांची होळी होऊन जाते कीं काय असें भासलें. हा भयंकर देखावा पाहून सर्वत्र हाहाःकार झाला. दक्षप्रजापति, सर्व ऋषीश्वर, देव, दैत्यादिक सगळे गडबडून गेले आणि आतां प्रळय होतो कीं काय, असें वाटून भीतीनें सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. हा

---

संपादिलें. पुढें हा बंगालप्रांतीं परत आला. तेव्हां त्याला योगशास्त्राचें पूर्ण ज्ञान झालें होतें. तो गुहेंत योगमग्न समाधिस्थितींत आठ आठ दहा दहा दिवस राहत असे, म्हणून त्याला तेव्हांपासून लोकांनीं पव्हारी ( पउ ( पवन ) + आहारी = वायुभक्षक ) बाबा असें सार्थ नांव ठेविलें. हे पव्हारीबाबा, स्वामी विवेकानंद यांचे जगद्विख्यात गुरु श्रीरामकृष्ण परमहंसाचे समकालीन होते. जगद्गुरु श्रीमद्विवेकानंद स्वामींनीं आपल्या व्याख्यानांत कित्येक प्रसंगीं यांचा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे. यावरून स्वामी विवेकानंदाची त्यांजविषयीं अत्यंत पूज्यबुद्धि होती हें व्यक्त होतें. या महात्म्या पव्हारीबाबांच्या निर्वाणसमयींच वर सांगितलेली अत्यंताश्चर्यकारक गोष्ट घडून आली ती ही—

## पव्हारीबाबांचें निर्वाण

एके दिवशीं निरभ्र अंधाऱ्या रात्रीं पव्हारीबाबा गंगास्नान करून एकांतांत योगसाधन करीत होते. दैवयोगानें त्यांच्या योगक्रियेंत कांहीं विघ्न आलें, त्यामुळें त्यांची प्रकृति बिघडली. नंतर पुष्कळ लोकांनीं आपणास काय दुःख होतें तें आम्हास सांगण्याची कृपा केल्यास शक्य तो उपाय करूं, असें त्यांना विनयपूर्वक विचारिलें; परंतु त्यांनीं कोणाला कांहीं सांगितलें नाहीं. यावेळीं त्यांना पाहण्यासाठीं पुष्कळ लोक येऊन त्यांचें दर्शन घेऊन जात होते. बंगाली संवत् १३०५ ( इ० स० १८९९ ) ज्येष्ठ शुद्ध ७ रोजीं प्रातःकाळीं पव्हारीबाबांचे बंधु बद्रीनारायण व भाचे काशी येथील कॉलेजचे प्रोफेसर पंडित भागवताचार्य, पंडित जनार्दन वगैरे ५।६ इसम बाबांच्या आश्रमीं येऊन पोहोंचले. त्यावेळीं त्यांच्या आश्रमांतील पर्ण–कुटींतून धूर निघत असलेला त्यांनीं पाहिला. प्रथम त्यांना तो धूर होमाग्नीचा असावा असें वाटलें; परंतु जेव्हां त्या पर्णकुटींतून शुभ्र मेघा-

विलक्षण प्रकार पाहून नंदीस परम क्रोध आला. यज्ञमंडपाच्या महाद्वाराबाहेर उभे असलेले अष्टभैरव, इतर महान् शिवगण व भुतावळ संतापून त्यांनीं यज्ञमंडपांत प्रवेश केला व सर्वत्र धुमाकूळ मांडिला! कित्येकांनीं मांडव पाडून टाकण्याचा यत्न चालविला; कित्येक त्यास ठिकठिकाणीं आग लावूं लागले. हें पाहून जिकडे तिकडे धांवाधाव झाली व हलकल्लोळ उडून गेला. यज्ञमंडपांतील हा धुमाकूळ पाहतांच भृगु ऋषींस अत्यंत राग आला, व तो मंत्रसामर्थ्यानें अग्नि चेतवून तो त्या शिवगणांस जाळूं लागला. तेव्हां भैरवादिकही भयंकर खवळून यज्ञाच्या विध्वंसनास प्रवृत्त झाले; तथापि नंदिकेश्वरानें सर्वांस अभय देऊन सांगितलें कीं, तुम्हीं आतां विशेष धुमाकूळ न घालितां तत्काळ कैलासास जा; व श्रीशंकरांना हा समाचार कळवा. त्यांची आज्ञा होईल त्याप्रमाणें पुढें वागतां येईल.

---

प्रमाणें श्वेतवर्ण धूर निघालेला दिसू लागला आणि ती सर्व कुटी आंतल्या बाजूनें अग्नि भडकल्याप्रमाणें देदीप्यमान् दिसूं लागली तेव्हां त्या सर्व मंडळींना स्वस्थ राहून पाहवेना. म्हणून विशेष चौकशी करण्याच्या हेतूनें बद्रीनारायण पर्णकुटीवर चढून गेले आणि छप्पराच्या फटींतून निरखून पाहून तो आंत योगमग्न स्थितींत असलेल्या पव्हारीबावांकडे दृष्टि लावून हात जोडून म्हणाले. ‘ महाराज, हा अग्नि विझवून टाकण्याची आम्हास परवानगी द्यावी. ’ तेव्हां पव्हारी बावांनीं त्याच्याकडे पाहून हस्तसंकेत केला; परंतु त्याचें मर्म बद्रिनारायणाला समजलें नाहीं. इकडे अग्नि तर सारखा वाढत चालला. तेव्हां तेथूनच त्यानें आरोळी ठोकिली. ती त्यांची भयप्रद आरोळी ऐकून बावांचे प्रिय शिष्य भूतनाथ व आणखी २।३ इसम तत्काळ पर्णकुटीवर चढले. तेव्हां आंत त्यांना जो देखावा दिसला तो अत्यद्भुत होय. त्यावेळीं स्वामीजी नुकतेंच स्नान करून येऊन होमकुंडाजवळ योगासन घालून बसले होते. त्यांचे केश पाठीवर पसरलेले होते व तुपाचा लेप केलेला त्याचा देह तप्तसुवर्णाप्रमाणे प्रदीप्त दिसत होता. ( पातंजलयोगसूत्रांतील ‘ समानजयाज्ज्वलनम् । या सूत्राप्रमाणें प्रथमावस्था दिसली. ) यावेळीं त्यांच्या अंगावर दर्भाच्या दोरीनें बनविलेल्या एका कौपिनाशिवाय दुसरें कोणतेंच वस्त्र नव्हतें. मात्र होमकुंडाजवळील कांबळीच्या आसनावर ते पद्मासन घालून योगमग्न स्थितींत

विलक्षण प्रकार पाहून नंदीस परम क्रोध आला. यज्ञमंडपाच्या महाद्वाराबाहेर उभे असलेले अष्टभैरव, इतर महान् शिवगण व भुतावळ संतापून त्यांनीं यज्ञमंडपांत प्रवेश केला व सर्वत्र धुमाकूळ मांडिला! कित्येकांनीं मांडव पाडून टाकण्याचा यत्न चालविला; कित्येक त्यास ठिकठिकाणीं आग लावूं लागले. हें पाहून जिकडे तिकडे धांवाधांव झाली व हलकल्लोळ उडून गेला. यज्ञमंडपांतील हा धुमाकूळ पाहतांच भृगु ऋषींस अत्यंत राग आला, व तो मंत्रसामर्थ्यानें अग्नि चेतवून तो त्या शिवगणांस जाळूं लागला. तेव्हां भैरवादिकही भयंकर खवळून यज्ञाच्या विध्वंसनास प्रवृत्त झाले; तथापि नंदिकेश्वरानें सर्वांस अभय देऊन सांगितलें कीं, तुम्हीं आतां विशेष धुमाकूळ न घालितां तत्काळ कैलासास जा; व श्रीशंकरांना हा समाचार कळवा. त्यांची आज्ञा होईल त्याप्रमाणें पुढें वागतां येईल.

---

प्रमाणें श्वेतवर्ण धूर निघालेला दिसू लागला आणि ती सर्व कुटी आंतल्या बाजूनें अग्नि भडकल्याप्रमाणें देदीप्यमान् दिसूं लागली तेव्हां त्या सर्व मंडळींना स्वस्थ राहून पाहवेना. म्हणून विशेष चौकशी करण्याच्या हेतूनें बद्रीनारायण पर्णकुटीवर चढून गेले आणि छप्पराच्या फटींतून निरखून पाहून तो आंत यागमग्न स्थितींत असलेल्या पव्हारीबावांकडे दृष्टि लावून हात जोडून म्हणाले. ' महाराज, हा अग्नि विझवून टाकण्याची आम्हास परवानगी द्यावी. ' तेव्हां पव्हारी बावांनीं त्याच्याकडे पाहून हस्तसंकेत केला; परंतु त्याचें मर्म बद्रिनारायणाला समजलें नाहीं. इकडे अग्नि तर सारखा वाढत चालला. तेव्हां तेथूनच त्यानें आरोळी ठोकिली. ती त्यांची भयप्रद आरोळी ऐकून बावांचे प्रिय शिष्य भूतनाथ व आणखी २।३ इसम तत्काळ पर्णकुटीवर चढले. तेव्हां आंत त्यांना जो देखावा दिसला तो अत्यद्भुत होय. त्यावेळीं स्वामीजी नुकतेंच स्नान करून येऊन होमकुंडाजवळ योगासन घालून बसले होते. त्यांचे केश पाठीवर पसरलेले होते व तुपाचा लेप केलेला त्याचा देह तप्तसुवर्णाप्रमाणे प्रदीप्त दिसत होता. ( पातंजलयोगसूत्रांतील ' समानजयाज्ज्वलनम् । या सूत्राप्रमाणें प्रथमावस्था दिसली. ) यावेळीं त्यांच्या अंगावर दर्भाच्या दोरीनें बनविलेल्या एका कौपिनाशिवाय दुसरें कोणतेंच वस्त्र नव्हतें. मात्र होमकुंडाजवळील कांबळीच्या आसनावर ते पद्मासन घालून योगमग्न स्थितींत



श्रीरुद्रपाद व श्रीनंदिकेश्वराचें देवालय.

जगन्माता देवी दाक्षायणीवांचून मला श्रीसदाशिवांना हें काळें तोंड दाखवावयाचें नाहीं. म्हणून तुम्हीं श्रीशिवाची आज्ञा घेऊन येईतोंपर्यंत मी येथें राहून यांच्या हालचालीवर लक्ष ठेवितों. कारण कदाचित् पुढील अनर्थांच्या भयानें देवी भवानीला संजीवनीनें सजीव करतील आणि जास्तच निंदा करूं लागतील. करितां कितीही घोर प्रसंग गुदरला तरी येथून मी हालणार नाही. तुम्ही मात्र त्वरितच परत यावें. असें बोलून बहुतेकांस कैलासास पाठवून त्या विशाल मंडपांत तो पूर्वीं देवी भवानीनें दाखवून दिलेल्या ठिकाणीं स्तब्ध बसला. ( त्याच ठिकाणीं हल्लीं श्रीनंदीचें देवालय आहे. श्रीवीरभद्रलिंगापासून या क्षेत्रांतील मुख्य नंदी इतका दूर असल्याचें पाहून कित्येकांस आश्चर्य वाटतें, पण त्याचें कारण हेंच होय. )

ज्यावेळीं शिवसतीनें अग्नीस स्वतःचें देहार्पण केलें. तेव्हां तेथें वर सांगितल्याप्रमाणें भयंकर अनर्थ घडला. ती सर्वांचें आयुष्य घेऊन गेली असेंच सर्वांस वाटलें तेथील सर्व लोक व स्वतः दक्षसुद्धां भयचकित झाला. अग्नि तर भयंकर क्षोभला. तो त्रिभुवन जाळून टाकितो कीं काय असें वाटूं लागलें. जिकडे तिकडे भयंकर उत्पात होऊं लागले! रक्ताचा पाऊस पडूं लागला! असे अनेक भयदायी अनर्थ उद्भवलेले पाहून दक्षपत्नि प्रसूति ही रुदन करूं लागली आणि या अनर्थाला काय

---

बसले होते. असें असतां त्यांचें पवित्र शरीर अग्नीच्या ज्वाळांनीं व्याप्त असून तप्त सुवर्णाप्रमाणें देदीप्यमान दिसत होतें! त्यांची योगसाधनाला उपयोगी पडणारी कुबडी जवळच पडली होती. त्या पर्णकुटीत अग्निकुंडापाशीं चोहोंकडे सभोंवतीं ठेविलेले तुपाचे कलश, कर्पूराच्या पेट्या, धूप वगैरे जिनसा त्या देहांतील योगाग्नीच्या योगानें पेट घेऊन जळत होत्या. हा अत्यद्भूत प्रकार पाहून बद्रिनारायण व ते सर्व शिष्य दिङ्मूढ होऊन उभे राहिले! तों पाहतां पाहतां त्या महायोगी सत्पुरुषांचा देह ' समान जयाज्ज्वलनम् ! ' या स्थितींतून ' जितस्मानस्तेजस उपध्मानं कृत्वा ज्वलति ।' या स्थितींत जाऊन त्यांचा प्राण ब्रह्मरंध्राचा भेद करून निघून गेला ! व त्यांचा दिव्य देह कापराप्रमाणें जळून गेला !

( ' भारतना संतपुरुषो ' या गुजराथी ग्रंथावरून. )

गति करावी अशी ती ऋषीगणांना पृच्छा करूं लागली. इकडे महाद्वाराबाहेरील शिवगणांनीं तेथें प्रथम धुमाकूळ मांडिला; परंतु ते सर्व शिवकिंकर शिवाज्ञातत्पर असल्याकारणानें त्या सर्वात्मा श्रीशिवाची आज्ञा विचारण्यास कित्येक निघून गेले. कित्येकांनीं नंदिकेश्वराप्रमाणें तेथेंच स्थान मांडिलें. कित्येकांना देवीच्या मरणानें मरणांतिक दुःख होऊन त्यांनीं स्वशस्त्रांनींच प्राणत्याग केला! कित्येकांनीं तर आपलें शिरकमल आपणच तोडून काढून तें देवीभवानीवरून ओंवाळून टाकून त्यांनीं देवीला देह अर्पिला! अशाप्रकारें त्या सर्व साठसहस्र गणांची वाताहत होऊन गेली. व त्या यज्ञमंडपांत जिकडे तिकडे त्यांचीं हजारों प्रेतें पडून राहिलीं हा आकांत व शिवकिंकरांचें तें रुदन व हलकल्लोळ पाहून इंद्रादिक सुरवर व ऋषीश्वर भयचकित झाले. ते सर्व भयत्रस्त लोकः श्रीविष्णुपाशीं येऊन त्यांनीं त्यांस म्हटलें. ‘ हा दक्षप्रजापति परम अधम आहे याच्या संगतीनें आम्हांस अपकीर्ति प्राप्त झाली. शिवसतीचा हा प्राणनाश सर्वांना अत्यंत हानिकारक होईल.’ श्रीविष्णुही हा अकल्पित प्रसंग पाहून चिंताक्रांत झाले. महाबलाढ्य दैत्यसुद्धा पुढें काय अनर्थ घडेल या भयानें गर्भगळित झाले. ब्रह्मदेवही सचिंतपणें विचार करूं लागला कीं, आतां भूमिभार नष्ट होईल; याप्रमाणें सर्वत्रांना या प्रसंगानें भयग्रस्त केलें; परंतु भृगु महामुनीला मात्र या प्रकाराचें कांहीं विशेष वाटलें नाहीं. त्यानें सर्वांचें समाधान व्हावें म्हणून विघ्नशांति करून अग्नीस आहुति द्यावी व यज्ञकार्य निर्भयपणें पुढें चालवावें असें सांगितलें. परंतु त्या भयग्रस्त भीषण प्रसंगीं त्याचें म्हणणें कोणी ऐकेनात. अशी सर्वत्र अव्यवस्था होऊन गेली. व यज्ञकार्य पुढें चालवितां न आल्यानें तें कुंठित झालें. यापुढें श्रीशिवास भयंकर क्रोध येऊन, श्रीवीरभद्रदेवाचा अवतार कसा झाला व त्यांनीं काय काय पराक्रम केले व अखेर परिणाम काय झाला या गोष्टी ऐकण्याची वाचकांस उत्कंठा लागली असेल, तरी श्रीवीरभद्रावताराची रम्य कथा ऐकण्यास्तव आपण ‘ श्रीवीरभद्रचरित्रांतर्गत ’ पुढील भागाकडे वळूं.

श्रीविरूपाक्षलिंगायनमः

# भाग चौथा.

## श्रीवीरभद्रावतार व श्रीवीरभद्रलिंगाची स्थापना

### (१) श्रीशंकराचा क्रोधावेश.

महायज्ञामध्यें देवी दाक्षायणी दग्ध झाली हें पाहून तेथील सर्व देव-दानवाच्या तोंडचें पाणी पळालें व सर्वत्र हाहाःकार झाला. शिवगणांनाही अत्यंत खेद झाला; परंतु कलहप्रिय नारदाला मात्र उलट आनंद झाला, कारण अशी कांहीं अघटित घटना घडून आल्यावांचून श्रीशंकरास क्रोध येणें शक्य नव्हतें. आणि त्यांना क्रोध आल्याशिवाय दक्षप्रजापतीसारख्या सर्वश्रेष्ठ होऊं पाहणाऱ्या महा अभिमानी दुष्टाची रग जिरणें शक्य नव्हतें. शिवाय पुरुषाला राग येण्यास त्याच्या स्त्रीची छळणूक होणें, हाच अगदीं रामबाण उपाय होय! (पहा, सीतादेवीचा छळ झाल्यामुळेंच, दाशरथि राम-चंद्रास राग आला व त्यानें रावणासारख्या दुष्ट राक्षसाधमाचा निःपात केला! आणि द्रौपदीची विटंबना हीच दुष्ट कौरवांच्या सर्व नाशाचें सबळ कारण होय!) अर्थात् नारदाला आनंद होणें साहजिक होतें. त्या महायज्ञ-मंडपांतील तो हलकल्लोळ अवलोकन करितांच नारदमुनींची स्वारी तेथून जी निघाली ती थेट कैलासपर्वतावर श्रीशंकराकडे जाऊन पोहोंचली. तेथें पाहतो तों श्रीशंकर ध्यानस्थ बसले होते. तेव्हां नारदास मोठा विचार पडला. कारण ध्यानविसर्जन होईपर्यंत वाट पहावी तों कदाचित् कित्येक युगेंही ध्यानमग्न स्थितींत निघून जावयाचीं! बरें त्यांत विघ्न आणावें तरी पंचाईत. शेवटीं आतांचा प्रसंग बिकट असल्यामुळें सावध करणेंच योग्य वाटून नारदानें स्तवनास प्रारंभ केला. त्यायोगें काम न झाल्यानें, शेवटीं

दुःखप्रद महाशब्द केला! त्यासरसें श्रीशिवानीं ध्यानविसर्जन करून नारदाकडे पाहिलें व असा दुःखी होण्याचें कारण काय? असा त्यांनीं त्यास प्रश्न केला. तेव्हां नारदांनीं दक्षयज्ञाचें सर्व वर्तमान सांगून शेवटीं मोठ्या कष्टानें रुद्धकंठानें देवी भवानीनें अपमानातिशयानें अग्नीस आपला पवित्र देह अर्पण केल्याचें दुःखदायक वृत्त कळविलें. आणि म्हटलें, ' देवी दाक्षायणीनें अग्नीस देहार्पण केलें त्यामुळें आपण मात्र पूर्ण नागवलां आहां, सतीचा कांहीं अपराध नसतां, फक्त श्रीशंकरांचा यज्ञ-भाग न देतां यज्ञ कसा कारितां? असें विचारल्याबद्दल दक्षानें तिचा फारच उपमर्द केला. त्यामुळें ती नाहक प्राणास मुकली आणि तुम्ही त्या सुलक्षणी सुंदर अशा सतीस अंतरला.' नारदाचें हे कठोर शब्द कानीं पडतांच श्रीशंकरांचा निद्रिस्त कोप जागृत झाला व ते दक्षाचा महापराध आठवून त्याजवर अत्यंत खवळले. इतक्यांत भूत, भैरवादि, शिवगण श्री-शंकरांना हीच दुःखकारक वार्ता सांगून पुढील कार्याची आज्ञा घेण्यास्तव याच वेळीं कैलासभुवनीं मोठ्यानें आक्रोश करीतच येऊन पोहोंचले. त्यांच्या तोंडूनही तेथील भयंकर प्रकार कांनीं पडतांच आगींत तेल ओत-ल्याप्रमाणें होऊन श्रीशिवाचा क्रोधानल भडकला.

## (२) श्रीवीरभद्रावतार.

सती दाक्षायणीचा संहार झाल्याची भयंकर वार्ता ऐकून जगदीश्वर श्रीसदाशिवाचा क्रोधानल भयंकर भडकला व त्यानें कल्पांतींच्या प्रळयरुद्रा-प्रमाणें रौद्ररूप धारण केलें. संतापातिशयानें त्यांना पुढें पाऊलसुद्धां टा-कितां येईना. त्यांनीं तृतीय नेत्र उघडिला तेव्हां प्रळयकाळचा अग्निच प्रदीप्त झाला असें भासलें! तेव्हां श्रीरुद्राच्या कोपाग्नीनें सर्व ब्रह्मांड भस्म होऊन जातें कीं काय असें भासूं लागलें. त्यावेळीं अत्यंत प्रखर अशा तमोगुणाचा श्रीशंकरांनीं अंगिकार करून, ते आवेशानें हातपाय आपटूं लागले. तेणेंकरून कैलासभुवन दणाणून गेलें, पृथ्वी कंपायमान झाली. तिच्यावरील पर्वत डळमळूं लागले! शेवटीं आत्यंतिक क्रोधभरानें श्रीशंक-

रांनीं आपल्या जटा हातांनीं उपटून जेव्हां अनिवार क्रोधानें कैलासपर्वताच्या शिखरावर जोरानें बडविल्या, तेव्हां त्या ताडनानें तो विशाल पर्वत जळून खाक होतो कीं काय असें वाटलें! ग्रह, नक्षत्रें तुटून पडूं लागलीं! सर्व ब्रह्मांड हदरून गेलें! वैकुंठभुवन, ब्रह्मसदन, व चौदा भुवनांचा संहार होतो कीं काय असा भास झाला! आणि भूमीसहित अतळ, वितळ, रसातळादि सप्तपाताळांतील सर्पकुळांचा आक्रांत झाला. नागलोक भयचकित झाला, कूर्म थरथरां कांपूं लागला; वराहाला तर हा विपरित प्रकार काय झाला हेंच कळेना, असा सर्वत्र अकाळ प्रळयारंभ झाला! मूर्तिमंत अग्नि खवळला! असा श्रीशंकराला भयंकर क्रोधभर आला. तेव्हां त्या रौद्रस्वरूपी परमेश्वराच्या तृतीय नेत्रांतील महाभयानक अग्नीमध्यें टहो! असा प्रळयकाळच्या मेघाप्रमाणें भयंकर कडकडाट होऊन त्यांतून जटाघाताच्या भीषण शब्दाबरोबरच श्रीरुद्राचा मूर्तिमंत क्रोधावतार रौद्रमूर्ति भयंकर श्रीवीरभद्र प्रगटला! प्रगट होतांच त्यानें रागानें जी भयंकर घनगर्जना केली त्यानें आकाशमंडळ दणाणून गेलें! कोट्यवधि विजा चमकूं लागल्या! दाही दिशा त्या वीरगर्जनेनें दुमदुमून गेल्या! अशा त्या भयंकरस्वरूपी, परमाद्भुत क्रूरभावी, भयानक श्रीवीरभद्राला संमुख उभा राहिलेला पाहून श्रीशंकरानें पुन्हां एकदां मागें पाहिलें तों तत्काळ भयंकर कडकडाट झाला व त्या अग्निज्वालेंतून सुंदर स्त्रीरूपी दिव्यांगना ' भद्रकाळी ' उत्पन्न झाली! त्या दिव्यस्वरूपी भद्रकाळीच्या एका हातांत अमृतकलश व दुसऱ्या एका हातांत रक्ताचें पात्र असून तें ती प्राशन

---

१ उत्पाट्य च जटा रुद्रो लोकसंहारकारक
आस्फालयामास रुषा पर्वतस्य शिरोपरि ॥१॥
त्रोटणाच्च समुद्भूतो वीरभद्रो महायशः
तथा काली समुद्भूता भूतकोटिभिरावृता ॥२॥
कोपान्निष्पातितो नैव रुद्रस्य च महात्मनः
जातं ज्वराणां च शतं सन्निपातास्त्रयोदशः ॥३॥
( श्रीवीरभद्रचरित्र, अ. ११ श्लो. १५ ते १७. )

करीत होती! ती दिव्य नारी श्रीवीरभद्रसाह्यार्थच उद्भूत झाली आणि तिजबरोबर तिजप्रमाणेंच बलसंपन्न, उग्र, तामसी, परमक्रोधी असे कोट्यनुकोटी स्त्रीगणही उत्पन्न झाले! शिवाय याच वेळीं—

दक्षापमानसंक्रुद्धरुद्रनिःश्वाससंभवः
ज्वरोष्टधा पृथग्द्वंद्वः संघातागंतुजः स्मृतः ॥१॥

( दक्षानें श्रीशंकराचा अपमान केला. त्यामुळें त्यास जो क्रोध आला त्यापासून ज्वरांची मूळ उत्पत्ति झाली. असें पौराणिक मत आहे. या ज्वराचे मूळ आठ प्रकार आहेत ते—वात, पित्त, कफ हे तीन, दोन दोन दोषांपासून तीन आणि सन्निपात व आगंतुक हे दोन मिळून आठ होत. )

या रुद्रकोपापासूनच मूळ आठ प्रकारचे व त्यांपासून शेंकडों प्रकारचे ज्वर, व इतर सहस्रावधि महाव्याधि उत्पन्न झाल्या. शिवाय त्याचप्रमाणें कोट्यवधि, उग्र व प्रत्यक्ष रुद्रासारखेच बलसंपन्न असे रुद्रगण उत्पन्न झाले. हे सर्व श्रीशंकराच्या तृतीय नेत्रांतील प्रळयाग्नींतून उत्पन्न झाले होते; व सर्वही पुन्हां तृतीय नेत्रयुक्तच होते. हे महान् पराक्रमी रुद्रवीर दैत्यांचा संहार करण्यास अवतरले होते.

रौद्रस्वरूपी श्रीवीरभद्र उत्पन्न होऊन त्यानें घनगर्जना केली. तेव्हां या मूर्तिमंत रुद्रक्रोधाचा पुतळा, व प्रत्यक्ष तृतीय नेत्रांतील भयानक वैश्वानराचा तो अति भयदायक घोर सिंहनाद ऐकून सर्व लोक भयचकित झाले. अनंत विद्युल्लतेच्या गर्जनेप्रमाणें सर्वत्र कडकडाट झाला. या भयंकर गडगडाटानेंच ब्रह्मकटाहाचें पीठ होतें कीं, काय असें भासलें. त्रैलोक्यांत महाप्रळयाचा आभास होऊन सर्वत्रांना आपलें आयुष्य तुटलें असेंच वाटलें.

सर्व त्रैलोक्य ज्वाळामय होऊन आकाश कोंदाटलें. या अग्निज्वाळांनीं चंद्रसूर्य फिके पडले, नक्षत्रांचा चुरडा झाला. ग्रहगणांसह आकाशमंडळ

---

१ रुद्र ही देवता ज्याप्रमाणें धार्मिक बाबतींत संहारकारक मानिली आहे त्याचप्रमाणें आर्यवैद्यककारांनींही त्याच हेतूचा पुरस्कार करून संहारकार्याचा संबंध रुद्रासच ( शंकरास ) जोडिला आहे. हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

चक्राप्रमाणें फिरूं लागलें. वैकुंठभुवन, इंद्रपुरी, ध्रुवलोक हे भ्रमणांत सांपडून अंतराळीं फिरूं लागले. श्रीवीरभद्रदेव सहज बोलला तेव्हां त्रैलोक्याचा भंग झाला असें वाटलें. भूमीवरील सप्तसमुद्रांतील जळ कढूं लागलें, त्यामुळें क्षीरसागरस्थ लक्ष्मीरमण गजबजले. आणि मनांत ह्मणाले कीं, हा यज्ञाकारणें ईश्वरक्रोधाचा जो वीरभद्र अवतार झाला आहे त्यायोगें हा अकाळप्रळय होईल. याला विरोध करून निभाव लागावयाचा नाहीं. फक्त ईश्वरभजनीं तत्पर असणाऱ्यांचा मात्र टिकाव लागेल. तरी याच युक्तीनें विविध लोकांचें रक्षण करून हा अकाळप्रळय थांबविण्याची खटपट करावी, असा श्रीविष्णु विचार करूं लागले.

## (२) श्रीवीरभद्रस्वरूपवर्णन.

या चंडप्रतापी, उग्रमूर्ति श्रीवीरभद्र देवाच्या भयंकर वीरवेषाचें यथोचित वर्णन करण्याची शक्ति आमच्या निर्बल लेखणींत कोठून असणार ? या कृतांतरूपी श्रीवीरभद्राला हजारों शिवगणांची शक्ति होती. त्यानें हातांत हजारों मुद्गर, लक्षावधि बाण धरिले असून हजारों शूल, टंक आणि गदा हीं आयुधेंही धारण केलीं होतीं. तसेंच एका हातांत लखलखीत दिव्य धनुष्य असून दुसऱ्या हातांत इंद्रवज्र व चक्र हीं आयुधेंही धरिलीं होतीं. मस्तकावर अर्धचंद्र शोभत होता. त्याचे केश विद्युल्लतेप्रमाणें चकाकत होते, त्याच्या दाढा फार अक्राळविक्राळ असून, त्याचा शब्द मेघगर्जनेप्रमाणें गंभीर होता. त्यानें ज्यांतून रक्ताचे थेंब गळत आहेत असें वाघाचें कातडें नेसलेलें होतें. दोन्ही :गालांवर गोल कुंडलें लोंबत होतीं. त्याच्या पायांत घागऱ्या वाजत असून, सुवर्णाचीं उत्तम बाहुभूषणें भुजांवर शोभत होतीं. अंगावर बहुमोल रत्नांचे अलंकार घातलेले असल्यामुळें व त्याची अंगकांति पांढरी शुभ्र होती, त्यामुळें तो फारच तेजःपुंज दिसत होता. तो सिंहासारखा पराक्रमी असून, मदोन्मत्त हत्तीप्रमाणें हळुहळु चालत होता. त्या शुभ्रकांति—युक्त वीरभद्राला पाहून असें वाटे कीं, ज्यावर मोठमोठे बर्फाचे ढीग पडले आहेत असा प्रत्यक्ष महामेरु-

पर्वतच चालत आहे कीं काय ! त्याच्या अंगांतून भयंकर ज्वाळा निघत होत्या, त्यामुळें प्रळयकाळीं त्रैलोक्यास जाळून टाकणाऱ्या अग्नीप्रमाणें तो देदीप्यमान् दिसत होता. असा तो शौर्यशाली वीरबाहु वीरभद्र प्रकट होतांच सहचरी भयानक भद्रकाळीसह श्रीशंकरास साष्टांग नमस्कार करून नम्रपणें हात जोडून उभा राहिला व गंभीर स्वरानें म्हणाला. 'स्वामी, आपण मला कोणता पुरुषार्थ साधण्याकरितां पाचारण केलें आहे? माझे हे उन्मत्त बाहु कसे स्फुरण पावत आहेत; करितां मला काम सांगावें. आपल्या क्रोधयुक्त मुद्रेवरून कांहीं तरी अघटित प्रकार घडला आहे हें व्यक्त होतें; तरी आपणावर असें कोणतें संकट गुदरलें आहे ? किंवा आपणांस कोणी त्रास दिला तें लवकर सांगा म्हणजे त्याचा क्षणार्धांत संहार करितों. माझा पराक्रम व्यक्त करण्याकरितां मी आतांच मेरु आदिकरून सप्त महापर्वत उपटून समुद्रांत फेंकून दाखवूं काय ? किंवा सप्त सागराचें उदक एके ठिकाणीं सम्मीलित: करूं ? अथवा सूर्य-चंद्र-नक्षत्रगणांचा फुलोरा संपूर्ण तोडून आणूं ? किंवा सप्तपाताळांचा संहार करूं ? अगर चौदा भुवनें व एकवीस स्वर्ग, यांचा चक्काचूर करूं ? अथवा सत्यलोक व वैकुंठभुवनाचें पीठ करूं ? किंवा मेरूचें पुष्प करून आपलें पूजन करूं ? अथवा काय करूं तें सत्वर सांगा. हे स्वामी, त्रैलोक्यनाथ, शूलपाणि, आपणाला अत्यंत क्षोभ उत्पन्न झाला आहे; त्याचें कारण काय ? माझ्या भुजांची रग जिरवील असा सामर्थ्यवान् शत्रु कोण उत्पन्न झाला आहे ? हें लवकर सांगा; म्हणजे त्याशीं युद्ध करून त्याचा निःपात करीन.' हें वीरभद्राचें वीरश्रीयुक्त भाषण ऐकून श्रीशंकर संतुष्ट झाले. आणि आपल्या कर्म-साक्षी-पणाच्या सामर्थ्यानें उत्पन्न झालेल्या भद्रकाळीला वीरभद्राच्या सहाय्यार्थ जाण्याकरितां आज्ञा करून त्या भद्रकाळीसह हात जोडून पुढें उभा असलेल्या क्रूरस्वभावाच्या त्या वीरभद्र गणेश्वरास श्रीशंकरांनीं म्हटलें. 'पराक्रमशाली वीरभद्रा, तूं ह्या भद्रकाळीसह सत्वर त्या दुरभिमानी दक्षप्रजापतीच्या यज्ञस्थळीं जाऊन तेथें त्या यज्ञास जे देवदानवादिक जमले आहेत; आणि ज्यांच्या बळावर तो महामूढ, अज्ञानी

दक्षप्रजापति मदोन्मत्त झाला आहे आणि मन मानेल तसें अन्यायाचें वर्तन करीत आहे, आणि ज्यांनीं उन्मत्तपणानें आमचें अवदान न देतां आमची निंदा केली. व देवी दाक्षायणीचा अपमान करून तिला अग्नीच्या भक्षस्थानीं जाणें भाग पाडिलें त्या सर्वांच्या शासनार्थ तिकडे जा. आणि तो यज्ञ नष्ट करून त्या दुष्ट दक्षाचा शिरच्छेद कर. व आमचा भाग न देतां ज्या ज्या देवांनीं आपापलीं अवदानें भक्षण केलीं, त्यांजकडून तीं परत ओकीव. शिवनिंदा करणाऱ्या व ऐकणाऱ्या दुष्टबुद्धि लोकांचा चांगला समाचार घेऊन देवी भवानी यज्ञामध्यें दग्ध झाली त्याबद्दल सर्वांना योग्य शासन घडूंदे. आणि सर्वांच्या समक्ष दक्षाच्या शिराची त्याच यज्ञकुंडांत पुर्णाहुति दे. अशी तुला आमची आज्ञा आहे.' ही खडतर कामगिरी सांगून त्याच्या मस्तकावर आपला वरदहस्त ठेवून श्रीशंकरांनीं त्याला सर्व शस्त्रास्त्रविद्या दिल्या. व भद्रकाळीसह त्याची दक्षयज्ञाकडे रवानगी करून आपण कैलासपर्वतावर बसून राहिले.

## (३) श्रीवीरभद्रदेवाची सेना

मग त्या शिवावतारी, स्मशानवासी, रागीट वीरभद्रानें आपल्या रोमकूपांपासून 'रोमज' नांवाचे, उजव्या हातापासून 'शतकोटी' नांवाचे व डाव्या हातापासून 'सर्वतोभद्र' नांवाचे पराक्रमी गणेश्वर उत्पन्न केले. याशिवाय आपल्या प्रचंड अवयवांपासून त्यानें अनेक तऱ्हेचे कोट्यवधि शिवगण उत्पन्न केले. ते सर्व स्वभावानें रुद्रासारखेच रागावलेले होते, इतकेंच नव्हे तर त्याच्याप्रमाणें भयंकर सामर्थ्यवान् होते. त्या प्रत्येकांना तीन तीन डोळे असून डोक्यांवर जटांचा भार वाढलेला होता! त्या प्रत्येकाच्या हातांत शूल, शक्ति, गदा, टंक, दगड इत्यादि आयुधें असून, ते सर्व रुद्रासारखेच उग्र होते. ते उत्पन्न होतांच रणगर्जना करूं लागले. कित्येक आकाशांत उडूं लागले, कित्येक हर्षानें नाचूं लागले, व गर्जना करूं लागले. त्यांनीं जिकडे तिकडे कडकडाट करून सोडिला. त्यांतले कित्येक सिंहांवर, कित्येक व्याघ्रांवर, कित्येक हत्तींवर तर आणखी कित्येक बैलांवर आरूढ झाले होते. अशा त्या

असंख्य शिवगणांना बरोबर घेऊन कल्पांतीं ज्याप्रमाणें कालभैरव प्रळयाग्नि घेऊन जगाच्या संहारास निघतो त्याप्रमाणें दक्षयज्ञाचा विध्वंस करण्यासाठीं वीरबाहू वीरभद्र निघाला. यावेळीं तो स्वतः एका प्रचंड शुभ्र मेघावर आरूढ झाला असून, त्यावर कित्येक शिवगणांनीं छत्र–चामरें धरलीं होतीं. कित्येक पुढें शंख–शिंगें फुंकीत होते; व दुसरे कित्येक अनेक प्रकारचीं रणवाद्यें वाजवीत होते. त्यावेळीं चोहोंकडे सुगंधित वारे वाहूं लागले, आकाशांत देवांनीं दुंदुभि वाजविल्या व वीरभद्राच्या मस्तकावर पुष्पवृष्टि केली. तेव्हां सर्व गणेश्वर मदोन्मत्त होऊन त्यांना रणमद चढला आणि ते नाचूं खिदळूं लागले, सिंहनाद करून बढाया मारूं लागले. असे महाबलाढ्य अगणित वीर समागमें घेऊन प्रळयरुद्र श्रीवीरभद्र दक्षप्रजापतीचा वध करण्यासाठीं कैलासाहून निघाला.

श्रीशिवाची आज्ञा शिरसामान्य करून त्यांचा संताप शांत करण्यास्तव दक्षाध्वरनाशनार्थ जेव्हां प्रळयवीर वीरभद्र निघाला, तेव्हां त्यासमागमें दुर्धर पराक्रमी अशा महाकाळी, भद्रकाळी, यांसारख्या भ्यासुर व अयोनिसंभव अशा असंख्य मातृका निघाल्या. आणखी क्रोधरूप, भयंकर, अघोर, कल्पांतकारी चित्रविचित्र भैरवही सहस्रावधि निघाले. शिवाय विशालमुख, घोरशरीरी, आरक्तवदन, भयासुर असे लक्षावधि भूतपिशाच्चगण निघाले. या सर्वांनीं चर्म, रुद्राक्ष व भस्मधारणा केली असून ते सर्व सर्पभूषण व जटाधारी होते. त्यांनीं धनुष्यबाण, त्रिशूल, खट्वांग, गदा हीं आयुधें धरलीं होतीं. असे ते भीषण वेताळ युद्धार्थ निर्माण झाले होते. त्याचप्रमाणें संपूर्ण व्याधि निर्माण झाले होते. अत्यद्भुत संधिवात, शेंकडो प्रकारचे सन्निपात व संतापज्वर हेही वीरभद्रासमवेत निघाले.

## (४) यज्ञमंडपांतील हालहवाल

या सर्व विविध सैन्यासहवर्तमान भद्रकाळीसह जेव्हां वीरभद्र दक्षयज्ञसंहारार्थ निघाला तेव्हां इकडे भूमंडळावर दक्षयज्ञांत काय काय अवचिन्हें झालीं तीं पहा. भयंकर वादळ सुटलें, दिवसा ढवळ्या असंख्य उल्कापात झाले.

जशा गारा पडाव्या तशा त्या उल्का सर्वत्र पडून हानि झाली. तारे तुटले. दाही दिशा अंधारानें व धुरानें व्याप्त झाल्या. आकाशांत पुच्छकेतु, धूमकेतु उगवले. ते कृतांतासारखे भासूं लागले ! रक्ताचा वर्षाव झाला व सर्व गगनमंडल रक्तवर्ण भासूं लागलें ! सगळीकडे भूमि कंपायमान होऊं लागून क्रोधानें ती उद्विग्न दिसूं लागली. भूकंपाबरोबरच पर्वताग्रांचे स्फोट होऊन सर्वांस संताप झाला. सर्व सैन्य व दैत्यमंडळ खवळून जिकडे तिकडे हलकल्लोळ उडून गेला !

परमधोरणी दक्षप्रजापतीनें हीं अवचिन्हें ओळखून श्रीविष्णूपुढें येऊन साष्टांग प्रणिपात करून अनेक प्रकारें त्यांची स्तुति करून म्हटलें 'हे भगवन् लक्ष्मीपते, क्षणोक्षणीं भूकंप होत असून दिवसा उल्कापात होत आहेत. सर्व लोक शीतज्वरादिकांनीं तळमळत आहेत, हीं सर्व दुश्चिन्हें पाहून माझें चित्त भयचकित झालें आहे. माझ्या प्रिय कन्येचा नाश होऊन यज्ञसमारंभाचा भंग झाला असेंच लोकांना वाटत आहे. यास्तव. हे रमाकांत, तूं आमचें भय निवारून आमचें रक्षण कर. यावेळीं तुजवांचून आमचा रक्षणकर्ता कोणी नाहीं. तूं अगाध सामर्थ्यवान्, अनाथांचा नाथ आणि अनंत आहेस अनुतापयुक्त मनानें स्मरण करितां तत्काळ प्रसन्न होतोस; असा तुझा अपार महिमा आहे. भक्तजन तारण्याकरितां अनेक सगुण अवतार धरणाऱ्या पुराणपुरुषा, गजेंद्रानें तुझें ध्यान करितांच त्याला दर्शन देऊन तूं त्याचा तत्काळ उद्धार केलास. त्याप्रमाणेंच सांप्रतच्या भयंकर संकटांतून माझें रक्षण कर.'

हें दक्षप्रजापतीचें करुणरसपरिपूरित ध्यान ऐकून श्रीविष्णु संतोष पावले मग ते दक्षास म्हणतात 'हे प्रजापते, तुला त्रैलोक्यवैभव मिळून तूं मोठा वेदवेत्ता ह्मणवितोस; परंतु मत्सरगुणाचा त्याग करीत नाहींस. वेदांचें खरें लक्षण हेंच कीं, मानवप्राण्यांचीं सर्व दुर्व्यसनें निघून जाऊन त्याला बोध घडून हळूहळू त्याची त्यागाकडे प्रवृत्ति व्हावी, असा मार्ग ते त्याला दाखवीत असतात. पण हा वेदमार्ग मत्सरग्रस्ताला काय होय ? उलट नीच मनुष्याला ऐश्वर्य प्राप्त झालें ह्मणजे तो त्यायोगें श्रेष्ठांचा अव्हेर करूं लागतो; व त्यांचा

बोध ऐकत नाहीं, सत्पुरुषांचें हितवचन मानिलें नाहीं तर, विघ्न हें रोकडें ठेविलेलेंच. यास्तव याच रीतीनें वागणाऱ्या तुझा नाश होणार हाच निश्चय होय. तुझ्या द्वेषाची परमावधि इतकी झाली आहे कीं, चराचर विश्वांत आपणच श्रेष्ठ असून विश्वव्यापक वेदमूर्ति परमात्म्याला मी वेदबाह्य करीन ही तुझी प्रतिज्ञा! मग या दुरभिमानाचें फळ विनाशाशिवाय दुसरें कोणतें असणार? ज्ञानविज्ञानलक्षण ज्याला कळत नाहीं तो खरोखर अज्ञानच होय. तसा तूं अज्ञान आहेस. तुला आम्ही इतका बोध केला पण तो न मानितां तूं यज्ञप्रारंभ केलास. नैमिषारण्यांत व मागील यज्ञप्रसंगीं सर्वांसमक्ष तूं श्रीशंकरांचा अपमान केलास. शिवाय या यज्ञारंभीं सुद्धां दधीच्यादि महाऋषींनीं तुझ्या हिताचा मार्ग तुला दाखविला असतां तो तूं मानिला नाहींस. साधूंचा अपमान तोच सर्वनाशाचें कारण होय. म्हणून हीं दुश्चिन्हें होत आहेत.' श्रीविष्णूचें हें भाषण चाललें असतांनाच अकस्मात् नारदमुनि तेथें आले. त्यांनीं श्रीविष्णूंना कैलासांत घडलेला सर्व प्रकार सविस्तर निवेदन करून आणि दक्षाचा संहार करण्याकरितां व भूभार उतरण्यासाठीं अयोनिसंभव, रौद्रावतारी श्रीवीरभद्र शक्तीसह येत आहे असें सांगितलें. हें ऐकतांच दक्षप्रजापति अत्यंत भय पावला आणि ऋषिमंडळाकडे येऊन त्यांची अनेक प्रकारें प्रार्थना करून दीनवदन होत्साता त्यांस म्हणाला 'ऋषिश्रेष्ठहो, तुम्ही मंत्रशास्त्रज्ञ व सर्वसमर्थ आहांत. अनेक विधिविधानें करून या अवचिन्हांची शांति करा. हे भृगो तूं अति समर्थ आहेस. तुझ्या आधारानेंच मी यज्ञास प्रवृत्त झालों. त्यांत कन्याघाताचा अनर्थ ओढवला. तस्मात् त्याबद्दल प्रायश्चित्तविधान करून आज्याहुतीनें यज्ञसमाप्ति करा.' हें दक्षाचें भयत्रस्त भाषण ऐकून त्या ऋषिगणांनीं त्याचें सांत्वन केलें व ते विघ्नशांत्यर्थ मंत्रजप करूं लागले. अशा अघोर मार्गानें, आपणांस अपरिमित दक्षिणा मिळेल या आशेनें, प्राणाची परवा न ठेवितां, त्या सर्व ऋषींनीं यज्ञरक्षणार्थ हवनकार्य चालविलें.

इकडे दक्षप्रजापतीनें ब्रह्मदेवापुढें जाऊन साष्टांग प्रणिपात करून त्यांस म्हटलें, यासमयीं तुझ्याशिवाय मला दुसऱ्याचा भरंवसा नाहीं. पण ब्रह्म-

देवानें त्याची निर्भत्सनाच केली. मग बाहेर भार्गी हिरण्याक्ष हिरण्यकश्यपादि महाभिमानी, महाक्रूर असे दैत्य होते. त्यांजवळ येऊन दक्षानें त्यांस विनयपूर्वक म्हटलें. ' मी श्रीविष्णु तोषणास्तव यज्ञ केला; परंतु आतां संकटकाळीं शार्ङ्धरानें माझा धिःकार केला. तरी तुह्मी साह्य होऊन आलेल्या अरिष्टाचें निवारण करावें. तेव्हां सर्वांनीं दक्षास अभय देऊन सांगितलें कीं, ' आह्मी कोट्यनुकोटी योद्धे अत्यंत प्रबळ आहोंत. आमच्यापुढें एका ईश्वराचा काय पाड ? विष्णु आदिकरून सर्व देवसुद्धां त्याला साह्य होऊन ते सर्वजण एकत्र होऊन आह्मांवर चालून आले, तरी आम्ही त्यांचा फडशा पाडूं! इतकें आमचें सामर्थ्य अचाट आहे. शिवाय यासमयीं पृथ्वीवरील सर्व राजांचें, तसेंच आमचे हाडवैरी जे इंद्रादिक देव त्यांचें-सुद्धां आम्हांस पूर्ण साह्य आहे. आणखी निशाचरांचेंही आम्हांस पूर्ण पाठबळ आहे. तेव्हां देव, दैत्य, दानव, गंधर्व, किन्नर, यक्ष, चारण इत्यादिक आम्ही सर्व एकत्र युद्धार्थ सिद्ध असतां तुम्ही विघ्नाची शंकाही मनांत आणूं नका. तुमच्या यज्ञास विघ्न करण्याची त्या सदाशिवाची काय प्राज्ञा आहे ? करितां निःशंक मनानें यज्ञकार्य करा.' याचप्रमाणें इंद्रादिक अष्ट-दिक्पालांनींही त्याला आश्वासन दिलें. नवग्रहांनीं मात्र दक्षास ह्मटलें कीं, " आम्ही काळ महाकाळाच्या संगतीं असतों. तो अनाद्यनंत काळ अन्यायी जनांचें न्यून सांपडतांच आम्हास सूचना करतो. तेव्हां तत्काळ त्या-ठिकाणीं आम्हीं उडी घेऊन त्यांचें पारिपत्य करितों. आमची धाड पडली कीं, त्रैलोक्याचा फन्ना उडतो. तूं तर शिवद्वेष करून अत्यंत अन्याय करीत आहेस. तुला विपरीत बुद्धि झाली आहे. आणि ही काळाचीच करणी होय. काळच तुझा बुद्धिभ्रंश करीत आहे. तुला वाटतें कीं, मी चिरंजीव आहे; परंतु हा तुझा भ्रम आहे. अनेक जन्मींच्या पुण्यसंचयानें अवचित मानव देह प्राप्त होतो, आणि त्यांत सत्य, न्याय, यश, यांची प्राप्ति होऊन ऐश्वर्य भोगण्यास काळाकडून सवड मिळते. म्हणून शुभकालीं पुण्यकर्मे करावीं, ईश्वरास संतुष्ट करावें. हें न करितां पापाचरण केलें कीं, पूर्व पुण्याचा क्षय होऊन अन्याय घडूं लागतात. मग तेथें काळाची उडी पडते.

आपल्या न्यायाची पारख करण्याला आपल्या शरीरामध्येंच अग्निरूपानें चंद्रसूर्य राहत असून वायु, आकाश, पृथ्वी व मन हीं सदा त्या कार्यीं तत्पर आहेत. यांच्या समक्षच प्राणी शुभाशुभ कर्मे करीत असतो. अर्थात् यांच्याशिवाय काळाला दुसऱ्या साक्षीदारांची जरूरी नसते. 'न हि सत्यात्परो धर्मः' या न्यायानें परमात्म्याचा सर्वदा सत्याकडे ओढा असल्यानें, असत्याचा चुराडा होणार हें निश्चित होय. तूं तर असत्य, अन्याय, उन्मत्तपणा याची केवळ मूसच आहेस. फक्त नांवानें मात्र ब्राह्मण आहेस; परंतु

शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च ।
ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ।। भ.गी.अ.१८-४२.

इत्यादि स्वभावसिद्ध ब्रह्मकर्मांपैकीं एकाचेंही तुजकडून आचरण होत नाहीं. तूं सर्वदा आसुरी संपत्तीचें कर्म आचरीत आहेस व अघोर यज्ञाचा सोहळा भोगीत आहेस. तुझ्या अंगीं वृथाभिमान फारच वाढला आहे. वास्तविक प्रतिसृष्टि निर्माण करण्याचें सामर्थ्य तुझ्या अंगीं असतां, त्याचा सदुपयोग न करितां तूं सर्वसमर्थ ईश्वराशीं ईर्षा धरून व्यर्थ नाश पावत आहेस. आमची दृष्टि फिरली कीं, तुला काळमृत्यु आलाच. निमिषार्धांत चौदा भुवनांचा संहार करून टाकण्याचें सामर्थ्य आमच्यामध्यें आहे. मग तुझी विशात ती काय? तूं ज्ञानी असतांही भ्रम पावून पराची निंदा करितोस. श्रीशंकर विभूति लावितात. म्हणून तूं त्यांनां दरिद्री ठरवून त्यांचा अव्हेर करितोस, त्यांना अवदानें देत नाहींस. शिवाय जिचें स्वरूप विश्वमान्य होतें अशा तुझ्या कन्येचें-जगन्माता-आदिमाया गौरी—हिचें खरें स्वरूप न ओळखतां इतर कन्यांप्रमाणें ही श्रीमंत नाहीं म्हणून तिचा तूं धिःकार केलास. तुला वाटतें कीं, मीच वैभवसंपन्न, परमज्ञाता! श्रीशिवपार्वती हीं दरिद्री व अवलक्षणीं होत. प्रत्यक्ष श्रीविष्णूनें स्वतःस वैकुंठभुवनाचें ऐश्वर्य व लक्ष्मी हीं श्रीशंकरापासून प्राप्त झाल्याचें व ब्रह्मादिक सर्व देवांना श्रीशंकरांनींच षड्गुणैश्वर्यसंपन्न केल्याचें सांगितलें असतांही तुला उमज पडेना! उलट तूं बलोन्मत्तपणें जगन्नाथाची निंदा केलीस, म्हणून शिवसतीनें सर्वांची बुद्धि भ्रष्ट करून व त्यांच्या शक्ति आकर्षून घेऊन

प्राणत्याग केला, हें न जाणतां तूं आम्हांस म्हणतोस कीं, तुम्ही मला साह्य करा. महादुरभिमानी दैत्याच्या संगतीनें तूं श्रीशंकरांना जिंकण्याचें धार्ष्ट्य करीन म्हणतोस; परंतु जेव्हां देवीचा प्राणांत झाला, त्याचवेळीं तुम्हा सर्वांच्या आयुष्याची दोरी तुटली आहे. आतां श्रीशंकरांच्या तृतीय नेत्रापासून उद्भवलेला वीरभद्र तुम्हां सर्वांना चांगली शिक्षा लावील, देवीचा देह नष्ट झाला; पण प्राण अग्नींत साभिमान जागृत असल्यानें हा अग्नि दारुण क्षोभला आहे. यांतच तृतीय नेत्राग्नि श्रीवीरभद्र सामील होतांच प्रळय होईल. त्या अशुभाचें सूचक चिन्ह ह्मणून नक्षत्रें खचत असल्याचें व इतर अशुभ चिन्हें होत असल्याचें दिसत आहे. श्रीशंकराच्या भयंकर जटाघाताबरोबर महाक्रूर, महावीर श्रीवीरभद्र भद्रकाळीसह उत्पन्न झाला असून तो असंख्य सेनेसह तुजवर चाल करून येत आहे. त्यापुढें तुझें सर्व सैन्य कसें निर्जीव व हतवीर्य झालें आहे पहा. या संग्रामांत तुम्हा सर्वांचा संहार होणार हें खास. तरी निदान आतां आम्ही सांगतों तो एक उपाय करून हा अकाळ प्रळय तूं थांबीव. आतां प्रळयरुद्र श्रीवीरभद्र येथें आला आहे. त्याला शरण जाऊन क्षमा माग, म्हणजे ईश्वर संतुष्ट होऊन सर्वांचे प्राण वांचवील." हें देवगुरु बृहस्पति इत्यादि ग्रहांचें बोलणें दक्षानें मुळींच मानिलें नाहीं. तेव्हां गगनांतून नक्षत्रगण तुटून पडले, पृथ्वी कंपायमान् झाली, आकाश दणाणून गेलें, अग्नि भयंकर क्षोभला. हें पाहून ऋत्विजांना अग्नि शांत करण्यास सांगून आपण आपल्या सर्व सैन्यानिशीं युद्धास सज्ज झाला. इतक्यांत दूतांनीं श्रीवीरभद्रदेव जवळ आल्याची वर्दी दिली. तों असुरगण गजबजले. दक्षप्रजापतीनें आपले प्रधान, सेनापति, असुररथी, महारथी, यांना पाचारण करून त्यांना आपापल्या कक्षांतील सर्व सेना एकदम युद्धार्थ सिद्ध करण्याची आज्ञा केली. दक्षप्रजापतीचे आठ हजार प्रधान—मंत्री, व हजारों सेनापति सैन्यांची व्यूहरचना करून युद्धार्थ सिद्ध झाले होते. त्यांनीं आपल्या साह्यार्थ आणखी कोणकोणास बोलाविलें व सैन्यरचना कशी केली हें पुढें सांगितलें आहे.

# [ ५ ] दक्षप्रजापतीचा सेनासागर.

या संग्रामाकरितां दक्षप्रजापतीनें देव, दैत्य, मानव, असुर, राक्षस, यक्ष, गंधर्व इत्यादिकांची रथ, गज, अश्व, पदाति अशीं समग्र चतुरंग सेना आणविली. त्यांत कोणकोणत्या देशाचे कोणकोण वीर होते हें थोडक्यांत सांगतों. पूर्वेकडील जंबुद्वीपाचे असंख्य महापराक्रमी राजे, तसेच मेरूपर्वतासभोंवतालच्या प्रदेशांतील वीर व ध्रुवलोक, सूर्यलोक, चौदा भुवनें, एकवीस स्वर्ग यांतील योद्धे, सप्त पाताळांतील निवातकवचादि महाक्रूर असुरगण बोलाविले. अमरपति इंद्र ऐरावतीवर आरूढ होऊन तेहतीस कोटी देवगणांसह युद्धास सिद्ध होता. आग्नेय दिशेचा अधिपति शोकावतीचा राजा अग्नि व दक्षिणाधिपति महिषारूढ वैवस्वत (यम) हे सहसैन्य हजर होते. प्रेतारूढ नैर्ऋत्यपति नैर्ऋत्यनृप, पश्चिमदिक्पति भोगावतीचा नृप मकरारूढ वरुण हे सैन्यासह सिद्ध होते. वायव्य दिशापति शशकारूढ वायु सर्व सेनेसह आला होता. उत्तराधिप अलकावतीचा भूपति ईश्वराचा मित्र कुबेर हा पुष्पकविमानीं बसून सहस्रावधि सैन्यासह सज्ज होता. हे सप्तदिशापति आले होते; पण श्रीशंकरांनां आमंत्रण नसल्यानें, ईशान्य दिक्पति ईशान हा मात्र आला नव्हता. या देवगणांशिवाय, काळिकेय, दनूचे पुत्र लक्षावधि दानव, हिरण्याक्षादि दैत्यगण, हे सर्व युद्धार्थ आले. यांच्या भारानें पृथ्वी लवूं लागली व दणदणाटानें दिगंतर व्यापून गेलें !

पृथ्वीवरील छप्पन[1] देशांचे पराक्रमी राजे आणि महाबलाढ्य भद्रश्रवाचे सर्व मांडलिक, मलयगिरीभोंवतालच्या देशींचे नानावर्णाचे विचित्राकृति वीर ह्मणजे एकपाद, द्विपाद, त्रिपाद, चतुष्पाद, पंचपाद, घोडमुख, श्वानमुख, सूकरमुख रासभमुख पण मनुष्यशरीरी हस्तीरथारूढ व विमानारूढ असे

---

१ पौराणिक काळांतील छप्पन देश—अंग, वंग, कलिंग, कालिंग, काश्मीर, कांभोज, कामग, रूनदेश, सौवीर, सौराष्ट्र, बंगाल, मागध, मालव, नेपाळ, केरळ, चोळ, पांचाळ, गौड, मल्याळ, सिंहल, द्रावीड, स्त्रीराष्ट्र, कर्नाटक, लाट,

अनेक राजे व महारथी ःद्धार्थ आले. शिवाय दक्षिण दिशेचे सर्व नृप, तसेंच ब्बर, हूण, रूमशामचे, म्लेंछ भाषा बोलणारे राजे, हबसी, अविंध, मळेवार, कांबे, कंक, तुरकमान, लंकेचे राक्षस, हे सर्व आले.

पश्चिम दिशेचे अनेक राजे व उत्तरेचे बलाढ्य राजे वीर हे आले. लक्ष-द्वीपांतील ईध्मजिव्ह राजा आपलें प्रबळ सैन्य घेऊन आला. तसेच यवस, इंद्रसेन, समुद्रसेन, शांतन हे महाबलाढ्य राजे सहसैन्य आले. शाल्मल-द्वीपाचा यज्ञबाहू नृपति, सुरोचन, सौंमनस्य, रमणक, परिभद्र, अप्यायन, नंदन, अविज्ञान, इत्यादि अनेक राजे दक्षयज्ञास आले. हिरण्यरेत द्वीपाचा विख्यात वसुराजा, नृपवर्मा, व नाभिगुप्त हे महाश्रेष्ठ राजे आणि स्तुत्यव्रत, सीतवंत, देवनाभ, कुशलाद, क्रौंचद्वीपाचा क्रौंचनाद—व सूर्यवंशी धृतपुष्ट, मंधुरह, सुधाम, भ्राजिष्ट, लोहितार्णव, पुरु; तसेच क्षीरसमुद्रांतील द्वीपांचे शाक, मेधातिथि, मनोजव, बलिभद्र, धूम्रकेतु, चित्ररेफ, द्वितियहोत्र, माणक, त्याचप्रमाणें सप्तपाताळींचे सर्व सर्प-जाति शेष, वासुकीसह येऊन दक्षप्रजापतीस मिळाले.

अशा प्रकारें अत्यंत पराक्रमी व महाबलाढ्य असे जगतीतलावरील सर्व राजे सहसैन्य दक्षप्रजापतीच्या साह्यास आले होते. या अपरमित सैन्य-सागरानिशीं दक्षराजा युद्धास सिद्ध झाला.

या अफाट सेनासागराशीं तुलना करितां श्रीवीरभद्राचें सैन्य परिमितच दिसत होतें. आणि हें एकप्रकारें योग्यच होतें, कारण जगामध्यें साधारणपणें असा नियमच आहे कीं, सत्पक्षाचें बल प्रारंभीं कमीच भासतें आणि सत्यालाच चिकटून असणारे लोक फारच कमी. सत्पक्षाचाच जय व्हावा अशी मनांतून इच्छा करणारे कित्येक सन्मार्गगामी पुरुषसिंहही अनेक

---

करहाटक, महाराष्ट्र, घोर्न, घोटदेश, नाट, पीड्य, पुलिंग, ग्रहुण, कुंरुगांधार, विदर्भ, विदेह, विट्कळ, बर्बर, कैकेय, कोसल, गांधर्व, निरुक्त, कुंतळ, किरात, शुरसेन, कोंकण, टंकण, मलयपर्वत, मरुंतक, यमद्रव, सैंधव, पारसी, गुर्जर, रूमशाम, जालंधर व शाळु ( शाल्व ) हे होत.

कारणानें निरुपाय ह्मणून असत्पक्षाकडेच प्रत्यक्षतः भाग घेत असतात. उदाहरणार्थ-- या चालू संग्रामाच्या वेळीं, श्रीविष्णु, ब्रह्मदेव, बृहस्पति, इत्यादिकांची स्थिति हीच होती. ( ऐतिहासिक ज्ञात कालांतील प्रख्यात भारतीय युद्ध अगर रामरावण युद्ध यांतही भीष्म, द्रोण, विभीषण, इत्यादि शौर्यशाली वीरांची हीच स्थिति होती. ) उलट असत्पक्षाला मात्र सर्वांची उघड सहानुभूति व साह्य मिळतें. कदाचित् असेंही असेल कीं, सृष्टिरचना बदलतांना अगर युगपरिवर्तन करितांना मागील सर्व रचना रसातळास पोहोंचवून मग नवीन युग सुरू करावयाचें कार्य परमेश्वर करीत असावा. म्हणूनच अशा परिवर्तन-परिस्थितींत झाडून सारे सर्व प्राणी कालमहात्म्यानें असत्पक्षाकडेच ओढिले जात असावे. याच नियमानें चालू संग्रामांत, जाणून-बुजून त्रैलोक्यातील सर्व देव, दानव, मानवादिकांनीं दक्षप्रजापतीलाच साह्य केलें. या अफाट सेनासागराशीं झुंजण्यास श्रीवीरभद्रदेवाकडे जें सैन्य होतें त्याचें थोडेसें वर्णन मागें केलेंच आहे. त्याशिवाय भद्रकाळी, कात्यायनी, चामुंडा, दिव्यायुधा, मुंडमर्दिनी, भद्रा, इत्यादि नवदुर्गा व त्याबरोबर असंख्य भूतगण जन्मले. शाकिनी, डाकिनी, गुह्यका, यक्षिणी, शांभवी, कूष्मांडा, कर्पटा व महाक्रूर चेटका, याही सर्व निघाल्या. आणखी महाभैरव, काळभैरव, क्षेत्रपाताळ, यक्षिणी, राक्षसी, चौसष्ट योगिनी, या सर्व संग्रामार्थ सिद्ध झाल्या. यांतील कित्येक अष्टभुजा, कित्येक दशभुजा, षोडशभुजा अशा अनंत भुजांच्या व अनंत शक्तीच्या होत्या. शत्रुपक्षांत ज्या अनेक देशांचे अनेक प्रकारचे योद्धे आले होते, त्या सर्वांशीं झुंजण्यायोग्य ह्या मायारूपिणी अवतरल्या होत्या. जे भैरव या वेळीं उत्पन्न झाले होते ते सर्वही दशभुज, पंचवदन, भस्म, रुद्राक्ष व जटाधारी, त्रिनेत्री, सर्पभूषण आणि वृषभवाहन होते. यांचे हजारों सुवर्णरथ होते; कित्येकांनीं आपल्या रथांना सिंह जुंपले होते ! तर आणखी कित्येकांनीं व्याघ्र जुंपिले होते ! हत्ती जुंपिलेले रथ दहा हजार व अश्वांचे रथ लक्षावधि होते. हे सर्व अतिरथी, महारथी, ईश्वरासमान तेजस्वी पण अत्यंत उग्र होते. ते सर्व सिंहनाद करीत, रणवाद्यें वाजवीत, रणगर्जना करीतच भूतळीं उतरले.

त्यांतील कित्येकांनीं आपल्या हातीं पर्वतांचीं शिखरें उपडून आणिलीं होतीं! अशा या महाभयंकर सैन्याचा अधिपति श्रीवीरभद्रदेवही तितकाच भयानक होता. त्याचें त्यावेळेचें स्वरूप अत्यंत गंभीर व सुंदर पण भयदायी होतें. त्या स्वरूपाचें वर्णन करण्यास कोणी समर्थ झाला नाहीं. तो चतुर्भुज, दिव्यमूर्ति परमेश्वराचा सगुण अवतार श्रीविरभद्र कोटि विद्युल्लतेप्रमाणें अग्नीसारखा देदीप्यमान दिसत होता. तो धरणीस पाय न लागतां अधांतरीं चालत होता. तो केव्हां दिव्य रथावर आरूढ होई, तर केव्हां शुभ्र मेघावर आरूढ होई. त्याचीं पदकमलें व नखाग्रें दिव्य तेजानें चकाकत होतीं. योगी त्या चरणांचें निरंतर चिंतन करीत असतात. त्या पायांस नेपुरें, घटिका, ब्रीदें, घंटा, किंकिणी ह्या बांधिल्या होत्या. त्यांच्या दर्शनानेंच चित्तशुद्धि होऊन ब्रह्मबोध व्हावा असे ते दिसत होते. कमरेस मनोहर पीतांबर शोभत होतें. त्याची कंबर सुंदर दिसत असून तीवर शस्त्रें लटकलीं होतीं. हृदयावर दिव्य सूर्याप्रमाणें देदीप्यमान पदक शोभत असून गळ्यांत रुद्राक्षमाला व नररुंडमाला घातल्या होत्या. युद्धांत जे रथी, अतिरथी महायोद्धे असुर मृत होत त्यांच्या शिरकमलांची माळ गुंफून तो गळ्यांत घालीत असे. डोक्यावर जटाभार शोभत असून त्यानें मनगटावर व बाहूंवर अनेक रत्नांचे अलंकार घातले होते. किरीटाचें तर कोटिसूर्यांप्रमाणें तेज पडलें होतें. असा हा स्वयंभू श्रीशंकराचा पूर्णावतार झाला होता. असा हा देदीप्यमान, प्रतापसूर्य श्रीस्वामी कैलासस्थानीं उत्पन्न होऊन जेव्हां भूतळीं अवतरला तेव्हां त्या क्रोधमूर्तीस पाहूनच भयानें कित्येकांनीं उभे प्राण सोडिले! अयोनिज दक्षाचा संहार करण्यास ही ईश्वराची उग्रमूर्ति अवतरली. हा वीरांचा वीर असा वीरबाहू वीरभद्र वर सांगितल्या प्रकारचें अपरिमित, अजिंक्य, अमर असें सैन्य घेऊन रणवाद्यें, नगारे, नौबती, शंख, भेरी वाजवीत घनगर्जना करीत भूतळीं आला. यांच्या रणगर्जनेनें पृथ्वी कंपायमान झाली, दशदिशा दणाणून गेल्या, गिरिशिखरें कोसळलीं, आकाश नादानें भरून गेलें आणि आतां ब्रह्मांडाचा संहार होतो कीं काय असें वाटलें! त्यांच्या त्या दणदणाटानें ती अफाट दक्षसेना गडबडली व ती रणगर्जना ज्या

उत्तर दिशेकडून ऐकूं येत होती, तिकडे सर्व पाहूं लागले. हा भयंकर आक्रोश ऐकूनच कित्येक वीर मरणोन्मुख झाले! भयानें कित्येकांची बोबडी वळली! परंतु हा आक्रोश ऐकतांच दक्षयज्ञमंडपांत ठाण मारून बसलेल्या नंदीस मात्र अत्यानंद झाला! व तो ज्या दिशेकडून ती घनगंभीर गर्जना ऐकूं येत होती त्या उत्तर दिशेकडून कोण वीर येत आहे तें न्याहाळून पाहूं लागला. ( म्हणून हल्लीं यडूर क्षेत्रांतील मुख्य नंदी वायव्येकडे किंचित् उत्तरेकडे तोंड—फिरवून पाहतोसा दाखविला आहे, त्याचें कारण हेंच होय. ) या रणगर्जनेला प्रत्युत्तर म्हणून दक्षसैन्यांतील श्रीविष्णु इंद्रादि देवगणांनीं आपापले शंख वाजवून सिंहनाद केला. या दोहों पक्षांकडील रणनादानें पृथ्वी डळमळूं लागली! म्हणून वराहानें आपल्या दाढेंत बळकट धरून ती सांवरली! असो.

## [ ६ ] चंडवीराची शिष्टाई

दक्षसैन्यांत असा हलकल्लोळ उडून गेला असतांच, श्रीवीरभद्रदेव रणगर्जना करीतच दक्षयज्ञमंडपासमीप आले. आतां एकदम हल्ला करून तावडतोब युद्धास प्रारंभ करणें हें युद्धनीतीस अनुसरून नसल्यानें दक्षराजा हा अत्यंत अपराधी असतांही, त्यांजकडे वकील पाठवून आपली मागणी काय आहे हें त्यांस कळविण्याकरितां व ती मान्य झाल्यास साम करण्याकरितां श्रीवीरभद्रदेवानें त्याच्याकडे चंडवीरनामक एका प्रख्यात पराक्रमी गणेश्वरास पाठविलें. अशा प्रक्षुब्ध मनःस्थितींत शिष्टाईचा कांहीं उपयोग होणार नाहीं हें तो जाणत असतांही युद्धनीतीचा आपल्याकडून भंग होऊं नये म्हणून मुद्दाम ही शिष्टाई घडवून आणिली. यावेळीं शिष्टाईकरितां जाणें अत्यंत जोखमीचें किंबहुना प्राणसंकटाचें होतें; तथापि ही खडतर कामगिरी शौर्यशाली चंडवीरानें मोठ्या आनंदानें पतकरिली. व ती अंदाजाप्रमाणें पुढें निःष्फळ झाली; तरी हें दाखविलेलें धैर्य कांहीं कमी नव्हे. पुढें प्रत्यक्ष युद्धांतही त्यानें श्रीवीरभद्रदेवाच्या जोडीनें पराक्रम गाजविला म्हणून सदरी चंडवीराची या वीरत्वाबद्दल कायमचें नांव रहावें याकरितां हल्लीं श्रीवी-

रभद्र लिंगाजवळ 'चंडिकेश्वर' या नांवानें एक पिंडी स्थापिली आहे. ती याचेंच स्मारक होय.

चंडवीर त्या विशाल यज्ञमंडपांत येऊन पोहोंचला. तेथें हजारों ऋषि वेदघोष करीत होते. त्यांनीं चंडवीरास पाहिलें; पण कोणी त्याशीं भाषण करीना कीं, कां आला याबद्दलही विचारपूस करीना. चंडवीरही मानापमानाकडे न पहातां थेट दक्षप्रजापतीपुढें जाऊन उभा राहिला, व त्यास म्हणाला. 'महान् महान् ऋषि व देव यज्ञास आले आहेत, असें असतां, फक्त एका श्रीशंकरांना यज्ञाच्या भागदानांतून वगळून टाकिलेंस अशी यज्ञ करण्याची रीत तूं कोठून आणिलीस? प्रत्यक्ष तुझी कन्या दाक्षायणी हिनें अग्नीस देह अर्पण केला. त्याचा तुजला यत्किंचित् खेद झालेला दिसत नाहीं. कल्पवृक्ष हा त्याच्या सावलींत बसणाऱ्याच्या सर्व इच्छा पूर्ण करितो; असें असतां, त्या वृक्षाच्या बुडाशीं अग्नि लावणें ह्याचेंच नांव उपकार स्मरणें कीं काय? तुम्ही सर्वजण श्रीशंकराच्या आधीन आहां व त्यांच्या प्रसन्न मर्जीमुळेंच तुम्हांला हें ऐश्वर्य प्राप्त झालें आहे, हें विसरलां काय? ज्याचें मनःपूर्वक एकदांच स्मरण केल्यास त्रिविध तापांतून अचानक सुटका होते, त्या दयाघन श्रीशंकरांनीं तुम्हांस कोणता त्रास दिला आहे कीं, त्यायोगें तुम्ही त्यांच्याशीं मात्सर्यानें वागतां?' हें चंडवीराचें गंभीर भाषण ऐकून दक्षानें उत्तर केलें. 'आम्ही आमच्या घरीं सुखासमाधानानें वागत असतां 'अमक्याला कां बोलाविलें नाहीं? असा जबाब विचारणारे तुम्ही कोण? शिवानें आम्हांस व गौरीलाही अत्यंत त्रास दिल्यामुळें तिनें अग्निप्रवेश केला! त्याच माझ्या दुसऱ्या कन्या पहा कशा आनंदांत निमग्न आहेत. भवानीनें तो राख लावणारा नवरा पसंत केला होता हें तिचें दुर्दैव होय!' हें ऐकून चंडवीरानें त्यासमयीं सामोपचारानें नमतें घेण्याविषयीं दक्षास बराच उपदेश केला; परंतु 'पालथ्या घागरीवर पाणी' पडल्याप्रमाणें दक्षानें तिकडे बिलकुल लक्ष पुरविलें नाहीं. उलट उद्धटपणानें तो चंडवीरास म्हणतो 'तुम्हां झोटिंगांना कुलीन स्त्रिया उपयोगी नाहींत. रुद्राक्षाच्या माळा घालण्याची तुम्हांस मोठी हौस, घरदार सोडून अंगास राख फांसून मसणवटींत राहण्याची आवड!

अश्व, गज, रथ, सोडून बैलावर बसणारे भणंग भिकारडे तुम्ही! तुमच्या घरीं गौरीसारख्या सुखसंपन्नतेंत सर्वदा काळ घालविलेल्या कन्येला समाधान कसें वाटावें? म्हणून तिनें स्वतःचा अंत करून घेतला. असें असतां, पिसाटमंडळ जमवून घेऊन मोठ्या तोऱ्यानें येथें तूं विचारावयास आला आहेस कीं, 'भवानी कोठें आहे?' ती, त्या कर्मकटकटींतून एकदांची सुटली, फार उत्तम झालें! तर आतां तुम्ही आल्या वाटेनें मुकाट्यानें परत जा. तुमच्या त्या गोसावड्याच्या त्रासानेंच तिनें प्राणत्याग केला असून उलट ती तुम्ही मजकडे मागावयास पळत आला आहांत. असे तुम्ही निर्लज्ज कपटी आहांत! करितां या नसत्या उठाठेवी न करितां, व युद्ध करण्याच्या भरीस न पडतां मुकाट्यानें खालीं माना घालून परत कैलासास जा. येथें शिरजोरपणा कराल तर व्यर्थ प्राणास मुकाल!' हें दक्षाचें अभिमानाचें असंबद्ध भाषण ऐकून चंडवीर खवळून म्हणाला, 'मूर्खा दक्षा, भवानीस सजीव करून परत देऊन श्रीवीरभद्रास शरण येऊन झाल्या अपराधाबद्दल त्वां त्यांची क्षमा मागितली नाहींस. तर आतांच तुम्हां सर्वांची युद्धाची रग पूर्णपणें जिरून यज्ञाची पूर्णाहुति झाली नाहीं तोंच तुझा शिरच्छेद होईल! आणि इतक्यांकरितांच महाबलाढ्य प्रळयरुद्र श्रीवीरभद्र येथें आला आहे. पुढें केल्या कर्मांचें पूर्ण प्रायश्चित्त भोगून पश्चाताप पावून तूं श्रीशंकराचेंच स्मरण करशील. असें बोलून रागारागानें तो यज्ञमंडपाबाहेर पडला व श्रीवीरभद्रास झालेला सर्व वृत्तांत कळवून युद्धाशिवाय अन्यप्रकारें दक्षराजा वठणीवर येत नाहीं असें स्पष्ट सांगितलें.

याप्रमाणें युद्धाचाच निश्चय ठरून त्यावांचून अन्यमार्ग नाहीं असें जेव्हां दिसून आलें. त्यावेळीं श्रीवीरभद्रानें आपल्या सैन्याची त्या रीतिनें व्यूहरचना करून तें व्यवस्थेनें उभें केलें.

इकडे श्रीविष्णूनें दक्षास झिडकारून या संग्रामांत खास तुला अपजय येणार, असें सांगितलें होतें, तरी दक्षप्रजापतीनें दैत्यमंडळांत जाऊन त्यांना युद्धार्थ सिद्ध होऊन अघाडीस जाण्याविषयीं आज्ञा केली. ते सर्व मदोन्मत्त दैत्य युद्धातुर झाले होतेच. हिरण्याक्षानें दक्षास म्हटलें, मी एकटाच पृथ्वीचें

निर्दालन करीन. शिवविष्णु एकत्र मिळून जरी युद्धास आले, तरी त्यांची मात्रा चालूं देणार नाहीं! इतक्यांत हिरण्यकश्यप आवेशानें म्हणतो, माझा पराक्रम विष्णु जाणत आहेच. मी एकटा त्या सर्व शिवसेनेस पुरून उरेन! तुम्हीं मुळींच शंका बाळगूं नका. गजासुर, दुंदुभी हे महापराक्रमी दैत्य आवेशानें पुढें येऊन ह्मणाले. आमच्या भुजबलाची उर्मी शमवील असा बलाढ्य योद्धा त्रैलोक्यांत नाहीं! शिवाला आमचा पराक्रम ठाऊक असल्यानें तो स्वतः न येतां या सोंगाड्या गणेश्वरास पाठविलें आहे. त्याची काय मातब्बरी आहे? तों सहस्रार्जुन शेंकडों धनुष्यें सरसावून पुढें आला. व दक्षास ह्मणाला, कीं, 'मी एकटाच या शिवसैन्याचा फडशा पाडून प्रत्यक्ष शिवाचाही पराभव करीन!' त्या सर्व दैत्यगणांतील तो आवेश व वीरश्री पाहून दक्षास परम संतोष वाटला व त्यानें दुंदुभीस सांगितलें कीं, तुम्ही प्रथम वीरभद्रास सामोरे जावें. असें सांगून आपल्या सर्व मांडलिकांना त्याला साह्य करण्याविषयीं बजाविलें. इतर सर्व योद्ध्यांनीं आपआपल्या सैन्यानिशीं सर्वदा दक्ष राहण्याविषयीं आज्ञा करून श्रीविष्णूंचें मन वळवून त्यांना युद्धोन्मुख करण्यासाठीं प्रजापती त्यांजकडे पुनः गेला व त्यानें त्यांची अत्यंत मनधरणी चालविली.

दक्षप्रजापतीची व त्यांजबरोबरच्या सर्व ऋषिमंडळींची ती प्रार्थना ऐकून श्रीविष्णु म्हणाले, 'हे प्रजापते, मी युगानुयुगीं अधर्माचा क्षय करून धर्म रक्षण करण्यास्तव अवतार घेत असतों. जसा मी तसेच श्रीशंकरही अधर्म, व असत्य यांचा नायनाट करीत असतात. ह्मणून त्यांची उपेक्षा न करण्या-विषयीं तुला यज्ञारंभीं बोध केला; पण तो न ऐकतां त्वां अन्यायाचरण केलें; त्यामुळें परमेश्वरास राग आला असून त्यापुढें कोणाचाही टिकाव लागणार नाहीं. तथापि मी तुजनिमित्त एकदां युद्धाला उभा राहीन मग होणार तें होईल.' यावर दक्ष ह्मणतो, ' हे दीनदयाळ, भक्तवत्सल, यज्ञ करणें हेंच वेदांचें सारभूत तत्त्व आहे. त्याप्रमाणें वेदधर्मानुसार मी आपणास तोषविण्याकरितां यज्ञकार्यरूपी वेदमार्गाचेंच अनुकरण करीत आहें. त्यांत सर्व देवांना अवदानें दिलीं. ईश्वराला मात्र भाग दिला नाहीं. कारण

त्याला देवत्वच नाहीं. पण हें पाहून व मुख्यतः दारिद्र्यदुःखानें पीडिल्यामुळें गौरीनें देहत्याग केला! त्या दरिद्री शिवाच्या संगतीनें अहोरात्र दुःख भोगून ती अत्यंत त्रासली असल्यानें, वरील प्रमाणें कांहीं तरी निमित्त पुढें करून तिनें आपला प्राण दिला; आणि ती त्या त्रासांतून एकदांची मुक्त झाली. परंतु ती दग्ध झाल्याकारणानें इकडे हा अनर्थ ओढवला. तथापि इंद्रादिक सर्व देवगण, दैत्य, दानव, त्रैलोक्यांतील राजे हे सर्व महाबलाढ्य सेनानी माझ्या साह्यास आले असल्यानें, फक्त एकाकी अशा मसणवटींतलीं थोडीं भूतपिशाचें बरोबर घेऊन कैलासाहून येथें केवळ मरण्यास्तव आलेल्या बीभद्रस्वरूपी वेताळाला भिऊन तुह्मी माझी निर्भर्त्सना करून मनोभंग करीत आहां. त्या पिसाटांचा फडशा पाडण्याला पळाचाही अवधि नको? असें असतांना माझा तेजोभंग करून त्या शंकराची येथील सर्वश्रेष्ठ सिंहासनावर स्थापना करण्याचा तुमचा मानस असावा असें वाटतें; परंतु हें मला कदापि मान्य नाहीं.' ही दक्षप्रजापतीची विचित्र कल्पना ऐकून श्रीविष्णु संतप्त झाले आणि म्हणाले, ' हे मूढमते, कोणाचें बळ किती व योग्यता किती व आपली पायरी कोणती हें न कळतां अज्ञानानें व भ्रमानें तूं हवें तसें बडबडत आहेस. तुज मूर्खाला आतां किती सांगावें? ईश्वर हा साक्षात् वेदांचा पूर्ण वेदगर्भच आहे. त्याच्या कृपामात्रेंच मी स्वतः निजस्थैर्य पावलों. पण हें गुह्य तुज मदोन्मत्ताला कोठून कळणार ! लवकरच तुझा सर्वस्व नाश होणार असल्यानें ही नानाप्रकारची ईश्वरनिंदा तुला आठवत आहे. इतकेंच नव्हे तर आदिमाता जगदंबा देवी भवानीलाही तूं दोष देत आहेस. तिचा महिमा तुज मूर्खाला कसा कळणार? ती शिवसती देवी दाक्षायणी चित्-चैतन्य-चित्प्रभामय असून अष्टसिद्धि तिच्या दासी होत्या. आणि प्रत्यक्ष लक्ष्मी अहर्निश मोठ्या प्रीतीनें तिची सेवा करी! त्या जगजननीला तूं जन्मदरिद्री ह्मणतोस या तुझ्या मूर्खपणाला काय ह्मणावें ? अरे, जिच्या नुसत्या नामस्मरणानें प्राणी पूर्ण कल्याण पावतात तिचा महिमा तुज अज्ञानाला कसा कळावा ? शुंभ निशुंभ महादैत्यांचा जिनें क्षणांत संहार केला त्या महादेवीचें सामर्थ्य तूं क्षुल्लक समजतोस काय?

केवळ ती आपल्या उदरीं जन्मली ह्मणून तूं मोठा गर्व वाहतोस; पण ती आदिमाया निश्चयानें ईश्वराची निजशक्तीच होती. ह्मणून तुजसारख्या अहंकारानें ताठलेल्या व उन्मत्तपणानें बेहोष झालेल्याची कन्या ह्मणवून घेणें तिला यापुढें इष्ट वाटलें नाहीं. ह्मणूनच तिनें देहत्याग केला; परंतु ती पुनः त्याच देवाधिदेव त्रिलोचनाला पुढें वरील. तूं मात्र वृथाभिमानानें नाश पावतोस यांत शंका नाहीं."

भगवान् श्रीविष्णु व ऋषिश्रेष्ठांचा वरील हितकारक बोध दक्षानें ऐकिला नाहीं. त्यानें आपले सेनापति व असुरयोद्धे यांस बोलावून वीरभद्रास सामोरे जाण्यास आज्ञा केली. त्यामुळें दैत्य, राक्षस, असुरादिकांना आनंद होऊन ते रणकर्कश वीरगर्जना करीत आपापली सर्व सेना घेऊन शिव-सैन्याशीं सामना देण्यास निघाले. यांत पायदळ असंख्य असून घोडेस्वारही असंख्यात होते. त्याचप्रमाणें रथारूढ, गजारूढ, अंतरिक्षांतील विमाना-रूढ सैन्यही अपरिमित होतें. शिवाय अनेक देशींचे अनेक तऱ्हेचे देव, दैत्य, दानव, मानव, सर्पकुल, राक्षस, इत्यादि परस्पर अत्यंत भिन्न प्रकृतीचा पण दक्षाकरितां एकत्र मिळालेला परमाद्भुत असा अपरंपार सैन्यसमूह आजपर्यंत कोणीही पाहिला नव्हता.

या अनेक वर्णांच्या असंख्य युद्धोन्मुख झालेल्या विक्रमशाली वीरांपुढें दक्षप्रजापति करद्वय जोडून उभा राहून ह्मणाला कीं, "हे अमितपराक्रमी वीरहो, आज माझा यज्ञ व माझा प्राण रक्षण करण्याचा सर्व भार तुमच्या शिरावर आहे. भगवान् श्रीविष्णूंनीं माझा अव्हेर केला हें तुह्मीं पाहिलेंच आहे. तेव्हां त्यांचे सर्व बोल फोल आहेत हें सिद्ध करून माझ्या कार्याची पूर्णता साधून त्रैलोक्यांत प्रसिद्धि पावण्याचें परमाद्भुत पराक्रम गाजविण्याचें कार्य तुह्मीं करावें; आणि हें कार्य करण्याचें सामर्थ्य तुमच्यामध्यें ओतप्रोत भरलेलें आहे हें त्या पिशाचरूपधारी अधम शिवगणांना दाखवून त्यांचा संहार करा, हीच माझी अत्यंत नम्र विनंति आहे." हें दक्षाचें करुणास्पद, गंभीर पण वीरश्रीयुक्त भाषण ऐकून त्या असंख्य वीरांनीं रणगर्जना केली. त्या वीरघोषानें दशदिशा दणाणून गेल्या. तेव्हां दक्षेश्वर अत्यंत खूष झाला

व त्यांना तत्काळ रणकंदन सुरू करण्याची आज्ञा करून आपण यज्ञ-मंडपीं राहिला.

इतक्यांत दक्षपत्नी, महापतिव्रता प्रसूति हिनें येऊन दक्षाला नमस्कार करून भयशंकित वृत्तीनें त्याजकडे पाहून ह्मटलें, "प्राणेश्वरा, रात्रीं मला एक भयदायी स्वप्न पडलें. स्वप्नांत माझी प्रियकन्या गौरी हिनें प्रत्यक्ष येऊन माझ्या मांडीवर बसून मला सांगितलें कीं, 'पित्यानें माझा अपमान केला त्यायोगें तो मृत्यु पावेल, महाअनर्थ ओढवेल. व सर्वांचा नाश होईल! मजकडे पाहून त्यावेळीं ज्या स्त्रिया हांसल्या त्यांचाही प्राणांत होईल. त्वां मात्र माझा सन्मान करून स्वहस्तीचें रत्नकंकण मला लेवविलें, त्यामुळें मी तुजवर प्रसन्न झालें असून तुला अभय व चुडेदान देईन. हें माझें शाश्वत वचन आहे. दक्षप्रजापतीचें शिर व सर्व सेनासागर जेव्हां नाश पावेल व तूं सत्वर सहगमनास सिद्ध होशील तेव्हां मी कोकिळा होऊन वृक्षावरून तुझ्या नांवानें टाहो फोडीन. तेव्हां मी बोललेलें वचन तुला आठवेल, शेवटीं दक्षेश्वर वांचेल व तुला चुडेदान मिळेल हा निश्चय जाण!' अशाप्रकारें विचित्र स्वप्न मीं पाहिलें. मग तत्काळ सावध होऊन शुद्ध मनानें भगवंताचें नामस्मरण करून मी पुनः झोपीं गेलें तों पहाटेच्या वेळीं पुनश्च स्वप्नांतरीं भयानक देखावा दिसला. तो असा कीं, आपल्या मस्तका-वर तेल घालून, गर्दभावरून धिंड काढून, आपल्यास मारीत मारीत नेलें; त्यावेळीं माझ्या सर्व कन्या आक्रोश करीत चालिल्या. तेव्हां अकस्मात् गौरी तेथें आली व तिनें तुमच्यावरील संकट निवारिलें; असें स्वप्न पाहून मी अत्यंत भयातुर झालें आहें. ह्मणून माझी हात जोडून आपल्यास इतकीच विनंति आहे कीं, श्रीविष्णुदेवांचें बोधवचन निश्चित समजून युद्धाचा प्रसंग टाळा. आणि श्रीशंकरांना शरण जाऊन सर्व जनांचें रक्षण करा. बिलकूल अभिमान धरूं नका. माझी ही प्रार्थना मान्य कराच" हें प्रियपत्नीचें अत्यंत कळवळ्याचें भाषण ऐकून अंतरीं दचकून दक्ष ह्मणतो, 'आतां भूभार उतरण्याकरितां जर काळच वाढून आला असेल, तर जें होणार असेल तें होईल, कदापि टळावयाचें नाहीं ह्मणून तूं शंकाकुशंका

बिलकूल मनांत न आणितां अगदीं निर्भय रहा. ' असें तिचें समाधान करून आपण यज्ञकार्यीं लक्ष घातलें. त्याच्या अंतःकरणांत या प्रसंगानें धडकी भरलीच होती, तथापि इकडे दोन्ही प्रचंड दळें एकमेकांस येऊन भिडलीं असल्यानें युद्धावांचून अन्य गति नव्हती, ह्मणून अष्टदिक्पालादिक सर्वांना युद्धार्थ धाडून आपण भृगु ऋषीकडे आला आणि जारण, मारण, उच्चाटणादि सर्व मंत्राराधना जारीनें सुरू ठेवून रुद्रसेना नष्ट होईल असें सत्वर करावें असें सांगून आपण त्या कार्यीं तत्पर राहिला.

## घनघोर संग्राम.

शिवसैन्याशीं सामना करण्यास प्रथमतः महाप्रतापी असुरवीर दुंदुभी हा पुढें झाला. त्याची सेना अत्यंत बलिष्ठ होती. त्याच्या रथास अनेक उत्तम घोडे जुंपिले होते. रथाच्या तीन बाजूस तीन भयंकर भैरव उभे राहिले होते. त्या रथाच्या भारानें भूमंडळ गडगडलें. अशा दिव्य रथांत बसून दुंदुभी जेव्हां सामोरा आला तेव्हां त्याजबरोबर चौघे प्रधान व सेनापति आणि संपूर्ण सेना निघाली. दुंदुभी हा अत्यंत चतुर सेनानी व कसलेला योद्धा होता. त्यानें आपल्या अपार सैन्याचें चक्रव्यूह, सर्पव्यूह, शकटव्यूह व सूचिकाव्यूह असे चार प्रकारचे व्यूह रचून यांच्या चारी बाजूंस चार सैन्यांचे हुडे रचिले. दर्शनी बाजूस दोहोंकडे हत्ती उभे केले. मध्यें रथी, महारथी आणि त्यांच्या सभोंवतीं घोडेस्वार ठेविले होते. याप्रमाणें सात पदरांचा तो चक्रव्यूह आणि इतर व्यूहांची चातुर्यानें केलेली रचना पाहून सर्व देवसुद्धां चकित झाले. ते दुंदुभीस ह्मणाले ' दैत्यश्रेष्ठा, ही तुझी सैन्यरचना व युद्धचातुर्य हीं अपूर्व आहेत यांत शंका नाहीं, तथापि तुझ्या-पूर्वीं आम्हांस वीरभद्राशीं सामना करण्यास त्वा सवड द्यावी व आमचा पराक्रम पहावा. ' असें म्हणून सर्व दिशापतींनीं आपापलें अपरंपार सैन्य आणून पुढें उभें केलें. सर्वांत पुढें इंद्र आपल्या सैन्यासह उभा राहिला. आणि त्याच्या साह्यार्थ सुरांबरोबर असुरही असंख्य होते. पृथ्वीवरील अनेक राजे सहसैन्य उभे होते. युद्धोत्सुकतेनें जेव्हां असुरसैन्य पुढें घुसूं

लागलें तेव्हां देवगणांनीं त्याचें निवारण करून प्रथम आपलें युद्धचातुर्य पहावें व जर आमची सेना भंग पावली तर आयत्यावेळीं आम्हांस तुम्ही साह्य करावें. असें सांगतांच ते बलिष्ठ असुर बाजूस राहून युद्धचमत्कार पाहूं लागले. महाशूर दिक्पाळांनीं आपल्या सैन्यासह दारुण युद्ध मांडिलें. इकडे दक्षप्रजापति शुक्राचार्यां ( भृगुऋषि ) पुढें येऊन म्हणाला. 'तुम्हीं या युद्धांत देवांस जय मिळावा एतदर्थ जारण, मारण उच्चाटणादि मंत्र-प्रयोग करून रुद्रसैन्याचा तत्काळ विनाश होईल असें करा.' तेव्हां भृगूनें मंत्रावदान करून आवाहन करितांच मंत्रदेवता प्रसन्न झाल्या. व त्यांनीं अमृतसंजविनी मंत्राचा प्रयोग करून देवसैन्याची अपार वृद्धि केली. जेव्हां हा सैन्यसागर शिवसैन्याकडे लोटला, तेव्हां वीरभद्रानेंहीं आपल्या अजिंक्य रुद्रसैन्याला आज्ञा केली. दोन्हीं सैन्यें एकवटतांच घनघोर युद्ध चाललें त्यामुळें त्रैलोक्य हादरून गेलें ! श्रीविष्णु विमानारूढ होऊन हा युद्ध चमत्कार पाहत होते, त्यांनीं मनांत विचार केला कीं, सुराधिप इंद्र हा ज्ञाता असूनही या प्रसंगीं मदांध होऊन जगदीश्वराशीं विरोध करीत आहे. व त्यांना वेदबाह्य करीन असा अभिमान वाहतो ! आणि ईश्वरक्रोधाचा परि-णमा किती भयंकर होणार हें जाणत असतांही, मोठ्या त्वरेनें युद्धार्थ ठाकला आहे. ही कालगतिच होय.' असा विचार ते करीत आहेत तोंच रण वाद्यांचा भयंकर गजर होऊन आकाशमंडळ हादरून गेलें ! देवाधिदेव वीरभद्रानें हें अपार देवसैन्य चालून येत असलेलें पाहून लक्षावधि बाणांचा वर्षाव व गदा, तोमर, परशु इत्यादि प्राणघातक शस्त्रांचा एकदम भयंकर मारा करून घनघोर युद्ध मांडिलें. अनेक शस्त्रघातांच्या व बाणांच्या मारानें तेथें प्रळयारंभच झाला ! सर्व देव मोठ्या इर्षेनें असंख्य शरांचा मारा करीत होते. त्यांचें निवारण करून रुद्रसैन्यानें उलट त्रिशूल, खड्ग, तोमरादिकांचा अतोनात मारा केला. परस्परांचा मार पुष्कळ वेळ चालला, शेवटीं देवसैन्याचें बळ खचून तें अतरीक्षीं राहून युद्ध करूं लागलें. रुद्र-सैन्यानें तेथेंही त्यांजवर तीक्ष्ण बाणांचा वर्षाव करून संहार केला. अखे-रीस कांहीं प्रमुख योद्धे मात्र शेष राहिल्यानें ते मागें हटले. इतक्यांत

भृगूनें यज्ञावदानानें अग्नीला प्रसन्न करून उच्चाटन, जारण, मारण, इ० मंत्रप्रयोग केले. त्यायोगानें शिवसेना हटूं लागली व देवगणांला स्फुरण चढलें. तेव्हां त्यांनीं असंख्य शरांचा मारा करून शिवसेनेचा मोड केला व त्यांच्या पाठलागास सैन्य पाठविलें. हें पाहतांच नंदी व चंडमुंडादि भैरव यांनीं पुढें होऊन शूल व परशूंचा मारा करून, व शेवटीं पाशुपतास्त्र योजिलें. त्या अस्त्रापुढें कोणाचाही निभाव लागणें शक्य नसल्यानें असंख्य देवसैनिकांचे धुनुष्यांसह हात तुटले; मुकुटांसह अनेक राजाचीं शिरें त्या अस्त्रानें उडविलीं. पाशुपतास्त्र हें प्रत्यक्ष अग्निरूपच असल्यानें त्यायोगें लोकपाळांचें सर्व सैन्य भंग पावलें. आपल्या पक्षाचा मोड होत आहे असें पाहतांच इंद्र हा वज्र सरसावून रुद्रगणांवर धांवला. तेव्हां शिवसैन्यांतील चंडमुंडादि महावीर पुढें झाले. आणि पूर्वबाजूच्या सर्व शिवगणांनींही निकरानें चाल केली. या महादारुण शिववीरांनीं सहस्र-नयना (इंद्रा)ला चोहों बाजूंनीं घेरिलें; तेव्हां तुमुल युद्ध होऊन तो हतवीर्य होऊन मूर्च्छित झाला. तें पाहून आग्नेय, दक्षिण, नैर्ऋत्य दिशेचे सर्व सैन्य घेऊन ते ते दिक्पाळ पुढें झाले. तसेंच पश्चिम दिशेच्या पाशपाणि सैन्यासह वरुण आणि वायु, तसाच उत्तरदिशेचा धनपति कुबेर, आपलें यक्ष, गंधर्व, किन्नरादिकांचें विमानारूढ सैन्य घेऊन धांवला. याप्रमाणें अष्टदिक्पाळ युद्धीं मिळाले. परस्परांवर शस्त्राघात करितां हलकल्लोळ उडून गेला. हा युद्धचमत्कार श्रीसदाशिव अंतरीक्षांतून मोठ्या कौतुकानें पाहात होते. याचवेळीं त्या देवसैन्यास चंद्रादित्य, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि इत्यादि नवग्रहांचें सैन्य येऊन मिळालें; तेव्हां तर महाप्रळय झाला. याप्रमाणें तेहतीस कोटि देवांचें सैन्य एकवटून त्या सैन्यानें जेव्हां बाणांचा भयंकर मारा सुरू केला; आणि त्यांतच शुक्राचार्यांच्या जारण, मारण, उच्चाटनादि मंत्रप्रयोगांनीं जेव्हां शिवसैन्याचा संहार चालविला; तेव्हां श्रीवीरभद्रानें अत्यंत खवळून जाऊन भयानक रूप धरिलें, व त्रिशूल खड्ग व चक्रादिक सर्व शस्त्रें सरसावून तो त्या देवांच्या सैन्यसागरावर तुटून पडला आणि लक्षावधि खडतर बाणांचा वर्षाव केला. या निर्वाण

बाणांच्या वृष्टीनें सर्व दिक्पाळ संत्रस्त झाले. एकएका दिशापतीच्या अंगांत शेंकडों बाण रुतले. व रक्ताचा महापूर लोटला. काळदंडधारी यम आपला काळदंड घेऊन रुद्रगणांचें निर्दालन करण्यासाठीं धांवला. तेव्हां हजारों तीक्ष्ण बाणांचा वर्षाव करून वीरभद्रानें काळपाशाचें निवारण केलें. पाशपाणी वरुण पाश घेऊन रुद्रगणांवर धांवत आला. आणि हजारों रुद्रांगणांचा संहार केला. तेव्हां वीरभद्रानें खडतर बाणांच्या वर्षावानें त्याचें निवारण केलें. वायुही आपल्या सैन्यासह घोरयुद्धास प्रवर्तला. पण वीरभद्राच्या बाणवृष्टीपुढें त्याचें कांहीं चालेना. शिवशक्तीच्या असंख्य बाणांपुढें अहंकारमदानें अज्ञानजड झालेल्या देवांच्या शस्त्राघातांचा कांहीं उपाय चालेना. ही देवसैन्याची दशा पाहून ईशान्य दिशेचे परमक्रूर दैत्य पुढें सरसावले. पण त्यांजवर अत्यंत तीक्ष्ण बाणांचा वर्षाव करून महारुद्रानें त्यांचा चुराडा केला. उरलेले दैत्य जीव घेऊन पळत सुटले. व त्यांनीं यज्ञमंडपाचा आश्रय केला, तेव्हां हतबल अशा सप्तदिक्पाळांना श्रीवीरभद्र म्हणाला कीं, ' श्रीसदाशिवास वेदबाह्य करून बलोन्मत्त होऊन तुम्ही अवदान घेतलें. आणि आतां आपल्या बळानें दक्षाला संतुष्ट करावयास येथें युद्धास आला आहां; पण तुमच्या सर्व सैन्याचा भंग झालाच आहे. आतां तुम्ही ईश्वराचा भाग देऊन आपल्या देहांचें रक्षण करा. नाहीं पेक्षां तुमची धडगत नाहीं. ' हें मनीं झोंबणारें भाषण ऐकून अमरपति इंद्र खवळून वज्र घेऊन धांवून आला. पण वीरभद्रानें त्रिशूळाच्या एकाच दणक्यानें वज्र गगनांत उडविलें. आणि ऐरावतास लोळविलें. तेव्हां अमरनाथ भयानें मूर्च्छित झाला. हें पाहून सर्व देव एकवटून सैन्यासह वीरभद्रावर तुटून पडले; परंतु त्या सर्वांचा बाणजाळ निमिषार्धांत तोडून टाकून त्रिशूळाचा व बाणांचा भयंकर मारा करून वीरभद्रानें अमरगणांचें पुनः निर्दालन केलें. श्रीवीरभद्राचें तें अचाट संग्रामशौर्य पाहून सर्व देव भयचकित झाले. ही विपत्ति अवलोकून गरुडारूढ श्रीविष्णूंनीं तर्क केला कीं, या अयोनिसंभव अवतारमूर्तीपुढें देवांचें कांहीं चालावयाचें नाहीं. कां कीं, याच्या एका बाणाच्या

आघातानें मेरु पर्वत खचतो, ब्रह्मांडांत दशदिशांस अग्नि उसळतो, अथवा सप्तपाताळाचा हुरडा होतो! व शस्त्राच्या एकाच घावानें वज्रकवचाचें पीठ होतें! यानें त्रिशूलाच्या मारानें शस्त्रांसहित देवगणाचा नाश केला. म्हणून याच्यासमोर कोणाचा निभाव लागणें शक्य नाहीं. इतक्यांत पुनः सावध होऊन यमधर्मानें आपल्या प्रचंड सेनेसह पुढें होऊन यमदंड प्रेरिला. तेव्हां परीघ, शक्ति, शूल, तोमर, या सर्व आयुधांचा एकदांच मारा करून त्याचें निवारण केलें. आणि यमदंड आकाशांत उडविला! तेव्हां यमानें अत्यंत क्रोधानें काळपाशाची योजना करून एक अमोघ अस्त्र शिवसैन्यावर फेंकिलें. तें दिव्य अस्त्र आपल्या सैन्याचा चक्काचूर करीत येत आहे असें पाहून, वीरभद्रानें त्याचें पूर्ण विदारण करण्याचा निश्चय करून सिद्धता केली; परंतु पुन्हां विचार केला कीं, कालपाशाचा उच्छेद केला तर यमधर्माचें कार्य कुंठित होईल. व अवनीतलावर मोठा अनर्थ घडेल. करितां तसें होऊं नये म्हणून त्या कालपाशावर महाकाळास्त्राची योजना करून त्यास बद्ध केलें. तेव्हां यमधर्म हतवीर्य होऊन पळत सुटला.

## ( ८ ) दैत्याग्रणींशीं घनघोर संग्राम

येणें प्रमाणें देवसैन्याची अत्यंत धूळधाण उडालेली पाहून दक्षप्रजापति भयभीत होत्साता श्रीविष्णूची स्तुति करून त्यांना या अरिष्टापासून रक्षण करण्याकरितां परोपरीनें विनविलें. ऋषिमंडळांनींही अत्यंत करुणरवानें आळविलें, तथापि श्रीविष्णु युद्धास सिद्ध होईनात. इकडे शिवसेना विजयघोष करीत यज्ञमंडपाकडे चाल करूं लागली. त्यामुळें दक्ष प्रजापतीनें दैत्यनाथ 'दुंदुभि'कडे जाऊन या संकटांतून सोडविण्याविषयीं आणि कैलासीं जाऊन शिवाचाच वध करून कैलासाची होळी करण्याविषयीं त्याची परोपरीनें विनवणी केली. ती ऐकून तो महाबलाढ्य दैत्य शिवसेनेवर खवळून उठला. त्यानें दक्षास म्हटलें. 'हे दक्षेश्वरा, आतां माझा पराक्रम अवलोकन करा. या क्षुद्र शिवसैन्याची बिशात काय? सर्व देवांनीं एकवटून जरी आमच्यावर हल्ला चढविला तरी त्यांचा

फडशा उडविण्याला हा वीर समर्थ आहे, मग यःकश्चित् शिवसैन्याचा पाड काय ? माझा पराक्रम कसा आहे याचा दाखला मागें विष्णूला आलाच आहे. आतां हा सोंगाड्या वीरभद्र आपली भरतमढीं भूतपिशाच्चें बरोबर घेऊन तुम्हांस भय दाखवीत आहे. त्याची चांगली रग जिरवून त्याला कैलासापर्यंत पिटाळून लावून आपला यज्ञ निर्विघ्न करीन. ' हें त्याचें वीरश्रीचें भाषण ऐकून दक्षास आनंद झाला. इकडे दुंदुभीनें आपल्या अनेक प्रधान, मंत्री, व सेनापती यांना बोलावून युद्धास निघण्याची आज्ञा केली व आपण स्वतः शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन अघाडीस निघाला.

गजासुराचा पुत्र दुंदुभी दैत्य हा महाबलाढ्य सेनानी असून तो आपल्या बापाच्या वधाचा सूड श्रीशंकरावर उगविण्याची वाटच पाहात होता. या दैत्यनाथाचा देह मेरु पर्वताप्रमाणें विशाल असून याला एकशत गजमुखें, एकशत अश्वमुखें आणि शेकडों उग्र अशीं दैत्यमुखें होतीं. त्याला सहस्रावधि हात होते व तो दीडसहस्र धनुष्यें एकाकाळींच उचलून शत्रूवर बाणांचा वर्षाव करीत असे. अशा प्रकारचा हा कृतांतासारखा शौर्यशाली दैत्यनाथ जेव्हां आपल्या लक्षावधि बलाढ्य दानव सैन्यासह युद्धास निघाला तेव्हां भयभीत होऊन पळत असलेल्या देवसैन्यासही धीर आला. व ते सर्व एकवटून त्यांनीं या दैत्यानाथास साह्य केलें. दुंदुभीनें आपल्या अफाट सेनेची चक्रव्यूह, हंसव्यूह, सूचिकाव्यूह, शकटव्यूह इत्यादि अनेक प्रकारें व्यूह-बद्ध रचना करून मग स्वतः मोठ्या आवेशानें शिवसेनेवर चालून गेला. तेव्हां दोहीं पक्षांत रणवाद्यांचा एकच गजर होऊन आकाशमंडळ दणाणून गेलें! वीरभद्रानेंही आपल्या सैन्यास रणकंदन करण्याची आज्ञा केली. व दैत्यसेनेवर बाणांचें छत पसरिलें. उलट दुंदुभीनें हजारों बाणांचा वर्षाव करून शिवगणांना जर्जर केलें. तेव्हां आपल्या सैन्याची ती दुर्दशा पाहून वीरभद्रास अत्यंत क्रोध आला व त्यानें अग्न्यस्त्र सोडिलें तेव्हां दैत्यसैन्यांत सर्वत्र अग्निप्रळय होऊन तें जळूं लागलें. हें पाहून दुंदुभीनें पर्जन्यास्त्र अभिमंत्रून सोडिलें. त्यामुळें तत्काळ तो प्रचंड अग्नि शांत होऊन शिवसेने-

वर मुसळधार पाऊस पडूं लागला. जिकडे तिकडे पाणीच पाणी होऊन हजारों सैनिक त्या महापुरांत वाहून गेले. तेव्हां वीरभद्रानें वाय्वास्त्राची योजना केली तों सर्व मेघमंडळ वितळून जाऊन त्या प्रचंड वातानें शत्रूसैन्याचा गोंधळ उडविला. तथापि महासामर्थ्यवान् दुंदुभीनें हजारों बाण मारून शिवगणांचा संहार चालविला त्यानें पर्वतास्त्र अभिमंत्रून टाकितांच शेंकडों पर्वतांचा शिवगणांवर वर्षाव होऊन त्यांचें पीठ होत चाललें तें पाहून वीरभद्रानें वज्रास्त्रानें त्या पर्वतांचा चक्काचूर केला. यावेळीं शिवसैन्यानेंही अत्यंत लगट केली. शिवसैन्यांत जे हजारों सिंह रथांस जुंपिले होते. त्यांनीं दुंदुभीच्या गजमुखांवर चाल केली. व जे व्याघ्र रथांस जुंपिले होते त्यांनीं त्याच्या अश्वमुखांवर झडप घातली, त्यामुळें प्रतापी दुंदुभीवीरही गडबडून गेला; परंतु लगबग करून त्यानें शिवसैन्याचा हा आपल्यावरील रोंख परतावेण्याकरितां मोहनास्त्र सोडिलें, त्या अस्त्रप्रभावानें शिवसैन्यांत सर्वत्र मायारूपिणी कोट्यावधि कात्यायनी, चामुंडा, काली, कराली इ. उद्भवल्या. त्यांच्या नेत्रकटाक्षादिकांनीं सर्व सैनिकांचा रणमद उतरून ते मोहित झाले व सर्व शिवगण स्तब्ध राहिले तें पाहून स्वतः वीरभद्र सुद्धां भ्रमांत पडला, व शिवध्यान करूं लगला या विष्णुमाया रूपिणींच्या दिव्य स्वरूपानें सर्व भैरवसुद्धां मोहित झाले ! तेव्हां श्रीशिवाज्ञेनें तेथें तत्काळ अतिक्रूर 'भद्रकाळी' प्रकटली. ईश्वराची ही महामाया उद्भूत होतांच, विष्णुमायारूपिणी सर्व परतल्या व भद्रकाळीशीं समरस झाल्या आणि शेवटीं दोन्ही एकरूप होऊन भद्रकाळीचें तेज अत्यंत वाढलें व ती अत्यंत उग्र दिसूं लागली. तिनें दैत्यांचा संहार चालविला. हें पाहून दुंदुभी आश्चर्यचकित झाला.

महामाया भद्रकाळीनें आपल्याबरोबर हजारों ज्वरादिक व्याधि, आणिल्या होत्या, त्यांनीं दैत्यसैन्यांत तत्काळ प्रवेश केला. त्यामुळें तें प्रबळ दैत्यदळ अनेक रोगांनीं ग्रस्त झालें. स्वतः दुंदुभीच्या अंगीं तप्त सन्निपात ज्वर भरला. तेणेंकरून त्यास युद्ध करणें अशक्य होऊन तो चक्रव्यूहाच्या आश्रयास गेला. तेव्हां वीरभद्रानें एक दिव्यरथ सज्ज करविला व नंदीस

सारथी करून त्यानें मोठ्या आवेशानें चक्रव्यूहांत प्रवेश केला. व अग्नितत बाणजाळानें सर्व अंबर भरून टाकिलें. या अग्निकल्लोळानें दैत्यसैन्य पोळूं लागलें. हा हलकल्लोळ पाहून दुंदुभीनें आपल्या कडील असंख्य सर्पांना सोडून दिलें. त्या भयानक सर्पांनीं शिवसैन्यांत धुमाकूळ मांडिला. त्यामुळें भयानें भैरवगण दशदिशा पळों लागलें. हें अरिष्ट टाळण्यास्तव वीरभद्रानें गरुडाचें स्तवन करून गरुडास्त्राचा मारा केला. त्यायोगें सर्व सर्पांचा क्षणार्धांत संहार होऊन उलट बाणवेगानें ते गरुड दैत्यावर झडप घालूं लागले. आणि त्यांना अत्यंत त्रास देऊं लागले. इकडे वीरभद्रानें चक्रव्यूहाच्या प्रथमावरणाचा भेद करून द्वितीयावरणांत वेगानें प्रवेश केला. तेथें तुमुल रणकंदन चाललें. दुंदुभीनें मनांत विचार केला कीं, सप्तपाशानें बद्ध करून वीरभद्राला अडखळून पाडावा. पण जेव्हां हजारो बाणांसहवर्तमान ते भयंकर सप्तकाळपाश वीरभद्रावर चालून आले. तेव्हां त्यानें श्रीशंकराचें स्मरण करून महाकाळ त्यांवर प्रेरिला. काळांना महाकाळाचें दर्शन होतांच ते भयभीत होऊन महाकाळामध्यें विराम पावले. यावरून श्रीशिवस्मरणानें काळभय दूर होतें हा निश्चय होय. वीरभद्रानें लागलाच चक्रव्यूहाचा भंग करून तेथील दैत्यसैनेचा मोड केला. येथें जो मृत योद्धे गज, अश्वांचा खच पडला होता त्यांतील प्रेतें खाऊन फन्ना उडविण्यास भूतावळ घेऊन भद्रकाळी सज्ज होतीच. त्या असंख्य भूतांनीं त्या मृत प्राण्यांचा तर फडशा उडविलाच, पण उलट ते दैत्य सैन्याच्याही पाठीस लागले. हा अनर्थ पाहून सर्व देव, दैत्य, राजे भयत्रस्त झाले. याचवेळीं वीरभद्रानें दुंदुभीचा रथ मोडून त्याचा मुकुट खालीं पाडिला आणि दिव्य बाणानें तीनशें शिरांचे तुकडे केले. त्याच्या तीन हजार हातांचा भारा बांधिला. नंतर कंठनाळ चिरण्याकरितां तो कृतांतमूर्ति वीरभद्र सिद्ध झाला. तेव्हां आकाशवाणी झाली कीं, श्रीविष्णूचें यास पूर्ण वरदान असल्यानें याचीं शिरें स्त्रीच्या हातानें तुटतील तरी त्वां हें वरदान मिथ्या करूं नये. ही आकाशवाणी ऐकतांच त्या मूर्च्छागत दुंदिभीला तेथेंच टाकून वीरभद्र दुसरीकडे निघून गेला. इकडे दुंदुभी सावध होऊन पाहतो, तों सर्व व्यूह

मोडून जाऊन सर्व सेना प्रेतरूप पावली आहे व सहस्रावधि सेनानायक हतबल होऊन पळत सुटले आहेत. तेव्हां त्या रणरंगधीर महावीरानें त्या सर्वांस धीर देऊन पुनः त्यांना जमविलें व वीरभद्रास चक्राकार वेढा दिला. वीरभद्राकडील चंडमुंडादि महायोद्धे बाह्यभागीं शौर्यानें लढत होते. तथापि वीरभद्राभोंवतीं जो दैत्यसैन्याचा गराडा पडला त्यांत वीरभद्राचा निभाव लागणें कठीण असें वाटूं लागलें.

## दुंदुभीचा पराजय.

याच वेळीं इंद्रादिक सुरवरांना दक्षानें विनवून त्यांनाही पुनः युद्धास पाठविलें. ते सोमरस पिऊन धुंद होऊन युद्धसंग्रामीं येऊन मिसळले. तसेंच यज्ञमंडपांत येऊन तेथील महान् ऋषींना विनति केली कीं, 'आपण जारण, मारण, उच्चाटन, स्तंभन, मोहनादिक सर्व मंत्रप्रयोग या काळीं सत्वर योजा.' असें म्हणून सर्व ऋषींना अपार दक्षिणा देऊन संतुष्ट केलें. मग ब्रह्मदेवाकडे येऊन 'माझें कल्याण होईल असा वर मला द्या' अशी प्रार्थना केली. शेवटीं श्रीविष्णूकडे जाऊन विनविलें कीं, 'हे करुणासागरा तुझ्या भरवशानेंच मी यज्ञास प्रारंभ केला; तरी तो सिद्धीस जाईल असें कर.' तेव्हां श्रीविष्णू ह्मणाले 'तू आतां तरी शिवद्वेष सोडून त्यांना शरण जा. नाहींतर तुला कल्पांतीं सुद्धां यश येणार नाहीं. अहंकारमदानें सर्वांचा घात करून तूं शेवटीं स्वतांचाही प्राणांत करून घेऊं नकोस.' तथापि दक्षाची समजूत झाली नाहीं.

इकडे वीरभद्रानें कृतांतासारखें भव्यरूप धरून दैत्यसैन्य–सागरावर निर्वाणीचें पाशुपतास्त्र अभिमंत्रून टाकिलें. त्यायोगें भयंकर कडकडाट होऊन सर्व सैन्य होरपळूं लागलें. या अस्त्राच्या नादानें कैलासभुवन दुमदुमलें. उलट दुंदुभीनें विद्युल्लतेसमान असंख्य बाण मारून रुद्रगणांना त्रास दिला. तें पाहून वीरभद्रानें आपलें जगद्व्यापी भयंकर विश्वरूप प्रकट करून महाप्रलय मांडिला. तेव्हां सर्व देव व दिक्पति, सप्तपाताळांतील शेष कूर्मादि सर्व लोकपाळ भयभीत होऊन कैलासपर्वतावर श्रीशंकराकडे गेले, व त्यांनीं विनाविलें कीं, 'हे दयाघना, मृत्युलोकीं हा अकाल प्रलयारंभ

झाल्यानें आम्ही अत्यंत भयत्रस्त झालों आहों, तरी यापासून आमचें रक्षण करावें,' श्रीशंकरांनीं त्यांना आश्वासन देऊन म्हटलें, 'हा जो श्रीवीरभद्राचा पराक्रमशाली अवतार झाला आहे तो अभिमानी जनांचा व दक्षाचा संहार करील. इतरांना भयत्रस्त होण्याचें कारण नाहीं.' तेव्हां ते आपापल्या स्थळीं गेले. इकडे वीरभद्रानें सर्व दैत्यसैन्याचा संहार केला. दुंदुभीनें अखेर वृश्चिकचक्र सोडून कोट्यनुकोटी वृश्चिक रणांगणांत उत्पन्न केले, परंतु, वीरभद्रानें अग्न्यस्त्राचा प्रयोग करितांच ते सर्व विंचू होरपळून गेले. शिवाय वीरभद्रानें जें विश्वरूप यावेळीं दाखविलें त्यांतच दुंदुभीस आपली ध्यानमूर्ति जो भगवान विष्णु त्याचें रूप त्याला तेथेंच साक्षात् दिसलें. आणि त्याचे प्रधानांनीं याच वेळीं बोध केला कीं, ईश्वराचा दक्षप्रजापतीवर कोप झाला असल्यानें आपण कितीही खटपट केली तरी यज्ञरक्षण होणें शक्य नाहीं म्हणून स्वस्थ राहावें. दुंदुभिसही स्वरूप साक्षात्कार होतांच हा बोध ठसला. आणि त्यानें काढता पाय घेतला. पण वास्तविक दुंदुभीचीं मनुष्यमुखें हीं सत्वगुणदर्शक, अश्वमुखें हीं रजोगुण व गजमुखें ही तमोगुणांचीं होतीं. या तीन गुणांच्या पलीकडे जातांच त्याला शुद्धसत्वाचें ज्ञान झालें, तेव्हां वीरभद्रानें त्याची तीं पापमय मुखें व शरीर छेदून शुद्धस्वरूप ठेविलें. तेव्हां तो आपल्या अवशिष्ट सेनेसह बाजूस गेला.

## हिरण्याक्षाशीं रणसंग्राम

दुंदुभीसारखा महाबलाढ्य दैत्याग्रणी वीर नामोहरम होतांच दक्षप्रजापतीनें हिरण्याक्ष व हिरण्यकश्यप या शौर्यशाली मदोन्मत्त दैत्यांना रणपट्ट बांधून समरांगणीं जाण्याची आज्ञा केली. तेव्हां उभयतांनीं अपार दैत्यसेना बरोबर घेऊन मोठ्या आवेशानें वीरभद्रावर चाल केली. इकडे वीरभद्रानें नंदिकेश्वरास सेनापति करून रथ, गज, अश्व, व पदाति अशी चतुरंग सेना त्याजकडे दिली. त्यांत कित्येक रथांस सिंह, शार्दूल जुंपिले होते. दोहोंकडून एकमेकांवर हजारों बाणांचा वर्षाव होऊं लागला. या युद्धांत वीरभद्राकडील चंड, मुंड, महाकाळ, काळभैरव, क्षेत्रपाळ इत्यादि सर्व अतिरथींनीं अति पराक्रम केला. तरी जेव्हां तो दैत्य आटपेना व

शिवसैन्याची अत्यंत दुर्दशा होऊन नंदी मूर्च्छित झाला, तेव्हां वीरभद्र त्रिशूळ उचलून दैत्यसैन्यावर धांवून गेला. त्यानें असंख्य दैत्यांचा चुराडा उडविला. भृंगी व बाणासुर यांनींही महापराक्रम केला. तथापि अफाट अशा दैत्यसेनासागरापुढें त्यांचा कांहीं इलाज चालेना. हिरण्याक्ष तर कृतांतासारखा भासूं लागला अशा प्रकारें स्वपक्षाचा मोड होतो असें दिसतांच वीरभद्रानें भद्रकाळीस आव्हान केलें. ती नवकोटि कात्यायनींसह दैत्य सेनासागरावर तुटून पडली. शिवाय शिवसेनेंतील जे असंख्य योद्धे यावेळीं कामास आले होते, त्यांना संजीवन करून पुनः युद्धोन्मुख करण्याविषयींही वीरभद्र नें भद्रकाळीस आज्ञा केली. तेव्हां महामाया भद्रकाळीनें ' अमृतकुंभ ' आणून त्यायोगें सर्व मृत शिववीरांना संजीव केलें. आणि पुनः आपण ' शाकंबरी ' नामें भयंकर रूप धारण करून दैत्यांचा संहार चालविला. हें सजीव झालेलें असंख्य रुद्रसैन्य पाहून हिरण्याक्षाला अत्यंत क्रोध आला. त्यानें ' संमोहनास्त्र ' जपून मायारूपधारी असंख्य रुद्रगण निर्माण केलें; आणि न भूतो न भविष्यति असें युद्धकौशल्य दाखविलें. परंतु ते मायारूपधारी रुद्रगणही निजरूपी रुद्रगणांत विलीन होऊन नामशेष झाले. तेव्हां दैत्यवरांचा धीर सुटला. त्याच्या सर्व सैन्यांचा विध्वंस झाला. अंतरीक्षांतील सैन्याचाही शिवगणांनीं चुराडा उडविला. शेवटीं हिरण्याक्षाचा रथ मोडला, तथापि त्याच्या चतुर प्रधानानें त्यास तत्काळ दुसरा रथ सज्ज करून दिला. तोही मोडून वीरभद्रानें त्याचा सारथी व रथाचे घोडे ठार केले. तथापि पदाति होऊन त्यानें हजारों शिवगणांना गदेनें लोळविलें; पण वीरभद्रानें शूलाच्या दणक्यानें त्यास घायाळ करितांच तो भूमीवर निश्चेष्ट पडला! तो मूर्च्छित होतांच हिरण्यकश्यप धांवत आला. त्यानें घनघोर युद्ध करून नंदिकेश्वराचा मोड केला. नंतर त्यानें अग्न्यस्त्र, वज्रास्त्र, पर्वतास्त्र इत्यादि भयंकर अस्त्रांचा एकामागून एक मारा केला. परंतु वीरभद्रानें तीं सर्व निष्फळ केलीं. नंतर हिरण्यकश्यपानें काळ, महाकाळ व नाग हे पाश एकामागून एक टाकिले पण वीरानें ते सर्व पाश तोडून टाकून, उलट एक दैदीप्यमान् बाण दैत्याच्या वक्षस्थलावर मारिला. त्या-

आघातासरशी तो महादैत्य ताडकन धरणीवर पडला. व मूर्च्छागत झाला इतक्यांत या घनघोर संग्रामाच्या धक्काबुक्कीनें हिरण्याक्ष पुनः सावध होऊन आपल्या भावाबद्दल सूड उगविण्यास सिद्ध झाला. त्यास समोर उभा राहिलेला पाहून वीरभद्र म्हणाला, हे वीरा, खरोखर तूं त्रैलोक्यांत अजिंक्य आहेस; परंतु आदिमाता शिवसती नाश पावली त्यायोगें दक्ष महाअनर्थांत सांपडला आहे, त्याचे तुम्ही साह्यकर्ते; अर्थात तुम्हां सर्वांचा सध्यां संहार होऊन ब्रम्हप्रळयानंतर तुमचा उद्भव होईल. व तेव्हां तुमच्याकरितां नारायण स्वतः अवतार घेईल. सांप्रत माझ्या तडाक्यांतून दक्षास सोडवि-ण्याला कोणीही समर्थ होणार नाहीं. त्या पापी दक्षाचा संहार करून मी त्याच्या शिराची याच यज्ञांत पूर्णाहुति देईन हा निर्धार जाण! यावर हि-रण्याक्ष म्हणाला. ' हे महाधनुर्धरा ' तूं खरोखर वरिभद्र हें नांव सार्थ केलेंस आणि आमच्या बाहूंची रग जिरविलीस! असें बोलून त्यानें पुनः भयंकर संग्राम सुरू केला तेव्हां एकमेकांचे वर्मी आघात बसून दोघेही मूर्च्छित झाले. इतक्यांत भद्रकाळीनें मृत रुद्रगणांस संजीवन करून वरिभ-द्रासही सावध केलें. इकडे ते दोघे दैत्यही सावध झाले; परंतु त्यांना अत्यंत ग्लानि आली होती. म्हणून त्यांनीं विचार केला कीं, दक्षानें अत्यंत गर्व केला असल्यानें त्याचा नाश होणार त्यामुळेंच दुंदुभी किंवा आमच्या-सारख्या महान् पराक्रमी त्रैलोक्य विजयी वीरांचा मोड झाला. आमचा मोड करणाराही प्रत्यक्ष श्रीशंकरच आहे. यापुढें आम्हीं व आमचें सैन्य तृणवत् आहों. असें समजून वरिभद्रास ते अनन्य भक्तीनें शरण गेले. आणि उरलेलें सैन्य घेऊन अंतरिक्षांत मेघमंडळाआड राहून तेथील युद्ध चमत्कार पाहूं लागले.

या दैत्याग्रणींचा मोड होतांच इकडे यज्ञमंडपांत मंत्रदेवतांना संतुष्ट करितांच त्या प्रसन्न झाल्या व दक्षास ह्मणाल्या. 'श्रीशंकर क्रोधाविष्ट झाले असल्यानें यापुढें आमची शक्ति आतां क्षीण झाली आहे; ह्मणून आमचें कांहीं चालणार नाहीं. कारण अष्टविध सन्निपात व महान् ज्वरा-दिक नाना व्याधि बरोबर घेऊन प्रत्यक्ष मृत्यु वीरभद्राच्या साह्यास उभा

आहे. ईश्वरक्षोभानें उद्भवलेल्या या वीरभद्ररूपी प्रळयाग्नीपुढें आमचें कांहीं चालणार नाहीं. शिवाय आदिमाया तुझ्या संहारास सिद्ध आहे. यास्तव या महाप्रळयाग्नींत तुझी सर्व सेना नष्ट होईल.' हें भाषण ऐकून दक्षराजा संतापानें ह्मणाला कीं, 'मी आतां त्या शिवालाच ठार मारितों.' असें ह्मणून तो यज्ञमंडपाबाहेर दैत्यांकडे आला.

## बलाढ्य दैत्यांची चढाई.

तेथें वृत्रासुर, तारकासुर, बळी, सहस्रार्जुन, भोमासुर, काळासुर इत्यादि हजारों प्रबळ दानव युद्धातुर होऊन सज्ज होते. त्यांना वीरभद्रावर चालून जाण्याची त्यानें आज्ञा केली. तेव्हां ते महाबलाढ्य दानव शिव-सेनेवर बाणांचा वर्षाव करीत धांवून गेले. यावेळीं वीरभद्राकडील काळ व महाकाळ हे दोघे सेनानी पुढें झाले; परंतु दैत्यसैन्यसागरापुढें त्यांना हार खावी लागली. ते दोघे असंख्य बाण मर्मस्थानीं लागून लवकरच मूर्च्छित झाले. तें पाहून वीभद्रानें मोठ्या आवेशानें दैत्यसैन्यावर चाल केली. आणि बाणांच्या वर्षावानें व त्रिशूलाच्या माऱ्यानें दैत्यदळाचा फडशा पाडला. ही दुर्दशा पाहून बळी दैत्य संतापला आणि त्यानें आपलें दिव्य चक्र अभिमंत्रून वीरभद्रावर फेंकलें. तें चक्र वीरभद्राच्या शरीराचा भेद करून आरपार जाऊन मोडून पडलें. तथापि त्यास कांहींच इजा झाली नाही. तेव्हां आपल्या चक्राची ही अवस्था पाहून मग त्रिशूल घेऊन तो वीरभद्रावर चालून आला. वीरभद्रानें हजारों बाण मारून त्याचा रथ मोडून त्यास विरथ केला. परंतु त्याच्या चतुर प्रधानानें तत्काळ दुसरा उत्तम रथ सज्ज करून त्यास दिला. नंतर नंदिकेश्वरास सुचवून वीरभद्रानें आपला दिव्य रथ त्याच्या रथावर घातला. तेव्हां बळीनें मायाशस्त्र वीरभद्रावर प्रेरिलें. पण आदि-माया स्मरणानें तिचें निवारण करून वीरभद्रानें तोही रथ मोडून टाकला. मग बळी रथाखालीं उतरून वीरभद्राशीं मल्लयुद्ध करण्याच्या इच्छेनें पुढें गेला. पण अग्नीप्रमाणें दैदिप्यमान अशा त्या रूपाला स्पर्श होतांच पळून गेला. आणि तो शिवस्मरण करूं लागला. तेव्हां चमत्कार असा झाला कीं, तो ज्याचें स्मरण करीत होता तेंच ध्यान प्रत्यक्ष समोर रथावर

त्याला दिसूं लागलें ! अशाप्रकारें वीरभद्राच्या दिव्य स्वरूपाचें ज्ञान होतांच त्यानें विचार केला कीं, हा पुनः आपल्या हातीं लागणार नाहीं, आतांच याशीं समरस व्हावें, म्हणून देहाभिमान सोडून तत्वविचार करितांच चैतन्यघन शिवस्वरूप त्यास दिसूं लागलें. तेव्हां हा वीरभद्र साक्षात् श्रीशंकर होय असें समजतांच तो अनन्य भावानें त्यास शरण गेला. याप्रमाणें बाह्यरूपी शरण जाऊन अंतरंगीं स्मरण करितांच तें शिवरूप मनीं बिंबलें. अशाप्रकारें महाशिवभक्त बळी दैत्य स्वस्वरूपीं लीन झाल्याचें पाहून वीरभद्रानें आपला पूर्णावतार प्रकट केला. आणि बळीस प्रसन्न होऊन म्हणाला. ‘ हे दैत्यश्रेष्ठा, तूं आमचा परमभक्त आहेस हें आज प्रचीतीस आलें ’ मग त्यास शिवपंचाक्षरीमंत्र उपदेशून त्यास त्रैलोक्यराज्य दिलें. तेव्हां परमानंद पावून तो महाशिवभक्त बळी आपलें उरलेलें सैन्य घेऊन स्वस्थानास चालता झाला. बळीचा असा शेवट होतांच वृषपर्वा मोठ्या त्वेषानें शिवगणांवर तुटून पडला परंतु थोड्याच वेळांत सैन्यासह त्याचा मोड झाला.

## सहस्रार्जुनाचें युद्धकौशल्य

मग प्रतापी सहस्रार्जुन पुढें झाला त्यानें अत्यंत पराक्रम करून नंदी, भृंगी, इत्यादिकांचा पूर्ण मोड करून, नंतर प्रत्यक्ष वीरभद्रावर चाल केली. तेव्हां वीरभद्र अत्यंत त्वेषानें आपल्या रथाखालीं उतरून त्याच्या रथावर चढून गेला व त्रिशूलानें त्याचे अनेक हात तोडिले; तरी सहस्रार्जुन मोठ्या युक्तीनें निसटून दुसऱ्या रथावर चढला. आणि उरलेल्या हातांनीं खड्ग, गदा, तोमरादिकांचा भयंकर मारा केला व शेवटीं काळखड्ग अभिमंत्रून वीरभद्रावर सोडिलें. पण काळचक्राचा मारा करून तें खड्ग वीरानें हाणून पाडिलें. त्या दोन्ही अस्त्रांचें आकाशांत जेव्हां सम्मीलन झालें, तेव्हां प्रळयाग्नि उठला व दोन्ही सैन्यांत हाहाःकार उडाला. परंतु थोड्यांच वेळांत तीं दोन्हीं निस्तेज झालीं. तें पाहून सहस्रार्जुनानें ब्रह्मास्त्र वीरभद्रावर फेंकिलें. रुद्रबाणानें त्या अस्त्राचें निवारण करून उलट दैत्यावर रुद्रास्त्र योजिलें. दैत्यही महान् योद्धा होता त्यानें परब्रह्मास्त्र योजून तें रुद्रास्त्र निरुपयोगी

केलें. नंतर अत्यंत खवळून दैत्यानें ईश्वराला आव्हानून प्रळयकारी महाभयंकर असें महेश्वरास्त्र वीरावर सोडिलें. तें अस्त्र आपल्यावर येत असलेलें पाहून रुद्रसैन्य भयानें पळूं लागलें; पण वीरभद्रानें स्वतः त्या अस्त्रास तोंड देऊन सर्व सैन्य स्थिर केलें. इतक्यांत त्या अस्त्रसमरप्रभावानें भूमीवर प्रत्यक्ष ईश्वर प्रकटला! व वीरभद्रावर चालून आला. पण स्वस्वरूप ओळखून तत्काळ वीरभद्राच्या रूपांत विलीन झाला! तेव्हां दैत्य अत्यंत आश्चर्यचकित झाला. महेश्वरास्त्र अशा रीतीनें समरस होऊन जातांच नारसिंहास आव्हानून नृसिंहास्त्र प्रेरिलें. तेव्हां रणभूमीवर अक्राळ विक्राळ असा नारसिंह प्रकटला ! याचा देह मनुष्याचा असून, मुख सिंहाचें होतें. त्या भयदायी सिंहमुखांस पाहून रुद्रसैन्य घाबरलें; परंतु वीरानें प्रथम त्याच्यावर सिंहरथ पाठवून निकरानें युद्ध चालविलें. पण नारसिंहापुढें त्यांचा निभाव न लागतां ते मागें हटले. नंतर हजारो शार्दूलरथ पाठविले. नारसिंहानें थोड्याच अवधींत त्यांचा चुराडा उडविला. त्यामुळें अत्यंत त्रासून वीरभद्रानें अतिघोर ‘ शरभमंत्र ’ स्मरून धनुष्याला बाण लावून सोडितांच भयंकर कडकडाट होऊन रौद्रस्वरूपी ‘ शरभावतार ’ झाला ! हा गगनगामी शरभ पक्षी अति अद्भुत कोटिसूर्यांप्रमाणें लखलखणारा आणि सर्वत्र ज्वालामय होता. त्याच्या तेजापुढें नृसिंहतेज फिक्कें पडलें. नंतर शरभानें नृसिंहाची शक्ति हरण करून त्यास निर्वीर्य केलें. याप्रमाणें नृसिंहास्त्राचें निवारण होतांच शरभानें असुरांचा संहार चालविला तें पाहून सहस्रार्जुन भयचकित झाला. तोंच शरभानें त्याच्या रथाचा चक्काचूर केला व तो महादैत्य निष्प्रभ होऊन धरणीवर पडून मूर्च्छित झाला. हें संहारकार्य आटपून शरभही किंचित्काल अदृश्य झाला. मग अंतरीक्षांत युद्धचमत्कार पाहात उभ्या असलेल्या देवांनीं सहस्रार्जुनास शुद्धीवर आणून विचार सांगितला कीं, ‘ वीरभद्र हा ईश्वराचा वरदपुत्र असून त्याच्याशीं वैर करून कोणाचा निभाव लागावयाचा नाहीं. करितां त्यासच शरण जा. ’ हा बोध पटून तो लागलाच वीरभद्रास शरण आला. तेव्हां त्या महादैत्याच्या मनांत शुद्धभाव प्रकटला.

व तें अंतःकरण ईश्वरभक्तींत रमून आनंदमय बनलें; व तो अवशिष्ट सैन्यासह स्वस्थानास चालता झाला.

## दैत्य सैन्यसागराचा पाडाव

सहस्रार्जुनाचा पुरा मोड झालेला पाहतांच दक्षप्रजापतीनें केशी, दुर्जय, विरूपाक्ष, नमूची, मय, व पुलोमा इत्यादि असंख्य पर्वतप्राय शरीराचे दानववीर वीरभद्रावर पाठविले. याच वेळीं सप्तपाताळांतील सर्व दानवदळ त्या सैन्यसागरांत येऊन मिळालें. या प्रचंड सैन्यांतील प्रत्येक महारथीनें वीरभद्राशीं घनघोर युद्ध केलें. त्याचें पृथक् पृथक् वर्णन केल्यास ग्रंथ फार वाढेल. त्रैलोक्यांतील हे प्रबळ दानव, आपापलीं अनेकविध मायारूपें प्रकट करून, विलक्षण आवेशानें वीरभद्राबरोबर घनघोर युद्ध करीत होते. इतक्यांत नंदिकेश्वर पुढें होऊन त्यांजबरोबर निकरानें लढूं लागला. इकडे अंतरिक्षांत कोट्यवधि मायारूपी दैत्य उद्भवले; आणि त्या सर्वांनीं रुद्रसैन्यास चोहोंकडून पूर्ण वेढा घातला. या दैत्यसागरानें भूमंडळ भरून गेलें. यानीं रुद्रसैन्याला सर्व बाजूंनीं गराडा घातला. व तीक्ष्ण बाणांनीं त्यास जर्जर केलें. ही आपल्या गणांची दुर्दशा पाहून वीरभद्र कृतांतासारखा खवळून उठला. व तत्काळ श्रीशंकराचें ध्यान करून निमिषार्धांत ब्रह्मांडव्यापी दारुणरूप धरिलें. त्या विराटरूपाला कोट्यावधि मुखें कोट्यानुकोटि हात असून सर्व हातांनीं सर्व दिशांस तीक्ष्ण बाणांचा सारखा वर्षाव करीतच त्या भयंकर रूपाचा उद्भव झाला ! त्या मूर्तीच्या सर्व मुखांतून अग्नीच्या भयंकर ज्वाळा भडकल्या व सर्व दैत्य सैन्य जळूं लागलें. त्यामुळें सर्वत्र हलकल्लोळ झाला. आकाश, पृथ्वी व पाताळींचें सर्व सैन्य त्या विराटरूपधारी वीरभद्राच्या बाण, त्रिशूळ, खड्ग, तोमरादिक तीक्ष्ण शस्त्रांच्या भयंकर माऱ्यानें बेजार झालें. सहस्रावधि सूर्यांचा प्रकाश प्रळयाग्नींत मिळतांच जसा अग्निकल्लोळ होतो तशी दानवांची या प्रळयाग्नींत होळी झाली. आपल्या सैन्याचा हा संहार पाहतांच सर्व दैत्यसेनानी भयाभीत होऊन अधोवदन करून स्तब्ध राहिले. पण त्यामध्यें जो विरूपाक्ष नामा महादैत्य

होता, तो शंकरध्यान करीत होता. त्यानें सर्वांस उपदेश केला कीं, ‘ येथें श्रीविष्णूचें कांहीं न चालतां आपणा सर्वांचा व्यर्थ संहार मात्र होईल. यास्तव यांशीं युद्ध न करितां सर्वांनीं शुद्धभक्तीनें यास शरण जावें म्हणजेच आपलें मरण टळेल. हा बोध सर्वांस पटून ते सगळे दानववीर वीरभद्रास शरण जाऊन जीवदान मागूं लागले. अनुताप पावून शरण आलेल्या त्या हजारों दानववीरांची ती निष्ठा पाहून सर्वेश्वर वीरभद्रानें त्यांस अभय देऊन रक्षण केलें. व रुद्रगणांस आपला मारा थांबविण्यास आज्ञा करुन या दैत्यांना बोध केला. तो अमृतमय उपदेश ऐकून सर्वांना अत्यानंद झाला. तेव्हांपासून ते सर्वजण शिवध्यान करूं लागले व परम शिवभक्त बनले. नंतर आपापल्या अवशिष्ट सैनिकांसह पाताळमार्गी स्वस्थानास निघून गेले.

नंतर अनेक दैत्य युद्धार्थ पुढें आले. पण देवदूतांनीं त्यांस दक्षाचा अपराध कळवून ईश्वरक्रोधास व्यर्थ प्राणाहुति देऊं नका असें परोपरीनें सांगितलें, पण तें न मानितां ते युद्धास प्रवृत्त झाले. दक्षप्रजापतीनें त्यांच्या साह्यार्थ पृथ्वीवरील असंख्य मानव वीरांना पाठविलें, व ऋषींना बरोबर घेऊन श्रीविष्णूजवळ आला. आणि साष्टांग प्रणिपात करून हात जोडून उभा राहून म्हणाला ‘हे चक्रपाणि ! थोर थोर दैत्य व दानव योद्धे, वीरभद्रानें धुळीस मिळविले. आणि आपण जवळ असतांना आमचा नायनाट होऊं पहात आहे; तरी आपण स्वस्थ बसला हें कसें ? कां माझ्या आचरणानें आपण रुष्ट होऊन आह्मांस प्रसन्न होत नाहीं ? हे त्रैलोक्यनाथ, आह्मां दीनजनांचें रक्षण करण्यास या समयीं आलस्य कां करिता ? ’ ही दक्षाची दीनवाणी श्रवण करून श्रीविष्णु ह्मणाले, ‘अन्यायकर्त्याला परमेश्वर शिक्षा करणारच हा निर्धार होय. मी स्वतः ईश्वरतोषणास्तव तपश्चर्या करीत असतो. व त्याच्या सेवेप्रीत्यर्थच अनेक अवतार घेत असतों. तो सर्वेश्वर हाच माझा अंतरात्मा होय. मूढा दक्षा, तुला मागें अनेक वेळां बोध केला; पण तो तूं मानिला नाहींस. आणि मदोन्मत्त होऊन त्याच्या विरुद्ध आचरण केलेंस. त्यामुळें तुझ्या सर्व पुण्याचा क्षय झाला असून आता तुझा नाश होईल. आमचा पराक्रम तुझ्या अन्यायाचरणानें कुंठित झाला

व ईश्वरप्रेमा नष्ट झाला. अशा रीतीनें ईश्वराची अवज्ञा घडल्यामुळें आमची शक्ति क्षीण झाली असून वीरभद्रापुढें आमची मात्रा चालणार नाहीं. तथापि तुझ्या समाधानाकरितां मी एकदां निर्वाण युद्ध करीन.' हे ऐकून दक्षप्रजापति अत्यंत संतुष्ट झाला. व वीरगर्जना करून आपल्या बरोबर आलेल्या अनेक दैत्य राजांना वीरभद्रावर चाल करण्याची आज्ञा करून आपण यज्ञमंडपीं आला. इकडे वीरभद्रानेंही तेथील सर्व सैन्याचा पराभव करून स्वपक्षाकडील सर्व मृत वीरांना संजीवन केलें व त्यांसह पुनः जोरानें चाल केली.

दक्षप्रजपतीस संतोष व्हावा या हेतूनें आपआपल्या चतुरंग सैन्यासह दितीनंदन तारकासुर, पौलम, काळीकेय, व दनायुषेय इत्यादि महान् दैत्यमंडळ युद्धास सिद्ध झालें. ते सर्व दैत्य यावेळीं इतके मदोन्मत्त झाले कीं, आम्हीं कश्यपाचे वडील कुमार आमच्यासारखे वीर त्रिभुवनांत नाहींत. आम्ही वीरभद्रास धरून बांधून आणितों! तुम्हीं स्वस्थ चित्तानें यज्ञकार्य करा. असें मोठ्या आढ्यतेनें सांगून ते युद्धकंदनांत मिसळले. शिवाय यांच्या साह्यास देव, दैत्य, मानव हेही होते. इकडे वीरभद्राकडील चंड मुंड, काळ, महाकाळ हे असंख्य रुद्रगणांसह धांवले. रणभेरींचा एकच गजर झाला. हे वीर, गदा, खड्ग, भींडिमाळा, चक्र, परीघ, त्रिशूलादि प्राणहारक शस्त्रांचा मारा करीत, त्यामुळें मांसाचा चिखल होऊन रक्ताचे पूर वाहिले! सेनापति नंदिकेश्वरानें असुरांकडील गजसेनेचा पुरा पाडाव केला; परंतु सर्व दैत्यांनीं एकवटून त्याचा रथ मोडून त्याचा कोंडमारा केला. तेव्हां वीरभद्र पुढें झाला. त्याचा शरमार पाहून दैत्यांचा मद उतरला. व त्यांचा सर्वस्वी मोड होऊन ते अंतरीक्षांत उडून जाऊन तेथून बाण मारूं लागले. त्यावेळीं वीरभद्र अत्यंत संतप्त झाला व त्यानें दैत्यसैन्यसागरावर पाशुपतास्त्र अभिमंत्रून टाकिलें. त्यायोगें कोट्यवधि दैत्य मृत झाले. आपल्या लोकांचा

१ नंदी या नांवाचे चौघे वीर होते. ते—एक हा सेनापति, दुसरा वीरभद्राचा सारथी होता. तिसरा प्रधान होता. व चौथा शिववाहन त्रैलोक्यसंचारी श्रीवत्स नामा वृषभ, हे होत.

हा संहार पाहून काळी व महाकालीकेय हे दैत्य आवेशानें चालून आले. त्यांनीं मायाबळानें दाही दिशांस अगणित राक्षस उत्पन्न केले. अंतराळ राक्षसांनीं व्याप्त झाल्यानें दिवसाच धरणीवर अंधःकार पसरला! त्यांनीं गगनांत अमरपुरीहून सुंदर व विस्तृत अशी एक मायापुरी निर्मिली आणि त्या सभोंवतीं अजिंक्य तटबंदी करून प्रचंड हुडे रचिले. व तेथून रुद्रसैन्यावर बाणांचा वर्षाव चालविला! शिवाय दारुण नागपाश टाकून शिवगणांस जखडून टाकिलें. परंतु वीरभद्रानें अग्निबाणांचा भयंकर मारा करून सर्व सर्प मारून टाकिले. साठ सहस्र कालिकेय ठार केले व त्यांची ती अजिंक्य मायापुरी जाळून उध्वस्त केली. अशा प्रकारें त्यांचें मायोद्भव ब्रह्मांड नष्ट करितांच ईश्वरांश वीरभद्रापुढें आपलें मायाबल टिकाव धरीत नाहीं. हें त्यांस पूर्ण कळून आलें, व हा सर्व मायाभगवति आदिदेवीच्या क्षोभाचा परिणाम होय असें त्यांनीं पाहिलें व ते स्तब्ध झाले. दूतांकडून हें वर्तमा। दक्षराजास कळतांच तो मनांत दचकला. इतक्यांत पौलस्त्य राक्षसांचा सैन्यसंभार युद्धातुर होऊन दक्षापुढें आला. त्यास तो म्हणतो "माझें राज्यवैभव, व अभिमान तुम्हीच राखणार. तरी शौर्यानें वीरभद्रास जिंकून जय मिळवा." असें म्हणून त्यांस युद्धास जाण्यास आज्ञा केली. या सैन्यांत कित्येक राक्षस फार प्रचंड असून कित्येक दशमुख, शतमुख, पंचशतमुख होते. आणि एकएकाचें बल असाधारण होतें. या प्रबल दैत्यांनीं चक्रव्यूह रचून बाणजालानें रुद्रगणांस अत्यंत त्रास दिला. पण वीरभद्रानें त्रिशूळ उचलून जेव्हां दैत्यांचा पिच्छा पुरविला, तेव्हां त्या प्रचंड दळाचा निःपात होऊन शेष राहिलेले सैनिक जीव बचावण्याकरितां गगनमार्गें पळून गेले.

## दानव मानवादिक वीरांचा पूर्ण पराभव

इकडे दक्षप्रजापति यज्ञमंडपीं बसला असतां, सर्व राक्षस महारथींचा संहार करून वीरभद्र आवेशानें चालून येत आहे असें ऐकून मनांत गडबडला व ऋषीगणांस विनंति करूं लागला कीं, "तुम्ही स्तंभन, मोहन, मारण, उच्चाटन, करून रुद्रगणांचा भंग होईल असें करा.' आणि

तो शुक्राचार्यास म्हणतो. ‘ तुम्ही संजीवनी मंत्र जपून सर्व मृत वीरांना उठवून सुरासुरांना या अरिष्टांतून वांचवा, यज्ञाचा भंग होऊं देऊं नका. म्हणजे मी तुम्हांस अगणित संपत्ति व मागाल तें देईन.’ नंतर सर्व ऋषि गणांनीं मिळून मंत्रगर्जना चालविली. दक्षानें तिकडे युद्धास जाण्याविषयीं शुक्राचार्यशिष्य जे सिंहकेय, काळिकेय, क्रोधय, आणि दनायूष्येय यांना आज्ञा करून त्यांस संग्रामास पाठविलें. त्यांच्याबरोबर सिंहकेयपुत्र राहु, चंद्र-विमर्दन, चंद्रांतक हे दारुण वीरही होते. यांनीं दनायुषेय याला सेनापति केला. यावेळीं नंदिकेश्वरानें आपले चारी सेनानी चार दिशांस पाठवून दानवसैन्यावर हल्ला चढाविला. चंड, मुंड, काळ, महाकाळ, या चौघां धनुर्धरांनीं सर्व बाजूंनीं घेरून त्यांचा पुरा मोड केला.

इकडे यममंडपांत शुक्राचार्यांनें मंत्रदेवतांना संतुष्ट करितांच त्या प्रसन्न होऊन म्हणाल्या ‘ जे दुर्जन अन्यायानें वागतात त्यांचे मनोरथ पूर्ण होत नाहींत. दक्षानें ईश्वराचा अव्हेर केला असल्यानें त्यास ईश व यज्ञ यांची प्राप्ति कदापि व्हावयाची नाहीं. दक्षानें अहंकारमदानें यज्ञ आरंभिला. त्यामुळें आतां त्याचा सर्वस्वी नाश होईल. विष्णु, ब्रह्मादिकदेवसुद्धां ईश्वरचिंतनीं तत्पर असतात. परंतु तुम्हीं द्विजांनीं त्यांचें वचन अभिमानानें मानिलें नाहीं. तरी तुम्हांस आपलें कल्याण करून घ्यावयाचें असल्यास आतां ईश्वरास शरण जा. शुद्धांतःकरणानें, ईर्षा टाकून तुम्हीं ईश्वर–सन्मुख व्हा. नाहींपेक्षां या क्षणीं ईश्वरक्षोभाचा प्रळयाग्नि तुह्मांस जाळून भस्म करील, हें सत्यवचन होय.’ असें भृग्वादि सर्व ऋषींना बजावून मंत्रदेवता गुप्त झाल्या. तेव्हां सर्वांस खेद झाला. सर्वांनीं येऊन दक्षास ही वार्ता सांगितली व ह्मटलें ‘हे प्रजापते, मंत्रदेवता तुजवर कोपल्या असून तुझा सर्वस्वीं घात होईल. तेव्हां जर आपलें कल्याण व्हावें असें तुला वाटत असेल तर शूलपाणीला शरण जा.’ परंतु आपण ‘चिरंजीव’ असल्याचा अभिमान दक्षास असल्यानें त्यानें त्यांच्या बोलण्याकडे बिलकूल लक्ष दिलें नाहीं.

महादैत्यांचा संहार करून आपल्या सैन्याची पुनः जुळवाजुळव नंदिकेश्वर करीत आहे तोंच या रुद्रसैन्यावर दक्षाच्या आज्ञेनें हैलोकींच्या सर्व

पक्षीगणांनीं एकवटून चाल केली, यांत अरुण, गरुड इत्यादि पर्वतप्राय प्रचंड पक्षी होते. खुद्द वीरभद्रावर गरुडानें झडप घातली; त्यानें शूल मारितांच तो चंचूंत धरून गरुडानें तो नदीत फेंकून दिला. याप्रमाणेंच वीरभद्राचीं सर्व आयुधें हिरावून घेतली. तेव्हां वीरानें क्रोधभरानें पाशुपतास्त्र अभिमंत्रून गरुडाच्या हृदयावर प्रहार केला त्यायोगें त्याचे पंख पोळून त्याच्या छातींत अनेक बाण घुसले, तेव्हां अत्यंत दुःखित होऊन गरुड धरणीवर पडला. मग मनांत दुःखमोचनार्थ विष्णुस्मरण करितांच भगवान् श्रीविष्णु तत्काळ त्यासमीप आले. त्यांनीं गरुडास सावध करून दिव्यज्ञान उपदेशिलें आणि सांगितलें कीं, सदाशिव हा सर्वांस वंद्य असून त्याचा नंदन वीरभद्र हा सध्यां दक्षाकारणें सर्वांचा संहार करील तरी त्याचेंच स्मरण करून त्वां सुखी व्हावें. आम्हीं सुद्धां सर्व समुदायासह पराभव पावणार, नंतर दक्षाचा मद उतरणार.' असें ह्मणून आपल्या अमृतकरानें त्यास स्पर्श करितांच गरुड दिव्यदेह पावला. व गुप्तपणें स्वस्थळास निघून गेला. गरुड निघून जातांच सर्व पक्षी भय पावून पळून गेले.

## पाताळवासी पराक्रमी वीरांचा पराजय

तेव्हां दक्षप्रजापतीनें कद्रुतनयांस ( सर्पगणांस ) युद्धास जाण्यास आज्ञा करून म्हटलें ' हे सर्पहो, आमचा वैरी रुद्ररूपानें आला असून त्यानें आतांपर्यंत दैत्य, दानव काळीकेय, दनायुषेय, सिंहिकेय इत्यादि सर्व वीरांना निस्तेज करून इंद्रादि देवांचाही पराभव केला आहे. आतां तुम्ही पाताळवासी महापराक्रमी सर्पगणांनीं आम्हांस साह्य करून यश मिळवून द्यावें' ही दक्षप्रार्थना ऐकून ते आनंदभरित झाले, व रुद्रसैन्यावर चालून गेले. याच्यांत वासुकी, तक्षक, ऐरावत, काळिया, कर्कोटक, धनजय, मणिमाण, कंबळक असे एकसहस्र कद्रुकुमार प्रमुख असून त्याचे पुत्रपौत्र हेही आले होते. यांतील एक एक वीर पर्वताप्रमाणें प्रचंड, असून ते शतमुख, द्विशतमुख होते. असे असंख्य दारुण सर्प युद्धास आले. त्यांनीं रुद्रसैन्यास दंश करून अत्यंत त्रास दिला. तेव्हां वीरभद्रानें अमोघास्त्र मंत्रून सोडिलें, तेव्हां सर्पांचे तुकडे तुकडे होऊं लागले. ते पाहातांच तक्षक

क्रोधानें लाल झाला. व असंख्य तीक्ष्ण बाण मारून रुद्रसैन्य झांकून टाकिलें. इतक्यांत वीरभद्र समोर आला व तक्षक, वासुकी इत्यादि प्रमुख सर्पांना उद्देशून रागानें म्हणाला—' सर्पहो, तुम्ही श्रीशंकराचें निज-भूषण असून त्यांच्या व दाक्षायणीच्या देहावर सर्वदा असणारे, दाक्षा-यणी तर तुमची माता, ती तुमची प्रिय माता या अधम दक्षाच्या अन्यायी वर्तनानें अस्तंगत झाली. त्यामुळें व दक्षानें ईश्वरानिंदा केली व करीत आहे त्यामुळें हा अनर्थ ओढवला. असें असतां तुम्ही शंकर-प्रिय सर्पकुळें येथें सहसमुदाय काय कारणानें आलां तें सत्वर सांगा.' यावर वासुकी म्हणतो, ' तुम्ही ईश्वराचे केवळ प्राण व ईश्वर जगदात्मा व सर्वांस मूळ कारण आहे, हे सर्व आम्ही पूर्ण जाणतों, परंतु दक्षप्रजापति हा मातामह, यानें आमची माता कद्रू हिजकडून आम्हांस यज्ञरक्षणार्थ जाण्याविषयीं आज्ञा देवविली. आणि आतां आपत्कालीं येथें आम्हांस युद्धार्थ धाडिलें आहे. तरी यापुढें तुम्ही सांगाल त्याप्रमाणें वागण्यास आम्ही सिद्ध आहों.' हें त्यांचें विनयवचन ऐकून वीरभद्र जरा शांत झाला. आणि मनांत विचार करूं लागला कीं, सर्पकुळ फार माजलें आहे, व इतर सर्व लोकही अत्यंत मदोन्मत्त झाले आहेत. या सर्व दुष्टांचा संहार करून भूमिभार हलका करण्यास्तव आणि युगपरिवर्तनाचा हा समय असल्यानें, कृतयुगाचा शेवट होणार असल्यानें आतां या महीतळीं महा-प्रळय होऊन जाणार, त्याचें पूर्वसूचक म्हणून हा संग्राम घडून यावा एतदर्थच श्रीविष्णूंनीं हा महायज्ञ करविला असावा. या हेतूस अनुसरू-नच पाताळ लोकींचीं सर्व सर्पकुळें येथें नष्ट होण्यास्तवच प्राप्त झालीं आहेत. असें समजून दिव्य माया अभिमंत्रून सर्पदळांचा समूळ संहार होण्यासाठीं ' नकुळास्त्र,' ' गरुडास्त्र,' इत्यादि भयंकर अस्त्रें एकामागून एक सोडिलीं. यायोगें अगणित नकुळ, गरुड व हजारों पक्षीजाति रण-भूमीवर एकदम उद्भवल्या. व त्या सर्वांनीं सर्पांचा फन्ना उडविला! तेव्हां वासुकी फार संतप्त झाला. व असंख्य अग्निबाणांचा वर्षाव करून त्यांनें गरुड, नकुलादिकांना जाळून भस्मसात् केलें. आणि शेष

सेनानींसह वीरभद्रास वेढा देऊन त्यास अत्यंत त्रासानें जेरीस आणिलें. तोंच प्रळय रुद्रानें क्रोधभरानें ' दिव्यचक्षुकी ' हें भीषण संहारास्त्र अभिमंत्रून सोडितांच पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, ईशान्य इत्यादि अष्ट दिशा व आकाशपाताळांतूनही असंख्य तीक्ष्ण बाण सर्पसैन्यावर सुटूं लागले! या भयंकर शरवृष्टीनें उरगसैन्य खचलें. हे बाण कोणीकडून येतात व कोण कोठून सोडितात हें त्यांना मुळींच कळलें नाहीं. यामुळें सर्वांचा क्षणार्धांत संहार झाला. तक्षक, वासुकी इत्यादि प्रमुख सेनानी सर्प मूर्च्छागत होऊन समरांगणीं पडले. त्यामुळें तिकडे पाताळलोक भयाण दिसूं लागला. ही सर्पकुळांची दुर्दशा पाहून दक्षप्रजापति मनांत चरकेला, पण वीरभद्रास संतोष वाटून त्यानें आपल्या विजयगर्जनेनें आकाशमंडळ दणाणून सोडिलें, व आपल्या गणांस पुढें जोरानें चाल करण्यास आज्ञा केली.

## अहिरावण महिरावणांचें युद्धचातुर्य.

सर्पांचा संहार झाल्यानंतर पाताळस्थ दैत्यगणांस अत्यंत क्रोध आला. पाताळांतील महिकावतींचा महापराक्रमी राक्षस भूपति अहिरावण व त्याचा बंधु महिरावण हे युद्धार्थ आले. हे पौलस्त्य ऋषीचे कुमार असून राक्षसकुळीं जन्मले होते. यांनीं कैलासनाथाकारणें मेरूपर्वतांत घोर तपश्चर्या करून त्याची आराधना केली. तेव्हां श्रीशंकर प्रसन्न झाले व ' वर माग ' ह्मणाले. मग राक्षसांनीं वर मागितला कीं, 'पाताळीचें राज्यवैभव आमच्याकडेच निष्कंटक राहावें व कोणाही पुरुषांपासून आह्मी नष्ट होऊं नये, आणि वीरश्रेष्ठांशीं युद्ध करितांना आमच्या अंगापासून जें रक्त सांडेल त्यांतील प्रत्येक बिंदूपासून आमच्यासारखाच एकेक बलाढ्य दैत्य उत्पन्न व्हावा! ' भोळा चक्रवर्ति सांब यानें त्यांच्या उत्कट भक्तीस संतुष्ट होऊन त्यांचें कपट न ओळखतां त्यांस हा वर दिला. मूळचेच ते क्रूर राक्षस, आणि त्यांत असा अप्राप्य वर मिळतांच ते अत्यंत मदोन्मत्त झाले. हे उभय उन्मत्त दैत्यबंधु यावेळीं आपल्याबरोबर सहस्रावधि राक्षससैन्य घेऊन युद्धास आल होते. शिवाय येथें येतांक्षणींच दक्षानें त्यांच्या उन्मत्तपणास

आपल्या रसवती आर्जवी वाणीच्या शौर्यवीरत्वाचें अप्रतिम वर्णनरूपी मद्याचें पुट देतांच त्यांना अस्मान ठेंगणें झालें यांत आश्चर्य कसलें ? त्यावेळीं अहिरावण अभिमानानें ह्मणतो-'मी क्रोधायमान झालों कीं, ब्रह्मांडाचा नाश करण्यास अवधि नाहीं ! या रुद्रपुत्राचा मी लवकरच वध करितों. तुह्मी निर्धास्तपणें यज्ञ करा.' ही गर्वोक्ति ऐकून दक्षप्रजापति अत्यंत खुष झाला आणि लवकरच वीरभद्राचा वध करून यज्ञपूर्तीचें यश मिळवा, असा आशीर्वाद देऊन त्यांस निरोप दिला. तत्काळ तें प्रचंड राक्षसद्वय आपल्या अफाट सैन्यासह वीरभद्रावर चालून गेले. तेव्हां परस्परांचें घनघोर युद्ध चाललें. दैत्यांनीं बाणांचा पाऊस पाडून रुद्रसैन्यास भंडावून सोडिलें. मग वीरभद्र पुढें झाला व त्यानें तें बाणजाळ तोडून टाकिलें व प्रचंड बाणांचा वर्षाव करून अहिरावणाचा रथ मोडिला. तेव्हां तो दुसऱ्या रथावर चढला. इतक्यांत वीरभद्रानें हजारों तीक्ष्ण बाण मारून त्याच्या रथाचे घोडे व सारथी ठार केले. व नंतर त्याच्या शरीराचे राई राई एवढे तुकडे केले ! त्याच्या करचरणादि अवयवांचें चूर्ण होतांना जो रक्ताचा महापूर भूमीवर लोटला त्यासरसे त्यांतील प्रत्येक रक्तबिंदूगणिक एकएक प्रचंड दैत्य उद्भवला ! याप्रमाणें असंख्यात अहिरावणाप्रमाणेंच बलसंपन्न राक्षस उत्पन्न होऊन त्यांनीं समरांगण व्यापिलें ! आणि त्यांनीं रुद्रसैन्यावर शस्त्रास्त्रांचा अतोनात मारा केला. उलट वीरभद्राचे प्रखर बाण त्या अगणित मायोद्भव राक्षसवीरांवर आदळतांच त्यांच्या जखमांतून जे रक्तबिंदु जमीनीवर सांडत त्यांपासून पुनः तितकेच भयंकर दैत्य उद्भूत होत ! अशाप्रकारें उत्पन्न होत चाललेल्या या असंख्य बलाढ्य राक्षसांच्या प्राणघातक माऱ्यानें रुद्रसैन्य गारद होऊं लागलें. खुद्द वीरभद्राच्या शरीरांतही या राक्षसांचे हजारों बाण घुसले. यामुळें तो दिङ्मूढ होऊन रणांगणांत स्तब्ध राहिला. तथापि आपल्या लोकांची अत्यंत दैना होत असलेली पाहून त्याला फार वाईट वाटलें. या अनर्थापासून कशी सुटका होईल याचा तो विचार करूं लागला. इतक्यांत आकाशवाणी झाली कीं, 'हे संग्रामधीरा शिवनंदना, हे रक्तबिंदूपासून उद्भवणारे कोट्यवधि राक्षस तुजकडून नाश पावणार नाहींत.

उलट त्यांची संख्या वाढतच जाईल. तरी यांना मारक अशी श्रीशिवांनीं जी दिव्यशक्ति भद्रकाळी तुझ्या साह्यार्थ निर्माण केली आहे तिचें या समयीं तूं स्मरण कर. ह्मणजे ती येऊन हें राक्षसरक्त प्राशन करील. मग तुला राक्षसांच्या संहारास एक क्षणही लागणार नाहीं.' ही गगनवाणी ऐकून वीरभद्रानें तात्काळ भद्रकाळीचें स्मरण केलें, तोंच ती भयंकर रूप-धारी भद्रकाळी उत्पन्न झाली. या वेळीं ती सिंहावर बसलेली व अष्टभुजां-मध्यें शूल, शक्ति, चक्र, गदा, खड्ग, धनुर्बाण हीं आयुधें धारण करून एका हातांत अमृतपात्र घेतलेली अशी ती भद्रकाळी आरक्तवदनानें जणूं-काय राक्षसांना जाळून भस्म करिते कीं काय इतकी उग्र दिसत होती! या उग्र देवतेचा रणांगणांत उदय होतांच भयंकर कडकडाट झाला! तिज-बरोबर तिच्याप्रमाणेंच भीषण रूपधारी आरक्त वदनाच्या नवकोटि कात्या-यनी उद्भवल्या! यांना पाहतांच ते क्रूर दैत्य भयाभीत झाले. इतक्यांत वीरभद्रानें असंख्य तीक्ष्ण शरांचा मारा करून राक्षसांना घायाळ करण्याचें कार्य झपाट्यानें चालविलें. तों इकडे चामुंडादि सर्व कात्यायनी हजारों पिशाचें बरोबर घेऊन शस्त्राघातानें राक्षसांच्या प्रचंड देहांतून जें रक्त घळ-घळा निघे तें जमिनीवर पडण्याच्या आंतच तत्काळ घुटु घुटु प्राशन करीत. व लागलेंच त्यांचें मांसही खाऊन चट्ट करून त्या शरीराचा रतिमात्र अंशही भूमीवर पडूं देत नसत. हें भीषण कर्म करितांना त्या सर्वजणी खदखदां विकट हास्य करीत या हास्यनादानें रणभूमि कंपायमान होई! हा प्रकार पाहून वीरभद्रास संतोष वाटला. याप्रमाणें राक्षसांचें सर्व सैन्य नष्ट झालें. जे थोडे सैनिक रणांगणांतून पळून गेले ते पाताळलोकीं दडून बसले. नंतर वीरभद्रानें स्वपक्षीय मृतवीरांकडे अमृतदृष्टीनें अवलोकन करितांच ते सर्वही सजीव झाले, चंडमुंडादि सर्व भैरवही सावध होऊन पुनः नव्या दमानें संग्रामास सज्ज झाले.

इकडे दक्षेश्वर चिंतातुर होऊन श्रीविष्णुसन्निध आला, व परोपरीनें त्यांची स्तुति करून या संकटांतून रक्षण करण्याविषयीं विनविलें, तेव्हां ते दक्षास ह्मणाले, 'हे प्रजाधीशा, मी भक्ताधीन असल्याकारणानें तुजकरितां

एकदां संग्राम करून वीरभद्रास जिंकून जय मिळवीन अथवा तसें न झालें तर जें होणार तें होईल.' असें ह्मणून त्यांनीं संग्राम करण्याचा निश्चय केला.

इकडे वीरभद्रानें आपल्या सर्व चंड, मुंड, महाकाळादी वीरांस सांगितलें कीं, ' वीरहो, तुम्ही सर्व महादैत्यांचा संहार करून संकट निवारिलें, आतां शत्रुपक्षांत जे थोडे मानववीर शिल्लक राहिले आहेत त्यांचा तुम्ही समाचार घ्या. मी स्वतः दक्षप्रजापतीवर चाल करून जाऊन त्याचा वध करितों. ' असें ठरवून ते आपापल्या कार्यास लागले. प्रजापतीनें पृथ्वीवरील छप्पन्न देशींचे जे जे थोर व बलिष्ठ राजे आपापल्या चतुरंग दळासह आले होते, त्यांनां बोलावून स्फुरण येण्यासाठीं म्हटलें, ' हे नृपश्रेष्ठ हो, तुम्हीच आतां आमच्या महायज्ञाचें रक्षण करण्यास समर्थ आहां. ' असें प्रोत्साहन दिलें, तेव्हां अश्व, गज, रथ, पदाति अशी कोट्यावधि मानववीरांची सेना शिवगणांवर चालून आली. परंतु दिव्यावर झडप घालणाऱ्या पतंगाची जी दशा होते तशी अवस्था होऊन ते सर्व वीर लवकरच धारातीर्थी पतन पावले. या वेळीं रुद्रसैन्यांतील अष्टभैरवांनीं छप्पन्न देशींचे राजकुमार मारून टाकिलें. मग ते पराक्रमशाली राजे चाल करून आले, त्यांचीही दैना उडविली. एकएकांच्या अंगामध्यें रुद्रगणांचे हजारों बाण घुसून ते धरणीवर अस्ताव्यस्त पडले. त्यांचा संहार होतांच दक्षप्रजापतीस फार हळहळ वाटली. पण लागलेच त्यानें आपल्या द्वीपांतरींच्या सर्व मांडलिक नृपांना बोलावून संग्रामास जाण्यास आज्ञा केली. त्यांनीं सांगितलें, 'ज्या रुद्रमूर्तीपुढें बलाढ्य दैत्यांचा व देवांचाही निभाव लागला नाहीं, त्याजबरोबर आम्ही लढून जय मिळवूं ही आशाही फोलच होय. तथापि तुजकरितां आम्ही आपले देह यावेळीं खर्ची घालूं. सर्वशक्ति सर्वेश्वराशीं वैर करून निभाव लागणें कधींही शक्य नाहीं. ' असें म्हणून ते, क्षीरसागरापासून इक्षुसमुद्रापर्यंत विस्तीर्ण पसरलेल्या प्लक्षद्वीपांतील थोर राजे ( यांची नांवें सविस्तर सांगितलीं आहेत. ) हे चारी दिशा व्यापून युद्धास सिद्ध झाले. सर्वांनीं रुद्रगणांशीं घनघोर संग्राम केला, परंतु वीरभद्राच्या प्रळयकारी बाणवर्षावापुढें त्यांचें कांहीं न चालतां ते सर्व पराभव पावले.

## ( १० ) श्रीविष्णु–वीरभद्राचें तुमुल युद्ध.

नंतर दक्षप्रजापति अत्यंत भयत्रस्त होऊन पुनः श्रीविष्णुकडे आला, आणि अत्यंत लीनतेनें ह्मणाला कीं, ‘ या संकटसमयीं आपल्यावांचून आह्मास दुसरा त्राता नाहीं.’ यावर श्रीविष्णूंनीं सांगितलें, ‘ प्रजापते, ईश्वराशीं वैर करितांच यज्ञारंभीं जेव्हां दधीच्यादि सर्व समर्थ ऋषि क्षोभानें निघून गेले त्यावेळीं आम्हीं केलेला सुबोध न मानितां त्वां ईश्वरास वगळून यज्ञागारीं माझी अग्रपूजा केली. नंतर दाक्षायणीचें दहन, व त्यामुळें वीरभद्राचा उद्भव होऊन देव, दैत्य, दानव, मानव इत्यादिकांचा आतांपर्यंत समूळ उच्छेद झाला, आतां मी केवळ तुजकरितां या विपत्काळीं युद्धास निघेन; यास्तव यशाचा भरवसा धरूं नको.’ असें बोलून रथारूढ होऊन यज्ञमंडपाबाहेर येतांच त्यांनीं ती अफाट, बलोन्मत्त रुद्रसेना पाहिली. श्रीविष्णु युद्धास आल्याचें पाहातांच स्वतः वीरभद्र त्याच्या समोर येऊन म्हणाला, ‘ हे कमलापते, हा रुद्रकोप कां झाला व यज्ञास विघ्न कां आलें हें तुम्ही जाणत आहां. मला श्रीशंकर जसे पूज्य तसे आपणही वंद्य. मी दुजाभाव मानीत नाहीं. म्हणून यासमयीं आपण सांगाल तसें वागेन. अथवा हा बुद्धिवाद सोडून आपण जर संग्राम करून यज्ञरक्षण करण्यास सिद्ध होत असाल, तर यज्ञरक्षण कालत्रयीं घडणार नाहीं. मी यज्ञाचा विध्वंस करून दक्षाचा शिरच्छेद करीन.’ श्रीविष्णु हास्य करून म्हणतात. ‘ वीरनायका, तूं म्हणतोस त्या सर्व गोष्टी आम्ही जाणतों. आम्हीही यज्ञारंभींच प्रजापतीस अनेक प्रकारें बोध केला आहे, पण तो न मानितां अभिमानमदानें त्यानें ईश्वरनिंदा करून माझी पूजा केली. तेव्हां मला अत्यंत खेद झाला. तूं महाज्ञानी व पवित्र आहेस. तुला या सर्व गोष्टी कळल्या आहेतच. आतां आमचा एक नियम आहे कीं, श्रीशंकराप्रमाणेंच आम्हीही भक्ताधीन असल्यानें, त्यांच्या शुद्धांतकरणानें मोहित होतों व त्यांची मनकामना पूर्ण करण्यास आम्ही झटत असतों. हे वीरा, भक्तकामकल्पद्रुम श्रीशिवाचा जसा वर्तनक्रम त्याच प्रमाणें आम्ही वागत असतों. म्हणून ज्यांच्यावर

सांप्रत ईश्वराचा क्रोध झाला आहे त्यांजवर आमचाही कोप होणें अगदीं साहजिक आहे. तथापि आतां कृतयुगांतीं भूमिभार अत्यंत वाढला असून तो निवारण्यास्तव त्रैलोक्यांतील दैत्य, दानव, मानवादिक सर्वत्रांचा तुझ्या-कडून संहार करविणेकरितां आपल्या क्रोधाप्रासून केवळ 'कोपमूर्ति' अशा तुला श्रीशिवांनीं निर्माण करून तशीच आज्ञा तुला केली आहे. हें आम्ही जाणून आहों. तरी भक्ताकारणें आम्ही तुजशीं युद्ध करूंच. त्यांत तूं मला जिंकशील किंवा मी तुला जिंकेन हाच निश्चय होय.' याप्रमाणें उभयपक्षीं जें करणें श्रेयस्कर किंबहुना कर्तव्यच होतें तेंच श्रीविष्णु बोलले. यावर वीरभद्रानें उत्तर दिलें, 'श्रीशंकरांनीं मला केलेली आज्ञा हीच आपली मनेच्छा आहे हें पाहून मला संतोष होतो. म्हणून तिज-प्रमाणेंच आपली आज्ञाही मी शिरसामान्य करीन,' ही वीरभद्राची लीनता पाहून श्रीविष्णु संतोषले व म्हणतात 'हे महाबाहो वीरभद्रा, परमेश्वरी आज्ञेनुसार तुमुल युद्ध करून, मनांत मुळींच शंका न धरितां मजसह सर्व देवांस जिंकून त्वां स्वस्थळास सत्वर जावें' हें विष्णुवचन अंगीकारून वीरभद्र संग्रामास सिद्ध झाला, आणि गंभीर रणगर्जना केली. इकडे श्रीविष्णूंनीं पांचजन्य महाशंख फुंकला. या दोन्ही महानादांनीं भूमि थरारली, अंतराळ दणाणलें व दिक्पति भयभीत झाले! वीरभद्रानें देवसैन्यावर महा-घोरास्त्र प्रेरिलें; तेव्हां श्रीविष्णूंनीं दिव्य बाणांनीं त्याचें निवारण केलें. दक्ष-प्रजापतीनें यापूर्वीं पराभव पावून परत फिरलेल्या देवेंद्रादिक सर्व देवांना व राक्षसांना विनवून त्यांनाही श्रीविष्णुसाह्यास बोलविलें. तेव्हां इंद्र, चंद्र अष्टदिक्पाल, मरुद्गण इत्यादि सर्व तेहतीस कोटि देव युद्धास निघाले. आणि लवकरच सर्वांनीं मिळून रुद्रगणांचा खरपूस समाचार घेतला. त्यामुळें शिवसेना मागें हटली. तें पाहून अष्टभैरव व अष्टवीरनायक पुढें झाले. व त्यांनीं देवसैन्यावर प्राणघातक शरांचा पाऊस पाडून रुद्र-सैन्यास धीर दिला. वीरभद्र श्रीविष्णु परस्परांवर अमोघ शस्त्रास्त्रांचा वर्षाव करीत घनघोर रणकंदनीं मिसळले.

इकडे इंद्र व नंदिकेश्वर, वायु व भृंगी, यमधर्म व महाकाळ, वरुण व चंडवीर या परस्परांचा घनघोर संग्राम चालला होता. त्यांत वीरभद्रानें ' योगिनीचक्र ' प्रेरून थोर थोर भैरव, क्षेत्रपाल व प्रमथगणांसह शंखिनी, डाकिनी, दुर्गादि कात्यायनींनीं युक्त असें अपरिमित सैन्य उत्पन्न करून सोडिलें. क्रूर कात्यायनींनीं देवसैन्यांतलि राक्षसांचें रुधिर भक्षण करितांच वीरवेताळांनीं तीं प्रेतें खाऊन फस्त करावींत! असा क्रम चालविला. यामुळें देवसैन्याचा आधारभूत जो राक्षणगण तो नष्ट होत चालला.

देव, राक्षसादिक सर्वांची अशी धूळधाण उडून अत्यंत शोचनीय स्थिति झाली. ती पाहूनही श्रीविष्णु अत्यंत कोपायमान झाले होते. त्या मुळें तत्काळ वेगवान् अशा गरुडावर आरूढ होऊन ते लढाईस सज्ज झाले. ज्यावेळीं श्रीविष्णु पुढें झाले, तेव्हां वीरभद्राच्या तडाक्यांतून नुकतेच जिवंत सुटलेल्या इंद्रादि सर्व पळपुत्या देवांना जरा धीर आला. आणि वीरभद्राकडून अंत व्हावा म्हणूनच कीं काय ते पुन्हां श्रीविष्णूस साह्य करूं लागले. तथापि ज्याप्रमाणें एखाद्या वाघाला पुढें करून पांच पन्नास कोल्हे आपल्यावर चालून आले तर त्याबद्दल सिंहाला यत्किंचित् भीति वाटत नाहीं, त्याप्रमाणें या सर्वांचें महासमर्थ वीरभद्रास मुळींच भय वाटलें नाहीं. उलट त्यास जास्तच रणमद चढला. आतां भयंकर संग्राम सुरूं होणार तोंच आकाशांतून वीरभद्राकरितां एक दिव्य रथ खालीं उतरला. तो रथ, सहस्रसूर्यांहूनही जास्त तेजस्वी असून त्यावर नंदिध्वज झळकत होता. पुढें दोन बलवान् घोडे जुंपिले असून आंत अनेक उत्तम अस्त्रें व दिव्य बाण ठेविले होते. श्रीशंकरांनीं त्रिपुरांचा संहार केला त्यावेळीं त्यांच्या रथावर सारथ्यकर्म करणारा ब्रह्मदेवच श्रीशिवाज्ञेनें त्यावर सारथी झाला होता. ब्रह्मदेवानें तो उत्तम सुसज्ज रथ श्रीविष्णुसमक्ष वीरभद्राजवळ आणून उभा करून म्हटलें, 'वीरश्रेष्ठा, तूं मोठा धैर्यवान् आहेस. तुला योग्य असा हा अविनाशी रथ शशिशेखरांनीं मजकडून मुद्दाम पाठविला आहे. तरी यावर बसून श्रीविष्णूंशीं संग्राम कर. अशी तुला शिवाज्ञा आहे' हें भाषण ऐकून व शिवाज्ञा शिरोधार्य समजून तो रणशूर वीरभद्र मोठ्या

उत्साहानें त्या सुंदर रथावर चढला; तेव्हां शिवगणांनीं आनंदानें जो जयघोष केला त्यायोगें आकाश पाताळ दणाणून गेलें! देवसेनेला धडकीच भरली. हा युद्धचमत्कार पाहण्यास यक्ष, गंधर्व, किन्नर, विद्याधर यांची आकाशांत इतकी गर्दी झाली कीं, एका क्षणांत आकाश विमानांनीं फुलून गेलें. इतक्यांत मेघकांतिवत् नीलवर्ण नारायणानें हातांत शार्ङ्ग धनुष्य घेऊन मुसळधार पावसाप्रमाणें दिव्य बाणांची रुद्रसैन्यावर वृष्टि केली व वीरभद्रास जेरीस आणिलें. हें पाहून वीरभद्रानें एक अत्यंत मोठें शिवधनुष्य हातीं घेऊन तिचा टणत्कार घनघोर केला, आणि श्रीविष्णूवर चाल केली. त्या टणत्कारानेंच पृथ्वी थरथर कापूं लागली. मग वीरभद्रानें एक लखलखीत सर्पासारखा भयंकर बाण भात्यांतून काढून धनुष्यास लाविला व श्रीविष्णूच्या कपाळावर प्रहार केला. हा आपला अपमान झाला असें समजून एक सर्पाकृति दिव्य बाण श्रीविष्णूंनीं वीरभद्राच्या उजव्या बाहूवर मारिला. अशाप्रकारें दोघांचा तुमुल संग्राम चालला. याचा काय परिणाम होईल कोण जाणे, या भीतीनें आकाशांत देवांनीं मोठा हाहाःकार केला. शेवटीं ज्यांतून अग्निकणांचा वर्षाव होत होता असा एक सूर्यासारखा लखलखीत बाण श्रीविष्णूंच्या विशाल छातीवर जोरानें मारून वीरभद्रानें त्यांस घायाळ केलें. त्यामुळें महासामर्थ्यवान् श्रीविष्णु मूर्च्छित होऊन धाडकन् जमीनीवर पडले; परंतु पुनः क्षणार्धांतच सावध होऊन आपल्याजवळील दिव्य अस्त्रें त्यांनीं वीरभद्रावर भराभर फेंकलीं. तीं सर्व भयंकर अस्त्रें दिव्य बाणांनीं त्यानें मोडून टाकिलीं. यायोगें श्रीविष्णु रागानें संतप्त झाले आणि ज्यावर आपलें नांव आहे असा केव्हांही वांया न जाणारा एक अमोघशक्ति भयंकर बाण बाहेर काढून त्यांनीं तो मोठ्या आवेशानें वीरभद्रावर फेंकिला. ती दिव्य शक्ति आपणावर येत आहे असें पाहातांच त्यानें आपल्या नांवाचा एक तेजस्वी बाण मारून तिचे शतशः तुकडे केले! आणि फिरून एक भयंकर बाण मारून श्रीविष्णूचें शार्ङ्गधनुष्य मोडून टाकिलें व दोन बाणांनीं गरुडास जखमी केलें. हा अचाट पराक्रम पाहून सर्व देव थक्क झाले. आणि शिवगणांनीं

आनंदानें जयघोष केला. तेव्हां श्रीविष्णु अत्यंत खवळले. संतापातिशयानें त्यांचे डोळे लाल झाले, व त्यांतून अग्निज्वाला बाहेर पडून रुद्रसेना आतांच जळून खाक होते कीं काय असें भासूं लागलें. मग त्या कोपायमान झालेल्या श्रीविष्णूनें योगबलानें त्यावेळीं आपल्या देहापासून शंख, चक्र, गदा इत्यादि आयुधांनीं युक्त अशा हजारों विष्णूंना त्या ठिकाणीं एकदम उत्पन्न केलें, व सर्व रणभूमि विष्णुमय करून सोडिली. तेव्हां तो महाधनुर्धर वीरभद्र थोडावेळ अगदीं गोंधळून गेला. नंतर श्रीशंकरांनीं आपल्या तृतीय नेत्रांतील अग्नीनें ज्याप्रमाणें त्रिपुर जाळून टाकिलें तसें वीरभद्रानें आपल्या तृतीय नेत्राग्नीनें ते सर्व योगबलोत्पन्न मायारूपी विष्णूंना जाळून भस्मसात् केलें. हें अचाट सामर्थ्य पाहून श्रीविष्णु खदिरांगाराप्रमाणें लाल झाले, व त्यांनीं आपलें निर्वाणीचें सुदर्शनचक्र बाहेर काढिलें, व वीरभद्रावर चालून गेले. श्रीविष्णु आपणांस मारण्याकरितां चक्र उगारून आपल्यावर वेगानें धांवत येतात असें पाहतांच वीरभद्रास मोठें कौतुक वाटलें. श्रीविष्णूंनीं, ' वीरेशा, हें निर्वाणीचें सुदर्शनचक्र प्रेरितों सहन कर. ' असें म्हणून आवेशानें तें चक्र त्याजवर फेंकिलें, तें धगधगीत ज्वालामय महाचक्र आपल्यावर येतांच वीरभद्रानें मोठ्या कष्टानें तें ओढून हातीं धरिलें, आणि त्याची शक्ति नष्ट करून त्यास अत्यंत सूक्ष्म रूप दिलें, व नंतर सर्व देवांसमक्ष तें महाचक्र तेथल्या तेथेंच गिळून टाकिलें, आणि फिरून लागलेंच योगमायेनें श्रीविष्णूंस जागच्या जागींच कुंठित केलें. त्यांना पुढें जातां येईना कीं धड मागें फिरतां येईना, फार तर काय सुदर्शनचक्र फेंकण्याकरितां वर उचललेला आपला हात सुद्धां खालीं करतां येईना, अशी शोचनीय स्तंभित स्थिति प्राप्त होतांच, दाढा पाडिल्यावर सिंहाची अथवा शिंगें मोडलेल्या क्रुद्ध बैलाची जशी अवस्था होते तशी श्रीविष्णूंची दीनावस्था होऊन ते आक्रोश करीत एका जागींच स्तब्ध राहिले !

## देवसेनेची दुर्दशा

आपल्या प्रख्यात सेनापतीची ही दुर्दशा पाहून इंद्रादिक सर्व देव दांत

ओठ खातच पुनः रागानें वीरभद्रावर चालून आले. तेव्हां अल्पशक्तीचे अनेक पशु आपल्यावर वेगानें चालून आले तरी ज्या प्रमाणें सिंह मुळींच डगमगत नाहीं, तसें या चालून येणाऱ्या देवांना पाहून वीरभद्रास कांहींच वाटलें नाहीं. त्यानें एक भयंकर आरोळी मारून फक्त त्या नादानेंच या सर्व देवांना जागच्या जागींच कुंठित केलें! ज्या ज्या देवांनीं प्रहार करण्याकरितां शस्त्रास्त्रें वर उचललीं होतीं त्यांचे वर केलेले हात शस्त्रांसहित जेथल्या तेथेंच निश्चल झाले त्यामुळें देवांना अत्यंत शरम वाटली. तेव्हां वीरभद्रापुढें रणांगणांत राहाण्यास कोणीही धजेना. शेवटीं तशा कुंठित अवयवांसह सर्व देवांनीं मागें पाय काढून पळण्यास आरंभ केला. तें पाहतांच वीरभद्रानें त्यांच्यावर हजारों तीक्ष्ण बाणांचा वर्षाव करून, ज्याप्रमाणें सूर्य आपल्या किरणांनीं पृथ्वी झांकून टाकितो तसें त्यानें आपल्या दिव्यबाणांनीं सर्व दिशा झांकून टाकिल्या. त्या बाणांचा आवाज मेघगर्जनेसारखा असून ते बाण विद्युल्लतेप्रमाणें चकाकत होते. त्या भयंकर बाणांनीं कित्येक देवांचे हात तुटले, कोणाचे पाय तुटले, कोणाच्या पाठी फुटल्या, कित्येकांचीं डोकीं फुटून शरिरांच्या चिंधड्या उडाल्या! त्यामुळें भयानें दिशाभूल होऊन कोणी जमिनींत शिरूं लागले, कोणी आकाशांत उडून जाण्यासाठीं धावूं लागले; कित्येक पर्वतांच्या दरींत लपले, तर आणखी कित्येकांनीं नदींत धडाधड उड्या टाकून दडी मारिली. याप्रमाणें शरीरें छिन्नविछिन्न झालेल्या त्या हतवीर्य देवसमुदायांत रक्तानें नखशिखांत न्हालेला पराक्रमी वीरभद्र प्रळयकाळीं सर्व प्रजा गिळून टाकणाऱ्या भयानक काळभैरवाप्रमाणें शोभूं लागला! दक्षयज्ञभूमीच्या आसपास रणांगणांत जिकडे तिकडे रक्ताचे पूर वाहूं लागले. या भयंकर संग्रामानें पृथ्वी थरथरूं लागली! तारे तुटले, मोठमोठे वृक्ष मोडून पडले, अमंगल वारा वाहूं लागला, व सर्व दिशा उदास दिसूं लागल्या !

## नृसिंहावतार

श्रीविष्णूसह सर्व देवांची अशी दुर्दशा होऊन प्रबळ सुदर्शन चक्रही वायां गेलें. याप्रमाणें वीरभद्रापुढें विष्णुतेज फिकें पडलेलें पाहतांच

दक्षप्रजापति अत्यंत चिंतातुर झाला; व तो ज्ञानसंपन्न अशा शुक्राचार्यांकडे जाऊन विनयपूर्वक ह्मणाला, ' मुनिश्रेष्ठा, आतां वीरभद्रास जिंकण्याकरितां कोणता उपाय करावा ? ' आचार्यांनीं सांगितलें. ' यावेळीं त्वां वीरभद्रासमान उग्रमूर्ति अशा श्रीनारसिंहावताराची आराधना करावी. कारण सांप्रत विष्णुबल अवतारपुरुषाकडे गेलें आहे, तेव्हां अनेक आहुति देऊन नृसिंहास आव्हान केलें पाहिजे; ह्मणजे नृसिंह प्रगट होऊन रुद्राचा संहार करील.' हें शुक्राचार्यांचें वचन ऐकून दक्षप्रजापतीनें तत्काल विधियुक्त दिव्य नारसिंह मंत्रांनीं आवाहन करून अग्नींत सहस्राहुति दिल्या. तेव्हां पूर्णाहुतीच्या शेवटीं शुक्राचार्यांच्या मंत्रसामर्थ्यानें यज्ञकुंडांतून भयंकर नारसिंहावतार प्रगट झाला ! तेव्हां भयंकर कडकडाट होऊन दशदिशा दणाणून गेल्या ! श्रीविष्णूच्या या अवतार स्वरूपाचें वर्णन करणें अशक्यच होय. त्या भयंकर मूर्तीचे नेत्र ज्वाळाकार तेजानें चमकत होते. त्यानें आपल्या सिंहमुखाचा भयंकर जबडा पसरला असून त्यांतून जणूं अग्निकणांचा वर्षावच होत होता ! ही अत्यद्भुत नृसिंहमूर्ति पाहतांच शुक्राचार्यांनीं यज्ञ पूर्ण केला. स्वतः दक्षप्रजापतिसुद्धां या भयंकर रूपानें भेदरून गेला ! तथापि धैर्य धरून त्यानें त्या उग्रमूर्तीची प्रार्थना केली कीं, हे देवाधिदेवा, यावेळीं रुद्रतेजानें सर्व भूमंडळाचा संहार चालविला आहे. त्याला प्रतिबंध होऊन आमचें रक्षण व्हावें एतदर्थ आपणास आव्हानिलें आहे. तस्मात् आमचें भय निवारावें. ही दीनवाणी श्रवण करून सर्वांस अभय देऊन ती विष्णुमूर्ति उद्युक्त होतांच समरांगणांत येऊन युद्धास उभी ठाकली. ती अयोनिसंभव, दैदीप्यमान, असाधारण अशी रुद्रतेजाशीं समानबल विष्णुमूर्ति पाहून वीरभद्रास निजतेजाची प्रचीति आली. आणि त्यानें तत्काळ रणसंग्रामाची तयारी केली.

## श्रीवीरभद्र–नृसिंह–युद्ध

प्रथम सर्वांपुढें सहस्रावधि सिंहरथ, त्यामागें शार्दूलरथ, नंतर गजरथ त्यामागें शूर सैनिक, अशी मोठ्या चातुर्यानें वीरभद्रानें आपल्या सैन्याची रचना करून, नंतर त्रिगुणदर्शक अतिविशाल त्रिशूल हातीं घेऊन, तो स्वतः त्या

मूर्तिसमोर आला व त्यानें तो शूल देवसैन्यावर फेंकिला. तेव्हां दक्षसैन्य भयातुर झालें. त्यांतील हजारों सैनिकांचा संहार करून तो तेजस्वी शूल शेवटीं यज्ञमंडपात प्रवेशला व तेथेंही अनर्थ उडविला. हें पाहून नारसिंहास संताप चढला व तो वीरभद्रासमोर आला. हीं रुद्र व विष्णुअवतार तेजें एकमेकांस भिडलीं तेव्हां देवादिकांसही महाभय वाटलें व आतां जगत्-याचा प्रळय होतो कीं काय असें सर्वांस भासलें. इकडे रुद्रसैन्यानें यज्ञ-मंडपास चोहोंकडून घेरून बाणवृष्टीनें देवदैत्यांचा संहार चालविला. तो पाहतांच अत्यंत क्रोधानें नारसिंहानें घोरगर्जना केली. वीरभद्रानेंही भयंकर सिंहनाद केला. परस्परांच्या रणगर्जनेनें ब्रह्मांडाचा थरकांप झाला. नारसिं-हानें सिंहरथांवर असंख्य शर वर्षून त्यांचा अगदीं मोड केला. मग शार्दूल रथांवर चाल करून त्यांचा फडशा पाडिला. आणि लवकरच गजरथांकडे धांव घेतली. त्यांतील कित्येक महारथी रथांतच चित केलें. हा आपल्या सैन्याचा भयंकर संहार पाहून वीरभद्र प्रळयाग्नीसारखा खवळला. व मनांत श्रीशंकराचें स्मरण करून खड्ग, चाप, त्रिशुलादि सर्व शस्त्रांचा एकदम जोराचा मारा सुरू ठेवून दक्षसैन्याचा चुराडा उडविला. तेव्हां देव, दैत्य, दशदिशा पळों लागले तें पाहून नृसिंहास अत्यंत क्रोध आला. तो वीर-भद्राच्या शस्त्रमारांचें निवारण करून थेट त्याच्यावरच चालून आला. त्या विशाल रूपाकडे पाहून वीरभद्र म्हणाला 'हे विष्णु, तुम्हीं दक्षसाह्यास अवतार धरिला; परंतु दक्षानें ईश्वरास अवदान न देतां त्याची निंदा केली; दाक्षायणीचा प्राणघात पाहिला. अशा या अधम दक्षाच्या अन्यायी वर्तनानें त्रिभुवनाचा संहार झाला. हा केवळ ईश्वरक्षोभाचा परिणाम होय. हें तुम्हांस कसें कळत नाहीं?' यावर नृसिंह उत्तर करितो. 'आम्हीं देव, भक्तांच्या आव्हानासरसे येऊन त्यांचें कल्याण करण्यास बद्धपरिकर आहों. ह्मणून येथें न्यायान्यायाचा विचार न पाहतां संकटीं साह्य होणें हेंच आमचें कर्तव्य होय. हें जर तुह्मास उचित दिसत नसल्यास येथें युद्धच केलें पाहिजे. आतां आम्हीं परस्पांमध्यें द्विधाभावानें जगाकारणें युद्ध करणें हें अयोग्य असलें तरी भृगुऋषीनें वेदविहित मंत्रांनीं पाचारण केल्यानंतर येथें न येणें म्हणजे

वेदांना दूषण देणें होय. याकरितां आम्हास येथें यावें लागलें. तरी तुम्हीं यावेळीं श्रीशंकरांचें दक्षास वरदान असल्याप्रमाणें त्यास ' चिरंजीव ' पद देऊन त्याच्या अपराधाची क्षमा करावी. ' तेव्हां वीरभद्रानें रागानें म्हटलें कीं, ' मला ईश्वराची निर्धारवाणी सत्य केली पाहिजे; त्यास्तव दक्षाचें शिर छेदून त्याचा होम केल्यावांचून सुटका नाहीं. ' असें बोलून तो घनघोर संग्रामास सिद्ध झाला. दक्षप्रजापतीनें आव्हानिलेली ही नारसिंहमूर्ति अत्यंत उग्र व रक्तवर्ण असल्यामुळें भयानक भासत होती. त्याच्या शरसंधानानें अगणित रुद्रसेना भंग पावली. तें पाहून वीरभद्रास अत्यंत क्रोध आला व त्यानें मोठ्या आवेशानें अग्न्यस्त्र अभिमंत्रून नारसिंहावर फेंकिलें तों रणभूमीवर सर्वत्र अग्निप्रळय झाला. यावर नारसिंहानें मेघास्त्र सोडून तें शमविलें मग वीरभद्रानें वाय्वास्त्र सोडून मेघांचा नायनाट केला; पण नारसिंहाच्या पर्वतास्त्रानें या महावाताचें निवारण करून रुद्रसैन्याचा चुराडा उडविला. तेव्हां वज्रास्त्र प्रेरून वीरेशानें त्या पर्वतांचें चूर्ण केलें. यामुळें खवळून नारसिंहानें हजारों तीक्ष्ण बाण मारून वीरभद्राचा सारथी व रथाचे घोडे ठार केले. मग रथ मोडून त्यास विरथ केलें. यावेळीं वीरभद्राच्या शरीरांत अनेक बाण घुसून त्यास अत्यंत वेदना होऊं लागल्या. तथापि मोठ्या आवेशानें निर्वाण बाण मारून त्यानें नारसिंहाचें वक्षस्थल भेदिलें. पण नारसिंहानें लवकरच मायापाशास्त्र अभिमंत्रून वीरभद्राच्या वक्षस्थळाचा नेम धरून जोरानें मारिलें; त्यामुळें वीरभद्र तत्काळ मूर्च्छित झाला; परंतु लागलाच पुनः सावध होऊन त्यानें श्रीशंकर स्मरण केलें आणि युक्ति योजिली कीं, नारसिंह हा अवतारी व विराटदेही असल्यानें याचा मोड करण्यास विराट अवतारच घेतला पाहिजे. असा विचार करून तो सूक्ष्मरूपानें आकाशांत गेला व तेथून भयंकर उग्र, व पर्वतप्राय असा पक्षीदेही—

## 'शरभावतार'

धारण करून त्यानें नारसिंहावर आकाशांतून झडप घातली. ह्या शरभाचें अतिविशाल व महाबलवान् भयानक रूप पाहून सुरासुर भयचकित झाले. त्याची चोंच वज्राप्रमाणें कठीण असून विद्युल्लतेप्रमाणें लकाकत

होती. अंगकांति रक्तवर्ण असून कोटिसूर्यांप्रमाणें तेजाळ होती! त्याच्या पंखांचा आकाशांत फडफडाट होतांच मेघगर्जनेप्रमाणें गंभीर नाद उठे. या फडाःकारानेंच भुवनत्रय कंपायमान झालें! अशा प्रकारचा हा अत्यद्‌भुत शरभावतार होतांच आकाशवाणी झाली कीं, 'हे भूचरहो, हा वीरभद्राचा शरभावतार सर्व जनांचा संहार करील. दक्षप्रजापतीचा वध करून त्याला साह्य करणाऱ्यांचा पूर्ण फडशा पाडील. करितां चतुरांनीं यथान्याय जीवरक्षण करावें.' ही गगनवाणी ऐकूनच कित्येक भयानें गतप्राण झाले. उरलले सैनिक दशदिशां पळों लागले.

## श्रीशरभ — नृसिंहाचा घनघोर संग्राम.

इतक्यांत दिव्य देहधारी शरभानें दक्षयज्ञमंडपापुढें युद्धार्थ सिद्ध होऊन राहिलेल्या विराटरूपी नारसिंहावर झडप घातली, व चंचुप्रहारानें त्याची सर्व शस्त्रास्त्रें तोडून चूर्ण करून टाकिलीं. असा निःशस्त्र बनतांच नारसिंह अत्यंत खवळला आणि दंड ठोकून शरभेश्वराशीं मल्लयुद्ध करण्यास्तव धांवून गेला. त्यावेळीं शरभेश्वर क्रूर स्वरानें गर्जना करून ह्मणाला. 'तुझें शिर छेदून श्रीशिवाच्या रुंडमालेंत गोंवून टाकीन, हा निर्धार जाण. तस्मात् या संकटकालीं तुझ्या साह्यकर्त्याचें लवकर स्मरण कर.' असें बोलून मनांत आदिपुरुषाचें ध्यान करून त्यानें अत्यंत क्रूर रूप धरिलें. आणि घनघोर युद्ध चालविलें. हें शरभ-नृसिंहाचें भयंकर युद्ध पुष्कळ काळपर्यंत चाललें होतें. रणभूमीवरील यांचा थैमान पाहून दिक्पति भयकंपित झाले. यांच्या दणदणाटानें आकाश भरून गेलें. भूमि हादरून गेली! शेवटीं नारसिंहाची शक्ति क्षीण झाली तोंच शरभानें त्यास खालीं पाडून तो त्याच्या उरावर बसला! आणि चंचुप्रहारानें कंठनाळ चिरून त्याचा शिरच्छेद करण्यास सिद्ध झाला. आपल्या अवतारी देहाची ही दुर्दशा पाहून श्रीविष्णु मनांत दचकले, व पुढील अनर्थ-परंपरा ध्यानांत आणून भक्तजनांच्या अंतःकरणांतील स्वतःवरील दृढभावना नष्ट होईल हें जाणून ते तत्काळ कैलासीं श्रीशंकराकडे जाऊन त्यांचें नानाविध स्तोत्रांनीं स्तवन करून म्हणाले कीं, 'हे प्रभो, यावेळीं आपण माझ्या अवतारी देहाचें रक्षण करा.' ही करुणवाणी श्रवण करून श्रीशंकर संतुष्ट

झाले व म्हणतात, 'हे विष्णो, तूं त्या वीरेशाचेंच स्तवन कर. म्हणजे तुझा अवतार-देही मुक्त होईल.' हें वरदवचन शिरसामान्यकरून श्रीविष्णु भूतळीं आले व त्यांनीं मनोभावानें सहस्रनामांनीं वीरभद्राचें स्तवन आरंभिलें. या विष्णुमुखोद्भव वीरभद्रनामांतील एक एका नामाचा महिमा ब्रह्मादिकांस वर्णवेना इतका अगाध आहे. हें वीरभद्राचें गुण-नाम-संकीर्तन जे ऐकतील ते मुक्त होतील. हें विष्णुकृत दिव्य स्तवन ऐकून वीरभद्र संतोषला. व त्यानें नारसिंहास सोडून दिलें. आणि आपण उभयतां एकरूपच असून केवळ भक्तांकारणें आम्हांस युद्ध करावें लागलें हें जगास दाखविलें. अशा प्रकारें नारसिंहाचा पराभव करून शरभेश्वर आकाशांत अंतर्धान पावला.

## (११) यज्ञमंडपांत वीरभद्राचा प्रवेश

बहुतेक सर्व देवदानवांचा संहार होऊन नारसिंहावताराची इतिश्री होतांच शिवसेनेच्या अग्रभागीं चमकणाऱ्या सेनाधिपति वीरभद्रानें तत्काळ यज्ञमंडपाकडे धांव घेतली. आणि आंत शिरून तो मंडप व तेथील यज्ञ यांचा विध्वंस करून टाकण्याची आपल्या सेनेस आज्ञा केली. रुद्रसेनेचा प्रचंड लोंढा त्या महायज्ञमंडपावर जाऊन आदळतांच त्या सभोंवतालचे रक्षक अत्यंत घाबरून पळून गेले. ज्यांनीं प्रतिकार करण्याचा थोडाबहुत यत्न केला, त्यांना बिलकूल दाद न देतां ती प्रचंड सेना पूर्व, उत्तर, वायव्य, पश्चिम इत्यादि सर्व दरवाज्यांनीं आंत घुसूं लागली. स्वतः वीरभद्र पूर्व महाद्वारासमोर येऊन थडकला होता. त्यानेंही बरोबरच्या सर्व योद्ध्यांसह महद्वाराजवळील सर्व रक्षकांचा संहार करून तत्काळ मंडपांत प्रवेश केला व त्या महाद्वारांतून कोणाही दडूंस बाहेर पडतां येऊं नये म्हणून 'वीरेश्वर' नांवाच्या एका बलाढ्य गणाधीशास तेथें रक्षणास ठेवून त्या दरवाजाची पक्की नाकेबंदी केली या वीरेश्वरानें अखेरपर्यंत मोठ्या पराक्रमानें झुंजून तें ठाणें सोडिलें नाहीं. आणि आपली ही कामगिरी उत्तम प्रकारें बजाविली. याच पराक्रमशाली वीरेश्वराच्या नांवानें पूर्वमहाद्वाराच्या ठिकाणीं जें लिंग स्थापिलें त्याच मांजरीजवळील लिंगास

हल्लीं ' कडबागिल वीरेश्वर ' ( वीराण्णा ) म्हणतात.

## यज्ञदर्शन

यज्ञमंडपांत शिरतांक्षणीं वीरभद्र थेट यज्ञशाळेकडे गेला. आणि श्रीविष्णु-इंद्रादि देवश्रेष्ठांप्रीत्यर्थ केला जाणारा तो महायज्ञ पाहिला. तेथें दक्षा-भोंवतीं अतिरथी, महारथी व इतर अनेक शूर योद्धे त्याच्या रक्षणार्थ सिद्ध होते. तेथें मध्यभागीं एक मोठा सुशोभित ध्वज उभारला होता. यज्ञ कुंडांतील प्रदीप्त अग्नीमध्यें आहुति देण्याचा धूमधडाका चालला होता. तेथील यज्ञसंबंधीं सर्व पात्रें रत्नखचित सुवर्णाचीं असल्यामुळें तीं झळकत होतीं. यज्ञकर्म करणारे ऋत्विज ऋषि अत्यंत विद्वान् तसेच महासमर्थ असून ते वेदमार्गास अनुसरून प्रत्येक कर्म करीत होते. तो यज्ञसमारंभ पाहाण्यास हजारों देवांगना व अप्सरा आल्या होत्या यज्ञमंडपांत जिकडे तिकडे वेणू व वीणा यांचें कर्णमधुर ध्वनि ऐकूं येत असून वेदमंत्रांच्या घोषानें दशदिशा दणाणून जात होत्या. असा तो यज्ञ पाहातांच पराक्रमी वीरभद्रानें मोठा सिंहनाद केला. तेव्हां सर्व शिवगणांनींही एकदम जयघोष करून तो मंडप दणाणून सोडिला. तो दणदणाट ऐकिल्या-बरोबर तेथील सर्व लोक व ऋषिसमुदाय, ज्याप्रमाणें सिंहगर्जना ऐकिल्या-बरोबर अरण्यांतील बलाढ्य हत्तींचा थरकांप होतो, त्याप्रमाणें तेथील सर्व देवसुद्धां गर्भगळित झाले. त्या विजयगर्जनेनें पृथ्वी कंपायमान झाली, वारे सोसाट वाहूं लागले. अग्नि निष्प्रभ झाला !

## वीरभद्र-दक्षप्रजापतीची प्रथम भेट

अशा भयदायक प्रसंगीं भद्रकाळी व असंख्य शिवगणांसह यज्ञमंडपांत शिरलेल्या त्या तेजःपुंज वीरभद्रास पाहातांच अंतर्यामीं घाबरलेल्या परंतु बाह्यात्कारीं धैर्याचा व क्रोधाचा दिमाख दाखविणाऱ्या दक्षप्रजापतीनें वीर-भद्रास, ' तूं कोण आहेस ? व येथें यज्ञमंडपांत धुमाकूळ कां घालितोस ? असें दरडावून विचारिलें. दुष्ट दक्षाचा तो उर्मट प्रश्न ऐकून विकट हास्य करून तेथील ऋत्विज, ऋषीमंडळ व देव, दानव आणि शेवटीं

दक्षाकडे क्रोधानें पाहून वीरभद्रानें म्हटलें. ' श्रीशंकराचें सामर्थ्य अलौकिक असून आम्ही त्याचे आज्ञाधारक सेवक आहों. आणि या यज्ञांतील आमचा हविर्भाग घेण्याकरितां येथें आलों आहों. ह्यासाठीं आमचा भाग आम्हांस देऊन या यज्ञांत आमचा भाग कां ठेविला नाहीं ? त्याचें कारण सांगा. नाहींपेक्षां तुमची धडगत नाहीं.' हें क्रोधयुक्त भाषण ऐकतांच शुक्राचार्य म्हणतो. ' अरे, तूं व्यर्थ अभिमान धरून कां बडबडतोस ? आम्ही ब्राह्मण वेदमूर्ति असून वेदसत्ता आमच्या हातीं आहे. या वेदांपासूनच जगाची उत्पत्ति झाली असून हेच चराचर ब्रह्मांडास आधारभूत आहेत. या वेदमंत्राधारें शंभर यज्ञ करणाऱ्यास इंद्रपद प्राप्त होऊन तें यज्ञकर्मांनेंच स्थिर होतें. म्हणून इंद्रादिक देवांस इंद्रपद व देवपद देणारे आम्ही ब्राह्मण त्यांहून श्रेष्ठ आहों ! कैलासपतिसुद्धां वेदमंत्रांनींच स्थिर आहे. असें सर्वसामर्थ्य वेदांपाशीं असून त्यायोगें आम्ही पूज्य आहों. हे श्रेष्ठ वेद, शंकासुरानें चोरून नेल्यावेळीं श्रीविष्णूंनीं ' मत्स्यावतार ' धरून ते परत आणून त्यांचे भाग करून हा यागधर्म स्थापिला. म्हणून त्या वेदाधार कमळापतीची आम्ही मोठ्या भक्तीनें यज्ञमुखानें आराधना करितों. असें तुझ्या ईश्वरानें कोणाचें बरें केलें आहे ? उलट तो सर्वांचा संहार करीत चालला आहे. शिवाय तो अपरिमित तमोगुणी, निंद्याचरणी, ब्रह्मद्वेषी व अमंगळ आहे. म्हणून त्याला आम्ही हविर्भाग दिला नाहीं, व देत नाहीं. आणखी तुझा तो ईश्वर महाविषयासक्त असून सर्वदा स्मशानांत राहातो. लोकांत वैराग्याचा दिमाख दाखवून जटेंत गंगेसारखी सुंदरललना लपवून ठेवितो ! अशा भ्रष्टाला उत्तम कुलवान् व परमपवित्र अशी दाक्षायणी दिली. तिला याचें वर्तन सहन न झाल्यानें ती येथें न बोलावितां आली व अग्नींत दग्ध झाली याचा दोष आमच्याकडे तिळमात्र नसून तूं मोठ्या तोऱ्यानें येथें त्याचा जबाब विचारण्यास आला आहेस. व सर्वांचा संहार चालविला आहेस. तथापि त्या तुझ्या ईश्वरानेंच दक्षप्रजापतीस ' चिरंजीव ' पद दिलें आहे. आणि तें पद दक्षास मारून तूं खोटें करूं पाहातोस. या मूर्खपणाला

काय म्हणावें ? ' हें असंबद्ध निंदापर भाषण ऐकून वीरभद्र खवळून म्हणाला. ' अरे नीचा भार्गवा, हा सर्व तुझाच खेळ आहे. ब्राह्मणाधमा तुला वेदांचा महिमा व वर्म न कळतां तूं अविहित कर्म करीत आहेस व करवीत आहेस. ज्या परमात्म्याच्या कृपादृष्टीनें तुम्हांस हें ऐश्वर्य प्राप्त झालें, त्याला विसरून, दधीच्यादि महाऋषींनीं व श्रीविष्णूंनीं केलेला उत्तम उपदेश तुच्छ मानून तुम्ही मदोन्मत्त होऊन श्रीशंकरांशीं वैर करीत आहां, अरे, ब्रह्मदेवास ब्रह्मपद व श्रीविष्णूस विष्णुपद श्रीशंकरांनीं दिलें आहे. हें शिवसामर्थ्य नारायण जाणीत आहे. म्हणून तो नित्य सहस्र-कमलानें त्याची पूजा करित असतो. हा सर्व महिमा तूं जाणत असतांना तूं मूर्खासारखा बडबडत आहेस. आणखी अरे अधमा दक्षा, याच्या तंत्रानें वागून तूंही मदोन्मत्त बनलास, असो ज्या अर्थीं या यज्ञांत तुम्हीं सर्वांनीं आमचा अपमान केला आहे; त्यास्तव तुमचा तो उद्दाम-पणा घालविण्यास मला तुमचा शिरच्छेदन केला पाहिजे.'

## यज्ञमंडपांतील धुमाकूळ

असें बोलून क्रोधायमान झालेल्या त्या वीरभद्र गणेश्वरानें, श्रीशंकरांनीं पूर्वीं जसें त्रिपुर जाळून भस्म केलें त्याप्रमाणें उंच उंच शिखरें असलेला तो विस्तीर्ण यज्ञमंडप आपल्या तृतीय नेत्रांतील अग्नीनें जाळून उध्वस्त केला ! आणि शिवकिंकरांना मंडपांतील ऋषिगणांचा व देवदानवांचा समाचार घेण्यास आज्ञा केली. तेव्हां नंदी, भृंगी आदि शिवगण, काळ महाकाळादि भैरव आणि पिशाच्च, वेताळ, कात्यायनी इत्यादि सर्वांनीं मिळून त्या विशाल मंडपांत जो धुमाकूळ घातला तो वर्णन करून सांगणेंच अशक्य. ते वीरभद्राचे गणेश्वर पर्वतासारखे धिप्पाड होते. त्या सर्वांनीं लागलेच यज्ञस्तंभ उपटून ते ऋत्विजांच्या गळ्यांत लोढण्यांप्रमाणें घट्ट बांधून टाकले ! सर्व ऋषींचीं वस्त्रें हिरावून घेऊन त्यांच्या तोंडास काजळ फासून त्यांची अत्यंत विटंबना केली. स्वाहा, स्वधा यांची फजिती केली. यज्ञाची नाना प्रकारचीं भांडीं फोडून त्यांचा चक्काचूर केला. वस्त्रालंकारादिक सर्व सामानसुमान नदींत फेंकून दिलें. यज्ञशाळेंत उत्तमोत्तम

पक्कानांचे पर्वताप्रमाणें ढीग रचिले होते; अमृतासारख्या उत्तम दुधाच्या असंख्य घागरी भरून ठेविल्या असून चिखलासारखें घट्ट दही तेथें भरपूर ठेविलें होतें. तसेच दुसरे उंची मांसाचे पदार्थ, गोड व सुवासिक सरबतें, चाटून व चोखून खावयाचे नाना तऱ्हेचे पदार्थ अतोनात ठेविले होते. ते सर्व पदार्थ त्या पराक्रमी पिशाच-वेताळांनीं भराभर खाऊन टाकिले, व तोंडें वेडीं वांकडीं करून तेथील देव व ऋषिगणांस वेडावून दाखवूं लागले! व रिकामीं भांडीं याज्ञिकांवर भिरकावूं लागले. बलिष्ठ शिवगणांनीं आपल्या वज्र, चक्र, शूल, शक्ति, गदा, पट्टीश व मुसळादि आयुधांनीं तसेंच खड्ग, परशु, इत्यादि अनेक प्रकारच्या तीक्ष्ण शस्त्रांनीं तेथील अष्टदिक्पालादिक सर्व देवांस व ऋषींस मारूं, तोडूं लागले. तोडा, फोडा, फेंका, मारा, ठोका असे रागाच्या आवेशांत निघणाऱ्या क्रूर शब्दांनीं कानठळ्या बसून गेल्या! या पराक्रमी गणेश्वरांचें सामर्थ्य अचाट होतें, त्यामुळें त्यांनीं या धादलींत युद्धांतून पळून येऊन यज्ञमंडपांत दडून बसलेल्या इंद्रादिक मुख्य मुख्य देवांस इतका बेदम मार दिला कीं, त्याचें वर्णन ऐकतांच अंगावर शहारे येतील! कित्येक प्रमथगणांनीं आपल्या तीक्ष्ण आयुधांच्या टोंकांवर देवांस उचलून धरून त्यांच्या अंगाचें कातडें सोलून त्यांना आकाशांत फेंकूं लागले! रुद्रगणांनीं मांडलेला हा भयंकर धुमाकूळ पाहून व स्वतांही भरपूर मार खाल्ल्यानें घाबरून जाऊन इंद्रादि प्रमुख देव व अष्टदिक्पाल वाट फुटेल तिकडे पळूं लागले. त्या पळपुट्या देवांकडे पाहून वीरभद्र रागानें फार खवळला. आणि सर्व देवांची शक्ति एका क्षणांत नाहींशी करून टाकणारा भयंकर शूल हातीं घेऊन तो त्यांच्या अंगावर धांवून गेला आणि मदोन्मत्त हत्ती जसें सरोवर खळबळून सोडितो तसें संतप्त झालेल्या वीरभद्रानें सर्व देवसमुदायास हैराण करून सोडिलें. जेव्हां तो कृतांताप्रमाणें देवांचा संहार करीत निघाला तेव्हा भयानें गर्भगळित झालेल्या देवांना हजारों वीरभद्र आपल्या भोंवतीं फिरतात कीं काय असें वाटूं लागलें. यावेळीं भद्रकाळीही क्रुद्ध झाली होती. ती हातांत ज्वालासमान तेजस्वी खड्ग घेऊन देवांना चराचर कापून काढूं लागली.

तिचा तो पराक्रम पाहून तर वीरभद्रास आणखी त्वेष चढला. त्यानें परशूनें सूर्याचा उजवा हात तोडून सर्व दांत पाडून त्याचे डोळे फोडिले आणि डाव्या पायाच्या लाथेनें त्याला दूर झुगारून दिलें! अग्नीवर तरवारीचा भयंकर वार केला. यमाला पट्टीशांनीं प्रहार केला. वळकट परिघांनीं निर्ऋति देवावर हल्ला करून, वरुणासह त्याचा अगदीं मोड केला. वायुदेवाला तर लीलेनें उभें चिरलें! नंतर वीरभद्रानें नखानें सरस्वती देवी व अदितीच्या नाकांचे शेंडे कापून, स्वाहा देवीचे स्तन तोडिले. आणि ज्यांच्या ज्यांच्या जिभा दक्षयज्ञांतील हविर्द्रव्य (पायस) चाखून मिटक्या मारीत होत्या त्या सर्व कापून काढिल्या. चंद्राला तर आंगठ्यानें चेंडूप्रमाणें चेंगरला! यावेळीं वीरभद्राकडील सर्व वीर कल्पांतकाळच्या मेघांप्रमाणें भयंकर गर्जना करीत होते. या भयंकर हल्ल्यांत दक्षाकडील सेना अतिशय जाया झाली. यज्ञमंडपांत तर रक्ताचे इतके मोठे पूर वाहूं लागले कीं, त्या पुरांत कित्येक हत्ती, घोडे वाहून गेले! अस्थिमांसाचा सर्वत्र चिखल झाला.

या धांदलींत तिकडे कित्येक गणांनीं, देवांना राहाण्याकरितां बांधिलेल्या वाड्यांच्या भिंती पाडिल्या व खिडक्या, दारें, उपटून पाण्यांत फेंकून दिलीं त्यावेळीं त्या वाड्यांत राहाणाऱ्या स्त्रिया निराश्रित होऊन मोठमोठ्यानें आक्रोश करूं लागल्या. याच संधीस भद्रकाळीच्या आज्ञेनें त्या स्त्रीसमुदायांत संन्निपातादि महाज्वर घुसले, त्यामुळें त्यांची दैना उडून गेली. सन्निपात ज्वरानें झपाटलेल्या स्त्रिया आपापसांत एकमेकांस मारूं, चावूं व झगडूं लागल्या. अंगावरील वस्त्रें फाडून घेऊन इतस्ततः धावूं लागल्या. कित्येक तापानें आरडूं ओरडूं लागल्या, तर कित्येक कण्हूं लागल्या. त्यांची ती भयंकर विटंबना पाहून सर्व देव व ऋषि दिङ्मूढ झाले. त्यांनीं हा सन्निपात निवारण्यासाठीं अश्विनी देवांची प्रार्थना चालविली; परंतु त्यांचीही शिवगणांनीं फटफजिती केली असल्यानें चंद्रानें सर्व देव; ऋषि यांना जमवून कश्यप व मरिची या ऋषीद्वयांना पुढें करून श्रीवीरभद्राचीच प्रार्थना करून सर्वांस जीवदान मागितलें. तेव्हां वीरभद्रानें ती

देवस्त्रियांची विटंबना थांबवून देवादिकांस म्हटलें, 'तुम्ही दक्षानुमतें दाक्षायणींची विटंबना केली व पाहिली करितां तुम्हांस ही पिशाचावस्था प्राप्त झाली. यास्तव त्य आदिशक्तीचीच भक्ति करा म्हणजे सुख पावाल.' ही वीरभद्रवाणी श्रवण करून पुष्कळ देवांनीं आपापल्या प्रियासह जीव बचावल्याचा आनंद मानून पलायन केलें.

इकडे कित्येक गणेश्वरांनीं अरिष्टनेमि, सोम, धर्म, प्रजापति, अंगिरा, भृशाश्व इत्यादि अनेक महान् ऋषींच्या गळ्यांत एकेक दावें बांधून त्यांना खूप मार दिला, कित्येकांस झाडांस उलटें टांगून खरपूस चोप दिला, व मर्मभेदक निंदा केली. भूतवेताळांनीं त्या ऋषींच्या स्त्रियापुत्रांचे कपडे-लत्ते व दागदागिने हिसकून घेऊन त्यांची मागें सांगितल्याप्रमाणें अत्यंत छळणूक केली. त्यामुळें तेथें सर्वत्र दुःखानें गांजून गेलेल्या स्त्रीपुरुषांचा कर्ण-कटु आक्रोश ऐकूं येऊं लागल्यानें ती यज्ञभूमि स्मशानाप्रमाणें भयाण दिसूं लागली! शूलांच्या दणक्यांनीं तेथें कोणाचे हात तुटले, तर कोणाच्या मांड्या मोडल्या, कोणांचीं डोकीं फुटलीं तर कित्येकांचीं शिरें तुटून तीं धुळात पडलीं. अशा रीतीनें ते हजारों देव व ऋषि दुर्दैवानें धूळ खात पडल्या-नंतर तो क्रुद्ध झालेला वीरभद्र तत्काळ आवहनीयाच्या अंगावर धांवून गेला. हा प्रळयभैरव, घोरकर्मा प्रतापी वीरभद्र आपल्यावर चालून येत आहे असें पाहाताच आवहनीय यज्ञ मरणाच्या भयानें हरणाचें रूप घेऊन पळूं लागला. तेव्हां आकर्णप्रत्यंचा ओढिलेलें भयानक धनुष्य हातीं घेऊन वीरभद्र त्याच्या पाठीस लागला व एका अर्धचंद्राकृति अमोघ बाणानें त्या हरणरूपी आवहनीयाचें डोकें उडविलें. यज्ञपुरुषाची ही दुर्दशा पाहून यमधर्म रागानें वीरभद्रावर चालून आला. त्याला एकाच दिव्य बाणानें त्यानें यमसदन दाखविलें!

## [ १२ ] दक्षवध व महायज्ञाची पूर्णाहुति.

याप्रमाणें सर्व सैन्याचा संहार होऊन, ऋषीजनांची त्यांच्या परिवारासह भयंकर दुर्दशा झालेली पाहून स्वतः युद्धांत गेल्यावाचून जयप्राप्ति अशक्य

युद्धाची समाप्ति व्हावयाची नाहीं. असा विचार करून दक्षप्रजापतीनें यज्ञ-दीक्षा विसर्जन केली, व वीरवेष धारण केला तेव्हां सुमति नामक सुज्ञ पुरोहितानें त्यास म्हटलें, ' राजाधिराज, जोंपर्यंत पुष्कळ सैन्य व सरदारांचा पाडाव झाला नाहीं तोंपर्यंत राजानें स्वतः युद्धांत मिसळूं नये; आणि शेवटीं आपणांस जाण्याचा प्रसंग आलाच तर शत्रूंचें म्हणणें मान्य करून तह करावा; व आपल्या प्राणाचें रक्षण करावें असा राजधर्म आहे. ' यावर दक्षानें उत्तर केलें ' आतां सर्व सैन्याचा संहार होऊन सर्व देव व ऋषि-गणांची इतकी दुर्दशा होत असलेली पाहात असतांही मानी पुरुषास लाज आणणारा असा स.म करणें शक्य नाहीं. तशांत शिववीर महाप्रबळ आहेत; तेव्हां मी स्वतःच गेल्यावांचून युद्धाचा सोक्षमोक्ष होणार नाहीं. ' असें ह्मणून तो समरांगणांत युद्धास ठाकला.

## श्रीवीरभद्र-दक्षाचा घनघोर रणसंग्राम.

दक्षप्रजापति पुढें झाला हें पाहून वीरभद्र पुढें सरसावला. त्यास समोर आलेला पाहतांच दक्ष तुच्छतेनें ह्मणाला, ' सूर्यावर पतंगानें झडप घालावी किंवा मदोन्मत्त हत्तीनं सिंहावर हल्ला चढवावा; तशी तुझी गत झाली आहे. आतां हां हां ह्मणतां या तुझ्या भूतावलीचा मी फडशा पाडितों पाहा. ' असें बोलून मोठ्या शौर्यानें तो वीरभद्रावर चालून गेला. महा-प्रतापी धैर्यमेरू वीरभद्र यत्किंचित् न डगमगतां मोठ्या इर्षेनें दक्षावर दिव्य बाणांचा वर्षाव करूं लागला. आणि अनेक मर्मभेदक शस्त्रप्रहार केले. तथापि पुष्कळ काळपर्यंत दक्षप्रजापति मुळींच हटेना. यावेळीं सर्व रुद्रगणांनींही चोहोंकडून दक्षावर तीक्ष्णबाणांचा मारा केला. तथापि तो बाणजाळ तोडून दक्षानें ब्रह्मदेवानें मोठ्या प्रेमानें आपल्यास दिलेल्या असाधारण बाणांचा रुद्रगणांवर वर्षाव केला. या दिव्य बाणांनीं त्रिभु-वन कंपायमान झालें. त्यांच्या तेजानें रविशशि लोपून गेले ! यांयोगें असंख्य रुद्रगणांचा संहार झाला. इतक्यांत एक तीक्ष्ण बाण वीरभद्राच्या वक्षस्थलावर मारून दक्षानें त्यास भयंकर जखम केली. तेव्हां वीरभद्र प्रळयकाळासारखा संतप्त झाला व त्रिशूलाचा भयंकर मारा करून दक्ष-

बाणांचें निवारण केलें. आणि लागलेंच त्यानें त्याचे सारथी व रथाचे घोडे ठार करून त्याचीं शस्त्रास्त्रें मोडून त्यास निःशस्त्र केलें. तेव्हां दक्ष-प्रजापति पादचारी होऊन गदा घेऊन वीरभद्रावर आवेशानें धांवला. इत-क्यांत शूलाच्या प्रचंड दणक्यानें वीरभद्रानें ती गदा मोडून टाकिली. आणि आपल्या भयंकर गदेनें दक्षाच्या नाभिप्रदेशीं तडाखा मारून तो त्याच्या अंगास जाऊन भिडला. तेव्हां दोघांचें तुमुल मल्लयुद्ध चाललें. त्यांत वीरभद्रानें एक जोराची लाथ मारून दक्षप्रजापतीस भूमीवर पाडिलें. नंतर त्याच्या उरावर बसून अत्यंत क्रोधानें त्याचे पाय मुरगाळून ते खां-द्यावर घातले. आणि खड्गाचा वार करून मस्तक तोडणार तोंच आकाश-वाणी झाली कीं, ' हा दक्ष अमर असून श्रीविष्णूचा वरदपुत्र आहे. पण वैराग्नीनें संतप्त झालेल्या वीरभद्रानें त्या आकाशवाणीवर बिलकूल भरंवसा ठेविला नाहीं. कारण ब्रह्मकल्पीं ब्रह्मदेवाचा व महाकल्पांतीं श्रीविष्णूचाही क्षय होतो. तेव्हां त्यांची प्रसन्नता कोठवर टिकाव धरील? असा विचार करून खड्गाच्या एकाच घावानें दक्षाचें मस्तक धडापासून वेगळें केलें! तेव्हां प्रळयकाळासारखा भयंकर कडकडाट झाला! आणि आकाशमंडळ दणाणून गेलें! इतक्यांत तें शिर हातीं घेऊन तो प्रळयरुद्र वीरभद्र वीरा-वेशानें समरांगणावर नाचूं लागला! व भद्रकाळीशीं त्या शिरानें लीलेनें चेंडू खेळूं लागला! शेवटीं प्रळयाग्निमुखीं त्या शिराची पूर्णाहुति दिली! त्या महायज्ञकुंडात दक्षशिराची पूर्णाहुति टाकितांच तो अग्नि भयानें थरथर कांपूं लागला. पण वीरभद्रानें त्यास अभय देऊन ती आहुति पूर्ण केली. असा तेथें थोर अनर्थ झाला. हें अचाट कर्म पाहतांच दिक्पाल दशदिशा पळून गेलें.

इकडे दक्षाचा शिरच्छेद होतांच त्याच्या पत्नीनें दुःखानें जो टाहो फोडिला तो ऐकून पाषाणालाही द्रव फुटला असता; परंतु त्या भयंकर रणगर्जनेंत तिकडे कोणाचें लक्षच गेलें नाहीं. दक्षप्रजापति पडतांच शिव-सेनेनें आनंदानें जयघोष केला. वीरभद्रानें दक्षाचा शिरच्छेद केला तेव्हां पडलेलें रक्त श्रीविष्णूच्या आज्ञेनें वरुणानें नेलें. दाक्षायणीच्या शापानें तें

दगडाप्रमाणें घट्ट झालें होतें. पुढें तें कश्यप ऋषीच्या प्रणेत्रा नामक स्त्रीनें भक्षण केलें, त्यापासून तेजस्वी हिमाचलाची उत्पत्ति झाली व या हिमाचलापासून त्याच्या मेनका नामक स्त्रीच्या पोटीं कांहीं काळानें दाक्षायणी ही पार्वती नांवानें उत्पन्न झाली तिनें श्रीशंकराची आराधना केली व ती त्याचीच अर्धांगी झाली. असो. दक्षप्रजापतीच्या शिराचा होम झाला. पण त्याचें पर्वतप्राय धड तेथेंच पडलें होतें. तें मांडीवर घेऊन त्याची पतिव्रता स्त्री प्रसूति ही शोक करीत तेथेंच बसली. तिलासुद्धां भद्रकाळीनें यावेळीं पुष्कळ त्रास दिला.

## १३ गुग्गुळाची उत्पत्ति

यज्ञकर्त्या यजमानाची अशी भयंकर दुर्दशा होतांच त्याच्या सर्व सैन्याची पळापळ झाली. त्यावेळीं त्या ठिकाणीं जे देव, दानव शेष राहिले होते, त्यांना पळतां भुई थोडी झाली. यज्ञभूमीवर जिकडे तिकडे रक्ताचे पूर वाहूं लागले. आणि भयंकर उत्पात झाले! काय दुर्दैवाचा फेरा पाहा. हा यज्ञ किंवा याचा कर्ता दक्षप्रजापति सामान्य नव्हे. दक्ष हा प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचा मानसपुत्र. श्रीविष्णु स्वतः या यज्ञाचा संरक्षक आणि यज्ञभाग घेण्याकरितां ब्रह्मा, इंद्रादिक देव स्वतः येथें आले होते. असें असतांना यज्ञकर्ता व ऋत्विज यांचीं डोकीं फुटून हा यज्ञ कर्त्यालाच मारक व्हावा ना ? हा विलक्षणच शेवट झाला म्हणावयाचा! यासाठीं मनुष्यानें उन्मत्तपणानें कोणतेंही वेद–विरुद्ध कर्म करूं नये, व ईश्वरी आज्ञेबाहेर वागूं नये. शेंकडों यज्ञ करून पुष्कळ पुण्यसंग्रह केला असला तरी, अज्ञानी जनांच्या सल्ल्यानें पारमेश्वरी सत्तेचें उल्लंघन केलें व त्याची भक्ति केली नाहीं तर त्याचें असें कटु फळ भोगावें लागतें! उलट अतिपापी मनुष्यही उपरति होऊन शिवभक्ति करूं लागला तर तो सर्व पापांपासून मुक्त होतो. जो पातकी सर्वदा शिवनिंदा करीत काळ कंठितो; त्याचें दान, तप, होम, हवन हीं सर्व व्यर्थ आहेत यांत तिळमात्र संदेह नाहीं. अशीच स्थिति दक्षाची झाली. असो.

वरील भयंकर युद्धांत अनेक जखमांनीं अंग रक्तबंबाळ झालेले जे थोडे बहुत देव-दानव व ऋषि जिवंत राहिले होते; ते त्या प्राणांतिक संकटानें अगदीं घाबरून गेले होते. तरी अशा निर्वीर्य झालेल्या देवादिकांच्या मुसक्या बांधून आणण्याकरितां वीरभद्रानें अनेक शिवगण पाठविले. त्यांनीं त्या निस्तेज बनलेल्या सर्व देव-दानवादिकांना पकडून ज्याचा जसा अपराध असेल त्याप्रमाणें त्यांच्या हातापायांत अगर गळ्यांत लहान मोठ्या वजनाच्या मजबूत लोहशृंखला अडकविल्या. नंदिकेश्वरानें भृगु, भग वगैरे ऋषींना युद्धप्रसंगीं पकडून अटकेंत ठेविलें होतें. त्यांपैकीं भृगूची दाढी उपटून भगाचे डोळे काढिले व पूषाचे दांत पाडून इंद्रादिक ज्या ज्या देवांनीं श्रीशिवाला वगळून अवदानें भक्षिलीं होतीं त्यांना झाडांस उलटें टांगून तीं ओकावयास लाविलीं ! तीन्ही यज्ञकुंडांचा विध्वंस केला. यावेळीं देवदानवांला मारून रक्त, आस्थि, वसा, मज्जा इत्यादिकांनीं न्हालेल्या व स्वतःस झालेल्या अनेक लहान मोठ्या जखमांमुळें रक्तबंबाळ होऊन गेलेल्या वीरभद्राचें स्वरूप इतकें भयंकर व क्रूर दिसत होतें कीं, त्यापुढें कल्पांतींचा काळभैवरही फिक्का पडला असता ! या वेळीं वीरभद्रानें धारण केलेलें वाघाचें कातडें मुळचेंच चित्र विचित्र रंगाचें होतें. त्यावरून हे रक्त, मांस, मज्जेचे जेव्हां ओघळ वाहूं लागले, तेव्हां फारच विचित्र व भेसूर शोभा दिसूं लागली ! व त्याकडें कोणाच्यानेंही पाहवेना.

दक्षसंहाराच्या वेळीं वीरभद्रास जो रणमद चढला, तो त्याच्या शिराची पूर्णाहुति देऊनही शांत होईना. देव, दैत्य, दानव, मानव यक्ष, गंधर्वादिकांची सेना जमीनदोस्त होऊन, सर्व शत्रु पूर्ण हतबल झाले, रणभूमीवर सर्वत्र अस्थिमांसाचा खच पडला, तथापि अद्यापही, कोणास फाडूं, कोणास तोडूं, कोणास झोडूं व कोणास रगडूं अशी भयंकर गर्जना करीत रणांगणावर तो रौद्रमूर्ति वीरभद्र इतस्ततः भ्रमण करूं लागला ! इकडे पिशाच्च वेताळादिकांनीं यज्ञाचा पूर्ण विध्वंस केला. यावेळीं या विराट कृत्यानें वीरावेश चढलेले कित्येक रुद्रगण अत्यंत बेफाम होऊन दंगल करूं लागले. तें पाहातांच भैरव व वेताळ-पिशाच्चांना आणखी स्फुरण-

चढलें ! त्यांनीं हातांत यज्ञाचीं फुटकीं भांडीं घेऊन त्यांत यज्ञकुंडांतील रसरशीत अग्नि भरून घेतला. आणि त्या कपऱ्या डोक्यावर ठेवून घेऊन यज्ञभूमीवर ते भैरवादिक थैमान करूं लागले ! कित्येक यज्ञकुंडांतच नाचूं लागले तर आणखी कित्येकांनीं एकमेकांवर अग्निकणाचा ( धगधगीत इंगळांचा ) वर्षाव चालविला ! यामुळें त्या यज्ञभूमीवर सर्वत्र अग्निप्रळय झाला ! अशा प्रकारें फुटक्या कपऱ्यांतून तो मंत्राग्नि घेऊन जेव्हां विलक्षण हौसेनें ते सर्वजण वीरभद्राभोंवतीं नाचूं लागले. तेव्हां ती अग्निवर्षावानें होणारी यज्ञचेष्टा पाहून क्रोधमूर्ति वीरभद्रास मोठा संतोष झाला ! व अत्यंत हौस वाटली. या अग्निवर्षावानें आपल्या प्रतापी सेनानायकास हर्ष होतो असें पाहातांच असंख्य शिवगणांनींही तोच मार्ग अनुसरला. त्यांनीं तेथें यज्ञमंडपांत फोडून टाकिलेल्या हजारों फुटक्या भांड्यांच्या मोठमोठ्या खापऱ्या हातांत घेऊन त्यांत अग्नि भरून घेतला आणि वीरभद्रासभोंवतीं विलक्षण रीतीनें थैमान केलें ! कित्येक यज्ञकुंडांतच उतरून इकडे तिकडे धावूं लागले; तर कित्येकजण विस्तवाचे निखारे सभोंवतीं उधळूं लागले. अशा प्रकारें हा अग्नीचा खेळ जसजसा जोरांत येऊं लागला तसतसा वीरभद्रास अत्यानंद झाला ! उग्रमूर्ति वीरभद्रास शांत व आनंदित करण्याकरितां या असंख्य शिवगणांनीं यावेळीं हा जो दक्षयज्ञाची कुचेष्टा करणारा अग्नीचा भयंकर खेळ केला, तोच सांप्रतकाळीं वीरभद्राकरितां काढण्यांत येणाऱ्या गुग्गुळाचें व अग्नींतून जाऊन अग्निदिव्य (अग्गी) करण्याचें मूळ कारण होय. रौद्रस्वरूपी वीरभद्राला प्रसन्न करण्याची ही एक पुरातन रूढीच होय. म्हणून सध्यां ज्या ज्या घराण्यांचा वीरभद्र हाच कुलदैवत आहे, त्यांच्या घरीं प्रत्येक वर्षी किंवा निदान दीक्षा-उपनयन विवाहादि प्रमुख संस्कारांच्या वेळीं तरी गुग्गुळ काढून अग्निदिव्य केलेंच पाहिजे असा प्रघात आहे. त्याशिवाय कुलस्वामी श्रीवीरभद्र प्रसन्न होत नाहीं, असा दृढ समज आहे; तो याच करितां होय. अर्थात् अशा गुग्गुळसमारंभांत अवश्य उधळला जाणारा तांबडा गुलाल हा वरील भयंकर संग्रामांतील रक्ताचा दर्शकच होय. असो.

येथें भाविक वाचक कदाचित् अशी शंका घेतील कीं, जो यज्ञ शिव-निंदकानें शिवनिंदेनें प्रेरित होऊन केला होता, तोच यज्ञाग्नि श्रीवीरभद्र-देवाचा कोप कसा शांत करिता झाला, याला उत्तर इतकेंच कीं, जो यज्ञाग्नि श्रीशिवाला वगळून प्रज्वलित होऊन श्रीवीरभद्ररूपीं महादेवाचा क्रोधानल भडकण्याला कारण झाला होता तोंच जेव्हां जगन्माता दाक्षायणीचें यांत पवित्र भस्म आहे, म्हणजे श्रीशिवाला आपल्या स्वतःच्या पवित्र देहाची आहुति देऊन तिनें या यज्ञाग्नीला पावन करून शिवगणांच्या दृष्टीनें पूर्ण केला होता, म्हणून तो पवित्र अग्नि शिवगणांनीं आपल्या मस्तकावर धारण केला. अशा रीतीनें तो अग्नि शिवनामगजरांत श्री-शिवाप्रीत्यर्थंच झाला तेव्हां त्या योगानें श्रीवीरभद्रदेवाचा क्रोधानल शांत झाला, आणि असें होणें स्वाभाविक आहे, कारण त्या यज्ञाग्नींत दक्षप्रजापतीचा धुमसणारा द्वेष दग्ध होऊन जाऊन शिवगणांचा हर्ष मिसळला म्हणून तो पूज्य झाला.

या ठिकाणीं दुसरी अशी शंका उत्पन्न होते कीं, त्या यज्ञाग्नींत श्रीशिव-निंदक दक्षप्रजापतीच्या मस्तकाचा होम झाला होता, मग तो शिवगणांनीं पवित्र कसा मानिला ? तर हा होम शिवगणांनीं शिवाज्ञेनें श्रीशिवा-प्रीत्यर्थंच केला होता. असो.

अशा तऱ्हेनें दक्षयज्ञनाशानंतर शिवगणांनीं श्रीवीरभद्रदेवास संतुष्ट करण्याकरितां फुटक्या कपऱ्यांतून पूज्य भावानें मस्तकावर वाहून केलेला आनंदोत्सव हाच सांप्रतकाळीं विवाह वगैरे समारंभांत निघणाऱ्या गुग्गु-ळाचें मूळ कारण होय. दक्षप्रजापतिकडील लोकांच्या दृष्टीनें जरी ती त्यावेळीं कदाचित् चेष्टा समजली गेली असली, तथापि शिवगणांच्या दृष्टीनें तो पवित्र प्रसंगच होता. म्हणून त्यावेळेपासून ही चाल हिंदुधर्मांतील कांहीं पंथामध्यें आपापल्या कुलदेवतेच्या संतोषार्थ करण्याचा प्रघात पडला आहे. आणि शिवगणांनीं त्याकाळीं तो यज्ञाग्निं मस्तकावर धारण करून

तो समारंभ साजरा केला म्हणून त्यास ' शिरोव्रत ' हें नांव जास्त शोभतें. याच मूळ हेतूनें गुग्गुळाची चाल प्रचारांत आली असली पाहिजे; म्हणून ज्यांच्यांत ही गुग्गुळ काढण्याची चाल आहे [ मग तो गुग्गुळ कोणत्याही देवतेप्रीत्यर्थ असो ] ते, श्रीवीरभद्रावताराची स्मृति उत्पन्न करणाऱ्या, त्यानें केलेल्या दक्षमख–विध्वंसनाचें दर्शक अशा, मातीच्या फुटक्या घागरींतून, म्हणजे त्या कृत्याचें अधिष्ठान ठेवूनच आपापल्या कुलदेवतेप्रीत्यर्थ काढीत असतात. मात्र हा काढण्यांत येणारा गुग्गुळ गांवाबाहेर गेल्यानंतर भक्त जनांच्या कुलदेवतेचें क्षेत्रस्थान ज्या दिशेकडे असेल त्यादिशेकडे मुख करून, प्रार्थना केल्यानंतर हव्यद्रव्यांनीं प्रज्वलित केलेला हा मंत्राग्नि दुग्ध-सिंचनानें शांत केला जातो.

त्या युद्धानंतर अग्निप्रळयाचा हा समारंभ ज्या दिवशीं झाला तो फाल्गुन मासांतील शुक्ल पौर्णिमेचा दिवस असावा, म्हणून हल्लीं फाल्गुन शु॥ पौर्णिमे ( होळीपौर्णिमे ) दिवशीं श्रीवीरभद्रदेवाच्या क्षेत्र–स्थानांत विशेषतः यड्डूर क्षेत्रांत येऊन गुग्गुळ काढून अग्नि करणें फारच पुण्यप्रद समजतात; त्या कारणानें कित्येक सद्‌गृहस्थ दर वर्षी त्या दिवशीं यड्डूर क्षेत्रांत येऊन मुद्दाम मोठ्या उत्साहानें सध्यां गुग्गुळ काढीत असतात.

या गुग्गुळ काढण्याच्या प्रकारांत सांप्रत कित्येक ठिकाणीं बरेच छानछोकीचे प्रकार शिरले आहेत. म्हणजे रात्रीं बेरात्रीं, अचकट विचकट लावणी पदें म्हणत, किंवा नुसतें वेश्येचें नाच–गाणें करवीत ऐषआरामानें काढीत असतात हें योग्य नव्हे.

## [१४] श्रीशंकराचें यज्ञभूमीस आगमन.



वर सांगितल्याप्रमाणें वीरभद्राचा कोप जरा कमी झाला व तो स्तुति ऐकून घेण्याइतका शांत झाला. तें पाहून त्याला प्रसन्न करण्यास सर्व देव पुढें झाले व साष्टांग नमस्कार करून हात जोडून म्हणाले,–'हे परमेश्वरा, तुला आम्ही फार भ्यालों असून शरण आलों आहों, तरी शरणागतांचें

रक्षण करून आमची आपत्ति दूर कर.' ही देवांची दीनवाणी ऐकून वीरभद्राचा कोप किंचित् शांत झाला. आणि त्यानें भूतावळीस व आपल्या गणांस आज्ञा करून देवादिकांच्या संकटाचें निवारण केलें. अशा रीतीनें त्रैलोक्यांत अद्वितीय विजय मिळवून तो वीरभद्र कृतार्थ झाला! इकडे यज्ञसमाप्ति होऊन देव—दैत्यांचा पराजय झाला. आणि सर्व भूभार हलका झाला. ब्रह्मा, विष्णुआदिक देव आकाशमार्गें आपापल्या लोकीं निघून गेले. तेव्हां इंद्रादिक सर्व देवांना अत्यंत काळजी वाटून ते सत्यलोकीं ब्रह्मदेवाकडे जाऊन म्हणाले—'आतां आम्हांस सुखानें स्वर्गवास कसा घडेल? कारण वीरभद्रानें देव, दैत्य, दानव, चंद्र, सूर्य, ग्रहांचा पराजय करून नक्षत्रें व तारका स्थानभ्रष्ट केलीं. आणि यज्ञकर्त्या प्रजापतीस ठार मारून यज्ञभंग करून देवांना उपाशी मरण्याची पाळी आणिली. शिवाय ईश्वरक्षोभामुळें उत्पन्न झालेले त्याचे जे अगणित शिवगण उभयलोकीं पसरले आहेत. ते ऋषिवरांचें क्रियाकर्म व नेमधर्म चालूं देत नाहींत.' हें देवांचें भाषण ऐकून विधात्यास परम चिंता वाटली व तो सर्व देवांसह कैलासभुवनीं आला. तेथें श्रीशंकर दक्षवध करण्यास पाठविलेल्या वीरभद्राचा पराक्रम पाहून आनंदभरित होत्साते बसले असतां, त्यांना सर्व देव पराभव पावून आपल्याकडे आल्याचें वृत्त समजलें. इतक्यांत ब्रह्मदेव पुढें होऊन प्रार्थना करूं लागला कीं, 'हे देवाधिदेवा कर्पूरगौरा, मी पुत्रशोकानें पीडित झालों आहे. तरी यां संकटापासून माझें रक्षण कर. व सर्व देवांचीही काळजी दूर कर. तूं परंज्योतिरूप, परब्रह्म, जगदानंदकारक असून, गो-द्विजांचा संरक्षक अशी तुझी बिरुदावळी आहे; मग दक्षवध करून मला दुःखी कां केलेंस? महादेवा, भयंकर अपराध केलेले पापी जनसुद्धां तुला शरण येतांच त्यांचें संकट नष्ट करून तूं अभय देतोस; असा तुजसारखा सदय, दीनजनोद्धारक दुसरा कोण आहे? तरी वीरभद्राचा कोप शांत करून आम्हांस भयमुक्त कर व आमच्या योगक्षेमाची घडी नीट बसवून दे.' हा करुण धांवा ऐकून सर्वांकडे अवलोकन करून जगदीश्वर श्रीशिव म्हणाले 'पितामह, काळाचा महिमा अगाध असून सर्व दृष्ट पदार्थ नश्वर आहेत. काळ, कर्म

व ईश्वर हें एक विचारानें चालत असून काळाचा साक्षी सर्वेश्वर आहे. तथापि बिंदूप्रमाण पुण्य करून समुद्रप्राय फळ मिळावें किंवा उलट तिळ-तुल्य दोषानें पर्वतप्राय दुःख भोगावें असा हा कर्माचा विचित्र खेळ आहे! यास्तव दक्षयज्ञाचा नाश त्याच्या कर्मानेंच झाला. अन्यायाचें फळ केव्हांही भोगिलेंच पाहिजे. हें तूं जाणतोस. श्रीविष्णु आदिदेव व ऋषिश्रेष्ठांनीं केलेला बोध न ऐकतां त्यानें शिवनिंदा केली. तो कर्मनिष्ठ असून वेदाभिप्राय जाणूनही अन्यायानें वर्तला. वेदविहितकर्मानें शाश्वत शुद्धज्ञान होतें तर वेदाविरुद्ध वर्तणूक केली असतां त्यास काळ दंड करितो. सर्व यज्ञांची भोगशक्ति आदिमाया दाक्षायणी हीच होय; अशी श्रुति निश्चयानें सांगत असतांना त्या मंदमति दक्षानें तिला दुखविलें, म्हणून तिनें अग्नींत देह-पतन केलें. तेंव्हांच नारायणानें सर्वांचा प्रळय होईल हें ताडिलें. त्या काळीं मला महाक्रोध आला. या अनिवार क्रोधानें भूतांचा महाप्रळय झाला. तथापि कमळाकांतानें दूरदृष्टीनें माझा क्रोध स्वसामर्थ्यानें पुष्कळ कमी केला म्हणून तुमचें दर्शन झालें. एरव्हीं एकट्या दक्षाच्या अन्यायानें सर्वांना मरण प्राप्त होणार होतें. यांत जे अन्यायच न्याय समजून वर्तत होते ते सर्व असुर आपल्या कर्मानें नष्ट झाले. दधीच्यादि सात्विक ब्राह्मणाचा अव्हेर करून त्यांना क्षोभविल्यानें या अनर्थांत भर पडली. आतां तुम्हीं शरण येऊन विनंति करीत आहां, तरी देवहो, आतां तुम्हीं भिऊं नका. आमचा कोप झाला कीं, तुमचें रक्षण करणारा त्रैलोक्यांत कोणी नाहीं हें समजून आलें. आतां मृत्युलोकीं श्रीविष्णुसन्निध जाऊन पुढील व्यवस्था करूं.' असें म्हणून ब्रह्मा, देवेंद्रादि सर्व देव व सनकादिक ऋषिमंडळासह श्रीशंकर मृत्युलोकीं कृष्णातिरीं जेथें श्रीविष्णु राहिले होते तेथें विमानांतून तत्काळ आले. तें श्रीविष्णूचें निवासस्थान म्हणजे जेथें दक्षप्रजापतीनें महायज्ञ केला त्या स्थानापासून उत्तरेस दोन हजार धनुष्य (सुमारें ४ मैल) अंतरावर असलेलें प्रजास्थान अर्थात् हल्लींचें खिद्रापूर येथील प्रख्यात असें—

**श्रीकोपनाथाचें देवालय**

होय. तेथें भूगोलचक्रांकित सूत्र साधून चित्रविचित्र शिळाखंडांनीं हें

देवालय बांधिलें आहे. येथें दिग्गजांचें (हत्तींचें) भूमीस टेंकण असून त्यावर चक्राकृति देवालय आहे. तेंच विष्णुपूजास्थान होय. द्वारप्रदेशीं स्थूलदेही जय विजय हे द्वारपाळ असून स्वर्गद्वारीं अष्टदिक्पाल उभे आहेत. त्या स्वर्गद्वारीं विमानयानांत तेहतीस कोटी देवगणांची स्थापना झाली आहे! पूर्वेस ऐरावतारूढ वज्रधर सुरेश्वर इंद्र शचीसह शोभतो. आग्नेयकोनीं स्वाहा स्वधा, या स्त्रियांसह मेषवाहन हुताशन आहे. तो अग्निदेव सात हात, दोन शिरें, व शृंगयुक्त,आहे. दक्षिणेस काळदंडधारी महिषारूढ यमधर्म स्त्रियांसह उभा आहे. नैऋत्यकोनीं आपल्या नैर्ऋति स्त्रीसह राक्षसारूढ निऋति शस्त्रांसह शोभतो. यम निऋतिच्या मध्यभागीं हंसारूढ षण्मुख उभा आहे. कार्तिकमासीं कृत्तिका नक्षत्राचा योग असतां जो शिवभक्त याचें दर्शन घेतो तो सप्तजन्म वेदपारंगत ज्ञानी व धनाढ्य द्विज होतो. हा योग पौर्णिमेदिवशीं आल्यास अत्यंत पुण्यकारक होय. त्या दिवशीं कार्तिकस्वामीचें दर्शन केल्यास पुनर्जन्म नाहीं. हा कार्तिक-कृत्तिका-योग तीन वर्षें साधल्यास तो पूर्ण होतो. त्या योगें उत्तम गति प्राप्त होते. पश्चिमेस वारुणीसहित मकरवाहन वरुणराजा वरुणपाश धरून उभा आहे. वायव्यदिशेस शशकारूढ वायु आपल्या शक्तिस्त्रीसह सशस्त्र उभा आहे. तसेंच उत्तरेस धनपति नरवाहनारूढ कुबेर स्त्रियांसह सवाहन स्थित आहे. आणि ईशान्यकोनीं गंगेसहित नंदिवाहन शिवभवानी दिसतात. असे अष्ट दिक्पाल तेथें असून हें कैवल्यपदप्राप्तिदायक सुंदर देवालय रचून त्यांत लोक नारायणाची आराधना करीत. युद्धांत पराजय होतांच श्रीविष्णु याच देवालयांत येऊन राहिले. आणि श्रीशंकरांना प्रसन्न करण्यास्तव ब्रह्मदेवास कैलासीं पाठविते झाले. नंतर जेव्हां ऋषि व देवमंडळासमवेत श्रीशंकर तेथें आले, तेव्हां त्यांचा राग पूर्ण कमी झाला नसून ते क्रुद्धच होते. ते येतांच श्रीविष्णु आपलें स्थान सोडून उठले, व त्यांस सामोरे गेले. मग आपल्या स्थानीं त्यांस बसवून आपण समोर उभे राहिले. हाच हल्लीं कोपनाथाजवळ उभा असलेला नीलवर्ण विष्णु परमात्मा 'धूपनाथ' होय. आणि अद्यापही श्रीशंकरांचा क्रोध शांत झाला नसल्यामुळें या ठिकाणीं सर्व

लोक त्यांना कोपेश्वर असें म्हणूं लागले. नंतर श्रीविष्णूंनीं सहस्रनामांनीं स्तवन करून त्यांचा कोप तेथें पूर्णपणें शांत केला. तेव्हां श्रीशंकर प्रसन्न झाले व त्यांनीं सर्वांस अभय देऊन संतोषित केलें.

## पतिव्रता प्रसूति देवीचा प्रलाप.

इकडे वीरभद्रानें दक्षप्रजापतीचें शिर तोडून तें यज्ञकुंडीं होमिल्यानंतर त्याचें धड तेथेंच भूमीवर पडलें होतें तें परम शिवभक्त, पतिव्रताशिरोमणी दक्षकांता प्रसूति हिनें पाहिलें, तेव्हां तिनें दुःखातिशयानें अत्यंत आक्रोश केला. तो ऐकून पाषाणासही पाझर फुटला असता. शेवटीं दुःख आवरून तिनें अग्निप्रवेश करण्याचा विचार ठरवून एक मोठी चिता तयार करविली. तिला अग्नि देऊन दक्षप्रजापतीचें तें धड आपल्या उराशीं धरून अग्नीस प्रदक्षिणा घालून उडी घालण्यापूर्वीं स्मरण होऊन ती श्री-शंकराचा धांवा करूं लागली कीं, 'हे कर्पूरगौरा, तूंच अंतकाळीं तारणार तरी आतां उदास कां झालास? जगन्नाथा, या संकटकालीं धांवत येऊन माझें सौभाग्य राख!' ही अंतकाळची अनुतापयुक्त निर्वाणस्तुति ऐकून आदिमाया दाक्षायणी कळवळली आणि कोकिळारूपानें तेथें जवळच्या एका वृक्षावर बसून गर्जना करून म्हणते, 'प्रसूते, त्वां या जन्मीं वेद-मार्गास अनुसरून जो परोपकार केला असेल त्याचें स्मरण कर. म्हणजे त्यायोगें जन्मभर तूं सुखसोहाळे भोगशील.' हें कोकिलकूजन ऐकून प्रसूतीस जरा समाधान वाटलें व तें प्रेत खालीं ठेवून ती त्या वृक्षासमीप आली, व नाना प्रकारच्या पत्र-पुष्प-फलादिकांनीं त्या कोकिलेची पूजा करून ती म्हणाली, 'हे माते, तूं कोण आहेस? मी तर महापापी व माझा पति दुष्ट व निर्दय असून राज्यमदानें धुंद झाल्यानें नष्ट झाला. माझे दौहित्र त्रैलोक्यांत पसरले असून त्यांतील दाक्षायणी श्रीशंकरास दिली होती. तो वैराग्ययुक्त असल्यानें माझ्या पतीनें त्याचा अव्हेर केल्यामुळें हा अनर्थ घडला. मजपासून कांहीं परोपकार घडला नाहीं. तुझ्या बोलण्यानें मला संतोष होतो, म्हणून तूं कोण तें लवकर सांग.' प्रसूती-कडून पूजा घेऊन संतुष्ट झालेली ती कोकिला म्हणते, 'मी शिवसती

गौरी असून तूं निर्वाण करण्यास सिद्ध झाल्याचें पाहून येथें आलें. त्वां यज्ञमंडपांत अनुतापयुक्त होऊन माझी पूजा करून, आपल्या हातांतील जडावाचीं रत्नकंकणें काढून माझ्या हातांत घातलीं. त्यायोगें मी संतुष्ट झालें असून तूं अक्षय्य सौभाग्यवती होशील व तुझा पति वांचेल, असा तुला माझा आशीर्वाद आहे. मी श्रीशिवाची आदिशक्ति असून मला केव्हांही नाश नाहीं. मी पुण्ययोगें तुझ्या उदरीं जन्मलें होतें. आतां मी हिमालयांत अहर्निश तप करून श्रीशंकराला प्रसन्न करीन. व त्याचीच अंगना होईन. तेथें मला 'पार्वती' हें नांव प्राप्त होईल. या कोकिळ-व्रतानें तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील, व हें व्रत ज्या स्त्रिया करतील त्या सर्व सौभाग्य पावतील. आतां तूं त्रिपुरारीची आराधना करूं लाग. म्हणजे तुला इच्छित वर मिळेल.' असें सांगून तिला शिवपंचाक्षरी मंत्राचा बोध करून कोकिळा गुप्त झाली.

नंतर प्रसूति चितेपाशीं आली व तिनें दुसरी आहुती देऊन अग्नि शांत केला. आणि दक्षप्रेत उराशीं धरून तिनें शिवध्यान मांडिलें. कोकिळेच्या सान्निध्यानें बुद्धि स्फुरली व ती शिवध्यानतत्पर झाली. अर्थात् कोकिळा ही तिला गुरुरूप झाली. आणि त्या गुरुकृपेनें तिला सर्व सिद्धि प्राप्त झाली. म्हणून वेदशास्त्रपुराणांतरीं गुरुकृपेवीण ज्ञान नाहीं; व अनेक जन्म पुण्याशिवाय सद्गुरुदर्शन नाहीं, असें सांगितलें आहे तें सत्य आहे. प्रसूतीच्या त्या सद्गुरुकृपेनें मिळालेल्या महामंत्रजपानें मदनारी श्रीशिव मनांत कळवळला त्याच वेळीं शिवगणांनींही श्रीशंकराजवळ येऊन हें प्रसूतीकडील वर्तमान कळविलें. तेव्हां ब्रह्मदेवानें प्रसूतीचे कष्ट दूर कर-ण्यास आपण चलावें, अशी प्रार्थना केली. ती प्रार्थना ऐकून श्रीशिव-विष्णु उभयतां संतोषून जेथें महासती प्रसूति पतिप्रेत उराशीं धरून ध्यानस्थ बसली होती तेथें आले. मग ब्रह्मदेवानें त्या पवित्रतेस सावध केलें. तेव्हां ती तें पाषाणवत् झालेलें दक्षाचें धड भूमीवर ठेवून साष्टांग नमस्कार करून नम्रतेनें उभी राहिली; आणि अनेक प्रकारें स्तवन करून श्री-विष्णूस म्हणते, 'तुमच्यावर भरंवसा ठेवून माझा पति मृत झाला. तुमच्या

व गौरीरमणाच्या पूजेनें माझा पति 'चिरंजीव' पद पावला तथापि तुम्हा दोघांचा तो वर खोटा ठरून मी विधवा बनलें. तरी आतां मजवर कृपा करून अंतकाळीं मला सद्गति द्यावी,' असें परोपरीनें आळवून ती उभी राहिली. तेव्हां ब्रह्मदेवानें तिला श्रीशंकरासन्निध आणिलें, तोंच आपल्या ध्यानदेवतेचें दर्शन होतांच प्रसूति आनंदभरित झाली, व मनोभावानें साष्टांग प्रणिपात करून तिनें त्यांचें स्तवन आरंभिलें. तें करुणरसपरिपूरित ध्यान श्रवण करून श्रीशंकरही द्रवले. तोंच श्रीविष्णु व ब्रह्मा यांनींही 'तूं भक्तकामकल्पद्रुम आहेस करितां दक्षास उठवून यज्ञ घ्यावें' अशी विनंति केली. ही सर्वांची प्रार्थना ऐकून जगन्नाथास दया आली; व त्यांनीं प्रसूतीस आश्वासन देऊन म्हटलें, 'हे महासाध्वी, तुझ्या सद्भक्तीनें मी प्रसन्न झालों, तुझी निष्ठा अचल आहे. आतां तुझ्या पतीस उठवीन.' हें स्वामींचें अभयवचन ऐकून प्रसूति मनांत संतोषित झाली व स्तवन करीत नम्रतेनें हात जोडून उभी राहिली.

## (१५) दक्षप्रजापतीस प्राणदान.

इकडे युद्ध संपून सर्व शत्रूंचा निःपात झाला, तरीसुद्धां वीरभद्राचा रणमद कमी न होतां तो रणभूमीवर थैमान करूं लागला होता. त्याचा धुमाकूळ बंद करण्यास मागें सांगितल्याप्रमाणें अग्नीचा ( गुग्गुळाचा ) भयंकर प्रळय केला, तेव्हां वीरभद्रास हौस वाटून तो जरा शांत झाला; परंतु ब्रह्मा इंद्रादिक देव जेव्हां त्याच्यासमोर आले तेव्हां त्यास पुनः आवेश आला, म्हणून ब्रह्मादिकदेवांनीं विचार केला कीं, वीरभद्राचा कोप पूर्ण शांत करण्यास श्रीशंकरावांचून दुसरा कोणी समर्थ नाहीं. असें समजून येतांच त्यांनीं श्रीशंकराना वरील कारणानें रणभूमीवर बोलावून आणिलें. व त्यांजकडून दक्षसतीस अभय देवविलें. यासमयीं श्रीशंकर रणभूमीवर ज्या स्थळीं येऊन राहिले होते तेथेंच हल्लीं 'रुद्रपाद' आहेत. प्रत्यक्ष श्रीशंकर रणभूमीवर आल्याचें पाहून नंदिकेश्वरासह सर्व शिवगणांस अत्यानंद होऊन त्यांनीं जयजयकार केला. तो जयघोष ऐकून व श्रीशंकरांचें पुण्य-

दर्शन घडतांच वीरभद्राचें थैमान तत्काल बंद झालें. इतकेंच नव्हे तर त्याचा भडकलेला क्रोधाग्नि पूर्ण शांत होऊन त्याचा रणमद पार उतरून गेला. व तावडतोब त्यानें आपलें रौद्ररूप टाकून अत्यंत रुचिर (सुंदर) रूप धारण केलें आणि तो श्रीशंकरासंन्निध येऊन साष्टांग प्रणिपात करून करद्वय जोडून नम्रतेनें उभा राहिला. त्या रुचिर रूपधारी वीरभद्रास नम्रपणानें उभा राहिलेला पाहून सर्व देवांस अत्यंत आश्चर्य वाटलें. तेव्हां ते सर्वजण त्यास रुचिरदेव ( राचिदेव, राचेश्वर अथवा राचोटी ) म्हणूं लागले. हा रूपसंपन्न वीरभद्र त्यावेळीं श्रीमहादेवासमीप जेथें नम्रतेनें राहिला होता, त्याच ठिकाणीं सांप्रत–

## राचोटी देव व त्याचें देऊळ.

आहे. या देवाची दृष्टि रुद्रपादांकडे वळल्याचें मागें १ ल्या भागांत सांगितलें आहे. ती का वळली असावी हें आतां वाचकांच्या ध्यानीं अ लें असेलच असो. अतुलपराक्रमी असा तो सौम्यरूपधारी वीरभद्र हात जोडून विनम्रभावानें उभा असलेला पाहून श्रीशंकराना परम संताप वाटला व ते त्याजकडे पाहून ह्मणाले, ' वीरेशा, त्वां हा काय प्रळय केलास ? तुजसारखा वीरवर त्रैलोक्यांत मुळींच नाहीं; असो. आतां ही पतिव्रता प्रसूति अत्यंत श्रमली आहे. तिच्या श्रमपरिहारार्थ दक्षप्रजापतीस सजीव कर ' ही शिवाज्ञा मान्य करून तत्काळ वीरभद्रानें तें दक्षकबंध उचलून आणून श्रीशिवापुढें ठेविलें. मग त्यांनीं दक्षाचे शिर आणून देण्यास सांगितलें. तेव्हां वीरभद्र ह्मणाला कीं, देवाधिदेवा, ज्या तोंडानें शिवनिंदा केली तें मस्तक छाटून अग्नींत दहन केलें आहे. अर्थात् तें परत मिळणें शक्य नाहीं. यास्तव निष्पाप असें मेषशिर लावून सजीव करावें ' असें म्हणून त्यानें एक मेषशिर आणून धडास लाविलें आणि सजीव केलें तों तत्काळ–

## दक्षप्रजापति सजीव झाला !

व शिवस्मरण करीतच उठून बसला ! तेव्हां प्रसूतीस अत्यानंद झाला. ब्रह्मा-विष्णु-इंद्रादिक देव संतोषले. ऋषिगण, यक्ष, राक्षस, दानव, गंध-

वांदिक, सर्व त्रैलोक्यांतील जनतेस हर्ष झाला. विमानस्थ देवगणांनीं पुष्पवृष्टि केली. त्यावेळीं जिवंत असलेल्या सर्व जनांस अभय देऊन श्रीशंकरांनीं जवळ बोलाविलें; तेव्हां हिरण्याक्ष, हिरण्यकश्यप, दुंदुभि इत्यादि महादैत्य, पाताळस्थ लोक, देव, दानव, यक्ष, गंधर्व. कालिकेय, दनायुषेय आणि सर्व नृपाळ जवळ आले व भयनिवृत्तमनानें भक्तिपूर्वक श्रीशंकरांना साष्टांग नमस्कार करून उभे राहिले. प्रसूतीनें उदक व घृतकुंभांतून पतिमुखदर्शन केलें. तेव्हां दक्षप्रजापति प्रसूतीस म्हणतो–'पतिव्रते, तुझ्या भक्तिप्रभावानें माझें भाग्य उदयास आलें. व ब्रह्मा-विष्णु-महेश इत्यादिक सर्व देव भूतळीं आले. तुझ्या पुण्यप्रभावानें व भक्तियुक्त स्तवनानें श्रीशंकर प्रसन्न झाले, व त्यांनीं कृपा केली; परंतु यांत इतकेंच अनुचित झालें कीं, मेष मस्तक धडास लाविलें. असो' असें म्हणून प्रसूतीसह येऊन मंगलस्नान करून दिव्यवस्त्राभरणें परिधान केलीं. नंतर अनुतापयुक्त भक्तिमय अंतःकरणानें श्रीवीरभद्रस्तवन आरंभिलें तें असें 'जयजया श्रीवीरराया वीरशौर्य विरूपाक्षा, तूं शिवतेजाकार आहेस, तूं सर्वांचा गर्व नाहींसा केलास आणि माझा देहाभिमान निरसून मला सावध केलें' अशाप्रकारचें दिव्यस्तवन ऐकून वीरभद्र संतोषला; नंतर त्यानें दक्षप्रजापतीस हातीं धरून मोठ्या प्रेमानें श्रीशिवाजवळ आणिलें. मग त्या पावन झालेल्या दंपतीनें मंगलमय स्तुतीनें श्रीशिवास आळवून ते प्रसन्न होतांच दक्षप्रजापतीनें 'त्वां निजपदीं स्थान द्यावें.' असा वर मागितला. तें ऐकून सदाशिव बोलले 'तूं विष्णुभक्ति केली. त्यायोगें त्याच्या कृपेनेंच तुझें रक्षण झालें व तुला प्रेतत्वापासून आम्ही संजीवन केलें. आतां तूं निजपदीं स्थान देण्याविषयीं वर मागतोस; परंतु ईश्व प्राप्तीचा विचार अत्यंत दुर्धर आहे. देहीं अहंकार वाढतांच ज्ञान नष्ट होतें. महावेदवेत्ताही मायाभ्रमानें मोहून जातो. अनेक जन्मींच्या पुण्याईनें आपोआप फलप्राप्ति होते. परंतु फलाशा धरून कर्में केलीं कीं, अनेक जन्म प्राप्त होतात. कामक्रोधादि षड्रिपूंच्या तडाक्यांत सांपडून जे प्राणी पापकर्में करितात ते यमलोकीं दुर्धर दुःखें भोगितात. पापाधिक्यानें

अधःपतन होतें तर पुण्याधिक्यानें स्वर्गप्राप्ति होते. आणि दोन्हीं सम-समान होतांच नरदेह प्राप्त होतो. पुण्यप्राप्तीचें मुख्य साधन निष्काम भगवद्भजन हेंच होय, या भगद्भक्तांचे अर्थी, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी असे चार प्रकार असून या चारी जनांस मिळणाऱ्या मुक्तींचेही चार प्रकार आहेत. त्यांचें सविस्तर वर्णन पुराणांतरीं पाहावें. यज्ञकर्त्याला यज्ञा-करितां नानाप्रकारचे कर्ममार्ग आचरावे लागतात. अशा शुद्ध कर्मा-पासूनच भक्तीचा उदय होतो व ही भक्ति आंधळ्यास डोळसानें मार्ग दाखवावा, तसें दृष्टि अंतर्मुख करवून साधकाला आत्मस्वरूपाकडे नेते, यामुळें शुद्ध ज्ञानाचा उद्भव होऊन त्यायोगें निर्गुण ब्रह्माची ओळख पटते.

सर्व प्राण्यांना उपजतांच आहार, निद्रादि इच्छा होत असतात. परंतु वेद हे हळुहळू या वासनेपासून उत्पन्न होणाऱ्या मदमोहांचा त्याग कर-ण्यास शिकवून प्राण्यांस निजरूपाकडे नेतात. हा विषयत्याग साधून पर-मेश्वर प्राप्ति व्हावी याकरितांच गुणकर्मानुसार ते ते प्राणी कर्में करीत असतात. अशा या स्वभावभेदामुळेंच जगांत चार वर्ण निर्माण झाले आहेत. आणि त्या त्या वर्णाचीं कर्में निष्कामबुद्धीनें केलीं असतां मानवप्राणी मुक्त होतो. परंतु करूं नये तें कर्म करणें हेंच पाप होय. त्यायोगें दुःखप्राप्ति होते याचा अनुभव तुला आलाच आहे.' असा अमूल्य उपदेश होतांच दक्षप्रजापतीचा भ्रम नाहींसा झाला. व त्यानें साष्टांग नमस्कार केला. तेव्हां करुणसागर सदाशिवानें पूर्ण प्रश्चात्ताप झाल्याचें पाहून त्याच्या सर्व अपराधांची क्षमा करून त्यास शापमुक्त केलें. इतकेंच नव्हे तर त्यास वीरभद्रपदीं अक्षय्यस्थान देऊन चिरकाल टिकणारें गाणपत्य पद दिलें. तेव्हां सर्वत्रांनीं आनंदानें जयजकार केला.

या आनंददायक प्रसंगीं श्रीविष्णूंनीं सदाशिवास विनविलें कीं, 'महा-देवा, आपल्या क्रोधानें हा अकाळ प्रळय होऊन सर्व संहार झाला आहे; पण हे दयासागरा, आपण प्रसन्न झाल्यावर कोणाही पामरांचें कल्याण झाल्यांशिवाय कसें राहील! करितां या युद्धांत जे जे देव हीनावस्था पावले, त्यांना पुनः पूर्वस्थिति देऊन सद्बुद्धि द्यावी.' ही देवांची नम्र

विनंति मान्य करून त्यांनीं वीरभद्रास तसें करण्याची आज्ञा केली. तोंच वीरभद्रानें विभूति मंत्रून रणभूमीवर फेंकितांच मृत व घायाळ झालेले सर्व देव व शिवगण जिवंत झाले! आणि इंद्रादि देव व ऋषींचीं शरीरें पूर्ववत् सुरेख झालीं. सरस्वति, अदिति वगैरे मुख्य मुख्य देवता व देवमातांचीं शरिरेंही पूर्वींप्रमाणें सुंदर झालीं. यामुळें सर्वांनीं श्रीशंकरास भक्तिपूर्वक वंदन करून नानाप्रकारच्या स्तवनांनीं आळविलें. या आनंदभरित झालेल्या देवदानवादिकांच्या आनंदी जयघोषानें आकाश दुमदुमून गेलें!

## वीरभद्रास वरप्राप्ति

अशाप्रकारें जिकडे तिकडे आनंदी आनंद होऊन गेला. या समयीं वीरभद्र म्हणजे राचोटी देवानें हात जोडून भगवान् श्रीशंकराचें स्तवन करून विनंति केली कीं, ' दयाघना, आपल्या दर्शनानें माझा रणमद उतरून भडकलेला क्रोधाग्नि किंचित् शांत झाला आहे; परंतु आपला वियोग होतांच तो पुनः भडकणार असें वाटतें, तरी तो शांत होण्याचा कांहीं उपाय सांगावा अथवा आपणच निरंतर मजजवळ राहावें ' वीरभद्राची ही नम्रप्रार्थना ऐकून महादेवास फार संतोष झाला. व ते हांसत हांसत म्हणाले. 'गणेश्वरा वीरभद्रा त्वां या दीर्घकाल चाललेल्या भयंकर युद्धांत जो अतुल पराक्रम गाजविला, व सर्व देवांना त्राहि त्राहि करून सोडिलें, तें पाहून मी अत्यंत संतुष्ट झालों आहें. असा अलौकिक पराक्रम आजपर्यंत कोणीच केला नाहीं. तूं प्रत्यक्ष प्रळयरुद्राचाच अवतार आहेस. तुझ्या शौर्यापुढें कोणाचा निभाव लागणें शक्य नाहीं. असा तूं त्रैलोक्य विजयी वीर आहेस. त्वां उत्पन्न केलेल्या या असंख्य गणांचा तूंच अधिपति आहेस. तुझ्या अंगापासून उद्भवलेले व शौर्य गाजविलेले हे शिवगणही अत्यंत पराक्रमी वीर आहेत हे सर्वदा माझ्या भक्तिरसांत गढून जातील. आणि तूं याच क्षेत्रांत राहून भक्तजनांचा उद्धार करिशील, पण आतां यापुढें तुझा क्रोधानल भडकून जगताचा संहार न व्हावा. आणि तुझें चित्त सर्वकाळ शांत राहावें, एतदर्थ मी या पुण्यक्षेत्रांत तुझ्या जवळभागींच

असलेल्या ( चंदूरनजीकच्या ) 'चंद्रेश्वर' लिंगांत यावच्चंद्रदिवाकरौ गुप्तरूपानें राहीन. त्या लिंगाचें तूं सर्वदा दर्शन करीत जा. म्हणजे तुझा ताप बराच शांत होईल. पुढें कालांतरानें माझ्या अंशीभूत अशा एका महासामर्थ्यवान् अवतारी योगीश्वराचें तुला दर्शन घडेल. त्याच्या स्पर्शानें तुझा संताप पूर्ण शांत होऊन तो पुनः भडकणार नाहीं असा तुला माझा अंतःकरणपूर्वक आशीर्वाद आहे.' हा शिवानुग्रह पाहून वीरभद्रास परमाल्हाद झाला. व सर्व शिवगणांनाही अत्यंत हर्ष होऊन ते जयघोष करूं लागले.

## ( १६ ) 'वीरशैव' शब्दाची उत्पत्ति

पराक्रमशाली वीरभद्राचे हे वीर शिवगण अथवा शिवभक्त, श्रीशिवाच्या आशीर्वचनाप्रमाणें पुढें वीरभद्राची अर्थात् वीराची भक्ति करूं लागले. म्हणून या शिवभक्तांना म्हणजे शैवाना 'वीरशैव' हें नांव प्राप्त झालें वीरभद्रापासून उत्पन्न होऊन त्या वीराची भक्ति करण्यांत गढून गेलेल्या अत्यंत प्राचीन काळच्या त्या प्रसिद्ध वीरशैवांचेच वंशज व कुलाभिमानी हल्लींचे वीरशैव अथवा लिंगायत लोक होत ! अशा कित्येक विद्वान् वीरशैवांचें मत आहे. यावर कोणी म्हणतील कीं, 'वीरशैव मत अगदीं अलीकडे ऐतिहासिक कालांत श्रीबसवेश्वरांनीं प्रचलित केलें असल्यानें त्या त्रेतायुगांतील अत्यंत प्राचीन काळच्या युद्धप्रसंगीं वीरशैव लोक कोठले ? मग त्यांचे हे वंशज कसले ? यावरून हें मतच नव्हतें तर त्याच्या नांवाचा शब्द कोठला ?' अशा सर्व तार्किकांना अम्ही फक्त इतकेंच सांगतों कीं, श्री बसवेश्वरमहाराज हे वीरशैव मताचे संस्थापक नसून प्रसारक होते. ही गोष्ट ऐतिहासिक पुराव्याला धरून असल्यामुळें सर्वसंमत आहे. मग या पूर्वप्रचलित शैवधर्माला 'वीरशैव' हें नांव केव्हां कोणत्या वीरपुंगवाच्या नांवावरून मिळालें ? शिवाय दुसरें असें पाहा कीं, वीरभद्राचे असंख्य भक्त बहुधा वीरशैवच कां आहेत ? आणि दुसऱ्या जातीचे जे कोणी आम्ही वीरभद्राचे निःसीम भक्त आहों असें

म्हणत असतील त्यांना आमचा असा सवाल आहे कीं, हिंदुधर्मांतील प्रत्येक मतानुयायांत आपापल्या उपास्य देवादिकांचीं नांवें आपल्या अपत्यांस ठेवण्याची पूर्वापार रूढि प्राचीन काळापासून असतांना वीरशैवांशिवाय अन्य कोणत्याही पंथांत अथवा जातींत, वीरभद्र, वीरापा, वीरेश्वर, राचेश्वर, राचोटी, करवीरभद्र, शलभापा ( सोलभाप्पा किंवा सोलभाण्णा ) इत्यादि नांवें पुरुषांना व वीरम्मा ( वीरव्वा, ईरव्वा ), राचव्वा इत्यादि नांवें स्त्रियांना दिलेलीं कां आढळून येत नाहींत ? यावरून हीच गोष्ट सिद्ध होते कीं, वीरभद्रापासूनच ' वीरशैव ' शब्दाची उत्पत्ति झाली असून तोच सर्व वीरशैवांचा कुलदेव होय यांत मुळींच शंका नाहीं. त्यापूर्वीं अत्यंत प्राचीन काळीं या मतास ' लिंगधर्म ' किंवा असेंच दुसरें कांहीं नांव असावें. असो

वीरशैव शब्दाची व्युत्पत्ति, ' वी ' शब्देनोच्याते विद्या शिव जीवैक्य-बोधिनी ॥ तस्यां रमन्ते ये शैवा वीरशैवास्तु ते मताः ( सिद्धान्तशिखामणि) किंवा यो हस्तपीठे निजमिष्टलिंगं विन्यस्य तल्लीनमनः प्रचारः॥ बाह्यक्रियासंकुलनिस्पृहात्मा संपूजयत्यंग स वीरशैवः ॥ (स्कंदपुराण--शंकरसंहिता ) अशा अनेकप्रकारें शास्त्रसंमत रीतीनें सांगण्याची रूढि आहे. त्यामुळें आम्ही वर दिलेली व्युत्पत्ति जरा चमत्कारिक वाटेल; परंतु वरील वीरशैव शब्दाच्या शास्त्रसंमत विग्रहांत ' वीर ' या शब्दाचा अर्थ ओढून ताणून आणिलेला आहे. असें आम्हास वाटतें. कारण ' वीर ' हा शब्दच असा आहे कीं, तो धार्मिक, सामाजिक अथवा युद्धविषयक कोणतेंही वीरत्वाचें कार्य केल्याशिवाय लावितांच येत नाहीं. म्हणून विशेषेंकरून वीरभद्रावतारी श्रीशिवाची भक्ति करणाऱ्या एकनिष्ठ शैवानां ' वीरशैव ' ही संज्ञा मिळाली असली पाहिजे. येथें वीरशब्दाचा 'वीरत्वा' हा विशिष्ट अर्थ कायम आहे. तसा वरील विग्रहांत दिसून येत नाहीं. यावरून आम्ही वर दिलेली व्युत्पत्ति सयुक्तिक दिसते. शिवाय वरील शास्त्रसंमत विग्रहांत केलेल्या ' वीर ' शब्दाच्या अर्थाप्रमाणें पाहतां शिवजीवैक्य-बोधिनी विद्येत निरंतर रममाण होणारे कित्येक शिवभक्ति-परायण

स्मार्त ब्राह्मणही आहेत. मग तेही वीरशैवच होत कीं काय? पण तसें ते म्हणवीत नाहींत. व आम्हीं वीरशैव लोक तसें त्यांना म्हणतही नाहीं. असा अनवस्थाप्रसंग वर आम्हीं दिलेल्या व्युत्पत्तीनें येत नाहीं. हें त्या-पुढील वरील विवेचनावरूनही कळून येईल.

## [ १७ ] वीरभद्र-विवाह

परमेश्वराच्या आशीर्वचनानें वीरभद्रास व सर्व गणांना अत्यानंद झाला. आणि सर्व देव, देवता, दैत्य दानव, हेही हर्षभरित झाले होते. अशा सर्वाल्हाददायक सुप्रसंगीं देव व ऋषिगण वगैरे सर्वांनीं मिळून विचार केला कीं, संग्रामकाळीं वीरभद्रास भूभार हलका करण्यास साह्य होण्यास्तव मूर्तिमंत मायाशक्ति भद्रकाळी अवतरली आहे. ती वीरभद्राची अनुचरी त्याची अर्धांगी होण्यास अत्यंत लायख आहे. तेव्हां तिचा या शुभानदकर प्रसंगीं मोठ्या समारंभानें वीरभद्राशीं विवाह करावा. म्हणजे या आनंदसागरास उत्साहाचें भरतें येईल. हा विचार मनांत येण्याचा अवकाश तों लागलीच देवेंद्रादिकांनीं ही बातमी श्रीशंकरांस कळविली. त्यांनाही फार अ नंद झाला. मग तेथें लागलाच भव्य व सुंदर असा लग्नमंडप उभारला, व्र अत्यंत आरास केली. लावण्यलतिका भद्रकाळी ही मूळची विष्णुकन्याच होय. तिला ही वार्ता कळतांच ती दैदीप्यमान सौंदर्यानें वीरभद्रासमान तेजानें शोभूं लागली. या लग्नसमारंभास श्रीविष्णु आपल्यां उभय स्त्रियांसह आणि ब्रह्मदेव सावित्रीसह आले होते. अष्टदिक्पाल आपापल्या स्त्रियांपरिवारासह सवाहन आले. शिवाय चंद्रादित्य, अष्टवसु, यक्षकिन्नर, गंधर्व, व भूमंडलांतील सर्व ऋषीश्वर व नृपाल सहपरिवार आले. रंभादि सर्व देवांगना येऊन त्यांनीं मोठ्या उत्साहानें नृत्यगान आरंभिलें. अष्टभैरव भूत वेताळादि शिवगण तेथें होतेच सर्व देव व ऋषि वगैरे जमल्यानंतर यज्ञकुंडांतील अग्नि पूजा करून शांत केला. व यज्ञसमाप्ति केली. व तेथें लागलेंच हें मंगलकार्य आरंभिलें. श्रीविष्णु वधूपक्षाकडे असून ब्रह्मेंद्रादिक देव वर-

पक्षाकडे होते. अशाप्रकारें त्रैलोक्यांतील सर्व मेळा जमून त्यांनीं मोठ्या समारंभानें फाल्गुनमासीं पौर्णिमादिवशीं गुग्गुळ महोत्सव करून रात्रीचे समयीं शुभमुहूर्तीं त्या विशाल लग्नमंडपांत वीरभद्राचा भद्रकालीशीं मोठ्या थाटानें विवाह केला! त्यावेळीं श्रीशंकरांनीं भद्रकालीस जवळ बोलावून घेऊन तिच्या मस्तकावर वरदहस्त ठेवून प्रेमपूर्वक म्हटलें, ‘ भद्रे, तूं अत्यंत पराक्रमशाली असून वीरभद्राची सहधर्मचारिणी होण्यास अत्यंत योग्य आहेस. तस्मात् या आनंददायक प्रसंगीं तुझा वीरभद्राशीं विवाह झाला हें अगदीं योग्य होय. ’ नंतर उभय वधूवरांनीं श्रीशंकरांना वंदन करून आशीर्वाद घेतले. यावेळीं त्रैलोक्यांत आनंदीआनंद झाला. श्रीविष्णूंनीं लग्नमंडपीं असंख्य ऋषिगणांना अगणित दक्षणा वांटली, व वीरभद्रास अपार वस्त्रें, भूषणें व अश्व, गज, रथ अर्पून षोडशोपचार पूजा केली. अशा रीतीनें मोठ्या आनंदोत्सवानें वीरभद्र–भद्रकालीचा योग होऊन ते आनंद–भोग उपभोगूं लागले. या आनंदोत्सवप्रसंगीं कोणाच्याही संहारांचें कार्य करणें उचित नसल्यानें या क्षेत्र–यड्रूरांत सांप्रतकाळींसुद्धां या आनंदोत्सव–स्मारक–दिनीं [ फाल्गुन शुद्ध पौर्णिमदिवशीं ] ‘कामदहन’ ( होळी जाळणें ) इत्यादि कोणतींही कोणांसही दुःखदायक होणारीं कृत्यें करीत नाहींत. या कारणानें येथें कामदहन दुसऱ्या दिवशीं करीत असतात,व धुळवड द्वितीये दिवशीं होते.

## [१८] श्रीवीरभद्रलिंगाची स्थापना

या आनंददायक प्रसंगीं वीरभद्राचें मन सुप्रसन्न पाहून ब्रह्मा, विष्णु, इंद्रादिक सर्व देव, ऋषीमंडळ व शिवगणांनीं त्याचें अत्यंत उत्साहानें स्तवन करून विनविलें कीं, ‘ हे धैर्यशाली वीरभद्रा, येथें कृष्णावेणीच्या परम पवित्र तीरीं दक्षप्रजापतीनें यज्ञ केलेल्या या पवित्र भूमीवर आम्हा देवांस व ऋषि, योगी व शिवगणांना दर्शन देऊन पूजास्पर्शादिकांनीं उत्तम गति देण्याकरितां येथेंच त्वां लिंगरूपांत वास्तव्य करावें. ’ ही त्या सर्वांची प्रार्थना ऐकून ‘ तथास्तु ’ असें म्हणून ते सर्वजण पाहात असतांच

वीरभद्र अकस्मात् गुप्त झाला, व सर्वांसमक्ष तत्काळ त्या विशाल यज्ञकुंडांतून देवी दाक्षायणी जेथें दग्ध झाली होती त्याच ठिकाणीं जटामंडित व सर्व आयुधांनीं युक्त असा भगवान् श्रीवीरभद्र 'स्वयंभू लिंगरूपानें' उत्पन्न झाला! तेव्हां आकाशांत कोटि-सूर्य-प्रभा पसरली. देवांनीं पुष्पवृष्टि केली. अप्सरा सुंदर नृत्य करूं लागल्या. गंधर्वांनीं मनोहर गायन आरंभिलें. तेव्हां कांतिमान् अशा त्या स्वयंभू वीरभद्रलिंगाची श्रीविष्णूंनीं तेथें प्रथम वेदमंत्रद्वारें महाभिषेक करुन षोडशोपचार पूजाविधीनें प्राणप्रतिष्ठा केली! ऋषीश्वर व शिवगणादिक सर्वांनीं नाना प्रकारच्या स्तोत्रांनीं स्तवन केलें. सिद्धांनींही महाभिषेक केला. तेव्हां श्रीवीरभद्र देव प्रसन्न होऊन त्या सर्वांस संतोषानें वरप्रदान देता झाला कीं, 'तुम्ही जशी माझी स्तुति केली त्या प्रकारच्या स्तोत्रांनीं जो स्तवन करील त्याचे सर्व मनोरथ मी पूर्ण करीन. शिवाय जे भक्तिभावानें प्रतिवर्षी येऊन रुद्रतीर्थी स्नान करून लिंगपूजा करितात, आणि यथाशक्ति गणाराधना करून शिवगणांना संतोषित करितात; त्यांची मनकामना मी पूर्ण करीन. हा निर्धार जाणा. त्यांतही मुख्यतः आमचें मनोगत इतकेंच कीं, येथें दक्ष महायज्ञाचा भग केला, त्याच्या स्मरणार्थ खापरांत अग्नि घेऊन मस्तकावर गुग्गुळरूपानें यथाक्रम मिरवावा. म्हणजे त्या भक्तांच्या सर्व मनकामना तृप्त होऊन ते इहपरलोकीं सौख्य पावतील.' तेव्हां सर्वांना अत्यानंद होऊन ते हा समारंभ संपवून आपापल्या स्थानीं निघून गेले. दक्षप्रजापति वीरभद्राच्या सेवेस येथेंच राहिला. त्याचीच मूर्ति हल्लीं श्रीवीरभद्रदेवाच्या भद्रकाळीसह असलेल्या उत्सवमूर्तीजवळ उजव्या भागीं ठेविलेली असते. असो. यानंतर अनेक ऋषि व शिवगण येथेंच वीरभद्रसेवेंत निमग्न होऊन अनंत काळ राहिले. विवाहसमारंभ संपतांच श्रीशंकर चंद्रेश्वर लिंगांत मागें सांगितल्याप्रकारें जाऊन अदृश्य झाले; म्हणून तेव्हांपासून चंद्रेश्वरलिंगास 'अदृश्येश्वर' (अदृशाप्पा) असें लोक म्हणूं लागले. आणि वीरभद्रदेव तापशांतीकारितां वारंवार अदृश्येश्वराच्या दर्शनास जाऊं लागले. यास्तव पूर्वी श्रीवीरभद्रदेवाच्या उत्सवमूर्तीची पालखी 'दर

सोमवारीं व प्रत्येक सणावारीं चंद्रेश्वराच्या म्हणजे अदृश्येश्वराच्या दर्शनास जात असे. पण पुढें तिकडे जाण्याचा क्रम कां बंद पडला तें मागें पहिल्या भागांत सांगितलें आहेच म्हणून येथें द्विरुक्ति नको.

१. श्रीवीरभद्रचरित्रांत श्रीक्षेत्रयड्डूरामध्यें गुग्गुळोत्सव करण्याचा क्रम सांगितला आहे, तो असाः—आपल्या निवासस्थानांतून मस्तकावर गुग्गुळ घेऊन निघण्यापूर्वीं त्याची तेथें यथाविधि पूजा करून पुरंत, गणाचार्य यांचे-सह शक्तीप्रमाणें गणाराधना [ जंगमार्चन ] केलेली असावी. नंतर करडी, ढोल, शृंग इत्यादि वादनकार व येथील श्रीवीरभद्रसेवक वारांगना यांनाही भोजनदक्षिणादिकांनीं तृप्त करून, अग्नि करणें असेल तर वीरभद्रदेवालयांत मोठ्या सभामंडपापुढें अग्नि प्रदीप्त करून त्याची षोडशोपचार पूजा करावी. मग प्रदक्षिणा घातल्यानंतर प्रथम गुग्गुळ घेऊन पूर्वेकडे 'रुद्रपाद' आहेत तेथें जावें. तेथें त्यांच्याजवळच देव, दैत्य, दानव, मानवांस अजिंक्य असा नंदी निजसत्तेनें स्थित आहे. नंदीचा पराक्रम पाहून प्रसन्न होऊन त्रि-लोचनानें त्यास कृष्णावेणीतीरीं पूर्वीं प्रस्थान मांडिलेल्या स्थानींच स्थापिलें. हा शिववाहन वृषभेश्वर युद्धापूर्वींच दाक्षायणीबरोबर येथें आला होता. तो दाक्षायणीदहनानंतर परत कैलासीं न जातां अनंत हालअपेष्टा सोसून येथेंच यज्ञमंडपीं स्थित झाला. युद्धप्रसंगीं यानें अत्यंत पराक्रम गाजविला. म्हणून युद्धसमाप्तीनंतर जेव्हां ब्रह्मा, इंद्रादिक देवांच्या विनंतीस मान देऊन श्री-शंकर कैलासाहून भूतळीं श्रीविष्णुनिवासस्थानास [ खिद्रापुरांतील कोपनाथ-देवालयास ] आले ते विमानांतून आले. त्यावेळीं त्यांचा वाहन हा वृषभ त्यांजबरोबर नव्हता. म्हणूनच हल्लीं खिद्रापूर येथील कोपेश्वराचे विशाल देवालयांत नंदी मुळींच नाहीं! त्याचें कारण हेंच होय. असो. या नंदिकेश्वराच्या देवळास वळसा घालून श्रीवीरभद्राचें मुख्य दैवत प्रख्यात 'रुद्रपाद' आहेत, तेथें जाऊन त्यांची उत्तमप्रकारें पूजा करावी व त्यांना प्रथम गुग्गुळ ओवाळावा. नंतर नंदीची पूजा करून गुग्गुळ ओवाळून मग श्रीवीरभद्र तेजरूप श्रीशैलपर्वतनिवासी साक्षात् राचोटी वीरभद्र अथवा राचेश्वर मध्यभागीं आहे, त्याचें देवालय उत्तराभिमुख आहे, त्याची पूजा

करून त्यास भक्तीनें गुग्गुळ ओवाळावा. मग वनांत यावें. तेथें प्रथम दर्शनींच जे दक्षयज्ञ-विध्वंसनास साह्यकारी झाले, असे अतिसमर्थ सैन्य-संभारी कोट्यवधि भूत, वेताळ, राक्षस व भैरवगण आपल्या नायकां-( सुभेदारां ) सह मूर्तिमंत उभे आहेत. त्यांना पूजा अर्पून गुग्गुळ ओवाळावा. या तीन ठिकाणांनंतर चौथें ठिकाण श्रीवीरभद्र देवालयाच्या उत्तरेस आहे, तें ' पंचलिंग ' होय. तो मूर्तिमंत पंचमुख परमेश्वर असून तो पंचतत्वांचा निर्धार दाखवितो. पंचभूतांचा कर्दमरूपी हा देह परमात्म्याचा जो भिन्नभाव दाखवीत आहे तो मूळचा एकरूपी आहे. हें येथें एकेठिकाणीं दाखविलें आहे. भूमि, आप, तेज, वायु या चार तत्त्वांचीं दर्शक अशीं चार लिंगें चार दिशास असून त्या सर्वांच्या मध्य-भागीं निर्गुण आकाशरूपी स्वयंज्योति परमात्मा आहे. आणि या प्रत्येक भूतांमध्यें पांच पांच सूक्ष्म भूतें ( तत्त्वें ) आहेत. या सर्व स्थूल व सूक्ष्म भूतांच्या समुच्चयानेंच हा जड देह बनला आहे. या शरीरांत पृथ्वी भूताच्या अंशीभूत अशीं—रोम, त्वचा, नाडी, मांस व अस्थि हीं पांच तत्त्वें आहेत. जलतत्वाचीं, लाळ, मूत्र, रक्त, वीर्य व ( मज्जा ) घर्म हीं पांच तत्त्वें. तेजाचीं—क्षुधा, तृषा, आलस्य, निद्रा, व क्रीडा हीं पांच, व वायूचीं प्राण, अपान, व्यान, उदान व समान हीं पांच तत्वें आहेत. वर दिलेले पांच वायु देहामध्यें संचरत असून याशिवाय सूक्ष्मरूपानें कच्छ, नाग, क्रिकीळ, देवदत्त व धनंजय असे पांच वायु देहांत आहेत. असे एकूण दहा वायु जे देहांत ( पिंडांत ) संचरत आहेत तेच ब्रह्मांड व्यापून आहेत. आतां पांचवें आकाश या भूतांचीं—काम, क्रोध, शोक, मोह व भय हीं सूक्ष्म रूपें होत. असा या पंचभूतदर्शक पंचालिंगांचा महिमा अपार आहे. आतां या पंचमहाभूतांचे पांच विषय आहेत. ते—आकाशाचा विषयशब्द होय. कारण, नादाचा उद्भव आकाशांत होतो. वायूचा स्पर्श. अग्नीचा रूप. आपाचा रस व पृथ्वीभूताचा विषय-गंध होय. या विषय-सेवनांची देहामधील साधनें जीं ज्ञान व कर्मेंद्रियें तींही पांच पांचच आहेत. चक्षु, श्रोत्र, त्वचा, जिव्हा व घ्राण हीं पांच ज्ञानेंद्रियें असून तोंड, हात, पाय,

जननेंद्रिय व गुद हीं पांच कर्मेंद्रियें होत. अशा प्रकारच्या ज्या स्थूल--सूक्ष्म तत्त्वांच्या व इंद्रियांच्या समुच्चयानें स्थूल देहाला जो आकार आला आहे, तोच येथें लिंगरूपानें दाखविला आहे. हा देह लिंग, सूक्ष्म, कारण व महाकारण या चार स्वरूपानें स्थित्यंतर पावत असतो. या लिंग, सूक्ष्म, कारणादि देहांचे भिन्नभिन्न गुण व लक्षणें आहेत. अशा लक्षणांचीं चार लिंगें चार कोनीं स्थापिलीं असून पांचवें लिंग प्रत्यक्ष ईश्वरमूर्ति असून त्याला उत्तम पुरुष म्हणतात. अशी ही पंचलिंगाची आकृति एकप्रकारें श्रीवीरभद्ररूपच होय. याप्रकारच्या परमेश्वररूपी पंचलिंगांचें आधीं भक्ति-भावानें पूजन करून नंतर गुग्गुळ ओंवाळून त्याला मान द्यावा.

मग तेथून पश्चिमभागीं शिवयोगी मुकुटमणी सिद्धगिरी क्षेत्र--निवासी 'श्रीकाडदेवरु' नामा साक्षात् शिवावतारी सर्वेश्वर शिवयोगी सत्पुरुषांचा अंशीभूत शिष्य '**पोवाडसिद्ध**' हा आपल्या आश्रमांत ( मठांत ) स्थित आहे. त्याची भक्तीनें पूजा करून साष्टांग नमस्कारानें तोषवून त्यास गुग्गुळ ओवाळावा. मग आनंदानें दक्षिणेकडे येऊन पूर्वमहाद्वारानें वीरभद्र देवालयांत प्रवेश करावा. नंतर तेथें पटांगणांत अग्नि केला असल्यास, शुचिर्भूत असलेल्या सर्वांनीं पुरंत, गणाचार्य व वाद्यकार यांसह अग्नींतून जाऊन अग्निदिव्य करावें. आणि तो अग्नि शांत करून सभामंडपांतून मध्य भागांत प्रवेशून गर्भदेवळाभोंवतीं प्रदक्षिणा करून कुंडामध्यें '-जयजय श्रीविरभद्र' अशी गर्जना करीत उतरावें. आणि श्रीवीरभद्रदेवाची षोडशोपचार पूजा करून त्यास गुग्गुळ ओवाळावा. मग साष्टांग प्रणिपात करून हात जोडून उभे राहून इच्छा असेल तें मागावें म्हणजे त्यांची ती इच्छा पूर्ण होईल. तसेंच यावेळीं जे श्रीविरेशाचें ध्यान, स्मरण अगर त्याचें पुण्यपावन चरित्र सद्भावें श्रवण करितील त्यांची इच्छित कामना तत्काळ पूर्ण होईल हा निश्चय जाणावा. तरी मनोवांच्छित वर मागून पुनः नमस्कार करून कुंडांतून वर यावें व श्रीउत्सवमूर्तींच्या देवाल-यांत भद्रकालीसह जी भोगमूर्ति आहे, तिला पूजा अर्पून गुग्गुळ ओवा-ळून मग मध्यभागास प्रदक्षिणा घालून दक्षिणमहाद्वारानें वीरभद्र देवालया-

बाहेर जावें. तेथें पश्चिमदिशेस श्रीवीरभद्रलिंगासमान श्रीअदृश्येश्वर लिंग व जवळच श्रीविष्णुरूपी महा-अश्वत्थवृक्ष आहे. त्या दोन्ही ठिकाणीं पूजा करून गुग्गुळ ओवाळावा. यानंतर तेथून थेट कृष्णावेणीतिरीं यावें, व तिची यथाप्रकार पूजा करून तिला गुग्गुळ ओवाळावा. मग गुग्गुळाची पूजा करून आरती करावी. नंतर गुग्गुळास थोडें दूध अर्पण करून मग तो गुग्गुळ नदीच्या उदकांत शांत करावा.

तेथून सर्वांसह दक्षिणमहाद्वारानें देवालयांत प्रवेशून लिंगालयीं जाऊन रुद्राभिषेक केल्यानंतर देवास षड्रस पक्वान्नांचा उत्तम नैवद्य दाखवावा. तेव्हां श्रीवीरभद्र संतुष्ट होतो, व मनेच्छा तृप्त करितो. अशारीतीनें गुग्गुळ महोत्सव संपल्यानंतर स्वतः नूतन वस्त्राभरणें परिधान करून पुरंतांस व गणाचार्यांसही वस्त्रदान देऊन नंतर सर्वांस भोजनादिकानीं तृप्त करावें. म्हणजे सर्व पातकांचा नाश होऊन अंतीं मोक्षरूप श्रेष्ठ शांति मिळते.

## (१९) फलश्रुति

याप्रमाणें श्रीवीरभद्र महिमा अपार असून येथें भक्तेच्छा पूर्ण होत असल्यामुळें त्या अनादिकालापासून श्रीविष्णु-आज्ञेवरून देव, ऋषि व शिवगणांनीं भूलोकीं यात्रा आरंभिली आहे. येथें साक्षात् श्रीवीरभद्रदेवानें शास्त्रसंमतीनें लिंगरूपीं आपलें ध्यान ठेविलेलें असें हें स्वयंभू जागृतस्थान आहे. म्हणून पुत्र-धन-विद्यादिक इहपर सौख्यसाधनें प्राप्त होण्यास्तव श्रीक्षेत्र यड्डुरांत येऊन मनेच्छा पूर्ण करून घ्यावी. आतां या प्रख्यात क्षेत्राची यथाप्रकार यात्रा करण्यानें काय पुण्यप्राप्ति होते, व कोणतें फळ मिळतें याविषयीं मागें अनेकदां विवेचन केलें आहे. तरी शेवटीं श्रीवीरभद्र चरित्रकारानें जी फलश्रुति सांगितली आहे तिचाच थोडक्यांत अनुवाद करून आटोपतें घेऊं.

प्रथम श्रीवीरभद्रलिंगाची श्रीविष्णूंनीं प्राणप्रतिष्ठा करून पूजा केली. तों त्यास सुदर्शनचक्र व गदा, शंख, हीं आयुधें परत सुस्थितींत मिळालीं.

इंद्रादिक देवांचीं आयुधें मिळून त्यांना पूर्णवैभव प्राप्त झालें, कित्येक ऋषी-श्वरांनीं प्रार्थना केली, त्यांचे मनोरथ पूर्ण झाले. करितां भक्तांनीं यात्रेस सहकुटुंब येऊन सूर्योदयीं स्नान करून श्रीवीरभद्रलिंगाची षोडशोपचारें पूजा केल्यानंतर गणाराधना करावी; आणि रात्रीं जागरण करून शिवध्यान करावें. शिवाय कुंडीं उतरून अष्टोत्तरशतप्रदक्षिणा करून नमस्कार करावा. व ' जयजय श्रीवीरभद्र! म्हणून गर्जना केल्यास देव संतुष्ट होतो. व सर्व इच्छापूर्ति होते. गुग्गुळ काढण्यानें शत यज्ञांचें फळ मिळतें. तसेंच देवास छत्र, चामर, वस्त्र, पात्रादिक अर्पण केल्यास महापातकांचा नाश होतो. गो-अश्व-गजादिक अर्पणानें पितरांचा उद्धार होतो. या क्षेत्रांतील देवालयांचा जीर्णोद्धार करण्यानें अथवा नवीन देवालयें व धर्मशाळा इत्यादि बांधण्यानें सर्व सुखें प्राप्त होतात. याप्रमाणें हें क्षेत्र-दर्शन अत्यंत पुण्यकारक आहे.

## [२०] या क्षेत्राचें विशेषत्व

आपल्या या भरतभूमींत काशी, रामेश्वर, प्रयाग, गया, केदारनाथ, गोकर्ण, पंढरपूर इत्यादि अनेक प्रख्यात क्षेत्रें आहेत त्या सर्व क्षेत्रांपेक्षां या श्रीक्षेत्र यड्डूरासंबंधानें एक विशेष गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे ती ही कीं, वर सांगितल्यापैकीं बहुतेक सर्व क्षेत्रें जीं निर्माण झालीं, तीं सर्व प्राचीन काळीं एकेका अत्यंत आनंददायक प्रसंगीं उत्पन्न झालीं असल्याचें त्यांच्या उत्पति-इतिहास-कथांवरून दिसून येईल. उदाहरणार्थ—श्रीक्षेत्र काशी हें श्रीविश्वनाथानें, रम्यस्थान पाहून आपलें निवासस्थान केलें म्हणून उत्पन्न झालें, तर श्रीक्षेत्र गोकर्ण हें श्रीपरमात्म्याच्या तेजोमय आत्मलिंगाच्या आनंदोत्सवाप्रीत्यर्थ उद्भवलें. श्रीक्षेत्र रामेश्वर हें श्रीरामचंद्रानें जयप्राप्त्यर्थ श्रीशिवाची आराधना केली म्हणून प्रसिद्धीस आलें; तर श्रीक्षेत्र पंढरपूर हें महाभगवद्भक्त श्रीपुंडलिकाच्या भक्तिमाहात्म्यानें उदयास आलें. अशीं अनेक क्षेत्रें कोणत्या तरी एकाद्या आनंददायक प्रसंगानें उत्पन्न झालीं असल्याचें दिसून येईल. परंतु हें यड्डूर-क्षेत्र मात्र अशा कोणत्याही आनंदककारक प्रसंगीं उत्पन्न झालें नसून दक्ष-महायज्ञसंहारासारख्या भयं-

कर युद्धप्रसंगानें म्हणजे एकप्रकारें भयंकर भांडणांतच उत्पन्न झालें आहे. शिवाय इतर क्षेत्रांतील मुख्य देव-देवतांप्रमाणें येथील श्रीवीरभद्र देव हा सौम्य व भोळा देव नसून तो अत्यंत उग्रमूर्ति आहे. आणि हें एका अर्थी योग्यही आहे. कारण अनेक विद्वानांच्या मनें वेदांतील 'रुद्र' या प्रळयकारी देवतेचेंच श्रीवीरभद्र देव हा पौराणिक स्वरूप होय, व याची उत्पत्ति जी झाली ती श्रीशंकरांच्या क्रोधाच्या परमावधीमध्यें तृतीय नेत्रांतील अग्नींतूनच झाली आहे. म्हणून याच्या ठिकाणीं सौम्यपणा किंचित्‌ही नाहीं. यामुळें हा संहारकार्य-प्रियकर देव अर्थात्‌च शांतता-प्रिय नसून तो कलहप्रिय आहे, आणि त्याची अर्धांगी भद्रकाळी तर प्रत्यक्ष रुधिरप्रिय आहे! या कारणामुळेंच कीं काय या रुद्रक्षेत्रांत एक ना एक भांडणें, तंटेबखेडे, मारामाऱ्या इत्यादि कांहींना कांहीं हरहमेश चालू असतातच. कोणत्याही प्रकारचें भांडण किंवा दुफळी, चुरस इत्यादि मुळींच नाहीं असा एकही दिवस या यड्डूर क्षेत्रानें निदान ज्ञात ऐतिहासिक कालांत तरी आजपर्यंत पाहिला नाहीं, असें निश्चयात्मक सांगणें चुकीचें होणार नाहीं, अशी या रुद्रस्थानाची प्रसिद्धि आहे. मात्र यांत एक गोष्ट मुख्यतः लक्षांत ठेविली पाहिजे कीं, येथें दुष्ट लोकांचा सर्वदा पाडाव होऊन सुष्टांचा विजयच होत आला आहे; म्हणून अन्यायानें गांजलेले अनेक न्यायी भक्तगणच सर्वदा जयप्राप्ति व्हावी, एतदर्थ या वीरभद्र देवाच्या उपासनेला लागलेले असतात. या परंपरागत भांडणांचाच अलीकडचा थोडासा इतिहास पुढें उत्तरार्धांत दिलाच आहे. तो वाचकांस विदित होईलच. यावरून येथें इतकेंच सांगतां येईल कीं, या रुद्रभूमींत भांडणतंट्यांचा सुकाळ व शांततामय दिवसांचा दुष्काळ सर्वदा असावयाचाच! कारण हें स्थान-माहात्म्य आहे. ही गोष्ट प्रामुख्यानें ध्यानांत ठेविल्यास पुढील भागांतील विवेचनाचा विशेष अचंबा वाटणार नाहीं.

अशा प्रकारचें हें श्रीवीरभद्रमाहात्म्य असून मानव प्राण्यांतील नेभळेपणा नष्ट करून जगांतील दुष्टपणा घालविण्याचा धीटपणा व असामान्य कर्तृत्व अंगीं उत्पन्न करण्याचें श्रेष्ठ कर्तव्य या क्षेत्रानें विशेषतः या क्षेत्रांतील परममंगल

वीरभद्रदेवाकडून निरंतर होत आहे. यासाठीं या क्षेत्रीं येऊन हा अलभ्य लाभ करून घेऊन इहपर सौख्यांत गढून जाण्यास कोणी आळस करूं नये, इतकें सांगून यापुढें श्रीशिवावतारी श्रीआद्यकाडदेवरुमाहात्म्य ऐकण्यास त्यांच्या निवासस्थानदर्शनास (श्रीकाडदेवरुस्वामींच्या मठास) जाण्यास यात्रेकरू भक्तांना कळवून या पूर्वार्धास येथेंच पूर्णविराम देऊं.



सदरहू ग्रंथ प्रसारक फिरते एजंट.



श्री. गुंडापा भरमापा कुडची.
इंगळी जि० बेळगांव.

श्रीविरूपाक्षलिंगाय नमः ॥

# उत्तरार्ध.



## भाग पहिला.



## श्रीआद्यकाडदेवरू स्वामी

### (१) श्रीयडूरक्षेत्राचें प्राचीनत्व



### ( थोडें पुराण व थोडा इतिहास ).

पौराणिक काळांत दक्षप्रजापतीच्या महायज्ञाचा विध्वंस करून त्याचा व इतर सर्व देव-दानवांचा गर्वपरिहार केल्यानंतर श्रीविष्णूंनीं श्रीवीरभद्र-लिंगाची स्थापना या यडूर क्षेत्रीं कशी केली हें मागें सांगितलेंच आहे. येथें श्रीवीरभद्रलिंगाची प्राणप्रतिष्ठा झाल्यावर अनेक देव, दैत्य, ऋषिमुनि व शिवगण हे वारंवार या रम्य व पवित्र महाक्षेत्रास येऊन श्रीवीरभद्र-लिंगाचें दर्शन व षोडशोपचार पूजादिकांनीं सौख्य पावूं लागले. त्या पौराणिक काळीं या पवित्र कृष्णावेणीच्या तीरीं परमपावन श्रीवीरभद्र देवाच्या सान्निध्यांत अनेक ऋषींचे पुण्याश्रम होते, असें पुष्कळ प्राचीन ग्रंथांवरून व पवित्र स्थलांवरून दिसून येतें. असा हजारों वर्षांचा काळ लोटल्यानंतर युगपरिवर्तन होऊन द्वापारयुगांतील रामायणकाळीं ऋषि-गणांनीं गजबजलेला हा प्रदेश किंबहुना हा सर्व दक्षिणापथ [ दक्षिण हिंदुस्थान देश ] ‘ दंडकारण्य ’ या नांवानें ओळखिला जाऊं लागला. त्या काळींही या पुण्यमय कृष्णतटाकीं अनेक महान् ऋषींचे आश्रम असून त्यांच्या इच्छेनुसार त्यांना दर्शन देण्याच्याच केवळ उद्देशानें दाशरथि रामचंद्र या महाक्षेत्रांत आले होते. हें त्यांच्या आगमनाचें स्पष्ट चिन्ह जें ‘ रामगया ’ त्यावरून दिसतें. इतकेंच नव्हे, तर रामपादरजानें

पुनीत झालेलीं पुष्कळ पुरातन पुण्यस्थानें या पुण्यक्षेत्रांत सर्वत्र पसरलेलीं आहेत. तीं नीट निरीक्षण करणाऱ्या भाविकांच्या निदर्शनास आल्यावांचून राहात नाहींत; पण या काळीं दंडकारण्याच्या दक्षिणभागीं वाली-सुग्रीवादि वानर जातीच्या अनार्य लोकांचें राज्य असून त्या पलीकडे लंकेमध्यें रावण-कुंभकर्ण इत्यादि बलाढ्य व सुधारणेंत आर्यांना कोणत्याही तऱ्हेनें हार न जाणाऱ्या प्रबल राक्षसांचें राज्य नांदत होतें. हे बलोन्मत्त राक्षस दंडकारण्यांत सर्वत्र स्वैरसंचार करीत असून त्यांजकडून या रम्य प्रदेशांत ठिकठिकाणीं शांततेनें कालक्रमणा करीत असलेल्या ऋषिगणांना वारंवार त्रास पोहोंचत होता असें दिसतें. या राक्षसांचा बंदोबस्त करून दंडकारण्यांत वास करणाऱ्या असंख्य ऋषिगणांना शांतता प्राप्त करून देण्यासाठींच मुख्यतः दाशरथि रामाची लंकेवरील स्वारी झाली. या घनघोर युद्धप्रसंगाच्या वेळीं वानरांचा राजा सुग्रीव व त्याचा प्रसिद्ध प्रधान हनुमान यांनीं आपल्या अगणित वानरसेनेनिशीं रामचंद्रास उत्तम मदत केली, हें रामायणावरून सर्वांस विदित आहेच. या प्रबळ सुग्रीवाची राजधानी तुंगभद्रानदीतीरीं 'किष्किंधा' नामक नगर होतें. हें हल्लीं नामशेष झालें आहे.

या कालच्या प्रख्यात ऋषींपैकींच मतंग; गालव, परशुरामपिता जमदग्नि व अगस्ति हे होत. पण येथील मूलनिवासी वर सांगितलेले वानर होत. हे सगळीकडे पसरलेले होते; परंतु यांना घरें बांधून गांव वसवून राहण्याचें माहीत नव्हतें. गुहेंत अथवा विशाल वृक्षांच्या ढोलींत हे राहात. वनांत मिळणारीं कंदमुळें व फळें हेंच यांचें अन्न. यांना अग्नीची जरूर भासल्यास लांकडांवर लांकूड घांसून तो तयार करीत! फारतर काय यांना वस्त्रें वापरण्याचें ज्ञानसुद्धां नव्हतें! इतके ते रानटी होते. तथापि यांच्यांत लग्न करण्याची पद्धत प्रचलित होती. यांची राजधानी किष्किंधा नगर असल्याचें मागें सांगितलें आहे. परंतु हें म्हणजे मोठें भव्य नगर होतें अशातला प्रकार नसून, तें 'पंपा' नामक मोठ्या नदीच्या योगानें बनलेल्या त्याच नांवाच्या विशाल सरोवराच्या तीरावर 'ऋष्यमूक' पर्वताच्या पाय-

च्याशीं ही किष्किंधा होती, हिच्यांत मोठमोठे वाडे, हुडे, राजप्रासाद किंबहुना एकादीं लहान झोंपडी वगैरे सुद्धां कांहीं नसून, फक्त एक मोठी गुहा व तिच्या सभोंवार कित्येक मैल आवार धरून बांधिलेला विशाल तट व त्या सभोंवतीं खोल खंदक एवढींच होतीं! ही किष्किंधाच हल्लीं हंपी क्षेत्र बनलें आहे. आणि तुंगभद्रा नदीलाच त्याकाळीं 'पंपा' असें नांव असून या पंपा नांवावरूनच क्षेत्रास हंपी हें नांव पडलें आहे. सध्यां येथें तुंगभद्रेच्या पात्रांत पूर्वकाळीं एकादें मोठें सरोवर असल्याच्या खाणाखुणा स्पष्ट दिसतात. त्या या सरोवराच्याच होत. या प्रदेशांत वानर लोकांच्याच बरोबरीनें शबर (भिल्ल) नांवाचे अनार्य लोक राहात असत. थांच्यांतील एका शबरीनें दाशरथि रामास बोरें आणून दिल्याची कथा रामायणांत आहे. यावेळींचं पश्चिमभागीं समुद्रतीरीं राक्षसश्रेष्ठ रावणाकडून स्थापिलें गेलेलें प्रख्यात गोकर्ण महाबळेश्वर हें लिंग होय.

पुढें कौरव-पाडवांच्या वेळीं म्हणजे भारतकालीं या कर्नाटक प्रांतांत कांहीं राज्यें स्थापित झालीं होतीं. त्यांपैकीं करवीरपुर—(कोल्हापूर) येथें 'शृगाल वासुदेव' नांवाचा राजा राज्य करीत होता. त्यास श्रीकृष्णानें ठार मारून त्याचें राज्य घेतलें व दंडकारण्यांतील बराच भागही यादव राजांनीं पादाक्रांत केला. या यादवांच्या राज्यांतच हें यद्दूर क्षेत्र होतें. कोल्हापूर हें गोमांतक नामक पर्वताच्या पायथ्याशीं आहे, असें महाभारतांत लिहिलें आहे. मत्स्यपुरांत विराटराजा राज्य करीत होता. शालिवाहन शकाच्या १२ व्या शतकापर्यंत हानगल गांवास विराट-नगर हें नांव चालत होतें. आणि हल्लींसुद्धां हानगलमध्यें जुनी तटबंदी व नाट्य शाळेची जागा दाखवितात. त्रिगर्त प्रांतांत सुशर्मराजा राज्य करीत होता. त्रिगर्त म्हणजेच म्हैसूर होय. कारण भागवतांत बलरामानें केलेल्या तीर्थयात्रेचें वर्णन देतांना तो रामेश्वराहून निघून त्रिगर्त प्रांतांमधून गोकर्ण क्षेत्रास गेला असें वर्णन आहे. येथील सुशर्मराजा दुर्योधनाचा मित्र असून त्याजकडे निवातकवच (वायुप्रवेश न होणारा पोषाक करणारे) सैनिक होते. हे बहुधा इजिप्शियन सैनिक असावे असें अनुमान आहे. असो.

याप्रमाणें भारतकालीं म्हणजे इ. सनाच्या पूर्वी चौदाव्या शतकाच्या सुमारास गोमांतक (करवीरपुर); मत्स्य, व त्रिगर्त हीं तीन राज्यें कर्नाटकांत नांदत होतीं हें उघड आहे.

परशुरामानें याच कालीं किंवा याच्या किंचित् पूर्वकाळीं उत्तर हिंदुस्थानांतून कित्येक सारस्वत ब्राह्मणांना आणून कोंकण प्रांतांत ठेविलें आणि कांहीं कोळी म्हणजे मच्छीमार जातीच्या लोकांना ब्राह्मणत्व देऊन पावन केलें! अशी कथा प्रसिद्ध आहे. मल्याळांतील नंबुरी ब्राह्मण हे त्यांचेच वंशज होत असें सांगतात.

---

## [२] उत्तर कर्नाटक प्रांताचा अल्प इतिहास

वरील पौराणिक वर्णन येथेंच पुरें करून पुढील श्रीआद्यकाडदेवरु स्वामींच्या कर्तृत्वाचें मर्म समजण्यास्तव या प्रदेशाचा खरा अल्पेतिहास वांचकाना विदित असणें अत्यंत जरूर असल्यानें त्याचा थोडा परिचय करून देणें क्रमप्राप्त आहे.

भारतीय युद्धानंतर शालिवाहनशकाच्या प्रारंभापर्यंतचा कर्नाटकाचा इतिहास बरोबर समजलेला नाहीं; पण या ज्ञात कालाच्या आरंभीं म्हणजे इ० स० च्या पूर्वी ५ शें वर्षांच्या सुमारास या देशास 'कुंतल' 'नाट' 'लाट' अशीं नांवें असून येथें चंद्रहास नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याच्या पश्चात् म्हणजे शिकंदर बादशहा हिंदुस्थानांत आल्यावेळीं इ० स० पूर्वी ३२७ व्या वर्षी या कर्नाटक प्रांतांत चार रजपूत राजे राज्य करीत असून त्यांपैकीं 'मीरचंद' नांवाचा राजा मिरज येथें सिंहासनारूढ होता. असें फेरिस्ता या इतिहासकारानें लिहिलें आहे. याच काळांत कर्नाटकच्या कांहीं भागांवर बर्बर, शक इत्यादि परदेशच्या लोकांचीं लहान लहान राज्यें नांदत होतीं असें वाटतें. तथापि इ० स० च्या पूर्वी १०० वर्षे उत्तर कर्नाटकाच्या पश्चिम भागावर म्हणजे मिरजेपासून घाटमाथ्यापर्यंतच्या

सर्व प्रदेशावर बौद्ध राजांचा अंमल प्रस्थापित झाला होता. कोल्हापुरांत सांपडलेलीं तांब्याचीं व शिशाचीं नाणीं आणि पितळेच्या मूर्ति यांवरून इ० सनाच्या पहिल्या शतकांत हा प्रांत दख्खनच्या उत्तर भागचे महाप्रतापी राजे शातकर्णि किंवा आंध्रभृत्य यांच्या अगर त्यांच्या प्रतिनिधींच्या अमलाखालीं होता. हें उघड होतें. सह्यपर्वतांतील ह्या भागांत पांडवदरा व जोतीबाच्या डोंगरामध्यें जीं कोरींव लेणीं आहेत तीं याच काळच्या बौद्ध व जैन राजांनीं कोरविलीं असावीं. यांच्यापैकीं कित्येक राजांनीं आपल्या धर्मानुयायी भिक्षुकांना राहण्यासाठीं लेण्यांशिवाय ठिकठिकाणीं रम्य मंदिरें व भव्य विहारही बांधविले, व अनेक नवीन शहरेंही वसविलीं. त्यांपैकींच खिद्रापूर येथील कोपनाथाचें मंदिर हें एक होय. एकंदरींत यांचें राज्य प्रजेस फार सुखप्रद होतें असें दिसतें.

या अवधींतच पैठणचा प्रख्यात राजा ' शालिवाहन ' यानें उत्तर कर्नाटकांत व मध्य हिंदुस्थानांत विस्तार पावलेल्या बर्बर, शिथियन अथवा शक इत्यादि परदेशच्या राजांना जिंकून त्यांना हांकून लाविलें; या विजयाच्या स्मरणार्थ आपला शक चालू केला. हा शक इ. सनाच्या ७८ व्या वर्षीं मार्च महिन्याच्या १४ व्या तारखेस प्रारंभ झाला. हल्लीं दख्खनच्या उत्तरभागीं नर्मदेपर्यंत सर्वत्र हाच शक मानितात. असा हा पराक्रमशाली शालिवाहन राजा जातीनें कुंभार असल्याबद्दल दंतकथा आहेत ! असो.

आंध्रभृत्यापासून हा प्रांत इ० स० ५०० च्या सुमारास पहिल्या कदंब राजांकडे गेला. कदंब राजाची राजधानी बेळगांव जिल्ह्यांतील ' पलाशिका म्हणजे हलशी येथें होती. पुढें पहिल्या कदंब राजांकडून हा उत्तर कर्नाटक प्रांत पश्चिमेकडील चालुक्यांच्या ताब्यांत गेला व इ. स. ५५० ते ७६० पर्यंत सुमारें दोनशें वर्षें राहिला. हा राजवंश मूळचा अयोध्येचा अशी आख्यायिका आहे. यांची मूळ राजधानी विजापूर जिल्ह्यांतील ' बदामी ' ही होय. यांच्या इतकें विस्तृत राज्य, इतक्या दीर्घकालपर्यंत कर्नाटकांत कोणी भोगिलेलें नाहीं. हे चंद्रवंशी रजपूत असून येथें

येण्यापूर्वी नर्मदा नदीच्या उत्तरतीरीं एका प्रांतात यांच्यापैकीं ५९ राजांनीं एकामागून एक याप्रमाणें अविच्छिन्नपणें राज्य केल्याबद्दल लेख सांपडले आहेत. आणि अखेर इ० सनाच्या ५ व्या शतकाच्या अखेर यांच्यांतील जयसिंह नांवाच्या पराक्रमी राजानें दक्षिणेकडे चाल करून कदंब राजाचा पराभव केला व ' कल्याण ' येथें आपलें स्वतंत्र राज्य स्थापिलें. या वंशातील पांचवा पुरुष दुसरा ' पुलकेशी ' ( सन ६१० ते ६४० ) नांवाचा राजा अत्यंत पराक्रमी आणि दानशूर असा निपजला. यानें सर्व कर्नाटकप्रांत आपल्या अमलांत आणिला. इतकेंच नव्हे तर त्यानें उत्तरप्रांतीं व दाक्षिणप्रांतीं मोठमोठाले दिग्विजय केले. एकंदरींत नर्मदेपासून तों कावेरीच्या दक्षिणतीराच्या पलीकडच्या प्रदेशापर्यंत त्यानें आपलें साम्राज्य स्थापिलें. याच्या कारकीर्दींत चालुक्य राजाचे दोन विभाग होऊन पूर्व समुद्रकांठचा प्रदेश याच्या धाकट्या भावाकडे गेला, तथापि हा पुलकेशी अत्यंत बलाढ्य असल्यानें त्यानें पल्लव, गंग वगैरे कर्नाटकांतील सर्व राजांना व नंतर उत्तर हिंदुस्थानावर स्वारी करून तेथील माळव, गुजराथच्या राजानांही सहज पादाक्रांत केलें. शेवटीं कनोजवर चाल करून जाऊन तेथील महाबलाढ्य सार्वभौम चक्रवर्ति ' हर्षवर्धन ' याचा पराभव केला ! नंतर उत्तरहिंदुस्थानांतील बाकीच्या सर्व मोठमोठ्या राजांना त्यानें आपले मांडलिक बनविलें ! उत्तरदिशेचा हा दिग्विजय पूर्ण करून त्यानें दक्षिणेकडे चाल केली व थोड्याच अवधींत पांड्य, चोळ, केरळ यांचीं राज्यें हिरावून घेऊन कोंकणांतील मौर्य राजांनाही हतवीर्य केलें. अशाप्रकारें आसेतु-हिमाचल सर्व हिंदुस्थान पादाक्रांत करून नंतर यानें सार्वभौमत्वदर्शक ' अश्वमेध ' यज्ञ यथासांग पार पाडिला. आणि स्वतांस ' परमेश्वर ' ही पदवी धारण केली. व मोठी कीर्ति संपादिली.

याच्या कारकिर्दींत प्रसिद्ध चिनी प्रवासी ' हुएत्संग ' हा इ० स० ६३९ व्या वर्षीं हिंदुस्थानांत आला होता. त्यानें या राजास पाहिलें होतें त्यानें या पुलकेशिचें साम्राज्य व त्यांतील प्रजेचा पराक्रम व सरळपणा या-

संबंधीं प्रशंसापूर्वक उद्गार काढले आहेत. चालुक्य वंशांतील बहुतेक राजे जैनधर्मास व वैदिकधर्मास सारखाच मान देत, असें दिसतें. ह्याच वंशाच्या कारकीर्दींत बौद्धधर्माचा ऱ्हास व वैदिकधर्माचा पुन्हां उत्कर्ष होऊं लागला. पुलकेशी राजानें अनेक यज्ञ केले. त्यानें व त्या वंशांतील दुसऱ्या पुरुषांनीं दिलेलीं अनेक ताम्रपत्रें व शिलालेख सांपडलेले आहेत, त्या बहुतेकांवरून महायाज्ञिकांना त्यांनीं दानें दिल्याचें दिसून येतें.

## [ ३ ] हिंदुधर्माचा पुनरुद्धार

राष्ट्रकूट वंशाच्या अमदानींत उत्तर हिंदुस्थानांत बौद्ध धर्माचा प्रसार फार झाला होता. त्यांनीं आपल्या भिक्षुकांना राहण्यास व धर्मोपासनेसाठीं बांधिलेलीं विशाल मंदिरें पाहून सामान्य हिंदु जनांचीं मनें तिकडे वेधूं लागलीं. व त्यांच्या मंदिरांत खोदून काढिलेल्या प्रचंड अशा बौद्ध मूर्ति पाहून आपल्याही देवतांच्या अशा मूर्ति असाव्या असें त्यांना वाटूं लागलें. बौद्ध धर्मांत बुद्ध, धर्म आणि संघ अशी जी त्रयी होती त्या त्रयीप्रमाणें आपल्यांतही असावी, अशी सामान्यजनांत जी बुद्धि उत्पन्न झाली; तिला मार्ग दाखविणें अत्यंत जरूर झालें. तेव्हां तत्कालीन हिंदुधर्मशास्त्रकारांना बौद्ध धर्मांत सामान्य जनांस आकर्षण करणारा जो भाग दिसला, तो प्राचीन हिंदुधर्माशीं विसंगत नसून वेदांतील ब्रह्मणस्पति, विष्णु व रुद्र ही देवतात्रयी, त्या बौद्धत्रयीपेक्षां सरस असून, त्यांची उपासना यज्ञयागादिकांनीं केली काय किंवा मूर्तिद्वारें केली काय दोन्ही सारखींच होत; असा समज करून देणें भाग पडलें. आणखी बौद्ध व जैन मतांतील अहिंसादि उत्तम तत्त्वें, आपल्या उपनिषदादि धर्मग्रंथांतून उद्धृत केलीं असून, आपली आर्यमीमांसा बौद्धमीमांसेपेक्षां श्रेष्ठ आहे; त्यामुळें बौद्धधर्मानें जें काय अंतीं मिळणार तेंच फळ आपल्या आनंदमय आर्यधर्मानें व्यक्तिमात्रास प्राप्त होणें अगदीं सुलभ आहे, असें लोकांच्या मनावर ठसवून त्यांची बौद्धधर्माकडे होणारी प्रवृत्ति नष्ट करून आर्यधर्माकडे त्यांचीं मनें

खेंचून आणावीं लागलीं. म्हणजे एकपरी बौद्ध व जैन मतांचें खंडन करून आपल्या धर्मांत व तत्त्वज्ञानांतही कालपरिस्थितीस अनुसरून त्या त्या धर्मांतील अहिंसादि उत्तम तत्त्वें विशेषत्वानें समाविष्ट करून घेऊन आपला सुधारलेला धर्मपंथ लोकांत प्रचलित करावा लागला. तेव्हां परधर्माकडे वळणारा जनांचा ओघ थांबून परधर्मांत गेलेले असंख्य लोकही पुनः आपल्या पूर्वीच्या वैदिक धर्मांत परत येऊन निरनिराळ्या पंथांत समाविष्ट झाले. अर्थात् बौद्ध व जैन धर्मांचे अनुयायीच कमी झाल्यानें थोड्याच काळांत त्यांच्या राज्यांनाही उतरती कळा लागली. हें काम, म्हणजे बौद्ध-धर्मास दूर सारून हिंदुधर्मास ह्या रीतीनें पुन्हा चालन देण्याचें प्रचंड कार्य, श्रीआद्यशकराचार्य व त्यांचे गुरु कुमारिलभट्ट व तत्कालीन अनेक सत्पुरुषांनीं मिळून केलें. त्यांनीं अत्यंत परिश्रम करून बौद्ध धर्माचें भरतखंडांतून समूळ उच्चाटन केलें. हें कार्य इ. सनाच्या नवव्या शतकाच्या पूर्वार्धांत झालें.

---

## [४] बिज्जळ व श्रीबसवेश्वर

चालुक्यवंशीय दुसऱ्या सत्याश्रयानें इ. स. ९७३ मध्यें राष्ट्रकूट वंशाचा पाडाव करून स्वतांचें राज्य पुनः स्थापिलें. तें तिसऱ्या तैलप राजा-पर्यंत निरातंक चाललें. त्या राजांच्या कारकीर्दींत कर्नाटकांत अद्याप अल्प-प्रमाणांत बौद्धधर्म प्रचलित होता असें दिसतें. वर सांगितलेल्या तैल-पाच्या कारकीर्दींत तेलगू देशाचा राजा रुद्रदेव हा त्याजवर चालून येऊन त्यानें त्याचा अगदीं मोड केला. या पराजयानें चालुक्यांचा दरारा नष्ट झाला. त्यामुळें हल्लींच्या म्हैसूर प्रांतांत नोनंबवाडी नामक गांवीं असलेला त्यांचाच बिज्जळ नामें जैन सरदार प्रबळ झाला, व त्यानें एकदम चालुक्यांची राजधानी जी कल्याणपूर तिच्यावर चाल केली; आणि तैलप राजास देशोधडीस लावून आपण सिंहासनारूढ झाला. बिज्जळ हा कलचूरी अथवा कलभूरी वंशांतील राजा होय. त्याचे पूर्वज पूर्वकालीं इ० स० २५० च्या सुमारास बुंदेलखंडांत कालिंजर येथें राज्य करीत होते,

असें समजतें. हे आपण हैहय कुलांतील कार्तवीर्यार्जुनाचे वंशज आहों असें सांगतात. सहाव्या शतकांत हे कर्नाटकांत आले; व चालुक्याचे मांडलिक अथवा सरंजामदार बनले. पुढें अनुकूल काल येतांच वर सांगितल्याप्रमाणें बिज्जळ हा कल्याणचा राजा झाला. त्यानें वीरशैव मतोद्धारक श्रीबसवदेवास आपला मुख्य मंत्री केलें. या महानुभाव बसवेश्वरांनीं जीर्ण झालेल्या वीरशैव मताचा पुनरुद्धार करून त्याची असंख्य जनांस दीक्षा दिली, व वीरशैव मताचा कर्नाटकांत फैलाव केला. त्यामुळें लक्षावधि लोक श्रीबसवेश्वरांचे अनुयायी होऊन त्यांचें वजन अतोनात वाढलें. परंतु त्यांचें वर्चस्व बिज्जळ राजास सहन न होऊन तो श्रीबसवेश्वराचा द्वेष करूं लागला व ‘ हे मतप्रसाराचें कार्य बंद केल्यावांचून तुम्हास मंत्रीपदावर ठेवणें मला शक्य नाहीं. ’ असें त्यानें श्रीबसवेश्वरांस बोलून दाखविलें. तेव्हां निस्पृही व सत्यप्रिय श्रीबसवेश्वरांनीं तत्काळ मंत्रिपदाचा त्याग केला. व कुडलसंगमक्षेत्राची (कृष्णा व मलप्रभा यांचा संगम जेथें झाला आहे, तें ठिकाण) वाट धरिली ! त्यावेळीं सर्व कल्याणपूर चिंताग्रस्त झालें व जणूं काय आपला आधारस्तंभच ढांसळला असें प्रत्येकास वाटूं लागलें, आणि मंत्रीपद न सोडण्याबद्दल कल्याणपट्टणांतील लोकांनीं त्यांना परोपरीनें विनविलें, परंतु या आग्रही पुरुषानें तें नाकारिलें व ते संगम-क्षेत्रीं निघून गेले. त्यावेळीं सर्व लोक त्यांच्या मागें लागले, व नगर ओस पडलें. ही लोकांची आपल्या वरील निष्ठा पाहून बसवदेवांनीं नमतें घेतलें, व कल्याणपुरांत राहणें आपल्या तत्त्वाच्या आड येत नाहीं, असें पाहून लोकांच्या आग्रहास मान देऊन ते पुन्हां कल्याणपुरास परत येऊन तेथेंच राहिले. श्रीबसवेश्वराबद्दल प्रजाजनांत किती आदर आहे हें बिज्जळ राजास कळून येऊन त्यानें बसवेश्वरांनीं जरी मंत्रीपद सोडिलें होतें तरी त्यांच्याच एका प्रमुख अनुयायास म्हणजे चेन्नबसवण्णास सचीव पद दिलें.

इकडे बसवदेवाचें धर्मप्रसारकार्य पूर्वापेक्षां जास्त जोरानें चालून सर्व कर्नाटकांत त्यायोगें खळबळ उडून गेली; आणि कर्मप्रधान व जन्मजात वर्णव्यवस्थेला प्राधान्य देणाऱ्या ब्राह्मण धर्मास कंटाळलेले लाखों लोक या

नवीन समतावादी व विश्वव्यापक मतांत शिरून समाधान पावूं लागले. याप्रमाणें यांच्या अनुयायांची संख्या दिवसेंदिवस वाढत चाललेली पाहून, स्वार्थी व परंपराप्रिय जनतेच्या दृष्टीला हें विश्वव्यापक तत्त्व विषाप्रमाणें वाटून, त्यांस व खुद्द बिज्जळ राजासही अत्यंत चीड आली; व त्यानें या कृत्यांत पुढाकार घेणाऱ्या दोघां बसवानुयायांस अविचारानें बैलांच्या पायांस बांधून ठार केलें! त्यामुळें चेन्नबसवण्णा सचिवास अत्यंत राग येऊन त्यानें बसवेश्वराच्या इच्छेविरुद्ध आपल्या अनुयायांकरवीं बिज्जळाचा इ० स० ११६७ सालीं खून करविला! हें आपल्या अनुयायांचें कृत्य पाहून श्रीबसवेश्वरांस फार वाईट वाटलें व ते लवकरच कल्याणपूर सोडून संगमक्षेत्रीं जाऊन राहिले. नंतर केवळ दहाच वर्षांनीं ते संगमक्षेत्रींच शिवैक्य पावले. इकडे बिज्जळ राजाचा खून होतांच त्याचा पुत्र सोमेश्वर यानें चेन्नबसवण्णाचें तें बंड मोडून त्याचा पाठलाग केला, परंतु तो उळवी क्षेत्राकडे अरण्यांत पळून गेला; व तेथेंच गुप्त स्थितींत मरण पावला. या चेन्नबसवण्णाच्या अविचारी वर्तनानें वीरशैव धर्माची अत्यंत हानि होऊन त्याच्या प्रसाराचें कार्य त्यावेळीं तरी बंद पडलें. तेंच महत्कार्य या उत्तरकर्नाटकांत बसवेश्वराचेच समकालीन श्रीआद्यकाडदेवरु स्वामी या शिवावतारी सत्पुरुषानें केलें. या साधुवर्यांच्या चरित्र–कथनास आरंभ करण्यापूर्वीं मागील इतिहासाची आपल्या चरित्र नायकाच्या अवतार–कालापर्यंत संगति जोडून देणें जरूरीचें आहे.

## (५) देवगिरीचे यादव व कोल्हापूरचे शिलाहार राजे

इ० सनाच्या ११ व्या शतकाच्या शेवटीं यादव कुळांतील सिंहण नांवाच्या महापराक्रमी राजानें देवगिरि म्हणजे दौलताबाद येथें एक स्वतंत्र राज्य स्थापिलें. द्वारसमुद्राचे बल्लाळ राजे हेही जरी यादव-कुळाचेच होते तथापि यांचा त्यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं, उलट दोघांमध्यें द्वेषाग्नि

धुमसत होता असें दिसतें. चालुक्यांची समाप्ति होतांच त्यांच्या राज्याचा सर्व दक्षिणभाग कृष्णा नदीपर्यंत बल्लाळ राजांनीं आक्रमिला व उत्तरभाग देवगिरीच्या यादवांनीं पादाक्रांत केला. चालुक्य राज्य नष्ट झालें त्या संधीस म्हणजे इ० स० ११८३ सालीं देवगिरि येथें 'बिल्हण' हा राजा झाला. त्यावेळीं अण्णीगेरीपर्यंत त्याच्या राज्याचा विस्तार झाला होता. त्याचा बाजीराव नांवाचा महामंडलेश्वर 'मल्लोड' प्रांताचा अधिकारी असून, तो त्या सर्व भागावर इ० स० ११९१ सालीं सत्ता चालवीत होता असें समजतें. बिल्हण हा कांहीं काळ विजापूर येथेंही राज्य करीत होता. परंतु या वंशांत दुसरा 'सिंहणराजा' हा अत्यंत पराक्रमी निपजला. हा इ० स० १२१० मध्यें देवगिरि येथें सिंहासनारूढ झाला. यानें कोल्हापूरच्या शिलाहार वंशाचा शेवटचा राजा जो दुसरा भोज त्याचा इ० स० १२१३ सालीं पूर्ण पराभव करून त्याचें राज्य हिरावून घेतलें. नंतर कृष्णा नदीच्या उत्तरेकडील सर्व प्रदेशावर आपली सत्ता दृढमूल करून तुंगभद्रेपर्यंत उत्तर कर्नाटकाच्या विशाल भागावर स्वाऱ्या करून आपला दरारा बसविला, असें शिलालेखांवरून समजून आलें आहे. याच महापराक्रमी यदुकुलावतंस सिंहण राजाचा आपल्या पुढील कथाभागाशीं अत्यंत निकट संबंध आला आहे. याच्याच कारकीर्दींत प्रमथगणाधीश्वर अवतारी श्रीआद्यकाडदेवरु स्वामींच्या अवतारकार्यांचा प्रारंभ झाला आहे. त्याविषयीं सविस्तर विवेचन करण्यापूर्वीं मागील इतिहासाची संगति जुळण्यास्तव या पराक्रमी यादव वंशाची इतिश्री केव्हां कशी झाली हें सांगून कोल्हापूरच्या शिलाहार राजांची त्रोटक माहिती देणें क्रमप्राप्त आहे. असो या पराक्रमशाली सिंहण राजानंतर इ० स० १२७१ पर्यंत सहा राजांनीं राज्य केल्यावर या वंशांतील दहावा 'रामराजा' गादीवर बसला. याच्या कारकीर्दींत इ० स० १२९४ सालच्या अखेरीस मुसलमानांच्या स्वाऱ्या दक्षिणेंत होऊं लागल्यावर पुढें काय झालें तें इतिहासज्ञांस सांगणें नको.

(१) कर्नाटकांतील घाटमाथ्यावरचा व त्याच्या जवळचा जास्त पावसाचा प्रदेश.

चालुक्यांच्या पूर्वी शिलाहार वंशाचे राजे कोंकणप्रांतीं राज्य करीत असत. इ. सनाच्या ९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत उत्तर कोंकणांत ठाणें येथें एक व दक्षिण कोंकणात गोंवें येथें एक, असे दोघे शिलाहार राजे राज्य करीत होते. यांशिवाय कोल्हापूर येथें शिलाहाराची तिसरी शाखा त्याचवेळीं सिंहासनारूढ होती. म्हणजे मिरज, शेडबाळ, रायबागपर्यंत प्रदेशावर १० व्या शतकापासून तेराव्या शतकाच्या प्रारंभकालापर्यंत हे राज्य करीत होते. त्यांचा ध्वज गरुडचिन्हांकित होता. तसा असण्याचें कारण एका शिलालेखावरून असें कळून येतें कीं, ' यांचा मूळपुरुष जो विद्याधर जीमूतवाहन यास नागकुलांतील राजा ' शंखचूड ' हा गरुडाकडून पीडित झाल्यानें शरण आला. तेव्हां शरण आलेल्यास मरणाच्या द्वारीं ढकलणें हें वीरपुरुषाचें ब्रीद नसल्यानें त्यानें स्वतःचें मांस गरुडास खावयास देऊन शंखचूड नागाचें रक्षण केलें ! ' म्हणून त्यांचा ध्वज गरुडचिन्हांकित झाला. हे राजे जैनधर्मी असून यांची कुलदेवता कोल्हापूरची महालक्ष्मी होय. तिला त्याकाळीं पद्मावति असें नांव होतें. शिलाहारांना ' तगरपूर पराधीश्वर ' अशी बिरुदावळी होती. तगरपूर म्हणजेच कोल्हापूर होय. हें तगरपूर इ० सनाच्या २ ऱ्या शतकांत प्रसिद्ध व्यापारी पेठ होती असें प्रसिद्ध ग्रीक इतिहासकार तालेमी यानें लिहिलें आहे. त्यावरून कोल्हापूर हें अत्यंत पुरातन नगर असून तेथें फार प्राचीन काळापासून शिलाहार राजे राज्य करीत होते असें सिद्ध होतें.

या वंशातील शेवटचा दुसरा भोज हा या घराण्यांतील अत्यंत पराक्रमी, दानशूर व वैभवशाली राजा होऊन गेला. त्याच्या राज्याचा विस्तार साताऱ्यापासून हिरण्यकेशी नदीपर्यंत होता व कोंकणांतील बराच भागही त्यांजकडे होता. त्यानें आजरे खिद्रापूर, वगैरे ठिकाणचीं जैनमंदिरें दुरुस्त करून पुष्कळ नवींही बांधविलीं. शिवाय त्यानें बरेच किल्ले बांधविले. हल्लीं कोल्हापूरच्या हद्दींत असणारे पन्हाळा, खेळणा किंवा विशाळगड, सामानगड, भुदरगड इत्यादि प्रसिद्ध किल्ले त्यानेंच बांधिले. त्यानें पहाडांतील सर्व मस्त सरदारांना जमिनदोस्त करून तेथील धामधुमी कमी केली,

ह्मणून त्यास 'मस्त सरदारांस जमिनदोस्त करणारा वज्र' असें नामाभिधान होतें. अशा त्या बलाढ्य भोजराजाचा पूर्ण पराभव करून त्याचें राज्य, इ. स. १२१३ च्या सुमारास मागें सांगितल्याप्रमाणें देवगिरीच्या पराक्रमशाली सिंहण राजानें आपल्या ताब्यांत घेतलें; म्हणून त्यास एका शिलालेखांत 'बलाढ्य भोज सर्पाचा संहारक केवळ गरुड' असें म्हटलें आहे ते यथार्थ आहे. असो. याप्रमाणें शिलाहार वंशाचा शेवट झाला; आणि पुढें १०० वर्षांतच श्रेष्ठ यादव वंशाचाही मुसलमानांकडून उच्छेद कसा झाला, हें मागें सांगितलेंच आहे. यावरून मुसलमानांचा दक्षिणेंत प्रवेश होण्यापूर्वीं दोन प्रमुख राजघराणीं म्हणजे देवगिरीचें यादव व द्वारसमुद्राचे बल्लाळ हीं येथें नांदत होतीं; यांशिवाय वरंगूळ येथें आंध्रभृत्य राजे राज्य करीत असून पूर्वसमुद्रापर्यंत थोडा प्रदेश त्यांच्या ताब्यांत होता.

---

## [६] हिंदुधर्माची स्थिति व वीरशैव धर्माचें कार्य.

सुल्तान अल्लाउद्दीनाचा पराक्रमी सरदार मलिक काफूर यानें इ. स. १३१८ मध्यें देवगिरीचें राज्य खालसा करून लागलेंच द्वारसमुद्राच्या बल्लाळांचाही नायनाट करून तें नगर लुटून ओस पाडिलें. तेव्हांपासून त्यास हल्लीं 'हळेबीड' म्हणतात. आणखी ३।४ वर्षांतच त्यानें वरंगूळ येथील आंध्रभृत्यांना देशोधडीस लावून थेट रामेश्वरापर्यंत चाल केली. अल्लाउद्दीन इ. स. १३१५ मध्यें मरण पावल्यानंतर लवकरच त्याचें राज्य तुघलक घराण्याकडे गेलें. त्या घराण्यांतील महंमद तुघलखानें इ. स. १३२७ त दक्षिणेंत स्वारी करून कर्नाटकप्रांत समुद्रतीरापर्यंत संपूर्ण लुटून उजाड केला! आणि नंतर देवगिरीस 'दौलताबाद' असें नांव देऊन तेथेंच तो राहिला. याप्रमाणें १०।२० वर्षांत दक्षिणेंतील तीन्ही राज्यें निर्मूल होऊन महाराष्ट्र, तेलंगण व कर्नाटक या सर्व प्रांतांतून अराजक स्थिति उत्पन्न झाली व लुटालूट, दंगे, दरोडे यांचा सर्वत्र सुकाळ झाला. अशा परिस्थितींत कोणाही बलिष्ठाचें फावतें, या नियमास अनुसरून

दक्षिणेंत दोन नवीन बलिष्ठ राज्यें निर्माण झालीं तीं—१ बहामनी व २ विजनगरचें राज्य, हीं होत. यानंतर साधारणपणें स्थिरस्थावर होत चाललें.

अशा अराजक व सर्वतोपरी निराशाजनक परिस्थितींत हिंदुधर्माची त्यांतही आपल्या वीरशैवधर्माची काय स्थिति असेल याविषयीं येथें दोन शब्द सांगणें अस्थानीं होणार नाहीं. नवव्या शतकाच्या प्रारंभीं श्री आद्य शंकराचार्यांदिकांनीं बौद्ध व जैन मतांचें खंडन करून हिंदुधर्माची नवीन घडी बसवली त्यावेळीं बौद्धांपूर्वीं ज्याप्रमाणें यज्ञयागांच्या नांवाखालीं प्राण-हानि होत होती व जीमुळेंच श्रीगौतमबुद्धांचें 'अहिंसा' तत्व थोड्याच काळांत सर्वमान्य होऊन बौद्धधर्माला कोट्यवधि अनुयायी अल्पाव-धींत मिळाले; ती हिंदुधर्मास रसातळास पोंचविणारी प्राणिहिंसा व तन्निमित्त होणारे ते पशुयज्ञ, श्रीआद्यशंकराचार्यांनंतर पुष्कळ कमी झाले. परंतु तिच्या ऐवजीं जातिभेदाची तीव्रता वाढविणारी 'मूर्तिपूजा' प्रचारांत आली. बौद्धधर्माचा पाडाव करून सामान्य जनतेच्या समजुतीसाठीं हिंदु-धर्मशास्त्रकारांनीं जी देवतात्रयी प्रत्यक्ष मूर्तिरूपानें पूजण्यास परवानगी ठेवली, त्या तीन देवतांऐवजीं, त्यांच्या या नूतनोद्धरित असंख्य अनुयायांनीं 'बापसे बेटा सवाई' या म्हणीप्रमाणें थोड्याच काळांत आपल्या पूजनीय देवतांची संख्या कल्पनातीत वाढवून ती 'तेहतीस कोटी' पर्यंत नेऊन भिडविली! थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास इतकेंच म्हणतां येईल कीं, वेद, उपनिषदें व स्मृति, पुराणादि धर्मग्रंथांतील प्रत्येक नांवागणिक एकेक देवमूर्तीचा उद्भव झाला! असें म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. ह्या कोट्यवधि देवांच्या उत्पत्तीबरोबरच त्या प्रत्येकाबद्दल रसभरित वर्णनांचीं पुराणें प्रसिद्ध झालीं, आणि प्रत्येक देवाच्या पूजकांचा एक संघ बनत चालला. त्या त्या देवतांच्या पूजापद्धति व आराधनेचे अनेक प्रकारचे विधि अस्तित्वांत आले. शिवाय त्याच वेळीं पूर्वींच्या गुणकर्मांवरून ठर-णाऱ्या वर्णव्यवस्थेऐवजीं अनेक जातिभेद रूढ झाले, व ते जन्मावरून ठरूं लागले. या जन्मजात जातिभेदांचा जसजसा प्रसार होत गेला, तस-तसें स्पर्शास्पर्शाचें भूत बळावत चाललें, त्यायोगानें समाजाचीं छकलें

होऊन हिंदुधर्म अत्यंत खिळखिळा झाला. याप्रमाणें गुणकर्मांचें महत्त्व कमी होऊन जन्मजात उच्चनीचत्वाची परमावधि झाली. त्या अत्यंत आणीबाणीच्या वेळीं कर्नाटकांत श्रीबसवेश्वरासारख्या समतावादी महानुभावाचा जन्म झाला व त्यांनीं ही कृत्रिम उच्चनीचतेची रूढि झुगारून देऊन, श्रुति, उपनिषदें व आगमप्रणीत शुद्ध वीरशैव-तत्त्वांचा जनतेंत फैलाव केला. वीरशैव धर्मांत उच्चनीचत्वादि भावनांस मुळींच अवसर नसून धर्मदृष्टीनें सर्वांची म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, अतिशूद्र चांडाळादिकांचा व स्त्रिया मुलांचाही दर्जा समान असून स्पर्शास्पर्शांचें बंड मुळींच नाहीं. शिवाय अनेक देवतापूजन व यज्ञयागादि कर्म-मार्गांचे अवडंबर अजीबाद नसून, फक्त एका शिवाराधनेनें आत्मस्वरूपाची ओळख करून घेणें अत्यंत सुलभ आहे. यामुळें जन्मजात वर्णव्यवस्थेच्या रगाड्याखालीं चिरडलेल्या व स्पर्शास्पर्शादि भेदभावानें नीचत्व पावलेल्या असंख्य अज्ञ जनतेला वरील वीरशैव धर्मांचा मार्ग मोकळा होतांच अत्यंत आनंद झाला. व ते सर्व गांजलेले लोक या धर्मांच्या शीतल छायेखालीं येण्यास तत्काळ तयार झाले. या कारणानें त्यावेळीं वीरशैव धर्मानुयायांची संख्या अतोनात वाढली, आणि सर्व कर्नाटकांत व त्यांच्या आसपासच्या भागांत हे वीरशैववीर पसरले. त्यांनीं कर्नाटकाची सामाजिक, धार्मिक व सांपत्तिक बाबींची अत्यंत सुधारणा केली. परंतु चेन्नबसवण्णाच्या अविचारी कृत्यानें श्रीबसवेश्वरांना आपल्या अवताराची समाप्ति लवकर करावी लागल्यामुळें त्यांच्या अनुयायांमध्यें जो विस्कळितपणा येऊं पाहात होता तो न होऊं देतां त्यांच्यामध्यें वीरशैवधर्मतत्त्वें स्थिर करून जोम उत्पन्न करण्याचें कार्य जोरानें पुढें चालवून यवनांकडून आपल्या धर्मानुयायांस त्रास पोहोंचूं न देण्याची विशिष्ट प्रकारची दूरदर्शीपणाची कामगिरी ज्या महात्म्यांनीं केली. त्यांच्या चरित्रवर्णनाकडे आतां आपण वळूं.

---

## [७] श्रीआद्यकाडद्देवरुस्वामींचा जन्म व सद्गुरुदर्शन

या चरित्रनायकाच्या जन्मापूर्वीं कर्नाटकची किंबहुना सर्व दक्षिणहिंदु-

स्थानची राजकीय परिस्थिति, तशीच हिंदु, बौद्ध, जैन, व मुसलमानी धर्मांची हालचाल कशा प्रकारची होती, आणि वीरशैव धर्माची अवस्था कशी होती, तें नीट ध्यानीं येण्याकरितां इतका विस्तार करावा लागला. कारण आमचे चरित्रनायक हे नुसते धार्मिक महात्मे होते, इतकेंच सांगण्यानें भागणार नसून, ते अत्यंत व्यहारचतुर दूरदर्शी सत्पुरुष होते. त्यांनीं तत्कालीन परिस्थितीची सूक्ष्म पारख करून आपल्या वीरशैव समाजास जें वळण लावून दिलें, त्यामुळेंच हा समाज व त्याचा धर्म हे आजतागायत अनेक धार्मिक व राजकीय वावटळींतून सुरक्षित पार पडले आहेत! अशा सर्वगुणसंपन्न महात्म्यांच्या सामाजिक, धार्मिक व राजकीय कर्तृत्वाचें मर्म समजण्यास तत्कालीन समाजपरिस्थिति पूर्णपणें माहीत असणें अत्यंत अगत्याचें असतें, म्हणूनच विस्तारभयाची विशेष फिकीर न करतां वरील विवेचन केलें आहे. असो.

वर सांगितल्या प्रकारच्या अत्यंत धामधुमीच्या काळांत गुंडेवाडी (तालुका अथणी) गांवांतील एका अत्यंत सच्छील वीरशैव–जंगम–घराण्यांत शके १०४२ (इ. स. ११२०) सालीं आमचे चरित्रनायक श्रीआद्यकाडदेवरु योगीश्वरांचा जन्म झाला. त्यांच्या बालपणाचें नांव काय व वृत्ति कशी होती वगैरेसंबंधीं विशेष माहिती मिळत नाहीं. मात्र तेव्हांपासूनच त्यांची धर्ममार्गाकडे प्रवृत्ति असून बुद्धि अत्यंत चलाख व स्वभाव फारच शांत होता; हें सर्व पाहून हा कोणी तरी थोर सत्पुरुष होणार अशी अटकळ सर्व लोक बांधीत असें कळतें. तसेंच यांचें शिक्षण कोठें झालें हें जरी निश्चित समजत नसलें, तरी हे तारुण्यांत येतांच जनरूढीप्रमाणें त्यांच्या प्रेमळ मातापित्यांनीं लग्नाची गोष्ट काढितांच त्या निस्पृह त्यागी पुरुषानें विवाहशृंखलेनें स्वतःस जखडून घेण्याचें साफ नाकारिलें; आणि आपली जन्मभूमि व प्रेमळ मातापित्यांचाही त्याग करून योगसाधनास्तव ते अरण्यांत निघून गेले! असें ऐकण्यांत येतें. [ जगांतील सर्व तत्त्वैकनिष्ठ सत्पुरुषांचा वर्तनक्रम बहुधा एकसारखाच असतो. श्रीकाडदेवरु स्वामींचा गृहत्यागही अशाच प्रकारचा होय. ]

तेथें अनेक वर्षें तपश्चर्या केल्यावर त्यांना यौगिक सामर्थ्य आलें; पण सद्गुरुकृपेवांचून आत्मज्ञानाची पूर्णता होत नाहीं हें ते जाणून असल्यानें सद्गुरुदर्शनार्थ ते आपलें आचार्यपीठ बाळेहळ्ळी इकडे गेले. शेवटीं अनेक वर्षांच्या दिव्य तपःसिद्धीनें त्यांना पंचाचार्य-प्रमुख, युगानुयुगीं धर्मरक्षणार्थ दिव्य देहानें वावरणारे प्रत्यक्ष परमात्मा श्रीसदाशिवस्वरूप जगद्गुरु—

## श्रीरेवणसिद्ध [ रेवणाराध्य ]

सद्गुरूंचा साक्षात्कार झाला. त्यामुळें त्यांचा सर्व मायामोह नष्ट होऊन दिव्यदृष्टि प्राप्त झाली. नंतर रेवणसिद्धांनीं त्यांना मंत्रोपदेश करून वीरशैव-मतोद्धाररूपी अवतारकार्य करण्याची आज्ञा देऊन ते अंतर्धान पावले. गुर्वाज्ञेनुसार श्रीकाडदेवरुस्वामी संचारार्थ निघाले ते फिरत फिरत करवीरक्षेत्रीं आले. त्याकाळीं तेथें माई या नांवाची सिद्ध पुरुषांचा गर्व

१ येथें कोणी अशी शंका घेतील कीं, कृतयुगामध्यें वीरशैव-मत-स्थापनेस्तव अवतार धारण करणारे श्रीरेवणाराध्य (रेणुकाचार्य) या कलियुगांत कसे भेटले ? तर याचें समाधान करण्यास फारसें दूर जाणें नको. रेवणाराध्यासंबंधीं असा इतिहास ऐकण्यांत येतो कीं, हे आचार्य अयोनिसंभव असल्यानें अमर आहेत, व युगानुयुगीं धर्मरक्षणार्थ अनेक कार्यें करीत आले आहेत. त्यांतील कृतयुगामध्यें वीरशैव-धर्म-स्थापना, त्रेतायुगांत-रावणबंधु बिभीषण यांच्या इच्छेनुसार पृथ्वीतलावर तीन कोटि लिंगाची स्थापना करण्याची कामगिरी, द्वापारांत अगस्ति ऋषींना लिंगधर्मोपदेश, व कलियुगांत श्रीमदाद्यशंकराचार्य (शृंगेरी) स्वामींना 'चंद्रमौलीश्वर' लिंग देऊन त्यांचा मोक्षमार्ग सुलभ करून देऊन, वीरशैव धर्माचें मालिन्य हटविण्यास्तव अनेक अवतारदेही उत्पन्न करणें इ. त्यांपैकीं श्रीनंदिकेश्वराचें अवतारदेही महानुभाव श्रीबसवेश्वर व शिवावतारी श्रीआद्यकाडदेवरु व श्रीवीरभद्रावतारी श्रीमडिवाळ मान्चिदेव इ. मुख्य होत.

श्रीरेवणाचार्य यांनाच 'रेवणाराध्य' अथवा 'रेवणसिद्ध' अशींही नांवें असून यांचा समाधियोग सातशें वर्षांचा व जागृतियोग सातशें वर्षांचा आहे व सांप्रत त्यांचा समाधियोग संपत आला असून लवकरच जागृतियोग येणार, असें कित्येकांचें मत आहे.

अशाप्रकारचे हे शिवस्वरूपी अवतारी महात्मे असल्यानें भक्तांच्या उत्कट इच्छेनुरूप त्यांना कोणत्याही काळीं दर्शन देणें शक्य आहे. अशाच प्रकारचें दर्शन श्रीआद्यकाडदेवरु यांना घडणें शक्य आहे.

हरण करणारी एक योगिनी होती. तिनें आपल्या पणानें कित्येक सिद्धपुरुषांना जिंकून 'सिद्धागिरी' डोंगरावरील एका बंदिखान्यांत कोंडिलें होते तर आणखी कित्येकांच्या गळ्यांत कवड्यांच्या माळा बांधून रंकाळ्यांत खडक फोडण्याचें काम लाविलें होतें, असें ह्मणतात. अशा स्थितींत श्रीआद्यकाडदेवरुस्वामींचा कोणी मरुळसिद्ध नामें शिष्य फिरत फिरत करवीरक्षेत्रीं आला. त्याचें सत्व हरण करण्यास्तव माईनें आपल्या मायारूप विषाचा पेला त्याजपुढें ठेविला; तो आपल्या असामान्य तेजानें स्वीकारून त्यानें पचविला, व माईचा पण जिंकिला; पण तिची पूर्ण भ्रांति फेडण्याबद्दल त्यास गुरूंची आज्ञा नसल्यानें तो परत गुरुजीकडे गेला व त्यांना तिजकडे येण्याविषयीं व तिच्या प्रश्नांचीं पूर्ण उत्तरें देण्याविषयीं विनंति केली. श्रीकाडदेवरुस्वामिनीं त्याची विनंति मान्य करून ते तिजकडे गेले, व मायेचें सर्व मायाविष प्राशन करून तिचा पण जिंकिला इतकेंच नव्हे, तर तिच्या सर्व भ्रांतीचें निरसन करून तिला हतवीर्य केलें ! त्यामुळें तिचा अभिमान नष्ट होऊन ती अत्यंत नम्र झाली आणि श्रीकाडदेवरु स्वामींना शरण आली. अशाप्रकारें तिचें अवतार—कार्य संपतांच तिच्या देहाची एक किनरी (एक प्रकारचें वाद्य) बनवून त्यांनीं ती आपल्याजवळ ठेविली ! ती ते नेहमीं वाजवीत असत, असें दिसतें.

याप्रमाणें प्रबळ 'माई' चें मर्दन केलें म्हणून श्रीकाडदेवरु स्वामी या भागीं 'श्रीकाडसिद्ध' या नांवानें प्रसिद्ध झाले. कानडींत 'काड' याचा अर्थ 'छळणें' असा आहे; म्हणून 'माईला छळलें' या अर्थीं हा शब्द असावा; तर कित्येकांच्या

१ 'नित्यनेमावली' नामक एक मराठी पुस्तक जमखंडीच्या कोणी चिक्कोण नांवाच्या गृहस्थांनीं सन १९२४ सालीं प्रसिद्ध केलें असुन त्याच्या प्रस्तावनेंत सदर गृहस्थांनीं असें अनुमान काढिलें आहे कीं, 'नवनाथांपैकीं' प्रसिद्ध जो रेवानाथ किंवा रेवणनाथ यानेंच माईचा गर्व हरिला म्हणून त्यासच या भागीं 'काडसिद्ध' म्हणतात व त्यांचाच कोणी एक 'मरुळसिद्ध' नामें एक शिष्य होता. व निंबरगीचे 'नारायणरावमहाराज' हे त्यांचच अनुग्रहीत होते. यावर आमचें म्हणणें इतकेंच कीं, निंबरगीकर महाराज हे कदाचित् श्रीकाडसिद्ध-

'काडसिद्ध हें नांव' 'काड' व 'सिद्ध' या दोन कानडी शब्दांनीं मिळून बनलें आहे. ' काड ' या शब्दाचा अर्थ ' अरण्यांतील ' असा असून ' सिद्ध ' म्हणजे सिद्धीप्रत पावलेला किंवा साधुपुरुष, तेव्हां सर्वदा

श्वराचें अनुग्रहीत असोत अगर नसोत, पण त्याकरितां श्रीशिवावतारी महान् सत्पुरुष श्रीआद्यकाडदेवरुस्वामी यांना नाथपंथांमध्यें ढकलण्यास नको होतें. कारण–

१ श्रीआद्यकाडदेवरुस्वामी हे कट्टे वीरशैव तर नाथपंथी रेवणनाथ हे पक्के वैष्णव होत.

२ श्रीकाडदेवरु स्वामी ' गुंडेवाडी 'च्या प्रसिद्ध जंगम घराण्यांत उत्पन्न झालेले तर रेवणनाथ हे ' रेवातीरीं विधिवीर्यानें उत्पन्न झाले ' असें नवनाथ-भक्ति-सारावरून दिसतें.

३ श्रीकाडदेवरुस्वामी बाराव्या शतकाच्या आरंभीं जन्मले असून श्रीबसवे-राचे समकालीन होत. तर रेवणनाथ हे अलीकडे ४–५शें वर्षांतच उत्पन्न झालेले होते.

४ प्राचीन युगांत परमेश्वराच्या मुखापासून उत्पन्न झालेले वीरशैव–मत–स्थापक पंचाचार्य–प्रमुख, श्रीआद्यकाडदेवरु स्वामींचे परमगुरु श्रीरेवणाराध्य किंवा श्रीरेवणसिद्ध आचार्य कोणीकडे व अलीकडे उत्पन्न झालेले वैष्णवपंथी रेवणनाथ कोणीकडे ? कशास काय संबंध ?

शिवाय सदरहू ग्रंथकार म्हणतात कीं, ' स्कंदपुराणांत सुद्धां श्रीरेवणसिद्ध व काडसिद्ध यांचा उल्लेख असल्याचें ' सन्मार्ग–वैभव ' पुस्तककर्ते म्हणतात. ' पण आम्ही म्हणतों कीं स्कंदपुराणच काय पण वेद–समकालीन प्रसिद्ध आगम-ग्रंथांतून श्रीरेवणाराध्यांचें वर्णन असलेंच पाहिजे. नुसत्या ' रेवण ' या नाम-सादृश्यानें फसून जाऊन सदरीं ग्रंथकारांनीं, अगदीं अलीकडील नाथपंथी विधि-वीर्योत्पन्न, वैष्णवमत–प्रसारक ' रेवणनाथाला ' च पुरातन कालचे वीरशैव मत-स्थापक श्रीशिवमुखोत्पन्न ' रेवणसिद्ध ' मानिलें आहे ! ही अत्यंत घोडचूक आहे त्याच रेवणनाथाच्या शिष्यमालिकेंत श्रीशिवावतारी श्रीकाडसिद्ध व मरुळसिद्ध इत्यादि प्राचीन प्रख्यात शिवशरणांना गोवितांना पाहून आश्चर्य वाटतें.

आम्ही म्हणतों कीं, निंबरगीकर महाराज हे जर त्या रेवणनाथाच्या परंपरेंतले असतील तर ते खास वैष्णवपंथी होत. ते जरी गुरु–लिंग–जंगम–भजक वाटत असले तरी तो निव्वळ भ्रम आहे. त्यांनीं किंवा श्रीज्ञानेश्वरमहाराज इत्यादि वैष्णवसांप्रदायी साधूंनीं गुरु–लिंग–जंगमादि अष्टावरण मार्गाची स्तुति करण्याचें मुख्य कारण त्याकाळीं व त्यापूर्वीचे श्रीबसवेश्वरमहाराज व श्रीआद्यकाड-

अरण्यांत राहून सिद्धदशेप्रत पोहोंचलेला म्हणून या योगी पुरुषास ' काड-सिद्ध ' म्हणत असत असें समजतात. या दोन्ही व्युत्पत्ति आपापल्यापरी योग्य असल्या तथापि बौद्ध व जैन मतांचा पाडाव करून, व हिंदु धर्मांतील विषमता आमूलाग्र नष्ट करून, वीरशैव मताची विजयी ध्वजा आसेतु हिमाचल अखंड फडकविण्याची उदात्त कामगिरी केल्याच्यायोगें, म्हणजेच आपल्या सिद्धेश्वरांदिकांनीं सर्व दक्षिण हिंदुस्थानांत या समतावादी वीरशैव मताचा अत्यंत फैलाव केला होता त्याचा तो प्रभाव आहे. श्रीकाडसिद्धेश्वराच्याच नव्हे तर श्रीरेवणाराध्यांच्या शिष्यपरंपरेंत प्राचीन काळापासून मरुळसिद्धासारखे अनेक शिवशरण होऊन गेले आहेत. त्यांतील कित्येकांची नामावळी कानडी भाषेंतील प्रसिद्ध ' मरळु-शंकर देवरिगे ' इ. या मंगलारतीवरून समजून येते, ती पहावी.

नित्यपाठावलीकार हे नांवावरून पाहातां वीरशैव असून, शिवाय ते निंबरगी महाराजांचे भक्त असावेत असें वाटतें. हें जर खरें असेल तर त्यांच्यासारख्या इतिहास-जिज्ञासु भक्तिमार्ग वीरशैवानें वरीलसारखीं विचित्र विधानें करावीं हें आश्चर्य होय. स्वतःच्या घरीं पंचपक्वान्नांचें ताट वाढून पुढें ठेविलें असतांना तिकडे न पाहातां परवशांच्या घरच्या पुरण-पोळीवर संतुष्ट राहाणाऱ्यासारखीच ही स्थिति होय. तेव्हां त्यांनीं व त्यांच्या सारख्याच अंधपरंपरेनें आपल्या वीरशैव तत्त्वाकडे न पाहतां भलतीकडेच भटकत जाणाऱ्या वीरशैवांनीं या गोष्टीकडे लक्ष द्यावें व आपल्या वीरशैवांच्या इतिहासाचें अगोदर मनन करून मग अशा बाबतींत लेखणी वर उचलावी, म्हणजे असा प्रकार होणार नाहीं. आणि जर ते वीरशैव नसतील तर त्यांनीं आमच्या वीरशैवांचे ग्रंथ पाहून मग टीका करावी, उगीच वघ्याची साल वाघ्यास चिकटवूं नये.

त्याप्रमाणेंच नुसत्या ' गुरु-लिंग-जंगम ' यांच्या जयजयकारास भुलून भलत्याच पंथाचे भजनीं लागूं नका; ही प्रत्येक वीरशैव सद्गृहस्थांना आमची विनंति आहे. तो पंथ जर पूर्णपणें वीरशैव धर्मास अनुसरत असेल तर चिंता नाहीं. पण तसें नसेल तर त्यापासून स्वतः तर दूर राहावेंच, पण इतर अज्ञ वीरशैवांनाही त्यांपासून दूर राहविण्याची जबाबदारी आपल्यावर आहे हें लक्षांत असावें.

श्रीबसवेश्वर व श्रीआद्यकाडदेवरु आणि इतर वीरशैव शिवशरणांनीं पूर्वकाळीं केलेल्या उन्नत धर्म-कार्यांचा सांद्यंत इतिहास आज पूर्ण उपलब्ध नाहीं. तो जसजसा उपलब्ध होईल तसतसा या गोष्टींवर पूर्ण प्रकाश पडेल. असो.

समतावादी वीरशैव धर्माची दीक्षा लक्षावधि, लोकांस देऊन, त्यांच्या मायामोहाचें पूर्ण निरसन करून त्यांना परमात्मप्राप्तीचा मार्ग सुलभ करून देण्याची जी प्रचंड कामगिरी या सिद्धपुरुषानें पुढें केली आहे. ती करणारा पुण्यलोक महात्मा ' काडसिद्धाशिवाय अन्य कोण असणार ? म्हणून पहिला अर्थच आमच्या मतें विशेष ग्राह्य आहे. असो.

श्रीकाडसिद्धेश्वरानीं माईचा गर्व हरण करितांच तिनें आपल्या पणानें जिंकून ज्या अनेक सिद्ध पुरुषांना बंदींत ठेविलें होतें, व ज्यांना आपले दास समजून ती त्यांजकडून जबरीनें करवीर क्षेत्राच्या ( कोल्हापूरच्या ) जवळपासच्या तलावांतील खडक फोडण्याचें काम करवून घेत होती, त्या सर्व बंदिवान् साधूंना अत्यानंद झाला. श्रीकाडदेवरुस्वामींनीं त्या सर्वांना एकदम बंधमुक्त केलें. तेव्हां ते सर्व आनंद पावून श्रीकाडसिद्धांचे उपकार मानून मोठ्या पूज्य भावानें श्रीआद्यकाडदेवरु या अद्वितीय साधुपुरुषांचें प्रेमपूर्वक दर्शन घेऊन आपापल्या स्थानीं निघून गेले. पुढें सिद्धगिरीस जाऊन तेथें बंदींत असलेल्या अनेक सिद्धपुरुषांनाही त्यांनीं मोकळें केलें. त्या सिद्धांना माईची झालेली दशा व त्या साधुवर्यांचें सामर्थ्य पाहून आश्चर्य वाटलें; व हे कोणी अवतारी महात्मेच आपल्या साह्यास आले आहेत, असें वाटून त्या सर्वांनीं भक्तिभावानें त्यांना वंदन केलें, व तेही योगसाधनार्थ आपापल्या स्थानीं निघून गेले. पुढें श्रीकाडसिद्धेश्वरस्वामींनीं ' श्रीक्षेत्र सिद्धगिरी ' हेंच आपलें निवासस्थान बनविलें, व पुष्कळ वर्षें श्रीस्वामी त्याच रम्य स्थानीं योगसाधन करीत राहिले. हे सिद्धपुरुष त्या स्थानीं राहूं लागले म्हणून या स्थानास तेव्हांपासून या अर्थी 'सिद्धगिरी' असें लोक म्हणूं लागले. तथापि त्यापूर्वीही माईपासून पराभूत झालेले अनेक सिद्ध पुरुषच तेथें बंदिस्त असल्यामुळेंही या स्थानास पूर्वींच 'सिद्ध-गिरी ' हें नांव प्राप्त झालें होतें असें कित्येकांचें म्हणणें आहे. कोणत्याही कारणानें हें नांव पडलेलें असो, तथापि हें स्थान अत्यंत रम्य आहे ही गोष्ट खरी. याची सविस्तर माहिती पुढें याच भागांत दिली आहे ती पहावी.

अनेक वर्षे तेथें तपश्चर्या करून योग–शास्त्राचें पूर्ण ज्ञान करून घेतल्या-नंतर श्रीकाडासिद्धेश्वरस्वामी हे तीर्थाटनास निघाले. त्यावेळीं त्यांची शिव-योगसंपन्न तेज:पुंज व आजानुबाहु अशी शररियष्टि व घोर तपश्चर्येनें :मुख-चर्येवर पसरलेली शांतवृत्ति हीं पाहून कोणाही मनुष्याला त्यांचें दर्शन होतांच पूज्य बुद्धि उत्पन्न झाल्याविना राहात नसे. असे पुण्यपावन सद्गुरु जेव्हां संचारार्थ जाऊं लागले, तेव्हां तेथील त्यांच्या सर्व शिष्यांना अत्यंत वाईट वाटलें व त्यांनीं अल्पावधींतच हें तीर्थाटन संपवून आप-णांस दर्शन द्यावें असें आग्रहपूर्वक विनाविलें; तेव्हां त्यांना 'लवकरच येऊं' असें अभय वचन देऊन श्रीस्वामी बाहेर पडले.

## (८) श्रीक्षेत्र यड्डुरास आगमन.

श्रीकाडसिद्धेश्वर स्वामींनीं फिरत फिरत चार धामें, बारा ज्योतिर्लिंगें व भरतखंडांतील बहुतेक सर्व तीर्थ-क्षेत्रांचें दर्शन घेतलें. विंध्याचल व अबु-पर्वतांत वास्तव्य करणाऱ्या, तसेंच हिमाचलांत असणाऱ्या अनेक प्रख्यात साधुपुरुषांचेंही दर्शन त्यांनीं घेतलें. इतकेंच नव्हे तर अनेक प्रसिद्ध नगरें व राजधान्या हीं सुद्धां सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन करून सुमारें तीस चाळीस वर्षांनंतर ते परत कर्नाटकांत आले. त्यावेळीं त्यांना सर्व हिंदु-स्थानची धार्मिक व ऐतिहासिक बाबींची खडान्खडा माहिती झाली होती.

अशा रीतीनें संचार करीत श्रीकाडदेवरु स्वामी जेव्हां या प्रख्यात यड्डूर क्षेत्रांत आले, तेव्हां जुन्या यड्डूर गांवांतील व आसपासच्या गांवा-तीलही सर्व लोकांस अत्यानंद झाला. त्यांच्या दर्शनानें सर्व लोक धन्य झाले. त्यावेळीं श्रीविरभद्र देवाची विशेष प्रसिद्धि नव्हती. कारण जुन्या यड्डूरच्या व चंदूरच्या पश्चिमेस त्याकाळीं हल्लींप्रमाणें शेतें व मळी जमिनी नसून त्या सर्व प्रदेशांत ' कुडल्डामवाडा ' (कुरुंदवाडा) पर्यंत मोठमोठ्या वृक्ष–वेलींनीं व्याप्त असें विशाल अरण्य पसरलें होतें, व त्यांत क्रूर श्वापदें इतस्ततः वावरत होतीं. या दाट जंगलांत फक्त कृष्णेच्या दोहों बाजूंस

तीरांजवळच जीं ' रामगया ' ' संगम ' वगैरे प्राचीन पवित्र स्थानें होतीं, तेथें मात्र महापर्वणीच्या वेळीं कोणी कोणी नदीच्या कांठाकांठानें महाप्रयासानें जाऊन येत. त्यामुळें या अरण्याच्या आंत प्रवेश करण्याची छाती होत नसे. तथापि गांवाजवळपास मैल अर्धा मैलाच्या प्रदेशांत गांवांतील गुरें चरण्यास सोडून सूर्यास्ताच्या आंत गांवांत परत जाण्याचा गुराख्यांचा प्रघात होता असें दिसतें. अशा या निबिड व निर्जन अरण्यांत वास करण्यांस केवळ योगी सत्पुरुषच समर्थ होत; यास्तव श्रीकाडदेवरु स्वामी जेव्हां या मार्गीं आले, तेव्हां ते यड्डूर गांवच्या पश्चिमेस सुमारें अर्ध्या मैलावर वर सांगितलेल्या ' जंगलांतील एका रम्य स्थळीं एक पर्णकुटी घालून तींत राहूं लागले.

---

## (९) श्रीवीरभद्रलिंगाचा जीर्णोद्धार.

या काळीं श्रीवीरभद्रलिंगाची विशेष प्रसिद्धि नसून येथील पूर्वकाळचें तें विशाल यज्ञकुंड चोहोंबाजूंची माती आंत पडून बुजून जाऊन त्यांत गवत व झुडुपें वाढलीं होतीं. अर्थात् श्रीवीरभद्र लिंगही जमिनींत बुजून जाऊन नामशेष झालें होतें. आणि त्यावरच यज्ञकुंडामध्यें या अरण्यांत गुरें व मेंढरें चरण्यास सोडणाऱ्या धनगरांनीं व गुराख्यांनीं आपल्या 'वीर' (वीराप्पा) नांवाच्या देवाची स्थापना केली होती. व त्याचें एक लहानसें देऊळही बांधिलें होतें. श्रीवीरभद्र देवाचे जवळ अथवा दूरच्या प्रदेशांत राहणारे कित्येक निःस्सीम भक्त जेव्हां या क्षेत्रांत देवदर्शनास येत, तेव्हां या वीरासच 'वीर' ( श्रीवीरभद्र देव ) समजून त्याचीच पूजा, अर्चा, अगर गुग्गुळ, अग्नि वगैरे प्रकारांनीं आराधना करून संतुष्ट होऊन परत जात! खुद्द श्रीवीरभद्र लिंगाची जर ही स्थिति; तर नंदी, रुद्रपाद वगैरे देवांचा पाड काय? सर्वच देवावर जंगल वाढून त्यांचा मागमूस देखील राहिला नव्हता!

अशा पुराणप्रसिद्ध क्षेत्राची अशी दशा कशी झाली असेल ? असें कित्येक वाचक विचारतील तर त्यावर आमचें म्हणणें इतकेंच आहे कीं, कालगति ही मोठी विलक्षण असते. या विचित्र कालचक्रानें देवादिकांसही मोकळें सोडिलें नाहीं. काळ फिरला कीं, देवादिकांचीसुद्धां बुद्धि पालटून त्यांना दुर्दैवाच्या फेऱ्यांत पडावें लागतें. फार दूर कशाला ? कालचक्र फिरतांच बारा ज्योतिर्लिंगापैकीं प्रख्यात श्री सोरटी सोमनाथ लिंगाची धर्मवेड्या गिझनीच्या महमुदानें इ. स. १०२४ सालीं काय गत केली हें आपण आज प्रत्यक्ष पाहातों! अथवा हा राजकारणाचा प्रश्न म्हणून बाजूस ठेविला तरी, ज्यांनीं जगाचें साम्राज्य कमाविलें त्या बौद्ध चक्रवर्ति प्रख्यात अशोकानें केवळ धर्मकार्याकरितां बांधविलेले, हजारों बौद्ध भिक्षु प्रशस्तपणें ज्यांमध्यें राहात असत व ज्या विहारांच्या नांवावरूनच एका मोठ्या प्रांतालाही 'बिहार' हें अन्वर्थक नांव मिळालें असे 'नालंदा' सारखे प्रचंड विहार या कालचक्राच्या तडाक्यानें जेथें नामशेष होऊन गेले! तेथें हजारों वर्षांपूर्वींच्या अज्ञात काळांत स्थापन झालेल्या प्रसिद्ध श्रीवीरभद्र लिंगाचें रूपांतर झालें असल्यास नवल काय! शिवाय प्राचीन काळीं जे ऋषिवृंद व शिवगण सदा सर्वकाळ येथें लिंग-सान्निध्यांत राहून मोक्षप्रीत्यर्थ पूजोपचार विधींमध्यें सर्वदा गढून गेलेले असत, ते ऋषि, व शिवयोगी आणि त्यांचे पुण्याश्रम यांची बौद्ध व जैन राजांच्या आणि बर्बर, शक, हूण इत्यादि मागें सांगितलेल्या परदेशीय राजांच्या शेकडों वर्षांच्या कारकीर्दींत पूर्ण वाताहात होऊन गेली. आणखी पूर्वकाळीं जेथें विशाल दंडकारण्य पसरून गेलें असल्यानें, ज्यांत अद्याप गांवें व खेडीं विशेष वसलीं नव्हतीं अशा निर्जन व निबिड अरण्यांत निरनिराळ्या ठिकाणीं ऋषि व शिवयोगी जनांना राहाण्यायोग्य निवांत स्थळें अनेक होतीं. पण ऐतिहासिक कालांत या दंडकारण्यांत सर्वत्र वस्ति वाढून त्याचा सुंदर देश बनला; यामुळेंही ते शिवयोग्यांचे आश्रम कमी कमी होत गेले. म्हणून येथें अशांची वस्ति नाहींशी होऊन सामान्य जनांनीं वसविलेलीं धड्डूर, चंदूर, वगैरे खेडीं या पुण्यस्थानापासून जरा दूर

बसलीं व त्यामुळें येथील वर्दळ कमी होऊन येथें जंगल वाढलें यास्तव या पूर्वींच्या प्रसिद्ध पुण्यक्षेत्रांतील पुण्यस्थळांना कालचक्रानें कांहीं काळ आपल्या विशाल उदरांत जागा दिली! नंतर त्याच पुण्यक्षेत्राचा ऊर्जित काळ येतांच पारमेश्वरी योजनेनें श्रीआद्यकडदेवरु शिवयोग्यांचें येथें शुभागमन झालें. असो.

या कारणानें आम्ही ज्या काळाची हकीकत येथें देत आहों त्या वेळीं म्हणजे इ. सनाच्या बाराव्या शतकाच्या शेवटीं क्षेत्र यड्डूरचें अस्तित्व दिसून येत नसून, तेथें जंगल वाढलेलें दिसे. इतकेंच नव्हे तर यड्डूर, चंदूर व मांजरी इत्यादि जवळपासच्या खेड्यांसभोंवतींही सर्वत्र दाट झाडी असून लागवडींत आलेली जमीन फार थोडी होती, व त्या काळानंतर जेव्हां येड्डूर क्षेत्राची भरभराट होऊं लागली, तेव्हां या खेड्यांचीही वस्ती वाढूं लागली; म्हणून हळुहळु ती झाडी तुटून जास्त जास्त जमीन लागवडींत येत चालली. तथापि तें सर्व जंगल तुटून जाऊन या प्रदेशाला आजचें स्वरूप येण्यास बाराव्या शतकापासून सतराव्या शतकाअखेर सुमारें पांचशें वर्षांचा दीर्घकाळ लागला! म्हणून श्रीकाडदेवरु स्वामी येथें येण्यापूर्वी या क्षेत्रांतील मुख्य स्थान म्हणजे एक विशाल यज्ञकुंड व त्यांत बांधिलेलें एक लहानसें ओबड धोबड देऊळ आणि त्यांत एक वीरदेवाची मूर्ति इतकें होतें! यड्डूर गांवातील कित्येक लोक मोठमोठ्या सणावारांच्या दिवशीं दर्शनास जाऊन श्रीवीरभद्रदेवास म्हणजे खरोखर त्यावेळच्या बीरदेवासच नैवेद्य वगैरे दाखवून परत निघून येत. अशा देवाला त्यावेळीं पुजारी कोठला? व नित्याची पूजा तरी कोठली? फक्त धनगर व गुराखी येथें दिवसा मेंढरें, व गुरेंढोरें चारण्यास घेऊन येत व संध्याकाळच्या आंत परत निघून जात. रात्रीं या दाट झाडींत चिटपांखरूंसुद्धां फिरकत नसे! परंतु या काळीं हें स्थान मात्र अत्यंत रम्य व प्रशांत होतें. आजमितीस त्याच्या एकशतांश झाडी नसतांनाही, आहे इतक्याच तुरळक झाडाझुडपांनीं जर हें श्रीवीरभद्रस्थान इतकें रमणीय दिसतें तर ज्यावेळीं हें स्थान वृक्षलतांनीं प्रफुल्ल होतें व येथें वनश्रीचेंच नितांत साम्राज्य पसरलें होतें, त्या वेळची

येथील शोभा काय वर्णावी? ज्यांनीं अशा स्थितींत या रमणीय क्षेत्र-स्थानाचें दर्शन घेतलें व ज्यांनीं येथें कांहीं काळ वास केला ते पुरुष खरोखरच धन्य होत!

## श्रीकाडदेवरु स्वामींचा दृष्टांत

अशा या रम्य क्षेत्रांत श्रीकाडदेवरु स्वामींचें आगमन होऊन यांनीं येथें वास्तव्य करितांच ' आम्हा त्या ठिक सेवितां समसमां संयोग कीं जाहला ॥ ' या कव्युक्तीप्रमाणें हें स्थान अधिकच रमणीय बनलें. यावेळीं त्यांनीं श्रीवीरभद्र देवळाच्या उत्तरेस नजीकच एक पर्णकुटि बांधून त्यांत वास्तव्य केलें. श्रीस्वामींना येथें येण्यापूर्वींच योगसामर्थ्यानें दिव्यदृष्टि प्राप्त झाली होती. म्हणून येथें येतांच त्यांना आपल्या अवतारकार्याची पूर्व स्मृति होऊन स्फूर्ति झाली कीं, ' येथील श्रीवीरभद्रलिंगाचा व या क्षेत्राचा आपण जीर्णोद्धार करावा ' हा अंतरात्म्याचा म्हणजे परमात्म्याचा दृष्टांत किंवा संदेश शिरसामान्य करून लागलेंच दुसऱ्या दिवशीं सकाळीं गांवांतील चार सभ्यगृहस्थांना त्यांनीं आपल्या पर्णकुटीस बोलावून त्यांना आपला दृष्टांत निवेदन केला. आणि त्या पुरातन श्रीवीरभद्र लिंगाचें व क्षेत्राचें माहात्म्य सांगून त्यांचा जीर्णोद्धार करणें अत्यंत जरूर आहे असें पटवून दिलें. तेव्हां त्या भाविक लोकांना जो परमानंद झाला तो वर्णन करून सांगणेंच अशक्य. त्यांना हा योगी आपल्यावर अनुग्रह करण्याकरितां आला असें वाटलें. त्यांनीं गांवांतील पांच पन्नास लोकांना त्या यज्ञकुंडांतील माती खणून काढण्यास तत्काळ बोलावून आणिलें. मग श्रीस्वामींनीं त्या सर्वांस कृष्णास्नान करून शुचिर्भूत होऊन येण्यास सांगून आपणही स्नान करून येऊन शिवार्चन आटोपिलें. नंतर ते यज्ञकुंडासमीप येऊन उभे राहिले. आणि त्या सर्व लोकांना त्या यज्ञकुंडांतील माती खणून काढण्यास आज्ञा केली; तों थोड्याच वेळांत त्या वीरापाच्या छोट्या देवळाशिवाय सर्व यज्ञ-कुंड स्वच्छ मोकळें झालें तें उत्तम प्रकारें बांधिलेलें प्राचीन काळचें विशाल यज्ञकुंड पाहून सर्वांस आश्चर्य वाटलें. मग श्रीस्वामींनीं तें देऊळ पाडून टाकण्यास सांगितलें, तेव्हां कित्येक लोक साशंक झाले. म्हणून

‘ नवीन याहूनही उत्तम देऊळ बांधावयाचेंच असल्यानें हें जीर्ण देऊळ पाडण्यास कांहीं हरकत नाहीं ’ अशी स्वामींनीं त्यांची समजूत करून स्वतःच हातांत कुदळ घेऊन ते पुढें सरसावले व पाडण्यास सुरवात केली. तेव्हां सर्वांनीं वरचें शिखर काढून चारी चिमुकल्या भिंती पायासुद्धां खणून टाकिल्या! इतक्या अवधींत श्रीस्वामींनीं देवळांतील वीरदेवाच्या पिंडी भोंवतालची सर्व माती काढून ती पिंडी उचलून बाजूस ठेविली आणि पुनः हात दीड हात मातीचा थर काढून मोकळा करिताच स्वयंभू, श्रीवीरभद्रलिंगाची दोन हात उंचीची देदीप्यमान पिंडी सर्वांच्या नजरेस पडली! तेव्हां त्या सर्वत्रांनीं अत्यानंदानें ‘ हरहर महादेव ’ ‘ श्रीविरूपाक्ष-लिंग महाराज ’ असा जयघोष केला! त्या आनंदी जयजयकारानें आकाश मंडळ दुमदुमून गेलें! श्रीस्वामी तर त्यांना प्रत्यक्ष परमेश्वर भासूं लागले! नंतर त्या पिंडीसभोंवतालची सर्व माती काढून टाकून त्या दिव्य लिंगाचें सर्वांस दर्शन करविलें. मग श्रीस्वामींच्या आज्ञेप्रमाणें कांहीं जणांनीं लागलाच त्या यज्ञकुंडावर एक विशाल लतामंडप उभारला, कित्येक जण षोडशोपचार पूजा–विधि व अभिषेकास लागणारें सर्व साहित्य आणण्या-करितां गांवांत गेले. आणि राहिलेल्या सर्व जणांनीं पुनश्च स्नान करून शेंकडों घागरी पाणी आणून तें विशाल यज्ञकुंड धुवून स्वच्छ केलें. व अशा प्रकारें श्रीस्वामीमहाराज स्नान करून परत येण्याच्या आंत तेथील यज्ञकुंड व आसपासची जागा स्वच्छ करून ती लतामंडपादिकांनीं शृंगारून त्यांनीं अभिषेक व पूजासाहित्याचीही जय्यत तयारी करून ठेविली होती. शिवाय गांवांतील नगारे, नौबती, आणून व सर्व वादनकार आणि भजनी मेळे बोलावून इतक्या अल्पावधींतही येथें मिळाली ती सर्व सामुग्री आणून समारंभाची मोठ्या उत्साहानें उत्तम तयारी केली. इतकेंच नव्हें तर जवळच्याच भागीं जागा स्वच्छ करून या शेंकडों लोकांच्या भोजनाकरितां तेथेंच स्वयंपाकाचीही तयारी केली! जवळपासच्या खेड्यांतील लोकांनाही ही वार्ता तत्काळ समजली तेव्हां शेंकडों लोक हा समारंभ पाहाण्यास तावडतोब धांवून आले.

ही सर्व सिद्धता, आणि ह्या लोकांचा उत्साह पाहून श्रीस्वामीमहाराजांना संतोष झाला. त्यांनीं त्यांतील पुढाऱ्यांना बोलावून त्यांसह ते या यज्ञकुंडाच्या पूर्वेस सुमारें दोन फर्लांग अंतरावर आले. तेथें एका विशाल वृक्षालगतची जागा दाखवून तेथें जमीन खणण्यास सांगितलें. तेव्हां येथेंही एकादें पुरातन लिंग असावें अशी त्यांची भावना होऊन त्यांनीं तत्काळ जमीन उकरण्यास सुरवात केली. तों पुरुषभर खणतांच एका लहानशा चौथऱ्यावर असलेल्या दिव्य 'रुद्रपादां' चें पुण्यदर्शन झालें! तेव्हां 'हरहर महादेव' असा एकच गजर झाला. नंतर श्रीस्वामींनीं त्या रुद्रपादांच्या आसपासची बरीच जागा साफ करण्यास कळवून लागलेंच त्याजवळच असलेला प्राचीन काळचा नंदी व श्रीराचोटी या देवांचाही मागमूस सांगून त्यांजवरील झाडाझुडुपांचें व मातीचें आवरण काढून टाकून ते देवही जनदृष्टीसमोर आणिले! अशा प्रकारें येथील ह्या तीन्ही देवांचा पुनरुद्धार करून त्यांच्या आसपासची सर्व झाडें तोडून जमीन साफ करून प्रत्येक ठिकाणी लहान लहान लतामंडप घालण्यास सांगून श्रीस्वामी श्रीवीरभद्रलिंगासमीप गेले.

येथें सर्व जय्यत तयारी झाली असल्यानें श्रीस्वामींनीं तत्काळ महाभिषेकास प्रारंभ केला. हा रुद्राभिषेक संपतांच षोडशोपचार पूजाविधीनें वेद मंत्राधारें पुनश्च श्रीवीरभद्रलिंगाची प्राणप्रतिष्ठा केली! तेव्हां विजय वाद्य घोषानें व 'हरहर महादेवा' च्या जयजयकारानें तें सर्व अरण्य दुमदुमून गेलें! यावेळीं या श्रीवीरभद्र देवाच्याच नांवानें यापूर्वी अनेक वर्षें पूजोपचार ग्रहण करणाऱ्या 'वीर' देवाचीही तेथें जवळच उजवीकडे स्थापना केली. नंतर तो सर्व सोहळा रुद्रपादांकडे वळला. तेथील त्या तीन्ही देवांची महाभिषेक व पूजाप्रकारानीं पुनश्च शुद्धता करून तो जनौघ श्रीवीरभद्रलिंगाकडे वळला. नंतर महानैवेद्य होऊन सर्वांचे त्या विशाल अरण्यांत अनेक पंक्तींनीं उत्तमप्रकारें आनंदानें भोजन झालें. याप्रमाणें महोत्सवानें पुराणप्रसिद्ध श्रीवीरभद्रलिंगाचा श्रीकाडदेवरू महास्वामींच्या हस्तें पुनरुद्धार होऊन सर्वत्र आनंदीआनंद झाला.

# [१०] श्रीस्वामींची धार्मिक कामगिरी

वरील समारंभ आटोपल्यानतर श्रीकाडदेवरु महास्वामींची कीर्ति सर्वत्र पसरली व दूरदूरच्या भागांतील लोकही या महानुभावाच्या व पुरातन श्रीवीरभद्रलिंगाच्या दर्शनास येऊं लागले. तेव्हां साहजिकच या जनसंमर्दानें आश्रमाजवळील जागा साफसूफ होऊन तें प्रशांतस्थान अत्यंत रम्य दिसूं लागलें. कित्येक भाविकलोक श्रीस्वामींची व देवाची सेवा आपल्याकडून नित्य घडावी म्हणून तेथें आश्रमाजवळच झोंपड्यांतून राहूं लागले; तेव्हां येथील वस्ति हळुहळु वाढूं लागली. नित्य शेंकडों लोक श्रीस्वामींच्या व देवाच्या दर्शनास येत व केव्हां केव्हां कित्येक दूरच्या गांवचे लोक तेथेंच वस्तीस राहात. यामुळें श्रीस्वामीमहाराजांच्या आश्रमाचाही विस्तार होत गेला. प्रत्येक अमावास्या व पौर्णिमा या दिवशीं आणि मोठमोठ्या सणांच्या दिवशीं तर येथें हजारों लोक दर्शनास येऊन जात. प्रतिवर्षी चैत्री पौर्णिमेस तर मोठी यात्राच जमूं लागली! अशा रीतीनें या श्रीस्वामी महाराजांची, व श्रीवीरभद्रदेवाची प्रसिद्धि सर्वत्र होऊन लोकांची सारखी रहदारी सुरू झाल्यामुळें या सत्पुरुषवस्तीस हळुहळु गांवाचें स्वरूप येत चाललें.

## श्रीस्वामींचा नित्यक्रम

श्री स्वामीमहाराज दररोज मोठ्या पहाटे उठून आपल्या दंडकमंडलूसह पर्णकुटीबाहेर पडून पश्चिमेस दोन मैलांवरील संगमस्थानास जात; तेथें स्नान वगैरे आटपून सूर्योदयाच्या सुमारास श्रीवीरभद्रदेवाचें दर्शन घेऊन पर्णकुटीस जाऊन शिवपूजा व योगसाधनांत निमग्न होत. नंतर ध्यान-विसर्जन करून दुपारीं अल्पाहार करीत. मग भक्त लोकांना दर्शन देऊन धर्मोपदेश करण्यास्तव तीन चार वाजण्याच्या सुमारास पर्णकुटीजवळच्या प्रांगणांत आसनावर येऊन बसत. यावेळीं श्रीस्वामींच्या दर्शनाची सर्वांना पूर्ण संधि मिळून आपल्या मनांतील शंकांचें निरसन करून घेण्यास सर्वांस पूर्ण मुभा असे. व श्रीस्वामी हे योगसामर्थ्यानें त्रिकालज्ञानीच होते म्हणून

भक्ताच्या अधिकाराप्रमाणें त्यांस ज्ञानोपदेश करून त्यांच्या सर्व शंकांचें निराकारण करीत. भक्तांमध्यें उच्चनीच भाव मुळींच ठेविला जात नसे. यामुळें लहानांपासून थोरांपर्यंत व राजांपासून रंकांपर्यंत यांचा उपदेश सर्वांच्या लक्ष्यांत सहज येऊन पूर्णपणें समजणारा, पटणारा व हितकारक असाच असे. शिवाय ज्ञानसंपन्नतेबरोबरच श्रीस्वामींच्या अंगीं कवित्व शक्तिही पूर्णत्वानें वास करीत होती. श्रीस्वामी हे प्रतिभावान् कवि होते. त्यांनीं तत्कालीन समाजस्थितीवर मार्मिक टीका करणारी व भूत-भविष्य वर्तविणारीं अनेक पद्यें कानडी भाषेंत केलीं आहेत. श्रीवीरभद्र देवाच्या पराक्रमाचें यांच्या पद्यांतून जें रसभरित वर्णन आहे तसें अन्यत्र कोठेंच दिसून येणार नाहीं. यांनीं क्षेत्रयड्डूर व अन्य प्रसिद्ध तीर्थें व क्षेत्रें यांच्या वर्णनाचींही अनेक सुरस पदें रचिलीं आहेत. हीं वर सांगि-तलेलीं कोणत्याही विषयांवरील त्यांची पदें ऐकतांना वृत्ति तल्लीन झाल्याविना राहात नाहीं. इतकी ओजस्विता आजही त्यांच्या कवनांत आहे. तर प्रत्यक्ष त्यांच्या रसवंती वाणींतून हीं पद्यें ज्यांना ऐकण्यास मिळालीं त्यांचें भाग्य काय वर्णावें? श्रीस्वामींच्या अनेक सच्छिष्यांनीं त्यांचीं बहुतेक सर्व पद्यें त्या काळीं लिहून ठेविलीं आहेत. त्यांपैकींच एक मोठें बाड यड्डूरांतील 'भृंगी' घराण्यांत असून त्यांतील बरींच पदें पालखीसेवेच्या वेळीं भृंगी पालखीपुढें म्हणत असतात. हीं पदें म्हटल्याशिवाय पालखीसेवा पूर्ण झाली असें ह्मणतां येत नाहीं. शोधाअंतीं स्वामींचीं बरींच पद्यें उपलब्ध होतील; पण या कार्याला संशोधनसंस्थेची व द्रव्य-सहाय्याची आवश्यकता आहे हें मागें सांगितलेंच आहे. श्रीस्वामींचीं अनेक विषयांवरील अनुभवसिद्ध मतें या पद्यरूपानें जनदृष्टीपुढें आल्यास त्यांचा हल्लींच्या काळीं समाजास अत्यंत उपयोग होईल.

## श्रीस्वामींचा धर्मोपदेश

ईश्वरी प्रेरणा व महान् सद्गुरु श्रीरेवणसिद्धांच्या आज्ञेनुसार वीरशैव समाजोद्धाराची पूर्वतयारी व पूर्तता करण्याकरितांच त्या धर्मग्लानीच्या काळांत श्रीस्वामींचा अवतार झाला असल्यानें व श्रीस्वामी हे महानुभाव श्रीब-

सवेश्वराचे समकालीन असल्याकारणानें यांनीं कोणत्या धर्मतत्वांचा जनतेंत फैलाव केला हें सहज समजून येईल. त्यांच्या हल्लीं उपलब्ध असलेल्या पद्यरूप वचनांवरून त्यांच्या उपदेशाचें धोरण लक्षात येण्यास विशेष मदत होत असली, तरी त्या सर्व वचनांचा व्यवस्थेशीर व संपूर्ण संग्रह एके ठिकाणीं सांपडणें तूर्त शक्य नसल्यानें त्यांच्या कार्यकर्तृत्वावरून त्यांच्या धर्मोपदेशाचा जो बोध होतो तो येथें थोडक्यांत सांगणें अस्थानीं होणार नाहीं.

श्रीस्वामींनीं आपल्या अप्रतिम उपदेशानें सर्व उत्तर कर्नाटक जागृत केला! व निरनिराळ्या सुमारें एक हजार ठिकाणीं आपल्या सांप्रदायाचे (वीरशैव धर्माचे) मठ स्थापिले! व त्या त्या ठिकाणीं आपले उपदेशक कर्तब्रगार शिष्य ठेविले. यांपैकीं सुमारें पन्नास पाऊणशें मठ व त्यांची उत्पन्नें हल्लीं यड्डूर मठाच्या देखरेखीखालीं आणि शेंदीडशें कोण्णूर मठाच्या देखरेखीखालीं व २।३ शें सिद्धगिरीमठाच्या देखरेखीखालीं आहेत. बाकीच्यांचा तूर्त पत्ता नाहीं. श्रीस्वामी हे आबालवृद्धांस वीरशैव धर्माचा उपदेश करीत. हा धर्म, तत्त्वदृष्ट्या अति उदात्त व समतेचा असून आचरणाच्या दृष्टीनें अत्यंत सुलभ आहे. म्हणून मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें कर्ममार्गाचा कळस झालेल्या व उचनीच भावनेचा बुजबुजाट झालेल्या अत्यंत आणीबाणीच्या प्रसंगीं श्रीबसवेश्वरांच्या जोडीनें त्यांचेच कार्य नेटानें पूर्ण करणारे स्वतंत्र कर्तबगार असे श्रीवीरभद्रावतारी मडिवाळ (परीट)माचिदेव, श्रीशिवावतारी हे श्रीकाडसिद्धेश्वरस्वामी, शिवाय मेदार (बुरूड) केतय्य, कुंभार, गुंडय्य हडपद (न्हावी) हंपय्य वेडर (बेरड) कन्नय्य (ढोर) कक्कय्य होलियेर (महार) चिन्नय्य इत्यादि अनेक शिवशरणांनीं अनेक जातींतून या काळीं अवतार घेतला, व कर्ममार्गाचें आणि निरीश्वरवादाचें सप्रमाण खंडण करून वीरशैव धर्माची विजयी ध्वजा सर्वत्र फडकाविली; त्यामुळें समाजांतील कृत्रिम उचनीच भावना रसातळास जाऊन समतेचा फैलाव मोठ्या प्रमाणांत झाला. या सर्व प्रमथ गणांच्या उपदेशाचें वर्म म्हणजेच वीरशैव धर्माचें मर्म समजण्याकरितां त्या धर्मासंबंधीं तत्त्वांचा थोडक्यांत प्रश्नोत्तर रूपानें श्रीकाडदेवरु स्वामींच्या शब्दांनीं खुलासा करूं.

# (११) वीरशैवधर्म

शिष्य०—वीरशैव मत म्हणजे काय?

स्वामी०—वीरशैव मत म्हणजे शैवपंथांतील उच्चतम तत्वें ज्यांत समाविष्ट झालीं आहेत त्यालाच 'वीरशैव मत' हें नामाभिधान आहे.

शि०—वीरशैवाचें लक्षण कोणतें?

स्वा०—इतर शैवांप्रमाणें अल्पफलाची अपेक्षा न ठेवितां

नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ॥
स्वल्पमप्यस्य धर्मस्य जायते महतो भयात् ॥गीता २ ४०

या गीतोक्तीप्रमाणें अल्पक्रियेपासून अनंत फलप्राप्ति करून घेणारा, व श्रीगुरूपासून शिवसंस्कार झाल्यानंतर आपल्या देहावरील इष्टलिंगाची त्रिकालपूजा करण्यांत निरत असलेला, आणि आकस्मिकपणें आपल्या स्वेष्टलिंगाचा लोप[१] झाला कीं, तत्काळ आपला प्राण देणारा (गुरुदत्त स्वेष्टलिंगावर प्राणापेक्षां जास्त प्रेम करणारा म्हणूनच इष्टलिंगाचा लोप होतांच प्राणाची पर्वा न करणारा) तोच खरा वीरशैव होय. त्याचप्रमाणें आपण अनन्यभक्ति करीत असलेल्या गुरु-शिव शिवयोगी यांची किंवा शिवक्षेत्र-शिवकथा-शिवचिन्हें यांची निंदा किंचित्‌ही सहन न करणारा. अन्य देवताराधन न करितां तनु-मन-धनेंकरून निरंतर शिवधर्माभिवृद्धींत गढून गेलेला; आणि अष्टावरणसंपन्न व पंचाचार निरत असून, वेदांततत्त्व प्रतिपादित प्रसिद्ध ईशावास्य कालाग्नि-रुद्र-श्वेताश्वतराद्युपनिषदें आणि कामिकपारमेश्वरादि श्रौतागमांतील ज्ञानपादांमध्यें वर्णिलेल्या ब्रह्मात्म्यैक्यदायक लिंगांगसामरस्यज्ञानपारंगत होऊन ज्ञानोत्तरही यावज्जीव स्वेष्टलिंगार्चनादि सत्कर्माचरण निष्ठापूर्वक करीत असतो, तोच वीरशैव जाणावा.

---

१ लिंगं पतिः सती चाहं भार्येयं वीरशैविनाम् ।
तस्माल्लिंगात्यये देवि सद्यः प्राणान्परित्यजेत् ॥

शिवाय शिवदीक्षानुग्रहानें निरंतर शिवव्रत-निष्ठ असणाऱ्या वीरशैवास जनन-सूतक व मृत सूतक हीं सुद्धां नाहींत. तसेंच शिवदीक्षा घेतलेल्या वीरशैव स्त्रियांना रजःसूतक, प्रसूतिका व प्रसूतिकागृह-सूतक हीं देखील

---

१ न तस्य सूतकं वत्स प्राणलिंगांगसंगिनः ।
जननोत्थं मृतोत्थं च विद्यते परमार्थतः ॥ ६९ ॥ (शंकरसंहिता अ. ८३)
देवार्चनादिकं कर्म कार्यं दीक्षान्वितै सदा ।
नास्तिशावं यतस्तेषां सूतकं च यदात्मनां ॥ २५ ॥
शिवदेवार्चनं यस्य यस्य वाग्निपरिग्रहः ।
ब्रह्मचारि यतीनांच शरीरे नास्ति सूतकं ॥ २६ ॥ (सौर-पुराण अ. ५१-२०६.)

२ सूतक तर राहो पण अनेक दिवसपर्यंत चालणाऱ्या एखाद्या व्रतास प्रारंभ करितांच तें नित्यनियमानें अखंडितपणें चालविलेंच पाहिजे, असा अबाधित विधि आहे. [ उदा० अश्वमेध यज्ञ इ० ] तेव्हां 'यावज्जीव अकुंठितपणें अनुसरीन' असा संकल्प करून दीर्घकालीन व्रताची दीक्षा घेतलेल्यांना कोणत्याही तऱ्हेचें सूतक नाहीं असें पाराशर माधवीयादि ग्रंथांतून सप्रमाण सांगितलें आहे. त्याप्रमाणें लिंगधारण, लिंगपूजारूप-व्रतें सद्गुरूकडून विधियुक्त दीक्षा करून घेतेसमयीं 'यावज्जीव' हें व्रत भक्तिपूर्वक चालवीन; असें वीरशैवांना वचनबद्ध व्हावें लागतें, त्याकारणानें शिवलिंग पूजानिरत वीरशैव स्त्रीला मासिक रजोदर्शनापासून उत्पन्न होणारे सूतकही, ती स्त्री अविच्छिन्नपणें आचरीत असलेल्या शिवसंबंधीं व्रतास मात्र केव्हांही प्रतिबंधक होणार नाहीं ! कारण—

१ [illegible]बद्धदीर्घतपसां नारीणां यद्रजो भवेत ।
न तेन तद्व्रतं तासामुपहन्येत कर्हिचित ॥ २४ ॥ (अंगिरसस्मृति)
म्हणजे नित्य न चुकतां बहुकालपर्यंत [illegible] करावयास पाहिजे असलेल्या शिव[illegible] विच्छिन्नरूप [illegible] स्त्रीला तन्मध्यकालीं स्त्री [illegible] रजो[illegible] न होत असले. तरी त्यामुळें तिच्या नियव्रताला कोणत्याही प्रकारें [illegible] नाहीं

३ त्याचप्रमाणें [illegible] शिवाचार्यांनीं सिद्धांत शिखामणीमध्यें—
लिंगार्जनस्ताश्चाश्च [illegible] नार्यो न सूतकं ।
तथा प्रसूतिकायाश्च सूतकं नैव विद्यते ॥ (सि. शि. परिच्छेद ९)
असें [illegible]पादलें आहे.

पाळण्याची जरूर नाहीं! कारण वीरशैव नारीनरांना शिवलिंगार्चनादि नियत सत्कृत्यें नित्यनियमानें केलींच पाहिजेत. नाहीं तर शिवव्रताचा भंग होतो. म्हणून शिवव्रतनिष्ठ असून जो षट्स्थल-पद्धति ज्ञानास अनुसरतो व 'आत्मज्ञं ह्यर्चयेद्भूतिकामः' या उपनिषद्वचनाप्रमाणें शिवज्ञानी व सदाचारसंपन्न अशा वीरमाहेश्वरपूजनामध्यें आसक्त असून शमदमादि सद्गुणविशिष्ट असतो, तोच वीरशैव होय.

शि०—अष्टावरणें, पंचाचार, व षट्स्थलज्ञान ह्मणजे काय?

स्वा०—मी लिंगरूपच आहे या भावनेनें लिंगार्पितबुद्धीनें निष्काम कर्मं करणाऱ्या या वीरशैवांना यज्ञयागादि किंवा श्राद्धपक्षादि काम्यकर्मं करण्याची मुळींच आवश्यकता नाहीं ह्मणून ज्ञान-क्रिया या दोहोंस साधनीभूत अशीं जगांत व्यापकत्वानें असलेली, वेदोपनिषदाची केवळ सारभूत अशीं गुरू-लिंग-जंगम-पादोदक-प्रसाद-भस्म--रुद्राक्ष व मंत्र हीं अष्टावरणें नित्य आचरणाकरितां आहेत. या उत्तमाचरणांनीं भक्त-महेश-प्रसादी-प्राणलिंगी-शरण आणि ऐक्य या षट्स्थलांचें ज्ञान होऊन तो लिंगांग-सामरस्यज्ञानास ('तत्वमसी' ची ओळख होण्यास) पात्र होतो. व शेवटीं शिवसमानत्वमुक्तीप्रत जातो.

आतां पंचाचार म्हणजे लिंगाचार, सदाचार, भृत्याचार, शिवाचार व गणाचार हे होत. यांचें पालन प्रत्येक वीरशैवाकडून होणें अत्यंत जरूर आहे. हे आचार दक्षतेनें पाळणाऱ्यांस षट्स्थलज्ञान होणें सहजसाध्य आहे.

[अष्टावरणें व पंचाचार हीं देहधारणास व तदनंतर लिंगांगसामरस्यज्ञानास किती आवश्यक आहेत व त्यांच्या नियमिताचरणानें षट्स्थलांचें ज्ञान कसें होतें याविषयीं धार्मिक व शास्त्रीय ज्ञानाच्या (चिकित्सक) दृष्टीनें विस्तारपूर्वक विवेचन करणारीं 'अष्टावरणविवेक' 'अष्टावरणप्रदीपिका' इत्यादि अनेक कानडी, व रावसाहेब वारद यांच्या ग्रंथमालेपैकीं कित्येक मराठी पुस्तकें प्रसिद्ध आहेत. त्यांमधून श्रीकाडदेवरुस्वामींनीं उपदेशिलेलीं

१ लिंगाचारः सदाचारो भृत्याचारस्तथैवं च।
शिवाचारो गणाचारः पंचाचाराः प्रकीर्तिताः॥ (सूक्ष्मागम पटल ७)

वीरशैवधर्मतत्त्वें जशीं होतीं त्याच प्रकारचीं तत्त्वें प्रतिपादिलीं आहेत. म्हणून विस्तारभयास्तव व प्रस्तुत पुस्तकाचा तो उद्देश नसल्यामुळें येथें फक्त त्यांचें दिग्दर्शन मात्र केलें आहे. जास्त माहिती पाहिजे असल्यास वरील पुस्तकें अवश्य वाचावींत. ]

शि०—इतर शैवांप्रमाणें या शिवोपासना करणाऱ्यांनांसुद्धां 'शैव' असें न म्हणतां आणखी 'वीर' असें विशेषण कां जोडिलें आहे?

स्वा०—शुद्ध शैवब्राह्मणदेखील उपनयनानंतर शैवदीक्षा घेऊन नित्य-नियमानें लिंगार्चन करीत असतो. तथापि कांहीं कारणानें लिंगाचा लोप झाला तर प्रायश्चित्त घेऊन तो शुद्ध होतो हाच विकल्प होय. परंतु वीर-शैव मनुष्य शिवदीक्षारूप उत्तम संस्कार झाल्यानंतर प्राण–लिंग–व्रतपरा-यण होऊन हस्तपीठावर नित्य त्रिकाल शिवलिंगार्चन करीत असतो, आणि प्रमादानें इष्ट लिंगाचा लोप होतांच प्राणत्यागावांचून दुसरें प्रायश्चित्त घेत नाहीं हेंच वीरत्वाचें चिन्ह होय.

शि०—वीरशैवमतास पर्यायनामें कोणतीं?

स्वा०—वीरशैवमत हें अद्वैतमताचे जे विशिष्ट, शक्तिविशिष्ट व केवल असे मुख्य भेद आहेत त्यांपैकीं 'शक्तिविशिष्टाद्वैत' मत होय. यालाच 'विशेषाद्वैत' असेंही नांव आहे.

शि०—अद्वैत म्हणजे काय?

स्वा०—सामान्यतः विचार करितां आर्यावर्तांत सध्यां मुख्यतः दोन प्रकारचीं मतें विशेष प्रचलित आहेत. तीं द्वैत व अद्वैत हीं होत. शिवाय अद्वैतांतील विशिष्टाद्वैत व शक्तिविशिष्टाद्वैत हीं पुष्कळप्रमाणांत प्रचलित आहेत. सर्व मतांच्या प्रवर्तकांनीं आपापल्या मतानुसार श्रीव्याससूत्रावर टीका केली आहे. या सर्व मतांना परमेश्वराचें आस्तत्व

---

१ अद्वैतमताचे प्रवर्तक—प्राचीन ऋषि.
द्वैत ,, ,, —कपील महामुनि ( सांख्यदर्शनकार )
विशिष्टाद्वैत मत-वर्धक रामानुज.
शक्तिविशिष्टाद्वैतप्रवर्तक-पंचाचार्य. ( मुख्यतः—रेणुकाचार्य ).

मान्य आहे. ही गोष्ट मुख्यतः ध्यानांत ठेविली पाहिजे. अद्वैतमत हीं वेदांताची अत्युच्च पायरी होय. तिचें पूर्ण ज्ञान होण्यास तिच्या अगोदर द्वैतसिद्धांत समजणें अवश्य आहे.

शि०—द्वैतमताची मांडणी कशी आहे?

स्वा०—परमेश्वर आत्मा आणि सृष्टि अशा त्र्यींचें कायमचें अस्तित्व आहे असें द्वैतमताचें म्हणणें आहे. परमात्म्यांत जीवात्म्याचें जें वास्तव्य घडतें तें भोग्य व भोक्ता या भावानें घडतें; पण जीवात्मा हा परमात्मा होत नाहीं, उत्पत्ति-स्थिति-लय या तीन्ही काळीं परमात्मा, जीवात्मा व सृष्टि हीं परस्पर भिन्नच असतात. कारण हीं अनादि व स्वयंसिद्ध आहेत; म्हणून परस्परांचें ऐक्य होणें असंभवनीय आहे; पण सृष्टि व जीवात्मा यांचा परमेश्वराशीं निकट संबंध आहे, म्हणजे सृष्टि आणि जीवात्मा हीं दोनही परमेश्वराच्या देहासारखीं आहेत. अशा दृष्टीनें या त्र्यींचें ऐक्य ते [ द्वैतवादी ] कबूल करीत असले, तथापि हीं तीन्ही अनादिसिद्ध व स्वयंसिद्ध असल्यामुळें कोणत्याही काळीं तीं भिन्नच असावयाचीं असें द्वैतवाद्यांचें मत आहे.

शि०—विशिष्टाद्वैतमताचें विवेचन कसें करितात?

स्वा०—प्रकृति म्हणजे विश्व हें परमात्म्याच्या शरीरासारखें आहे. ज्याप्रमाणें दुधामध्यें लोणी असतें त्याप्रमाणें परमेश्वर हा प्रकृतींत ( विश्वांत ) भरलेला आहे. प्रकृतीच्या रूपांत [ आकारांत ] परिस्थित्यनुरूप बदल होत असतो; पण परमात्मस्वरूपांत कोणत्याही काळीं बदल होत नाहीं. परमात्मा हा सच्चिदानंद, सर्वत्र भरलेला, असा एकरूपच असतो. जीवात्मा हा पापकृत्यांनीं मलीन व शुभदायक म्हणजे यमनियमांतील अहिंसा, सत्य, अस्तेय, शौच, संतोष, ईश्वरप्रणिधान, इत्यादि चित्तशुद्धि करणाऱ्या पुण्यकृत्यांनीं तेजस्वी होतो. आतां जीवात्म्यांत जो बदल होतो तो लहानमोठेपणाच्या स्वरूपाचा असतो. काम-क्रोध, लोभ-मोहांच्या तडाक्यांत सांपडून अहंकाराच्या आधीन झाल्यामुळें मूळचा शुद्ध असलेला जीवात्मा अशुद्ध (मलिन) व संकुचित होतो; पण तो जर यमनियम पाळून परमे-

श्वराची निष्काम भक्ति करूं लागला तर परमेश्वराच्या कृपेनें शुध्द होऊन विस्तार पावतो. या मताला विशिष्टाद्वैत मत म्हणतात.

शि०—या दोन्ही मतांत भेद कोणता ?

स्वा०—द्वैतमताप्रमाणें प्रकृति, जीव व परमात्मा हीं नित्यच भिन्न आहेत. पण विशिष्टाद्वैतमताचें म्हणणें असें आहे कीं, परमात्मा हा प्रकृतीच्या रोमरोमांत भरलेला आहे; आणि परमेश्वराच्या कृपेनें जीवात्मा शुद्ध व विस्तृत होईल; पण तो त्या परमात्मस्वरूपांत विलीन होणार नाहीं.

शि०—अद्वैत मताची मांडणी कशी आहे ?

स्वा०—आतां अद्वैतमतासंबंधीं थोडा विचार करूं—

ज्ञान प्राप्त करून घेऊन विश्वाशीं एकरूप होऊन जाणें हें अद्वैत मताचें मुख्य ध्येय आहे. अद्वैतमताचें मुख्य प्रतिपादन असें आहे कीं, सृष्टि, परमात्मा व जीवात्मा हे परस्परभिन्न नसून एक सच्चिदानंद असा परमात्माच सृष्टि, जीव इत्यादि सर्व रूपांनीं प्रतीतीला येतो त्या चैतन्यरूप परमात्म्याचें जग हें स्थूलरूप आहे. परमात्मा व सृष्टि यांत जो भेद आहे तो रूपमूलक आहे, गुणमूलक बिलकूल नाहीं. ज्याप्रमाणें सुवर्ण व त्याचे अलंकार किंवा साखर व साखरेची केलेली बाहुली अगर समुद्र आणि मीठ हीं वास्तविक भिन्न नाहींत; पण जो भेद आहे तो दिसण्यांत आहे. समुद्रांत जीं द्रव्यें आहेत तींच मिठामध्यें असतात. दुसरा सुलभ दृष्टांत हा—' पावसांत पडणाऱ्या गारा ' यांत वास्तविक पाणीच आहे. पाण्याशिवाय दुसरें कांहींच नाहीं; पण दिसण्यांत त्या शुभ्र, वर्तुळ, थंड व कठीण अशा भिन्नत्वानें व्यक्त होतात; परंतु थोड्याच वेळानें त्या मूळ रूपांत जातात; म्हणजे त्यांचें पाणी बनतें. त्याचप्रमाणें ब्रह्मरूपी समुद्रांतलि ह्या विश्वरूपी गारा आहेत. ज्याप्रमाणें गारेचें मूळरूप पाणी आहे; त्याप्रमाणें या जगाचें मूळरूप चैतन्यमय सत्य असें ब्रह्मच आहे. याप्रमाणें वेदांचें वर्णन आहे. हें विश्व लयाला जाणें म्हणजे आपल्या मूळ चैतन्यरूपांत प्रविष्ट होणें आहे. यावर द्वैतवादी अशी शंका घेतात कीं, प्रत्यक्ष जें निराळेपणानें भासतें तें एक कसें

असूं शकेल ? या शंकेचें निरसन अद्वैतवादी असें करतात कीं, हा एक भ्रम आहे. यास दृष्टांत ' रज्जुसर्पन्याय '. ज्याप्रमाणें अंधारांत पडलेली दोरी सर्प आहे असा भ्रम उत्पन्न करिते; पण तेथें दीप येऊन भ्रमनिरास झाला म्हणजे आपल्या मूळरूपानेंच प्रतीतीला येते, त्याप्रमाणें गुरुकृपेनें ज्ञानदीपाचा हृदयांत उदय होऊन अज्ञानरूपी अंधःकाराचा नाश झाला म्हणजे ( अंधारानें रज्जूवर झालेला सर्पभ्रम जसा दीपानें नष्ट होतो तसा ) चैतन्यावर झालेला हा जगद्भ्रम नाहींसा होऊन एक, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, अनंत, अद्वय, सच्चिदानंद असा परमात्माच सर्वत्र प्रतीत होतो.

आतां माया ही काय वस्तु आहे याचा विचार करूं. अज्ञानानें परब्रह्मावर जीव, जगत्, इत्यादि जडपदार्थांचा आभास होतो ती अज्ञानरूप माया, सत्य असत्य, नित्य अनित्य, भिन्न-अभिन्न अशी कांहींच म्हणतां येत नाहीं; म्हणून मायेला अनिर्वचनीय असें म्हटलें आहे. जीव हा मुळीं ब्रह्मच असून या मायारूप अविद्येच्या योगानें मी जीव, मी बद्ध, मी दुःखी असें मानीत असतो. वास्तविक या विश्वाला अस्तित्वच नाहीं. जें दिसतें तें स्वप्न आहे. देव, दानव, मनुष्यें, व इतर जडपदार्थ यांचा जन्ममृत्यु हें एक स्वप्न आहे. जें आहे तें सारें एकरूपच आहे. वास्तविक सर्वव्यापी आकाश एकच असून घट, मठ इत्यादि उपाधींच्या योगानें भिन्नरूपानें प्रतीतीला येतें; अथवा पाण्याच्या हजारो बिंदूंवर एकच सूर्य प्रकाशित असला तथापि त्या प्रत्येक बिंदूंत एकेक निराळाच सूर्य दिसत असतो, तथापि सूर्य एकच आहे. त्याचप्रमाणें अनंत जीव एकाच अनंताची अनंत प्रतिबिंबें आहेत. स्वप्न हें सुद्धां सत्यवस्तूवेंच असतें. त्याप्रमाणें सत्यरूप अशा परमात्म्याचेंच आपण हजारों प्रतिबिंबें स्वप्नांत पाहात आहों. आपणाला शरीर, मन, आत्मा हीं आहेत असें वाटणें हें एक स्वप्न आहे. वास्तविक तुम्हीं सच्चिदानंदरूपच आहां जन्म, पुनर्जन्म, जाणें, येणें, हीं सारीं मायिक ( काल्पनिक ) आहेत.

शि०—मग ईश्वर कर्ता आहे. कीं अकर्ता ?

स्वा०—अद्वैत मतानुसार ईश्वर हा वास्तविक अकर्ता आहे. ज्याप्रमाणें लोहचुंबकाच्या सांनिध्यानें लोहाला ( जड वस्तूला ) गति प्राप्त होते. तद्वत् चैतन्याच्या सांनिध्यानें मन, बुद्धि, इत्यादि जड पदार्थांना गति मिळून तीं कार्यप्रवृत्त होतात. तेव्हां परमात्मा हा लोहचुंबकाप्रमाणें अकर्ताच आहे.

शि०—आपल्या शक्ति-विशिष्टाद्वैत मताचें प्रतिपादन कसें आहे ?

स्वा०—अद्वैत म्हणजे परवस्तु [ परमात्मा ]. अर्थात् शक्तीनें युक्त असें अद्वैत तेंच शक्तिविशिष्टाद्वैत होय. कोणत्याही पदार्थांत एक शक्ति म्हणून असतेच. शक्ति हें नांव भिन्न असलें तथापि त्या वस्तूहून ती शक्ति वेगळी आहे असें म्हणतां येत नाहीं. जसें रत्न व त्याची प्रभा. रत्नामध्यें असणारी प्रभा जशी रत्नाहून भिन्न नव्हे. ( प्रभेशिवाय मणि किंवा मणि व्यतिरिक्त त्याची प्रभा संभवत नाहीं. ) असें असतांही, नुसतें रत्न असें म्हणून न थांबतां आपण त्याच्या प्रभेस कांति किंवा तेज अशी दुसरीं नांवें देतों, यामुळें प्रभाविशिष्ट अथवा कांतिमय रत्न असा त्याचा अर्थ होतो. याहून सुलभ उदाहरण म्हणजे दीप व त्याचा प्रकाश अगर अग्नि व त्यांतील दाहकशक्ति हें होय. या शक्ति व त्या वस्तु यांमध्यें भिन्नत्व नसून जसें अद्वैतत्त्व सिद्ध होतें त्याप्रमाणें स्वप्रकाशचिदात्मा जो परशिव व त्याच्यांत असलेली अव्यक्तादि गुणसंयुक्त चिच्छक्ति यांमध्यें भिन्नत्व नाहीं. ही ज्ञानक्रियात्मक शक्ति भिन्न नसून ती परमात्म्याचा सहज स्वभावरूप असल्यामुळें परमात्म्यापासून पृथक् आणि अद्वैतवाद्यांच्या म्हणण्याप्रमाणें मिथ्या नसून अभिन्न व सत्य आहे. म्हणजे परमात्मा व त्याची सृष्टिकर्तृत्वादिक शक्ति ह्या स्वाभाविक आहेत. परमात्मा जसा नित्य आहे, तद्वत् ती शक्तिही नित्यच आहे ती परमात्म्यामध्यें अंतर्हित असल्यानें तद्विशिष्ट परमात्मा एकच आहे.

द्वासुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते ।
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्न्योऽभिचाकशीति ॥

' सूक्ष्म शरीरसंज्ञक वृक्षाचा आश्रय करून जीव आणि शिव या नांवाचे दोन पक्षी राहात आहेत. त्यांतील जीवरूप पक्षी, पूर्व कर्मांनीं निष्पन्न होणारीं सुखदुःखात्मक फलें भोगितो. दुसरा पक्षी ( ईश्वर ) त्या सर्वांस साक्षीभूत होऊन नित्य, बुद्ध, मुक्त स्वभावानें राहातो. '

या द्वैतपर वचनानुसार जीव व शिव हे आधीं परस्पर भिन्न असून ' ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति ' या वचनानुरूप अंतीं एकरूपच होऊन जातात. हाच शक्तिविशिष्टाद्वैतमताचा मुख्याभिप्राय होय.

शि०— द्वैताद्वैतमतांपेक्षां शक्तिविशिष्टाद्वैत मतांत विशेष काय आहे?

स्वा०— " अद्वैत मत हें ' एकमेवाद्वितीयं ' किंवा ' नेह नानास्ति किंचन निष्कलं निरंजन निरवयवं ' इत्यादि वाक्यांनीं जीवेश्वरांमधील अभेदभाव प्रतिपादितें; तर ' द्वासुपर्णा ' इत्यादि प्रमाणांनीं द्वैत मत हें, जीवेश्वरांमध्यें नित्य भिन्नत्व असून त्यांचें ऐक्य केव्हांच होत नाहीं असें ठांसून सांगतें. याप्रमाणें केवळ अद्वैतमतप्रतिपादक श्रुतिवचनें द्वैतनिरूपक वचनांस विरोधी भासतात; तर केवळ द्वैतमतप्रतिपादक प्रमाणें अद्वैताच्या विरुद्ध अभिप्राय प्रकट करितात. यामुळें या परस्परविरुद्ध प्रमाणांनीं एकवाक्यता सिद्ध करितांना या दोनही मतवाद्यांना अत्यंत ओढाताण करावी लागते; परंतु या वीरशैवमताची स्थिति तशी मुळींच नाहीं. याला द्वैताद्वैतपर श्रुतिप्रमाणें उत्तम रीतीनें लागू पडतात. कारण या मतान्वयें प्रथम जीवेश्वर हे परस्पर अत्यंत भिन्न असतात; ( त्यामुळें द्वैतपरवाक्यांस बाध येत नाहीं. ) पण पुढें ' ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति ' ( ब्रह्मज्ञान होतांच ब्रह्मस्वरूप पावतो. ) या वचनाप्रमाणें जीवेश्वर हे अंतीं एकरूप होऊन जातात. ( यामुळें अद्वैतपर वाक्यांना विरोध येत नाहीं. ) या रीतीनें दोन्हीं मतांचा त्यांत समावेश होतो इतकेंच नव्हे; तर—

"ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।" या गीतोक्तीप्रमाणें अनादि अशा मायेच्या संबंधानें ईश्वराचे अंशच 'जीव' हें नामाभिधान धारण करून देव दैत्य-तिर्यङ्मनुष्यादि जाति रूपानें व्यक्त होतात. या सर्व

जीवांना ईश्वर हा साक्षीरूपानें प्रेरक आहे. अशा मल-कर्म-मायादि-पाशबद्धजीव संसारदशेंत ईश्वराहून भिन्न होत असून ते आपल्या कर्मपरिपाकवशानें पुढें शुद्धांतःकरणयुक्त होऊन श्रीगुरुकृपेनें शिवाभेदज्ञान संपादून 'भ्रमरकीटक' न्यायानें शिवस्वरूपानुसंधानबलानें शिवरूपाशीं ऐक्य होऊन जातात. या प्रकारें भेदाभेद व मागें सांगितल्याप्रमाणें सर्वज्ञत्व व सर्वकर्तृत्वरूप शक्तीनें युक्त असलेलें तेंच परब्रह्म होय. अशा प्रकारच्या परब्रह्माचा स्वीकार केल्याकारणानें ज्ञान व कर्म हीं दोन्हीं मुक्तीला मुख्य साधनसमुच्चय होत. असा इष्ट व श्रेष्ठ मार्ग यांत दर्शविला असल्याच्या योगानें हें मत द्वैताद्वैत मतांपेक्षां जास्त श्रेयस्कर होय. हाच यांतील विशेष आहे. "

अशा प्रकारचा इहपरकल्याणकारक अमोल उपदेश श्रीस्वामी नित्य आपल्या शिष्यांस करीत. शिवाय लिंगांगसामरस्य कसें होतें; त्यांस अष्टावरणें व पंचाचार यांचा कसा उपयोग होतो; षट्स्थलज्ञानी कसें व्हावें? वीरशैव मत हें वैदिक कीं तांत्रिक? शिवदीक्षा म्हणजे काय व ती कशी द्यावी? वीरशैव मतास गौणत्व आणणारे हे स्वतःच अल्पज्ञानी असल्याचा पुरावा कसा देतात; नीच व त्याज्य वस्तु कोणत्या; संकट कसें टाळावें व संसारसागरांतून सुलभरीतीनें कसें सुटून जावें; इत्यादि अनेक सामाजिक, नैतिक व धार्मिक बाबींत श्रीस्वामींनीं केलेला मार्मिक उपदेश व राजकारणपारंगत कसें व्हावें, याविषयीं आपल्या अनुयायांपुढें त्यांनीं ठेविलेला स्वतःचाच कित्ता, हीं अवलोकन करणाऱ्यास श्रीस्वामींच्या अगाध बुद्धिमत्तेची साक्ष पटते. वरील सर्व विषयांचें सांगोपांग विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे, यास्तव श्रीस्वामींचें सर्वांगपूर्ण चरित्र लवकरच जिज्ञासु वाचकांपुढें ठेवण्याची प्रस्तुत लेखकाची मनीषा, तेच परमात्मस्वरूपी सद्गुरु श्रीकाडसिद्धेश्वर स्वामीमहाराज लवकरच पूर्ण करोत, असें विनवून पुढील विषयाकडे वळूं.

---

# ( १२ ) योगीश्वरास राजेश्वराची भेट.

श्रीकाडदेवरु योगीश्वराची कीर्ति वरील धार्मिक उन्नत कामगिरीमुळें सर्वत्र फैलावत जाऊन त्यांचा शिष्यपरिवार हळुहळु वाढत चालला. या शिष्यसमूहांपैकीं कित्येकांनीं वरील बोधामृतानें संतुष्ट होऊन स्वतःच्या आत्मिक उन्नतीप्रत जाण्यास सुलभ सोपानपथ असा जो समतावादी वीर-शैव धर्म त्याचा स्वीकार करून लिंगदीक्षा घेतली; तर कित्येक भक्तांनीं आपापल्या जातींतच राहून शैवदीक्षा घेऊन ते स्वामींचे शिष्य बनले. सर्व जातींच्या व धर्मांच्या लोकांनाही शिवभक्ति करणें सुलभ असल्यानें त्या त्या सर्वांना हा राजमार्ग सर्रास मोकळा करण्यांत आला होता. त्यामुळें मूळचे हिंदू ( वैदिक ) धर्मांतील, कित्येक धर्मांतर करून बौद्ध, जैन इत्यादि अन्य धर्मांत सामील झालेले अनेक लोक, श्रीस्वामीमहाराजांच्या अनुग्रहानें शैव अथवा वीरशैव दीक्षा घेऊन परत आपल्या वैदिक मतांत समाविष्ट झाले. अशा रीतीनें धार्मिक दृष्टीनें कुचंबणा झालेल्या सर्व भाविक लोकांना पावन करण्याचें पवित्र सत्रच या क्षेत्रांत सर्वदा चालत असल्यामुळें येथील यात्रेला विशाल स्वरूप येत गेलें; व या आश्रमस्थानास एका मोठ्या गांवाचें रूप आलें.

## यादवराज सिंहणदेवाचें आगमन.

अशा प्रकारें सुमारें १०–१२ वर्षांत या पवित्र क्षेत्राला विशालत्व प्राप्त होऊन श्रीस्वामीमहाराजांची विमल कीर्ति सर्वत्र पसरत चाललेल्या सुप्रसंगीं मागील इतिहास प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें इ० स० १२१२ च्या सुमारास पराक्रमी २ ऱ्या सिंहणदेव यादव राजेश्वराचें या प्रांतात शुभा-गमन होऊन त्यानें कोल्हापूरच्या शिलाहारवंशीय दुसऱ्या भोज राजाचा पूर्ण पराभव करून हा संपूर्ण उत्तर कर्नाटक प्रांत आपल्या अमलाखालीं आणिला. त्याच सालीं त्यानें श्रीकोपनाथ देवालयाचा जीर्णोद्धार करून 'खंडाळेश्वर' खिद्रापूर गांव त्या देवास इनाम करून दिल्याचा मार्ग

उल्लेख आलाच आहे. असा हा दानशूर महापराक्रमी क्षत्रिय राजा या योगीराजांच्या दर्शनास आल्यावांचून मुळींच राहिला नाहीं. अथवा श्रीकाडदेवरुस्वामीसारख्या त्रिकालज्ञानी सत्पुरुषानें या राजेश्वराची भेट घेतल्याशिवाय त्याला या प्रदेशांतून जाऊं दिलें असेल हें शक्यच नाहीं. शिवाय या राजानें या क्षेत्रांतील आणखीही अनेक देवालयांचा श्रीस्वामींच्या आज्ञेनुसार जीर्णोद्धार केला असला पाहिजे व त्यांना थोडीं फार उत्पन्नें देऊन त्यांच्या पूजाअर्चा व्यवस्थेशीर होण्याची तजवीज केली असावी. कारण यादव व इतर वंशाचे बहुतेक सर्व क्षत्रिय राजे हे शिवोपासक असल्यानें त्यांनींच भरत–खंडांतील अनेक प्रसिद्ध शिवालयें बांधविलीं व त्यांना उत्पन्नें दिलीं आहेत. अर्थात् त्याच पूर्वपरंपरेस अनुसरून या यदु-वंशीय प्रख्यात सिंहणराजानें श्रीकाडदेवरु स्वामीमहाराजांच्या प्रोत्साहनानें पुरातन श्रीवीरभद्र-लिंगासाठीं हें उत्तम गर्भदेऊळ बांधविलें असावें. आणि देवालय बांधविल्यानंतर ओघानेंच त्यांतील देवांच्या पूजाअर्चेचा प्रश्न पुढें येतो, तोही या राजानें सोडविला असावा, म्हणजे श्रीवीरभद्र-लिंगाचा पुनरुद्धार करणाऱ्या श्रीस्वामींच्या इच्छेप्रमाणें श्रीवीरभद्रलिंगाची नित्य नियमानें पूजा करणाऱ्या त्यांच्या एका जंगम शिष्यांस पुजारी नेमून त्यास कांहीं जमीन देऊन या देवाची पूजाअर्चा निरंतर चालण्याची व्यवस्था केली. शिवाय यापूर्वींच येथें जमणाऱ्या यात्रेस शोभा येण्या-करितां श्रीस्वामींच्या अनेक शिष्यांनीं इतर देवालयांप्रमाणेंच श्रीवीरभद्र-देवाची एक उत्सवमूर्ति तयार करून ती पालखींतून मिरविण्याचा उपक्रम सुरू ठेविलाच होता. या पालखी महोत्सवास कायम स्वरूप येण्याकरितां कांहीं सेवेकरी कायम नेमणें जरूर होतेंच. तेव्हां जे स्वामींचे प्रिय शिष्य यात्रेच्या वेळीं व दर सोमवारीं स्वयंस्फूर्तीनें दहा बारा वर्षेपर्यंत पालखी उत्सव करीत आले; त्यांनाही श्रीस्वामींच्या सांगण्यावरून थोडथोडी जमीन देऊन आठवड्याच्या पालखी प्रदक्षिणोत्सवाचा पाया तरी याच राजानें घातला असावा यांत शंका नाहीं. तेव्हां निरक्षेपपणें श्रीवीरभद्र-लिंगाचा पालखी महोत्सव करणाऱ्या भाविक सेवेकऱ्यांना देवदयेनें उत्पन्नें

मिळून पोटापाण्याची उत्तम सोय झाल्या कारणानें अत्यानंदानें त्यांनीं तेव्हां-पासून दररोज पालखीमहोत्सव करण्यास सुरवात केली असल्यास त्यांत आश्चर्य नाहीं.

श्रीक्षेत्रयड्डूरांतील व इतर अनेक ठिकाणच्या श्रीवीरभद्रदेवाच्या समंजस भक्तांचा व इतरांचाही असा एक तर्क आहे कीं, श्रीवीरभद्रदेवालयास पहिल्यानें जमीन मिळाली, ती कोणा मुसलमान बादशहाची देणगी होय. पण यावर आमचें म्हणणें असें आहे कीं, हिंदू लोकांचा व देवांचा परामर्ष घेऊन त्यांना नवीन उत्पन्न करून देईल असा कोणी प्रख्यात समतावादी मुसलमान बादशहा या यड्डूर क्षेत्रांत आल्याचें दिसत नाहीं. अथवा तो न येवो, पण अशी खटपट करून कोणा बादशहाकडून येथील कोणा प्रसिद्ध पुरुषानें हें उत्पन्न मिळविल्याचेंही ऐकिवांत नाहीं. म्हणून कोणा मुसलमान बादशहानेंच या देवास प्रथम उत्पन्न देऊन ही सर्व व्यवस्था केली असें विधान करण्यास आमची लेखणी मुळींच धजत नाहीं. शिवाय या देवाचा पुनरुद्धार व प्रसिद्धिकीरतांच अवतार घेऊन आलेल्या श्रीकाडदेवरु स्वामीच्या दीर्घकालीन हयातींतही या भागांत ( दख्खनमध्यें ) मुसलमान राजांचा पाय पक्का रोंवला नव्हता असें इतिहासावरून दिसतें. मग अशा परिस्थितींत देवादिकांकडे लक्ष पोहोंचविण्यास त्यांना सवड कोठली ! दुसरें असें कीं, श्रीकाडदेवरु स्वामी किंवा सिंहणदेव राजा अशासारख्या सामर्थ्यवान् व्यक्तींचा जर यांत कांहीं संबंध नसेल असें म्हणावें तर येथें हल्लीं देवालयांत चालणारा पूजेचा व पालखीउत्सवाचा सर्व प्रकार सूक्ष्मपणें पाहाणाऱ्यांस असें स्पष्ट दिसून येईल कीं, यांतील प्रत्येक लहानसहान कामांतही किंचित् उणें पडूं न देतां ती ती कामगिरी अव्याहत चालण्याची व्यवस्था विचारपूर्वक दूरदृष्टीनें करण्याची कल्पना मूळची परधर्मीयांची असेल असें मुळींच म्हणवत नाहीं. म्हणून येथील लोकांचा हा तर्क अगदीं चुकीचा ठरतो. उलट अशा तार्किकांना आम्हीं असें विचारितो कीं, ज्या मुसलमानराजांना आम्हां हिंदू लोकांच्या देवमूर्ति पाहिल्याबरोबर डोक्यांत तिडीक उठत असे व हल्लीं देखील त्यांच्या

कित्येक जातभाईंना उठते; आणि त्यांची फोडून छकलें करण्यास स्फुरण चढत असतें; अशा मुसलमान राजांनीं या देवालयास नवीन देणगी करून दिली असेल हें संभवनीय तरी दिसतें काय?

यावरून सरसकट सर्व मुसलमान राजे अगर बादशहा हिंदु धर्मांचे व देवांचे कट्टे द्वेष्टे होते, व त्यांनीं सगळीकडे देव, देवालयें भ्रष्ट केलीं, अथवा कोणत्याही देवालयाला असलेलीं इनामें काढून घेतलीं; असा आमच्या लिहिण्याचा अर्थ करून कोणी उलट प्रश्न करितील कीं, मग आज तागायत नांदत असलेलीं प्रख्यात पुरातन देवालयें व त्यांचीं हजारों रुपयांचीं उत्पन्नें सर्व हिंदुस्थानभर दिसून येतात, तीं अशा कट्टया हिंदु-धर्मद्वेष्टया मुसलमान राजांच्या तडाख्यांतून कशीं राहिलीं? तर यावर आमचें म्हणणें इतकेंच कीं, सर्वच यवन राजे अगर बादशहा अशा औरंग-जेबी वळणाचे नसून त्यांतील कित्येक अकबर बादशहाप्रमाणें सौम्य, शांत-तावादी व ऐक्येच्छु होते. अशा राजे व बादशहांच्या मेहेरबानीनेंच सदरी देवालयें व उत्पन्नें शीरसलामत राहिलीं. ही गोष्ट सर्वसंमत असली तरी, अशाप्रकारें हिंदुलोकांची मनधरणी करणाऱ्या समतावादी म्हणून गणलेल्या एकाद्या परमतसाहिष्णु चांगल्या मुसलमान बादशहानेंसुद्धां एकाद्या हिंदु अगर अन्य धर्मीयांना देवालयें बांधवून देऊन त्यांना इनामें घालून दिलीं; असें धाष्ट्यांचें विधान करणें मुळींच समंजसपणाचें होणार नाहीं! कारण ही गोष्ट मुसलमानी धर्मानें अगदीं निषिद्ध ठरविली आहे. अशा सद्व-र्तनी मुसलमान बादशहांनीं अगर राजांनीं या बाबतींत जर कांहीं दिल-दारपणा व उदारपणा दाखविला असेल तर तो फक्त इतकाच कीं, त्या त्या प्रख्यात देवालयांचीं पूर्वापार चालत आलेलीं उत्पन्नें त्यांजकडे परंपरेनें चालविण्याची कायमची हमी त्यांनीं दिली हाच होय! या बद्दल त्या त्या देवतांचें भक्तजन सदरीलप्रमाणें उदारपणा दाखविणाऱ्या मुसलमान बाद-शहांचे आभारी आहेत. असा प्रकार या देवालयासंबंधानेंही झालेला असून पुढें वर्णिला आहे, तो पहावा.

## गर्भदेवालयाचें बांधकाम करणारा कोण?

या विवेचनावरून श्रीवीरभद्रदेवाचें गर्भदेऊळ बांधवून देवाच्या पूजेस व उत्सवाप्रीत्यर्थ जमीन देण्याचें सत्कृत्य प्रथम करणारा पुण्यपुरुष यदुकुलतिलक सिंहणराजच होय, हें वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. आणि राजाश्रयावांचून अशीं महत्वाचीं कार्यें सिद्धीस जात नसतात. यावर कित्येक वाचक म्हणतील कीं, श्रीवीरभद्रदेवालयासारखें एकादें दहावीस फूट लांबींरुंदीचें लहानसें देऊळ बांधण्यास राजाश्रयाची काय जरूरी? पण वाचकहो, क्षेत्र यड्डरासारख्या गांवीं शेंकडों फूट खोलपर्यंत पक्का पाया न लागणाऱ्या अत्यंत भुसभुशीत काळया जमिनींत असें प्रमाणबद्ध सुंदर देवालय बांधविण्याचाच नव्हे तर त्या देवालयाच्या शाश्वतीसाठीं त्याच्या आसपास सुमारें शेंकडों चौरस यार्डपर्यंत चुनेगची पक्का पाया घालून ठेवण्याचें अत्यंत खर्चीचें कार्य, सामान्य जनाकडून होणारें खास नव्हे. हल्लीं दिसणाऱ्या सर्व ओंवऱ्या व तटबंदीसहीत विशाल वीरभद्रदेवालयाचा पाया गर्भदेवालयाबरोबरच घातला गेला आहे. इतकेंच नव्हे तर हल्लींच्या श्रीवीरभद्रदेवालयाच्या तटबंदीपलीकडे १५–२० फूट अंतरापर्यंत पूर्वींच घालून ठेविलेला पक्का पाया अद्याप आसपास खणतांना दिसून येतो! इतक्या भक्कम पायावर बांधिल्यामुळेंच या देवालयाच्या बांधणींतील एक दगडसुद्धां इकडे तिकडे न हालतां सर्व इमारत शाबूत राहिली आहे! नाहीं तर सध्यां कितीही खोल पाया काढून एकादी इमारत येथें बांधिली तरी दोन चार वर्षांतच भिंतींत चिरा पडून ती ढांसळल्याशिवाय राहात नाहीं. पण श्रीवीरभद्रदेवालय, त्यांतही त्यांतलि गर्भदेऊळ हें आज सुमारें सातशें वर्षेंपर्यंत दरसाल पंधरा वीस दिवस, क्वचित् महिना दोन महिने सुद्धां सतत महापुरामध्यें पाण्यांत बुडून जात असतांही, आजतागायत अखंडितपणें उत्तम स्थितींत उभें आहे! यावरून याचा पाया किती मजबूत असेल याची कल्पना करावी. तेव्हां असें प्रचंड कार्य राजाश्रयाशिवाय झालें असेल काय? नाहीं, हें उघडच दिसतें. असो.

-वर सांगितलेलें श्रीवीरभद्रदेवालयाचा विशाल असा पक्का पाया घालणें व त्यावरील मुख्य सुशोभित बांधकाम करणें ह्या गोष्टी राजाश्रयावांचून होणें शक्यच नाहींत हें तर सिद्ध झालें. तथापि आणखी एक शंका राहाते. ती ही कीं, हें काम सिंहणदेव राजाकडून झालें असें म्हणण्याला प्रमाण काय? दुसऱ्या कोणा राजाकडून अथवा पूर्वकाळच्या कर्नाटकांतील एकाद्या प्रसिद्ध सरदेसाई अथवा सरदारांकडून कां झालें नसावें? या शंकेचें समाधान करण्यास मागील प्रकरणांतील इतिहासाचें पुनः एकदां निरीक्षण करण्यास सांगून त्यानंतर ही शंका काढणाऱ्यांनाच आम्हीं असें विचारितों कीं, हें कार्य कोणा मुसलमान राजाकडून अगर बादशहांकडून झालें नाहीं, ही गोष्ट तरी आपणांस कबूल आहे ना? मग मुसलमाना-व्यतिरिक्त या भागांत आलेला व येथील देव-देवालयांकडे लक्ष पुरविणारा प्रख्यात क्षत्रिय राजा सिंहणदेव हाच होय. त्याच्यापूर्वीं सुमारें पांच सहाशें किंबहुना हजार वर्षें तरी या भागावर पूर्णपणें क्षत्रिय राजांचा अंमल बसलाच नव्हता. त्या काळीं या प्रांतावर राज्य करणारे बहुतेक राजे प्रत्यक्ष बौद्ध अथवा जैन मतानुयायी अगर त्या दोन्ही धर्मांना मान्यता देणारेच होते. शिवाय श्रीकाडदेवरुस्वामीसारखा कर्तबगार पुण्यपुरुष त्याकालीं कोणी उत्पन्नच झाला नाहीं ही गोष्ट सर्वमान्य आहे. आणि इ. स. च्या प्रारंभीं अथवा त्यापूर्वीं बांधिलेली हिंदु देवालयें सुद्धां बहुधा बौद्ध देवालयांच्या धर्तीवर गेलीं आहेत. पण या श्रीवीरभद्र देवाच्या गर्भदेवालयांत तसा प्रकार दिसत नाहीं. म्हणून हें देवालय अलीकडचें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणखी ज्या राजानें या क्षेत्राच्या पंचक्रोशींतील प्रसिद्ध श्रीकोपेश्वर देवाचा व देवालयाचा जीर्णोद्धार करून त्याला एका सबंध गांवाचें उत्पन्न इनाम करून देऊन तेथील पूजा व पालखी-सेवा वगैरे उत्तम प्रकारें चालण्याची व्यवस्था केली. त्याला तेथून केवळ दीड दोन मैल अंतरावर असणाऱ्या श्रीकोपनाथापेक्षां प्रख्यातीस आलेल्या अशा श्रीवीरभद्रदेवाची आठवण मुळींच झाली नसेल अथवा वरील प्रकारची उत्पन्नाची खैरात वाटतांना या यड्डूर क्षेत्रांतील श्रीवीरभद्रदेवाचे लिंगायत

पुजारी, भिक्षुक व त्यांचे गुरु तत्कालीन त्रिकालज्ञ महासाधु श्रीकाडदेवरु स्वामी स्वस्थ बसले असतील असें मुळींच म्हणवत नाहीं. असा कर्णासारखा उदारधी राजराजेश्वर दाता आपल्या गांवापासून एका हांकेच्या अंतरावर येऊन ठेपला असून आपल्या उदार देणग्यांनीं याचकांना सुवर्णमंदिरें बांधितां येईल असें ऐश्वर्य बहाल करीत असतांना, कोणता याचक घरकुलांत स्वस्थ घोरत पडेल? असा सुस्त जर कोणी असेल तर तो 'भिक्षुक' या संज्ञेस मुळींच पात्र नाहीं असें म्हणावें लागेल. यावरून आमचें वरील अनुमानच योग्य असून त्यावेळच्या श्रीकाडदेवरुशिष्यांनीं या देवाविषयीं व योगीश्वराविषयीं सदरी सिंहणदेव राजास पूर्ण माहिती देऊन त्या शिवभक्त राजेश्वरास या योगीमहाराजांच्या दर्शनास खास आणिलें असलेंच पाहिजे. मग या दोघां उत्तमोत्तम पुरुषांच्या भेटीनें वर सांगितल्याप्रमाणें हें एक सर्वोत्तम कार्य झालें यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

त्रिकालज्ञानी महासामर्थ्यवान् श्रीकाडदेवरु स्वामी अशा एकाद्या समर्थ सच्छिष्याची मार्गप्रतीक्षा करीतच असले पाहिजेत. कारण पुरातन अशा पुण्यपावन श्रीवीरभद्रलिंगाचा जरी त्यांनीं पुनरुद्धार केला तरी त्या प्रख्यात देवाला साजेल असें देवालय बांधणें व त्या देवाच्या पूजाअर्चेची निरंतर चालणारी व्यवस्था नीट रीतीनें करणें या गोष्टी अद्याप अपुऱ्याच राहिल्या होत्या. यांपैकीं देवालय बांधण्याची व्यवस्था यांच्या अनेक श्रीमंत शिष्यांकडून साधारणपणें झाली असती पण पूजाअर्चा निरंतर चालण्याकरितां कायमचें उत्पन्न देण्याची बाब राजसत्तेवांचून कशी पूर्ण व्हावी? अर्थात् या दोन्हीं बाबी उत्तम रीतीनें तडीस जाण्यास अशा एकाद्या पराक्रमशाली धार्मिक वृत्तीच्या राजेश्वराचीच अत्यंत जरूरी होती ती श्रीवीरभद्रदेवानें या सिंहणराजास इकडे आणवून पूर्ण केली. व श्रीस्वामींचा उद्देश अपेक्षेप्रमाणें सिद्धीस नेला.

या वैभवशाली राजानें श्रीस्वामीमहाराजांच्या इच्छेनुसार येथें देवालय बांधविण्याचें ठरविलें. पण त्यावेळीं स्वयंभू अशा श्रीवीरभद्र लिंगासंबंधानें एक अडचण उत्पन्न झाली ती ही कीं, हें स्वयंभू विशाल लिंग बरेंच

( सुमारें दोन फूट ) उंच असून सर्वत्र अगदीं छिद्रमय होतें; त्यामुळें त्यावर अभिषेक करितांना गंध, पुष्प, अक्षता, इत्यादि पूजाद्रव्यांतील कठीण पदार्थ त्या शेंकडों छिद्रांतून जाऊन बसत त्यामुळें पुनः शुद्धोदक स्नानाच्या वेळीं दहा वीस घागरी पाणी आणून स्वच्छ केल्याशिवाय अशा जिनसा त्या छिद्रमय पिंडींतून बाहेर निघतच नसत; आणि सायंकाळचे पूजेच्या वेळीं तर सर्व लिंग स्वच्छ पुसून कोरडें करणें पुजाऱ्यास अवश्य असे. कां कीं, त्याशिवाय त्यांना मागें सांगितलेल्या कारणाकरितां सुटका नसे. किंवा तेथें त्या जिनसा तशाच राहूं देण्यानें जास्त घाण जमण्याची भीति होतीच. यामुळें सायंकाळच्या पूजेच्या वेळीं नित्य लिंगास जें शुद्धोदक स्नान घालणें भाग पडे, तें पाणी दररोज त्याचवेळीं कुंडांतून लागलेंच काढून टाकणेंही पण जरूरीचें असे. नाहीं तर लिंगाच्या आसपास यज्ञकुंडभर पाणीच पाणी होऊन राहावयाचें ! आणि धूप, दीप, मंत्रपुष्प, महानैवेद्य वगैरे करण्यास तें पाणी तीर्थकुंडांत जिरून अगर वाहून जाईपर्यंत कांहीं काळ स्वस्थ बसणें भाग पडे. हें महालिंगपूजेचें तीर्थमय पाणी फुलझाडें अथवा बेलाच्या झाडांना घातलें पाहिजे. त्याशिवाय भलत्या जागीं ओतून भागावयाचें नाहीं. तेव्हां ही नित्याची अडचण दूर करणें अत्यंत जरूर होतें. प्रारंभीं ही अडचण विशेष भासली नाहीं. पण जेव्हां लोकसमुदाय जास्त जमूं लागला व यात्रा भरूं लागली, तेव्हां हें अभिषेकाचेंच पाणी काढणें फार त्रासदायक होऊं लागलें. त्यांत संध्याकाळच्या शुद्धोदक स्नानाचे आठ दहा घागरी पाण्याची भर पडतांच त्याचा तत्काळ उपसा होऊन तें योग्य ठिकाणीं पडणें जिकीरीचें होणें अगदीं साहाजिकच होतें. या अडचणीची कल्पना श्रीस्वामीमहाराजांना अगोदर पासून होतीच; परंतु ती देवालय बांधितेवेळींच युक्तीनें दूर करणें जरूर होतें. त्यावांचून दुसरा इलाज नव्हता. म्हणून ते स्वस्थ होते. यानंतर जेव्हां सिंहणदेव राजाच्या साह्यानें श्रीवीरभद्र देवालयाच्या बांधणीचा प्रश्न पुढें आला तेव्हां ही अडचण काढून टाकण्याची योजना श्रीस्वामींनीं केली ती अशीः—

---

# [ १३ ] सांप्रतचें श्रीवीरभद्रलिंग.

या पुराणप्रसिद्ध विशाल लिंगाला लोकांनीं भक्तिमय अंतःकरणानें केलेला अभिषेक व पूजा हीं तर पोहोंचावीं; परंतु या सर्वत्र छिद्रमय लिंगामध्यें पूजाद्रव्यें अडकून लिंगाच्या नित्यपूजेस व पुजाऱ्यास होणारा वरील प्रकारचा त्रास कायमचा दूर व्हावा म्हणून या स्वयंभू लिंगाच्या पिंडीचा फक्त शिरोभाग मोकळा ठेवून या विशाल लिंगाच्या चोहोंबाजूस लिंगाचें पीठ व पिंडी याला अगदीं लागूनच फार तर इंच दीड इंच अंतर ठेवून भक्कम चुनेगच्ची ओटा बांधून काढावयाचें व अशा रीतीनें लिंगा-भोंवतीं एकतऱ्हेनें समाधिच तयार करून या पवित्र लिंगाच्या शिरोभागावर मात्र सछिद्र पीठ ( जलहरीयुक्त ) असें दुसरें एक लहानसें लिंगच स्थापावयाचें! म्हणजे या वरच्या लहान लिंगाला केलेला अभिषेक वगैरे त्याच्या छिद्रमय जलहरींतून मूळच्या स्वयंभू लिंगाच्या शिरोभागास पोहों-चेल पण वर सांगितलेल्या गंधाक्षतादि पूजा द्रव्यांचा त्रास होणार नाहीं. अशी योजना ठरवून श्रीवीरभद्रदेवालयाचा पाया घालण्याच्या कामास सुरवात होतांच श्रीस्वामींनीं राजास सांगून कांहीं सेवक, लहान लिंगाच्या जळहरीस जरूर असलेली छिद्रयुक्त वालुकामय शिला आणण्यासाठीं श्री-क्षेत्रहंपीकडे पाठविले. कारण हंपीक्षेत्रानजीक तुंगभद्रा नदीच्या पात्रांत अशा वालुकामय शिलांचें खडक कांहीं ठिकाणीं असल्याचें श्रीस्वामींनीं आपल्या तीर्थाटनाच्या वेळीं पाहून ठेविले होते; आणि त्यावरील पिंडीकरितां श्रीक्षेत्रकाशींतील पवित्र गंगानदीच्या पुण्यप्रवाहांतील एक उत्तम शिला त्यांनीं स्वतःच तपासून पूर्वींच आपल्या बरोबर आणिली होती. होतां होईल तितका जलद प्रवास करून त्या राजसेवकांनीं दीड दोन महिन्यांच्या आंतच श्रीस्वामींना इष्ट असलेली एक वालुकामय विशाल शिला हंपीक्षे-त्रांतून आणून ती त्यांच्या स्वाधीन केली. अशाप्रकारें सर्व जुळणी होत आहे. इतक्या अवधींत गर्भ देवालयाचा पाया तयार झाला होतांच. मग

श्रीस्वामीमहाराजांच्या सांगण्याप्रमाणें या स्वयंभू लिंगासभोंवतीं वर लिहिल्याप्रमाणें एक लहानसें देऊळच तयार करून फक्त लिंगाचा शिरोभाग मात्र पृष्ठभागावरोवर दिसेल अशी तेथें फरशी वगैरे बांधून तयार केली. पुढें लवकरच गर्भदेवालय व त्याच्या आसपास यज्ञकुंडामधील सर्व लहान ओंवऱ्या व त्यावर फरसबंदी आणि या सर्वांभोंवतीं एक लहानशी तटबंदी बांधून तयार केली. या देवालयाबरोबरच नंदी, राचोटी व गणपति या देवांचींही लहान लहान देवळें तयार केलीं गेलीं.

याप्रमाणें सर्व बांधकाम पूर्ण होतांच सिंहणदेव राजास वर्दी पोहोंचविली. तो राजा या भागीं नवीन ( कोल्हापूरचें ) राज्य घेऊन त्याची व्यवस्था करण्यांत गुंतला होता म्हणून ही वर्दी पोहोंचतांच तो आपल्या सर्व सरंजामासह यड्डूर क्षेत्रांत हजर झाला. आणि श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणें मोठ्या समारंभाची तयारी केली. मग श्रीस्वामींच्याच हस्तें पुरातन श्रीवीरभद्रदेवाच्या स्वयंभू पिंडीच्या शिरोभागावर हल्लीं दिसणारी वालुकायम सछिद्र जलहरी बसवून तीवर त्यांनींच पसंत केलेली दिव्य पिंडी स्थापून महाभिषेकांनीं मंत्रद्वारें त्या नूतन लिंगाची प्राणप्रतिष्ठा केली ! ( या कारणानेंच श्रीकाडदेवरुस्वामी हे श्रीवीरभद्रदेवाचे पुनरुद्धारक गुरु होत, असें समजण्यांत आलें व तेव्हांपासून प्रत्येक सोमवारीं या सद्गुरुदर्शनार्थ श्रीवीरभद्रदेवाच्या उत्सवमूर्तीची पालखी श्रीकाडदेवरुमठास नेण्याचा क्रम सुरू झाला.) नंतर गणाराधना, ब्राम्हणभोजन व लक्षावधि लोकांना अन्नसंतर्पण करवून आणि सर्व भिक्षुकांस अगणित दानधर्म करून सर्वांस संतुष्ट करण्यांत आलें. हीच श्रीवीरभद्र देवालयाची वास्तुशांति होय. याच वेळीं पुजाऱ्यासहित सर्व सेवेकऱ्यांना जमिनी इनाम करून देऊन हा गांव देवाच्या नांवानें दिला गेला. त्यामुळें सर्वांच्या आनंदाची परमावधि झाली. यावेळीं फार मोठी यात्रा जमली व श्रीस्वामी महाराजाचें आणि या राजेंद्राचें नांव सर्वतोमुखीं झालें. असो. हा प्राचीन काळचा महासमारंभ चैत्रमासीं महादेव—पौर्णिमेदिवशीं झाला असला पाहिजे. म्हणूनच हल्लीं श्रीवीरभद्र देवाची यात्रा याच पौर्णिमेस भरत असते.

श्रीकाडदेवरुस्वामीमहाराजांच्या हस्तें झालेल्या या लिंगस्थापनेस अनुसरूनच श्रीकाडदेवरु मठाच्या बखरींत 'श्रीस्वामींनीं आपलें महत्त्व दाखवून वीरदेवास पलीकडे सारून दक्षयज्ञकुंडांत उत्तम रीतीनें श्रीवीरभद्रलिंगाची स्थापना केली.' असें वर्णन आलें आहे. ही लिंगस्थापना म्हणजे अर्थात्‌च हल्लीं दिसणाऱ्या श्रीवीरभद्रालिंगाची स्थापना होय. पुरातन लिंग स्वयंभू असल्यानें त्याची स्थापना श्रीकाडदेवरु स्वामींकडून होणें शक्य नाहीं. यावरून हल्लीं दिसणारें श्रीवीरभद्रलिंग श्रीकाडदेवरु स्वामींच्या हस्तें स्थापन झालें असून याच्या खालींच पुराणप्रसिद्ध स्वयंभूलिंग गुप्त आहे; आणि त्या स्वयंभू लिंगाला अभिषेकपूजादि समर्पित व्हावीं, या उद्देशानेंच दृश्यालिंगाची जलहरी सछिद्र शिळेची बसविली आहे, ही गोष्ट वाचकांच्या ध्यानांत आलीच असेल. पुरातन गुप्त लिंग हल्लींच्या लिंगापेक्षां फारच मोठें आहे. त्या लिंगाच्या पिंडीवरच मध्यभागीं हल्लींची पिंडी असून या वालुकामय जलहरीच्या वर्तुळपरिघाइतका त्या स्वयंभू पिंडीचा परीघ आहे. म्हणून सध्यां पिंडीच्या सभोंवतीं जलहरीवर कोठेंही अभिषेक केला तरी तो मूळ लिंगास पोहोंचतोच. या मूळलिंग इतक्याच उंचीवर त्याचवेळीं श्रीस्वामींनीं वीरदेवाचीही स्थापना केली आहे. सध्यां गर्भदेवालयाच्या दक्षिण बाजूच्या भिंतींतील बाहेरील भागीं असणाऱ्या मोठ्या कमानींत त्या वीरदेवाचा फक्त शिरोभाग मात्र दिसून येतो. तो पाहिल्यास पुरातन स्वयंभू लिंगाचा शिरोभाग किती उंचीवर व कसा असावा याची साधारण कल्पना येईल. या दोन्ही देवांबरोबरच 'चंडिकेश्वरा'चीही तेथें जवळच स्थापना करून सोडिली आहे. मग गर्भदेवालय व सभोंवतालचा प्राकार तयार होतांच पाया खणतांना सांपडलेल्या सर्व देवमूर्ति त्या प्राकारांतील कोनाड्यांतून किंवा सभोंवार ठेवून दिल्या आहेत. हल्लीं दिसणारें श्रीवीरभद्र देवालयावरील शिखर मात्र त्यावेळीं तयार झालेलें नाहीं. कारण त्याची बांधणी अलीकडे दोन अडीचशें वर्षांतच झाली आहे. त्यापूर्वीं या देवळावर नंदी किंवा राचोटी या देवालयांवर आहेत तसें साधें शिखर होतें.

श्रीवीरभद्रदेवालयाबरोबरच यावेळीं अनेक लहान देवळें बांधिलीं गेलीं आहेत. श्रीपंचालिंग, श्रीचंद्रेश्वर, श्रीकडबागिल वीराण्णा, श्रीरामलिंग इत्यादि सर्व प्राचीन देवळें याच अवधींत बांधिलीं आहेत. श्रीक्षेत्रचंदूर येथलि श्रीचंद्रेश्वर लिंगासही जामिनी इनाम मिळालेली वेळ हीच होय. येणेंप्रमाणें श्रीकाडदेवरु स्वामीच्या कृपेनें दानशूर सिंहणदेव राजाकडून या क्षेत्रांतील सर्व देवळांचा जीर्णोद्धार होऊन त्यांच्या पूजाअर्चेची उत्तम सोय झाली. त्यामुळें पूर्वीपेक्षां फारच मोठ्याप्रमाणात दरसाल यात्रा भरूं लागली. येथील त्या महापुण्यपुरुषांच्या दर्शनापेक्षेनें येथें वर्षभर सर्वदांच यात्रा भरलेली असे; पण त्यांतल्या त्यांत विशाळी अमावास्येनंतर माघ, फाल्गुन चैत्र व वैशाख या चार महिन्यांत तर हें क्षेत्र भक्तलोकांच्या दाटीनें सर्वदा प्रफुल्ल झालेलें दिसे. चैत्री पौर्णिमेस तर यात्रेची परमावधि होई. पुढें वैशाख अखेर येथील गर्दी कमी होत जाई.

अशा रीतीनें या क्षेत्राचें वैभव वाढून भक्तांची गर्दी जमूं लागल्यानंतर येथील पूजा, उत्सवादि प्रकारांस व्यवस्थित स्वरूप देणें भाग झालें म्हणून या जमणाऱ्या भक्तांच्या उत्कट इच्छेनें व श्रीस्वामीमहाराजांच्या कृपानुग्रहानें पालखी महोत्सवाचे निरनिराळे प्रकार सुरू झाले. हल्लीं दसरा, संक्रांत इत्यादि वेळीं होणारे विशेष प्रकारचे पालखी महोत्सव हे त्यांचेच अवशेष होत. त्यांचें वर्णन मागें पूर्वार्धांत सविस्तर आलेंच आहे.

---

## [१४] क्षेत्र यडूरगांवचा उदय

मागील विवेचनावरून श्रीकाडदेवरु स्वामींच्या आगमनानें क्षेत्र यडूरचा भाग्योदय कसा झाला. हें वाचकास विदित झालेंच आहे. या गांवाच्या ठिकाणीं त्यापूर्वीं दाट झाडी होती, तेथें प्रथम श्रीकाडदेवरु स्वामींची लहानशी पर्णकुटि तयार होऊन त्यानंतर श्रीवीरभद्रलिंगाचा जीर्णोद्धार होतांच या महात्म्यांची कीर्ति वाढून त्यांच्या पर्णकुटीचें एका

मोठ्या रम्य आश्रमांत रूपांतर होऊन तेथें त्या महात्म्यांचे अनेक शिष्य राहूं लागले. मग यादव राजेंद्र सिंहणदेवाच्या देणगीनें या श्रीवीरभद्र देवाचे वीरशैव भक्त, त्याचे कायमचे सेवक बनले; व त्यांतील कित्येकांनीं श्रीस्वामीमहाराजांच्या आश्रमाजवळच आपल्या झोंपड्या घालून ते त्यांत राहूं लागले. अशा रीतीनें या वस्तीस लहानशा वाडीचें स्वरूप आलें. या वाडींत बहुतेक सर्व जंगम भिक्षुकच यावेळीं राहात असत म्हणून त्यास ' जंगमवाडी ' हें नांव यथार्थ शोभलें असतें. याच पुण्यक्षेत्रांत श्रीकाडदेवरु स्वामींच्या समाजोद्धारक किंबहुना धर्मोद्धारक महत्कृत्याची मुहूर्तमेढ झाली. येथें नित्य हजारों लोक श्रीस्वामींचा उपदेश ऐकण्यास येत व त्यांपैकीं कित्येक शिवदीक्षा घेऊन पावन होत. अशा प्रकारें या आश्रमस्थानास एका प्रख्यात वीरशैव मठाचें स्वरूप प्राप्त झालें.

या सत्पुरुषाच्या आश्रमस्थानास जरी लहानशा गांवाचें स्वरूप प्राप्त झालें; तथापि या गांवासभोंवतीं अत्यंत झाडी असून अद्याप विशेषशी जमीन लागवडींत आली नव्हती. अलीकडे दहा-बारा वर्षांत याला भरू लागल्यानें जुन्या गांवापासून या मठापर्यंतच्या भागीं मध्यंतरीं असलेली झाडी बरीच तुटून जाऊन ती बरीच विरळ झाली होती. म्हणून सिंङ्गणदेव राजानें सेवकांस जमिनी इनाम देतांना त्यावेळीं लागवडींत असलेल्या जमिनी बरोबरच झाडी तोडिल्यास लवकरच सुलभपणें लागवडींत आणण्यायोग्य अशी मठापर्यंतची जमीनही सेवकांस इनाम दिली आहे. मठाच्या पश्चिमेस तर निबिड अरण्य असल्यानें त्यांपैकीं कांहीं देतां येणें शक्यच नव्हतें, किंवा देऊन न दिल्यासारखेंच होतें; म्हणून सध्यां श्रीक्षेत्र यड्डूर व चंदूर येथील श्रीचंद्रेश्वर अर्थात् अदृश्येश्वर देवाचें देवालय यांमध्यें जो दक्षिणो-

---

१ हें कार्य क्रमशः कसें झालें असेल याची कल्पना करण्यास फार दूर जाणें नको. अगदीं अलीकडचे हल्लीं हयात असलेले महासाधु परमहंस श्रीसिद्धारूढ स्वामी हुबळी यांच्या आश्रमाचें रूपांतर होऊन सध्यां तेथें किती विशाल मठ तयार झाला आहे हें ध्यानांत आणावें, म्हणजे वरील गोष्टीची सत्यता पूर्ण पटेल.

त्तर रस्ता थेट गेला आहे; त्या रेषेच्या पूर्वेसच बहुतेक सर्व सेवकांच्या जमिनी आहेत. त्या रस्त्याच्या पश्चिमेस सेवकांच्या जमिनी फारशा नाहींत याचें कारण हेंच होय. पश्चिमभागच्या सर्व जमिनी यानंतर लागवडींत येत गेल्या हें यावरून उघड दिसतें.

या काळीं यड्डूर क्षेत्राच्या पंचक्रोशींत ठळकपणानें दिसून येणारीं खेडीं यड्डूर, चंदूर, खिद्रापूर, रामपूर व मांजरी हीं होत. दाट झाडींमध्यें दहा वीस घरांनीं वसलेलीं हीं खेडीं विशेष प्रसिद्ध होतीं अशांतला प्रकार नाहीं. खिद्रापूर व रामपूर या खेड्यांतून जरा जास्त वस्ति असावी, व तींतून गांवकामगार असावेत. कारण या काळीं हीं गांवें तेथील ग्रामदेवतांच्या नांवें इनाम देऊन त्यांविषयीं सनदा दिल्या होत्या; पण यड्डूर, चंदूर येथें त्याकाळीं पाटील तरी होते कीं नाहीं याची वानवाच आहे. कारण चंदूर येथें पंधराव्या शतकामध्यें वतनदार पाटीलकीचा हक्क उत्पन्न झाला आहे. हें पुढें ओघानें सांगण्यांत येईलच. श्रीवीरभद्रलिंगाची प्रसिद्धि होऊन श्रीकाडदेवरु स्वामींच्या निवासानें श्रीक्षेत्र यड्डूरचा उदय झाला आणि येथें यात्रा जमूं लागली. तेव्हां या गांवातूनही वस्ति हळुहळु वाढूं लागली म्हणून वाढत्या गरजेप्रमाणें जास्त जमीनही पण लागवडींत येऊं लागली. ज्यावेळीं हीं गांवें येथील देवांच्या नांवानें इनाम मिळालीं, त्याकाळीं पुजारी व सेवकांस ज्या जमिनी मिळाल्या त्याशिवाय जास्त जमिनी लागवडींतच नसाव्या असा अदमास आहे. आणि या साधारणपणें लागवडींत असलेल्या सर्व जमिनी जरी देवांच्या सेवकांनीं व्यापिल्या, तरी त्या सेवेकऱ्यांचें शेतीकडे विशेष लक्ष नसून श्रीवीरभद्र देवदर्शनार्थ येणाऱ्या हजारों उदार भक्तांकडून त्यांच्या उदरनिर्वाहाची भरपूर सोय उत्तम प्रकारें होई; त्यामुळें शेतीवांचून त्यांचें विशेष अडत नसे. म्हणून ह्या जमिनी सेवकांस इनाम मिळाल्यानंतरसुद्धां अनेक वर्षेपर्यंत पूर्वीसारख्या रान माजून राहिल्या होत्या. यांत शंका नाहीं. पुढें जेव्हां शेंदीडशें वर्षांनंतर या सेवकांचा परिवार वाढत जाऊन नुसत्या भिक्षुकीवर सर्वांचा सर्वकाळ उदरनिर्वाह होईना. तेव्हां कोठें यांना त्यांची

आठवण होऊं लागली, व ते थोडथोडी शेती करूं लागले. त्यामुळें एकामागून एक जमीन लागवडींत येत गेली. मात्र या अवधींत श्री-काडदेवरुस्वामींच्या धर्मोपदेशानें या भागांतील सर्व अज्ञ जनतेंत त्यांनीं वीरशैव मताचें बीजारोपण केलें होतें, व हजारो लोकांस वीरशैव दीक्षा देऊन त्यांना आपल्या सांप्रदायांत सामील करून: घेतले होते. उत्तरेस नाशिक-पैठणपासून तहत दक्षिणेस तुंगभद्रा तीरापर्यंत यांचा शिष्य-परिवार पसरला होता. असें आज मितीस त्या त्या भागांपर्यंत सुखानें ठिकठिकाणीं नांदत असलेल्या त्यांच्या तुरळक शिष्यघराण्यांवरून दिसून येतें! अर्थात् या क्षेत्रांतील व आसपासच्या खेड्यांतून जी वस्ति वाढली ती मुख्यत्वें श्रीस्वामींच्या नवमतोद्धारित वीरशैव लोकांकडूनच वाढली, हें निराळें सांगणें नको. म्हणून श्रीक्षेत्र यडूरच्या आसपास पांचपन्नास मैलांतील सर्व गांवांतून अशा वीरशैव लोकांची वस्ति विशेष आहे, त्याचें कारण हेंच होय.

---

## [ १५ ] पुनश्च राज्याधिकारपरिवर्तन.

महाशौर्यशाली दुसऱ्या सिंहणदेव राजानें कोल्हापूरच्या शिलाहारांचा वींमोड करून या सर्व उत्तर कर्नाटक प्रांतावर आपली सत्ता दृढमूल केली. अकराव्या शतकाच्या उत्तरार्धापासून इ. स. १२७१ पर्यंत वरील सिंहण-राजासह एकूण नऊ पुरुषांनीं देवगिरी येथें राज्य केल्यानंतर दहावा रामराजा सिंहासनारूढ झाला. त्याच्या कारकीर्दींत दिल्लीच्या सुलतानाचा पुतण्या अल्लाउद्दीन यानें कशी स्वारी केली व पुढें इ. स. १३१८ मध्यें यादवांचें राज्य मुसलमानांनीं कसें खालसा केलें हें मागें सांगितलेंच आहे. पुढें इ. स. १३३१ त महंमद तुघ्लख यानें देवगिरीस ' दौलताबाद ' असें नांव देऊन तेथें कांहीं महिने त्यानें राज्यही केलें. शेवटीं

इ. स. १३४७ त बहामनी राज्याची स्थापना होऊन मुसलमानांचा पाय दख्खनमध्यें पक्का रोंवला गेला.

अशा रीतीनें राज्यक्रांति होऊन क्षत्रियांचें राज्य नष्ट झालें व मुसलमानी अंमल सुरू झाला. परंतु प्रत्यक्ष मुसलमानांची राजसत्ता दक्षिणेंत प्रस्थापित होण्यापूर्वींच अनेक वर्षें बरेच मुसलमान फकीर व अवलिया हे परमात्मा ( अल्ला ) प्राप्ति आणि मनःशांतीस्तव दक्षिणेंतील अरण्यमय रम्य प्रदेशांत आपापल्या शिष्यांसह येऊन राहिले होते. ज्याप्रमाणें प्राचीन काळीं उत्तर हिंदुस्तानांत आर्यलोकांचीं अनेक राज्यें स्थापित होऊन तेथील लोकवस्ति वाढतांच अनेक आर्य ऋषि तपश्चर्येंकरितां निवांत व रम्य अशा दक्षिण हिंदुस्तानांतील दंडकारण्यांत प्रथम आले! व त्यांनीं सगळीकडे आपापले आश्रम स्थापिले. आणि मग आर्य राजांनीं दक्षिणेकडे आपला मोर्चा फिरविला; त्याचप्रमाणें अल्लाउद्दीन खिलजीची दक्षिणेंत स्वारी होण्यापूर्वीं अशा प्रकारचे अनेक मुसलमान अवलिये येथें ठिकठिकाणीं आपल्या शिष्यसमूहासह राहिले होते. व त्यांच्या दर्शनास केव्हां केव्हां उत्तर हिंदुस्तानांतील मुसलमान राजे व क्वचित् दिल्लीपति सुलतानही येत असत. अशापैकींच एक प्रसिद्ध अवलिया 'पीर मिरासाहेब' हे कुडची येथें राहात होते; व दुसरे अथणी तालुक्यांतील श्रीकाडदेवरु स्वामींची जन्मभूमि गुंडेवाडी गांवाजवळच्या वडगेरी नामक डोंगरांत 'शेख सलीम' म्हणून एक प्रख्यात अवलिया राहात होते. आमच्या स्वामीमहाराजांची दोघा अवलियांशीं निरनिराळ्या वेळीं कशी मुलाखत झाली व त्यांनीं तेथें कोणत्या लीला केल्या हें सांगण्यापूर्वीं आणखी थोडा इतिहासाचा दुवा जोडून देणें भाग आहे. कारण श्रीकाडदेवरु सारख्या महायोग्याला या अवलियांच्या दर्शनास जाण्याची काय अवश्यकता होती, तें स्पष्ट कळेल.

इ. स. १३४७ मध्यें गुलबुर्गा येथें इतिहासप्रसिद्ध 'जाफरखान' ऊर्फ '**हसन गंगू**' यानें '**बहामनी**' राज्याची स्थापना केल्यानंतर त्या राज्याचे अनेक सरदार मुलुख जिंकण्यासाठीं सगळीकडे स्वाऱ्या करूं

लागले. पुढें जेव्हां बहामनी बादशहा निर्बल झाले व त्यांची मध्यवर्ती सत्ता संपुष्टांत आली, तेव्हां त्या बादशाहींतले चोहोंकडे अधिकारारूढ असलेले वर सांगितलेले पराक्रमी सरदार व त्यांचे वंशजच त्या त्या प्रांताचे स्वतः मालक बनले; आणि त्यांनीं बादशहाची सत्ता पार झुगारून दिली. अशा रीतीनें स्वतंत्र झालेल्या सरदारांत यूसफ आदिलशाह हा अग्रेसर होता. त्यानें स्वपराक्रमानें इ. स. १४८९ सालीं विजापूर येथें एका स्वतंत्र राज्याची स्थापना केली, व बहामनी बादशहांच्या ताब्यांतील अरबी समुद्रापर्यंतचा सर्व पश्चिमेकडील अफाट प्रदेश हिरावून घेऊन त्यानें आपल्या राज्यांत सामील केला. हाच विजापूरच्या प्रसिद्ध आदिल-शाहीचा मूळ संस्थापक होय. यावरून इ० सनाच्या पंधराव्या शतका-पासून उत्तर कर्नाटक प्रांतांतील या यड्डूर क्षेत्रावर आदिलशाहीचा अंमल सुरू झाला हें इतिहास-ज्ञांस विदित झालेंच आहे. याच अदिलशाहीच्या अमलांत श्रीकोपेश्वर देवालयावर इ. स. १५६० च्या सुमारास कसा दुर्धर प्रसंग ओढवला; पण त्याचें मोठ्या शिकस्तीनें निवारण झालें, हें मागें सांगितलेंच आहे. असा दुर्धर प्रसंग आपण नूतनोद्धरित श्रीवीरभद्रलिंगा-वर व देवालयावर येऊं नये. म्हणून मुसलमान साधुपुरुषांमार्फत यवन राजांवर आपली धार्मिक तेजाची छाप बसवून पुढें येणाऱ्या मुसलमानांच्या टोळधाडीपासून आपला देव व धर्म यांचें रक्षण करण्याची पूर्वतयारी करून ठेविली. म्हणूनच पुढें मुसलमानांनीं या भागांत शेंकडों वर्षे धुमाकूळ घातला व अनेक देव, देवळें भ्रष्ट व नामशेष केली; परंतु या देवालयास त्यांजकडून यत्किंचितही उपसर्ग पोहोंचला नाहीं. इतकेंच नव्हे तर उलट या देवालयाच्या व श्री काडदेवरु स्वामींच्या मठांच्या उत्पन्नांत मुसलमानांकडून भरच पडत गेली! त्याचें मर्म हेंच होय. तेव्हां अशीं मुसलमान समाजावर परंपरागत छाप पडण्यासाठीं कोणतीं अलौकिक कृत्यें आमच्या या साधुवर्यांनीं केलीं त्याचें थोडक्यांत दिग्दर्शन करूं.

---

# [१६] श्रीकाडदेवरु-लीलावर्णन

पुराणप्रसिद्ध श्रीवीरभद्रालिंगाचा व त्यायोगें श्रीयड्डूर क्षेत्राचा पुनरुद्धार करण्याची जी एक अपूर्व कामगिरी श्रीस्वामींनीं प्रथमारंभींच केली, तिचें व त्यांच्या धार्मिक कर्तृत्वाचें येथपर्यंत विवेचन केलें. हीं आपलीं नूतन कार्यें चिरंजीव व चिरपारिणामीं कशीं होतील याचें वर्महि त्याच सर्वज्ञ महा पुरुषाला ठाऊक असणें अस्वाभाविक नाहीं. आपल्या धार्मिक कृत्यांवर कशा प्रकारचे आघात पुढें होणार आहेत व त्यांच्या निवारणाचे आज काय उपाय योजावेत हें जर त्यांना अगोदरच न कळतें तर ते त्रिकालज्ञ कसले ? अर्थात् पुढील हजार पांचशें वर्षांच्या दीर्घकाळांत आपल्यास पुनः अवतार घेण्याचें कारण राहूं नये म्हणून ज्या ज्या योजना करून ठेवणें शक्य होतें त्या त्या करण्यास आतां श्रीस्वामींनीं सुरवात केली. त्यांचें सविस्तर वर्णन पुढें द्यावयाचें आहे. त्यापूर्वीं श्रीक्षेत्र यड्डूर सोडण्याच्या अगोदर येथें श्रीवीरभद्र देवाची पूजा, पालखी उत्सव व देवालयाची एकंदर व्यवस्था आपल्या शिष्यांकडे सोंपवून मग ते धर्मोपदेशाकरितां संचारास निघाले. येथून न जाण्याविषयीं त्यांच्या असंख्य शिष्यांनीं अत्यंत आग्रह धरिला; परंतु मतोद्धाराचें कार्य करण्याची आवश्यकता सांगून पुनः लवकरच परत येण्याचें आश्वासन देऊन श्रीकाडदेवरुस्वामी येथून जे निघाले ते कुडचीकडे गेले. कुडची येथें त्यावेळीं पीर मिरासाहेब नांवाचा मुसलमान अवलिया होता. येथें व यानंतरच्या प्रवासांत श्रीस्वामींनीं आपल्या योगसामर्थ्यानें ज्या दैवी लीला दाखविल्या, त्या श्रीकाडदेवरु मठांच्या बखरकाराच्या शब्दांतच पुढें देत आहोंत. बखर म्हणते—(१) 'हड्डूर' येथें वीरापानी दक्षाच्या यागकुंडांत होता. बीरापास येकीकडे करून

१ सदरहू बखर मोडी लिपींत सुडाच्या कागदावर एकाच अंगास लिहून तें कागद ( वंद ) एकास एक जोडून लांबच लांब अशी जन्मपत्रिकेसारखी सुरळी करून ठेविली आहे. हिचा आरंभीचा थोडा भाग जीर्ण होऊन फाटून

स्वामीनी आपले महत्त्व दाखवून श्रीवीरभद्रस्थापना करून (२) कुडचीस येता समई नदीस पूर आली होती; तेव्हां आपली ' कांबल ' आसन घालून नदी उतरून येता समई तेथील पीर मिरासाहेब यांणी स्वामीचे चमत्कार पाहून पिरानी स्वामीस बोलावून घेऊन गांवांत आणी याचे घरांत उतरविले. (३) आदर उपचार पिरानी करावे म्हणून ' मांसाचे आहार ' करून ठेविले ते स्वामीनी घेऊन हात ठेविताच ' पुष्प ' जाहले येस ( असे ) कितीएक महत्व पाहून आणखी चमत्कार पाव्ह म्हणून

---

गेला आहे. आणि शेवटीं उपलब्ध असलेल्या बखरीचा सत्ताविसावा बंद भरल्यानंतर फिरून त्याच्या पाठीमागें लिहिण्यास सुरवात करून दोन बंद पाठपोठ लिहून पुढें चालू करून ठेविली आहे. हिच्या आरंभीच्या भागाचा पत्ता नसल्यानें ही कोणी लिहिली व केव्हां लिहिण्यास आरंभ केला हें समजण्यास कांहीं मार्ग नाहीं. तथापि यांतील सर्व लेखन एका कालींच झालें असून तें सतराव्या शतकाच्या अखेरीच्या सुमारास यडूर मठाचे पट्टचरमूर्ति स्वतंत्र वागूं लागले तेव्हां झालें असावें असें दिसतें. यांत य मठाचें मूळपुरुष महायोगी श्रीकाडदेवरु यांच्यासंबंधानें आलेली माहिती त्यांच्या अवतारसमाप्तीपर्यंत बखरकारांच्या शब्दांतच वर दिली आहे. तींत या महास्वामींनीं आपल्या योग-सामर्थ्यानें जे चमत्कार दाखविले तें व ज्याशेगें श्रीस्वामी हे अवतारी महात्मे होते हें सिद्ध होतें, अशा अलौकिक लीला दाखविल्या आहेत. त्यांतील नंबर १, ५, ६, या लीला त्यांच्या अवतारकृत्याचें माहात्म्य दाखवितात, तर नंबर २, ३, ४, व श्रीस्वामींचें दिल्लीस जाऊन येणें, या गोष्टी त्यांचें योगसामर्थ्य किती असामान्य होतें तें व्यक्त करितात. यांमधील १ ली गोष्ट जी ' श्रीवीरभद्र लिंगाचा जीर्णोद्धार ' त्याविषयीं मागें सविस्तर वर्णन आलेंच आहे. पुराणप्रसिद्ध श्रीवीरभद्र लिंगाची स्थापना फार प्राचीन कालीं झाली असतांना पुढें कालपरिवर्तनानें येथें जें स्थित्यंतर घडून आलें होतें तें श्रीशंकरांनीं त्या प्राचीनकालीं श्रीवीरभद्र देवास देऊन ठेविलेल्या वरद वचनानुसार श्रीवीरभद्रलिंगाचा पुनरुद्धार करून, शिवभक्तांना मनःस्वास्थ्य मिळवून देण्याच्याच केवळ हेतूनें आपल्या अंशीभूत श्रीकाडदेवरस्वामीचा अवतार निर्माण केला ! अर्थात या अवतारी पुरुषाचें हें

(४) पिरानी घरांत घालून कुलूप घातलें तेव्हां स्वामी घरास कुलूप घातले प्रमाणें तसेच होते घरांत पादुका व वेत दोन्ही ठेवून आपण नदीस जाऊन तेथे स्नान करून तेथे शिवपूजा करीत बसलेहोते! गांवाचा कोणी नदीस गेले होते त्यास पाहून स्वामीनी बोलिले जे, आपली पीर मिरासाहेव यास आम्ही गेलो म्हणून सांगणे. येस बोलून गुडेवाडी प्रो. (परगणे) आथणी तेथ आले. तेव्हा काटवणी (काटेकुटे, अरण्य) होते मृग राक्षीची संच्यार नव्हते तेथे. शेखसलीम म्हणून वली याणी

---

कर्तव्यच होतें, यांत शंका नाहीं. मग आपल्या अवतारकर्तव्याची पूर्तता होऊन त्यांना स्थिरत्व प्राप्त होण्यास्तव तदनुषंगी जीं कार्यें तत्कालीन परिस्थितीस अनुसरून श्रीस्वामींना करावीं लागलीं; व अन्यधर्मीय अधिकारसंपन्न जनांस आपलें महत्व पटवून देऊन त्यायोगें आपल्या नूतनोद्धरित श्रीवीरभद्रलिंगाच्या व आपल्या हजारों अनुयायांच्या संरक्षणाचा पक्का पाया घालावा लागला, त्याच्या दर्शकच या लीला होत. नंबर २ व ४ या लीला म्हणजे पाण्यावर फुलाप्रमाणें तरंगणें व प्रतिबंधांतून विनधोक पार होणें, या गोष्टी म्हणजे योगसंपन्न पुरुषाच्या हाताचा मळ होय. अलीकडेसुद्धां कित्येक योगसंपन्न सत्पुरुषांनीं अशा प्रकारच्या लीला करून दाखविल्या आहेत. नंबर ३ची मांसान्नाचें गुलाबाच्या फुलांत रुपांतर होणें, ही गोष्ट योगीपुरुषाच्या प्रबल इच्छाशक्तीचें फल असावें किंवा दैवी सामर्थ्य असावें. नंबर ५ची लीला ही खरोखर त्यांची दैवी शक्ति व्यक्त करणारी आहे. थसलथाजागीं झरा उत्पन्न करून तो अखंडपणें चालेल अशी व्यवस्था ठेवणें हें कृत्य मानवी सामर्थ्याच्या मर्यादेबाहेरचें आहे. तसेंच योगी सत्पुरुष ज्याप्रमाणें निष्प्रतिबंध असतात त्याचप्रमाणें ते इच्छा येईल तसें हवें तेव्हां हव्या त्या ठिकाणीं विनधोक जाऊं शकतात. याचेंच प्रत्यंतर श्रीस्वामींच्या दिल्लीच्या पर्यटनांत येत आहे. अशा इच्छापर्यटनाचे अथवा एके ठिकाणीं अदृश्य होऊन दुसऱ्या ठिकाणीं त्याचवेळीं दृश्य होणें अशासारखे चमत्कारही योगी सहज करूं शकतात. यांवरून श्रीस्वामी येथून सुमारें हजार मैल अंतरावरील दिल्लीनगरीस कसे जाऊन आले असतील? अशी शंका येण्याचें कारण नाहीं. शेवटची नंबर ६ची लीला ही तर दैवीशक्तीचें आदर्शच होय. कारण ऐंशीं वर्षांच्या म्हाताऱ्यास

मौजे मजकूरचे रानांत वडगेरी म्हणून डोंगर तेथ होता. स्वामीची व पिराची भेट जाहली. उभयतांनीं आपले स्वकुशेलार्थ दौलतासमई पिराची मन संतोष होऊन पाच दिवस आम्हाजवळ आसावे म्हणून विनंति करून घेतली. स्वामींनी पिरानी केलेले विनंतीस मान्य होऊन पाच दिवस तेथे राहिले; मग पिरानी दररोजी दिलींत आकबर पातशाईच (?) पंक्ती भोजन करून येत होते तेव्हां स्वामी आले पासून पाच रोज दिलीस जात नव्हते मग पादशाहानी ध्यानास आणीले जे पिरानी किंनिमित्य

---

मुदकप्पास साठ वर्षांच्या म्हातारी मुदकव्वापासून दोन प्रतापी पुत्र व्हावे ! ही दैवी लीला अगाध नव्हे काय? साधारणतः पन्नास वर्षे वयानंतर स्त्रियांना गर्भसंभव मुळींच होत नाहीं. असा सृष्टिनियमच आहे; कारण त्याच्या आंतच त्यांचा विटाळ बंद होऊन गर्भाशय निद्रिस्त होतें. मग साठ बासष्ट वर्षांच्या सुमारास स्त्रियांना गर्भसंभव होणेंच अशक्य. परंतु निसर्ग नियमांचेंच नियमन करण्याचें ज्या सृष्टिचालक परमेश्वराचें कर्तव्य, त्याच्या अंशीभूत अवतारी सत्पुरुषाला या निसर्ग नियमांला निराळें वळण लावणें असाध्य असेल काय? मुळींच नाहीं. तेव्हां ही गोष्ट त्यांच्या दैवी सामर्थ्याची पूर्ण द्योतक आहे असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं.

आतां यावर कित्येक अश्रद्धावान् लोक अशी शंका घेतील कीं, ज्या बखरीमध्यें या लीला वर्णिल्या आहेत ती जर त्या साधुवर्यांच्या अवतारसमाप्तीनंतर दोन अडीचशें वर्षांनंतर लिहिली गेली आहे असें म्हणणें आहे तर त्यांत बखरकारानें अतिशयोक्ति केली नसेल कशावरून? अशा निसर्गाविरुद्ध गोष्टी घडतील कशा? एकादा सत्पुरुष जरा प्रसिद्धीस आला कीं, त्याच्या हयातींत व निधनानंतर अशा दैवी थोतांडाच्या आख्यायिका त्याच्या पाठीस चिकटवून ठेवण्याची खोड अनेक अंधश्रद्धावानांना जडलेली असते. तसाच प्रकार येथेंही असेल. या लीलांना ‘ अंधश्रद्धाळू लोकांच्या अतिशयोक्तीच्या कल्पना ’ याहून जास्त किंमत देतांच येत नाहीं. ’ अशा शंकेखोरांना आम्हीं इतकेंच सांगतों कीं, ज्या लीला या बखरकारांनीं वर्णिल्या आहेत त्यांचा प्रत्यंतर पुरावा त्या काळींच नव्हे तर आजतागायत अत्यंत ठळकपणें दिसून येत असलेला प्रत्यक्ष पाहिल्यानंतर तरी या लीला म्हणजे

पाच दिवस भोजनास येत नाहीं म्हणून आपण ठाकोठाक फौजसुद्धां आपले गुरु शेख सलीम पिराची दर्शनासी आले तेव्हां स्वामीनी व पिरानी आपले आत्मविचार रहशे बोलत बसले समई पादशाइनी आले व पिरानी पाहून आपले हातातील रुमाल फिरविले ते पाहून पादशाहानीं आपली बा (बरोबरचे) फौज येकीकडे ठेवून आपण खुद येकठाच आपला गुरु पीराजवळ आले नंतर पादशाईनी पिरास विचारिले जे आपण किंनिमित्य भोजनास येत नाहीं त्यास्तव आमचे येंणे जाहले म्हणून त्याजवरी

---

केवळ कविकल्पना नसून सत्यप्रचीतीच्या आहेत हें कबूल कराल ना? ऐका व पहा तर मग यांची प्रचीती—

पहिली लीला श्रीवीरभद्रलिंगाचा पुनरुद्धार ही होय. हें पवित्र लिंग तर सर्वांच्या नित्य दर्शनांत आहेच. आतां शंका फक्त इतकीच कीं, या हल्लीं दिसणाऱ्या लिंगाखालीं स्वयंभु लिंग आहे हें कशावरून? तर आम्हीं म्हणतों, अशी असंख्य छिद्रयुक्त जलहरी असलेलें एक तरी प्रख्यात पुरातन लिंग दुसरीकडे आपण दाखवूं शकाल काय? शिवाय अशी छिद्रमय ओबड धोबड शिला येथें बसविण्यापेक्षां एकादा गुळगुळीत घोटीव फत्तर त्या पूर्वकारच्या लिंगस्थापकांना मिळाला असता कीं नाहीं? मग अशी सछिद्र जलहरी येथें बसविण्यांत कांहीं हेतु असलाच पाहिजे. तो हेतु दुसरा कोणता नसून त्या 'गुप्त' असलेल्या स्वयंभु लिंगास अभिषेक घडावा हाच होय. याहूनही जास्त पुरावा कोणास पाहिजे असेल तर त्यांनीं या देवाचे व श्रीकाडदेवरु स्वामींच्या परंपरागत निस्सीम भक्तांतील अनेक विचारी व चौकस लोकांना या गोष्टीची पूर्ण प्रचीति आहे त्यांना विचारून खुलासा करून घ्यावा.

दुसऱ्या (नंबर २, ३, ४) दोन तीन लीला श्रीस्वामींनीं कुडची येथें दाखविल्या आहेत. कुडची हा गांव प्राचीन काळापासून (निदान तेराव्या शतकापासून) मुसलमान वस्तीचा गांव म्हणून प्रसिद्ध आहे. येथें आजही मुसलमानांचीच वस्ती बहुतेक आहे. हिंदूची त्यांतही वीरशैवांची वस्ति अगदीं कमी म्हणजे केवळ पांच पचवीस घराण्यापेक्षां मुळींच जास्त नाहीं. म्हणून येथें कोणाही हिंदु साधु पुरुषांची मिरवणूक करण्यास सध्यां वाव नाहीं; परंतु श्रीक्षेत्र यड्डूर अगर सिद्ध-

पिरानी पादशाई यास उतर केले जे आम्हाजवळ हिंदू वली आले आहे. त्यासी थोर वली आहे. त्यास सोडून यावयास मन जाहले नाहीं त्याकारितां भोजनास आले नाहीं. त्याची दर्शन होताच अनृतप्राशन केले सारीखे क्षुदा निवारण जाहली आहे. त्यास्तव येणेस घडले नाहीं म्हणताच पादशाईनी बोलिले जे आम्हास दर्शन करावे; म्हणून पिरास विनंति केली नंतरी पिरानी स्वामीस विनंति करून घेऊन पादशास दर्शनास घेऊन गेला. तेव्हां पादशहाचे हातात कांहीं पुढे ठेवण्यासी नव्हते हातातील

---

गिरी येथील काडदेवरु मठाचे कोणीही स्वामी या गांवास आल्यास त्यांच्या मिरवणुकीस पूर्ण मुभा आहे इतकेंच नव्हे तर पुष्कळ मुसलमानच त्यांत पुढाकार घेतात व आपल्या दर्ग्यापुढील पटांगणांत त्यांना घेऊन जात असतात. शिवाय ते शिधा सामुग्री देऊन विनंह करवून त्यांना संतुष्ट करितात. असा प्रघात आजतागायत चालू आहे. त्यांचें कारण काय? हें कोणी शंकेखोर सांगू शकतील काय? बरें आद्यश्रीकाडदेवरु स्वामींच्या पश्चात् यांच्या शिष्यांपैकीं कोणीही प्रसिद्ध स्वामी कुडचीस गेले व त्यांनीं आपलें महत्त्व दाखवून त्यांजवर आपली छाप बसविली अशी गोष्ट घडली नाहीं. फक्त यड्डूर पीठावरील एक दोघे स्वामी संचारास गेल्यावेळीं सहज दोनतीनदां कुडचीस जाऊन तेथें मानमरातब करून घेऊन आल्यानें समजतें; परंतु तेवढ्यावरून हे परधर्मी लोक या पीठाधिपतींस इतका मान देतील हें शक्य नसल्यानें श्रीआद्यकाडदेवरु महास्वामींनीं या ज्या असामान्य लीला त्यांना दाखविल्या व आपलें दैवी तेज व्यक्त केलें तेव्हांच पीर मिरासाहेबासारख्या प्रख्यात अवलियांनीं त्यांचा गुणगौरव करून त्यांना लावून दिलें. इतकेंच नव्हे तर त्यांनीं ठेवलेल्या पादुका व वेत्रदंड पुष्कळ काळपर्यंत पूज्य वस्तु म्हणून त्यांनीं आपल्या दर्ग्यांत ठेविल्या होत्या! असें सांगतात. ही जी आद्य श्री काडदेवरु महास्वामींबद्दल पूज्यबुद्धि या परधर्मीयामध्यें उत्पन्न झाली ती पुढें वृद्धिंगत होत जाऊन यांचा व तात्कालीन सर्व प्रसिद्ध मुसलमान अवलियांचा पक्का स्नेह जमला. त्यामुळें त्या अवलियांच्या दर्शनास येणाऱ्या मुसलमान वजीर, राजे, सुलतान व बादशहा यांचीही श्रीकाडदेवरु स्वामींवर भक्ति बसली. आणि या मुळेंच या महास्वामींच्या दीर्घकालीन हयातींत तर राहोच पण त्यानंतर आज

ंसिका स्वामीपुढे ठेऊन नमस्कार केले. हे कां ठेविला म्हणून स्वामीनी पादशाईस बोलिले नंतर रिक्त पाणीने येऊ नये म्हणून सिक्का आपली पायाजवळ ठेविलो येस म्हणता स्वामीनी आपली ध्यानस अणून ज्ञानदृष्टीनें पाहून भविष्य तसच आहे म्हणून बोलिले. पादशाईनी स्वामीचा निरोप घेऊन आपल्या स्वस्थानासी जातासमई स्वामीनी आणिखी आपली पायाची दर्शन दिलीस येऊन द्यावे म्हणून बोलून गेले. बोलिले प्रो (प्रमाणें) दिलीस जाऊन स्वामीनी जाऊन दर्शन देऊन आले नंतर

---

तागायत कोणाही मुसलमान बलिष्ठ राजा अगर बादशहाकडूनसुद्धां श्रीवीरभद्र देवास व इतर ठिकाणच्या कोणत्याही काडदेवरु मठांस अगर त्यांतील देवांस विशेष धक्का पोहोंचला नाहीं! उलट त्या मठांच्या देणगींत मुसलमान अधिकाऱ्यांकडून क्वचित् भरच पडली असें म्हणण्यास हरकत नाहीं. अशाप्रकारें श्री आद्य काडदेवरु महास्वामींचीं स्थानें ।(त्यांनीं स्थापिलेले मठ व श्रीवीरभद्रदेवादिक प्रसिद्ध लिंगें) मुसलमानांच्या शेंकडों वर्षांच्या अमदानींत शीरसलामत राहण्याचें हें एक बळकट कारण आहे. **श्रीआद्यकाडेदेवरुस्वामी** व मुसलमान बादशहा यांच्या अवलियांच्या मार्फत किंवा स्वतंत्रपणें भेटी झाल्याच्या अनेक गोष्टी सांगितल्या जातात. त्यापैकींच वर निर्दिष्ट केलेली बखरींतील गोष्ट ही एक होय.

प्रसिद्ध अवलिया **शेख सालीम** यांच्याकरितां झरा निर्माण केल्याविषयीं पांचवी लीला आहे. तो झरा म्हणजे '**विभूति ओढा**' आज धुंडेवाडी गांवाजवळ प्रत्यक्ष दिसून येतो. श्रीकाडदेवरु स्वामींनीं वेतानें रेघ ओढून या ओसाड ओढ्यांत पाणी उत्पन्न केलें! याचें दर्शक म्हणून या ओढ्यास 'वेताचा ओढा' असें नांव पडलें असून ज्या ठिकाणीं प्रथम झरा निर्माण झाला तेथें हल्लीं एक मोठी विहीर बांधिली असून ज्यांच्यानिमित्त हा झरा निर्माण केला गेला त्या प्रख्यात पीर **शेख सलीम** यांचें थडगें या ओढ्याजवळच पूर्व कांठावर बांधिलें असून त्याला 'शेख सलीमचा दर्गा' असें म्हणतात. या ओढ्याच्या पश्चिम तीरावर श्रीकाडदेवरुस्वामींनीं स्थापिलेल्या श्रीसिद्धेश्वराचें देवालय व त्यांचा मठअसून या देवालयाच्या समोर थेट पूर्वेस वर सांगितलेला दर्गा आहे. येथें दर्ग्याच्या उरुसांत येथील मुसलमानांना सदरी मठाधिकारी जंगमांस मानपान करावा लागत

श्रीस्वामीनी पिरास बोलिले जे आम्ही फार दिवस येथे बैसलों देशपर्यटण करून आणिखी आपले दर्शनास येतो. आपण आगरणीस ( नदी ) पाण्यास जाऊ नये येथे आपणास पाणी करून देतो म्हणून सांगून (५) आपले हातातील वेतानी रेग वोडिले तेव्हां रेगाबरोबर पाण्याचा झरा निघाला ! तेव्हापासून विभूतीची वडा म्हणून नाव जाहले.

( ६ ) नंतर स्वामीनी देश पर्यटन करीत कल्याण देशांत गेले ते प्रांती जाडर येरुणिगी ह्मणून गाव तेथील पाटील मातबर कडकोल व तीन

---

असुन श्रीसिद्धेश्वराच्या उत्सवांत दर्ग्यांतील मुसलमानी मुल्लांना मेजवानीस बोलवावें लागतें! असा एकमेकांचा पूर्वकाळीं श्रीकाडदेवरु महास्वामींनीं प्रचारांत आणिलेला सलोखा आजपर्यंत अखंडित चालला आहे. यावरून प्राचीनकाळीं श्रीकाडदेवरु स्वामींनीं या ठिकाणीं झरा उत्पन्न करुन अवालियास संतुष्ट केलेली गोष्ट सत्य असली पाहिजे.

शिवाय याच शेख सलीम पिराच्या मार्फतीनें दिल्लीच्या तत्कालीन बादशहाची ( हा बहुधा सुलतान महंमद तुघलख किंवा त्याचा कोणी अकबर नांवाचा मुलगा असावा ) भेट घेतली. त्यानें श्रीस्वामींच्या दर्शनास आल्यावेळीं ( रिक्त हस्तानें आला असल्यानें तसें साधुपुरुषाचें दर्शन घेऊं नये असें त्याचा गुरू ह्मणजे शेख सलीम यांनीं सांगतांच ) आपल्या हातांतील बादशाही शिक्याची मौल्यवान् आंगठी काढून श्रीस्वामी महाराजांपुढें ठेवून दर्शन घेतलें ! आणि नंतर श्रीस्वामींना दिल्लीस येण्याची विनंती केली. हा जो बादशाही शिक्का त्यावेळीं श्रीस्वामींना मिळाला, तो अद्याप शुभचिन्ह ह्मणून श्रीस्वामींचे परंपरागत पट्टशिष्य सिद्धगिरी व यड्डूर येथील पट्टाधिकारी आपल्याजवळ बाळगीत असून नवीन शिष्यास पट्टाभिषेक करितांना तो विजयचिन्ह ह्मणून त्याच्या गळ्यांत घालीत असतात! अर्थात् कोणा बादशहाची भेट होऊन त्यांच्याकडूनच हा शिक्का मिळाला असला पाहिजे त्यावांचून त्यास इतकें महत्त्व प्राप्त झालें नसतें.

श्रीस्वामींची सर्वांत शेवटीं वर्णिलेली सहावी लीला तर अगदीं सत्यप्रतीत असून आजपर्यंत श्रीकाडदेवरु मुख्यपीठ जें सिद्धगिरी क्षेत्र त्यांतील श्रेष्ठ सिंहासन व त्याचीच दुसरी शाखा जी क्षेत्र यड्डूर मठाची गादी, यांजवर जे त्या

च्यार गावचा पाटीलपण करून होता परंतु पोटी संतान नव्हत. पाटील ऐंशी वर्षांचा त्याची बायको साठ वर्षांची येस असता श्रीस्वामींनी पाटलाचे घरास भिक्षास गेले स्वामीस पाहून पाटिलानी विनाव (विन्नह=जेवणास बोलावणें) करून पाद प्रक्षालन करून आसनावरी बसविले. नंतर स्वामींनी बोलिले जे, 'घर थोर दिसते घरासारिखे राष्ट्रण दिसत नाहीं.' ह्मणून विचारिले ? त्यास पाटिलानी विनंती केले की, 'स्वामीच्या आशीर्वादेकरून सर्व सौभाग्य आहे; परंतु पोटी संतान नाहीं.' ह्मणून त्यास स्वामीनी कृपाळू होऊन प्रसाद दिल्हे जे, 'आपले पोटी दोघे पुत्र होतील!' म्हणून आसीर्वाद देऊन संचारास गेले. नंतरी पाटिलास दोघे पुत्र जाहले श्रीशैल वगैरे क्षेत्र पाहून पुढे पाच वर्षांस येरुणगीस स्वामीनी आले तेव्हापावेतो थोरले मुलास नाव ठेविले नव्हते. स्वामीनी येऊन गोरा तेजस्वी पाहून 'केंचपा' म्हणून नांव ठेविले नंतरी पाटिलानी स्वामीस विनंति केली 'आपले पायाचे आसीर्वादेकरून दोगे पुत्र जाहले थोरला पुत्रास स्वामीचे पायास समर्पण करितो' म्हणून नमस्कार केला. स्वामीनी ते मुलास घेऊन गुडेवाडिगीस येऊन मुलास आनुग्रह करून श्रीदोडमुरिगेपा मठ वेलकी याचे सिष्य चौघात मुलास ठेऊन स्वामी सिद्धागिरीस जाऊन जागा प्रशस्त पाहून आपले शिष्य केंचापास बेलकीहुन बोलावून घेऊन सिका गळेत घाल्रून मस्तकीं हस्त ठेऊन 'तूं भूलोकात सवाशेहें वरुषे

---

महान् श्रीकाडदेवरु स्वामींचे शिष्य पट्टाभषेक होऊन वसत आले त्यांतील कित्येक त्या जाडर ऐरुणगी गांवच्या मुदकप्पा पाटिलास श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेनें झालेल्या पुत्रांचेच वंशज होत! ही गोष्ट सुर्यप्रकाशाइतकी ढळढळीत आहे. यांच्या पैकीं कोणी लायक बटु न मिळाल्यास त्यांच्या शिष्यघराण्यांतील एकादा होतकरू हुशार मुलगा जरूर त्यावेळीं शिष्यशाखेंतील कोणत्याही सिंहासनावर बसविला जात असतो. तो न च मिळाला तर क्वचित् एकाद्या दुसऱ्या शिष्यघराण्यांतील कोणास पट्ट करितील पण अन्य पुरुषास पट्टाधिकार देण्याची मुळींच वहिवाट नाहीं. यावरून श्रीआद्यकाडदेवरु महास्वामींच्या कृपाप्रसादानें पुत्रप्राप्ति झालेली बखरींतील हकीकत अगदीं सत्य आहे यांत शंका नाहीं.

महत्व करून मग समाधीमध्ये योगनिद्रात बसणे. पुढे चन्नवसवेश्वर येतील तेव्हां प्रकट होऊन ऐक्यपदास येणे.' म्हणून श्रीस्वामीनी येस कोंचापास आशीर्वाद देऊन आपण आद्रिश जाहले !' याप्रमाणें श्री काडदेवरु महास्वामींनीं आपली अवताराची समाप्ति केल्यानंतर पुढें, त्यांच्या आशीर्वादानुरूप श्रीकेंचकाडदेवरु पीठाधिकारी झाले यांच्या व पुढील स्वामींच्या कारकीर्दींचें वर्णन करण्यापूर्वी श्री आद्य काडदेवरु महास्वामींच्या

'आयुर्मर्यादे'

संबंधानें थोडासा खुलासा करणें जरूर आहे. श्रीआद्य-काडदेवरु स्वामिमहाराजांच्या अत्युत्तम अशा अमर्याद कर्तृत्वाकडे पाहतां व त्यांच्या दैवीलीलांचें सूक्ष्म निरीक्षण केलें असतां त्यांना सामान्य मनुष्याला शिकस्तीनें लाभणाऱ्या शंभर वर्षांच्या आयुष्यांत या इतक्या अनेकविध गोष्टी इतक्या परिणामकारक रीतीनें करितां येणें मुळींच शक्य नाहीं असें वाटतें. तेव्हां हे महात्मे आपल्या योगबलानें सुमारें दोनसवादोनशें वर्षं हयात होते असें अनेक विद्वानांचें मत झालें आहे तें खरें असावें. त्याशिवाय पराक्रमशाली सिंहणदेव यादव राजांच्या हस्तें श्रीवीरभद्रदेवास उदार देणगी देववून त्याच्या पूजा उत्सवाची उत्तम व्यवस्था करवून पुढें सुमारें शंभर वर्षांनतर एका प्रसिद्ध मुसलमान बादशहाची भेट घेऊन त्याजकडून विजयसूचक चिन्हच असा तो बादशाही शिक्का मिळविणारा महात्मा केवळ शंभर वर्षे आयुष्याचा असून कसें चालेल ? यावरून कमींत कमी दोनशें वर्षांहून जास्त काळ तरी ते हयात होते हें उघड आहे.

---

## (१७) श्रीकाडदेवरु-अवतारसमाप्ति.

मागें सांगितल्याप्रमाणें अनेक असामान्य लीला दाखवीत श्रीस्वामी हे श्रीशैल मल्लिकार्जुनाच्या दर्शनास गेले व तिकडे पांच वर्षें संचार करून फिरून जाडर ऐरुणगीस आले. तेथें यांच्या शुभाशीर्वादानें त्या वृद्ध

पाटलास तितक्यांत दोन पुत्र झाले होते. पण त्यांना अद्याप नांवसुद्धां ठेविलें नव्हतें. मग श्रीस्वामी येतांच त्या पाटलानें स्वामीमहाराजांच्या कृपाप्रसादाचीं उभय सुपुत्ररूप फळें त्यांच्या पायावर घालून त्याना नांवें देण्याची विनंति केली. तेव्हां श्रीस्वामींनीं वडील मुलास ' कैंचापा ' असें व धाकट्यात ' अदशापा ' असें नांव ठेविलें. त्यापूर्वी पाटलानें आपल्या पत्नीच्या विचारें असा नवस केला होता कीं, ' श्रीस्वामीमहाराजांच्या ' आशीर्वादानें लाभणाऱ्या पुत्रांतील प्रथमचा पुत्र त्यांनाच अर्पण करावयाचा ' त्याप्रमाणें मोठा समारंभ करून अत्यंत भक्तिमय अंतःकरणानें त्या वृद्ध दंपतीनें आपल्या जीवापेक्षां प्यार असलेला वडील मुलगा ( कैंचापा ) हा श्रीस्वामींना अर्पण केला. त्या पांच वर्षांच्या कोमल अर्भकास आणून श्रीस्वामींनीं गुंडेवाडी येथें अनुग्रह करून ( जंगमदीक्षा देऊन ) त्यास बेळंकी येथील प्रसिद्ध मृगेंद्रस्वामींच्या मठांत त्या स्वामींच्या शिष्यांमध्यें शिक्षणार्थ ठेविलें. नंतर पुनः श्रीस्वामी श्रीक्षेत्र यड्डूरास आले. तेव्हां येथील सर्व भक्तांस अत्यानंद होऊन त्यांनीं मोठा उत्सव केला. येथें येतांच त्यांनीं आपल्या मठांत एक सुस्वभावी शिष्य कायम ठेवून त्यास, पुजारी नेमिला; व त्यास श्रीवीरभद्र देवाची नित्य भक्तिपूर्वक पूजाअर्चा करून सुखानें कालक्रमणा करण्यास आज्ञा केली. सर्व सेवेकऱ्यांनाही एकनिष्ठपणें श्रीवीरभद्रसेवा करण्यास सांगून आपण आपल्या योगसमाधीस योग्य असें सह्याद्रि पर्वतांतील जें पवित्र स्थान सिद्धगिरि तेथें गेले. हें स्थान अत्यंत रम्य व निवांत असें होतें. व याच ठिकाणीं दीर्घकाल तपश्चर्या केल्यानंतर श्रीस्वामींना परमात्मप्राप्तीचें

---

श्रीक्षेत्र सिद्धगिरी हें कोल्हापूरच्या थेट दक्षिणेस सुमारें ७ मैलावर एका उंच डोंगरावरील रम्य प्रदेशांत वसलेलें क्षेत्र आहे. येथें डोंगराच्या माथ्यावर श्रीकाडदेवरु स्वामींचा प्रख्यात मठ असून त्या मठाच्या भोंवतीं लहानशी चुनेगची तटबंदी आहे. आंतील आवारांत मध्यभागीं पूर्वाभिमुख श्रीकाडसिद्धेश्वराचें मुख्य व सुंदर देवालय असून सभोंवती अडकेश्वर, चक्रेश्वर, व रुद्रपाल यांचीं लहान देवळें आहेत. मुख्य मठाच्या आवारापलीकडेही डोंगरांत सगळांकडे अनेक

दिव्य ज्ञान प्राप्त झालें होतें. शिवाय सद्गुरु श्री रेवणनाथ यांचीही आज्ञा श्रीस्वामींना शिरसामान्य करणें अवश्य होतें. या सर्व कारणांनीं श्रीकाडसिद्धेश्वरांनीं आपलें सर्व शेष आयुष्य याच ठिकाणीं घालविण्याचा विचार ठरविला. श्रीस्वामी येथें येऊन राहिल्यापासून या ठिकाणच्या सर्व लोकांना फार आनंद झाला. आणि ते येथें कायमचेंच वास्तव्य करणार असें समजतांच त्यांना अत्यानंद झाला. श्रीस्वामींच्या पूर्वींच्या शिष्यांना तर

---

लहानमोठीं देवळें आहेत. या डोंगरांत मठाच्या थेट दक्षिणेस सुमारें दोन फर्लांग अंतरावर एक अत्यंत रमणीय स्थान आहे. तेथील मुख्य देवळांत पाताळगंगेचा ( एका सतत वाहणाऱ्या झऱ्याचा ) एका पिंडीवर नित्य सतत अभिषेक घडत असतो. अभिषेकानंतर हें तीर्थोदक देवळाजवळच्याच एका लहानशा तळ्याभोंवतीं गणपति, भवानी व पंचसुवासिनी, इत्यादि देवतांचीं अनेक लहान लहान देवळें आहेत. एकंदरींत हें स्थान फारच रमणीय व पवित्र आहे. हल्लीं या मठास कोल्हापूर संस्थानांतून सुमारें दीडहजार व इतरत्र सुमारें दीडदोन हजार असें एकूण सुमारें तीन हजाराचें उत्पन्न आहे. या मठाच्या स्वामींना सर्व लिंगायत लोक फार मान देतात. कोल्हापूर कोंकण, मुंबई, कर्नाटक, निजामचे राज्य, बल्लारी, म्हैसूर, व मद्रास इत्यादि सर्व भागीं मिळून एकंदर ७-८ हजारपर्यंत या स्वामींचे वीरशैव व अन्य जातीय शिष्य आहेत. या मठाच्या श्रीक्षेत्र यड्डूर व श्रीक्षेत्र कोण्णूर (ता. गोकाक) येथील शाखाही अत्यंत प्रसिद्ध आहेत. यड्डूर मठाचा सविस्तर इतिहास वर आला आहे. श्रीक्षेत्र कोण्णूर येथील हल्लींचे पट्टाधिकारी महास्वामी अत्यंत विद्वान् धोरणी व समाजाची कळकळ बाळगणारे आहेत. त्यांचें नांव ऐकून माहीत नाहीं असा मनुष्य हल्लीं कर्नाटकांत सांपडणें विरळा. यांच्या व यड्डूर मठाच्या हल्लींच्या पट्टाधिकारी स्वामींच्या प्रेमळ आज्ञेनुसार लवकरच श्रीक्षेत्र सिद्धगिरी व सर्व काडदेवरु मठांचा सविस्तर इतिहास प्रसिद्ध करण्याचा प्रस्तुत लेखकाचा संकल्प आहे. श्रीक्षेत्र सिद्धगिरीचे हल्लींचे पट्टाधिकारी स्वामी अल्पवयी असून विद्यार्जन व योगाभ्यासाकरितां सध्यां सदरहू श्रीकोण्णूर मठाच्या स्वामीमहाराजांच्या पवित्र सान्निध्यांत नेहमीं असतात.

ही ईश्वरी कृपाच वाटली. व ते श्रीस्वामीसेवेंत सर्वदा निमग्न झाले. श्रीस्वामीमहाराजांचा उपदेशक्रम सारखा चाललाच होता. त्या उपदेशानें सर्व लोकांचीं अंतःकरणें पवित्र व ईशपदीं लीन झालीं. यांच्या उपदेशामृतानें पावन होऊन कित्येकांनीं ' शैव ' ' वीरशैवा 'दि दीक्षा घेऊन ते शिवज्ञानसंपन्न बनले; तर आणखी कित्येक नुसत्या शिवभक्तींतच रंगून गेले. अशाप्रकारें अनेक शतकें केवळ जैन व बौद्ध-मय होऊन गेलेला हा सर्व उत्तर कर्नाटकाचा भाग, आपल्या अमृतमय उपदेशानें शिवभक्तीस लावून प्रत्यक्ष हिंदुधर्मांत आणून सोडण्याचें प्रचंड कार्य या पुण्यपावन महात्म्यानें केलें !

अशाप्रकारें अनेक वर्षें आपलें महत्त्व दाखवून पुढें जेव्हां आपल्या स्ववतार-कार्याची पूर्तता झाली असें त्यांना वाटलें, तेव्हां त्यांनीं मुद्‌काप्पा पाटलाचा पुत्र जो ' केंचदेवरु ' बेळंकी येथें शिक्षणार्थ ठेविला होता, त्याला सिद्धगिरी येथें बोलावून घेतलें; व स्वतःच्या देखरेखीखालीं आपल्या सर्व शिष्य व नूतनोद्धरित भक्तांसमक्ष श्रीकेंचदेवरु यास विधिपूर्वक पट्टाभिषेक करविला. नंतर विजयचिन्ह जो. प्रसिद्ध बादशाही शिक्का तो गळ्यांत घालून मस्तकीं हस्त ठेवून ' तूं सवाशें वर्षें महत्त्व करून ( सर्व लोकांस उपदेशामृत पाजून शिवभक्तींत विलीन करण्याची ही परंपरा चालवून ऐश्वर्य भोगून मग समाधीमध्यें योगनिद्रेंत निमग्न व्हावें ( ऐक्यपदास यावें ) ' असा आशीर्वाद देऊन आपण सर्व लोक पाहात असतां बसल्या जागींच अदृश्य झाले ! वाचकहो, हीच आमची तिसरी जगद्वंद्य विजयी वीरशैव विभूति ! यांची नीट ओळख पटवून घ्या. यांच्या नित्यनामस्मरणानें आपण सर्वच पवित्र होऊंया. असो. हे महाशिवयोगी सिद्धगिरीस ज्या ठिकाणीं अदृश्य झाले, त्याच स्थानीं हल्लीं श्रीसिद्धेश्वरमहालिंग आहे. हें श्रीकाडदेवरुस्वामींचें अघटित सामर्थ्य पाहून सर्व लोक जितके आश्चर्यचकित झाले त्याहून त्यांचा कायमचा वियोग झाल्याचें पाहून सर्वांना परमदुःख वाटलें. परंतु ' परमेश्वरी लीला अगाध असल्यानें आपल्या कर्तव्यांत सर्वांनीं दक्ष राहून त्यांची शिकवण कायम ठेवून ईश्वर-

भक्ति करणें हाच श्रीकाडसिद्धेश्वर स्वामीमहाराजांना संतुष्ट करण्याचा सुलभ उपाय होय; करितां याच मार्गाचा सर्वांनीं अवलंब करावा' असा उपदेश करून श्रीकेंचकाडदेवरु स्वामींनीं सर्वांचें समाधान केलें. तेव्हां सर्व लोकांस धीर येऊन ते आपापल्या कर्तव्यांत तत्पर राहिले. आणि तेव्हांपासून पुढें श्रीकेंचकाडदेवरु स्वामींची कारकीर्द सुरू झाली.

या श्री आद्य काडदेवरु महास्वामीसंबंधानें जितकी माहिती मिळाली तितकी संग्रहित करण्याचा येथें प्रयत्न केला आहे; तथापि '. सिंधूंत बिंदु' या न्यायानें त्यांच्या विशाल कर्तृत्वाच्या मानानें ही . अत्यंत अपुरी आहे हें आम्ही जाणून आहों; पण ज्या बाबींसंबंधानें यत्किंचितही लेखी पुरावा मिळाला नाहीं, तेथें नुसत्या आख्यायिकांवर विश्वास ठेवून कादंबरी रचिल्यानें तें खरें चरित्र होत नाहीं; म्हणून या महास्वामींसंबंधाच्या तशा कित्येक दंतकथा तूर्त ( त्यांतील सत्यांश व्यक्त होईपर्यंत ) ग्रंथांत घेतांच येत नसल्यानें मुद्दाम वगळल्या आहेत. योग्य दिशेनें सतत प्रयत्न करून संशोधन केलें असतां या महास्वामींच्या सर्वच चरित्राचा उलगडा होईल, असा भरंवसा वाटतो; पण तसा प्रयत्न होणें अत्यंत जरूर आहे. व असा प्रयत्न करणें किंवा करविणें हें कार्य त्यांच्या शिष्यपरंपरेच्या पठावर आरूढ झालेल्या स्वामीमहाराजांकडून जितकें मनःपूर्वक व लवकर होईल तितकें अन्य जनांकडून होणें शक्य नाहीं. या गोष्टीकडे त्या महास्वामींच्या सर्व शिष्यपरंपरेच्या गादीवर विराजमान झालेल्या सांप्रतच्या स्वामींना लक्ष पुरविण्याविषयीं विनंति करून, व हें त्यांचें कर्तव्यच असल्यानें तें, सदरहू स्वामीमहाराज करितील असा विश्वास बाळगून कोणत्या स्थळीं श्रीआद्यकाडदेवरु महास्वामीसंबंधानें विशेष माहिती मिळेल याचें थोडेसें दिग्दर्शन करून हें प्रकरण आटोपतें घेऊं.

श्रीआद्यकाडदेवरुमहास्वामींच्या अफाट कर्तृत्वानें सर्व दक्षिण हिंदुस्थान व्यापून टाकिलें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं; व या योगानें दक्षिण हिंदुस्थानच्या सर्व भागीं या स्वामींचे मठ पसरले आहेत. उत्तर दिशेचें मुख्य स्थान अहमदनगराजवळील ' नगरसिद्धगिरी ' हें असून

तेथील मठाच्या स्वामींची शिष्यशाखा ( तुरळक अशी कां होईना, पण ) नर्मदेपर्यंत पसरली होती. दक्षिणेस बळ्ळारी, बेंगळूरपर्यंत श्रीकाडदेवरु स्वामींचीं शिष्यघराणीं वास करीत आहेत. श्रीशैलमल्लिकार्जुन, शृंगेरी येथील मठांतील कागदपत्रांतूनही कांहीं माहिती मिळेल. तसेंच विजापूर व त्याच्या आसपासचीं खेडीं, यांतील काडदेवरु मठांतून व सिद्धाचें वास-स्थान ' सीतीमनी ' डोंगर त्यांतील सिद्धांकडून कांहीं माहिती मिळणें शक्य आहे. बेळगांव जिल्ह्यापैकीं श्रीआद्यकाडदेवरु स्वामींचें प्रसिद्ध जन्मस्थान ' गुंडेवाडी ' येथील मंठांत व श्रीक्षेत्र ' कोण्णूर ' व ' श्रीक्षे-त्र यड्डूर ' यांतील मठांतून आणि सिरसंगी, जत, वंटमुरी या संस्थानीं दप्तरांतून अद्याप बरीच माहिती मिळेल. कोल्हापूर संस्थानांतील ' श्रीक्षेत्र सिद्धगिरी ' हें तर श्रीआद्यकाडदेवरु महास्वामीचें मुख्य स्थान होय. येथील दप्तरांत पुष्कळ माहिती सांठविलेली आहेच. एकंदरींत सर्व भागांतील प्रसिद्ध अप्रसिद्ध अशा सर्व काडदेवरु मठांतून व कोल्हापूर, म्हैसूर इ. मोठीं संस्थानें व वर सांगितलेलीं लहान संस्थानें यांतील दप्तर आणि सर्व कानडी—मराठी जिल्ह्यांचें ग्याझेटीयरांमधून तपास केल्यास पुष्कळ माहिती उपलब्ध होईल; तरी त्याच्या सच्छिष्यांनीं ही गोष्ट मना-वर घेऊन श्रीआद्यकाडदेवरु महास्वामींचें एकादें सर्वांगसुंदर चरित्र लवक-रच प्रसिद्ध करण्याचें कार्य मनावर घ्यावें अशी सूचना करून पुढील मार्ग-क्रमणास लागूं.



श्रीविरूपाक्षलिंगायनमः

# भाग दुसरा.

## खटल्याची मुहूर्तमेढ

### [ १ ] श्रीआद्य काडदेवरु शिष्यपरंपरा

मागील भागांत उल्लेख केलेल्या काडदेवरु मठांच्या बखरीवरून पाहातां श्रीकाडदेवरु महास्वामींनीं आपण अदृश्य होण्यापूर्वीं ' श्रीकेंचदेवरु ' यांस स्वहस्तें पट्टाभिषेक केला होता असें दिसतें; पण श्रीक्षेत्र-सिद्धगिरी येथें उपलब्ध असलेल्या वंशावळीवरून श्रीआद्यकाडदेवरु महास्वामीनंतर श्रीअदृश्यकाडदेवरु हे पट्टाभिषिक्त झाले असें दिसतें. परंतु या वंशावळींत प्रथम जे अदृश्यकाडदेवरु स्वामींचें नांव दिलें आहे तें मूळपुरुषासंबंधींच असावें. कारण श्रीआद्यकाडदेवरु अदृश्य झाल्यानें त्यांनाच मागाहून ' अदृश्यकाडदेवरु ' असें नांव लोकांनीं ठेविलें असावें. तें कांहीं असो; श्रीकेंचकाडदेवरु हे अत्यंत तेजस्वी व योगज्ञान-संपन्न स्वामी होते. यांनीं श्रीआद्यकाडदेवरु महास्वामींची उपदेशपरंपरा उत्तम चालवून सर्व मठांवर देखरेखही चांगल्या प्रकारें ठेविली होती. यांच्यावेळीं कल्याण (हल्लींचे निजामचें राज्य) प्रांतीं दुष्काळ पडल्याकारणानें तेथील जाडरऐरुणगी गांवचे चौघे पाटील ( श्रीकेंचकाडदेवरुस्वामींच्या पूर्वा-श्रमींचे बंधु ) आपापल्या कुटुंबासह सिद्धगिरीस स्वामीमहाराजांकडे आले. स्वामींनीं ' तुम्ही कोण व येथें कां आलां ? ' असें विचारतांच ' आम्ही जाडर ऐरुणगीच्या पाटलाचे पुत्र आहों. तिकडे दुष्काळ पडल्यामुळें इकडे आपली प्रसिद्धि ऐकून आपलें दर्शन होऊन कांहीं रोजगार मिळेल

म्हणून येथें आलों.' असें सांगतांच स्वामींना पूर्वस्मृति होऊन त्यांनीं त्या सर्वांस तेथें ठेवून घेतलें; व देवस्थानाच्या बांधणीच्या कामावर नेमिलें. पुढें २।३ वर्षें गेल्यानंतर त्या चौघांस बोलावून स्वामी म्हणाले– 'तुमच्या प्रांतीं आतां सुबत्ता झाली आहे तरी तिकडे सर्वांनीं निघून जावें.' यावर चौघांनीं नम्रतेनें विनविलें कीं, 'आपल्या चरणाचें दर्शन सोडून आम्ही तेथें कसें राहावें ? आम्ही आपली चरणसेवा करीत येथेंच राहातों. आम्हांस जंगमदीक्षा देऊन पावन करावें. ही त्या सर्वांची प्रार्थना ऐकून स्वामींस दया आली व त्यांच्या उत्कट इच्छेनुरूप त्या सर्वांस सहकुटुंब जंगमदीक्षा देऊन त्यांना आपल्या संनिध ठेवून घेतलें. व त्यांना कांहीं काम सांगावें म्हणून एकाला जूगुळांत ठेविलें, दुसऱ्या एकास गुंडेवाडीस ठेवून तिसऱ्याला कमतावर नेमिलें. आणि एकाला आपल्या मठांत कारभारी केलें. पुढें बाहेर राहिलेल्या तिघांच्या प्रवर्तनांत अंतर पडून ते पुनर्वि-वाह वगैरे करून घेऊं लागल्यानें त्यांचा संबंध सोडिला. व आपल्या जवळ जो होता त्याच्या मुलास मात्र आपल्या पायाखालीं कोणिक घालून श्रीमुप्पिन काडदेवरु' म्हणून नांव ठेवून पट्टाभिषेक केला; व शिका गळ्यांत घालून 'तुम्ही सवाशें वर्षें महत्त्व करून मग मोक्षास जाणें' असा आशीर्वाद देऊन आपण समाधिस्थ झाले.

पुढें श्रीमुप्पिन काडदेवरु यांनीं अनेक वर्षें उत्तम प्रकारें धर्मवृद्धीचें कार्य करून दूरदूरच्या प्रांतांत स्थापिलेल्या आपल्या मठांचीही व्यवस्था यथायोग्य चालविली. अशा प्रकारें अनेक वर्षें महत्त्व दाखवून आपल्या पूर्वाश्रमांच्या बंधूचे दोघे पुत्र सुंदर व सद्गुणी होते त्यांपैकीं वडील पुत्र 'घटसिद्दपा' यास काणीक घालून स्वहस्तें पट्टाभिषेक करून ते शिवैक्य पावले.

श्रीघटसिद्ध काडदेवरूंनीं आपला धाकटा बंधू मरिकाडपा यास काणीक घालून शिष्य करून ठेविलें. या श्रीघटसिद्धकाडदेवरु स्वामींच्या

१ पट्टाभिषेक समयीं केला जाणारा एक धार्मिक विधि. हा विधी झाल्यानंतरच पट्टाभिषेक पूर्ण होतो.

वेळेपासून मूळची धार्मिक उपदेश-परंपरा सुटून श्रीपट्टाभिषिक्त स्वामी ऐष-आरामी बनले. या पूर्वींच्या महापुरुषांच्या वेळची ‘ जगाच्या कल्याणा संताच्या विभूति ’ ही विचारसरणी व तदनुरूप वर्तणूक हीं नाहींशीं होऊन पट्टाधिकाऱ्यांच्या विचारसरणींत बदल झाला. श्रीघटसिद्ध-काडदेवरु यांच्या स्वैर वर्तनाचा सर्वांस वीट आला. श्रीमरिकाडदेवरु स्वामींस हें सहन न होऊन त्यांनीं श्रीघटसिद्धकाडदेवरु यांस असें न करण्याविषयीं विनविलें; परंतु या विनंतीचाही कांहीं उपयोग न होतां ते जास्तच विषयी बनले; तेव्हां मठांत राहाणें न आवडून श्रीमरिकाडदेवरु जे रागानें बाहेर पडले ते श्रीक्षेत्रयड्डूरास आले. तेथें कांहीं दिवस राहून मग गुंडेवाडीस जाऊन तेथें चार पांच महिने राहिले; पुढें सिद्धगिरी-कडील वरील हकीकत तेथील काडदेवरु शिष्यांस समजतांच गांवच्या सर्व लोकांनीं विनंति करून त्यांस गृहस्थाश्रमी बनून संसारी होऊन त्याच मठांत कायम वास्तव्य करण्याचा आग्रह केला; इतकेंच नव्हे तर हुचटीकर पाटलांची सद्गुणी व सुलक्षणी कन्या आणून त्यांनीं त्यांचें लग्न लावून दिलें! श्रीमरिकाडपा हे यड्डूर व गुंडेवाडी येथील मठांची व उत्पन्नाची व्यवस्था पाहात इकडेच राहूं लागले. याच दंपतीच्या पोटीं ‘ पवाडकाड-देवरु ’ जन्मले. इतक्यांत श्रीघटसिद्ध काडदेवरु स्वामींस आपल्या वर्तनाचा पश्चात्ताप होऊन त्यांनीं आपली वर्तणूक सुधारल्याची खातरजमा करून देऊन श्रीमरिकाडदेवरु यांस सिद्धगिरीस बोलावून नेलें. व त्यांचा पुत्र ‘ पवाडकाडदेवरु ’ यांस शिष्य करून घेतला; परंतु श्रीस्वामींचें वर्तन न सुधारल्यानें पुनः श्रीमरिकाडदेवरु हे आपल्या परिवारासह गुंडेवाडीस येऊन राहिले. नंतर थोड्याच दिवसांत श्रीघटसिद्धकाडदेवरु अत्यंत आजारी पडले; त्यावेळीं श्रीमरिकाडदेवरु यांस बोलावणें पाठविण्याविषयीं त्यांनीं पुष्कळ सांगितलें; परंतु श्रीस्वामींच्या प्रीतींतल्या माणसांस श्रीमरि-काडदेवरु सिद्धगिरीस येणें इष्ट नसल्यानें त्यांनीं त्यांस मुळींच बातमी कळविली नाहीं. शेवटीं श्रीस्वामींनींच एका विश्वासू सेवकाकडून पत्र पाठवून तावडतोब येण्याविषयीं श्रीमरिकाडदेवरु यांस आज्ञा केली. पण ते सिद्ध-

गिरीस जाऊन पोहोंचण्याच्या आंतच श्रीस्वामी लिंग्यैक्य पावले होते. श्रीस्वामींच्या प्रीतींतील नीच माणसेंच तेथें धनी होऊन बसलीं होतीं व त्यांनीं श्रीमरिकाडदेवरु यांस मठांत येण्यास प्रतिबंध केला. तेव्हां पुनः गुंडेवाडीस येऊन शें दोनशें लोक बरोबर घेऊन जाऊन त्यांनीं मठांत प्रवेश करून तो हस्तगत केला. व त्या नीच माणसांकडील शिक्का काढून घेऊन त्यांना व त्यांस सामील असलेल्या कारभाऱ्यांसह मठाबाहेर हांकलून दिलें व आपण गुंडेवाडीस आले. हाच गृहकलहाचा पाया होय.

पुढें श्रीमरिकाडदेवरुच्या विरुद्ध पक्षाच्या नीचांनीं सिद्धगिरींतील भोगमूर्ति जमाखिंडीस नेऊन तेथील देशमुखांच्या आश्रयाखालीं एका वाणीशिष्याच्या मुलास तेथें पट्टाभिषेक केला! इकडे कोकटनूर, जत, व चिकोडीचे देसाई व हुचटी पाटील यांनीं श्रीमरिकाडदेवरु यांस सांगून जूगुळांतील एका 'गादिगेपा' नांवाच्या मुलास आणून त्यास पट्टाभिषेक करून श्रीपवाडकाडदेवरु यांचें लग्न केलें. येणेंप्रमाणें दोघे अधिकारी होऊन पुढें हा तंटा विकोपास गेला. पुढें प्रत्येकानीं आपापली शिष्यपरंपरा पुढें चालविली.

---

# [ २ ] यड्डूर मठाची शिष्यशाखा

## श्रीमरिकाडदेवरु स्वामींची कारकीर्द.

गुंडेवाडी येथील मूळघराण्यांत मूळपुरुषापासून तेरावे शिष्य 'श्रीअदृश्य काडदेवरु' म्हणून होते. त्यांनीं इ. सन १७१० च्या सुमारास यड्डूरकर मुतालिक देसाई यमाजी रुद्रो व चिकोडीचे देसाई देमाणा गुड्डद यांच्या मदतीनें यड्डूर येथें वास्तव्य केलें; व येथूनच ते सिद्धगिरीची व्यवस्था पाहूं लागले. पण पूर्वींचे सिद्धगिरीचे कारभारी व इतर सर्व जण जमखंडी येथील स्वामीस साह्य असल्या कारणानें व त्यांनींही जुगुळकराकडील मुलासच पट्ट करून यांच्या मूळघराण्यांतच भांडण सुरूं करून ठेविलें; यामुळें व पुढें तर

त्यांना वंटमुकरीकर सरदेसाई यांचें साह्य मिळून ते प्रबळ झाले; व त्यांनीं सिद्धगिरी काबीज केली. म्हणून हे श्रीअदृश्यकाडदेवरु इकडे यड्डूरांतच राहूं लागले हेच यड्डूरच्या पीठाचे मूळपुरुष होत.

हे समाधिस्थ झाल्यानंतर 'श्रीघटासिद्धकाडदेवरु पट्टाभिषिक्त झाले. यांच्या कारकीर्दींत यमाजी रुद्रो याचा पुत्र अप्पाजीपंत हा पुढारी झाला होता. पुढें इसवी सन १७४० च्या सुमारास श्रीघटसिद्धकाडदेवरु हे लिंगैक्य झाले. त्यांनीं श्रीमरिकाडदेवरु यास शिष्य करून घेतले होते. नंतर श्रीमरिकाडदेवरु यांनीं यड्डूरचे मुतालिक देसाई व चिकोडीकर देसाई यांच्या साह्यानें सिद्धगिरी येथें जाऊन पट्टाभिषेक करून घेतला व नंतर ते यड्डूरास येऊन राहिले.

या स्वामींच्या कारकीर्दींतच श्रीवीरभद्रदेवालयांत ब्राह्मणांचा चंचुप्रवेश होऊन परवांपर्यंत चाललेल्या प्रख्यात खटल्याची मुहूर्तमेढ रोवली गेली. तरी ती रोवली जाण्याचें कारण स्पष्ट कळण्याकरितां मागील इतिहासाचें थोडें पर्यालोचन करणें प्राप्त आहे. मागील भागांत बहामनी राज्याच्या स्थापनेपर्यंतचा इतिहास दिला आहे. त्यापुढें या काळापर्यंत (सन १७५० इ. पर्यंतचा त्रोटक इतिहास असा आहे:—

## पूर्वेतिहासाचें मार्गक्रमण व समाप्ति.

इ०स० १३४७ सालीं बहामनी राज्य स्थापन होऊन त्या राज्यांतील अनेक मुसलमान सरदार मुलूख जिंकण्याकरितां स्वाऱ्या करूं लागले. पुढें सुमारें शेंदीडशें वर्षें त्या राज्याची भरभराट होती. या नंतर बहामनी बादशहा निर्बल झाले; व राज्यांत गृहकलह वृद्धिंगत झाले, तेव्हां मध्यवर्ति शक्ति संपुष्टांत आली. त्यामुळें त्या बादशाहींतील चोहोंकडे अधिकारारूढ असलेले पराक्रमी सुभेदार त्या त्या प्रांताचे स्वतः राजे बनले. आणि त्यांनीं बादशाहीची सत्ता पूर्ण झुगारून दिली. अशा रीतीनें एका बहामनी बादशहाची पांच शकलें झालीं. त्यांपैकींच विजापूरची आदिलशाही ही एक होय. हिचा संस्थापक यूसफ आदिल-

शहा हा अत्यंत पराक्रमी, साहसी व मुत्सद्दी होता. त्यानें बहामनी बादशाहींतील अरबी समुद्रापर्यंतचा सर्व पश्चिमेकडील अफाट प्रदेश बळकावून घेतला व त्याचा तो सत्ताधीश झाला. (इ० स० १४९८) अर्थात् इ० सनाच्या पंधराव्या शतकापासून उत्तर कर्नाटक प्रांतांतील या यडूर क्षेत्रावर आदिलशाहीचा अंमल सुरू झाला.

या वेळीं यडूरचा नुकताच अभ्युदय होत चालला असून जुनें यडूर व चंदूर हीं प्रत्येकीं ४।५ शें वर्षे वस्तीचीं लहान लहानच खेडीं होतीं असें दिसतें. कारण या दोन्ही खेड्यांतून त्यावेळीं ग्रामाधिकारी पाटील-कुलकर्णी तरी होते कीं नव्हते याची वानवाच आहे. निदान चंदूर येथें तरी या काळीं पाटील मुळींच नव्हता असें दिसतें. कां कीं, आदिलशहाच्या सुरवातीनंतर सुमारें ५०–६० वर्षांनीं (इ० स० १५५० च्या सुमारास) 'भीमापा पंचम' या नांवाच्या कोणा धनवान् लिंगायत शेतकऱ्यानें विजापूरच्या बादशहास तीन हजार मोहरा नजराणा देऊन आदिलशाही दरबारांतून चंदूरच्या पाटीलकीचा हक्क व एक चाहूर मळी जमीन आणि पाव चाहूर जिराईत जमीन लागवडींत आणण्याच्या परवानगीची इनामी सनंद मिळविली असें येथील हल्लींचे त्या भीमापाचे वंशज वतनदार पाटील सांगतात; अर्थात् त्यापूर्वी तेथें वतनदार पाटील नसावा. त्यापूर्वी यडूरचाच पाटील तेथें काम पाहात असावा.

इ० स० १५६० च्या सुमारास विजापूरचा मोठा इब्राहीम बादशहा हा कोल्हापूर व पन्हाळा यांच्या बंदोबस्ताकरितां या भागीं आला. तेव्हां त्याचा कृष्णाकांठीं शहापुरास मुक्काम असतेवेळीं श्रीकोपनाथ देवालयासंबंधीं जी भानगड झाली असें दंतकथेवरून समजतें ती मागें (पृ० ११० वर) दिलीच आहे; परंतु यानंतर या भागांत मुसलमानांनीं विशेष धुमाकूळ घातल्याचें दिसत नाहीं. इतकेंच नव्हे, तर इसवी सनाच्या सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं जेव्हां

---

१ चाहूर म्हणजे ४ पाव किंवा हल्लींचे १२० बिघे

२ ही सनद हल्लीं उपलब्ध नाहीं. असें शोधाअंतीं कळलें. म्हणून तिचा नक्की सन देतां आला नाहीं.

मागें [ पृष्ठ २९ते ३३ वर ] सांगितल्याप्रमाणें मोठ्या अघटित कृतीनें, हल्लीं पालखींत मिरवितात ती श्रीउत्सवमूर्ति यड्डूर क्षेत्रांत श्रीवीरभद्र-देवालयांत आल्याचें वृत्त सर्वतोमुखीं झालें असेल. त्यायोगें व त्यापूर्वींच दोनतीनशें वर्षें अगोदर श्रीआद्यकाडदेवरु स्वामी व त्यांच्या सच्छिष्यांनीं श्रीवीरभद्र देव व श्रीक्षेत्र यड्डूर यांचें माहात्म्य या भागांतीलच नव्हे तर दूरदूरच्या प्रांतांतील अनेक लोकांच्या निदर्शनास आणून देऊन आपल्या दैवी लीलांनींही अन्य धर्मीय लोकांचीसुद्धां निष्ठा बसवून घेतली असल्यानें, आणि याच संधीस श्रीकाडदेवरु मठाच्या सिंहासनावर अधिष्ठित असलेल्या महासमर्थ "श्रीगुरु-सिद्ध काडदेवरु" नामक स्वामींनीं तत्कालीन विजापूरच्या बादशहापुढें आपलें दैवी तेज व्यक्त करून दाखवून त्यांची व त्यायोगें एक प्रकारें त्यावेळच्या सर्व मुससमान समाजाचीच भक्ति आपल्यावर बसवून घेतल्या कारणानें त्या बादशहानें संतुष्ट होऊन कृष्णा नदीच्या कांठचा आपल्या राज्यांतील सर्वच प्रदेश त्या स्वामी-महाराजांच्या नांवें इनाम करून देण्याची उत्सुकता दाखविली! परंतु त्या निस्पृह व त्यागी महात्म्यानें, बादशहांच्या या अति उदार देणगीचा मोह सहज दूर करून, बादशहाकडून होणाऱ्या आदरातिथ्याचीसुद्धां वाट न पाहातां ते संचारार्थ निघून गेले! या त्यांच्या निःस्वार्थ वर्तणुकीनें बादशहाची त्यांजवरील भक्ति अधिकच दृढ झाली. व त्यानें स्वकर्तव्य म्हणून स्वतःच्या मनाची समाधानी होण्यास्तव श्रीकाडदेवरु मठांच्या व श्रीआद्यकाडदेवरु स्वामींनीं स्थापित केलेल्या देवादिकांच्या नांवानें ज्या ज्या ठिकाणीं जमिनी होत्या त्या सर्व पूर्वापार वहिवाटीप्रमाणें अखंडित चालविण्याविषयीं फर्मान काढिलें! तेव्हांपासून श्रीकाडदेवरु मठांच्या कोठल्याही उत्पन्नाला मुसलमान सत्ताधाऱ्यांकडून उपसर्ग पोहोंचला नाहीं असें दिसतें. याच वेळीं श्रीवीरभद्रदेवाच्या नांवानें चालत आलेल्या जमिनी व यड्डूरगांव पूर्वापार वहिवाटीप्रमाणें पुढें चालू करून दिलीं असलीं पाहिजेत. याच गोष्टीला अनुसरून श्रीवीरभद्रदेवाच्या नांवानें हल्लीं असलेलीं सर्व इनामें व सेवेकऱ्यांच्या जमिनी मुसलमान बादशा-

करूनच देवास नव्यानेंच इनामें मिळालीं असावीं असा गैरसमज पुष्कळांनीं करून घेतला आहे असें वाटतें; पण वास्तविक प्रकार तसा मुळींच नसून हीं सर्व इनामें पूर्वीच मिळालीं होतीं, हें मागील भागांत केलेल्या विस्तृत विवेचनावरून सर्वांस कळून चुकलेंच असेल.

मोठ्या परिश्रमानें झाडी तोडून पूर्वजांनीं लागवडींत आणिलेल्या ह्या सर्व जमिनी व गांव देवाच्या नांवानें मुसलमान बादशहाकडूनही कायम होतांच त्यावेळच्या सर्व सेवेकऱ्यांना अत्यानंद होऊन त्यांनीं नवीन आलेल्या श्रीउत्सवमूर्तीचाच हा विजय समजून त्याचा दररोज त्रिकाल पालखी-महोत्सव सुरू केला. आणि याच वेळीं मुसलमान राजकर्त्यांना संतुष्ट करण्याकरितां त्यांच्या दरबारी–पद्धतीप्रमाणें येथेंही देवाच्या सेवेस कलावंतिणी ठेवण्याचा उपक्रम झाला असें दिसतें; कारण त्यांना देणगी रूपानें मिळालेल्या जमिनी याच वेळीं नव्यानें मिळाल्या असाव्या असें म्हणण्यास आधार आहे.

यानंतर ५०–६० वर्षांच्या आंतच ( इ. स. १६५९ सालीं ) हा सर्व प्रदेश हिंदुधर्मप्रतिपालक प्रौढप्रतापनिधि श्रीमच्छत्रपति शिवाजीमहाराजांनीं जिंकून घेतला. तेव्हांपासून यवनांची भीति नाहींशी झाली, तथापि सन १६६१ सालीं थोडे दिवस पुनः यावर आदिलशहा आपली सत्ता गाजवीत होता. परंतु इ. स. १६६२ च्या सुमारास हा प्रदेश पूर्णपणें शिवाजीमहाराजांच्या ताब्यांत आला. शिवछत्रपतींच्या निधनानंतर जेव्हां हिंदुधर्मद्वेष्ट्या औरंगजेबानें दक्षिणेंत मुख्यतः मराठ्यांवर स्वारी केली; तेव्हां मराठी राज्यावर आलेल्या प्राणसंकटाच्या वेळीं इ. स. १६९१ ते १७०७ पर्यंत सुमारें १६ वर्षें हा प्रदेश मोगलांच्या ताब्यांत होता; परंतु पुढें मराठ्यांनीं लवकरच तो परत घेतला. सातारा येथील सिंहासन, श्रीमच्छत्रपति थोरले शाहूमहाराज यांनीं ताब्यांत घेऊन ते मराठ्यांचे सत्ताधीश बनतांच, छत्रपति राजाराममहाराजांची पत्नी श्रीताराबाई महाराणीसाहेब व त्यांचा प्रतापी पुत्र शिवाजीमहाराज यांनीं कोल्हापूर हीच आपली राजधानी केली. ( इ. स. १७०८ ). तेव्हांपासून या प्रदेशावर

कोल्हापूरच्या छत्रपतींचा अंमल सुरू झाला; परंतु साताराचे शाहूमहाराजही या प्रदेशावर आपला हक्क सांगत होतेच. हें येथील वहिवाटदारास छत्रपति शाहू महाराजांकडून इ. स. १७०९ मध्यें मिळालेल्या सनदेवरून दिसून येतें; पण हा त्यांचा हक्क कोल्हापूरकरांप्रमाणें निश्चित स्वरूपाचा केव्हांही नव्हता. त्यामुळें त्यांनीं दिलेल्या वर नि:र्दिष्ट केलेल्या सनदेचा अंमलसुद्धां झाला नसावा असें पुढें लिहिलेल्या खुलाशावरून कळून येईल.

हा गांव यमाजी रुद्रो ( यड्डूर येथील हल्लींच्या वहिवाटदारांचे मूळ-पुरुष ) यांना इनाम मिळाल्याचें कारण असें सांगतात कीं, शाहू महाराज जेव्हां मोगलांच्या कैदेंतून मुक्त होऊन आले व सर्व मराठी राज्यावर आपला हक्क सांगूं लागले, तेव्हां प्रथमारंभीं त्यांना इकडचे प्रसिद्ध सरदार अनुकूल होण्यास धजेनात. कारण सातारा येथें प्रत्यक्ष छत्रपति राजाराम महाराजाचा पुत्र शिवाजी हा राज्य करीत असतांना, त्याच्या विरुद्ध जाण्याची छाती कोणास कशी होईल? परंतु शाहू महाराजांचा पक्ष खरा असल्यानें पुढें एकेक सरदार त्यांना हळुहळु सामील होऊं लागला. त्या वेळीं श्रीमंत वंटमुरीकर सरदेसाई यांचे मुतालिक यमाजी रुद्र या पराक्रमी पुरुषानें श्रीशाहूछत्रपतींचा पक्ष धरिला व मोठा पराक्रम गाजविला. शाहूमहाराजांना साताऱ्याचें राज्य मिळतांच त्यांनीं आपल्या सर्व लहान मोठ्या साह्यकर्त्या सरदारांस त्यांच्या इच्छेनुसार गांवें इनाम दिलीं. त्या-वेळीं यमाजी रुद्रो यासही यड्डूर, नेरली वगैरे नऊ गांवें इनाम घालून दिलीं. अर्थात् यावेळीं छत्रपति शाहूमहाराज देखील या प्रदेशावर आपला हक्क सांगत होते हें उघड आहे.

येथें यड्डूर गांवासंबंधानें वाचक अशी शंका घेतील कीं, 'येथपर्यंत मागें अनेक वेळां आपण सदरहू यड्डूर गांव पुरातन कालापासून श्रीवीर-भद्र देवाच्या नांवानें 'इनाम' मिळाल्याचें लिहितां; परंतु येथें म्हणतां कीं, यड्डूर हा गांव श्रीशाहू छत्रपतींनीं यमाजी रुद्रो यास इनाम दिला. मग पूर्वींपासून हा गांव देवास इनाम असल्याची गोष्ट श्रीशाहू छत्रपति विसरले काय? कां तुम्हींच लिहिण्याच्या भरांत मागें काय लिहिलें आहे

तें पाहाण्यास विसरलां? पण वाचकहो, असें घोटाळ्यांत पडण्याचें मुळींच कारण नाहीं. कां कीं, श्रीशाहूछत्रपतींनीं यमाजी रुद्रो याच्या नांवानें दिलेली सनद व पुढे पेशवाई सुरू झाल्यानंतर नानासाहेब पेशव्यानें यमाजी रुद्रो याच्या नातवास त्यांनीं अर्ज करून सनद मागितल्यावरून याच गांवासंबंधानें दिलेली सनद ह्या दोन्ही एकापुढें एक ठेवून पाहिल्यास असें स्पष्ट दिसून येईल कीं, श्रीशाहूमहाराजांच्या सनदेचा अंमल झालाच नाहीं. कारण पेशव्याकडून खुद्द यड्डर गांवांतील तत्कालीन वहिवाटदारांनीं केलेल्या अर्जाबरहुकूम जी सनद सन १७५७ इसवीमध्यें मिळाली त्यांत स्वच्छ नमूद केलें आहे कीं, 'पूर्वापार वहिवाटीप्रमाणें देवाकडे पूजा, नैवेद्य, नंदादीप, यात्रा वगैरे खर्चाकरितां पूर्वीपासून चालत आल्याप्रमाणें हा गांव देवाच्या खर्चास लावून दिला आहे.' यावरून पूर्वीपासूनच हा गांव याच कारणांकरितां देवाकडे चालत आला होता असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. शिवाय ही सनद तत्कालीन मालकांनीं अर्ज करून मिळविलेली आहे, राज्यकर्त्यांनीं आपण होऊन दिलेली नव्हे, हे लक्षांत ठेवण्यासारखें आहे; आणि त्यावेळीं 'तुम्हीं असा अर्ज कां करितां? हा यड्डर गांव देवास इनाम नसून आमच्या घराण्यासच इनाम आहे. कारण ही शाहूमहाराजांनीं दिलेली सनद पहा' असें म्हणून त्यांच्या त्यावेळीं हयात असलेल्या कोणाही भाऊबंदांनीं तक्रार केली नाहीं. जर कोणी तक्रार करून त्यांच्याच पराक्रमी पूर्वजास मिळालेली त्यांजवळ असलेली वरील शाहूमहाराजांनीं दिलेली सनद हजर केली असती; तर पेशव्यांना अशी सनद केव्हांही देतां आली नसती. यावरून शाहूमहाराजांनीं दिलेली सनद पोकळच राहिली नाहीं काय? या दोन सनदांच्या मजकुरावरूनच शाहूमहाराजांच्या सनदेचा अंमल यड्डर गांवापुरता मुळींच झाला नाहीं असें दिसतें. यावरून पुरातन कालापासून म्हणजे सिंहणदेव यादव राजापासून हा गांव श्रीवीरभद्र देवासच इनाम मिळाला आहे. हें आम्ही पूर्वीपासून करीत आलेलें विधान अगदीं बरोबर आहे, हें वाचकांच्या ध्यानीं आलें असेलच.

ही सनदांसंबंधाची मध्येंच घुसडलेली भानगड बाजूस ठेवून मागील इतिहासाचा अपुरा राहिलेला दुवा सन १७५० इसवी पर्यंत जोडून देणें भाग आहे.

इ. स. १७०८ ते १७४९ पर्यंत सुमारें ४० वर्षे छत्रपति शाहूमहाराजांनीं अत्यंत भरभराटींत राज्य केलें. या दीर्घकालीन कारकीर्दींत अनेक घडामोडी झाल्या व मराठ्यांची सत्ता कळसास पोहोंचली. ती असो. सांप्रत आपणास कृष्णानदीकांठच्या प्रदेशासंबंधानेंच इतिहास पहावयाचा असल्यानें तिकडे वळूं. सन १७३० सालीं कोल्हापूरचे छत्रपति संभाजी महाराज व शाहूमहाराज यांजमध्यें झालेल्या तहान्वयें कृष्णेच्या उत्तरेकडील मिरजप्रांत जरी शाहूमहाराजांकडे गेला होता, तथापि प्रसंगोपात शाहूमहाराजांच्या हयातींत देखील कोल्हापूरचे छत्रपति संभाजी महाराज हे त्या प्रांतावर आपला हक्क सांगत असत. पुढें इ० स० १७४९ सालीं छत्रपति शाहूमहाराज निपुत्रिक होऊन वारले. तेव्हां विश्वासघातकी व स्वामीद्रोही नानासाहेब पेशव्यानें (त्यांजकडून अंतकाळीं त्यांना फसवून किंवा जबरीनें घेतलेली असो, अगर त्यांच्या मरणानंतर तयार केलेली असो. पण ) आपल्यास सर्व मराठा साम्राज्याची वटमुखत्यारीची सनदच शाहूछत्रपतींनीं दिली असल्याचें जाहीर केलें ! व साताऱ्यास एक नामधारी राजा गादीवर बसवून सर्व राज्याचा आपणच स्वतंत्र ( पण नांवानें मात्र पेशवा–प्रधान असा ) मालक बनला. अर्थात् यावेळीं ( स० १६४९ इ० नंतर ) जरी या प्रदेशावर मराठ्यांचेंच राज्य होतें तरी त्याचा खरा धनी पेशवाच होता असें दिसतें; परंतु कोल्हापूरचे छत्रपति संभाजीमहाराज हे कृष्णाकांठच्या व त्या जवळपासच्या सर्वच प्रदेशाचे आपणच मालक आहों असें समजूं लागले व तसा अंमलही करूं लागले. या दोघांच्या अधिकारामधील झगड्याचा आपल्या प्रस्तुत यडूरच्या इतिहासावर कसा परिणाम झाला हें पुढें ओघानें येणारच असल्यानें स्वतंत्र इतिहासाला येथेंच विराम दिलेला बरा.

---

# [ ३ ] ब्राह्मणांचा चंचुप्रवेश.



या नानासाहेब पेशव्यानें तत्कालीन श्रीक्षेत्र यडूरांतील काडदेवरु मठाधिकारी श्रीमरिकाडदेवरु स्वामींशीं किती मगरूरीचें वर्तन केलें आहे त्याचा खालील मासला पाहाः—

सावनूरच्या नवाबाकडे चौथाई सरदेशमुखीची बाकी थकल्यामुळें ती वसूल करण्याचे पेशव्यांनीं यापूर्वी पुष्कळ प्रयत्न केले; पण अखेरीस लढाई केल्यावांचून गत्यंतर नाहीं, असें जेव्हां पेशव्यांस वाटलें, तेव्हां त्याचें पारिपत्य करण्याकरितां नानासाहेब पेशवा व सदाशिरावभाऊ हे दोघे इ. स. १७५३ सालीं एक मोठें सैन्य घेऊन निघाले. त्यावेळीं एकदां कृष्णाकाठीं मांजरीगांवीं त्यांच्या सैन्याचा तळ पडला. ब्राह्मण्याचा अस्सल पुरस्कर्ता पेशवा आपल्या गांवापासून दीडदोन मैलांच्या अंतरावर ससैन्य येऊन बसल्यावेळीं त्याच्या आगमनाचा शक्य तितका फायदा घेण्यास यडूरचे भट कसूर करतील काय? असें होणें शक्यच नसल्यानें त्यावेळीं यडूर येथील कांहीं चळवळ्या उपऱ्या भटांनीं येथील त्यावेळचा वयोवृद्ध वहिवाटदार यमाजी रुद्रो याच्या मार्फतीनें मांजरी मुक्कामीं नानासाहेबाची भेट घेऊन विनंति केली कीं, ‘येथून जवळच श्रीक्षेत्र यडूर येथील पुरातन कालचें प्रख्यात व अत्यंत जागृत असें श्रीवीरभद्रलिंग असून हें स्थानही अत्यंत रमणीय आहे; तरी श्रीमंतांनीं त्या देवाचें एकदां दर्शन घेण्याची कृपा करावी.’ ही त्या भटांची नम्र विनंति ऐकून नानासाहेबानें अवांतर चौकशीच्या भानगडींत न पडतां एकच शेलका प्रश्न विचारिला कीं, ‘तेथें पुजारी कोण आहे?’ भटांनीं उत्तर केलें कीं, ‘जंगम पुजारी आहे.’ तेव्हां नानासाहेबानें नकारार्थ दर्शवून निश्चयी स्वरानें म्हटलें, ‘ज्या देवालयांत ब्राह्मण पुजारी नसतो, तेथील देवाच्या दर्शनास आम्ही बहुधा जात नसतों.’ हें उत्तर ऐकतांच भटांची निराशा झाली, व ते यडूरास परत निघून आले; परंतु स्वस्थ बसणें हा त्यांचा स्वभावधर्म नसल्यामुळें अनेक वर्षांपासून

मनांत घोळत असलेल्या पूर्वसंकेताप्रमाणें आपला प्रसिद्ध म्होरक्या यमाजी रुद्रो याच्या मध्यस्थीनें त्यावेळचे काडदेवरु मठाचे अधिकारी व श्रीवीरभद्रदेवाचे परंपरागत हक्कदार पुजारी श्रीमरिकाडदेवरु स्वामी यांच्याशीं संधान बांधून व पेशव्याकडून मोठी देणगी मिळेल अशी लालूच दाखवून या सर्वांनीं मिळून त्यांना विनंतिवजा हुकूमच केला कीं, 'तूर्त पेशवे सरकार येथें येऊन जाईपर्यंत श्रीवीभद्रलिंगाची पूजा आम्हांकडे द्यावी. सामोपचारानें बिनबोभाट तुम्हीं असें न कराल तर ही गोष्ट कोणत्या थराला जाईल याचा आपण विचार करावा.' कित्येक उतावळ्या उर्मट भटांनीं श्रीस्वामींना 'तुम्हीं आतां श्रीवीरभद्रलिंगाची पूजा आमच्या स्वाधीन न केल्यास आम्ही पेशव्यांकडून तुम्हांस बाहेर काढून सत्तीनें गर्भदेऊळ कबज्यांत घेऊं. असें बजावण्यासही कमी केलें नसेल. पाहा किती उलटा ब्राह्मणी न्याय हा! देऊळ श्रीकाडदेवरु स्वामींच्या परंपरागत मालकीचें. त्यांतील श्रीवीरभद्रदेव

१ श्रीवीरभद्र लिंगाचा जीर्णोद्धार करून गर्भदेऊळ बांधविण्याची कामगिरी **श्रीआद्यकाडदेवरुस्वामींनीं** केल्यापासुन त्या लिंगाच्या पूजेस वीरशैव-जंगमपुजारीच नेमिलेला होता. त्यामुळें तो देव व तें देऊळ जवळ जवळ लिंगायतांचेंच समजलें जात होतें. ब्राह्मण अगर इतर लोक गर्भदेवालयांत जात नव्हते. पुढें श्रीवीरभद्र लिंगाची चोहोंकडे प्रसिद्धि होऊन जेव्हां मोठी यात्रा जमूं लागली; व देवास जमिनी व गांव इनाम मिळून तीं मुसलमान बादशहाकडूनही कायम झाली; तेव्हां श्रीवीरभद्र देवाचा पुजारीपणा म्हणजे एक मोठी स्थाईक उत्पन्नाची बाबच होऊन बसली. त्यामुळें हा गांव यमाजी रुद्रो यास इनाम म्हणून ( वास्तविक या इनामी सनदेचा अंमल मुळाच झाला नाहीं हें मागें खुलासवार सांगितलेंच आहे. ) मिळाल्यापासून त्यांचे आश्रित असे जे भट येथें येऊन राहिले. त्यांना हें श्रीवीरभद्र देवाचें उत्पन्न पाहून तोंडास पाणी सुटलें. त्या योगानें उ.प्रमाणें शेंकडों वर्षांपूर्वी सिंहणदेव यादव राजानें लागवडींत आणलेल्या जमिनी देवाप्रीत्यर्थ देऊन टाकल्या असतांनाही, घेणाऱ्यांच्या हलगर्जीपणानें किंवा आळसामुळें ही गोष्ट स्पष्टपणें पुढें न आल्यानें, पूर्वी वास्तविक श्रीवीरभद्र देवाच्या नांवानें दिला गेलेला यड्रूर गांव व जमिनी, फक्त सेवेकऱ्यांच्या व इतर पाटील-कुलकर्णी

लिंगायतांचा, असें असतांना थोर सजातीयांच्या काल्पनिक आश्रयावर या क्षुद्र पोटभरूंचा कसा राक्षसी उद्दामपणा हा! पण त्यांत त्यांचा तरी काय दोष? यथा राजा तथा प्रजा! असो. अशा विकट परिस्थितींत गरीब बिचारे एकाकी श्रीमरिकाडदेवरुस्वामी काय करणार? शिवाय 'सत्तेपुढें शहाणपण चालत नाहीं' म्हणतात तें खोटें नाहीं. तेव्हां श्रीस्वामींनीं अत्यंत नाखुषीनें एकादशरुद्रपूजेस्तव अकरा दिवसांच्या बोलीनें, नित्यनियम चालावा एतदर्थ आपल्या तर्फेच्या एका जंगम पुजाऱ्यास दररोज फक्त त्रिकाल अगदीं थोडथोडा वेळपर्यंतच श्रीवीरभद्र लिंगाची संक्षिप्त पूजा करून महानैवेद्य अर्पण करण्याकरितां गर्भदेवळांत प्रवेश मिळावा असें भटांकडून आश्वासन घेऊन केवळ आपला प्राण व पूर्वज गुरुवर्यांचा दैवी ठेवाच असें श्रीवीरभद्र लिंग, भटांच्या स्वाधीन करून शके १६७५ सालांतील श्रावण मासीं [इ०स० १७५३ सालीं] श्रीवीरभद्र-

---

इत्यादि वतनदाराच्या जमिनी मात्र वगळून पुनः नव्यानें मोघमांतच वहिवाटदाराच्या नांवें श्रीशाहू छत्रपतींकडून इनाम लिहिला गेला. (याचा अंमल झाला नाहीं ही गोष्ट निराळी). याचप्रमाणें लिंगायताकडे असलेली ही अत्यंत किफायशीर पूजाही आपल्या ताब्यांत असावी अशी अंधुक आशा या आश्रित भटांच्या मनांत उद्भूत झाली व त्यांनीं तीं आपले आश्रयदाते वहिवाटदार यमाजी रुद्रो यांना कळविला; परंतु सदरी वहिवाटदार हा छत्रपति शाहू महाराजांचा आश्रित असून त्यांच्या मेहेरनजरेनेंच हा इतक्या योग्यतेस चढला असल्यामुळें, एका स्वामींचा (त्यांतही वीरशैवसमाजासच केवळ नव्हे तर अखिल जनतेस वंद्य असलेल्या अशा एका प्रख्यात स्वामींचा) वृत्तिच्छेद करून त्याला दुखविल्यास सर्व कर्नाटकांत आपलें नांव बद्दू होईल. इतकेंच नव्हे तर आपले उदार आश्रयदाते छत्रपति शाहू महाराजानांसुद्धां ही गोष्ट पसंत पडणार नाहीं व ते नाराज होतील हें तो जाणून होता. म्हणून मनांतून जरी त्याला आपल्या (नुसत्या नांवानेंच कां होईना पण इनाम असलेल्या) इनाम गांवांतील प्रख्यात व हजारों रुपये उत्पन्नाच्या देवालयांत जंगम पुजारी नको होता, तथापि त्यास उघडपणें तसें म्हणतां येईना, कीं कांहीं करतां येईना. यामुळें यावेळीं या सर्व मत-

गर्भदेवळांत एकदांची—

## भटाला ओसरी दिली !

गर्भदेवळांत प्रवेश मिळतांच त्यांची फार दिवसांची मनीषा तृप्त झाल्यानें, वांझ स्त्रियेस पुत्रप्राप्ति होतांच जसा अत्यानंद होतो तद्वत् यड्डूरच्या भटांनाही परमानंद झाला. त्यांनीं मोठ्या उत्साहानें तत्काळ मांजरी मुक्कामीं नानासाहेबाकडे प्रयाण केलें व त्यास आपला अवर्णनीय पराक्रम कळवून ' श्रीवीरभद्र देवालयांत सध्यां आम्हीच पूजा करीत असतों तरी आपण देवदर्शनास चलावें ' अशी नम्र विनंति केली. वास्तविक न्याय-दृष्टीनें पाहतां, यावेळीं नानासाहेबानें या अन्यायाचें परिमार्जन करून, श्रीस्वामींचें देऊळ स्वामींना देववून या स्वज्ञातीय भटांची चांगली कान-उघाडणी करून असा अन्याय पुढें न करण्याविषयीं खरमरीत ताकीद द्यावयास पाहिजे होती; पण इतकी उदार-बुद्धि जर या पेशव्यांच्या घराण्यांत

---

लवी ब्राह्मण मंडळानीं मिळून पूर्ण विचाराअंतीं असें ठरविलें कीं, ' येथें या लिंगायतांच्या पूजेच्या धार्मिक बाबींत आस्ते आस्ते आपला हात शिरकवावा. एकदम हबकण्यास गेलों कीं, आपल्या कवडीमोल काळ्याकुट्ट हृदयाचें प्रदर्शन होऊन जगामध्यें फजिती व्हावयाची व कदाचित् राजाचा कोप झाल्यास प्रसंगीं, आतांपर्यंत मिळालेलें जावयाचें ? करितां येथें धिमेपणानेंच साधणूक करून अनुकूल कालाची वाट पहावी.' असें या कुटिलनीतीच्या कुशाग्रबुद्धि लोकांचें ध्येय निश्चित होऊन यावेळीं 'आस्ते कदम'चा जो मार्ग या मंडळींतून आंखला गेला. त्याचें दर्शकच हल्लीं उपलब्ध असलेलें 'श्रीवीरभद्रचरित्र'रूपी पुराण होय. या पुराणासंबंधानें एक विशेष गोष्ट सांगावयाची ती हीच कीं, आपल्या या पूज्य भरतभूमींत मूळचीं अठरा व नंतर शेंकडों पुराणें प्रसिद्ध झालीं आहेत. त्या प्रत्येक पुराणांतील प्रत्येक अध्यायांत ब्राह्मण वंद्य [ किंवा देवच ] समजून त्यास अशा अशा तऱ्हेनें दानधर्म करावा म्हणजे कोटि यज्ञ केल्याचें फळ मिळेल ! ' असें किंवा निदान ' हा अध्याय वाचल्यानें ब्राह्मणांस सहस्रभोजन घातल्याचें पुण्य मिळेल.' असें तरी आढळेल परंतु या पुराणाच्या मुख्य भागांत तरी या प्रकारचें एक वाक्यसुद्धां सांपडावयाचें नाहीं, हेंच यांतील विशेष आहे. शिवाय या पुराणाचा कर्ता मोरेश्वर नांवाचा कट्टा ब्राह्मण

असती तर त्याचें अल्पावधींतच असे धिंडवडे कां निघाले असते ? म्हणून या पेशवाई नरपशूकडून अशा न्यायबुद्धीची अपेक्षा करणेंच खुळेपणाचें होय.

भटांची वरील नम्र विनंति ऐकून व त्यांची मर्दुमकी पाहून नानसाहेबास त्वेष तर आला नाहींच; उलट संतोष मात्र झाला व त्यानें भटांच्या विनंतीस मान देऊन आपला मांजरीचा मुक्काम हालवून क्षेत्र यडूरच्या विशाल वनांत आपल्या सैन्यासह तळ दिला व जयप्राप्त्यर्थ श्रीवीरभद्र-लिंगास महारुद्राभिषेक सुरू केला.

यापूर्वी आम्हीं लिहिलेल्या एका गोष्टीविषयीं येथें जरा जास्त खुलासा केला पाहिजे. ती ही कीं, 'अकरा दिवसांच्या बोलीनें श्रीमरिकाड-देवरु स्वामींनीं भटांस गर्भदेवळांत येऊं दिलें.' यावर कोणी म्हणतील कीं, 'हें कशावरून तुम्ही लिहितां ?' यावर आमचें, इतकेंच उत्तर

---

भट व तोही यमाजी रुद्रो याचा आश्रित आहे. हें लक्षांत ठेवण्यासारखे आहे. त्यानें श्रीवीरभद्र चरित्राचें सूक्ष्मपणें अवलोकन करून हें पुराण, अनेक प्राचीन प्रसिद्ध पुराणांचें पूर्ण मंथन करून निघालेल्या तत्त्वाधारें उत्तम सजविलें आहे. ही गोष्ट खोटी नाहीं. त्याचा मासला, याच पुस्तकाच्या पूर्वार्धांतील तिसऱ्या व च भागांत वाचकांना पहावयास मिळालेला आहेच; तथापि या ब्राह्मणकृत पुराणांतही ब्राह्मणांच्या स्तुतिपर गोष्टी न येण्याचें, आमच्या मतें एक मुख्य कारण असें दिसतें कीं, ज्या श्रीवीरभद्रदेवाचा महिमा सहरहू मोरेश्वरभट वर्णित होता, त्या क्षेत्र यडूरांतील श्रीवीरभद्रदेवाजवळ औषधालासुद्धां भट दिसत नव्हता ! ह्यामुळें न जाणो कदाचित आपले श्रम वायां जाऊं नयेत म्हणून किंवा कालानुसार हें पुराण प्रसिद्ध केलें गेलें आणि त्यांत ब्राह्मणास सर्वस्व अर्पण करण्याचा लोकांस उपदेश केलेला असला. आणि त्या ऐन वेळा मुख्य ठिकाणीं ब्राह्मण स्थानापन्न नसतां लिंगायत जंगमच असले, तर त्यांची आंद त्याहून जास्तच चंगळ व्हावयाची व ती आपण स्वहस्तें करून दिल्याप्रमाणें व्हावयाचें ! ही भीति त्याच्या मनांत सदैव असावी. असो.

या पुराण लेखनास आरंभ शके १६६३ म्हणजे सन १७४१ सालीं

आहे कीं, आम्ही प्रथम लिहितांनाच यडूर येथील कित्येक वृद्ध मंडळींना विचारून खात्री करून घेऊनच ही हकिकत लिहली; परंतु पुनः ही गोष्ट ( यडूर येथील भटांनीं श्रीकाडदेवरु स्वामींच्या हक्काचें अतिक्रमण करून श्रीवीरभद्रदेवाच्या गर्भदेवळांत शिरण्याची गोष्ट ) कोठें लेखी पुराव्यानें सिद्ध झाली आहे काय तें पाहावें, अशी आमच्या मनांतच इच्छा उत्पन्न झाली व तिच्या पूर्तीकरितां शोध चालविला, तों पुढें दिलेल्या कोल्हापुरच्या श्रीमन्महाराणी जिजाबाई साहेबांनीं श्रीमरिकाडदेवरु स्वामींस शके १६७८ रांत दिलेल्या सनदेंत यमाजी रुद्रो यांस जी स्पष्ट व खरमरीद ताकीद दिली आहे, ती पाहतांच वृद्धांचें सांगणें अगदीं सत्य आहे अशी आमची खात्री पटली.

वरील विपरीत न्याय पाहून श्रीमरिकाडदेवरु स्वामींना फार वाईट वाटलें व अत्यंत चीडही आली; आणि एकदां या सगळ्या भामट्या भटांना देवळांतून हांकलून काढण्याचा विचारही मनांत आला. पण नुसतें मनांत येऊन उपयोग काय? म्हणून आंतल्या आंत चरफडत स्वस्थ बसणें भाग पडलें.

पुढें रुद्राभिषेक आटपतांच या उभय पेशव्यांचा तळ येथून हालला; व ठरल्याप्रमाणें सावनूरच्या नबाबावर या पेशव्यांची स्वारी झाली. त्यांत पेशव्यांना उत्तम प्रकारें जय मिळून त्यांचा तेथील सर्व वसूल बिनसूट हातीं आला; आणि इतर प्रकारेंही पुष्कळ फायदा झाला तेव्हां परत पुण्यास जातांना पुनः उभयतां पेशवे बंधूंनीं या यडूर क्षेत्रांत दीड महिना मुक्काम ठेविला. याच वेळीं येथील भटांना यडूर येथील जी जमीन इनाम घालून

---

( मराठी साम्राज्याच्या अत्यंत वैभवाच्या काळीं ) होऊन त्याची समाप्ति शके १६७२ ( इ. स. १७५० ) सालीं म्हणजे छत्रपति शाहू महाराजांच्या मृत्यु-नंतर झाली आहे. या अवधींत अद्याप पेशवे पूर्ण सत्ताधारी झाले नव्हते; ही गोष्ट लक्षांत ठेवावी. पुढें छत्रपति शाहू महाराजांच्या मृत्यूनें पेशवे स्वतंत्र मालकच बनले; म्हणून त्यांच्या समानशील अशा मराठी राज्यांतील सर्व भटांना आनंद झाला; व त्यांचे वरील प्रकारचे सर्व कुटिल मनोरथ पूर्ण होण्यास वाव मिळाला.

दिली तीच हल्लींच्या येथील भट घराण्याची जात इनाम जमीन होय.

याच वेळेपासून श्रीवीरभद्रदेवालयांत ब्राह्मण बळेंच घुसले असल्यानें लिंगायत व ब्राह्मण यांची दुहेरी पूजा सुरू झाली. अशाप्रकारें या नानासाहेब पेशव्याच्या परजातीला तुच्छ मानण्याच्या अहंपणाच्या स्वभावामुळें येथील भटांच्या पांढऱ्या पायाचा स्पर्श आमच्या गर्भदेवळास झाला. हा चंचुप्रवेश होतांच लागलेच हे उर्मट भट अत्यंत मगरूर होउन पुढें मुसळाप्रमाणें मुर्दाड बनले असावे; व त्यांनीं त्याच वेळीं लिंगायतांना अजीबात बाहेर हाकून काढून स्वतःच मालक बनण्याचाच तावडतोब विचार केला असावा. कदाचित् कांहीं दिवस लिंगायतांना अजिबाद बाहेर सुद्धां घालवून दिलें असावें असेंही आभास वाटतें. याचें कारण श्रीमंत जिजाबाई महाराणी आईसाहेब यांनीं दिलेल्या [ पुढें उल्लेखिलेल्या ] सनदेंत त्यांनीं स्वच्छ ह्मटलें आहे कीं, ' तुह्मी नूतन करितां तसें न करितां काडदेवरू शिष्यपरंपरा पूजा करीत आहेत तसें त्यांना करूं देणें ! ' यावरून सदरी भटांना व त्याचे साथीदार वहिवाटदारालाही खरमरीत ताकीद येऊन लागू होईपर्यंत यांनीं वरीलप्रमाणें नंगा नाच केला असलाच पाहिजे. ह्मणूनच अशी खरमरीत ताकीदरूपी जहाल मात्रा द्यावी लागली. यावरून तेव्हां या उभऱ्या भटांनीं किती नीचपणा केला आहे तें पाहावें. यावेळीं बेशरमपणें बळेंच गर्भदेवळांत घुसलेल्या भटांना वरील सनदरूपी कायद्याच्या दंडुक्यानें जरी यावेळीं बाहेर हांकलिलें तथापि पूर्वी जसा त्यांना आंत येण्यास अजीबाद प्रतिबंध होता तसा त्यापुढें राहिला नाहीं. त्यांची पूजेकरितां आंत येण्याची वहिवाट येथपासून सुरू झाली. भटघराण्यांना इतरांकडून ज्या जमिनी जात इनाम व इतर कारणाकरितां मिळाल्या त्या त्यांना यानंतरच मिळाल्या आहेत. यापूर्वी कोणतीही जमीन इनाम नाहीं.

या रीतीनें गर्भदेवळांत ब्राह्मणांचा प्रवेश होऊन त्याचें वहिवाटींत रूपांतर होतांच त्यांना देवाच्या पूजा, उत्सव, वगैरे कामांत लुडबुड करण्यास सवड मिळूं लागली व आमच्या जंगम पुजाऱ्यांच्या अज्ञानपणाचा गैरफायदा घेऊन त्यांच्यांत लाथाळी सुरू करण्यासही अवसर मिळूं लागला.

यावेळीं कुसळ रूपानें आमच्या देवालयांत घुसणारे ब्राह्मण पुढें पुढें तर कसे मुसळाप्रमाणें मुर्दाड बनले याचा हृदयंगम इतिहास आपल्या अद्भुतपणानें कादंबरीसही मागें टाकील असा चमत्कृतिपूर्ण आहे. तो यथाक्रम पुढें दिलेला पाहण्यांत येईलच; असो. यावरून श्रीवीरभद्र देवालयांत भटांचा व वहिवाटदाराचा किती हक्क आहे हें सर्वांना पूर्ण समजून चुकलें असेलच. भटांच्या याच लुडबुडेपणाचा, या पुढील तिसऱ्या भागांत दिलेल्या पूर्व तयारीशीं कसा निकट संबंध आहे हें सूक्ष्मपणें पाहावें.

---

## [४] पेशव्यांची सैतानशाही

वरील प्रकारांत आम्हास फक्त एका गोष्टीचेंच विशेष आश्चर्य वाटतें. त्याविषयीं थोडा खुलासा केल्यावांचून पुढें जाववत नाहीं. ती गोष्ट हीच कीं, आपल्या प्रजेला अन्यायी जनांकडून जाच होऊं नये; व शांततेनें राहूं इच्छिणाऱ्या रयतेवर जुलूम जबरदस्ती होऊं नये; आणि त्यांच्या हक्कांचें संरक्षण व्हावें म्हणूनच राजसत्तेचा उदय झाला आहे. त्यामुळें आपल्या प्रजेचें पुत्रवत् पालन करणें हेंच कोणाही राजाचें अगर राजप्रतिनिधीचें श्रेष्ठ कर्तव्य होय, असें सर्व देशांत समजलें जातें. असें असतांना स्वतांच्या जगद्वंद्य सद्गुरूकडून स्थापन झालेल्या लिंगाची, त्या सद्गुरू कृपेनें तयार झालेल्या देवालयांत बसून भक्तिभावानें पूजा करणाऱ्या लिंगायतास पाहून या त्रयस्थ पेशव्याला वाईट वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें. परंतु मूल वासनाच जेथें सरळ नाहीं; म्हणजे जगांत श्रेष्ठ काय तें आम्हीच असें समजून स्वतः पुढें सर्व जगालाच तुच्छ लेखण्याची ज्यांची जन्मजात खोड, त्यांना हा सरळ सिद्धांत कसा पटणार ? अथवा स्वतःला अन्नास लावून उच्च दर्जास चढविण्याचा प्रयत्न करणाऱ्या सरलहृदयी शाहूछत्रपतींना आसन्नमरण स्थितींत गांठून त्यांनीं व त्याच्या प्रतापी पूर्वजांनीं प्रत्येक पावलागणिक रक्ताचा सडा घालून, निढळाच्या घामानें कमविलेलें प्राणाहून प्यार असलेलें स्वराज्य, चुटकीसरसें कुटिल

नीतीच्या व कृतघ्नपणाच्या एकाच लेखणीच्या फटकाऱ्यानें गिळंकृत करून साळसूदपणाचें सोंग आणणाऱ्या या मांगहृदयी मूर्खांना एकाद्या सामान्य प्रतीच्या लिंगायत स्वामींच्या हक्काची पायमल्ली करणें म्हणजे हाताचा मळ होय! मग तेथें कोठली राजनीति, किंवा कर्मभीति? बरें येथें हा मोठा राजकारणी मनुष्य होता सबब नूतन ऐश्वर्यानें मदांध होऊन त्यानें अशी अनुचित गोष्ट केली असेल, इतरांकडून सहसा असें घडावयाचेंच नाहीं, असें कोणी म्हणेल तर ही पूर्वीची पेशवाईतली गोष्ट शिळी म्हणून दृष्टी-आड केली; तरी अगदीं अलीकडे म्हणजे २।३ वर्षांपूर्वीं सुरू होऊन अद्यापही सुरू असलेल्या परळी येथील 'श्रीवैजनाथ' ज्योतिर्लिंगाच्या रुद्राभिषेकासंबंधीं खटल्यांत, अथवा याहूनही ताजें उदाहरण पाहिजे असल्यास केवळ दोन तीन महिन्यांपूर्वीं कोल्हापूरचे सरकार श्रीमच्छत्रपति राजाराम महाराज हे आपली कुलस्वामिनी जी कोल्हापूरची श्रीमहालक्ष्मी (अंबाबाई तिची प्रत्यक्ष पूजा करण्यारितां त्या देवालयांत गेल्याविषयीं तेथील भटांनीं व पुण्या मुंबईत व इतरत्र राहणाऱ्या त्यांच्या सर्व भाऊ-बंदांनीं जो गहजब केला, तो या स्वार्थी लोकांच्या मनाचा कोणता कुचका भाग दाखवीत आहे हें वाचकांनींच पाहावें. यावेळीं स्वतांस अत्यंत सुधारक व उदारमतवादी म्हणवून घेणाऱ्या ब्राह्मणी वर्तमानपत्रांनीं 'असें पुनः न होईल अशी खबरदारी घ्यावी' अशा अर्थाचे लेख लिहून ताकीद देण्यास कमी केलें नाहीं! मग इतर कर्मठ भटांनीं किती अकलेचे तारे तोडले असतील तें पाहावयासच नको. या सर्व महा-पंडितांना आम्ही इतकेंच विचारितों कीं, कायहो पंडितवर्य, तुम्ही मराठ्यांचा इतिहास जाणतां काय? तर मग ज्यावेळीं सर्व हिंदुस्थानास मुसलमानी दीक्षा देण्याची भीषण प्रतिज्ञा करून महाबलाढ्य सार्वभौम सत्ताधारी, हिंदुधर्मद्वेष्टा औरंगजेब बादशहा आपल्या लक्षावधि प्रतापी सैनिकांसह दक्षिणेंत उतरला व ठिकठिकाणचीं देवळें मोडून व देव भ्रष्ट करून हिंदूंच्या क्रियापोरांचीं धुळधाण उडवूं लागला, त्यावेळीं तळहातावर शिर घेऊन व हजारों वीरांच्या आहुती देऊन, स्वतः अत्यंत क्लेश भोगीत

अनेक वर्षे वनोवनीं हिंडून ज्या मर्द मराठा छत्रपतींनीं व त्यांच्या सरदारांनीं तुमची शेंडी व तुमचा धर्म, हीं शाबूद राखिलीं व तुमच्या आयाबहिणी व तुमचे देव भ्रष्ट होऊं दिले नाहींत, त्या शूरमर्दांच्या सध्यांच्या वंशजांना, त्यांच्याच पराक्रमानें सुरक्षित राहिलेल्या त्यांच्याच जागृत कुलदेवतेची प्रत्यक्ष पूजा करण्याची बंदी तुमचे ऐतखाऊ भट करूं पाहातात. हा कोठला न्याय ? जर त्यावेळीं औरंगजेबाच्या आमिषास भुलून, ऐष आरामाची इच्छा करून, छत्रपति संभाजी महाराज किंवा राजाराम महाराज यांनीं अंग काढून, एकादी मोठी जहागीर घेऊन स्वार्थ साधिला असता, तर तुह्मी आज ज्या श्रीअंबाबाईला सोवळ्यांत गुरफटून ठेवीत आहां, ती देवी मुसलमानांच्या एकाद्या मोठ्या मशिदींतील कोपऱ्यांत कुराण ऐकत स्वस्थ बसली असती! हें तुम्हांस समजत नाहीं असें नाहीं; पण समजून उमजत नाहीं म्हणा किंवा उमजून सुद्धां अंगांतील अहंपणाचा पीळ जात नाहीं म्हणून म्हणा तुमची आपल्या उपकारकर्त्यांना व इतर सर्वांना नीच मानण्याची व त्यांच्यावर उलटून पडण्याची क्षुद्रपणाची दुष्ट संवय मुळींच जात नाहीं हेंच खरें. तेव्हां अनादि कालापासून अरेरावीपणा व अहंमन्यपणा हे दुर्गुण यांच्या शेंकडा पन्नास इसमांच्या तरी पांचवीस पूजलेलेच आहेत असें लोक ह्मणतात तें खोटें नसावें. सध्यां सुधारलेल्या विसाव्या शतकांत दुसऱ्यास धर्म-नीति शिकविण्याचा आव आणणाऱ्या सामान्य पुजाऱ्यांच्या अंगांत जर असा शंभर नंबरी मगरूरपणा वास करितो, तर ज्याकाळीं प्रतापी शाहू छत्रपतींच्या हिंदवी स्वराज्याला खंबीर आधारस्तंभ बनलेल्या पुण्यपावन सिंहासनावर त्यांचेंच थडगें उभारून त्यांच्या वंशजांच्या देखत त्यांच्या राज्यलक्ष्मीला हरण करून नेऊन तिच्या दीप्तीनें दिपून जाऊन हे ऐश्वर्यमदांध बनले होते त्या पेशवाईच्या काळांत यांना नरकोटींत मोजणारेच मूर्ख ठरावे यांत आश्चर्य काय ? मात्र अशा संतानांच्या मागें वर्णिलेल्या अत्याचारानें भिऊन जाऊन देवघरांत दडणारे श्रीमरिकाडदेवरु स्वामी नव्हते. हें पुढें दिलेल्या त्यांच्या अप्रतिम कर्तबगारवरून दिसून येईल.

. . . . . . . . . . .

# [५] श्रीमरिकाडदेवरु स्वामींची कर्तबगारी

कोणत्याही ठिकाणच्या श्रीकाडदेवरु मठांच्या गादीचा गुणच असा आहे कीं, त्यांवर आरूढ होणारा चेला जन्मतः जरी भोळा व अज्ञ असला तथापि तेथें येऊन त्या गादीचा स्पर्श होतांच तो अष्टपैलु व सुज्ञ बनलाच पाहिजे. निदान आजपर्यंतचा अनुभव तरी असें ठासून सांगतो कीं, अनेक आपत्ति अंगावर कोसळून दुःखानें गांजून गेल्यावेळीं सुद्धां गलितधैर्य होऊन भागूबाई प्रमाणें मुळुमुळु रडत बसणारा मेंग्या मारुति मठ स्वामी, श्रीकाडदेवरु स्वामींच्या अफाट शिष्यपरंपरेंत अद्याप एकही झाला नाहीं! तर कपटास कपट लढवून व ठोशास ठोसा लगावून आपल्या न्याय हक्काचें सर्वदा रक्षण करण्यांतच जीवितसाफल्य मानणारे मर्द वीरशैव वीरच या शिष्यपरंपरेंत झळकत आहेत. या परंपरागत वीरमालिकेंतच आपल्या तत्कालीन श्रीमरिकाडदेवरुस्वामींची गणना होते. कारण त्यावेळीं 'बळी तो कानपिळी' किंवा याहूनही यथार्थ दृष्टांत एका आधुनिक कविवर्याच्या काव्यमय भाषेंत सांगावयाचें म्हणजेः—

'राजा लुटि जरी प्रजाजनांला शरण कुणां जावें ?'

अशी असहाय्य स्थिति प्राप्त झाल्यामुळें निरुपाय होऊन त्या वेळेपुरते जरी या जबरदस्तांचे हात त्यांनीं स्वांग्रावर वाहिले. ( नानासाहेबाच्या अधिकाराचा जोर पाहून भटांना कांहीं वेळ गर्भदेवळांत येऊं दिलें. ) तथापि पेशवा निघून जातांच या स्वामींनीं भटांना बाहेर हाकलून दिलें. इतकेंच नव्हे तर पुनः मगरूरीनें त्यांनीं असा आंत येण्याचा प्रयत्न करूं नये म्हणून श्रीक्षेत्र **सिद्धगिरी** येथील मठाधिकारी स्वामींच्या मार्फत कोल्हापूरच्या दरबारीं वशिला लावून तत्कालीन प्रतापी छत्रपति संभाजी महाराजांच्या ज्येष्ठ पत्नि राजकारणपटु महाराणी जिजाबाई आईसाहेब यांची भेट घेतली व त्यांजकडून करवीर दरबार मार्फत श्रीक्षेत्रयडूर येथील

---

१ छत्रपती संभाजीमहाराज यावेळीं हयात असतां त्यांजकडून सनद न

मगरूर भटांना व त्यांचा म्होरक्या यमाजी रुद्रो याला शके १६७८ (इ.स. १७५७) सालीं खालीलप्रमाणें खरमरीत ताकीद आणून लाविली तीः–

सनद अशीः—

श्री.

श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेब याणी राजश्री यमाजी रुद्र यासी आज्ञा केली येसीजे. श्रीसंस्थान यङ्कर प्रांत हुकेरी येथील श्रीची पूजा पूर्वीपासून काडसिद्धेश्वर गोसावी सिष्यपरंपरेने करीत आहेत असे असता सांप्रत तुम्ही गोसावी याचे पूजेस अडथळा करून नूतन करिता म्हणून हुजूर विदित जाहाले, त्याजवरून हे आज्ञापत्र सादर केले असे; तरी गोसावी श्रीची पूजा पूर्वीपासून करीत आले आहेत तेणें प्रमाणें करू देणे. नवीन एकंदर न करणे सुदामत चालत आल्याप्रमाणें चालो देणे; येविसी हुजूर बोभाटा येऊ न देणें. जाणीजे छ० ६ माहे जमादिलाकर सूरसन सबा खमसेन मया अलफ बहुत काय लिहिणे.

---

आणितां महाराणीसाहेबांकडून कां आणिली? अशी कोणास शंका येईल तर तिचें समाधान असें करितां येतें कीं, प्रत्यक्ष संभाजीमहाराजसुद्धां पुष्कळ बाबतींत जिजाबाई महाराणीसाहेबांची सल्ला घेत असत. अणि कित्येक महत्वाच्या तह-नाम्याच्या वेळीं राणीसाहेब महाराजांबरोबर असत (पहा–मोडक कृत कोल्हापूर राज्याचा इतिहास उत्तरार्ध भाग १ पृष्ठ ३७) शिवाय महाराजांच्या मरणानंतर छत्रपति शिवाजीमहाराज (सन १७६२ ते १८१२) यांना दत्तक घेऊन ते वयांत येईपर्यंत १२-१५ वर्षे या जिजाबाई महाराणीसाहेबांनींच उत्तम प्रकारें राज्य चालविलें आहे. (पहा सदरहू इतिहास पृष्ठ ४७ ते ६४) मग यःकश्चित एका सामान्य भट सरदाराला ताकीद देण्याचें काम करण्यास प्रत्यक्ष छत्रपतींनीच काय जरूर होती हें शंकेखोरांनींच सांगावें. अशीं सर्व साधारण कामें त्यावेळीं राणीसाहेब स्वतःच्या देखरेखीनेंच करीत असत असें या सनदेवरून सिद्ध होतें.

शिवाय येथें दुसरी एक शंका अशी उद्भवते कीं, श्रीक्षेत्र यङ्कूर व त्याच्या आसपासचा जुगुळ कर्यातचा मुलूख म्हणजे मनोळी तालुका व चिकोडी तालुकासुद्धां त्यावेळीं पेशव्यांकडे असतांना, कोल्हापूर सरकारानें या पेशव्यांच्या

करवीर दरबारची ही खरमरीत ताकीद मिळतांच यमाजी रुद्रो व त्याचे बगलबच्चे भट ताळ्यावर आले व त्यांनीं या स्वामींच्या हयातींत कांहीं गडबड केली नाहीं.

सदरहू महत्वाची सनद चालू म्हणजे सन १९१९-२० च्या खटल्यांत हल्लींच्या श्रीस्वामीमहाराजांनीं हजर केली होती.

या सनदेनें या वेळीं इतकी उत्तम कामगिरी बजाविली आहे कीं, 'श्रीक्षेत्र यड्डूर येथील वरील श्रीवीरभद्र देवाच्या पुजेची वहिवाट पुरातन कालापासून भटांची असावी' असा ज्या जज्जसाहेबांची अंधुक कल्पना खटला पुढें येतांना झाली होती ती साफ निघून जाऊन 'श्रीवीरभद्र देव हा लिंगायतांचा देव असून त्या देवाची ( त्यांच्या लिंगाची ) प्रत्यक्ष पूजा करण्याचा हक्क पुरातन कालापासून लिंगायतांनाच आहे व भट हे आश्रित असून मध्यंतरीं आंत घुसले आहेत, अशी कोर्टाची पक्की खातरी झाली व तसें कोर्टानीं आपल्या ठरावांत स्वच्छ नमूद केलें आहे

---

हद्दींतील त्यांच्या सरदारांस कशी बेकायदेशीर ताकीद दिली ? तर याचें समाधानही थोडक्यांत आहे तें असें कीं, चिकोडी व मनोळी या प्रांतावर या काळीं निश्चित असा अंमल कोणाचाच नव्हता. यावेळचा इतिहास पाहाणाऱ्यांस असें आढळून येईल कीं, हे दोन तालुके पेशवे व कोल्हापूरकर यां उभयतांमध्यें १७२७ ते १८१८ पर्यंत १०० वर्षांत सुमारें ७-८ वेळां दिले-घेतले आहेत. मग अशा परिस्थितींत अमुक खालीं या तालुक्यांवर अमक्यांचीच सत्ता होती असें निश्चित करें सांगता येणार ? हे दोन्ही तालुके या अवधींत जवळ जवळ दोघांच्या समाईक हक्काचेच झाले होते. इ. स. १८१८ सालीं, पेशवाई ही आंग्लाईंत समाविष्ट झाल्यानंतर सुद्धां इ. स. १८२७ सालापर्यंत या दोन तालुक्यांचा पक्का कबजा इंग्रजसरकारकडे आला नव्हता. तेव्हां मग पेशवाईच्या वेळीं ( दोघे चुलत बंधूच सातारा व कोल्हापूर येथें राज्य करीत असल्यामुळें ) या सरहद्दीवरच्या तालुक्यांवर कोणाचा कायम ताबा होता, हें निश्चित कसें सांगतां येईल ? ज्यांचा जोर होईल ते त्या तालुक्याचा वसूल घेत. अशीच पद्धत होती; परंतु शाहू छत्रपतींच्या निधनानंतर कोल्हापूरकरांनींच हे तालुके बळकाविले. तथापि पेशवेसुद्धां प्रसंगोपात

( पहा—बेळगांव येथील आसि–जज्ज कोर्टाच्या अस्सल नंबर ४ व ५, १९१९ वरील तारीख ४।२।२० इ०च्या ठरावांतील प्यारा १० व ११). यावरून फक्त या एका सनदेनें भटांना बाजूला ढकलून लिंगायतांना आपल्या हक्काच्या जागेंत हक्कानें स्थापिलें आहे. म्हणून ही सनद, या मठाच्या सर्वच स्वामींनीं व श्रीवीरभद्रदेवाच्या सर्व भक्तांनीं इतकेंच नव्हे तर लिंगायत समाजानें सदैव सुवर्णपत्र्यावर लिहून संग्रहीं ठेवावी इतकी योग्यता या सनदेची आहे ! अर्थात् अशा प्रकारची श्रेष्ठ सनद अत्यंत खटपटीनें मिळविणारे श्रीमरिकाडदेवरु स्वामी, व यांच्याहूनही या स्वामींची दाद घेऊन त्यांचा हक्क त्यांना मिळवून देणाऱ्या श्रीमन्मातुश्री जिजाबाई महाराणीसाहेब ह्या खरोखर धन्य होत. यांचे उपकार श्रीवीरभद्रदेवाचे सर्व भक्त सदैव स्मरत राहातील यांत आश्चर्य काय ?

असे हे अत्यंत धोरणी व दीर्घोद्योगी, पूज्य श्रीमरिकाडदेवरु स्वामी महाराज इ. स. १७६०च्या सुमारास शिवैक्य पावले व त्यानंतर ' श्रीगदिगय्य काडदेवरु ' स्वामी पट्टाधिकारी झाले.

---

ते आपलेच तालुके असें समजत असत ही गोष्ट खोटी नाहीं. हे दोन तालुके इंग्रजापूर्वी कांहीं वर्षें [ सन १८०७ ते १८१२ ] निपाणकर प्रसिद्ध आप्पा साहेब देसाई यांनीं बळकाविले होते. असो.



श्रीविरूपाक्षलिंगाय नमः

# भाग तिसरा

—:०:—

## श्रीआद्यसिद्धलिंगेश्वरस्वामी



### श्रीमुप्पिनकाडदेवरुस्वामींची इच्छापूर्ति

श्रीगदिगय्या काडदेवरु स्वामींच्या कारकीर्दींत विशेष भानगडी झाल्या नाहींत. येथील वहिवाटदार प्रसिद्ध यमाजी रुद्रो हा मयत होऊन त्यांच्या मुलांमध्यें आपल्या वडिलाप्रमाणें नवीन उत्पन्न कमाविण्याचें सामर्थ्य नसल्यानें किंवा तशी परिस्थिति नसल्यानें ते स्वस्थ होते. श्रीगदिगय्या-स्वामी इ. स. १७७६ च्या सुमारास शिवाधीन होऊन त्यांच्या पश्चात् श्रीपोवाडकाडदेवरु मठाधिकारी झाले. यांच्या वेळीं श्रीमंत खंडेराव जाधव मोकासी कागल यांनीं श्रीस्वामींच्या नांवें ' वेक्केरी ' येथील जमीन इनाम करून दिली. याशिवाय विशेष कांहीं सांगण्यासारख्या गोष्टी घडल्या नाहींत. पुढें इ. स. १७९६ मध्यें श्रीपोवाडकाडदेवरुस्वामी लिंगैक्य पावले व प्रसिद्ध श्रीमुप्पिनकाडदेवरुस्वामी पट्टाधिकारी झाले. हे अत्यंत निष्ठावान् व चतुर होते. यांनीं आपलीं शिष्यधराणीं बरींच वाढ-व अनेक जमिनीही मिळविल्या. यांना श्रीमंत नरसिंगराव देशपांडे तेर-दाळकर यांजकडून इ. स. १७९६ ( शके १७१८ ) त ' सेगुणसी ' येथील जमिनीचें दानपत्र मिळालें. यांच्या कारकीर्दींत येथील लिंगायत व ब्राह्मण समाज अगदीं सलोख्यानें वागत व श्रीवीरभद्रदेवळांत ब्राह्मणांना पूजा करण्यास जाण्यास पूर्ण मुभा होती. या वेळचा वहिवाटदार यमाजी दिनकर याची श्रीस्वामींवर पूर्ण निष्ठा असून तो अनेक गोष्टींत श्रीस्वा-मींची सल्ला मसलत घेई व त्यांना मान देई. यावेळीं ' गुरसिद्धय्या '

नामक अत्यंत धोरणी व राजकारणी मनुष्य मठांत कारभारी होता व त्यासच शिष्य करून घेण्याची श्रीमुप्पीन काडदेवरुस्वामींची इच्छा होती; पण गुरसिद्धयाच्या मनांत पूर्वीच्या वहिवाटीप्रमाणें एकाद्या सच्छील बटूस श्रीक्षेत्र सिद्धगिरी येथें नेऊन तेथें विधियुक्त पट्ट करून आणून पट्टाधिकारी करावें व आपण कारभार पाहावा असें फार होतें. कारण यापूर्वी अनेक वर्षे श्रीसिद्धगिरीकर व यड्डूरकर स्वामींच्या दरम्यान बेबनाव होऊन यड्डूरचें स्वामी पट्टाभिषेकास्तव सिद्धगिरीस जात नव्हते; परंतु हें गुरसिद्धयास पसंत नसल्यानें इ. स. १८२६ च्या सुमारास जेव्हां श्रीमुप्पिन काडदेवरुस्वामी अत्यंत क्षीण झाले, तेव्हां ' अद्रशाप्पा ' नामक एका सुस्वभावी बटूस बरोबर घेऊन व यड्डूरचे वहिवाटदार यमाजी दिनकर व दुसरा पुढारी शिवरामभट लाटकर यांना बरोबर घेऊन तो कोल्हापुरास गेला. तेथें त्या उभयतांकडून ' श्रीअद्रशाप्पा यास श्रीक्षेत्र सिद्धगिरी येथील सूत्रपट्ट धरून पट्टाभिषेक करण्यास परवानगी मिळावी. ' असा हुजुरास विनंति करवून परवानगी मिळविली व थोडे संत्री बरोबर घेऊन त्यांसह हे सर्वजण श्रीसिद्धगिरीस गेले व तेथें जबरीनें श्रीअद्रशपोवाडकाडदेवरु यांना पट्टाभिषेक करून घेऊन यड्डूरास आले. (इ. स. १८२७). याच पट्टाभिषेकासंबंधानें या गुरसिद्धकाडदेवरु स्वामीच्या प्रयत्नानें या साली या भागांतील सर्व देसाई देशमुख व पाटील कुलकर्णी वगैरे सर्व अधिकारी व सर्व जंगम व पेठकऱ्यांनांही कोल्हापूर दरबाराकडून सहा सात ताकीदपत्रें (सनदा) सोडून ही गोष्ट सर्वत्र जाहीर केली. त्यांतील यड्डूरचे वहिवाटदार यमाजी दिनकर यास लागू झालेली सनद अशी आहे:—

श्री.

राजमान्य राजश्री यमाजी दिनकर यासी आज्ञा केली ऐसीजे—

मौजे यड्डूर कसबा जुगुळ प्रांत हुक्केरी येथील मुप्पिनकाडदेवरु मठाधिकारी हे मृत्यु पावले. सबब त्याचे शिष्य अद्रशपवाडकाडदेवरु यासी मठाधिकाराची आज्ञा व्हावी म्हणोन वां। राजश्री सिवरामभट लाटकर यांनीं हुजूर विदित केलें. त्याजवरून काडदेवरु याजवरी स्वामी कृपाळू

होऊन सिद्धगिरी पाठवून देऊन तेथील सूत्रपट्ट पेशजीचे दाखलेप्रमाणें करवून मौजे मजकूर येथील मठाचा अधिकार देववून अलाहिदा सनद सादर जाहाली आहे त्याप्रमाणें श्रीची पूजा ऊर्जा व गावगन्नांची कमते वगैरे आहार वेवहार त्याचें शर्तीत पूर्व मर्यादेप्रो चालवीत जाणे असें या पत्राची तालीक लिहून घेऊन असलपत्र भोगवटेस देणें जाणिजे सूरसन सबा अशरीन मया तेन व अलफ छ० १६ माहे मोहरम बहुत काय लिहिणे. सिक्का.

याचप्रमाणें खालीं दिलेल्या सहा सनदा मिळाल्या आहेत त्या:—

१ राजश्री अद्रशपवाड काडदेवरु, मठ यड्डर.

२ तहामोकदमानी मौजे यड्डर.

३ प्रांत हुकेरी व रायबाग यांतील सर्व तहामोकदमानी यांस—

४ प्रांत हुकेरी व रायबाग यांतील मठकरी जंगम व पेठकरी लिंगायत गांवगन्ना या सर्वांस.

५ राजश्री लखमगौंडा बसप्रभु देसाई नाडगौडा प्रांत हुकेरी यांस.

६ राजश्री खळोजी तमाजी देसाई नणदीकर यांस.

या सर्वांना वरील अर्थाच्याच सनदा लागू होऊन यड्डर येथील श्रीवीरभद्र देवाची पूजा करण्यास व वरील सनदेंतील हक्क उपभोगण्यास श्रीस्वामी पात्र असल्याचें सिद्ध झालें; व श्रीस्वामींच्या विरुद्ध बाजूचे स्वार्थी लोक स्वस्थ बसले. त्यामुळें श्रीस्वामींची पूजा व सर्व हक्क निर्बंध चालले.

इतक्यात 'श्रीमुष्मिनकाडदेवरु शिवैक्य पावले. तेव्हां श्रीअद्रश्यपोवाडदेवरुस्वामी हेच सर्वाधिकारी झाले; परंतु इतक्या सायासानें पट्टाभिषेक करून आणिलेले हे श्रीअद्रश्यपोवाडकाडदेवरुस्वामी फार दिवस वांचले नाहींत. मठाधिकारी झाल्यापासून एका वर्षाच्या आंतच ( इ. स. १८२७ त ) हे शिवाधीन झाले.

## [ २ ] श्रीआद्य-सिद्धलिंगेश्वर-स्वामी



श्रीगुरुसिद्ध काडदेवरु स्वामींनीं इ. स. १८२७ ते १८५१ पर्यंत सुमारें २४ वर्षें मठाचा कारभार उत्तम प्रकारें पाहून सर्व लोकांवर आपली छाप बसविली. इतकेंच नव्हे तर आपल्या पश्चात् मठाधिकारी करण्यांतही मुळींच भानगड राहूं नये ह्मणून आपल्याप्रमाणेंच किंबहुना आपल्यापेक्षां कांकणभर सरस अशा एका अत्यंत कुशाग्रबुद्धीच्या सुस्वभावी सुंदर व मानी बटूची निवड करून त्यास आपल्याजवळ मठांतच राहवून घेतलें. हेच हल्लींच्या श्री पट्टचरमूर्ति स्वामींचे आजे गुरु प्रख्यात–

### श्रीआद्यसिद्धलिंगेश्वरस्वामी

होत; परंतु या स्वावलंबी, चलाख बटूस पट्टाधिकारी केल्यास तो आपणास जुमानणार नाहीं व मठांत आपली डाळ शिजावयाची नाहीं हें उघड दिसत असल्यानें त्या वेळचे मठांतील कारभारी यांनीं आपल्याच घराण्यांतील ' गदिगय्या ' नामक एका निराळ्याच मुलाची निवड करून त्यासच शिष्य करून घ्यावें अशी श्रीगुरुसिद्ध काडदेवरु स्वामींना विनंति केली किंवा जवळ जवळ आग्रहच चालविला असें म्हणणें जास्त शोभेल. या वेळीं श्रीस्वामींना शिष्य करून घेण्याच्या बाबतींत कारभाऱ्याकडून इतका आग्रह होण्याचें दुसरेंही एक प्रबळ कारण होतें तें हें कीं,– त्यावेळीं यड्डूर येथें भवानराव नागनाथ या नांवाचा अत्यंत अभिमानी व महत्वाकांक्षी वहिवाटदार प्रमुख होता. तो फारच धाडसी व खर्चिक असल्यानें त्याचा शब्द झेलणारे शेंकडों पोटार्थी धाडसी लोक त्याच्या तैनातींत होते. त्यामुळें यड्डूरांतच काय पण आसपास १०–२० कोसांत भवानरावांचें प्रस्थ फारच माजलें होतें; आणि त्या कारणानें प्रत्येक बाबतींत भवानराव ' करील तें कारण व बांधील तें तोरण ' अशी स्थिति यड्डूर व आसपासच्या खेड्यांची झाली होती. त्यावेळीं नुकताच हा भाग ( मिरजप्रांत व हुकेरी परगणा ) इंग्रजी अमलाखालीं आला असून अद्याप येथें त्यांचा चांगला जम बसला

नव्हता. ठिकठिकाणीं जे पुंड लोक होते तेच आपल्या मनास येईल तसा पुंडावा करीत. अशा सर्व पुंडांचें शासन करून त्यांचें बंड मोडण्याची शक्ति, अद्याप इंग्रजी सत्तेंत नव्हती म्हणा, किंवा इंग्रजांना अनेक ठिकाणीं मोठमोठ्या लढायांत आपलें सैन्य गुंतविणें भाग असल्यानें सवड नव्हती म्हणा, कोणत्याही कारणानें कां होईना पण असा पुंडपणा प्रत्येक ठिकाणीं बोकाळला होता. ' बळी तो कान पिळी ' हीच त्या काळची नीति झाली असल्यानें दुर्बलांना हे दिवस अत्यंत कष्टदायक झाले होते. अनेक प्रसंगीं बलवानांच्या लहरीप्रमाणें निर्बलांना अनन्वित जाच सोसावा लागे; आणि त्या जुलमापासून सुटण्यास परमेश्वराची प्रार्थना करण्यावांचून त्यांना अन्य गति नसे. असो.

अशा मालिकेंतल्या या प्रसिद्ध भवानराव नागनाथाचें साह्य मठांतील कारभाऱ्यास असल्यामुळें, आणि भवानरावासही यड्डूर मठांतील स्वामी सर्वदा आपल्या मुठींत असावा असें वाटत असल्यानें ' श्रीसिद्धलिंगेश्वर स्वामीसारखा पाणीदार मनुष्य यड्डूरचा मठाधिकारी होणें त्यास प्रशस्त वाटत नव्हतें, म्हणून तोही श्रीगुरुसिद्धकाडदेवरुसारख्या वृद्ध स्वामींना विनंतिवजा सदरहू बटू नको असा आग्रह करीत होता; परंतु श्रीस्वामींना श्रीसिद्धलिंगेश्वराशिवाय दुसरा कोणीही शिष्य नको होता. कारण भवानराव किती महत्वाकांक्षी व पाताळयंत्री आहे हें श्रीस्वामी पक्कें जाणत होते. ते स्वतः जर आणखी १०-२० वर्षे जगणार असते तर तेच त्याला पुरून उरणार होते; पण त्यांचा वृद्धापकाळ त्यांना आड येत होता. यामुळें आपल्या पाठीमागें भवानरावासारख्या पुंडाच्या पुंडाईस बळी न पडतां बाणेदारपणानें आपला मठ व आपले सर्व हक्क शाबूत राखण्याची धमक असणारा तेजस्वी पुरुषच त्यांना शिष्य करून घ्यावयाचा होता; आणि या कामास सर्वतोपरि योग्य अशा श्रीसिद्धलिंगेश्वरासारख्या दिव्य पुरुषास आपलें शिष्यत्व देऊन श्रीस्वामींनीं आपल्या मनांतून तरी त्यास मठाधिकारी केलेंच होतें; परंतु प्रत्यक्ष ही गोष्ट कृतींत उतरविण्यास भवानरावाचा भयंकर अडथळा होता. यामुळें श्रीस्वामी ही गोष्ट कोणापुढें

बोलत नसत; पण आपल्या कृतनिश्चयापासून रतिभरही ढळावयाचें नाहीं असा त्यांचा निर्धार होता.

भवानराव हा जरी कर्दनकाळ होता तथापि तो अत्यंत भाविक, विश्वासु व किंचित् भोळाही होता ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. तत्कालीन सर्व वंद्य व विख्यात साधुपुरुषांवर त्याची श्रद्धा होती व त्यांचा अवमान आपल्याकडून केव्हांही होणार नाहीं अशी तो खबरदारी घेई व अशा साधुपुरुषांची कोणतीही आज्ञा तो शिरसामान्य करी. यड्डर मठांतील श्रीगुरुसिद्धकाडदेवरुसारख्या अत्यंत थोरणी व पूज्य स्वामीसंबंधानेंही त्याच्या मनांत योग्य आदर होताच, म्हणून 'तुह्मी अमूकच शिष्य करून घेतला पाहिजे दुसऱ्यास करतां कामा नये?' असें श्रीस्वामींना तो हट्टानें बजावीत नव्हता. वास्तविक तो त्यावेळीं यड्डूर गांवाचा सर्वाधिकारीच असल्यानें असें बजावणें त्याला अशक्य नव्हतें, किंवा त्याला अडथळा करण्यासही कोणी समर्थ नव्हता; परंतु त्याच्या भाविक वृत्तीमुळेंच त्याजकडून या बाबतींत असा जुलूम झाला नसावा. शिवाय दुसरेंही एक कारण होतें असें म्हणतात तें हेंच कीं, श्रीक्षेत्रनिडसोसी येथील श्रीदुरदुंडेश्वर मठाधिपति तत्कालीन महासाधु श्रीशिवलिंगमहास्वामी यांच्यावर भवानरावाची दृढ श्रद्धा होती व ही गोष्ट यड्डूरच्या श्रीगुरुसिद्ध काडदेवरु स्वामींना माहीत होती. म्हणून आपण मनांत योजिलेला शिष्य (श्रीआद्यसिद्धलिंगेश्वर) हाच मठाधिकारी होण्याच्या कामांतील भवानरावाचा अडथळा दूर करण्यास श्रीशिवलिंग महास्वामींचें आज्ञापत्रच अत्यंत उपयोगी पडेल हें जाणून श्रीस्वामींनीं तत्काळ एक विश्वासू स्वार निडसोसीस रवाना करून श्रीनिडसोसी स्वामींकडून आपल्यास पाहिजे तसें आज्ञापत्र आणवून तें भवानरावास देतांच त्याचा नाइलाज झाला व त्यानें अत्यंत नाखुषीनेंच श्रीगुरसिद्धकाडदेवरुस्वामींना 'तुम्ही आपल्या मनास येईल तो शिष्य करून घ्या. आमचा त्या बाबतींत कांहीं संबंध नाहीं.' असें सांगून पाठवून तो स्वस्थानीं स्वस्थ बसला. त्यामुळें कारभाऱ्याची दुरदुर बंद पडून श्रीस्वामींनीं आपल्या देखतच इ. स.

१८४९ सालीं ' श्रीसिद्धलिंगेश्वर ' यास विधिपूर्वक शिष्य करून घेतलें व त्यास सर्वदा आपल्याजवळ वागवूं लागले. हें पाहून कारभाऱ्याला अत्यंत वाईट वाटे; पण कांहीं इलाज नव्हता. पुढें दोन वर्षांनीं ( इ. स. १८५१ सालीं ) जेव्हां श्रीगुरुसिद्धकाडदेवरुस्वामी अत्यंत क्षीण होऊन समाधिस्थ झाले तेव्हां त्यांच्या पश्चात् श्रीसिद्धलिंगेश्वरस्वामी मठाधिकारी झाले; परंतु हे अद्याप मठाच्या गादीवर आरोहण करण्याच्या अगोदरच एका जंगमास पुढें करून कारभाऱ्यानें इंग्रजी न्यायकोर्टात [ चिकोडी तालुक्यांतील सबजज्ज कोर्टांत ] मठाच्या गादीवर श्रीसिद्ध-लिंगेश्वराचा हक्क नसून वारसाहक्क आपला आहे ' असा त्याजकडून दावा करवून मठाचें व श्रीवीरभद्रदेवालयांतील सर्वच उत्पन्न सरकाराकडून जप्त करविलें! हा वारसाचौकशीचा प्रथमारंभीचा, श्रीसिद्धलिंगेश्वरस्वामींना इंग्रजी न्यायपद्धतीचा ओ--ना--मा-- शिकविणारा प्रसिद्ध खटला पांच सहा वर्षें चालून अखेर त्यांतून इ. स. १८६० सालीं श्रीस्वामी हे तावून सुलाखून हक्कदार ठरले व दरम्यानचें [ जप्तींतील ६ वर्षांचें ] सर्व उत्पन्न यांना मिळून हे मठाच्या गादीचे कायम वारस झाले !

या वारसाचौकशीच्या खटल्यापूर्वींच श्रीगुरुसिद्धकाडदेवरु मृत्यु पावतांच भवानरावानें नवीन श्रीसिद्धलिंगेश्वर स्वामींचें मूळच उपटून टाकण्याची एक नवीनच अजब युक्ति केली. ती पाहिल्यास हे वहिवाटदा-राचे बचे स्वतःचें नाक कापून घेऊन दुसऱ्यास अपशकून करण्यांत किती तत्पर होते हें वाचकांस स्पष्ट कळून येईल —

श्रीसिद्धगिरी मठाधिकारी व यड्डूरमठाधिकारी यांजमध्यें त्यावेळीं अत्यंत वैमनस्य असून ते एकमेकांची नुकसानी करण्यास सर्वदा टपलेले असत. या त्यांच्या दुहीचा फायदा घेऊन भवानरावानें असा डाव टाकिला कीं, ' यड्डूर येथील मठावर सिद्धगिरीकरांचा हक्क असून त्यांनीं आपला मठ आपल्या ताब्यांत घ्यावा व येथील अनधिकारी बटूस हांकून द्यावें,' असें तत्कालीन सिद्धगिरीकर स्वामी श्रीमुप्पिनकाडदेवरु यांस कळविलें. इतकेंच नव्हे तर तोंडी निरोपानें हें काम होणार नाहीं असें

जाणून ' यड्डूर येथें मठांत व श्रीवीरभद्रदेवालयांत तुमचा अमुक अमुक हक्क आहे तो तुह्मी घेऊन येथील सर्व व्यवस्था पूर्ववत् चालवावी ' अशी एक

## सहा कलमांची यादी

तारीख २१ सप्टेंबर सन १८५३ इ. सालीं लिहून, तिजवर, आपली व आनला भाऊ रुद्रो नागनाथ याचीही सही करून घेऊन दोघां प्रसिद्ध इनामदारांच्या तीवर साक्षी घालून ती प्रसिद्ध यादी सिद्धगिरीस श्रीमुप्पिनकाडदेवरु स्वामीकडे पाठविली. आपलें हें कोलीत दोन्ही मठांत आगीचा भडका उडवून देईल, व आपणास नामानिराळे राहून ती मौज पाहाण्यास मिळेल, असे किती तरी मनांतले मांडे मिटक्या मारीत खाण्यांत हा स्वार्थी भवानराव गर्क झाला असावा. पण बिचाऱ्याला काय माहीत कीं, भविष्यकालांत हेंच कोलीत आपलें स्वतःचें व स्वज्ञातीय भटांच्या घराण्यांचें भस्म करण्यास भक्कम पुरावा होईल ? परवांच्या प्रख्यात खटल्यांतच पहिल्यानें ही निशाण नं०४३ ची यादी ह्मणून प्रसिद्धीस आली व तिनें श्रीस्वामीतर्फे ( लिंगायतांतर्फे ) इतकी उत्तम कामगिरी बजाविली कीं, ' प्रत्यक्ष श्रीवीरभद्रलिंगापुढें ( गर्भदेवालयाच्या आंत ) ठेविलेल्या किंवा लिंगास अर्पण केलेल्या यच्चावत् वस्तूंवर श्रीचरमूर्ति स्वामींचा हक्क आहे. ' हें या यादीनें सिद्ध केलें, आणि त्यामुळें श्रीवीरभद्रदेवालयांत लिंगापुढें अगर कोठेंही ठेविलेल्या कोणत्याही वस्तूंवर येथील भटांचा अगर भवानरावाच्या वंशजांचा मुळींच हक्क नाहीं. असें ठरवून त्यांना गचांडी देऊन देवळाबाहेर हांकून देण्यास हीच यादी कारण झाली आहे ! ' मानवी इच्छा विरुद्ध दैवी लीला ! ' ही गोष्ट येथें स्पष्ट दिसून येत असून, क्षुद्र मानवी मनाची शक्ति किती संकुचित व दैवाची विचित्र लीला किती अगाध व अतर्क्य आहे हें समजून येतें. यावरून

---

१ ही यादी बरीच लांब असल्यानें विस्तारभयास्तव समग्र न देतां फक्त तींतील मुद्दा तेवढाच येथें दाखविला आहे. जिज्ञासू वाचकांना ही यादी किंवा तिची नक्कल केव्हांही यड्डूर मठांत अगर आमचेकडे पहावयास मिळेल.

आपली नीच वृत्ति आपणासच प्रसंगीं किती घातक होते हें जाणून केंव्हांही नीच मनोवृत्तींना मनांत थारा देऊं नये, हें प्रत्येकानें लक्षांत ठेवावें. असो.

बरें, या दुष्ट बुद्धीनें प्रेरित होऊन लिहिल्या गेलेल्या भवानरावाच्या यादीनें त्यावेळीं तरी त्याच्या दुष्ट हेतूप्रमाणें दोवां मठाधिकाऱ्यांमध्यें भांडणाचा भडका उडवून दिला म्हणावें तर तसेंही घडून आलें नाहीं. फक्त वरील वारसाचौकशीच्या खटल्याच्या वेळींच उद्भवलेल्या एका फौजदारी खटल्यांत श्रीसिद्धगिरीच्या स्वामींनीं आपण मठाचे मालक आहोंत असें दाखविण्याकरितां ही यादी हजर केली; पण यड्डूर मठांतील श्रीसिद्धलिंगेश्वराचे तत्कालीन वटमुखत्यार 'अद्रशापा' यानें या यादी-विषयीं डिस्ट्रिक्ट म्याजिस्ट्रेटपुढें असा जबाब दिला कीं, 'आम्ही व सदरहू बहिवाटदारामध्यें अदावत असल्यानें आमची नुकसानी करण्याच्या दुष्ट हेतूनें ही यादी सिद्धगिरीकर स्वामींना लिहून दिली आहे त्यामुळें आम्ही-च यड्डूरच्या मठाचे सर्वाधिकारी आहों. सिद्धगिरीकरांचा येथें कांहीं संबंध नाहीं' असें सांगून ती यादी त्या प्रकरणापुरती निर्माल्यवत् केली.

अलीकडच्या खटल्यांतही ही यादी हल्लींच्या श्रीस्वामींनीं कोर्टांत हजर करितांच आपल्या सर्वच मुद्यांवर या यादीनें पाणी पडणार असें पाहातांच वादी भटांनीं ही यादी 'बनावट' आहे अशी हूल उठविली व कोर्ट-मार्फत ती जप्त करवून सीलबंद करून ठेविली आणि 'हा बनावट कागद हजर केल्याबद्दल श्रीचरमूर्तिस्वामीवर निराळा खटला करून त्यांची फजिती उडवितों पहा!' असें हे वादी भट वडबडूं लागले; परंतु मागील एका खटल्यांत सदरहू यादी हजर झाली असून तद्बद्दल सवाल जबाब झाले आहेत; व त्या जबाबाच्या सर्टिफिकेट कॉप्या अपील कोर्टांत श्रीचरणमूर्तिस्वामींनीं हजर केलेल्या आहेत असें पाहातांच सर्व भटांचीं तोंडें फोटो घेण्यासारखीं विचित्र झालीं! आसुरी आनंदाचें पर्यवसान अधःपाताशिवाय दुसरें काय असणार? याचा अनुभव सदरी खटल्यांत ब्राह्मणांना पदोपदीं आला आहे. असो.

# [३] सन १८६८–७० सालचा प्रसिद्ध खटला

श्रीसिद्धलिंगेश्वर स्वामींचा नायनाट करण्याकरितां भरलेले वरील दोन्ही खटल्याचे वार वायां जाऊन उलट श्रीस्वामींचा उत्कर्ष अधिकाधिकच होत चालला हें पाहातांच भवानरावाच्या अंगाचा भडका होऊन गेला आणि आतां अशाप्रकारें दुसऱ्यांच्या ओंजळीनें पाणी पिऊन आपली दुष्ट तहान भागत नाहीं असें जेव्हां त्याला स्पष्ट समजलें तेव्हां स्वतःच श्रीस्वामींना नष्ट करण्यास कंबर कसल्यावांचून भागत नाहीं, असें जाणून तो त्या उद्योगास लागला. सुदैव श्रीकाडदेवरु मठाचें व वीरशैव समाजाचें कीं, हा वेळपावेतों अनेक टक्केटोणपे खाऊन श्रीसिद्धलिंगेश्वर स्वामीही पक्के वस्ताद बनले होते. व त्यांनींही आपल्या कर्तबगारीनें अनेक पुंडांचा व राजकारणी मुत्सद्यांचाही लोभ संपादन केला होता, व प्रसंग पडल्यास कोणाही मगरूराची मस्ती जिरविण्याची शक्ति त्यांच्या अंगीं पूर्ण आली होती.

वारसाचौकशीचा खटला निकालांत निघून सर्व उत्पन्न श्रीसिद्धलिंगेश्वर काडदेवरु यांस मिळालें व श्रीवीरभद्रदेवालयांत त्यांचा पूर्ण अंमल चालू झाला. हें पाहून भवानराव आंतून जळफळत होता; परंतु कोणत्या कारणानें श्रीस्वामींशीं कुरापत काढावी याविषयीं तो शोध काढीत होता. इतक्यांत इ. स. १८६८ च्या प्रारंभीं भवानरावाच्या चौघा मुलांनीं देवळांत कांहीं दंगा केला. त्यामुळें श्रीस्वामीमहाराजांनीं त्या लोकांवर फिर्यादी करून दाद मागितल्यावरून त्या वेळच्या चिकोडी तालुक्याच्या मामलेदार साहेबांनीं त्यांजकडून जामीनमुचलका घेऊन सोडून दिलें. हें श्रीसिद्धलिंगेश्वरस्वामींचें धाडसी कृत्य पाहतांच इ. स. १८६८च्या मार्च महिन्यांत एके दिवशीं भवानरावानें आपल्या पुंड साथीदारांना देवालयांत घुसून सर्व जंगमांना तेथून हांकून देऊन सर्व देवालय (श्रीउत्सवमूर्तीसह) कबजांत घेऊन आपल्या आश्रयास असलेल्या ब्राह्मणांच्या स्वाधीन करण्याची आज्ञा केली ! तों लागलेंच वहिवाटदारातर्फेचे शेंकडों पुंड धांवतच श्रीवीरभद्र

देवालयांत आले व त्यांनीं गर्भदेवालयांत पूजा करीत बसलेल्या जंगम पुजाऱ्यास व बाहेर आमिष ( नैवेद्य वगैरे देवास अर्पण करण्यास आणिलेल्या जिनसा ) घेण्यास बसलेल्या जंगमास मार देऊन तेथून बाहेर घालवून दिलें. नंतर श्रीउत्सवमूर्तीच्या देवालयांतीलही सर्व जंगमांस व सेवकांस हुसकून लावून ती मूर्तिसुद्धां आपल्याच कबजांत घेऊन पूजा व पालखीउत्सव हीं दोन्हीं भटांच्याच ताब्यांत दिली ! तेव्हां श्रीस्वामीतर्फेचे जंगम पुजारी व सेवक रडत मठांत श्रीस्वामीकडे गेले व त्यांनीं सर्व हकिकत त्यांना कळविली. गांवांत ही बातमी कळतांच सर्व लिंगायतांत हाःहाकार होऊन गेला व दोन्ही यड्डूरांतील सर्व लिंगायत लोक व देवाचे सर्व सेवक तत्काळ मठांत जमा झाले. श्रीस्वामीकडील शेंकडों पुंडलोकही मठांत येऊन थडकले व " आम्हांस आज्ञा करा म्हणजे त्या भवानरावाचा फडशा पाडितों, सर्वांची कत्तल उडवून हां हां म्हणतां भटांना बाहेर ढकलून श्रीवीरभद्र-देवालय आम्ही आमच्या कबजांत घेतों; फक्त आपली आज्ञा पाहिजे. " आपल्या शब्दाखातर प्राणार्पण करण्यास तयार झालेल्या त्या शेंकडों लोकांकडे पाहून श्रीस्वामींना संतोष वाटला व त्यांचा क्रोध कमी होऊन ते विचारांत मग्न झाले. क्षणार्धांत मनानेंच एक निश्चय ठरविला व शांतपणानेंच त्या सर्व जमावास त्यांनीं म्हटलें, " शूर शिष्य हो, नुकताच देवळांत भवानरावाच्या लोकांनीं जो प्रकार केला व आमच्या सेवकांस त्रास दिला तो पाहून तुम्हां सर्वांप्रमाणेंच आम्हांसही अत्यंत राग आला आहे; परंतु आतांच रागाच्या भरांत कांहीं करण्यास गेलों कीं, निष्कारण भयंकर भांडण होऊन त्यांत पुष्कळांना प्रसंगीं प्राणांसही मुकावें लागेल. कारण बऱ्याच दिवसांपासून पक्की पूर्वतयारी करूनच त्यांनीं हें भांडण मुद्दाम उकरून काढिलें आहे; तेव्हां त्यांनीं तशी लोकांचीही जोडणी केलीच असली पाहिजे; म्हणून बाहेरून दिसणाऱ्या त्यांच्या थोड्या लोकांकडे पाहून तुम्ही भांडणास जाऊं नका ! अशानें व्यर्थ प्राणहानि होऊन देऊळ कबजांत येण्याचें बाजूसच राहून उलट तुम्ही पुढारी पडून गेल्यास बाकीच्यांना या गांवांत रहाण्याचीसुद्धां सोय रहाणार नाहीं !

कारितां असा कांहीं अविचार न करतां तुम्ही सर्वजण आपापल्या घरीं चला. श्रीवीरभद्रदेवाच्या मनांत जसें असेल तसें होईल. तो आपल्या भक्तांची इच्छा पूर्ण करण्यास समर्थ आहे.' अशी लोकांची समजूत करून ते स्नानास उठले, तेव्हां सर्वांचा अत्यंत हिरमोड झाला. कित्येकांना श्रीस्वामींचाच राग आला व अनेक प्रसंगीं आम्हांस वीरोचित सल्ला देणारे श्रीस्वामीमहाराज आतां स्वतःच कसे मिळमिळीत बनले ? हे ब्राह्मणांस इतके कां भितात ? असें आपापसांत कुजबुजूं लागले; परंतु श्रीस्वामींनीं सांगितलेली वरील वस्तुस्थितिही अगदीं बरोबर असल्याची खात्री त्यांतील शहाण्या लोकांना लागलीच पटून ते सर्व आपापल्या घरीं निघून गेले. त्याच दिवशीं संध्याकाळीं पुढील तजवीज करण्याकरितां श्रीस्वामी चिकोडीस निघून गेले. व आपल्या हितचिंतकांच्या सल्ल्यानें त्याच दिवशीं तेथील कोर्टांत "श्रीवीरभद्र देवालयांतील पूजा करण्याचा व उत्पन्न घेण्याचा हक्क आपला असून त्यास भवानराव हा हरकत करितो; तरी त्याला कायम ताकीद होऊन आमचें उत्पन्न आम्हास घेण्याचा व पूजा करण्याचा हक्क अबाधित रहावा" असा दावा केला.

कर्मधर्मसंयोगानें चिकोडी कोर्टांत त्यावेळीं 'वीरभद्रय्यास्वामी' नांवाचे लिंगायत मुनसफ असून ते श्रीसिद्धलिंगेश्वरस्वामीचे दूरचे आप्तच होते. त्यांनीं यड्डूरास तंटाभांडण न करितां राजरोस न्यायकोर्टांत दावा करून दाद मागण्याचा शहाणपणा केल्याबद्दल श्रीस्वामींच्या सहनशीलतेची तारीफ केली व हें अत्यंत योग्य झालें असेंही बोलून दाखविलें; परंतु लिंगायतापुढें, त्यांतही वादीच्या आप्तापुढेंच आपला खटला चालणें आपल्या नुकसानीस कारण आहे, असें जाणून भवानरावानें हा खटला ट्रान्स्फर होऊन दुसऱ्या कोर्टांत चालावा असा सरकारांत अर्ज केला. प्रतिवादीचें हें म्हणणें रास्त असल्यानें 'सदरहू खटला कलादगी ( जि० धारवाड ) येथील सबजज्ज कोर्टांत चालावा.' असा सरकारांतून हुकूम होऊन तो तिकडे गेला. तेथें दयाराम मयाराम नांवाचे रजपूत मुनसफ होते. त्यांनीं दोन्ही पक्षांचे कबूलीजबाब घेऊन मग खटला पुढें चालविला व

अखेर वर्षभर चौकशी करून वादीतर्फे निकाल दिला. या खटल्यांत श्रीस्वामींना ज्या अनेक थोर व्यक्तींनीं साह्य केलें. त्यांत श्रीमंत सांगलीकरांचे दक्षिणभागचे प्रख्यात कारभारी कोन्हेरराव ऊर्फ बापूसाहेब अण्णाजी देशपांडे जहागिरदार हे प्रमुख होत. हे त्यावेळीं दक्षिण महाराष्ट्राचेच पुढारी होते, असें म्हणण्यास हरकत नाहीं. बेळगांव जिल्ह्याचे मोठमोठे युरोपियन अंमलदारही राजकारणांत कित्येकवेळां यांची सल्ला घेत, असें सांगतात. अशा प्रसिद्ध पुरुषाचा वशिला काढणाऱ्या श्रीस्वामीमहाराजांच्या बुद्धीची तारीफ करावी तितकी थोडीच आहे. विशेष हें कीं, आपल्या कर्तबगारीची छाप त्या प्रख्यात पुरुषावर पाडून, आपल्या म्हणण्याची सत्यता पटवून दिली. इतकेंच नव्हे, तर आपल्यातर्फे साक्ष देण्यासही त्यांना भाग पाडिलें! हा श्रीस्वामींच्या बुद्धीचा प्रभाव म्हणावा कीं श्रीवीरभद्रदेवाची लीला म्हणावी हें वाचकांनींच ओळखावें. हे श्रेष्ठ दर्जाचे जहागिरदार कोर्टांत येऊन साक्ष देणें शक्य नसल्यानें कोर्टमार्फत कमिशन नेमिलें जाऊन त्या कमिशननें त्यांच्या मुक्कामाच्या गांवीं ( गुजनाळ ता. बेळगांव ) येथें जाऊन त्यांची साक्ष घेतली ( ता. ७।९। १८६८ ). अर्थात् अशा महत्त्वाच्या राजकारणी :मनुष्याची साक्ष ज्या बाजूनें झाली, त्याचवेळीं या खटल्याचा निकाल सर्वांनीं आपल्या मनानें ठरविला व त्याप्रमाणें लवकरच श्रीस्वांमीतर्फे तो निकालांत निघाला. पुढें बेळगांव डिस्ट्रिक्ट जज्ज कोर्टाकडे भवानरावानें अपील गुदरिलें. तेथें व पुढें मुंबई हायकोर्टांतसुद्धां हा ठराव न फिरतां तीन्ही कोर्टांत श्रीस्वामीप्रमाणेंच निकाल झाला तेव्हां श्रीवीरभद्रदेवालयांतील सर्व उत्पन्न व श्रीउत्सवमूर्ति आणि श्रीवीरभद्रदेवही श्रीस्वामींच्या ताब्यांत येऊन सर्वत्र त्यांचा बोलबाला झाला. सतत तीन वर्षं ( सन १८६८ ते १८७० अखेर ) पर्यंत हा खटला मोठ्या ईर्षेनें चालू होता. त्यावेळीं मुंबईपर्यंत पूर्णपणें रेल्वे झाली नसून कित्येक मैल बैलगाड्यांतून जावें लागत होतें. श्रीस्वामीमहाराज तर भिक्षाधीशच असल्यानें कोणाही श्रीमंत शिष्यावरसुद्धां त्यांची छाप लागलीच पडून ते त्यांची व त्यांच्या सर्व

लोकांची सोय स्वखर्चानें अत्यानंदानें करीत. त्यामुळें श्रीस्वामीतर्फेच्या साक्षीदारांना व खटपटदारांना गाड्या, घोडीं इत्यादि वाहनांची व जेवण, फराळ यांची रेलचेल असे; पण भवानरावाची स्थिति मात्र याच्या उलट असे. तो स्वतः यड्डूर गांवची शींव ओलांडून कधीं बाहेर पडत नसे.[1] त्यामुळें कारभारी व इतर नोकरचाकरांमार्फतच त्याला सर्व व्यवस्था करावी लागे. त्याच्या मुलांतही कोणी तसा फर्डा नव्हता असें दिसतें. त्या कारणानें श्रीस्वामींच्या मानानें चौपट खर्च होऊन एकपट व्यवस्था होण्याची मारामार पडे. म्हणून पहिल्या कोर्टांत खटला विरुद्ध होतांच त्याची जी हिंमत खचली ती कायमचीच. अनिर्वाहपक्षीं व स्वतःचा वडेजाव राखण्यास्तव त्यास अपिलें करावीं लागलीं व त्यांत तर त्यास भयंकर खर्च येऊन तो कर्जबाजारी झाला! त्याचे सर्व साथीदार त्यास सोडून गेले व कोणी एक पैची मदत करण्यास पुढें येईना. शेवटीं कोर्टखर्चाकरितां श्रीस्वामींनीं जेव्हां त्याजवर दरखास्त बजाविली, तेव्हां त्याच्या वाड्यांत पैसा मुळींच शिल्लक नसल्यानें वाड्यांतील पाणी आणण्याची माकण अडवून त्यांतील घागरी लिलांव करून त्यांवरून आपल्या ५५५ रुपयांची भरती करून घ्यावी लागली! यांपैकीं २ घागरी श्रीस्वामींनीं इर्षेकरितां १०२ रुपयांस सवालांत घेऊन त्या यशस्वी घागरी म्हणून त्यांवर तसा मजकूर लिहून मठांत आणून ठेविल्या! त्या विजयीध्वजारूप घागरी हल्लीं मठांत मोठ्या प्रेमानें जपून ठेविल्या असून कौतुकानें दाखविल्या जातात!

---

## (४) या खटल्यांतील कांहीं गंमती

पहिली गंमत ही कीं, पहिल्यानें श्रीशाहूमहाराजांच्या वेळीं वहिवाटदारांचा पूर्वज जो यमाजी रुद्रो तो ज्या श्रीवीरभद्रदेवालयांत जाण्यास धजत नव्हता, तोच नानासाहेब पेशव्याच्या नीचपणानें गर्भदेवळांत जाण्या-

---

१ त्याचें असें कांणतें एक व्रत असल्यानें तो त्या व्रतपालनास्तव सीमोल्लंघन करीत नसे असें सांगतात.

इतका धीट बनला आणि त्याचा नातू जो भवानराव तो तर मूळ मालकालाच गचांडी देऊन आपणच कांहीं काळ सर्वाधिकारी बनला! पण इंग्रज सरकारच्या कायद्याचा दंडुका पाठीवर आदळतांच [मागें श्रीमन्मातुश्री आईसाहेबांच्या जरबेच्या ताकिदीनें ( सन १७५६ सालच्या सनदेनें ) जसा याचा आजा पूर्ण शुद्धीवर आला तसा हा ] चांगला शुद्धीवर आला, आणि पुढें मरेपर्यंत तो श्रीस्वामींच्या वाटेस गेला नाहीं.

याहूनही दुसरी विशेष गंमत त्यावेळच्या येथील भटांची आहे. ती अशी— यसाजी रुद्रोच्या वरील वंशजानें ( भवानरावानें ) आपल्या आजावर ताण करण्याकरितां म्हणजे नुसतें श्रीवीरभद्रदेवालयांत पूजेकरितां जाणेंच नव्हे, तर त्या देवाचें सर्वच उत्पन्न स्वाहा करण्याकरितां ज्याप्रमाणें आतां खटला सुरू केला, त्याचप्रमाणें पूर्वी पेशव्यांच्या कारवाईनें येथील ज्या भटांना गर्भदेवळांत जाऊन प्रत्यक्ष श्रीवीरभद्रलिंगाची पूजा करण्यास वाव मिळाला त्या वेळच्या त्या कार्यसाधू भटांच्या तिन्ही घराण्यांतील आतांच्या ( सन १८६८ सालांतील ) वंशजांना तर श्रीवीरभद्र देवाची पूजा व उत्पन्न हीं आपल्याच पूर्ण मालकीचीं आहेत असें वाटूं लागलें! ' भटाला दिली ओसरी, भट हात पाय पसरी ' म्हणतात तें खोटें नाहीं. या वेळच्या भटांना असें वाटून ते स्वस्थ बसले नाहींत; तर यावेळीं सणभट्ट बिन्न सखारामभट जोशी व धोंडभट्ट बिन्न शंभूभट्ट जोशी या दोघांनीं कोर्टांत असा अर्ज दिला कीं, " श्रीवीरभद्रदेवाची पूजा आमची, व हें उत्पन्नही आमच्या पूर्ण मालकीचें आहे. असें असतांना हे दोघे वादी फुकटच आपापसांत भांडतात, व आमची नुकसानी करूं पाहतात; तरी आह्मांस पक्षकार करून घ्यावें व वादी प्रतिवादींचा हक्क रद्द करावा! ' याच वेळीं तिसऱ्या एका 'महादेव' नांवाच्या भटानें कोर्टास दुसरा एक अर्ज केला आहे; त्यांत तो म्हणतो. ' पूजा आपल्या घराण्याच्या मालकीची आहे, व अभिषेक, वुत्तिपूजा, पंचामृतदक्षिणा इत्यादि चार पांच बाबी आपल्या असून बाकी सर्व उत्पन्न श्रीचरंतीस्वामींचें

आहे ! असें असून माझें नुकसान करण्याकरितां वादी प्रतिवादी भांडतात याप्रमाणें तिघे स्वार्थपरायण भट जेव्हां आपापसांत भांडूं लागले; तेव्हां मुनसफ साहेब दयाराम मयाराम यांनीं त्या दोन्हीं साधणुकीच्या अर्जांना ( ता. ११-९-१८६८ इ. रोजीं ) उत्तर दिलें कीं, ' वादीनें पुजेच्या वहिवाटीकरितां दावा केला नाहीं. ( अर्थात् वहिवाट त्याची आहेच.) आपणास मिळणारें पुजेचें उत्पन्न देवविण्याबद्दल व पुजेवर आपला [ पूर्वापार ] हक्क स्थापन करण्याकरितां दावा केला असून यांत तुमची नुकसानी होईलसें दिसत नाहीं; म्हणून पक्षकारांत तुम्हांस सामील करण्यास आमची कबुली नाहीं. ' असें उत्तर मिळतांच हे तिघे भटजी स्वस्थ बसले. त्याच तिघां स्वार्थी भटांचे अर्ज पुराव्यास ठेवून हल्लींचे त्यांचे शहाणे वंशज भट, आम्ही पुजेचे मालक म्हणून सांगतात ! आणि गप्प बसते तर गोष्ट निराळी. पण याच फुसक्या मालकी हक्काच्या सुतानें प्रिव्ही कौन्सिलरूपी कायद्यांचा स्वर्ग जिंकूं पाहातात ! धन्य या भटांच्या भक्कम अकलेची ! यावरून या भटांची पूर्व तयारी कशी असते व हे थोडासा टेकू सांपडतांच कसे सुतानें स्वर्ग चढूं पाहतात आणि दुसऱ्यांचा हक्क बुडविण्यास सावधगिरीनें किती टपून बसलेले असतात हें दिसून येईल.

वरील विवेचनावरून मूळ वहिवाटदार, या वेळचे तिघे अर्जदार भट, व हल्लीं दावा करून दाद मागत असलेले हे त्याच तिघां भटांचे वंशज, व या प्रत्येकास साह्य करण्यास सर्वदा सिद्ध असलेले सर्व काळचे यड्डूरचे वहिवाटदार हे सर्व किती खरेपणानें भांडणारे आहेत व यांची बाजू किती सत्य व न्याय आहे आणि ज्या श्रीवीरभद्रलिंगाकरितां हे सर्वजण पूर्वकाळापासून ' शेंडीं तुटो कीं पारंबी तुटो ' अशा निकरानें भांडत होते त्या देवाजवळ यांचा किती हक्क आहे याचा वाचकांनींच आपला अमूल्य वेळ खर्चून पाहिजे असल्यास नीट उलगडा करून घ्यावा; आणि अशा लोकांच्या हातचलाखीपासून सर्वांनीं दूर राहावें, व अज्ञ जनांसही दूर राहाण्यास सुचवावें.

---

# (५) श्रीस्वामींची अवतारसमाप्ति.

अशा प्रकारचे हे अत्यंत प्रतिभावान् श्रीसिद्धलिंगेश्वर काडदेवरु स्वामी इ० स० १८९० सालापर्यंत सुमारें ४० वर्षे आपल्या गादीचा उपभोग घेऊन, यडूरच्या मठाचे सर्व शत्रु धुळीस मिळवून समाधिस्थ झाले.

त्यांचा स्वभाव अत्यंत दिलदार, मायाळू पण करारी असा होता. त्यांची राहाणी डामडौलाची असून त्या राजयोगी डामडौलास शोभण्यासारखें त्यांचें शरीरसौंदर्यही पण अप्रतिम होतें. त्यांचा बांधा उंच व सडपातळ असून वर्ण गोरा, सरळ नाक व पाणीदार डोळे, यामुळें त्यांजकडे पाहतांच मनांत आदर उत्पन्न होई. त्यांची शरीरयष्टि मोहक व नाजूक दिसे; परंतु ते अत्यंत काटक होते. त्यांची बहुतेक कारकीर्द खटल्यांतच निघून गेली असून देवालयाच्या महत्त्वाच्या खटल्याच्या वेळीं तर तीन चार वर्षेपर्यंत त्यांना एक दिवससुद्धां मठांत सुखानें स्वस्थ राहण्यास सवड नव्हती! त्यांना पाहिलेले अनेक लोक सध्यां हयात आहेत, त्यांजकडून या प्रतापी श्रीस्वामींसंबंधानें अनेक गोष्टी ऐकण्यांत येतात, त्यांपैकीं त्यांच्या दिलदार व मायाळूपणाविषयीं फक्त एकच गोष्ट सांगून यांची कारकीर्द संपवूं.

येथील तत्कालीन वहिवाटदार प्रसिद्ध भवानराव व हे श्रीस्वामी यांचें आजन्म हाडवैर होतें, व एकमेकांचा पाडाव करण्यास ते दोघेही सदैव तत्पर होते, हें मागील हकीकतीवरून वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. असें असतांही भवानराव हा श्रीस्वामींपेक्षां वयानें बराच वडील असल्यानें श्रीस्वामी त्यास नेहमीं ' काका ' असें संबोधीत व कोठेंहि भेट झाल्यास ते एकमेकांची थट्टामस्करी करीत! अथवा केव्हां केव्हां तासानुतास त्यांच्या गुजगोष्टी चालत! हें वाचून वाचक बुचकळ्यांत पडतील अगर हें त्यांना खरेंसुद्धां वाटणार नाहीं; पण वस्तुस्थिति अगदीं तशी होती हें त्रिवार सत्य आहे. शिवाय इ० स० १८७० सालीं जेव्हां श्रीवीरभद्र-

देवाच्या प्रसिद्ध खटल्यांत भवानराव हरला, व त्याची संपत्ति खलास होऊन तो कर्जबाजारी झाला आणि शेवटीं त्याच्या नातेवाईक जहागिरदारांनीं हजारों रुपये कर्जाचे हुकुमनामे मिळवून त्याविषयीं दरखास्त बजाविली व त्या कर्जापायीं भवानरावाचें यड्डूर येथील इनामी उत्पन्न लिलावांत निघून त्याच्या अन्नावर पोसलेल्या कित्येक भटांनींच तें लिलावांत घेऊन त्यास सफाई बुडविलें, तेव्हां अशा दैन्यावस्थेंत श्रीसिद्धलिंगेश्वर स्वामींनींच त्यास आश्रय दिला. व त्यांत अखेरपर्यंत अंतर पडूं दिलें नाहीं! असें वृद्ध लोक सांगतात. यांत कितपत तथ्य आहे तें एक श्रीवीरभद्रच जाणे, परंतु ही गोष्ट सत्य असेल तर, खरोखरच श्रीस्वामींच्या प्रेमळ व उदार स्वभावाची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे. असो.

अशा प्रकारचे हे ऐश्वर्यवान् सर्वगुणसंपन्न श्रीस्वामी स. १८९० सालीं शिवैक्य पावले व त्यांच्या पश्चात् श्रीगुरुसिद्धकाडदेवरु पट्टाधिकारी झाले.

---

## (६) श्रीगुरुसिद्धकाडदेवरुस्वामींचा उदयास्त

सदरहू श्रीस्वामीमहाराज इ० स० १८९० सालीं पट्टाधिकारी झाले. यांच्या कारकीर्दीत वहिवाटदारांच्या घराण्याची स्थिति अत्यंत खालावलेली असल्यानें व भवानरावाच्या मुलांमध्यें तसा कोणी कर्तबगार नसल्यामुळें या श्रीगुरुसिद्धकाडदेवरुस्वामींना कोणाकडून त्रास पोहोंचला नाहीं. म्हणून यांच्या कारकीर्दीत महत्त्वाच्या गोष्टी घडल्या नाहींत.

हे स्वामी कित्तूर ( जि० बेळगांव ) येथील पाटील घराण्यापैकीं म्हणजे भक्त घराण्यापैकीं असून अत्यंत सात्त्विक व धर्मभोळे होते. हे आपल्या आप्तांना अगर इष्टमित्रांना मठाकडे फिरकूं देत नसत. यांच्या हयातींत जरी कोणत्या महत्त्वाच्या गोष्टी घडल्या नाहींत तथापि यांनीं देहावसानापूर्वी आपल्या शिष्याची ( हल्लींच्या श्रीसिद्धलिंगेश्वरस्वामींची ) जी निवड केली, ती अत्यंत आश्चर्यकारक असल्यानें तिचा उल्लेख केल्याशिवाय आमच्यानें पुढें जाववत नाहीं. ती गोष्ट अशी—

इ० स० १८९८ सालच्या जून महिन्यांत जेव्हां श्रीगुरुसिद्धकाडदेवरु स्वामी क्षयाच्या आजारानें अत्यवस्थ झाले व यांतून आपण जगत नाहीं असें त्यांस पक्कें कळून चुकलें; तेव्हां त्यांनीं एकें दिवशीं गांवांतील चार सभ्य गृहस्थांना मठांत बोलावण्याविषयीं कारभाऱ्यास आज्ञा केली. लवकरच गांवांतील २।४ पुढारी इसम मठांत आले, व त्यांनीं 'काय आज्ञा आहे?' असें श्रीस्वामींना विनविलें. तेव्हां ते म्हणाले, 'आमच्या देहाचा भरंवसा नाहीं; तरी पुढील तजविजीस लागा, व संध्याकाळच्या आंत शिष्याची निवड करावयाची आहे; तरी आमच्या शिष्य-घराण्यांतील ४-५ मुलगे घेऊन या!' या आज्ञेप्रमाणें तत्काळ कार्यास सुरवात झाली. जमलेल्या मंडळीपैकीं एक दोघे सब-रजिस्ट्रार साहेबांना घेऊन येण्या-करितां चिकोडीस गेले; व दोघे चौघे मुलांची निवड करून आणण्यासाठीं शहापूर, जुगूळ, मंगावती व राजापूर वगैरे गांवाकडे निघून गेले. या मंडळींनी मोठी लगबग करून या सगळ्या गांवांतून मिळून श्रीकाडदेवरु मठाचे शिष्य असलेल्या पाटील घराण्यांतून १० वर्षांपासून १७ वर्षें वयापर्यंतचे पांच मुलगे आणून श्रीस्वामींपुढें उभे केले. त्या सर्वांत वयानें थोर व प्रकृतीनें सशक्त असे हल्लींचे श्रीसिद्धलिंगेश्वरस्वामी (पूर्वा-श्रमींचे म्हणजे त्यावेळचे 'लिंगौडा' पाटील) हेच होते. हे जरी त्या वेळीं वयानें १६-१७ वर्षांचे होते; तथापि यांना लेखणीची ओळख नसून हा वेळपर्यंत त्यांचें सर्व बालपण तालीम व कुस्ती खेळण्यांत म्हणजे शरीर कमविण्यांतच गेलें होतें. बौद्धिक शिक्षणाकडे त्यांचें लक्ष मुळींच नव्हतें. यांच्या मातापित्यांनासुद्धां यांच्या बौद्धिक शिक्षणाची विशेष फिकीर वाटत नव्हती; म्हणून त्यांनीं यांना शाळेस जाण्याविषयीं कधीं आग्रह केला नाहीं. असो. इतर जे चार मुलगे आणिले होते, त्यांत कोणी चौथी ईयत्ता तर कोणी पांचवी ईयत्ता शिकणारे असून वयानें लहान म्हणजे १०ते १२ वर्षांच्या आंतील होते. यांतील एकदोन मुलगे रंगारूपानें नीटस असून तरतरीत होते. तेव्हां त्यांना बोलवण्यास गेलेल्या गृहस्थांना सदरी दोन मुलां-पैकींच श्रीस्वामी कोणाएकाची निवड करितील असें वाटत होतें. थोडक्यांत

सांगावयाचें म्हणजे इतकेंच म्हणतां येईल कीं, त्या पांच मुलांतून शिक्षणहीन व रंगारूपानेंही यथातथाच असलेल्या आपल्या या 'लिंगौडा'ची निवड होईल, हें तेथें जमलेल्या शेंकडों लोकांच्या ध्यानीं मनींसुद्धां नव्हतें ! फक्त त्या चार मुलांना घेऊन येत असतांना, हे पाटीलबुवा आपल्या शेतांत कांहीं काम करीत उभे होते, यांना दाखवून जुगूळच्या ब्ऱ्याच लोकांनीं आपल्या गांवचा एक तरी मुलगा त्यांत असावा. याच केवळ हेतूनें यड्डूरच्या पुढाऱ्यांना आग्रह करून यांना परभारें शेतांतूनच आपल्या बरोबर आणिलें होतें, आणि यड्डूरच्या सद्गृहस्थांनींही, या अशा पैलवानासारख्या दिसणाऱ्या थोर मुलाची निवड होणें मुळींच शक्य नाहीं हें जाणून देखील जुगूळकरांचीं मनें विनाकारण कां दुखवा, या कल्पनेनें यांना त्या मुलांबरोबर राहूं दिलें. पण दैवगति किती विचित्र पहा ! जो त्या वेळच्या सर्वच लोकांना एकमतानें मठाच्या गादीला नालायक वाटला; तोच मुलगा श्रीकाडदेवरु स्वामीला पटला ! व आजपर्यंतच्या अनुभवानें तोच त्या जागेस अत्यंत योग्यही ठरला ! ही या पाटीलबुवाच्या दैवाची लीला म्हणावी कीं, श्रीकाडदेवरु मठाच्या गादीचा महिमा म्हणावा ? हें वाचकांनींच ठरवावें. असो.

हे पांचही मुलगे मठांत येतांच त्यांना लागलेच अंथरुणास खिळलेल्या त्या जीर्णदेही श्रीगुरुसिद्धकाडदेवरुस्वामीसमोर नेण्यांत आले. हे भावी मठाधिपति आपल्यासमोर आलेले पाहातांच श्रीस्वामींच्या अंगी नवचैतन्य स्फुरलें असावें! कारण हे मुलगे जेव्हां त्यांच्या दृष्टीसमोर आले, तेव्हां त्यापूर्वीं नीट शब्दोच्चार करण्यासही त्राण नसलेले श्रीस्वामी आपणांस 'अंथरुणावर उठवून बसवा' असें म्हणाले व नंतर उठून बसलेही! मग समया वगैरे उजळ करण्यास सांगून एकेका मुलाला आपल्यापुढें आणवून आपल्या तीक्ष्ण नजरेनें ते एकेकाचें निरीक्षण करूं लागले. त्यांचें निरीक्षण चालल्यावेळीं तो मुलगा कोठला, त्याचें वय किती, अभ्यास कोठपर्यंत झाला आहे, इत्यादि त्रोटक माहिती कारभारी श्रीस्वामींना सांगत. पहिल्या चार मुलांचें निरीक्षण झाल्यानंतर शेवटची पाळी आपल्या पाटीबुवांवर

झाली. या वेळेपर्यंत श्रीस्वामींनीं कोणताच भाव आपल्या चेहऱ्यावर व्यक्त केला नव्हता; परंतु यांजकडे एकदां आपादमस्तक निरीक्षण करितांच श्रीस्वामींना काय कळलें कोण जाणे. त्यांनीं पसंतिदर्शक मान हालवून हास्यमुद्रेनें सर्वांकडे पाहून म्हटलें; ' यासच पट्टाधिकारी करा. ' तेव्हां कारभाऱ्यासहित तेथें जमलेल्या सर्वांसच अत्यंत आश्चर्य वाटलें! पुढाऱ्यांना तर वाटलें कीं, यांत श्रीस्वामींची दृष्टिभूल झाली असावी; म्हणून पुनः त्यांना सर्वानुमतें कारभाऱ्यानें विनविलें कीं, ' हा मुलगा अशिक्षित आहे, व देखणा तर मुळींच नाहीं, तरी आणखी एकदां निरीक्षण करून काय ती आज्ञा द्यावी. ' असें म्हणून मागें पाहिलेल्यांतील तीं दोन चलाख मुलें पुनः श्रीस्वामीपुढें उभीं केलीं. तेव्हां सर्वांच्या आग्रहानेंच पुनः निवड करण्यास श्रीस्वामी उठून बसले; परंतु त्या देखण्या मुलांकडे तादृश लक्ष न देतां त्यांनीं या पाटीलबुवांनाच हातानें स्वतः खुणावून समोर बसवून घेतलें व २।३ मिनिटेंपर्यंत यांच्या तोंडाकडे सूक्ष्म नजरेनें पाहून नंतर सर्वांकडे दृष्टि फिरवून निश्चयी स्वरानें म्हटलें कीं, ' यालाच गादीवर बसवा ! ' तेव्हां सर्वांना विस्मय वाटला. जरी यावेळीं बहुतेक पुढाऱ्यांच्या मनाविरुद्धच ही निवड झाली, तथापि त्यांनीं असा विचार केला कीं, ' श्रीकाडदेवरुस्वामींनाच आपल्या गादीला जो शिष्य लायक वाटतो तो आम्हांस नालायक वाटून काय उपयोग ? त्या सर्वसमर्थ महात्म्याच्या इच्छेप्रमाणें गोष्ट होऊं द्या. ' असें म्हणून लागलीच नूतन शिष्याच्या पट्टाभिषेकाची सिद्धता केली. इतक्यांत सबरजिष्टरसाहेबही येऊन दाखल झाले. त्यांनीं श्रीस्वामींचें शिष्यपत्र वाचून पाहून त्याला अवश्य असणारे त्यांचे कायदेशीर जावजबाब वगैरे घेऊन ते त्यांना पुनः वाचून दाखविले, व शिष्यपत्र रजिष्टर करून त्यावर श्रीस्वामींची सही घेतली. चमत्कार हा कीं, ही शेवटची सही करून श्रीस्वामींनीं लेखणी खालीं ठेविली तोंच त्यांचें प्राणोत्क्रमण झालें ! सर्व जनता आश्चर्यानें थक्क होऊन गेली ! श्रीकाडसिद्धेश्वरांनींच प्रत्यक्ष आपल्या गादीकरितां या ' श्रीसिद्धलिंगेश्वर-

स्वामींची ' ( हें आश्रमस्वीकारानंतर ठेविलेलें नांव होय. ) निवड केली असें जो तो म्हणूं लागला. असो.

पुढें रीतिप्रमाणें सर्व विधि वगैरे होऊन यांना ' पट्टाभिषेक ' करण्यांत आला. आणि ता. २६ जून सन १८९८ इ० पासून या नूतन श्रीसिद्धलिंगेश्वरस्वामींच्या विजयी कारकीर्दीस प्रारंभ झाला.



श्रीविरूपाक्षलिंगाय नमः

# भाग चौथा.

## प्रख्यात खटला व श्रीस्वामींचें विजयाभिनंदन.

### ( १ ) श्रीसिद्धलिंगेश्वरस्वामींचा पूर्वपरिचय.

या विजयी मूर्तींच्या पूर्वाश्रमींचें नांव काय व यांचें बाळपण कसें गेलें याचें थोडेसें दिग्दर्शन मागील भागांत केलेंच आहे. यांच्या वडिलांचें नांव ' बाळगौंडा ' असें असून ते जुगूळ गांवांतील एक मातबर शेतकरी होते. हे आपल्या वडिलार्जित पाटीलकीची वतनवाडी संभाळून स्वकष्टानें इतरही बऱ्याच उत्पन्नाची त्यांत भर घालून मोठ्या सुखानें संसार करीत होते. देव धर्म या बाबींकडेही यांचें विशेष लक्ष असून, श्रीवीरभद्रदेवाच्या व कुलगुरूंच्या दर्शनार्थ हे वारंवार श्रीक्षेत्र यडूरास जात असत. यांची पत्नी नीलम्मा ह्याही अत्यंत धार्मिक व दयाळू असून यांना सर्वतोपरी अनुरूप अशाच साध्वी होत्या. अशा स्वधर्मनिष्ठ दंपतीच्या उदरीं स्वधर्माभिमानी बालकच निपजावयाचें हा ईश्वरी नियमच असल्यानें याच्या पोटीं आपल्या वीरशैव धर्माभिमानी 'श्रीसिद्धलिंगेश्वरस्वामी [ पूर्वाश्रमींच्या ' लिंगौडा ' ] सारख्या पुत्ररत्नाचा जन्म सन १८७२ सालीं झाला. हें साहजिकच आहे.

यांच्यापूर्वीं या दंपतीला ‘ आलगौडा ’ नामक एका सुपुत्राचा लाभ झाला होता. [ हे श्री स्वामींचे पूर्वाश्रमीचे वडील बंधूच हल्लीं जुगुळास आपल्या पूज्य पित्याची वतनवाडी संभाळून रहात असतात. ] बाळगौडा पाटलांचें, शाळेंतील लिहिण्या वाचण्याच्या शिक्षणापेक्षां शारीरिक शिक्षणाकडे जास्त लक्ष असल्यानें त्यांनीं वडील मुलास शाळेंत घालून धाकट्यास शारीरिक शिक्षणाकडे वळण्यास सवड दिली; म्हणून यांच्या बालपणांतलीं बरींच वर्षें मनमुराद दूध पिऊन मन मानेल तशी मेहनत करण्यांतच निघून गेलीं. यामुळें मागें सांगितल्याप्रकारें बलवत्तर पूर्वपुण्याईनें म्हणा किंवा दैवयोगानें म्हणा यांना यडूरच्या श्रीकाडदेवरु मठांतील पट्टचरमूर्तिस्वामी होऊन, छत्रचामरें ढाळून घेत, पालखी-मेण्यांतून मिरविण्याची संधि प्राप्त झाली; त्यावेळीं लहानपणीं लिहिण्या वाचण्यास न शिकल्याबद्दल यांना स्वतःसच वाईट वाटलें असावें. असें वाईट वाटण्याचें पट्टाभिषेकापूर्वींच एक अल्प कारणही झालें, तें हें कीं, यांचे गुरु श्रीगुरुसिद्धकाडदेवरुस्वामी हे ज्यावेळीं शिवाधीन झाले, त्या वेळीं शिष्यपत्रावर सबरजिष्टरसमोर त्यांची फक्त एकच सही झाली; पण पुढें आणखी थोडा मजकूर लिहिल्यानंतर सर्वांत शेवटीं आणखी एक सही व्हावी लागते. तरच दस्तैवजाची नोंदणी पुरी होते; परंतु श्रीस्वामी तर त्यापूर्वींच लिंगैक्य झाले, तेव्हां सबरजिष्टरहि गोंधळले व आतां ही नोंदणी कशी पुरी करावी असें त्यांनाही कोडें पडलें, त्यांनीं मे० कलेक्टर साहेब यांजकडे तावडतोब तसा रिपोर्ट करून उत्तर मागितलें. एक दोन दिवसांच्या आंतच ‘ नवीन पट्टचरमूर्तीस्वामींची सही घेऊन नोंदणी पुरी करावी ’ असें उत्तर आलें. तेव्हां सबरजिष्टरनीं आमच्या या नूतन स्वामी महाराजांना सही करण्यास बोलाविलें, तों हे अक्षरशत्रु असल्याचें कळलें, तेव्हां ते सहज विनोदानें म्हणाले, ‘ कायहो, इतक्या मोठ्या पदास चढून आपल्यास स्वतःची सहीसुद्धां करितां येत नाहीं ? ’ हे विनोदाचे शब्द यांच्या वर्मीं झोंबलें व त्याच दिवशीं रातभर बसून यांनीं प्रथम आपली सही घटवून दुसऱ्या दिवशीं सबरजिष्टर समोर त्या नोंदणीदस्तावर सफाईदारपणें सही करून दाखविली ! तें पाहून सबरजिष्टर देखील आश्चर्य-

चकित झाले. असो. यानंतर त्याच दिवसापासून इतक्या जास्त वयांतही आपली योग्यता अगर मानापमान न पाहतां हे शाळेंत जाऊं लागले. व एका वर्षाच्या आंतच मोडी, बालबोध हस्तलिखित अक्षरेंसुद्धां हे सफाईदार वाचूं लागले ! व यांच्या निश्चयी स्वभावानें यांना वरीलप्रमाणें लवकरच सुफळ मिळालें म्हणूनच हल्लीं आपल्या मठाच्या दप्तरांतील कोणताही ( कानडी व इंग्रजीसुद्धां ) कागद यांच्या हातांत येतांच हा अमुकच आहे असें तावडतोब सांगतात ! हें त्या निश्चयाचेंच फळ होय. श्रीस्वामींनीं त्या रात्रीं जी सही घटविली तीच अद्याप यांची सही कायम आहे ! हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

## [२] विजयी कारकीर्दीचा प्रारंभ.

हे द्वितीय श्रीसिद्धलिंगेश्वरस्वामी अत्यंत यशस्वी व वैभवशाली आहेत ही गोष्ट सिद्ध करण्यास अनेक यश मिळालेल्या खटल्यांची माहिती होणें जरूर आहे. तथापि स्थलाभावामुळें त्यांतील महत्वाचीं अशीं ३।४ उदाहरणें दिलीं असतां बस्स होईल. तीं हीं:—

( १ ) मठांतील 'गदगय्या पोवाडय्या' नांवाच्या कारकुनानें मठ सार्वजनिक आहे असा मे. डि. डि. कलेक्टरसाहेब यांजकडे अर्ज करून काम चालविलें; तेव्हां सन १८९८ इ० सालीं श्रीस्वामींना अनुकूल असा निकाल लागला व मग तो खटला अपील होऊन गेला. तथापि हायकोर्टांतही श्रीस्वामींनाच यश मिळालें. हा प्रथमचा विजय होय.

( २ ) यानंतर लागलीच 'सिद्धवीरय्या महादेवय्या' नांवाच्या मठांत राहणाऱ्या एका ब्रह्मचाऱ्यानें यड्डूर येथील स्वार्थी लोकांच्या सांगण्यावरून 'मुप्पीन काडदेवरु पट्टाधिकारी' असें टोपण नांव धारण करून आपणच मठाचे मालक आहों असा बेळगांव येथील फर्स्टक्लास सबजज्ज कोर्टांत दावा केला. तो दावा तीन वर्षें चालून अखेर सन १९०२ सालीं मुंबई हायकोर्टांत श्रीसिद्धलिंगेश्वर स्वामी हे मठाचे मालक ठरले. हा दुसरा विजय होय.

(३) इ. स. १९१३ सालीं 'गद्दिगय्या पवाडय्या' यानें श्रीपट्टचरमूर्तीस्वामींना अजीबाद वगळून श्रीक्षेत्र यड्डूरांत 'रथोत्सव' करण्याचा बेत केला. पण अखेर श्रीस्वामींनाच त्यांत यश कसें मिळालें हें पुढें सविस्तर दिलेंच आहे.

(४) जत संस्थानांतील १०४८१४ एकशेंचार एकर चौदा गुंठे जमीन, श्रीस्वामींच्या कोणा पूर्वज गुरुवर्यांना प्राचीनकाळीं इनाम मिळून देखील पूर्वजांच्या हलगर्जीपणामुळें ती भलत्यांकडेच राहिली होती. अखेर बरींच वर्षें काम चालवून अत्यंत खटपट केल्यामुळें जत संस्थानांतून तारीख १४ जुलई १९२० इ० रोजीं श्रीस्वामींच्या नांवानें नवीन इनामी सनद मिळून ती जमीन यांच्या कबज्यांत आली.

अशाप्रकारें अनेक लहान मोठ्या खटल्यांत व कामगारींत श्रीस्वामींना सारखें यशच येत गेलें आहे. यावरून यांची सर्वच कारकीर्द यशस्वी होणार अशी कोणी अटकळ केल्यास ती वावगी होणार नाहीं. या पूर्व यशस्वी परंपरेस अनुसरून सांप्रतच्या प्रख्यात खटल्यांतही श्रीस्वामीमहाराज कसे यशस्वी झाले हें ऐकण्याकरितां आपण अत्यंत आतुर झालां असाल तरी पुढील अद्भुतरम्य ब्राह्मणी लीलांकडे लक्ष पुरवावें.

## [३] पुढील संग्रामाची पूर्वतयारी.

नुकत्याच होऊन गेलेल्या पुजेच्या प्रख्यात खटल्यास प्रत्यक्ष प्रारंभ होण्यापूर्वी सुमारें पंधरा वीस वर्षें उभयपक्षाची हालचाल कशी होती व कोण कशाप्रकारें पूर्वतयारी करीत होते हें थोडक्यांत सांगणें अवश्य आहे. कां कीं, त्याशिवाय हा खटला असा एकाएकीं कां उद्भवला हें नीट कळणार नाहीं. असो.

श्रीआप्पासिद्धलिंगेश्वरस्वामींच्या कारकीर्दीत पूजा व हक्कासंबंधींच्या खटल्यांत त्यांना यश मिळून त्यांचा वचक बसल्यानंतर श्रीवीरभद्रदेवाची पूजा करण्यास ब्राह्मणांना जरी हरकत नव्हती, तरी लिंगायतांची पूजाअर्चा संपून वेळ मिळाल्यास त्यांना कदाचित् श्रीस्वामींकडून मेहेरबानीनें परवानगी

मिळे. आणि तीही ज्या ब्राह्मणांनीं श्रीस्वामींना ( सन १८६८-७० ) सालच्या खटल्यांत साह्य केलें होतें त्यांनाच प्रथम मिळे, इतरांना बहुतेक नकारघंटा असावयाचीच; यामुळें श्रीवीरभद्रलिंगाची पूजा त्यावेळीं सर्वस्वीं लिंगायतांच्या ( जंगम पुजाऱ्यांच्या ) हातीं होती. परंतु पुढें इ. स. १८९० सालीं जेव्हां त्या तेजस्वी स्वामीमहाराजांचा अस्त होऊन त्यांचेच भाचे श्रीगुरुसिद्धकाडदेवरु हे पट्टाधिकारी झाले. त्यावेळीं त्यांच्या भोळसर व आळशी स्वभावामुळें जी ढिलाई झाली त्याचवेळीं येथील धोरणी भटांनीं आपलें तट्टू पुढें दामटलें. प्रथम ब्राह्मणांनीं श्रीवीरभद्रलिंगाची पूजा जास्त वेळ करीत बसण्याचा क्रम घातला. नंतर कांहीं दिवसांनीं सकाळीं जंगम पुजारी प्रातःकाळच्या पूजेस येई त्याच्याबरोबर येण्यास ब्राह्मणांनीं सुरवात केली. दोन चार वर्षांनीं विशेष सहवास होऊं लागल्यानें लिंगायत ब्राह्मणांतील पूर्वीचें वैमनस्य कमी होत जाऊन त्यांनीं त्यांचा स्नेह संपादिला, म्हणून जंगम पुजारी पूजा करून बाहेर बसला कीं, हे भट आंत बऱ्याच वेळपर्यंत बसत. कांहीं वर्षांनीं याच्याही पुढें मजल गेली; आणि श्रीस्वामींच्या हलगर्जीपणामुळें म्हणा, किंवा देवळांत प्रत्यक्ष पूजा करण्यास ठेविलेल्या जंगम नोकराच्या आळसामुळें म्हणा रोज त्रिकाळ पूजेस जंगम थोडथोडा वेळ आंत जाई, बाकी सर्व वेळ हे भट लिंगायतभक्तांच्या जोडीनेंच पूजा करीत बसलेले असत. जंगम नोकरांना ही त्रिकाळ पुजेची कटकटसुद्धां स्वतःच्या मागची सुटली तरी पाहिजेच होती. फक्त देवापुढील उत्पन्न उचलण्यास व चमचमीत खाण्यास मिळालें कीं बस्स! असें सुद्धां वाटे, पण ती त्रिकाळपूजा झाल्याशिवाय पुढें बसून हक्क घेण्याची त्यांस मुळींच परवानगी नसल्यानें नाइलाजास्तव त्यांस त्या तिन्ही वेळीं तास दीड तास पूजा करणेंच भाग पडे. असो. या व्यतिरिक्त बाकी सर्व काळ ब्राह्मणांना गर्भ देवळांत पूर्ण मुभा असे. म्हणून सर्व दिवसभर एक ना एक ब्राह्मण आंत पूजा करीत बसलेला असे.

इतकें मऊ सापडल्यानंतर कोपरानीं खणण्यास आरंभ करणें भटांना अवघड असेल काय? ज्या देवळांत पूजा करण्यास जाण्यासाठीं श्रीस्वा-

मींची परवानगी घेतल्याशिवाय गत्यंतर नसे, त्याच देवळांत परवानगी-वांचून बराच वेळ बसण्याची सवड आयतीच मिळूं लागल्यानंतर आणखी काय पाहिजे? या वेळीं जे लिंगायत भक्तलोक श्रीवीरभद्र लिंगाच्या पुजेस येत, त्यांना केव्हांच मना नसे. पण पुढें पुढें असा प्रकार होऊं लागला कीं, भट पूजा करीत आंत बसलेला असला ह्मणजे लिंगायत भक्तानें थोडा वेळ बाजूस बसावें व त्याची पूजा संपल्यावर मग आपण पूजेस लागावें. कांहीं काळानें ब्राह्मणांचा जम जरा जास्त बसल्यानंतर भट आंत असले कीं लिंगायत भक्तानें आंत जाऊं नये व लिंगायत आंत असले कीं, भटांनीं आंत जाऊं नये, असा प्रघात सुरू झाला. या परि-स्थितीचा फायदा घेतल्याशिवाय भटजी स्वस्थ बसले नाहींत. त्यांनीं अशी वहिवाट ठेविली कीं, ब्राह्मण पूजा करीत आंत बसले असले तर लिंगायतभक्तांनीं गर्भ देवळांत होतां होईल तोंवर जाऊं नये! या गोष्टी-कडे जंगम पुजाऱ्याचें लक्ष जाऊं नये अशी भट दक्षता घेत. व क्वचित् कोणा लिंगायत भक्तानें तक्रार केल्यास त्यास 'आह्मांस शिवाशिव होते सबब मागाहून या अगर तुमची पूजा आटपून बाजूस सरा.' असा विनंतिवजा हुकूम करीत. तथापि जंगम पुजाऱ्यांच्या उत्पन्नांच्या मुख्य बाबींत या प्रत्यक्ष पूजापद्धतीनें कांहींच फरक पडत नसल्यानें त्यांचें या प्रत्यक्ष पूजेच्या बाबीकडे कधीं कधीं दुर्लक्ष होई; व भटांचा वरचढपणा तेथें चाले.

त्यावेळीं एकंदर लिंगायत समाजांतच अशिक्षितपणा, आळस इत्यादि दुर्गुण बऱ्याच मोठ्या प्रमाणांत वास करीत होते. त्यामुळें या नियमास या भागांतील लिंगायत लोक तरी कसे अपवाद ठरणार? यामुळें श्रीगुरु-सिद्ध काडदेवरू स्वामींच्या ७–८ वर्षांच्या कारकीर्दींत ब्राह्मणांनीं श्रीविर-भद्र गर्भदेवालयांत चांगलीच छाप बसविली. ह्मणजे इतरांबरोबरच पूजा करण्याची जी इष्ट पद्धत होती, तीऐवजीं वरील शिवाशिवच्या क्षुद्र सबबीनें इतरांहून आपण निराळें आहों ह्मणून आह्मांस अगोदर सवड द्यावी अशी दक्षता ब्राह्मणांनी घेतां येण्यासारखी वहिवाट सुरू झाली. त्यावेळीं

आमच्या लिंगायत समाजांत भाविक लोक शेकडों होते तथापि देवाकरितां भांडणतंटा करण्याची अगर पूजेसारख्या धार्मिक बाबींतील आपला हक्क अगर (ब्राह्मणांबरोबरीनें अगर त्यांच्या आधींच पूजा करण्याची) वहिवाट भांडून शाबीत करण्याची धमक आणि आवड फारच थोड्या लोकांत असे आणि तशा जबर दिसणाऱ्या लिंगायतांना भट मुळींच हरकत करीत नसत. तशांना व पांढरपेशा लिंगायत भक्तांना केव्हांही आंत जाण्यास मना नसे. शिवाय खरे हक्कदार पुजारी श्रीपट्टचरमूर्तिस्वामी अगर त्यांचे देवालयांतील जंगम नोकर यांना मिळणाऱ्या उत्पन्नांत हे भटजी ढवळाढवळ करीत नसत, त्यामुळें या उभयतांना हे ब्राह्मण भट व लिंगायत भक्त चढाओढीनें पूजा करून आपली दगदग वांचवून उपकार करितात असें वाटूं लागले! या गैदीपणाचा परिणाम काय होणार हें सांगण्यास ज्योतिषी नकोच. श्रीगुरुसिद्धकाडदेवरुस्वामीच्या कारकीर्दीच्या अखेर अखेर तर श्रीवीरभद्रगर्भदेवळांत हे भट लिंगायतांच्या जोडीस आल्यानें, जंगम हे केवळ त्या उभय भक्तांच्या नोकरांसारखे भासत. श्रीस्वामी हे महिन्यांतून २।४ वेळां श्रीवीरभद्रलिंगाच्या पुजेस आले कीं, इतरांपेक्षां हे भटजीच पुढें पुढें करून त्यांना अत्यंत लीनता दाखवीत; व कोणी जबरदस्त अगर श्रीमंत किंवा सुशिक्षित लिंगायत भक्त आल्यास त्यांसही मान देत. ह्मणजे पुढें सर्व तेथील नोकर जंगम पुजाऱ्यांना गोडीगुलाबीनेंच कां होईना, राबणुकीचीं कामें लावून आंत बसून स्वस्थ पूजा करण्यास त्यांना सवड मिळत असे. या एकंदर गैदीपणाचा एक वाईट परिणाम असा झाला कीं, परप्रांतांतले सामान्य लिंगायतभक्त श्रीवीरभद्रगर्भदेवळांत प्रत्यक्ष पूजा करण्यास सर्रास जाण्यास कधीं कधीं भिऊं लागले. कारण पुजेचा दिखाऊ डामडौली प्रकार ब्राह्मणांइतका लिंगायतांना साधत नसल्यानें तो बाह्य भपका पाहून इतर लोक आपण होऊनच त्यांना अगोदर सवड देत व आपण मागें बसत. यावर कोणी ह्मणतील कीं, हा भटांचा कावा ओळखणारे लिंगायत पुढारी यावेळीं कोणी नव्हते काय? परंतु जरी कोणी असले तरी मुख्य मालक श्रीस्वामीच स्वस्थ असल्यावर इतर बिचारे

कोण काय करणार ! शिवाय याहूनही वहिवाट जास्त दृढ करून आपण असतां इतरांना गर्भदेवळांत वरचेवर येता येऊं नये असें भटांना वाटूं लागणें स्वाभाविक असल्यानें, त्यांनीं आमच्यांतीलच कांहीं गावगुंड श्रीस्वामीविरुद्ध उठतात हें पाहून पडद्याआडून त्यांना शक्त्यनुसार साह्य देऊन श्रीस्वामींना परभारेंच सळो कां पळो करून सोडिलें. अशा प्रकारचीं अनेक खेकटीं निस्तरतां निस्तरतां बेजार होऊन गेलेले श्रीस्वामी श्रीवीरभद्र देवाकडे कसचें लक्ष देतात ? यामुळें या श्रीस्वामीमहाराजांच्या हयातींत येथें देवालयांत शिरलेले भट बरेच कणखर बनले व सामान्य लिंगायतांना आपण आंत असतांना ते गर्भदेवळांत फारसा प्रवेश करण्यास वाव देत नसत.

इ० सन १८९८ सालीं श्रीगुरुसिद्धकाडदेवरु स्वामी शिवैक्य पावून हल्लींचे श्रीसिद्धलिंगेश्वरस्वामी पट्टाधिकारी झाले. तेव्हां श्रीवीरभद्र गर्भदेवालयांतील स्थिति वरील प्रकारची होती यापूर्वीं थोड्याच दिवसांमागें येथील श्रीकाडदेवरु मठ सार्वजनिक नसून श्रीस्वामी हेच पूर्ण मुखत्यार आहेत असा फौजदारी खटल्याचा मागें उल्लेखिल्याप्रमाणें हॉयकोर्टाकडून निकाल लागला होता; म्हणून वरील प्रकारचीं खेकटीं कमी झालीं होतीं; परंतु यावेळां 'सिद्धवीरय्या' चा दावा कोर्टांत चालू झाला होता. त्याकरितां नूतन स्वामींना पुष्कळ पैसे खर्चावे लागून कोर्टांत हेलपाटे घालावे लागले. त्या खटल्यांतच प्रथम या श्रीसिद्धलिंगेश्वर स्वामींना इंग्रजी न्याय कोर्टांतील कज्जांचा ओ-ना-मा शिकावा लागला. त्यांतून ते विजयी होऊन बाहेर पडतात न पडतात तोंच पूर्वींच्या श्रीगुरुसिद्धकाडदेवरुस्वामींनीं केलेल्या कर्जाच्या फेडीचे तगादे लागले. ते कर्ज निवारणें जरूर असल्यानें त्यांना प्रारंभीं ८-१० वर्षें श्रीवीरभद्रदेवाकडे लक्ष देण्यास व सामान्य स्थितींतल्या लिंगायतांनाही भटांकडून प्रत्यक्ष पुजेच्या बाबतींत मुळींच हरकत होऊं नये अशी व्यवस्था करून भटांचा वरचढपणा नष्ट करण्यास मुळींच सवड झाली नाहीं. शिवाय जरी यावेळीं श्रीस्वामींच्या मनात ही गोष्ट येत असली तरी त्यावेळचे मठांतील कारभारी नारो बाळाजी

कुलकर्णी यांजपुढें अशी गोष्ट बोलणें अगर या बाबतींत त्यांचा सल्ला घेणें म्हणजे जवळ जवळ रॉकेलनेंच घरची आग विझवूं पाहाणें होतें! म्हणून मनांत असलें तरी यावेळीं मूग गिळून मुकाट्यानें स्वस्थ बसणें त्यांना भाग होतें. त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट इतकीच कीं, केव्हांही आंत जाऊन सर्वांच्या अगोदर प्रत्यक्ष पूजा करण्यास हे भट, श्रीस्वामींना व त्यांच्या प्रभावळींतल्या लिंगायत भक्तांना मोकळीक देत. इतकेंच नव्हे, तर श्रीमंत अगर सुशिक्षित लिंगायत भक्तांना हे भटजी आंत जाण्यास केव्हांही अडथळा करीत नसत. परप्रांतांतल्या अनोळखी अशिक्षित लिंगायतांना हे भट कधीं कधीं प्रतिबंध करीत. त्यांना येथील अन्यायाबद्दल श्रीस्वामीकडे तक्रार करण्याचें माहीत नसल्यानें ते बिचारे या देवळांत दोघांचाही कांहीं संबंध असेल अशी मनाची समजूत करून घेऊन स्वस्थ बसत.

हा प्रकार पाहून व स्वतःस आंत जाण्यास केव्हांच कोणाच्या परवानगीची अपेक्षा राहिली नाहीं, हेंही लक्षांत आणून तर येथील भट जास्त धीट बनले व ते आपल्या बहिवाटी हक्काचा धागा जास्त जास्तच आवळूं लागले. अगदीं अलीकडे तर ते स्वतःसही 'पुजारी' समजूं लागले व या लटक्या पुजारकी हक्काची फुशारकी इतरांपुढें मारण्यास भीतनासे झाले. दरसाल जे हजारों लिंगायत भक्त श्रीक्षेत्र यडूरच्या यात्रेस येत. त्यांतील बिनमाहितगार अशा श्रीमंत भोळसर भक्तांकडून जंगम पुजाऱ्यांना न कळत त्यांजकरितां पूजा वगैरे करून मंत्रपुष्पाकरितां नारळ, अभिषेक-दक्षिणा अशा नांवाखालीं जे पैसे घ्यावयाचे ते त्यांना गांवीं जाऊन आपल्या नांवें 'पुजारी' या आडनांवानें मनिऑर्डर करून पाठवून द्या, असें सांगून मागवून घेऊं लागले. व अशा प्रकारें आमच्या भोळ्या 'बसवाण-भक्तांचीं' आपण पुजारी असल्याबद्दल लेखी कबूली घेऊ लागले! किंवा अडाणी लिंगायतांकडून होणाऱ्या अशा प्रकारच्या अनेक गोष्टी श्रीस्वामींच्या कानांवर वारंवार येत, परंतु त्यांचा कांहीं इलाज नव्हता. कारण लिंगायत समाज अफाट असून यांत हजारों भक्त एकाच वेळीं येत अस-

तात, त्यामुळें त्या सर्वांची व्यवस्था नुसत्या जंगमाकडून होणें कठीण होतें म्हणून कांहीं लिंगायत भक्त ब्राह्मणांकडूनही कधीं कधीं पूजा सांगून घेत. मात्र श्रीवीरभद्रलिंगाच्या प्रत्यक्ष पुजेसंबंधीं गरीब लोकांना (हल्लीं हा प्रकार बंद झाला आहे.) होणारा त्रास चुकवून भटांना ताकीद करून आपल्या सर्वच भक्तांना सरास सर्व दिवसभर पूर्वीप्रमाणेंच पूजा करीत स्वस्थ बसण्यास कोणाची हरकत राहूं नये अशाविषयीं खटपट करण्याची श्रीस्वामींना उत्कट इच्छा होती; परंतु ही गोष्ट प्रत्यक्ष कृतींत आणणें तितकें सोपें नव्हतें. कारण, यावेळीं मठांतील कारभारी ब्राह्मण, गांवचे वहिवाटदार ब्राह्मण्याचे कट्टे अभिमानी, आणि सरकारी अंमलदारांत तर पट्टेवाल्यापासून पट्टाभिषिक्तापर्यंत ब्राह्मणांचा सुळसुळाट! अशा परिस्थितींत बिचारे एकटे श्रीस्वामी त्यांना काय ताकीद करणार? यावेळीं या भागांत एकही लिंगायत पुढारी अगर उत्तम वकील नव्हता आणि सरकारी अंमलदारांत तर राव. ब. अरटाळ यांना वगळल्यास औषधालासुद्धां लिंगायत नव्हता. म्हणून सर्वतोपरी अननुकूल अशा या परिस्थितींत श्रीस्वामींना तसें कांहीं करितां येईना. आपण तशी कांहीं चळवळ करावी तर हेंच निमित्त पुढें करून आपल्यावर निराळेंच कांहीं किटाळ आणितील व कदाचित् त्यांच्या मनानें उलट ग्रह करून घेतल्यास प्रसंगीं येनकेन प्रकारेण देवालयांत होणाऱ्या कांहीं बाबींतील उत्पन्नावरही आपला हक्क सांगण्यास हे भट कमी करणार नाहींत, कारण सध्यां परिस्थिति त्यांना अनुकूल आहे. हें श्रीचरंतीस्वामी पूर्ण जाणून होते. म्हणून त्यावेळीं ते जरी आपल्या स्वतांच्या सर्व हक्कांचा बोज संभाळून होते तरी इतर सामान्य लोकांना गर्भदेवलयांत भटांकडून केव्हांही त्रास पोचूं नये, असें करणें त्यांना तेव्हां शक्य वाटत नव्हतें. तेव्हां वरील कारणानें श्रीस्वामी भटांना कांहीं बोलत नसत. त्यामुळें जंगमपुजाऱ्यांऐवजीं हे भटच गरीब भक्तांशीं किती अरेरावीपणानें वागत याचा खुद्द लेखकासही थोडा अनुभव आला आहे. यावरून तेव्हां येथील बिन हक्कदार व लटके पुजारी बनलेले भट किती शिरजोर झाले होते आणि अशा हलगर्जीपणांत आणखी कांहीं वर्षे

जातीं तर गरीबांबरोबर इतर लिंगायतांनाही भटांनीं हरकत करण्यास हळु-हळु सुरवात केली असती, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

पण अगदीं अलीकडे गरीब लिंगायत भक्तांच्या मागें लागलेला भटांच्या लटक्या भीतीचा हा समंध बराच प्रबल होत चालला होता. तेव्हां त्या लोकांबरोबरच त्यांजकडून श्रीवीरभद्र-पुजाऱ्यांना [ श्रीचरंतीस्वामींना ] मिळणारें उत्पन्नसुद्धां मधल्यामध्येंच हा स्वाहा करणार कीं काय अशी भीति वाटूं लागली. या समंधाची त्या लोकांच्या मागची कटकट सोड-विण्याचें सामर्थ्य श्रीस्वामींच्या अंगीं असूनही तें सांप्रत निरुपयोगी होतें; कां कीं, वर सांगितल्याप्रकारें त्या कारणानें ते ब्राह्मणांना फार भीत असत. परंतु वीरशैवांचा खरा वीर जो भगवान् श्रीवीरभद्र देव तो मात्र या वेळीं या समंधाला पूर्ण गाडून टाकण्याच्या पूर्वतयारींतच होता, असें पुढील उ-दाहरणावरून दिसून येतें कसें तें पहा.

वर सांगितल्याप्रमाणें भटांची वहिवाट एक प्रकारें या देवालयांत सुरू होत चालली होती; पण याच वेळीं दुसऱ्या तऱ्हेनें तिचा पाया डळमळीत करणारें एक विचित्र प्रकरण आपोआपच उद्भवलें. तें प्रकरण म्हणजे इ० स० १९१३ सालचा—

## प्रसिद्ध रथोत्सवाचा खटला.

हा होय. श्रीवीरभद्रदेवाच्या अगदीं अलीकडे विस्कळित झालेल्या वार्षिक यात्रेला कांहीं तरी व्यवस्थित स्वरूप यावें; व एका काळींच यात्रा जमावी म्हणून येथें येणाऱ्या भक्तांच्या यात्रेस जनावरांच्या यात्रेची जोड देण्याची कल्पना येथील चळवळ्या व ब्राह्मणबगलबच्या अशा मागें सांगितलेल्या 'गदिगय्या' याच्या मनांत आली व त्यास सर्वांकडून मुख्यतः श्रीस्वामींच्या विरुद्ध बाजूच्या पुढाऱ्यांकडून पूर्ण प्रोत्साहन मिळून त्यानें त्या वेळचे मे० रावबहादुर अरटाळ डि. डि. कलेक्टर साहेब यांजकडे अर्ज केला, व त्यांत रथोत्सव करण्याचा प्रघात यंदापासून सुरू करणार आहों त्यासही परवानगी असावी अशी विनंति केली. साहेबबहादुरांनीं जरूर ती चौकशी करून गदगय्यास जनावरांची जत्रा भरवून त्यांत रथोत्सव करण्यास परवानगी

दिली; व बंदोबस्ताकरितां पोलीस पार्टीही दिली. या परवानगीनें सदरी गदगय्या फुगून गेला; व येथील देवालयाचे पूर्ण मालक पुजारी श्रीपट्टचरमूर्तिस्वामी यांना न पुसतां त्यांना न कळवितांच आपल्या घरांतील देव्हाऱ्यावरील एक श्रीवीरभद्रमूर्ति रथांत बसवून मोठ्या थाटानें रथोत्सव चालू केला. हा प्रकार पाहून श्रीस्वामींना वाईट वाटलें व आम्ही असे हक्कदार असून नसून सारखेच असें वाटून त्यांच्या मनास खेद झाला. तेव्हां ते तत्काळ राव. ब. अरटाळ साहेबांकडे गेले व 'आमचा हक्क नष्ट करून आमचा पूर्ण नायनाट करण्याकरितां सतत प्रयत्न करणाऱ्या, व पिढीजाद विरुद्ध असलेल्या गदगय्यास, आपण केवळ आमचा अपमान करण्याकरितांच मुद्दाम मागितलेल्या मागणीस परवानगी देऊन आमच्या विरुद्ध जास्तच थैमान करण्यास अवसर दिला आहां. सबब श्रीक्षेत्र यड्डूर गांवांत आम्हांस राहा म्हणतां किंवा जा म्हणतां ते आपणच सांगावें.' असा रोखठोक त्यांस प्रश्न विचारिला. तेव्हां 'श्रीस्वामी आपणास सामील आहेत' असें खोटेंच सांगून आपणाकडून हुकूम मिळवून अशा विचित्र रीतीनें धुडगूस घालणाऱ्या गदगय्याचा साहेबबहादुरांस अत्यंत राग आला. त्यामुळें त्यांनीं श्रीस्वामीकडून हजर झालेल्या तक्रारी अर्जावरून व त्यासोबत हजर केलेल्या अस्सल कागदपत्रांवरून पूर्ण चौकशी करून गदगय्यास रथोत्सव बंद ठेवून ताबडतोब स्वारीमुक्कामीं जबाबास येण्याविषयीं रथोत्सवाच्या बंदोबस्ताकरितां पाठविलेल्या फौजदारामार्फतच हुकूम फर्माविला; या प्रकरणांत ओघानेंच श्रीवीरभद्रदेवालयांत व श्रीक्षेत्र यड्डूरांत कोणाचा किती किती हक्क आहे याची चौकशी करणें भाग पडल्यामुळें साहेबबहादुरांनीं: सदरी गदगय्या व श्रीस्वामी यांजबरोबरच येथील तत्कालीन वहिवाटदार श्री. नागनाथराव ऊर्फ आप्पासाहेब यांचाही जबाब घेऊन अखेर निकाल दिला कीं, 'श्रीस्वामींच्या परवानगीशिवाय श्रीक्षेत्र यड्डूरांत असे कोणत्याही प्रकारचे उत्सव करूं नयेत.' त्यावेळीं ओघानेंच आप्पासाहेबांना 'श्रीवीरभद्रदेवाचे पुजारी कोण ? आणि हल्लीं वहिवाट कशी आहे ?' असे प्रश्न जेव्हां विचारण्यांत आले तेव्हां त्यांनीं सांगि-

तलें कीं, ' श्रीस्वामी हेच, पुजेचे, एकंदर उत्पन्नाचे व मानपानाचे पूर्ण हक्कदार मालक आहेत. आमचा पूजा अगर उत्सवाच्या बाबींत बिलकूल संबंध नाहीं; ' या जबाबानें येथील भटांच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला, व श्रीस्वामींना आपला हक्क किती चोख आहे हें समजुन आलें. म्हणून त्या वेळेपासून श्रीस्वामी जास्त सावध झाले आणि आपल्या हक्काविषयीं ते जास्त जागरूक बनले. त्यामुळें पूर्वीपासून श्रीवीरभद्रदेवाच्या प्रत्यक्ष पुजेकरितां ठेविलेल्या जंगम नोकरांकडून पूर्वापार वहिवाटीप्रमाणें ज्या कबुलायती घ्यावयाच्या त्याप्रमाणें त्या आतां साध्या कागदावर एकसालीं न घेतां जास्त वर्षें मुदतीच्या कबुलायती नोंद [ रजिस्टर ] करून घेण्याची त्यांना जरूरी भासूं लागली. तसि अनुसरून याच सालीं म्हणजे सन १९१३ इसवींत शिवमूर्ति परवय्या राजांगळी याजकडून ५ वर्षें करारानें घेतलेली कबुलायत रजिस्टर करून घेतली; हीच पहिली रजिस्टर कबुलायत होय. ही कबुलायत पुढें वर्णिलेल्या अलीकडच्या प्रख्यात खटल्यांत हजर झाली होती. तिजवर असि. जज मे० नार्मन साहेब यांनीं ' साधणुकी-करितां केलेली कबुलायत ' असा शेरा मारिला. पण त्यावेळीं [ सन १९१३ त ] ' पुढें चार पांच वर्षांनीं येथील भट अशा प्रकारचा दावा करणार आहेत त्यांत उपयोगी पडेल ' असें श्रीस्वामींना स्वप्न पडलें होतें थोडेंच. फार तर त्या वेळेपासून श्रीस्वामी आपल्या हक्काविषयीं जास्त जाग-रूक झाले इतकेंच म्हणतां येईल. असो.

वरील रथोत्सवाच्या प्रकरणानें अगर रजिस्टर कबुलायतीनें येथील श्री-वीरभद्रदेवाच्या प्रत्यक्ष पुजेच्या बाबतींत सामान्य भक्तांच्या दृष्टीनें कांहीं फेरफार झाले नाहींत, अगर त्यांच्या मागची भटांची मगरमिठीहि ढिली झाली नाहीं, ही गोष्ट खरी असली, तरी श्रीवीरभद्रदेवालयांत अगर श्री-क्षेत्रयड्डूरांत कोणाचा किती हक्क आहे याची एकदां प्रचीति आली; आणि या खटल्याच्या निमित्तानें मठांत श्रीवीरभद्रदेवाच्या पूजेसंबंधीं कोणते कागद आहेत; व ते किती महत्वाचे आहेत हें समजून आलें. नाहीं तर त्या वेळे-पर्यंत भीतीनें ते सर्व कागद लपवूनच ठेविले होते. अशा प्रकारें अंधारांत

गडप झालेले सर्व कागद या वेळीं उजेडांत आले. या गोष्टीचा पुढील प्रख्यात खटल्यांत लिंगायत समाजास अत्यंत फायदा झाला. ही श्रीवीरभद्र देवाची कृपाच होय.

## (४) हल्लींच्या प्रख्यात खटल्याचें निमित्त कारण

ज्याप्रमाणें युरोपियन महायुद्धाची तयारी शेंपन्नास वर्षें अगोदरपासून चालू असल्यानें त्या जगड्व्याळ युद्धाच्या मानानें 'आस्ट्रियन राजपुत्राचा खून' ही सामान्य गोष्ट त्या युद्धास निमित्त कारण झालें. त्याचप्रमाणें येथेंही दोन्ही पक्षांची तयारी अनेक वर्षांपासून चालू असून लिंगायत पक्ष आपला एक प्रकारें कमी होत चाललेला वहिवाटीचा हक्क पूर्णत्वानें पूर्वीप्रमाणें संपादण्यासाठीं; तर ब्राह्मणपक्ष आपला नसता विनबुडाचा हक्क स्थिर करून सर्वच लिंगायतांना शह देण्याचा जारीनें यत्न करीत होता; परंतु या दोघांनाही अगम्य असा एक निराळाच चित्रपट भगवान श्रीवीरभद्रदेव रंगवीत होता. हे आम्हां अज्ञजनांस कसे कळणार? त्यानें या संग्रामास सुरवात होण्यास्तव पुढीलप्रमाणें घटना घडवून आणिली ती अशीः—

श्रीमन्निरंजन महाशिवयोगी श्रीसुरगेंद्रस्वामी अथणी यांच्या दर्शनांस गेलेल्या श्रीक्षेत्र निडसोसी मठाच्या परमपूज्य श्रीनिजलिंगेश्वर महास्वामींना परत स्वस्थानास जातेवेळीं श्रीक्षेत्र यड्डूरांतील परमपावन श्रीवीरभद्रदेवाचें व श्रीकाडदेवरुमठांतील स्वामींचें दर्शन घेऊन जावें, अशी सहज इच्छा झाली. तेंव्हां यड्डूरांतील श्रीसिद्धलिंगेश्वर पट्टचरमूर्तींना तशी अगोदर सूचना पाठवून नंतर दुसऱ्या दिवशीं आपल्या सर्व सरंजामासह ते श्रीक्षेत्रयड्डूरास गेले. तेथें श्रीपट्टचरमूर्तिस्वामी व दोन्हीं गावांतील सर्व जातींचे प्रमुख लोक, पालखी घेऊन श्रीवीरभद्रदेवालयांतील सर्व वादनकार सेवेकऱ्यांसह त्यांना सामोरे गेले. परस्पर भेटी झाल्या. नंतर श्रीनिजलिंगेश्वर महास्वामींना पालखींत बसवून वाजत गाजत मोठ्या समारंभानें श्रीकाड-

श्रीदुरदुंडेश्वर मठाधिपति—





श्रीकाडदेवरु मठाधिपति—



देवरुमठास पोहोंचविलें. दुसऱ्या दिवशीं महास्वामींच्या निमित्त मठांत जेवणाचें महाप्रयोजन ( दासोहसमारंभ ) झाला. या दोन दिवसांत मठांत पुराण, कीर्तन वगैरे झालें. त्यावेळीं दोन्ही गांवांतील बहुतेक सर्व ब्राह्मण पुढारीसुद्धां मठांत श्रवणास व दर्शनास येत. शेवटीं तिसऱ्या दिवशीं म्हणजे गुरुवार तारीख २० जून सन १९१८ इ. रोजीं भोजनोत्तर सुमारें दोन वाजतां श्रीनिजलिंगेश्वर महास्वामी निडसोसीस जाण्यास निघाले. तेव्हां पुनः मेण्यांतून मोठ्या समारंभानें सर्व पुढाऱ्यांसह मिरवणूक निघून ती श्रीवीरभद्रदेवालयांत आली. नंतर महास्वामी मेण्यांतून उतरून श्रीचरमूर्तिस्वामींसह यज्ञकुंडांत उतरून श्रीवीरभद्र गर्भदेवालयासमोर येत असतांना सहज म्हणाले कीं, 'आपण उंबऱ्याबाहेरूनच दर्शन घेऊन जाऊं या.' तेव्हां श्रीचरंतीस्वामींनीं श्रीवीरभद्र देवालय आपल्या स्वतःच्या मालकीचेंच असल्यामुळें त्या अभिमानानें म्हटलें, 'आमचेंच देवालय आहे. उंबऱ्याच्या आंत राहून दुरून दर्शन घेण्यास हरकत नाहीं. चला मी आपणास आंत नेतों.' असें बोलत ते उभय स्वामीमहाराज गर्भदेवालयासमोर आले. वरील संभाषण त्यावेळीं आंत पूजा करीत बसलेल्या सांभट त्रिंबकभट जोशी व शंकरभट खाडीलकर या दोघांनीं ऐकिलें असल्यानें आतां हे उभयस्वामी आनण आंत पुजेस बसलों असतांनाच गर्भदेवळांत शिरणार असें जाणून त्यांपैकीं सांभट पुढें येऊन दरवाजा अडवून उभा राहिला व श्रीचरंतीस्वामींना 'आह्मी येथें असतांना आपण आंत येऊं नका. बाहेरूनच दर्शन घ्या.' अशी विनंति करूं लागला! तेव्हां श्रीचरंतीस्वामी जरा रागानेंच ह्मणाले, 'श्रीमहास्वामींनीं गर्भदेवालय आंतून पाहिलें नाहीं, ह्मणून तूं अगोदर बाहेर पड. आमच्या परवानगीशिवाय तूं आंत गेलास कां तें सांग. आणि आमच्याच देवळांत फक्त उंबऱ्याच्या आंत राहण्यास तुह्मी हरकत काय म्हणून ?' यावर सांभट ह्मणतो, 'तुह्मी एकटे पाहिजे तर उंबऱ्याच्या आंत आतां राहा, पण ते बरोबरचे स्वामी नकोत.' हे शब्द ऐकतांच श्रीचरंतीस्वामीचें पित्त खवळलें व क्रोधानें संतप्त होऊनच त्यांनीं विचारलें

कीं, 'आमच्या गुरुस्वरूप पूज्यस्वामींना आंत येण्यास प्रतिबंध करून आमचा उपमर्द करणारे तुह्मी कोण?' हा वाद चालल्या-वेळीं तेथें असलेला दुसरा भट आंत बसल्या ठिकाणींच शंख ठोकीत ओरडूं लागला कीं, 'अरे, हे लिंगायत लोक आह्मी असतांना आंत येऊन सगळा भ्रष्टाकार करणार!' हा सर्व प्रकार अवलोकन करून श्रीनिजलिंगेश्वर स्वामीमहाराज पुनः म्हणाले कीं, 'स्वामी, सध्यां तंटा नको, आम्ही बाहेरूनच दर्शन घेऊं. आपण वाटाघाट करूं नका.' तरी श्रीचरंतीस्वामींचा राग कमी न होतां उलट ते क्रोधानें तप्त झाले व 'आमच्या मालकीच्या देवळांत आम्ही जात असतांना अडथळा करण्याला या भटांना काय अधिकार आहे?' असें म्हणून ते आंत निघाले; परंतु 'या अधिकार व हक्क वगैरेंचा विचार मागाहून करूं. तूर्त भांडण नको' असा सर्वांनीं मोडतां घालतांच श्रीचरंतीस्वामींचा निरुपाय झाला व ते तसेच रागारागानें श्रीमहास्वामिबरोबर श्रीवीरभद्रदेवालयाबाहेर आले. आणि त्यांना नदीकिनाऱ्या-पर्यंत पोहोंचवून मठास परत आले. या प्रकरणानें श्रीनिजालिंगेश्वर महास्वामींना अपमान वाटून मनस्ताप झाला असावा. कारण, आपण तेथें गेलोंच नसतों तर बरें, असें वाटणें साहजिक आहे. आम्हांस तर असें वाटतें कीं, भटांनीं महास्वामींचा हा जो अवमान केला त्या योगानें क्रुद्ध होऊनच श्रीवीरभद्रदेव भटांवर कोपला कीं काय कोण जाणे! कारण श्री-वीरभद्रदेव व निडसोसी मठाच्या गादीवरील कोणत्याही काळचे महास्वामी यांचा अन्योन्य असा कोणता गूढ संबंध आहे, कोण जाणे कीं, त्यामुळें ज्या ज्या वेळीं श्रीक्षेत्र यड्डरांत अत्यंत महत्वाची गडबड उत्पन्न व्हावयाची असेल त्या त्या वेळीं श्रीनिडसोसी मठाच्या महास्वामींचा त्यांत संबंध आलाच पाहिजे. (पहा पृष्ठ ४१८) अशी पूर्वापार वहिवाटच पडून गेली आहे. त्यास अनुसरूनच हल्लींच्या खटल्याचें कारण घडून आलें आहे. तें पूर्वपरंपरेस धरूनच आहे यांत शंका नाहीं.

श्रीनिजालिंगेश्वर महास्वामींना नांवेंतून नदीपार पाठवून श्रीचरंतीस्वामी मठाकडे आले. व सर्व लोकही आपापल्या घरीं गेले परंतु, झालेल्या

प्रकाराबद्दल सर्वांस धुगधुग होतीच, कारण लिंगायत लोक अशा प्रकारें ते आंत असतांही श्रीवीरभद्रगर्भदेवालयांत शिरण्याचा प्रयत्न करीत असतांना भट स्वस्थ बसतील हें शक्यच नव्हतें; आणि त्यांनीं कांहीं इलाज केल्यास त्याला प्रत्युत्तर देण्याची तयारी करणें श्रीस्वामी व इतर सर्व लिंगायतांना भागच होतें. श्रीचरंतीस्वामी त्यावेळीं रागाच्या भरांत जरी आपल्या अधिकारबजावणीची भाषा बोलून गेले, तरी मागाहून त्यांना अशी भीति पडली कीं, हे भट स्वस्थ बसणार नाहींत व गोष्ट कोणत्या कोणत्या थरास जाईल कोण जाणे. तशांत लिंगायत लोक निघून जातांच भटांनीं दुसरे कोणी याप्रमाणेंच शिवाशीव करीत गर्भदेवळांत शिरतील, या भीतीनें श्रीवीरभद्रगर्भदेवळास तें आपल्या स्वतःचेंच आहे असें समजून कायमचेंच कुलूप घातलें आहे; आणि सर्व भट 'वझे' वैद्यांच्या घरांत जमून खलबत करीत आहेत; असें ऐकतांच श्रीचरंतीस्वामींचें धाबेंच दणाणलें. कां कीं, ते स्वतः ह्यावेळेपर्यंत जवळ जवळ ब्राह्मणांच्या तंत्रानेंच वागणारे होते. किंबहुना अलीकडे ४।६ वर्षांत ब्राह्मणांशिवाय मठांतील पानही हालत नसे असें ह्मटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. असा प्रकार असल्यामुळें प्रमुख लिंगायत लोक श्रीस्वामींना तुह्मी इतकें कां भितां असा पुष्कळ दोष देत; पण ते तरी काय करणार ! ह्यावेळीं मठांतील कारभारी ब्राह्मण, श्रीस्वामींचे सल्लागार ब्राह्मण, फार तर काय मठाचा कारकूनसुद्धां ब्राह्मणच होता. अशा स्थितींत त्यांना ब्राह्मणांविरुद्ध असलेल्या या सामान्य भक्तांच्या वहिवाटीच्या हक्काची आठवण अगर तो हक्क परत मिळविण्याची छाती व्हावी कशी ! अर्थात् लिंगायत लोकांनीं तरी अशा ब्राह्मणांविरुद्ध भांडण्याच्या बाबतींत श्रीस्वामी नेटानें झटतील असा विश्वास कसा धरावा ! ह्मणून आतां ह्यावेळीं लिंगायत लोक फटकून वागणार व ब्राह्मण तिरस्कार करणार, तेव्हां भटांनीं खटल्याचें कांहीं किटाळ आणून घातल्यास साह्य कोणाचें मागावें ! हा श्रीचरंतीस्वामींना मोठा पेंच पडला. शिवाय ज्या सामान्य भक्ताकरितां श्रीस्वामींना इतका त्रागा करावा लागला त्यांना तरी त्याबद्दल कोठें जाणीव होती !

ह्मणून तेही तटस्थ वृत्तीनेंच पाहणार. हें श्रीस्वामींना कळत होतें ह्मणून ते मनांतून अगदीं भ्याले होते. इकडे भटांनाही या प्रकारानें अत्यंत संताप आला. पण तेही सर्वच लिंगायत लोक अशाप्रकारें सरांस शांत जाऊं लागल्यास आपला फायदा बुडेल व नकली श्रेष्ठत्व नष्ट होईल आणि श्रीक्षेत्र यड्डूरांत आपणास कुत्रासुद्धां विचारणार नाहीं; आणि प्राचीन-काळीं पेशवाई कारवाईनें फुकटाफाकट शिरकाव मिळून हातीं लागलेलें घबाड हातचें जाणार या भीतीनें गांगरून गेलेच होते. काय करावें हें त्यांनाही सुचेना. शिवाय श्रीचरंतीस्वामी पडले उत्पन्नदार व जरूर पडल्यास सर्व लिंगायत समाज त्यांना साह्य होईल हें ते जाणत होते. तेव्हां अशा वड्या प्रस्थाला जरबेंत ठेवावें कसें? हा मोठा विकट प्रश्न होता. यावेळीं कांहीं उथळ डोक्याच्या अनभिज्ञ भटांनीं श्रीस्वामींच्याविरुद्ध अकांडतांडव करून शिव्यांची लाखोली वाहिली व शेवटीं श्रीस्वामींसह येथील सर्व लिंगा-यतांना दस्तगीर करण्याचा हुकूम मिळविल्यावांचून आमचा संताप शांत होणार नाहीं ! असे अकलेचे तारे तोडिले. पण त्यांच्यांतीलच कांहीं अनुभववृद्धांनीं या उथळ पंडितांना उत्तर दिलें कीं, 'सध्यां लिंगायत लोकही कांहीं अशिक्षित नाहींत. त्यांच्यांतही रावबहादूर अरटाळ, मेण-सिनकाईसारखे डि. डि. कलेक्टर. मे० हालभावीसारखे मुनसफ. श्री० पावटे, कंबळीसारखे विद्वान् वकील व एक दोघे प्रसिद्ध बॅरिस्टरही आहेत. यांचें साह्य जर श्रीस्वामींस मिळालें व तें मिळणारही आणि पैशाच्या बाबतींत तर लिंगायत समाज आह्मांस केव्हांही हार जाणार नाहीं. मग ज्या बेड्या त्यांच्या हातांत घालण्याच्या वल्गना तुह्मी करितां त्या उलट कायमच्याच तुमच्या हातांत पडतील; तरी असा कांहीं अविचार करून उपयोग नाहीं. शिवाय श्रीवीरभद्रदेवालयांत तसा आमचा हक्क काय आहे?' असें ह्मणतांच त्या टवाळ भटांचीं तोंडें बंद झालीं. तथापि पुढें काय करावें? हा प्रश्न तेथील वड्या धेंडांनाही सुटेना ह्मणून सर्वानुमतें श्रीच-रंती स्वामींच्याच अन्नावर पुष्ट झालेले मठाचे त्या वेळचे कारभारी श्री. विष्णुपंत कुलकर्णी कल्लोळकर यांची सल्ला घेऊनच काय तें ठरवावें असें

योजून त्यांना तावडतोब बोलावून घेतलें. ते मठाचे कारभारीच असल्यानें त्यांस श्रीचरंतीस्वामींचीं बरींच बिंगें माहीत होतीं. ह्मणून त्यांनीं पूर्ण विचार करून सल्ला दिला कीं, 'श्रीचरंतीस्वामी हे भित्रे असून आमच्या सल्ल्याशिवाय त्यांचें चालावयाचें नाहीं व इतर लिंगायत पुढाऱ्यांचीही त्यांना सध्यां ओळख नाहीं. तरी खटल्याचा बाऊ दाखवून लगबगीनें त्यांजकडून " श्रीवीरभद्रगर्भदेवळांत आह्मी केव्हांही जाणार नाहीं; व आमच्या अनुयायांना जाऊं देणार नाहीं. " इतकाच फक्त लेख घ्यावा. ह्मणजे पुढें हवी तशी व्यवस्था करितां येईल.' अर्थात्‌च हा सल्ला सर्वांस पूर्ण पटला; परंतु असा लेख श्रीस्वामींकडून कोणी घ्यावा? असा प्रश्न पुढें आला. शेवटीं, ज्यांनीं युक्ति काढिली त्यांनींच पुढील कार्य करावें, हें साहजिकच असल्यानें सर्व भटांनीं विष्णुपंतांनाच तसा लेख लिहवून आणण्यास सांगितलें. तेही त्या गोष्टीस आनंदानें कबूल झाले व मग लागलेंच मठांत श्रीचरंतीस्वामीकडे आले आणि त्यांनीं आपला ब्राह्मण समाज आजच्या आपल्या कृतीनें किती खवळला आहे व तो किती समर्थ आहे, त्या मानानें तुह्मी किती असहाय्य आहां, त्यांच्या मर्जीविरुद्ध वागल्यास तुमची कशी फटफजिती होईल, इत्यादि गोष्टींचें भयानक कल्पनाचित्र श्रीस्वामीपुढें मांडिलें; आणि हें सर्व येथल्या येथें गुपचूप आटपून टाकावयाचें असल्यास ते मागतात त्याप्रमाणें ' आम्ही गर्भदेवळांत केव्हांही जाणार नाहीं व आमच्या अनुयायांस जाऊं देणार नाहीं ' इतकाच फक्त लेख लिहून द्या, म्हणजे मी त्यांची समजुत घालून त्यांना शांत करतों, असा अत्यंत पोक्त सल्ला दिला. येथें वाचकांनीं जरा शांत चित्तानें विचार करावा कीं, श्रीचरंतीस्वामीसारख्या आपल्या लिंगायत धन्याला त्यांचे विश्वासू ब्राह्मण कारभारी, संकटसमयीं अत्यंत जिव्हाळ्याचा इसम म्हणून सल्ला देतात कीं, ज्या श्रीवीरभद्रदेवालयांत शेंकडों वर्षें श्रीस्वामींचें पूज्य पूर्वज गुरुवर्य, श्रीवीरभद्रालिंगाची प्रत्यक्ष पूजा करीत आले व हे येत आहेत व जे या देवाचे हक्कदार पुजारी असून तेथील यचावत उत्पन्नाचा सर्वदा उपभोग घेत आले व येत आहेत, आणि मागें पूजा करण्याबावत व उत्पन्न

घेण्याबाबत ब्राह्मणांशीं अनेक तंटे होऊन त्या सर्वांस श्रीकाडदेवरु मठाचे स्वामीच सर्वदा हक्कदार ठरत आले आहेत. अशा श्रीवीरभद्रगर्भदेवालयांत ' आम्ही आणि आमचे अनुयायी केव्हांही जाणार नाहींत ' एवढासाच चिमुकला लेख लिहून द्या, असें म्हणणारे कारभारी मठाचे किती हितचिंतणारे व किती सरळ सल्ला देणारे असतील हें ओळखावें. 'यावरून प्रसंगी असा ब्राह्मण कसा खाल्ल्याघराचे वांसे मोजण्यासही कमी करीत नाहीं, हें जाणावें. आणि अशा हितशत्रूपासून सर्वांनीं दूर रहावें. असो.

अशा संकटकाळीं श्रीस्वामींना सल्ला देणारे अगर साह्य करणारे जे कांहीं जिल्हाळ्याचे समंजस लिंगायत इसम त्यावेळीं यड्डूरांत होते, त्या सर्वांना श्रीस्वामींनीं आपला कारभारी मठांत येण्यापूर्वींच मठांत बोलावून घेतलें होतें, व त्यांच्याशीं वरील गोष्टीविषयींच खल करीत ते बसले होते. इतक्यांत कारभारी साहेब ब्राह्मणकंपूकडून शिष्टाईकरितां आले व वरीलप्रमाणें आपला अमूल्य सल्ला देऊन त्याचा श्रीस्वामींवर काय परिणाम होतो हें सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण करूं लागले. वरील पोक्त सल्ला ऐकून श्रीस्वामी कारभाऱ्यास ह्मणाले, ' तुह्मी ह्मणतां त्याप्रमाणें आह्मीं लिहून द्यावें असें स्वतः तुह्मांस वाटतें काय ? ' त्यावर त्यांनीं लागलेंच उत्तर दिलें कीं, ' खुशाल लिहून द्यावें असें मला वाटतें. कारण जर केव्हांही आंत जाणार नाहीं असें तुम्हीं तोंडानें मला समक्ष आतां सांगतच आहां, तर तसें लेखी लिहून देण्यास काय हरकत आहे ? अशानें पुढील अप्रतिष्ठा व दगदग तरी टळेल ! यावर श्रीस्वामी गोंधळले व नंतर आपल्या स्वज्ञातीय जिल्हाळ्याच्या सल्लागारांचें यावर काय म्हणणें आहे तें पाहाण्याकरितां त्यांना म्हटलें, ' विष्णुपंत म्हणतात. तसा लेख लिहून द्यावा काय ? ' यावर त्यांतील एका चलाख इसमानें चटकन म्हटलें. ' आपल्या घरांत आपण केव्हांही जाणार नाहीं, असें आपण पाहिजे तर लिहून द्या; पण आम्ही मात्र आपणांस द्या म्हणणार नाहीं किंवा नकोही म्हणणार नाहीं.' या उत्तरांतील खोंच कारभाऱ्यानें तत्काळ ओळखिली व आतां आपला

सर्वच डाव फसणार; ही मंडळी यांना तसा लेख मुळींच देऊं देणार नाहींत; असें जाणून ते श्रीस्वामींना वरील सल्ला देणाऱ्या इसमावर संतापून उठले व क्रोधानें ह्मणाले ‘ अहो शिष्ट, तुम्ही असा घातक सल्ला देऊन हें विझूं पाहाणारें प्रकरण पुन्हां पेटवितां हें लक्षांत ठेवा. श्रीवीरभद्रदेऊळ हें तुमचें घर कसें? तेव्हां तितक्याच जोरदार स्वरानें त्याच इसमानें लागलीच उत्तर केलें. ‘मग काय तें तुमचें घर काय? जर तुमचें (ब्राह्मणांचें) तें हक्काचें घर आहे तर श्रीस्वामींची लेखी कबुली कां मागतां? या सडेतोड उत्तरानें कारभारी निरुत्तर झाले व श्रीस्वामींच्या हृदयांत चक्क उजेड पडला. तेव्हां हिरमोड झालेले संतापातिशयानें खवळलेले कारभारी श्रीस्वामींना म्हणतात, ‘ आपण पुढील अनर्थपरंपरेकडे लक्ष देऊन मी म्हणतों तसें करा; नाहींपेक्षां मलाही प्रसंगीं आमच्या समाजाकरितां आपल्याविरुद्ध जाणें भाग पडेल. ’ या धमकावणीच्या भाषणानें श्रीस्वामींचा निद्रिस्त क्रोध जागृत झाला आणि त्यांनीं अत्यंत खवळून जाऊन रोखठोक उत्तर दिलें कीं, ‘ श्रीवीरभद्रदेवाच्या मनांत असेल तसें होईल. तुम्ही पुढें आमच्याविरुद्ध येण्याची भीति दाखवितां सबब आतांच मठाची पायरी उतरून खुशाल चालते व्हा.’ या उत्तरानें कारभारी पूर्ण विरमले व रागारागानें मठांतून निघून गेले. आणि त्यांनीं श्रीस्वामींचें उत्तर ऐकण्यास व लेख वाचण्यास टपून बसलेल्या बकध्यानी भटमंडळींना ‘ श्रीस्वामींच्या सल्लागारांनीं आग लाविली आतां पुढील तजविजीस लागा. आतां श्रीस्वामी कोणताच लेख देणार नाहींत. ’ असा भ्रमाचा भोंपळा फोडला! तेव्हां सर्व भट संतापानें शेंडी झाडूं लागले; व तेथील लिंगायत पुढाऱ्यांवर मनसोक्त शिव्यांची लाखोली वाहून त्याच दिवशीं रात्रीं पुढील तजविजीकरितां ते सर्वजण चिकोडीस निघून गेले.

## ५ उद्योगपर्व.

चिकोडींत श्री० गोविंदराव यद्लूरकर वकिलांच्या घरीं सर्व मंडळी जमली व श्रीस्वामीवर कशा तऱ्हेचे प्रयोग करावे आणि त्यांना कसे वठ-

णीस आणावें याचा तेथील आणखी बऱ्याच वकील मंडळींच्या सल्यानें खल चालविला. तारीख २१ शुक्रवारीं सर्व दिवसभर वाटाघाट होऊन ठरल्याप्रमाणें शनिवार ता० २२।६।१८ इ. रोजीं वादी सांभट लिंवकभट जोशी यानें चिकोडी सबजज्ज कोर्टांत श्रीचरंतीस्वामी यांना प्रतिवादी करून खालीलप्रमाणें मनाई दावा केला तो:—

'आह्मीच श्रीवीरभद्रालिंगाच्या पुजेचे हक्कदार पुजारी आहों. व गर्भदेवळांत लिंगा[1]पुढें ठेविलेल्या जिनसा आम्हीच घेतों. फक्त पंचद्रविड ब्राह्मणच गर्भदेवळांत जातात. सबब श्रीचरतीस्वामींनीं गर्भदेवळांत प्रवेश केल्यास लिंग भ्रष्ट[3] होतें. करितां त्यांना गर्भदेवळांत जाण्यास कायमची मनाई असावी.' असा दावा केला. व हा दावा करण्यास कारण असें दाखविलें कीं, 'लिंगायत समाजांत अलीकडे सुधारणा होऊन ते श्रीवीरभद्र गर्भदेवालयांत शिरण्याचा प्रयत्न करीत आहेत.' [ जणूं काय यापूर्वी कोणी लिंगायत आंत जातच नव्हते. ]

यावेळीं चिकोडी कोर्टांत मे० 'असुंडी' या नांवाचे वैष्णव मुनसफ होते. त्यांजपुढें वरील प्रकारें दावा करून लागलीच एकतर्फी मनाई मागितली; आणि अशी मनाई न दिल्यास ब्राम्हणसमाजाचें भयंकर नुकसान आहे असें भासविलें; परंतु त्यांनीं, 'तुम्हीच देवालयाचे मालक आहांत, अशी कोर्टाची खात्री झाल्याशिवाय तशी मनाई आम्हांस देतां येत नाहीं असें स्पष्ट सांगितलें. या उत्तरानें भटांचा निरुपाय झाला व श्रीस्वामींना वाटलें कीं, हे मुनसफ जरी ब्राह्मण असले तरी अत्यंत निःपक्षपाती आहेत;

१ मागें याच भटांच्या पूर्वजांना अगर भवानगवाला सर्वच उत्पन्न आपलें वाटत होतें, पण यांनीं लिंगापुढील व बाहेरील असे दोन भाग पाडिले. असा भाग मागें कधींच केला गेला नाहीं व होणें शक्यही नाहीं.

२ मागें श्रीमरिकाडदेवरु स्वामींच्या वेळीं ब्राह्मणांनीं आंत जाण्याची वहिवाट पाडिली; त्यापूर्वी हे पंचद्रवीड ब्राह्मण कोठें जात होते ?

३ लिंगायतांनीं लिंगस्पर्श केल्यास तें भ्रष्ट होतें ! हा तर विसाव्या शतकांतील अजब शोध होय. अर्थात् हा दावा करण्याच्या घटकेपर्यंत लिंग भ्रष्टच होतें.

त्यांजपुढें आपला खटला चालल्यास योग्य न्याय मिळेल; परंतु आश्चर्य हें कीं, शनिवारीं असें म्हणणारे मुनसफसाहेब लागलेच सोमवार ता. २४ रोजीं कोर्टांत आल्याबरोबर श्रीस्वामींच्या नांवानें एकतर्फी मनाई नोटीस देऊन मोकळे झाले. तेव्हां मध्यंतरीं भटांनीं 'आपण मालक आहों' अशी सुटीच्या दिवशींच त्यांची कशी खात्री करून दिली व त्यांची खात्री कशी झाली देव जाणे! असो. हा प्रकार पहातांच श्रीस्वामींना एकदम शंका आली व त्यांजपुढें खटला चालविणें धोक्याचें आहे असा त्यांचा पक्का ग्रह झाला.

इकडे गुरुवार ता.२० जूनरोजीं रात्रीं श्रीचरंतीस्वामींनीं आपल्या कारभाऱ्यांना मागें सांगितल्याप्रमाणें खरमरीत उत्तर देऊन त्यांना मठाबाहेर घालविलें; पण त्यावेळीं श्रीस्वामींना अगर त्यांच्या सल्लागारांना पुढें काय करावें हें सुचेना. शेवटीं ज्या श्रीवीरभद्रदेवानें असें उत्तर देण्याची बुद्धि दिली तोच पुढेंही मार्गदर्शक होईल. अशी मनाची कांहींतरी समजूत करून घेऊन श्रीस्वामींना 'आपण धैर्य सोडूं नका,' असें सांगून ती सर्व मंडळी मठांतून आपापल्या घरीं गेली. तथापि श्रीचरंतीस्वामींना भयंकर काळजीनें ग्रासिलें. त्या सबंध रात्रींत त्यांच्या डोळ्यास डोळा कसा तो लागला नाहीं. आणि लागावा तरी कसा? आपलीं अनेक वर्मे माहीत असलेलीं पाताळयंत्री ब्राह्मण मंडळी सर्वस्वीं आपल्या विरुद्ध जाणार आणि त्यांस तज्ज्ञातीय अधिकारी वर्गाचें साह्य मिळणेंही साहजिकच आहे. मगते पुढें काय करितील काय न करितील याचा नेम कोणी सांगावा? म्हणून श्रीस्वामींचें मन अत्यंत भयत्रस्त झालें होतें. परंतु इतक्या घाबरट परिस्थितींत सुद्धां ब्राह्मण मागतात तसा लेख लिहून देऊन या कटकटींतून एकदां कायमचे मुक्त व्हावें, असें त्यांना स्वप्नांतसुद्धां वाटलें नाहीं! आणि श्रीस्वामीसारखी पूर्ण ब्राह्मणाळलेली व्यक्ति ब्राह्मणांच्या विरुद्ध वागण्यास सिद्ध झाली हें आश्चर्य होय. किंवा यांत आश्चर्य तरी कसलें? खऱ्या वीरांचा वीर जो श्रीवीरभद्र देव तोच त्या भटांच्या वारंवार होणाऱ्या त्रासास कंटाळला असावा. आणि आपले भोळे भाविक खरे भक्त आतां

यापुढें दूर राहविले जाणार, हें इष्ट नसून त्यांनाच नेहमींप्रमाणें जवळ घेणें जरूर आहे असें त्यास वाटलें असावें; म्हणूनच श्रीस्वामींना वरीलप्रमाणें धैर्य आलें. वास्तविक भट हे श्रीवीरभद्रदेवाची पूजा भक्तीनें मुळींच करीत नव्हते; कारण, तसें असतें तर वरीलप्रमाणें साधारण वाटाघाट होतांच त्यांनीं इतर भक्त आंत जातील या भीतीनें ता. २० ते २२ जून अखेर तीन दिवस श्रीवीरभद्रगर्भदेवळास सर्व दिवसभर कुलूप घालून जवळ जवळ पूजा बंदच केल्यासारखी स्थिती दिसत होती; तसें ते करते ना! दिवसा देवाला उपाशी पाडून स्वतः चैनींत चहा पिणाऱ्या या स्वार्थसाधू भटांना भाविक कसें म्हणावें? प्राचीनकालापासूनच, क्षत्रिय, वैश्य, शूद्रादि वर्णांनीं देवाची दलाली करण्याचा सर्वच मक्ता स्वखुषीनेंच ब्राह्मणांस दिला असल्यानें दलालीच्या आशेनें म्हणजे एकप्रकारें भोळें भक्ति करावयास लाविलेल्या या ब्राह्मणभटांमध्यें बहुधा खऱ्या भक्तीपेक्षां देवतादलालीच्या अनुषंगानें उत्पन्न होणारा ढोंगीपणाच जास्त बोकाळला आहे अशी इतिहास साक्ष देत आहे. असो.

अशा प्रकारें दिवसा पूजा बंद असलेली पाहून श्रीस्वामींना व नित्यनेमानें पूजा करणाऱ्या अनेक भक्तांना फारच वाईट वाटलें. कायद्याच्या भीतीनें, कुलूप तोडून दर्शन घेऊन पूजा अर्चा करण्याचें धैर्य वरील भक्तांना न झाल्यानें श्रीस्वामींसह कित्येक भाविक भक्तांनीं वरील तीन दिवस उपोषण केलें! भट चिकोडीस गेल्यानंतर दुसऱ्या (ता. २१) दिवशीं सकाळीं श्रीस्वामींना चिकोडीस जाणें भागच पडलें. त्यापूर्वीं गुरुवारीं सबंध रात्रभर जागून त्यांनीं आपणास समजले तितके जुन्या दप्तरांतील या खटल्याच्या उपयोगाचे सर्व कागद काढिले व सकाळीं ते सर्व घेऊन चिकोडीस निघाले. हल्लींच्या काळीं सुशिक्षित ह्मणविणाऱ्यांचा शकुनांवर बहुधा विश्वास नसतो; तथापि श्रीस्वामी जेव्हां प्रथमच घोड्यावरून चिकोडीस निघाले तेव्हां त्यांना जे शुभसूचक शकुन झाले ते ध्यानांत ठेवण्यासारखे आहेत. प्रथम मठाची हद्द ओलांडतांच खुद्द मुख्य वादी जो सांभट त्रिंबकभट त्याची बायको नदीस्नान करून बैलावरील माकणींतून चार व

बगलेंत एक अशा पांच भरलेल्या घागरींसह समोर आली! नंतर श्रीस्वामी श्रीवीरभद्रदेवालयांत जाऊन श्रीउत्सवमूर्तींच्या दर्शनास निघाले. तोंच तेथें पुजारी देवास नैवेद्य अर्पण करीत होता. मग दर्शन घेऊन श्रीउत्सवमूर्तीस कौल लाविला तों त्या देवाच्या उजव्या हातांतील खड्गावरील प्रफुल्लित गुलाबाचें फूल उजवीकडे पडलें! या तीन्ही उत्तम शकुनांवरून श्रीस्वामींना बराच धीर आला व निदान श्रीवीरभद्रदेवतरी आमच्या बाजूस असून उलट कांहींतरी सुचिन्ह आहे अशी त्यांची पक्की खात्री झाली. मग ते लागलेच श्रीवीरभद्रदेवालयाबाहेर पडून फक्त पुजारी परवया राजांगळी या एकट्यास बरोबर घेऊन ते कल्लोळच्या वाटेनें चिकोडीस निघाले. त्यावेळीं शुभशकुनांनीं मनास झालेला उल्हास क्षणभर टिकला, नंतर त्या उल्हासाच्या जागीं उद्विग्नता उत्पन्न झाली. कारण प्रयत्नावांचून नुसत्या शुभशकुनांनींच जर कोर्टकचेऱ्यांतील खटले आपल्याप्रमाणें निकालांत निघते तर सर्व जागृत देवालयांतून तशा हजारों ऐदी भक्तांचा देवांभोंवतीं गराडा पडला असता. त्यामुळें प्रयत्न व तोहि अत्यंत शिकस्तीचा प्रयत्न केला तरच आपला यांत निभाव लागेल :हें श्रीस्वामी जाणून होते म्हणून श्रीवीरभद्रदेवालयाबाहेर पडतांच त्यांचें चित्त भयंकर चिंतेनें व्यास झालें यांत आश्चर्य काय! त्यांना त्यावेळीं कोणीकडे जावें, कोणाचा सल्ला घ्यावा, काय करावें, हें कांहीं सुचेना. अशा चिंताग्रस्त मनस्थितीमुळें त्यांची चालही मंदावली, आणि कोठें जावयाचें याचा कांहींच निश्चय नसल्यामुळें ते अत्यंत जड पावलानें चालले होते.

अशा प्रकारें जातां जातां शेवटीं १॥–२ तासांनीं ह्मणजे सुमारें सकाळचे १० वाजतां श्रीक्षेत्र यड्डूरापासून अवध्या एक मैलाच्याच अंतरावर असलेल्या कल्लोळास पोहोंचले! तेथें जातांच श्रीस्वामींना पुनः आपल्या कारभाऱ्याची आठवण झाली. काल जरी खटका उडाला होता तथापि खाल्लेल्या अन्नास विष्णुपंत थोडे तरी जागतील व आज कांहीं तरी योग्य सल्ला देतील; असें त्यांच्या भोळ्या मनास वाटत होतें. म्हणून जातां जातां रस्त्यावर राहूनच श्रीस्वामींनीं विष्णुपंतांना आपल्याजवळ बोलावून घेऊन

ह्मटलें. 'तुम्ही आमचे विश्वासू कारभारी, मागें अनेक खटल्यांत अभिमानानें आमच्या तर्फे तुम्ही काम केलेलें आहे; तरी या वेळींही तुम्ही आम्हाबरोबर चला, व एकदांची ही भानगड मिटवा.' तेव्हां त्यांनीं लागलेंच ओळखिलें कीं, श्रीस्वामींच्या अंगीं कालचा गरमपणा मुळींच राहिला नसून ते बरेच नरम झाले आहेत; व आपण आणखी जरा ओढून धरिलें कीं, ते अत्यंत नरम होतील. मग आम्ही सांगूं तसे ते मुकाट्यानें ऐकतील असें पक्कें समजून त्यांनीं उत्तर केलें, 'मी सध्यां आपल्याबरोबर येण्याची जरूरी नाहीं. ब्राह्मण मंडळी अत्यंत खवळली असून ती आतां चिकोडींत श्री. यड्डूरकर वकिलांच्या घरीं जमली असेल. तेथें जाऊन त्यांजपुढें क्षमेची याचना करा, ह्मणजे त्याचा राग शांत होऊन ती स्वस्थ बसेल, व सर्व भानगड आपोआप मिटेल. नाहीं तर परिणाम भयंकर होऊन तो निस्तरणें आपणांस अत्यंत कठीण होईल.' तेव्हां श्रीस्वामी अत्यंत काकलुतीनें म्हणतात, 'मग आमच्यातर्फे तुम्हीच एवढें काम करा चला म्हणजे झालें. कारण कसें झालें तरी तुम्ही आमचे विश्वासू व पूर्ण मुखत्यार कारभारीच आहांत, तेव्हां आमच्याकरितां तुम्ही क्षमा मागण्यास हरकत नाहीं; व ते ब्राम्हण तुमचे म्हणणें शब्दशः मान्य करितील. तरी जरूर चला.' यावर कारभारी म्हणाले, 'तूर्त माझें तेथें कांहीं काम पडणार नाहीं. जरूर पडल्यास ते भटजी मला बोलावू पाठवितीलच. तेव्हां मी तावतोब येऊन सर्व व्यवस्था करीन; आतां आपणच चलावें. सध्यां मी येत नाहीं.' असें चक्क उत्तर देऊन ते तडक घरांत निघून गेले. मनांतील हेतू हा कीं, आतां हे चिकोडीस जातील. तेथें जमलेल्या भट, वकील वगैरे ब्राम्हण समूहाची हे मनधरणी करितील. ते यांचे कान चांगलें पिरगाळून यांना शुद्धीवर आणितील; मग यांजकडून कसा लेख घ्यावा हें ठरविण्याकरितां श्रीस्वामीतर्फेचे पूर्ण माहितगार म्हणून मला बोलावितील; तेव्हांच जाऊन तेथें सर्वांसमक्ष श्रीस्वामींना उपदेशपर दोन गोष्टी सांगून, भटांचें ( ब्राम्हणांचे ) महत्व त्यांच्या मनावर बिंबवून, मग हवा तसा अघळपघळ लेख लिहून घ्यावा. व अशा प्रकारें श्रीस्वामींच्या परंपरागत पूर्ण

हक्कावर सफाई बोळा फिरवावा, आणि या रीतीनें ब्राम्हणकंपूपुढें आपली बहाद्दरी दाखवावी. तसेंच श्रीस्वामींना या संकटांतून अचानक वांचविल्याचा आव आणून इकडून ही भलीभलायकी व साधल्यास ओली शाबासकी मिळवून आपला खिसा पुनश्च गरम करावा ! असा श्रीस्वामींच्या अन्नावर पोसलेल्या या पंतांचा सोज्वळ विचार असावा; परंतु कारभाऱ्यांच्या मनांतील हे सर्व शेखमहंमदी राज्यांतील सोन्याचे मनोरे श्रीवीरभद्रदेवाच्या कृपेनें वाऱ्याबरोबर उडून गेले; व कारभाऱ्यांच्या कृतघ्न हृदयाचें स्वरूप मात्र कसें उघड झाले हें ओघानें पुढें कळून येईलच.

विष्णुपंताच्या या भाषणानें अगोदरच घाबरलेल्या श्रीस्वामींच्या मनाची अत्यंत घाबरगुंडी उडून गेली. व आतां आपल्यावर हे कोणतें संकट आणितील व काय करतील याची काळजी लागून त्यांचीं पावलें पुढें उचलेनातच. आपल्यावर आकाशाची कुऱ्हडच कोसळली असें त्यांना वाटलें. अशा प्रकारें कारभाऱ्यांकडून झिडकारले गेलेले श्रीस्वामी त्यांच्या मनानें तरी त्यावेळीं सर्वतोपरी निराश्रित बनले. या अफाट दुनियेंत आतां आपणांस कोणाचें साहाय्य मिळेल? कोण शहाणा यांवेळीं योग्य सल्ला देईल? या विवंचनेंतच श्रीस्वामी कल्लोळाहून पुढें निघाले. ते निघाले ह्मणण्यापेक्षां त्यांच्या घोड्यानेंच त्यांना नेलें म्हणणें जास्त शोभेल. कारण त्यावेळीं किंकर्तव्यमूढ बनलेले श्रीस्वामी कोठें जाणार होते हें त्यांचें त्यानाच माहीत नव्हतें. त्यामुळें अत्यंत जड पावलानें जातां जातां संध्याकाळीं सुमारें ४ वाजतां ते एकसंब्यास गेले. तेथील श्रीमंत चनबसापा मलापा अण्णा कराळे हे नुकतेच सरकार–दरबारच्या कामांत जरा पुढाकार घेऊं लागले होते, हें श्रीस्वामींना माहीत होते. ह्मणून त्यांची जरी तशी पक्की ओळख नव्हती, तथापि तोंडओळख असून या बाबतींत ते कांहीं तरी योग्य सल्ला देतील असें त्यांना वाटत होतें. ह्मणून ते तडक त्यांच्या घरीं गेले. चनबसाप्पाअण्णांनीं त्यांचा आदरसत्कार करून आसनावर बसवून कुशल प्रश्न विचारिले; परंतु श्रीस्वामींचा चेहरा अत्यंत म्लान झाला असल्याचें पाहून विनंति केली कीं, ' महाराज आपण कडक उन्हांतच प्रवास,

करून आला असल्यामुळें अत्यंत श्रमलां आहांत तरी अगोदर स्नान करून भोजन आटपा चला, मग आपण बोलत बसूं ' श्रीस्वामींना यावेळीं भुकेचें भान कोठचें! पण अतिशय तहान लागली होती ह्मणून ते लागलेंच उठले, व स्नान शिवपूजा करून परवच्यासह थोडासा फराळ कसा तरी पाण्याबरोबर गिळला व बाहेर येऊन बसले. नंतर आतांपर्यंत घडलेला सर्व वृत्तांत अण्णापुढें सांगून पुढें काय इलाज करावा असें विचारलें. अण्णा नुकतेंच राजकारणांत जरा जरा लक्ष घालूं लागले होते; व ह्यावेळेपर्यंत आपले सर्व प्रकारचें वजन खर्च करून त्यांनीं श्री. विष्णुपंत कुलकर्णी कल्लोळकर (श्रीस्वामींचे वर सांगितलेले कारभारी) यांनाच वाढवून लोकलबोर्ड मेंबर व त्यायोगें ' रावसाहेबही ' बनविलें होतें, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. प्रसंगीं अण्णा पंतांचीच सल्ला मसलत घेत. त्यामुळें अण्णांनीं ' या बाबतींत विष्णुपंतांचाच सल्ला घेऊं ' असें श्रीस्वामींना सांगितलें आणि त्यांना तात्बडतोब बोलावून आणण्यासाठीं कल्लोळास एक माणूस पाठविला. श्रीस्वामी अण्णांना ह्मणाले कीं, ' विष्णुपंत बहुधा यावयाचे नाहींत. कारण तुह्मी इतक्या तांतडीनें कां बोलाविलें आहे हें त्यांना कळल्याशिवाय राहावयाचें नाहीं. ' पण अण्णांना आजपर्यंतच्या अनुभवारून असें पक्कें वाटत होतें कीं, विष्णुपंत हे अत्यंत प्रामाणिक मनुष्य असून ते आपल्या निरोपासरशीं नेहमींप्रमाणें तांतडीनें येतील व या बाबतींत निःपक्षपातपणें आपली सल्ला देतील; परंतु अण्णांच्या या समजुतीच्या भ्रमाचा भोपळा लागलाच फुटला. कां कीं, कल्लोळास गेलेला मनुष्य रात्रीं ७ वाजण्याच्या सुमारास परत आला. व त्यानें, विष्णुपंतांनीं ' यडूरचे श्रीस्वामी तेथें आलेत काय ? ' असें विचारून मग ' मला आतां येण्यास सवड नसून उद्यां परवां सवडीनुसार येऊन अण्णांना भेटतों. ' असा त्यांचा निरोप अण्णांना व श्रीस्वामींना कळविला. तेव्हां या चन्नबसवेश्वराच्या डोक्यात चक्क प्रकाश पडला; व श्रीस्वामींचें म्हणणें त्यांना पूर्ण पटलें. मग मात्र स्वारी विष्णुपंतावर अत्यंत खवळली. व ' आमच्या प्रयत्नानें आणिं पूर्ण साह्यानें पुढें आलेला हा भट इतक्यांत अशा आणी-

वाणीच्या प्रसंगीं निरोपासरसा न येण्याइतका चढेल बनला काय ?' असें म्हणून दांत ओंठ खात जागच्याजागीं ते स्वस्थ बसले. त्यांनाही त्यावेळीं कायद्याचें ज्ञान यथायथाच असल्यामुळें या प्रचंड खटल्यांत काय सल्ला द्यावा हें समजणें त्यांच्या अथवा त्यांच्याच काय किंबहुना मी मी म्हणणाऱ्या कसलेल्या वकिलांच्याही कुवतीच्या बाहेरील असल्यानें त्यांनीं त्या बाबतींत कांहींच सल्ला दिला नाहीं. मात्र पंताप्रमाणें श्रीस्वामींना जरतच घाबरवून सोडणारें गुळमुळीत भाषण न करितां त्यांना धीर देऊन म्हटलें, 'आपण केली ही गोष्ट अत्यंत योग्य झाली आहे. ते भटभाई काय करितात ते खुशाल करूं देत. आपण मात्र धीर न सोडतां नेटानें अखेरपर्यंत पल्ला पोहोंचवा. हजारों रुपये खर्च झाले तरी डगमगूं नका.आपण कोणाचा घातपात केला नसल्यानें भटांकडून आपलें मुळींच वांकडें होणार नाहीं. प्रसंगच आल्यास आम्ही आपणांस सर्वप्रकारें साह्य करण्यास सर्वदा सिद्ध आहों, आपण मुळींच भिऊं नका' असा दुजोरा दिला. हें धैर्य देणारें व अधिकार वाणीनें मनापासून केलेलें उत्तेजनपर भाषण ऐकून श्रीस्वामींना वाटलें कीं, आपण केलेलें कृत्य अन्याय्य नसून न्यायाचें आहे व त्याला पाठबळ देण्यास आपल्या समाजांतील अण्णासारखे समंजस श्रीमंत लोक सिद्ध आहेत. असें पाहतांच श्रीस्वामींना तेव्हां किंचित् धीर आला व ते अण्णांना आपल्याबरोबर निघा म्हणाले. पण हा खटला पुढें कोणत्या थराला जाईल त्याचा कांहींच थांग लागत नसल्यानें व हें कार्य म्हणजे एकप्रकारें ब्राम्हणसमाजरूपी नागसर्पाच्या शेपटीवर पाय देण्याचेंच असल्यामुळें व शिवाय त्यावेळीं चिक्कोडी तालुकाच काय पण सर्व महाराष्ट्र आंग्लाईतील 'पेशवाई' बनून जाण्याचा संभव दिसत होता. कारण त्यावेळचे बहुतेक ब्राम्हण अधिकारी, ब्राह्मणेतर म्हणजे शूद्र, अतएव त्यांना वेदाधिकार नाहीं, अशा मताचे असून त्यांजकडून ब्राह्मणेतरांना पदोपदीं अडथळा होत असे, म्हणून श्रीचनबसाप्पाअण्णा, विष्णुपंतावरील रागाच्या भरांत जरी श्रीस्वामींना धीर देण्यास्तव वरीलप्रमाणें बोलले तरी त्यांजब-

-रोबर जाण्याचें धैर्य त्यांना झालें नाहीं. यावरून त्यावेळीं ते ब्राह्मणांना वचकत असत हें उघड दिसतें. म्हणून त्यांनीं श्रीस्वामींना ' तूर्त आपण पुढें चलावें, मी मागाहून येत आहें; ' असें सांगून वाटेस लाविलें.

## [ ६ ] संग्रामास सुरुवात.

शनिवार तारीख २२ जून रोजीं सकाळीं श्रीस्वामी एकसंब्याहून खिन्नांतःकरणानें निघाले ते १० वाजण्याच्या सुमारास चिकोडीस श्रीचरंतीस्वामींच्या मठांत आले. तेथें येतांच त्यांचीच वाट पाहात असलेल्या पेठेंतील प्रमुख पुढारी, शिवमूर्ति कल्लय्यास्वामी कवटगी, शिवमूर्ति सुरगय्यास्वामी वस्त्रद, श्री.शिवाप्पा अण्णा संमतशेट्टी, श्री.साळी, श्री.नवलीहाळकर वगैरे मंडळींनीं त्यांची भेट घेतली. तेव्हां श्रीस्वामींनीं कची हकीकत सांगून त्यांजपुढें आपल्याबरोबर आणिलेला कागदपत्रांचा भारा टाकून आवेशानें म्हटलें, आपणांस आपल्यां समाजाचा कांहीं अभिमान असल्यास या कागदपत्रांच्या भाऱ्यांत काय लिहिलें आहे तें पाहून आमचा श्रीवीरभद्रदेवळांत काय हक्क आहे तें ठरवा व तो हक्क प्रस्थापित करण्याकरितां संघशक्तीनें ब्राह्मणांशीं टक्कर द्या. नसल्यास आम्हांस देशोधडीस लावण्याची भटांची प्रतिज्ञा पूर्ण होऊं द्या. ' हें अत्यंत अभिमानास्पद पण वैताग येऊन केलेलें वर्मीं झोंबणारें भाषण ऐकून तेथें जमलेल्या त्या सर्व पुढाऱ्यांना भटांचा अत्यंत राग आला. शिवाय त्यावेळीं असा राग येण्यास दुसरेंही एक कारण झालें होतें. तें हेंच कीं तारीख २० गुरुवार रोजीं यड्डूरच्या देवालयांत गडबड झाल्याची बातमी ब्राह्मणांकडूनच ता. २१ रोजीं चिकोडींत पसरली होती व त्याबरोबरच ' यड्डूरच्या श्रीचरंतीस्वामींना व तेथल्या लिंगायत पुढाऱ्यांना फार मस्ती आली आहे त्यांचीं खोडकी जिरवून आतां ताबडतोब पकडवून आणिलें पाहिजे ' अशी सर्व दिवसभर कोर्टकचेऱ्यांतून भटांची आपापसांत चाललेली बडबड ऐकून तेथें जाणाऱ्यायेणाऱ्या लिंगायत सम्यग्हस्थांना व कारकुनांना यड्डूरची ही काय गडबड आहे व हे भट श्रीचरंतीस्वामींच्या नांवें कां खडे फोडीत आहेत हें नीट कळेना व कोणा भटांना

विचारिल्यास ते नीट सांगतना. त्यांमुळें श्रीस्वामी व लिंगायत लोकांची ती चाललेली निंदा निमुटपणें ऐकिल्यावांचून गत्यंतर नव्हतें. कारण खरी हकिकत कळल्यावांचून भटांना उत्तर देतां येईना व श्रीस्वामी अगर दुसरे कोणी यल्लूरचे लिंगायत इसम आल्यावांचून खरी परिस्थिति कळावी कशी ? अशा पेचांत सांपडल्यामुळें मनांतल्या मनांत जळणाऱ्या त्या लिंगायत पुढाऱ्यापुढें ता. २२ रोजीं सर्व हकीकत व कागदपत्रें वर सांगितल्याप्रकारें येऊन पडतांच, राईचा पर्वत करून श्रीचरंतीस्वामींच्या नांवानें काल सर्व दिवसभर त्वंपुरा करीत भटकणाऱ्या भटांचा कावा त्यांच्या लक्षांत येऊन या मालकाअधींच आरडाओरड करणाऱ्या ऐतखावूंची त्यांना अत्यंत चीड आली व त्या सर्वांनीं श्रीस्वामींना सांगितलें कीं, 'आपण स्नान, शिवपूजा करून स्वस्थ चित्तानें भोजन करा; तोंपर्यंत आह्मी हे सर्व कागद पूर्ण वाचून पाहातों मग काय तें ठरवूं. इतके महत्वाचे कागद आपणांकडे असतांना कोणता ब्राह्मण अधिकारी आपल्याविरुद्ध कसा निकाल देतो व काय करितो हेंच आह्मी पाहातों; आपण मुळींच काळजी करूं नका. आपण केलें हें अत्यंत योग्य केलें.' असा पाठिंबा मिळतांच श्रीस्वामींना पुष्कळ धीर आला. मग ते उठून स्नानास गेले. शिवपूजेनंतर अल्प फलहार करून ते पुनः मंडळींत येऊन बसले. तेव्हां त्या सर्वांनीं एकमतानें सांगितलें कीं, 'अविरिभद्रगर्भदेवालय हें सर्वस्वीं आपल्या मालकीचें आहे त्यांत आपण अगर इतर कोणी लिंगायत वगैरे भक्त मंडळी गेली तरी तो मुळींच गुन्हा होत नाहीं. आणि भटांनीं वाटेल तें जरी केलें तथापि हा खटला आपल्याप्रमाणेंच होणार असें या भक्कम कागदपत्रांवरून सिद्ध होतें.' असा त्या कागदांचा निष्कर्ष कळतांच व आपला समाज आपला पाठीराखा आहे हें समजून येतांच श्रीस्वामींना समाधान वाटून बराच धीर आला. विशेष हें कीं त्यावेळीं ज्या ज्या लिंगायत इसमांस ही बातमी कळली तो 'भटांची खोडकी जिरवा' असेंच ह्मणे निरुत्साहाचे उद्गार कोणाच्याच तोंडून निघाले नाहींत. त्यामुळें श्रीस्वामींना प्रोत्साहन आलें. ह्मणून त्यांना ब्राह्मणाकडे जाण्याची अगर त्यांना हवा

तसा लेख देऊन तडजोड करण्याची बुद्धि मुळींच झाली नाहीं उलट उमेद येत गेली. शेवटीं त्या बैठकींत असें ठरलें कीं, ब्राह्मणांनीं आज काय दावा केला आहे तो पाहावा; पण इतक्यांत समन्स बजावून न घेतां विचार करून वकील देऊनच रीतसर काम चालवावें; व दाव्याचें स्वरूप समजतांच हे कागदपत्र घेऊन या भागांतील वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध व अनुभविक असे प्रसिद्ध रावबहादूर अरटाळ साहेबांकडे जाऊन त्यांची सल्ला घेऊनच त्याप्रमाणें पुढें तजवीज करावी. अशी योजना निश्चित होतांच बातमी काढण्याचें काम सुरूं झालें व संध्याकाळच्या आंत 'ब्राह्मणांनीं फिर्याद वगैरे कांहीं केली नसून फक्त सांबट त्रिंबकभट यास वादी करून मागें लिहिल्याप्रमाणें दावा केला आहे व श्रीस्वामींच्या नांवें तात्पुरती मनाई नोटीस कोर्टाकडून मागितली पण मे. सब जजसाहेब तशी एकतर्फी मनाई नोटीस काढण्यास तयार नसल्यानें ऑफीस अवरांत नोटीस निघाली नाहीं.' अशी बातमी कळली. तेव्हां श्रीस्वामी पुढील कामाकरितां सल्ला घेण्यास्तव त्याच दिवशीं चिकोडींतील एकदोघां प्रमुख मंडळींना बरोबर घेऊन बेळगांवास रावबहादुरांकडे निघून गेले. त्यावेळीं खरोखरच चिकोडीकर लिंगायतांनीं अत्यंत बिनमोल कामगिरी केली आहे. तेथें येऊन श्रीस्वामींनीं सर्व खरी हकिकत सांगतांच सर्व लिंगायत समाज खळबळून गेला; व तेव्हां जरी तेथील सर्वच अधिकारी ब्राह्मण होते तथापि न डगमगतां तेथील सर्व पुढाऱ्यांनीं श्रीस्वामींना जें मनःपूर्वक साह्य केलें त्यामुळेंच त्यांना धैर्य आलें व हा खटला पुढें चालू झाला. त्यावेळीं त्यांनीं जरा भित्रेपणा दाखविला असता तर श्रीस्वामींनीं लागलेच हातपाय गाळले असते आणि भटांना हवा तसा लेख मिळून श्रीक्षेत्र यडूर येथील लिंगायतांच्या हक्काची इतिश्री झाली असती व तें क्षेत्र प्रति नरसोबाची वाडी झाली असती. हें जें अत्यंत धीरोदात्त काम चिकोडीकरांनीं केलें त्याबद्दल श्रीस्वामी, व श्रीवीरभद्रदेवाचे सर्व भक्तच नव्हेत तर सर्व वीरशैव समाज त्यांचा ऋणी आहे. असो.

बेळगांवास जातांच तेथें श्रीस्वामींनीं रावबहादुरांची भेट घेऊन त्यांना सर्व इत्थंभूत वृत्त सांगितलें व पुढें कसें करावें? अशी पृच्छा केली. तेव्हां रावबहादुरांनीं मागें आपण कामावर असतेवेळीं हे सर्व कागदपत्र आपणांस न दाखविल्याबद्दल श्रीस्वामींना बराच दोष दिला व प्रथम त्यांतील सन १८६८-७० सालच्या खटल्याचे ठराव व डिक्री सर्वांना कळण्यास्तव छापवून तावडतोब प्रसिद्ध करण्यास सांगून ते सर्व कागद पाहून, यांवरून श्रीवीरभद्रलिंगाची प्रत्यक्ष पूजा करण्याची वहिवाट लिंगायत पुजाऱ्यांनीं आजपर्यंत चालू ठेविली आहे असाच अर्थ निघतो. तरी भटांचा अडथळा न मानितां पूर्वापार वहिवाटीप्रमाणें पुजेची वहिवाट तुम्ही होती तशी तेथें चालूच ठेवावी. याकामीं भटांचा अडथळा येण्याचें कारण नाहीं. काय व्हावयाचें तें कोर्टमार्फत होईलच. असा त्या कागदपत्रांच्या आधारें योग्य व कायदेशीर सल्ला दिला. आणि या कामीं तूर्त मि. अण्णापा फड्यापा चौगुले यांना वकीलपत्र द्यावें. व मि. केशवराव आजरेकर हे अत्यंत नाणावलेले सत्पक्षपाती व निर्भीडपणें काम चालविणारे प्रख्यात वकील असल्याकारणानें ते जरी जातीनें ब्राह्मण असले तथापि त्यांनाही यांत वकीलपत्र देण्यास हरकत नाहीं. मात्र ते सध्यां गांवीं नसून लवकरच येतील असें वाटतें, असें कळविलें. हा अत्यंत योग्य व बहुमोल सल्ला लक्षांत घेऊन त्याप्रमाणें मि० चौगुल्यांना वकीलपत्र दिलें व प्रथम श्रीवीरभद्रगर्भदेवालयांत आपली पूजेची वहिवाट कुलूप घालण्यापूर्वीं चालूं होती तशीच बिनहरकत सुरू करण्याचा विचार ठरवून तें परत परभारें जुगुळास गेले व तेथून यडुरास येऊन शिव. परवय्यास तेथेंच राहावयास सांगून त्याला व शिव. गुरसिद्धय्या या उभयतांस उद्यांपासून पूर्वरिवाजाप्रमाणें तुम्ही खुशाल श्रीवीरभद्रगर्भदेवालयांत जाऊन सोंवळ्यानें श्रीवीरभद्रलिंगाची पूजा करण्यास प्रारंभ करा. भट आल्यास त्यांनाही करूं द्या; पण ते कांहीं गडबड करूं लागल्यास त्यांना बाहेर जाण्यास सांगा. जरूर पडल्यास तुमच्या मदतीस मठांतील दोन चार इसम येतीलच. तुम्हां कोणासही आम्हीं तोशीस लागूं देणार नाहीं.' असें सांगून

ते परत जुगुळास गेले. कारण त्यावेळीं अंदाजाप्रमाणें ता. २२ रोजीं चिकोडी कोर्टानें श्रीचरंतीस्वामींच्या नांवें 'श्रीवीरभद्रगर्भदेवळांत जाऊं नये.' अशी एकतर्फी मनाई नोटीस काढिली असून तिच्या बजावणी-करितां भटांनीं बेलीफ घेऊन श्रीचरंतीस्वामींचा शोध चालविला असल्याचें समजलें होतें. पण श्रीवीरभद्रगर्भदेवालयांत चालू वहिवाटीप्रमाणें लिंगायत पुजाऱ्याची पूजेची वहिवाट सुरू झाल्याशिवाय ती नोटीस लागू करून घेणें घोक्याचें असल्यानें ४।८ दिवस चाळवाचाळव करण्यास चिकोडीकरांनीं कळविलें होतें; म्हणून श्रीस्वामी यड्डुरांतून लागलेच बाहेर पडून खिद्रापूर, रायबाग, वगैरे हद्दींत हिंडत होते.

## [ ७ ] फौजदारी खटला.

रविवार तारीख ३० जून रोजीं सकाळीं सांभट त्रिंबकभट व त्याचा पुतण्या धोंडभट हे श्रीवीरभद्रगर्भदेवळांत पूजा करीत बसले असतां पुजारी परवय्या राजांगळी व गुरुसिद्धया हे दोघे नदीस्नान करून ओले-त्यानें घागरी भरून घेऊन आले, व तडक गर्भदेवळांत शिरून त्यांनीं नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें श्रीवीरभद्रलिंगास अभिषेक केला. तें पाहतांच सांभटानें त्यांना बाहेर जाण्यास सांगितलें; पण ते जात नसल्यानें त्यानें परवय्याचा हात धरिला. तेव्हां 'आमच्या पूजेस अडथळा करणारे तुम्ही कोण?' असें म्हणून त्या उभय भटांना गर्भदेवळाबाहेर घालविलें. त्यांनी-ही लिंगायतांपुढें आतां तूर्त आपली मात्रा चालावयाची नाहीं असें पाहून घराकडे पलायन केलें; व ती सर्व हकिकत त्यांनीं सर्व भटांना कळविली. आतां दंगामस्ती करून लिंगायतांना प्रतिबंध करणें जवळ जवळ अशक्य वाटल्यामुळें भटांनीं तो मार्ग टाळला व या क्षुल्लक बाबीचें 'वांग्याचें भूत' बनवून 'यड्डुर देवालयांत लिंगायतांनीं दंगा करून शांतताभंग केला, ब्राह्मणांना त्रास दिला, व अनेक भटांना जखमी केलें. तरी ताबड-तोब पोलिस पार्टी न आल्यास परिणाम भयंकर होईल' अशा अर्थाच्या मे. पोलीस सुपरिंटेंडेंटसाहेब, मे. कलेक्टरसाहेब यांजकडे सात आठ तारा

करून त्याच दिवशीं चिकोडींत मे. मामलेदारसाहेबांपुढें वीस लिंगायत इसमांवर १४४ कलमाप्रमाणें क्रिमिनल केस केली! व बंदोबस्ताकरितां सशस्त्र पोलीसपार्टी मागितली! त्यांतील एक तार आमच्या पूर्वपरिचित विष्णुपंत कारभाऱ्यांनींही कल्लोळास बसूनच यडूरचा शांतताभंग पाहून केली होती! हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. अशाच मासल्याच्या अनेक तारा होत्या. खुद्द यडुरांतून दत्तोपंत वझे यांनीं एक तार मे. पोलीस-सुपरिंटेंडेंटसाहेबांकडे केली होती. या कोल्हेकुईनें अर्थातच जिल्हाधिकाऱ्यांना आश्चर्य वाटलें. इतक्यांत ता. ३ जुलई रोजीं चिकोडीच्या मामलेदार साहेबांनीं सर्व लिंगायत समाजास 'तूर्त श्रीवीरभद्रगर्भदेवालयांत जाऊं नये.' असा एकतर्फी मनाई हुकूम काढून पोलीसपार्टी देण्याविषयीं शिफारस केली. तेव्हां भटांचा आनंद गगनांत मावेना. त्यांना त्यावेळीं स्वर्ग दोनच बोटें उरला.

## तात्पुरत्या मनाई नोटिसीचा फार्स.

ता. ४ जुलई रोजीं यडुरास येण्याकरितां बेळगांवाहून पोलीसपार्टी निघाली. ती दुसऱ्या दिवशीं म्हणजे ता. ५ शुक्रवारीं सकाळीं यडुरास आली. मग लागलीच फौजदारसाहेबांनीं श्रीवीरभद्रगर्भदेवालयांत पूजा करीत बसलेल्या परवय्या राजांगळी या नोकर पुजाऱ्यास मामलेदारसाहेबांची मनाई नोटीस दाखवून 'तुम्ही आजपासून पूजा करण्यास आंत जाऊं नये. आतां बाहेर येऊन गर्भदेऊळ ब्राह्मणांच्या ताब्यांत द्या.' असें सांगितलें. त्यावेळीं परवय्यानें नकार दाखवून 'मी हक्कदार पुजारी आहें बाहेर निघत नाहीं.' असें चक्क सांगितलें असतें तर कारभार आटपलाच होता. त्याला जबरीनें बाहेर काढण्याचा कोणालाच अधिकार नव्हता; परंतु त्याला श्रीचरंतीस्वामींच्या वकिलांकडून तसा सल्ला न मिळतां उलट 'फौजदार साहेबांनीं मागितल्यास देऊळ त्यांच्या ताब्यांत देऊन तुम्ही बाहेर पडा.' असा विचित्र सल्ला मिळाला होता! त्यामुळें त्याचा निरुपाय झाला व अत्यंत नाखुषीनें त्यानें गर्भ देऊळ आंतील सर्व साहित्यासह भटांच्या स्वाधीन केलें. त्यानंतर फौजदार साहेबांनीं पंच-

नामा करून तो मे. मामलेदार साहेबांकडे रवाना केला. त्यावेळीं भट मंडळींना जो आनंदी आनंद झाला तो सांगता पुरवत नाहीं. यडूरगांव भटांनीं फुलून गेला. यडूर व आसपासच्या खेड्यांतून त्यावेळीं दवंडी पिटाविली कीं, 'श्रीवीरभद्रगर्भदेवालयांत ब्राह्मणांशिवाय कोणी जाऊं नये.' सकाळपासून यडूर गांवांतील मुख्यतः सर्व लिंगायत व इतर पुढाऱ्यांच्या मनाई नोटिशीवर सह्या अगर आंगठे घेण्याची एकच गडबड उडून गेली होती. मनाई नोटिशीच्या प्रती हातांत धरून धांदलीनें गल्लोगल्लीं भटकणाऱ्या भटांना पाहून इतरांना आश्चर्य वाटलें. त्या दिवशीं बहुतेक सर्व पुढारी लिंगायत मंडळी चिकोडीस गेली असल्यानें त्यांना अवश्य ती मंडळी मिळाली नाहींच, तथापि जे लिंगायत सांपडले त्या पोरासोरांचासुद्धां आंगठा घेण्यास कसूर केली नाहीं. फार तर काय शेतवाडींतून हिंडून तेथें राहणाऱ्या गरीब बिचाऱ्या लिंगायत शेतकऱ्यांचे आंगठे घेण्यासही त्यांनीं कमी केलें नाहीं! इतका भटांस लिंगायतांचा दरारा वाटत होता. त्यावेळची त्यांची ती धांदल व आसुरी आनंद लेखकाच्या डोळ्यासमोर अद्याप मूर्तिमंत उभी आहे मला वाटे कीं, यःकश्चित् तुर्तातूर्त मनाई नोटीस आल्यानंतर जर भटांना इतका अवर्णनीय आनंद झाला; तर पुढें खटला त्यांच्याप्रमाणें निकालांत निघाला कीं, सर्व भटांना हर्षवायु होणार आणि लिंगायतांना यडूर गांवांत प्रपंच करणेंच अशक्य होणार कीं काय ! असो. अशा प्रकारें भटांना श्रीवीरभद्रदेव एकदांचा मिळाला.

हा आंगठा घेण्याचा पोरखेळ संपतो न संपतो तोंच या सर्व आनंदावर विरजण घालणारी एक गोष्ट त्याच दिवशीं दुपारीं घडून आली, ती ही:— यडूरच्या नसत्या दंग्यासंबंधानें अतिशयोक्तीच्या ७।८ तारा जिल्हाधिकाऱ्यांकडे केल्याचें व त्याप्रमाणें पोलीसपार्टी वगैरे येऊन काय प्रकार चालला हें वर सांगितलेंच. तेव्हां हें काय प्रकरण आहे, तें समक्ष पाहाण्यास्तव खुद्द मे. पोलीस सुपारिंटेंडेंट साहेब स्वतः रेल्वेनें शेडबाळ स्टेशनास उतरून तेथून टांगा घेऊन ते शेडबाळ, जुगूळ, कागवाड, शिरगुप्पी इत्यादि यडूरच्या आसपासच्या खेड्यांतून 'यडूर येथें दंगा कसा झाला व किती

जखमी झाले ?' याचा बारीक शोध करीत करीत संध्याकाळीं ४ वाज-ण्याच्या सुमारास येड्डूरास येऊन थडकले. वाटेंत ज्यांना ज्यांना त्यांनीं विचारलें त्या सर्वांनीं 'यड्डुरास दंगा झाल्याचें आह्मांस माहीत नाहीं.' असें सांगितलें. वास्तविक दंगा झालाच नव्हता तर कोण काय सांगणार ? त्यामुळें खोटी बातमी देऊन सरकारास विनाकारण त्रास दिल्याबद्दल साहेबबहादुरांना अत्यंत राग आला होता. ते यड्डुरास येतांच तेथें अशी खोटी तार करणारे जे दत्तोपंत वझे नामक गृहस्थ होते त्यांना ताबडतोब बोलावून आणून 'येथें कोठें कसा दंगा झाला? व किती भट जखमी झाले आहेत दाखवा.' असें रागानें विचारिलें; तेव्हां ते गुळमुळ करूं लागले व कांहीं तरी उत्तर देणें भागच होतें ह्मणून ह्मटलें कीं, 'तसा दंगा होण्याचा रंग दिसल्यानें आह्मी भयानें तारा केल्या.' हें ऐकून साहेब अत्यंत खवळून ह्मणाले 'बनावट बातमी दिल्याबद्दल तुमच्यावर केस कां करूं नये ?' त्यांचा तो संताप पाहून दुमजल्यावरून पडल्यामुळें पाय मुरगाळून सुजलेल्या शकरभट खाडिलकर यास त्यांजपुढें जखमी इसम ह्मणून उभें केलें ! तेव्हां साहेब मजकुरांनीं टांग्यांतून खालीं उतरून निरखून पाहून ह्मटलें 'बदमाष लोक, ही जखम मारानें झाली कीं पूर्वीची आहे खरें सांगा.' हे दरडावणीचे शब्द ऐकतांच तो भट भयानें थर-थर कांपूं लागला. त्यावेळीं साहेबांचा राग अनावर झाला असल्यामुळें ते सदरी वझे यांजवर कांहीं खटला घालतात कीं काय असें वाटूं लागलें ह्मणून त्यांना लोकसमुदायांतून चहा पिण्याच्या निमित्तानें इतर कित्ये-कांनीं बाजूस बोलावून नेलें व पंतांना क्षमा मागण्यास सांगून लागलेंच त्यांना बेळगांवास पाठवून दिलें. यावेळीं कोणी लिंगायत पुढारी तेथें हजर असता व त्यानें ब्राह्मणांविरुद्ध तसा अर्ज देता तर हे खोट्या तारा करणारे सर्व भट परभारें सरकारतर्फेच खटला होऊन बिनबोभाट बिन-भाड्याच्या घरांत रवाना झाले असते; पण सुदैव भटांचे कीं, त्यावेळीं कोणी यड्डूरास हजर नव्हता. असो. पण या गोष्टीमुळें भटांना सकाळीं जो रंग चढला होता त्याचा बेरंग झाला व पुढाऱ्यांची कंबरच खचली.

सज्जनांना त्रास देणाऱ्यांस अशीच अद्दल घडावयाची ही जगाची रहाटीच आहे.

इकडे हा प्रकार चालला आहे तों तिकडे चिकोडींत मे. मामलेदारांकडे केलेली फिर्याद, त्यावेळचे मामलेदार साहेब मि. मोरब हे सेकंड क्लास असल्यानें त्यांनीं प्रांतसाहेब मे. 'गुळवडी' डि. डि. कलेक्टर उत्तरभाग जि० बेळगांव यांजकडे चौकशीकरितां पाठविली. तेव्हां पहिल्याच मुदतीस सर्व वीसही लिंगायत इसम चिकोडी मुक्कामीं सदरी साहेबापुढें हजर होऊन त्यांनीं यड्डूरच्या वीसजण ब्राह्मणांना आरोपी करून फिर्याद केली कीं, 'आम्हांस श्रीवीरभद्रदेवाच्या पुजेस एकतर्फी मनाई करून मे. मामलेदार साहेबांनीं आमच्या धार्मिक हक्कावर गदा आणिली आहे, तरी आमचा नित्यनेम चुकूं नये म्हणून तावडतोब मनाई दूर करावी. व आम्हांस हरकत करूं पाहाणाऱ्या वीस जण भटांना कायमची ताकीद व्हावी.' असा फिर्यादी अर्ज तारीख ४–९–१८ रोजीं दाखल केला. त्यावेळीं श्रीमंत चनबसाप्पाण्णांनीं फारच खटपट केली. वरील दोन्ही फिर्यादींचें स्वरूप एकच असल्यानें साहेब मजकुरांनीं त्यांच्या चौकशीची एकच मुदत नेमिली. या चौकशी मुदतीच्या आंतच भटांना असें कळून चुकलें कीं, नुसत्या मामलेदार साहेबांच्या मनाई नोटीशीनें सर्व वीरभद्रभक्तांना गर्भदेवालयांत जाण्यास प्रतिबंध होणें शक्य नाहीं व तीही तात्पुरतीच असल्यानें सर्व लिंगायत समाजास कायमची मनाई होण्यास्तव निराळा दावाच करणें जरूर आहे. असा विचार ठरतांच श्रीचरंतीस्वामींना या भागांतलि ज्या एकदोघां श्रीमंतांचें साह्य होणें शक्य होतें त्यांना म्हणजे श्रीमंत चनबसाप्पा मल्लाप्पा कराळे व कै. श्रीमंत साताप्पा गुराप्पा हालाप्पनवर या उभयतांस आणि श्रीस्वामी, परवय्या राजांगळी, व मठांतील कारभारी महारुद्रय्या मलकय्या यरगट्टीमठ ( गोकाककर ) या पांच जणांस प्रतिवादी करून ( लिंगायत समाजाचे पुढारी कल्पून ) सर्व समाजावरच वादी सांभट हणमंतभट यानें 'श्रीवीरभद्रगर्भदेवालयांत लिंगायतांना जाण्यास कायमची मनाई असावी.' असा मनाई दांवा तारीख ४ १–१९ रोजीं चिकोडी सबजज कोर्टांत दाखल केला, आणि वाटेल त्या

सदरी खटल्यांतील साक्षकर्ते:—



श्रीमंत चनबसापा मलापा कराळे ( एकसंबें )





स्व. श्रीमंत सातापा हालाप्पनवर ( सदलगें. )

लिंगायत इसमानें यांत प्रतिवादी व्हावें अशी मोकळीक ठेविली. या दाव्याचा अस्सल अर्ज तयार करण्यांत ब्राह्मणांनीं आपलें वेदकालापासूनचें सर्व ज्ञान खर्च करून, लिंगायत समाज पुढाऱ्यांना हिणविण्यास्तव आपल्या मनांतील सर्व कुजके विचार कसे बाहेर ओकिले आहेत व यावरून असे ब्राह्मण सर्व हिंदुधर्मांचे गुरु होण्यास कसे लायक आहेत हें स्पष्ट समजून येण्यास्तव त्या अस्सल अर्जाचा उतारा घेऊन तो प्रत्येक लिंगायतानें मनन करून वाचावा व त्यावरून स्वार्थी अंतःकरण किती कुजकें होऊं शकतें आणि अशा स्वार्थी लोकांशीं कसें वागावें हें ठरवावें. असो.

हा दावा केल्यानंतर मामलेदार साहेबांकडे केलेल्या फिर्यादीचें कांहीं प्रयोजन राहिलें नाहीं म्हणून ब्राह्मणांनीं ही फिर्याद मे. प्रांतसाहेबांपुढें चौकशीस निघण्याच्या दिवशींच काढून घेतली. ही गोष्ट कुडचीस साहेबांचा मुक्काम असतांना घडली. त्या दिवशीं आपली फिर्याद काढून घेऊनच हे भट स्वस्थ बसले नाहींत तर मुदतीप्रतिबंध येत असल्यानें लिंगायतांनीं केलेली फिर्यादही काढून टाकिली पाहिजे अशी त्यांनीं जोराची तक्रार केली; परंतु लिंगायतांना श्रीवीरभद्रगर्भदेवालयांतील आपली आज तागायत चालू असलेली पुजेची वहिवाट शाबीत करण्याच्या दृष्टीनें सदरहू फिर्याद पुढें चालविणें इष्ट असल्यानें त्यावेळीं लिंगायतांतर्फेचे प्रसिद्ध वकील मि. मंगसुळी ( अथणी ) यांनीं 'फिर्याददारांच्या तक्रारीस कायद्याचें कोणतें कलम लागू करावें हें ठरविण्याचें काम वकिलांचें असल्यानें त्यांत जर पूर्वीच्या वकिलांच्या धोरणांमुळें कांहीं चुकी झाली असल्यास त्यांत फिर्याददारांचा दोष काय? अशानें त्यांची तक्रार खोटी होऊं शकत नाहीं. सबब आतां त्यांची दाद घेणें जरूर असल्यानें त्यांची तक्रार ज्या कलमाखालीं येईल त्याखालीं घेऊन काम चालविण्याचा अधिकार सरकारास आहे; तरी मुदतीचा प्रतिबंध न मानितां ती फिर्याद दुसऱ्या कलमाखालीं घेऊन पुढें चालविणें जरूर आहे.' अशी जोराची तक्रार केली. ती मे. गुळवडी साहेबांनीं मान्य करून खटला पुढें चालविण्याचें ठरवून लिंगायतांतर्फेच्या साक्षी घेण्यास सुरवात केली.

## [८] ब्राह्मणांनीं लिंगायत समाजावर केलेल्या दाव्याचा-परिणाम--

हा दावा ब्राह्मणांपेक्षां लिंगायतांनाच जास्त हितकारक झाला. कारण श्रीमंत कराळे व हालाप्पनवर सारखे जे लक्षाधीश इसम दूरदुरूनच या खटल्याकडे पाहात होते, व त्यांत प्रत्यक्ष पडण्याची त्यांची तादृश इच्छा नव्हती त्यांना ब्राह्मणांनीं मुद्दाम ओढून यांत पाडिल्याप्रमाणें झालें; त्यामुळें ते श्रीमंत व त्यांचे आप्त स्नेही यांना चीड उत्पन्न झाली, आणि या खटल्यांत पूर्ण लक्ष घालणें त्यांना भाग पडलें. या उभय वजनदार श्रीमंतांचें साह्य ह्मणजे या भागांतील सर्व लिंगायत समाजाचेंच साह्य होय. तें साह्य ब्राह्मणांनीं आपल्या कृतीनें श्रीस्वामींना अनायासेंच मिळवून दिलें, ही श्रीवीरभद्रदेवाची विचित्र करणी होय. श्रीमंत कराळे हे प्रथम प्रथम ब्राह्मणांना जरा वचकत होते; परंतु प्रत्यक्ष प्रतिवादीच केल्यानंतर संशय फिटला व उघडाउघड रंगणांत उतरणें त्यांना जरूर झालें. त्यामुळें ब्राह्मणांची जी किंचित् भीति कोठल्या कोपऱ्यांत शिलक असेल तीही साफ निघून जाऊन ते राजरोसपणें खटल्याकरितां प्रयत्न करूं लागले त्या खटल्यांतील यांचें प्रथमचें महत्वाचें कार्य ह्मणजे वरील फौजदारी कज्जेंत प्रसिद्ध साक्षीदारांच्या व मुख्यतः ब्राह्मण साक्षीदारांच्या लिंगायतांतर्फे साक्षी करविणें, हें होय. हा फौजदारी खटला सुमारें वर्षभर चालू होता. तितक्यांत ७।८ मुदती पडून त्यांत फिर्यादी ( लिंगायतां ) तर्फे २०।२१ साक्षी झाल्या त्यांत ब्राह्मण साक्षीदार १५।१६ आहेत.

## ब्राह्मणांच्या साक्षींचें महत्व.



यड्डूरच्या या प्रख्यात खटल्यांत ब्राह्मणांच्या साक्षी आपल्यातर्फे करविण्याची मूळ कल्पना श्री. कराळे यानींच काढली व तिला श्री. हालाप्पनवर यांनीं दुजोरा दिला. या साक्षींचें विशेष महत्व वाटण्याचें कारण हेंच

कीं, ' लिंगायतांनीं श्रीवीरभद्रालिंगाची प्रत्यक्ष पूजा केल्यास तें लिंग भ्रष्ट होतें. ' असें एक मुख्य विचित्र कलम [ विसाव्या शतकांतील यडूरच्या भटांचा अजब शोध म्हणाना !! ] भटांनीं वर निर्दिष्ट केलेल्या दोन्ही दिवाणी दाव्यांत स्पष्ट नमूद केलें होतें. अर्थात या अजब शोधाचा पुर्ण समाचार घेण्यास ब्राह्मणांच्या साक्षीवांचून अन्य रायवाण उपाय नव्हता. कां कीं, यडूरच्या (वादी) भटांच्या पाहिपाहुण्यांनींच जर ' लिंगायत श्रीचरंतीस्वामी हेच हक्कदार पूजारी आहेत व कोणाही लिंगायतांस गर्भदेवळांत जाऊन प्रत्यक्ष श्रीवीरभद्रालिंगाची पूजा करतां येत असून तशी प्राचीन वहिवाटही आहे. ' असें सांगितलें तर, तें जास्त फायद्याचें होय हें उघड आहे. व म्हणूनच ब्राह्मणांच्या साक्षी करविणें अत्यंत जरूर वाटलें. त्यास्तव श्रीमंत कराळे व हालाप्पनवर हे उभयतां त्या प्रयत्नास जारीनें लागले, आणि ही सत्यगोष्ट ज्या अनेक ब्राह्मणांनीं प्रत्यक्ष पाहिलेली होती अशा यडूरच्या आसपास गांवीं रहात असलेल्या भट, कुलकर्णी वगैरे पुष्कळ तशा साक्षी देण्यास तयार असलेल्या लोकांना जर प्रोत्साहन मिळालें तर त्यानीं लिंगायतांतर्फे साक्ष सांगणें अगदीं साहजिक होतें. मात्र असे ब्राह्मण शोधून काढून त्यांचा विश्वास पटवून घेणें, त्यांना साक्ष होईपर्यंत गुप्तपणें आणणें व नंतर व्यवस्थितपणें परत पोहोचविणें, त्यांजवर यडूरच्या भटांनीं किंवा त्यांच्यातर्फे कोणा इसमांनीं कांहीं किटाळ आणिल्यास तें द्रव्यद्वारें अगर अन्य रीतीनें निवारणें व पुढें कोणत्याही प्रकारें भिऊं नका, असें अधिकारवाणीनें त्यांस पटण्यासारखें हमी देऊन सांगणें, वगैरे अनेक जबाबदारींचीं कामें करणें अत्यंत दुर्घट होतें. हें जोखमीचें कार्य या उभय श्रीमंतांनीं मोठ्या उत्साहानें उचलिलें, आणि आसपासच्या ४०।५० मैलांच्या टापूंतील अनेक सुप्रसिद्ध ब्राह्मणांच्या साक्षी त्या अत्यत आणीबाणीच्या प्रसंगीं करविल्या हें धैर्य सामान्य नव्हे. हा प्रकार पाहून यडूरच्या भटांना उलट अशी धास्ती पडली कीं, धडधडीत आपल्या आसपासच्या भटांनींच जर आपल्याविरुद्ध साक्षी दिल्या तर आतां हे लिंगायत लोक त्यांजकडून आपल्यावर कोणतें संकट आणून घालतील कोण जाणे असें वाटून त्यांना अगदीं दहशत बसली.

त्या कामीं या उभय गर्भश्रीमंतांना जो त्रास पडला तो सांगतां पुरवत नाहीं श्रीचरंतीस्वामी जरी द्रव्यसाहाय्य करण्यास मागेंपुढें पहात नसत तरी फिरतीचें व आपल्यापेक्षां गरीब लोकांची मनधरणी करण्याचें त्रासदायक काम अंतःस्फूर्तीशिवाय कसें होणार ? अशा श्रीवीरभद्रदेवाच्या प्रेरणेनें उत्पन्न झालेल्या मनोमय दिव्यस्फूर्तीनेंच तें कार्य झालें आहे. त्यावेळीं अशा या अत्यंत प्रयत्नानें प्राप्त होणाऱ्या ब्राह्मणसाक्षीदारांना लिंगायतांनीं थट्टेनें

## ‘ रिक्रूट ’

म्हणण्याची वहिवाट ठेविली होती, व हें नांव त्यांस यथार्थच होतें कारण, कित्येक प्रसंगीं या उभय श्रीमंतांनीं जिवापाड श्रम करून ५।७ ब्राह्मणसाक्षीदार गुप्तपणें घेऊन यावें तों यड्डूरच्या भटांनीं त्यांचा सुगावा काढून फितवून अचानक पळवून लावावें व त्यामुळें महिना दीड महिन्याचे श्रम व शेंकडों रुपये फिरतीचा खर्च वायां जावा ! असा प्रकार या खटल्यांत अनेक वेळां झाला; तथापि हे प्रयत्नवादी बहाद्दर निराश न होतां पुनः दुसरीकडे यत्न करून निराळेच साक्षीदार मिळवीत त्यामुळेंच अशा साक्षीदारांना लिंगायतांनीं वरील नांव दिलें होतें. असो. अशाप्रकारें आठ दहा महिन्याच्या शिकस्तीच्या प्रयत्नानें यांनीं पैदा करून आणिलेल्या पन्नाससाठ साक्षीदारांतून अवघ्या पंधरा सोळाच ब्राह्मण साक्षीदारांची प्रांत साहेबांपुढें साक्ष झाली ! यावरून या उभय श्रीमंतांनीं त्यावेळीं किती विश्वप्रयत्न केले असतील तें जाणावें. शिवाय त्याच वेळीं यांनीं केलेली खटल्यांतील दुसरी अत्युत्तम कामगिरी म्हणजे लिंगायतांतील रावसाहेब रावबहादूर अशा श्रेष्ठ दर्जाच्या लोकांना ह्या खटल्याची समजूत करून देऊन त्यांच्यांत वीरशैवसमाजाभिमान उत्पन्न करणें व या यात्नां खटल्यांत साक्ष देण्यास प्रवृत्त करणें हें होय. अशा बड्या साक्षीदारांची त्यावेळीं किती आवश्यकता होती व सर्व वीरशैव समाजाचें लक्ष सदरी खटल्याकडे वेधण्यास अशा प्रसिद्ध साक्षीदारांचें साह्य कसें कारणीभूत होणार होतें हें कोणास निराळें सांगितलें पाहिजे असें नाहीं. तेव्हां त्या-

## स[illegible]ल्यांतील महत्वाचे साक्षीदार.



स्वर्गवासी रावसाहेब गुरमलापा
कोठीवाले निपाणी.





श्रीमंत रावसाहेब रुद्रापा चनवीरापा
द्वालापनवर सदलगे.

वेळीं अशा बऱ्या सद्गृहस्थांना (स्वतः त्यांच्या योग्यतेचे असतांनाही) तो खटला व त्याचें महत्व पटवून देणें व साक्षीकरितां त्यांचें मन वळविणें व ते तयार होतांच त्यांच्या इतमामाप्रमाणें त्यांना प्रांतसाहेबांच्या स्वारी-मुक्कामीं बोलावून आणणें व परत पाठविणें या गोष्टीकडेही यांनीं पूर्ण लक्ष दिलें होतें. केवळ या दोघांच्या (त्यांतही विशेषतः श्रीमंत कराळे यांच्या) खटपटीनेंच बेळगांवचे प्रसिद्ध पुढारी रावसाहेब श्री. वैजाप्पा अण्णा अनगोळ बँच मॅजिस्ट्रेट; व नेसर्गीचे सुप्रसिद्ध पुढारी रावसाहेब (हल्लीं तर रावबहादूर झालेले) श्री. महांतशेट्टी ऑनररी मॅजिस्ट्रेट, यांची आणि निपाणी येथील सुविख्यात समाजधूरीण श्री. रावसाहेब गुरुमलाप्पा अण्णा कोळीवाले बँचमॅजिस्ट्रेट, आणि सदलगें येथील वीरशैव समाजाभिमानी रावसाहेब श्री. रुद्रापा अण्णा हालाप्पनवर या चौघां प्रसिद्ध पुढाऱ्यांची साक्ष या यड्डूरच्या खटल्यांत होणें सुलभ झालें. त्यामुळें एक मोठा परिणाम हा झाला कीं, श्रीवीरभद्रगर्भदेवालयांत चालू तारखेपर्यंत लिंगायत लोक प्रत्यक्ष पूजा करीत आहेत, अर्थात् ब्राह्मण म्हणतात तशी वहिवाट सोडिली नाहीं अशी मे. गुळवडी डि० डि० कलेक्टर साहेब यांची पूर्ण खात्री झाली; आणि त्या फिर्यादीचा निकाल लिंगायतांप्रमाणें होणार असा भरंवसा वाटूं लागला. याचें सर्व श्रेय या उभय श्रीमंतांसच आहे. यांचें साह्य न होतें तर ही फौजदारी फिर्याद अजीबात काढून घेणें लिंगायतांना भाग पडलें असतें. हें श्रीचरंतीस्वामींना व त्यावेळीं खटल्यांत वावरणाऱ्या सर्व लिंगायत पुढाऱ्यांना पूर्ण माहीत आहे. म्हणून या उभय श्रीमंतांना प्रतिवादी करून यड्डूरच्या भटांनीं श्रीचरंतीस्वामी व सर्व लिंगायत समाजावरच एक प्रकारें उपकार केले असें म्हणणें जरूर आहे. असें न होतें तर या उभयतांना इतका राग आला असतां कीं नाहीं; व त्यांनीं इतका भगीरथ प्रयत्न केला असतां कीं नाहीं याची शंकाच होती. मात्र यांचा यत्न पाहून वादी भटांना यांना आपण प्रतिवादी कां केलें असा पश्चात्ताप झाला असावा.

परंतु या प्रयत्नास पूर्णपणें यश आलें नाहीं. म्हणजे हा फौजदारी खटला अखेरपर्यंत चालला नाहीं. मे. गुळवडीसाहेब ठराव लिहिण्याच्या बेतांत होते, तथापि नंतर त्यांनाच शंका आली कीं, जर अलाहिदा याच प्रकरणासंबंधीं दिवाणी कोर्टांत दावे चालले आहेत तर आम्हां मुलकी अंमलदारांना त्यांत ठराव देण्याची काय जरूरी आहे. असा विचार करून त्यांनीं तें काम बंद ठेविलें. वास्तविक न्याय दृष्टीनें पाहातां अगोदर काम पुढें चालवावयाचें नव्हतें; आणि जर चालविलें होतेंच तर आपल्यापुरता कायतो निकाल देऊन मोकळें होणें हेंच रास्त झालें असतें; पण इतकी उदारमनस्कताही सदरी साहेबांनीं दाखविली नाहीं. तथापि या अपुऱ्या खटल्याचाही एक अत्यंत मोठा फायदा हा झाला कीं, याच जबाबांचे उतारे पुढें आसि. जज्ज कोर्टांत हजर केले व यांपैकीं कांहीं ब्राह्मणांच्या व एक दोघां रावसाहेबांच्या साक्षीही कोर्टांत करविणें सुलभ होऊन लिंगायतांची बाजू बळकट झाली.

---

## [९] दिवाणी दावे.

फौजदारी खटल्यांची वर सांगितल्याप्रमाणें इतिश्री होईपर्यंत इकडे दिवाणी दाव्यांची काय अवस्था झाली होती हें जाणण्याची उत्कटइच्छा वाचकांस झाली असेल. कारण–खटल्याची मुख्य मदार दिवाणी दाव्यांवरच असल्यानें त्यांच्या निकालावर खटल्याचें यशापयश अवलंबून होतें, म्हणून सर्वांचें तिकडे लक्ष लागणें साहाजिक होतें. श्रीचरंतीस्वामी तर सर्वस्वीं तिकडेच गुंतले होते. जरी फौजदारी खटल्याच्या प्रत्येक मुदतीस ते प्रांत साहेबांच्या मुक्कामास हजर असत तरी त्या खटल्याची सर्व जबाबदारी मागें सांगितल्याप्रमाणें मुख्यतः श्री. कराळे व श्री. हालाप्पनवर या उभयतांवरच सोंपविलेली होती. आणि ते स्वतः दाव्यांकडे गुंतले होते. त्यांतील त्यांचें काम म्हणजे मठाच्या दप्तरांतील जुने असल कागद श्री. करोसी यांच्या मदतीनें शोधून काढून त्यांच्या सरटीफाइड

कॉप्या मिळविण्याचा प्रयत्न करणें, सर्व खटल्यांना लागणाऱ्या पैशाचा पुरवठा करणें, इत्यादि सर्वच कामें त्यांना करणें जरूर असून ते अत्यंत दक्षतेनें सर्व तयारी व सर्व कामांवर देखरेख करीत. अशा प्रकारच्या धोरणी व अत्यंत धैर्यवान् श्रीचरमूर्तिस्वामीमहाराजांच्या वेळींच हा खटला उद्भवला हें वीरशैव समाजाचें सुदैव होय.

चिकोडी कोर्टांत ता. २२ जून रोजीं एक दावा दाखल होऊन त्याबद्दलची मनाई नोटीस श्रीचरंतीस्वामींना बजावण्याकरितां निघाली असल्याचें मागें सांगितलें आहे. ती नोटीस बऱ्याच दिवसांपर्यंत चाळवून मध्यंतरीं श्रीवीरभद्र-गर्भदेवालयांत पुनः पूर्वी चालू होती तशी प्रत्यक्ष पूजा करण्याची जी कामगिरी श्रीचरंतीस्वामींनीं केली तिचा कसा परिणाम झाला हें वर सांगितलें. तेथें त्याबद्दल तारा वगैरे झाल्यानंतर व मामलेदारसाहेबांकडे फिर्याद झाल्याबरोबर त्याकरितां व कोर्टांतील दाव्याकरितां आरंभीं तूर्त म्हणून श्रीचरंतस्वामींनीं चिकोडीचे मि० साने यांना वकीलपत्र दिलें. अथवा त्यांनीं दिलें म्हणण्यापेक्षां चिकोडीच्या सर्व ब्राह्मण वकिलांनीं (त्यावेळीं चिकोडींत कोणी ब्राह्मणेतर वकील नव्हतेच) जवळ जवळ कट करून त्यांत कोणी अन्य ठिकाणचा ब्राह्मणेतर वकील येऊन शिरेल म्हणून मि० साने यांनाच वकील देणें श्रीस्वामींना भाग पाडिलें असें म्हणणें जास्त शोभेल. कोर्टांत वकील हजर करून रीतसर काम चालू होतांच मागील मनाई नोटीस बजावून घेण्याची तादृश जरूरी राहिली नाहीं. पण एकट्या सान्यांना या मोठ्या खटल्याचें काम झेंपणार नाहीं, म्हणून व प्रस्तुत खटल्यांत तशा परिस्थितींत त्यांजवर पूर्ण विसंबून राहाण्यास श्रीचरंतीस्वामी धजेनात; त्यामुळें पुढें लागलेंच कोर्टांतील दाव्यांकरितांच बेळगांवचे सुप्रसिद्ध ब्राह्मणेतर वकील मि० चौगुले यांना वकीलपत्र दिलें. हे या खटल्याचें काम चालविण्याकरितां प्रथमच चिकोडीस आल्यावेळीं, 'प्रत्यक्ष श्रीवीर-भद्रगर्भदेळांत चालू असलेली पूजेची वहिवाट मनाई नोटीस लागू होतांच श्रीचरंतीस्वामींनीं सोडावी कीं, सोडूं नये?' असा प्रश्न विचारतांच सदरी वकील महाशयांनीं 'सोडण्यास हरकत नाहीं' असा सल्ला दिल्यावरून

गर्भ देवालयांतलि जंगम पुजारी बाहेर आला. नाहीं तर तो प्राण गेला तरी बाहेर पडत नव्हता. पुढें खटला इतका वाढण्यास व इतका चिघळला जाण्यास मुख्यकारण जंगमांनीं प्रत्यक्ष पूजेची वहिवाट सोडिली हेंच होय. तेंव्हां वरील सल्ला सदरी वकीलसाहेबांनीं कोणत्या धोरणानें दिली देव जाणे.

मि. साने अगर मि. चौगुले या उभयतांकडूनही सदरी महत्वाच्या खटल्यांचें काम झेंपणार नाहीं व यांचें कोर्टावर वजन पडत नाहीं असें पाहून, व नुकत्याच उद्भवलेल्या फौजदारी खटल्यांत एकादा तडफदार वकील देणें जरूर होतें म्हणून आणि याच संधीस मे.असुंडी सबजजसाहेबांनीं आठ आठ दहा दहा दिवसांच्याच कोर्टात मुदती टाकून होतां होईल तों लवकर मुद्दे काढून खटला लवकर निकालांत काढण्याचें धोरण स्वीकारल्याचा बळकट संशय येऊं लागल्यामुळें (व हा संशय उद्भवण्यास कारण म्हणजे मे. सबजजसाहेबांनीं प्रथम एकतर्फी मनाई देण्याचें नाकारून मागाहून लागलीच ती दिली, हेंच होय.) आणि ते स्वतः ब्राह्मण असल्यामुळें अशा प्रकारचा समाजासमाजांतील चुरशीचा खटला त्यांजपुढें चालविणें लिंगायतांना धोक्याचें वाटणें साहजिक होतें; त्यामुळें त्या सबजजसाहेबांकडून हा खटला ट्रान्सफर करवून युरोपियन जजांपुढेंच हा चालूं करवावा; या हेतूनें श्रीचरंतीस्वामींनीं एक ट्रान्सफर अर्ज बेळगांव डिस्ट्रिक्ट जज्ज कोर्टाकडे यापूर्वीं केला होता. त्या अर्जाची जजकोर्टांत योग्य सुनावणी करून त्याचा निकाल होईपर्यंत १।२महिने चिकोडी कोर्टाकडून मुदत घेणें जरूर होतें. अशा या सर्व महत्वाच्या कामाकरितां म्हणजे— १ फौजदारी खटला चालविणें, २ ट्रान्सफरअर्जाची सुनावणी करणें, ३ चिकोडी कोर्टांत दीर्घकाल मुदत घेणें या तीन मुख्य कामांकरितां एक उत्तम वकील देणें श्रीचरंतीस्वामींना अत्यंत जरूर झालें. ह्मणून बेळगांवचे नामांकित तडफदार ब्राह्मण वकील मि. गोविंद हरी केळकर (हे जरी ब्राह्मण असले तथापि अत्यंत निःपक्षपाती आहेत; असें श्री. कराळे यांनीं खात्रीपूर्वक सांगितल्यामुळें) त्यांना वकील नेमिलें. त्यांनीं प्रथम दर्शनी चिकोडी कोर्टांत मुदतीदिवशीं हजर होऊन ‘ सदरहू खटला महत्वाचा

असून यांत जुने कागदपत्र फार हजर झालें आहेत ते पाहून खटला समजून घेण्यास मला कमींत कमी निदान सहा महिन्यांची मुदत पाहिजे.' अशी कोर्टास विनंति केली. लगबगीनें मुद्दे काढून लवकरच ठराव लिहिण्यास सिद्ध झालेल्या मे. सबजज साहेबांना एकेक दिवस बहुमोलाचा वाटत असावा, तेव्हां त्यांजकडून सहा महिन्यांची मुदत मिळणें शक्य तरी होतें काय? त्यांनीं मि. केळकरांस सवाल केला कीं, 'प्रतिवादी हे प्रत्येक मुदतीस एकेक नवीन वकील आणून हजर करिताहेत, तेव्हां अशा प्रत्येक वकिलाला खटला समजून घेण्यास तुमच्याप्रमाणेंच जर सहा सहा महिन्यांच्या मुदती आह्मी देत गेलों तर खटल्याची चौकशी होण्यास दिरंगाई होईल; सबब पंधरा वीस दिवसांत खटला समजून घेऊन पुढें काम चालवा.' यावर मि. केळकर ह्मणाले, 'प्रतिवादींच्या वकिलांना खटला समजो अगर न समजो आपल्यास लवकरच खटल्याची चौकशी करावयाची असल्यास आमचें कांहींच ह्मणणें नाहीं; सबब आजच एकतर्फी चौकशी करून काय तो निकाल द्यावा. आह्मी मुदत मुळींच मागत नाहीं.' या सडेतोड उत्तरानें कोर्टाचा निरुपाय झाला व मोठ्या मिनतवारीनें एक महिन्याची मुदत कोर्टानें दिली. त्यावेळीं कोर्टाबाहेर येतांच मि० केळकर वकिलांनीं श्रीचरंतास्वामींना चक्क सांगितलें कीं, 'या मुनसफांपुढें हा खटला चालल्यास तुमच्या विरुद्ध निकाल होऊन तुमची भयंकर नुकसानी होईल तरी शक्य ती खटपट करून हा खटला लवकर ट्रान्सफर करून घ्या.' असा अत्यंत जिव्हाळ्याचा सल्ला दिला. यावरून ब्राह्मणांमध्येंसुद्धां मि० केळकरांसारखे खरे निःपक्षपाती, सत्यप्रिय असे वकील असतात हें पाहून व श्री० कराळे यांच्या ह्मणण्याचा पूर्ण प्रत्यय येऊन श्रीस्वामींसह सर्वांना समाधान वाटलें.

## चिकोडी कोर्टांतील शेवटची सलामी

मि० केळकर वकील साहेबांचा सल्ला सर्वांना पूर्ण पटून त्याप्रमाणें त्यांजकडून लवकरच दुसरा एक ट्रान्सफर अर्ज जजकोर्टांत दाखल केला.

फौजदारी केसच्या एक दोन मुदतीसही ते हजर झाले. इतकें होत आहे तोंच मागें सांगितल्याप्रमाणें पांच इसमांस प्रतिवादी करून दुसरा एक समाजावरील मनाई दावा चिकोडी कोर्टांतच सांभट हणमंतभट यानें दाखल केला. या दाव्याकरितांही मि० केळकर यांनाच वकील नेमिलें व त्यांच्या जोडीस बेळगांवचे प्रख्यात वकील [ ज्यांनीं सिरसंगीफंडाच्या व व्यासंतोळच्या खटल्यांत लिंगायतांतर्फे अत्युत्तम कामगिरी करून वीरशैवसमाजास यश मिळवून देऊन त्याचें मुख उज्वल केलें त्या ] मि० केशवराव आजरेकर यांना रावब० अरटाळ साहेबांच्या मार्फतीनेंच वकीलपत्र दिलें. तेव्हां कोठें श्रीवरंतिस्वामींना जरा समाधान वाटलें व त्यानंतर खटला लिंगायतांच्या दृष्टीनें मार्गाला लागला.

त्यावेळीं बेळगांव येथें मे० माँटगामरी हे डिस्ट्रिक्ट जज्ज होते. त्यांनीं ट्रान्सफर अर्जाचा विचार करून मे० असुंडी मुनसफसाहेबांपुढेंच सदरहू दावे चालावे.' असा निकाल दिला, त्यामुळें मुद्दाम सदरहू सबजज्जसाहेबांना चिडविल्याप्रमाणें झालें. त्यापेक्षां त्यापूर्वी तसेंच मोघमांत काम चाललेलें होतें तेंच ठीक होतें असें वाटूं लागलें; म्हणून मे० जज्जसाहेबांच्या या निकालावर नामदार हायकोर्टाकडे अपील केल्यावांचून गत्यंतर नाहींसें झालें. त्यास्तव लवकरच मुंबई हॉयकोर्टांत मुंबईचे अनुभविक हॉयकोर्ट वकील मि. सिंहेश्वरकर यांच्या मार्फत हा खटला ट्रान्सफर होण्याबद्दल अपील दाखल केलें. पुढें चौकशी मुदतीच्यावेळीं मुंबईचे सुविख्यात बॅरिस्टर मि. स्ट्रॉंगमनसाहेब यांना श्रीस्वामींनीं आपल्यातर्फे नेमिलें. या अर्जाचा ६ महिने विचार होऊन अखेर मि. स्ट्रॉंगमन बॅरिस्टर साहेबांनीं नामदार हॉयकोर्टपुढें असा एकच मुख्य मुद्दा विचारला कीं, ज्यापक्षीं प्रतिवादी यांना चिकोडीच्या सबजज्जांपुढें आपला खटला चालविणें धोक्याचें वाटतें त्याअर्थी त्यांजकडून हा खटला दुसरीकडे ट्रान्सफर करण्यांत सरकारची काय नुकसानी आहे? यावर वादीतर्फे मि. राव यांनीं 'वादी भटजींना जास्त खर्चाच्या पेचांत पाडण्यास्तव प्रतिवादींनीं

ही युक्ति योजिली आहे.' अशी तक्रार केली; पण पुनः 'ज्या पक्षातर्फे खटला निकालांत निघेल त्याला विरुद्ध बाजू कडून सर्व खर्च मिळतोच तरी खर्चाचा प्रश्न यांत मुख्य नाहीं.' असें बॅरिस्टर साहेबांनीं स्पष्ट उत्तर देतांच हॉयकोर्टास ती गोष्ट पटून त्यांनीं 'बेळगांवचे डिस्ट्रिक्टजज्ज अगर असि. जज्ज या युरोपियन न्यायाधिशांपुढेंच हा खटला चालावा.' असा निकाल दिला. गंमत ही कीं, या निकालाची हॉयकोर्टा-कडून चिकोडी सबजज्ज कोर्टास येणारी तारेची आर्डर, ज्या चौकशी मुद-तीच्या दिवशीं मे.असुंडी मुनसफ साहेब मुद्दे काढण्याच्याच विचारानें कोर्टांत बसले होते त्या दिवशीं कोर्टाच्या सुरवातीच्या ऐनवेळींच येऊन थडकली! ती तार हातीं पडतांच मे. असुंडी साहेबांचा चेहरा एकदम उतरला व ते स्तब्ध झाले; पण हुकुमापुढ नाइलाज असल्यानें त्यांनीं ती तार मि. केळकर, यड्डूरकर वगैरे दोन्ही पक्षांच्या वकीलांना दाखवून तो खटला तहकूब केला व लागलेच सर्व कागदपत्र बेळगांव जज्ज कोर्टाकडे रवाना केले. ही तारेची बातमी भटांस कळतांच त्यांचें कंबरडेंच मोडलें. व त्यांना हा प्रथमचा मोठा अपशकुनच झाला! कां कीं, आतां मुद्दे निघून श्रीस्वामींसह सर्व लिंगायतांना लवकरच या खटल्यांत सहज चीत करूं अशी पूर्ण खात्री वाटून आनंदानें उड्या मारण्याच्या ऐनप्रसंगीं हा अचानक [त्यांच्या दृष्टीनें] दुर्दैवाचा घाला पडला. त्यामुळें सर्व भट व या खटल्यांत वावरणारे इतर ब्राह्मण यांचीं तोंडें काळीं ठिक्कर पडलीं! हें पाहून व मुख्यतः खटला युरोपियनांपुढें ट्रान्सफर झाला हें ऐकून श्री-स्वामींसह सर्व लिंगायतांना अत्यानंद झाला; व खटल्यावरचें एक गंडां-तर टळलें असें समजून श्रीवीरभद्रदेवालाच आपली दया आली असें वाटूं लागलें, त्यामुळें त्यांची एक मोठी काळजी दूर झाली. अशाप्रकारें चिकोडी कोर्टास त्यावेळीं लिंगायतांनीं शेवटचा रामराम ठोकून आनंदानें बेळगांवचा रस्ता धरिला.

## [१०] बेळगांव असि. जज्ज कोर्टांतील चौकशी.

त्यावेळीं बेळगांव येथें मे. मॉंटगामरी साहेब हे डिस्ट्रिक्ट जज्ज होते.

त्यांनीं हॉयकोर्टच्या हुकुमान्वयें हे दोन्ही जोड दावे असि. जज मे.नार्मन साहेब यांजकडे चौकशीकरितां घातले. त्यांनीं हे दावे असल नंबर ४।५/१९१९ यांस दाखल करून घेतले. तेथेंही लागलाच भटांनीं खालील कोर्टाप्रमाणेंच लिंगायतांना तूर्तातूर्त मनाई नोटीस काढण्याबाबत अर्ज दिला. तेव्हां 'श्रीवीरभद्रलिंगापुढील आमचें उत्पन्न बुडविण्याकरितां वादी अशी मनाई मागतात;' अशी लिंगायतांनीं तक्रार केली. त्यावर विचार करून मे० नार्मन साहेबांनीं 'तूर्त ३ महिने लिंगायतांना मनाई केली आहे; पण प्रत्यक्ष श्रीवीरभद्रलिंगापुढें आलेल्या उत्पन्नाचा भटांनीं हिशेब ठेवावा.' अशी आर्डर दिली. भटांना हिशेबाचें हें नसतेंच लचांड पाठीमागें लागलेलें पाहून अशी आर्डर न निघती तर बरें असें वाटूं लागलें. यावरून मे० नार्मन साहेबांचा स्वभाव किती न्यायनिष्ठुर आहे हें समजून येऊन त्यांजपुढें कांहीं मात्रा चालावयाची नाहीं अशी त्यांची खात्री झाली.

या जोड दाव्यांत मे० नार्मन साहेबांनीं खालीलप्रमाणें मुद्दे काढिले. तेः—असल नंबर ४–१९१९ यांतील मुद्देः—

१ श्रीवीरभद्रलिंगाचा वादी हा हक्कदार पुजारी आहे; आणि असा हक्कदार पुजारी म्हणून गर्भदेवळामध्यें देवापुढें ठेविलेल्या सर्व वस्तूंवर वादीचा हक्क आहे, असें वादी शाबीत करून देतो किंवा कसें ?

२ गर्भदेवळांत प्रवेश करण्याचा व प्रवेश करून लिंगास स्पर्श करून त्याची पूजा करण्याचा प्रतिवादीस बिलकूल हक्क नाहीं; असें वादी शाबीत करून देतो किंवा कसें ?

३ मागितलेली ताकीद मिळविण्यास वादी पात्र आहे किंवा नाहीं ?

या तिन्ही मुद्यांवर निकाल अस्तिपक्षी आहे.

असल नं० ५–१९१९ यांतील मुद्दे—

१ गर्भदेवळामध्यें प्रवेश करून लिंगास स्पर्श करून त्याची पूजा करण्याचा लिंगायतांना बिलकूल हक्क नाहीं असें वादी सिद्ध करून देतो किंवा कसें ?

२ मागितलेलीं मनाई व हक्क ठरवून मिळण्यास वादी पात्र आहे किंवा कसें ?

यांवरही अस्तिपक्षी ठराव आहे.

असे मुद्दे काढून नंतर सन १९२० च्या तारीख ४ ते ३१ जानेवारी अखेर सुमारें २७ दिवस मे. नार्मनसाहेबांनीं फक्त या एकाच प्रख्यात खटल्याची चौकशी चालविली. त्यांत प्रथमारंभीं दोघां वादी सांभटांचे जबाब झाले. नंतर प्रथम त्यांच्या तर्फेच्या साक्षी झाल्या. त्यांतील सर्वांत मुख्य साक्ष बेळगांवचे सुप्रसिद्ध वकील नामदार बेळवी यांची होय. यांच्याशिवाय अनेक बडेबडे इनामदार व एक दोघे रावसाहेबही होते. एकूण वादी पक्षातर्फे ५९ साक्षी झाल्या, यांत बहुतेक ब्राह्मण साक्षीदार आहेत. त्यांच्या खालोखाल मराठे आहेत. लिंगायतांनीं फौजदारी खटल्यांत जशा अनेक ब्राह्मणांच्या साक्षी करविल्या व कोर्टांतही करविणार होतेच. त्याप्रमाणें त्यांच्या तोडीस तोड ह्मणून बऱ्याच लिंगायतांच्या आपल्यातर्फे साक्षी करविण्यासाठीं भटांनीं भगीरथ प्रयत्न केले; परंतु आश्चर्य हें कीं, आमच्या अफाट व अर्धशिक्षित अशा वीरशैव समाजांतून एकही महत्वाचा साक्षीदार भटातर्फे साक्ष सांगण्यास आला नाहीं! हा लिंगायत समाजाचा स्वाभिमान व सत्याभिमान ब्राह्मणांनीं सदैव ध्यानीं धरावा. उलटपक्षीं ब्राह्मणांच्या ६।७ बऱ्याच महत्वाच्या साक्षीदारांनीं कोर्टांतही लिंगायतांतर्फे साक्ष दिली. व आणखी १०—२० साक्षीदार साक्ष देण्यास हजर होते; परंतु कोर्टांनीं व मि० आजरेकर वकीलसाहेबांनींही जास्त साक्षी घेण्याची जरूरी नाहीं असें सांगतांच कांहीं जणांस जाण्यास सांगितलें. यावरूनच लिंगायताची बाजू किती सत्य होती हें दिसून येतें. आश्चर्य हें कीं, वरील ब्राह्मण साक्षीदार बेळगांवांत येतांच यड्डूरच्या वादी भटांनीं त्यांना युक्तीप्रयुक्तीनें भेटून त्यांजपुढें साष्टांग घालून साक्ष न देण्याविषयीं अगदीं गयावया केली. फार तर काय अशा कित्येक ब्राह्मण साक्षीदारांना, त्यांची ती विनंति न मानिल्याकारणानें सर्व भट व ब्राह्मणांनीं अगदीं भंडावून सोडिलें; इतकें कीं बेळगांवांतील

कोणत्याही ब्राह्मणी खाणावळींत त्यांना जेवण मिळूं नये कीं, हॉटेलांत घोटभर चहासुद्धां मिळूं नये असा कडक बहिष्कार घातला. तथापि कित्येक ब्राह्मण सत्य पक्षपातीच राहिले ! त्या ब्राह्मणांचा हा सत्पक्षपातीपणा अत्यंत अभिनंदनीय होता. बहिष्काराच्या क्षुद्र भीतीनें त्रिकालाबाधित सत्याला ते आंचवले नाहींत. हें खरोखर सर्व ब्राह्मणसमाजासच भूषणास्पद आहे. असो.

ब्राह्मणांशिवाय लिंगायतांतर्फे आणखी रावसाहेब व इतर अनेक श्रीमंत देसाई वगैरे प्रसिद्ध व्यक्तींच्याही साक्षी झाल्या. त्यांत मुख्यतः यड्डूरचे प्रसिद्ध मराठे देसाई श्रीमंत कृष्णराव नारायणराव निंबाळकर यांची साक्ष श्रीस्वामीतर्फेच झाली; आणि श्रीवीरभद्रदेवाल्यांतील ७।८ सेवेकरी व खुद्द यड्डूर गांवांतील २।४ पुढारी रयतांच्याही साक्षी श्रीस्वामींतर्फेच झाल्या. यांशिवाय मागें फौजदारी खटल्यांत लिंगायतांतर्फे नुकत्याच झालेल्या सर्व साक्षीदारांचे जबाबही कोर्टांत हजर केले होते व त्यांतील कांहीं जणांच्या साक्षीही कोर्टांत झाल्या. तथापि एकंदर २६ साक्षीच लिंगायतांतर्फे झाल्या आहेत. मात्र यांत सर्व जातींचे विशेषतः ब्राह्मण, मराठे वगैरे लिंगायतेतर महत्वाचे साक्षीदारच फार आहेत. लिंगायत मात्र कमी आहेत. यावरून सत्पक्षाला जास्त साक्षीपुराव्याची जरूरी लागत नाहीं, ही गोष्टही ओघानेंच सिद्ध झाली. असो.

या सर्व महत्वाच्या तोंडी पुराव्यांचा एक मोठा परिणाम असा झाला कीं, चालू तारखेपर्यंत लिंगायत लोक श्रीवीरभद्रलिंगाची प्रत्यक्ष पूजा करीत आहेत; व प्राचीन काळापासून त्यांची वहिवाट सुरू असून त्यांच्या पूजेनें श्रीवीरभद्रलिंग मुळींच भ्रष्ट होत नाहीं. इतकेंच नव्हे तर लिंगायतांचे श्रीचरमूर्तिस्वामी हेच पुजेचे हक्कदार मालक असून त्यांनीं व लिंगायत समाजानें आपली श्रीवीरभद्रलिंगाच्या पुजेची वहिवाट केव्हांही सोडिलेली नाहीं. या गोष्टी सप्रमाण सिद्ध झाल्या. त्यामुळेंच ब्राह्मणांच्या बड्याबड्या साक्षींचेंही पुढें तेज पडलें नाहीं. ही गोष्ट कशी घडून आली हें ओघानें कळणारच आहे. तथापि इतके भक्कम तोंडी पुरावे व जब-

रदस्त लेखी पुरावे हजर करूनही या असि. जज्ज कोर्टांत लिंगायत समाजाच्या विरुद्ध खटल्याचा निकाल कां झाला? याचें सुज्ञ वांचकांस मोठें कोडें पडलें असावें त्याचा खुलासा असा—

## [ ११ ] विरुद्ध निकालाचीं कारणें.

मागें उत्तरार्धांतील दुसऱ्या व तिसऱ्या भागांमध्यें ज्या सनदांचा उल्लेख आलेला आहे त्या पाहून व इतर कागदपत्रांचेंही लक्षपूर्वक निरीक्षण करून मे० नार्मन साहेबांची तर पक्की खात्री झाली कीं, श्रीवीरभद्रालिंगाची पूजा फार प्राचीन काळापासून इ. सन १८२७ पर्यंत फक्त लिंगायत लोकच अविच्छिन्नपणें करीत आले, पण त्यानंतर श्रीवीरभद्र गर्भदेवळांत ब्राम्हणांचा हळुहळू शिरकाव कसा झाला याचा कोर्टास विचार पडला आहे; परंतु मागें एके ठिकाणीं आम्ही विवेचन केल्याप्रमाणें ही गोष्ट क्रमाक्रमानें घडली असावी म्हणून ते पुढें लिहितात कीं, "इ. स. १८५३ पर्यंत ब्राह्मणांची वहिवाट हळूहळू वाढत गेली व त्यानंतर सन १८६२ सालापर्यंत लिंगायत व ब्राह्मण मिळून दुहेरी पूजा करीत. ( मात्र त्यावेळीं व त्यानंतर आज तारखेपर्यंत ब्राह्मण हे 'आश्रित' या नात्यानें होते व आहेत, ह्मणून हीच गोष्ट त्यांना आपणच हक्कदार पुजारी आहोंत असें म्हणण्यास आधारभूत आहे. ) परंतु पुढें ब्राह्मण भटांची वहिवाट जास्त जास्त वाढत जाऊन इ. स. १८६२ नंतर लिंगायतांनीं श्रीवीरभद्रगर्भदेवळांत जाण्याची वहिवाट अजीबात सोडिली! व तेव्हांपासून फक्त हक्क घेऊनच ते राहूं लागले; ह्मणून अलीकडे ५० वर्षांत लिंगायत लोक गर्भदेवळांत मुळींच गेले नाहींत! ( हा कोर्टाचा निव्वळ तर्क आहे. यास हजर झालेल्या कागदपत्रांत कोणत्याच प्रकारचा आधार नाहीं. असो. ) सबब ब्राह्मणांची वहिवाट अविछिन्नपणें सुरू आहे. आतां अशी वहिवाट प्राचीन असावी ही गोष्ट खरी, परंतु प्राचीनत्वाला कालाची मर्यादा नाहीं; म्हणजे अमुक वर्षें झाल्यानंतरच ती गोष्ट प्राचीन होय असें कांहीं ठरलेलें नाहीं. म्हणून मी ( मे. नार्मन साहेब ) ह्या ५० वर्षांलाच

प्राचीन वहिवाट समजतों. आणि वादीच्या म्हणण्याप्रमाणें लिंगायतांना गर्भदेवळांत जाण्यास कायमची मनाई करितों. पुजेच्या हक्काच्या जोडीस देणगी घेण्याचा हक्कही असला पाहिजे म्हणून गर्भदेवळांत ठेविलेल्या कोणत्याही देणग्या लिंगायतांनीं घेऊं नयेत, अशी त्या समाजास कायमची ताकीद देतों. ” अशाप्रकारें शेवटीं शेवटीं फक्त वहिवाटीवर जाऊन अलीकडे ब्राह्मणांची वहिवाट आहे सबब त्यांच्या वहिवाटीस बाध येऊं नये म्हणून त्यांच्याप्रमाणें निकाल दिला आहे. [ पहा— बेळगांव असि. जज्ज कोर्टाचा तारीख ४।२।२० रोजीं झालेला अस्सल नंबर ४।५/१९१९ वरील ठराव प्यारा २२।२३ ] या ठरावावर टीकाच करावयाची तर अनेक आक्षेप घेतां येतील. प्रथम दर्शनींच असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, सन १८६२ इसवीनंतर लिंगायतांनीं अजीबात वहिवाट सोडिली याला प्रमाण काय? आणि वादींनीं तरी असा कोणता भक्कम पुरावा शाबीत केला आहे? आणि फुकटची काल्पनिक वहिवाट सुरूं होतांच उत्पन्नावरही हक्क स्थापित होऊं शकतो कीं काय? इत्यादि अनेक आक्षेप घेतां येतील; व हेच पुढें अपिलाच्या वेळीं घेतलेले आहेतही. परंतु असा ठराव करण्याकरितांसुद्धां या विद्वान् जज्जांना प्रतिवादींचे कितीतरी महत्वाचे कागद नाशाबीत समजावे लागले व शाबीत धरिलेल्या कांहीं कागदांच्या अर्थामध्यें थोडाफार फेरफार करून घ्यावा लागला. अशा सर्व कागदांचा स्थलाभावीं आम्ही येथें उल्लेख न करितां त्यांतील फक्त दोनच महत्वाच्या कागदांविषयीं थोडा विचार करूं:—

मे. असि. जज्जसाहेबांनीं आपल्या ठरावांतील प्यारा ८ मध्यें असें स्वच्छ म्हटलें आहे कीं ‘ वादी किंवा प्रतिवादी यांपैकीं कोणत्याही पक्षास श्रीवीरभद्रदेवाच्या पुजेबद्दल जमीन आहे असें दाखवितां आलें असतें तर या खटल्याचा निर्णय करण्यास अत्यंत मदत झाली असती. ’ ही गोष्ट अगदीं सरळ आहे. परंतु या प्रकारचीच श्रीचरंतीस्वामींकडे कल्लोळ ( ता. चिकोडी ) येथील जी जमीन केवळ श्रीवीरभद्रदेवाच्या पुजेकरितांच आहे; त्या जमिनीच्या श्रीचरंतस्वामींच्या पूर्वजांच्या नांवें इंग्रजसरकारांतून

मिळालेल्या, समरीसेटलमेंट सनदेंत फक्त 'देव' असा शब्द नसून त्यांत 'श्रीवीरभद्र यड्डूर' 'काडदेवरू चरंती' असें नांव दाखल असल्यानें वादींच्या तक्रारीवरून मे. नॉर्मन साहेबांनीं त्या सनदेचा असा अर्थ केला आहे कीं, ही जमीन श्रीवीरभद्रदेवाच्या पुजेकरितां दिली नसून 'श्रीवीरभद्र यड्डूर' गांवांतील 'काडदेवरु मठाच्या श्रीचरंतीस्वामीस इनाम दिली आहे! आणि असा याचा अर्थ धरण्याकरितां क्षेत्र यड्डुरास वादींच्या म्हणण्याप्रमाणेंच 'वीरभद्र यड्डूर' असें नांव आहे, असें गृहित धरणें भाग पडलें. पण त्या नांवामागें असलेल्या 'श्री' अक्षराची वाट काय? येथें आम्ही इतकेंच विचारितों कीं, कोर्टापुढें हजर झालेल्या शेंकडों कागदांपैकीं एकामध्येंसुद्धां क्षेत्र यड्डुरास (नव्या यड्डुरास) 'वीरभद्र यड्डूर' असें नांव असल्याचें दिसत नसतांना या एकाच महत्वाच्या सनदेंत हें नांव कसें असेल? अशी मे. नॉर्मन साहेबांना मुळींच शंका आली नाहीं कां? बरें, खुद्द मठास इनाम असलेल्या अनेक जमीनींच्या हजर झालेल्या सनदांत नव्या यड्डूरास 'श्रीवीरभद्र यड्डूर' असें म्हटलें आहे काय, याचाही विचार झाला नाहीं. शिवाय ही सनद स्वतः ब्रिटिश सरकारनेंच दिली असल्यानें हल्लींच्या तेथल्याच कोर्ट कचेऱ्यांतील दप्तरांतून या सनदेचें मूळ तत्काल सांपडलें असतें, तें तरी निदान ही महत्वाची सनद असून तिच्या अर्थावरून हक्का-मध्यें परिवर्तन होऊन एका पक्षाची भयंकर नुकसानी विनाकारण केवळ नुसत्या अर्थभेदानें होते म्हणून जरा चिकित्सक दृष्टीनें पाहाण्यास अगर जास्त वाटाघाट होण्याला अवकाश देण्याची जरूरी होती; असें आम्हांस वाटतें. शिवाय ही सनद राहो, पण श्रीवीरभद्रदेवाच्या पुजेकरितां सौंदत्ती (इ. कोल्हापूर) येथील जी जमीन श्रीचरंतीस्वामींकडे यापूर्वी होती, (पण जी चालू खटल्याचे वेळीं खालसांत निघाली होती,) तिच्या कबुलायती व सरकारी फाळ्याच्या पावत्या या वेळीं हजर झाल्याच होत्या त्यांवरून स्पष्ट बोध होत होता कीं, ती जमीन केवळ श्रीवीरभद्रदेवाच्या पुजेकरितांच होती, तिकडे मे. नार्मन साहेबांचें लक्ष गेल्याचें दिसत नाहीं. याप्रमाणें त्या सनदेच्या पुर्ण अर्थाविषयीं कोणतीच चिकीत्सा न केल्यानें

वादीतर्फे वकिलांच्या मतलबी तक्रारीवरच जास्त भरंवसा ठेविला गेला, हें खरोखर लिंगायत समाजाचें दुर्दैव होय.

दुसरा महत्वाचा कागद म्हणजे या खटल्यांतील निशाण नं. ४३ ची मागें ( पृष्ठ ४२०वर ) उल्लेख केलेली प्रसिद्ध 'सहा कलमांची यादी' होय. हजर झालेल्या कोणत्याही कागदांत या यादीचा उल्लेख नसल्यानें व ही यादी वास्तविक यङ्कर मठांतील श्रीचरंतीस्वामींस लिहिली नसून श्रीसिद्धगिरी मठाच्या स्वामींना लिहिली असल्यानें सकृद्दर्शनीं ही यादी बनावट असावी असा संशय आला असावा; परंतु श्रीसिद्धगिरी व यङ्कर या दोन्हीं मठांकडील शिष्यपरंपरा वंशावळी हजर झाल्या असल्यानें यडुरांत नसो पण श्रीसिद्धगिरींत तरी त्या वेळीं ज्यांना यादी लिहिली ते श्रीमुप्पिनकाडदेवरुस्वामी हजर होते कीं नव्हते हें जरा चिकीत्सक दृष्टीनें पाहावयास पाहिजे होतें. पण अशी कांहींच खटपट लिंगायतांतर्फेंच्या वकीलांनींसुद्धां न केल्यानें ही महत्वाची यादी त्या वेळीं तरी बनावट वाटली.

या दोन महत्वाच्या कागदांना अशा तऱ्हेनें वादींनीं हरताळ लावण्याचा प्रयत्न केल्यामुळें व कोर्टासही त्यांचीच टीका ग्राह्य वाटल्याच्या योगानें मे. नॉर्मनसाहेबांना लिंगायतांविरुद्ध निकाल देणें शक्य झालें. जरी लिंगायतांविरुद्ध ठराव झाला तरी सदरी साहेबबहादुरांनीं आपल्या ठरावानें लिंगायत समाजावर अत्यंत उपकारच केले आहेत असें आम्हीं म्हणतों. कारण या ठरावानें ' लिंगायतांनीं पूजा केल्यास श्रीवीरभद्रलिंग भ्रष्ट होतें' अशी जी वादींची मुख्य, बळकट व महत्वाची मूळ तक्रार होती ती अजीबात खोटी ठरली. उलट हजर झालेल्या दोन्हीं पक्षांच्या बाकीच्या सर्व कागदांचा सूक्ष्म विचार करून निःपक्षपाती व न्यायनिष्ठुर अशा मे. नॉर्मन साहेबांनीं श्रीवीरभद्रदेवाचे परंपरागत हक्कदार पुजारी लिंगायत श्रीस्वामी हेच असून ब्राम्हण हे 'आश्रित' आहेत, आणि गेल्या ५० वर्षांपूर्वींपर्यंत लिंगायत लोक श्रीवीरभद्रलिंगाची प्रत्यक्ष पूजा करीत आले आहेत. ' असा तर्कशुद्ध निष्कर्ष काढिला आहे. हे त्या साहेबमहाशयांचे लिंगायत समाजावर अत्यंत उपकारच झाले आहेत. यावरून ब्राह्मणांनीं लिंगाय-

त्यांच्या हक्कांत मुद्दाम हात शिरकावून ढवळाढवळ केली आहे, या आमच्या मागील भागांतून केलेल्या विवेचनास दुजोरा येतो. मात्र अखेर अखेर केवळ तोंडी पुराव्यांवर व त्यांतल्या त्यांत नामदार बेळवी यांच्या साक्षीवर मे. नॉर्मन साहेबांनीं जरा विशेष भिस्त ठेवलीसें दिसतें. त्यामुळें त्यांचा ग्रह लिंगायतांच्या विरुद्ध होऊन ते शेवटीं वहिवाटीवर घसरले आहेत. ही एक बाब वर्ज केल्यास बाकी संपूर्ण ठराव लिंगायतांप्रमाणेंच झाला आहे. म्हणूनच हा ठराव बाहेर पडतांच ना. बेळवींसह सर्व ब्राह्मण वकिलांचा व ब्राह्मणहितचिंतकांचा 'हा ठराव पुढें मुळींच टिकावयाचा नाहीं' अशी बालंबाल खात्री झाली. त्यामुळेंच भटांप्रमाणें ठराव झाला असतांही उलट त्यांनींच आपसांत होण्याची वाटाघाट सुरू केली होती; परंतु त्या वेळीं आपसांतींत सदरहू तंटा मिटविण्याचा अधिकार फक्त एकट्या श्रीचरंती-स्वामींना तरी कोठें होता ? सर्व लिंगायत समाजावरच भटांनीं दावा केला असल्यानें नुसत्या श्रीस्वामींच्या संमतीनें सर्व लिंगायत समाज बांधला जाणार होता थोडाच म्हणून व सर्व समाजाशीं आपसांत करणें त्या वेळीं जवळ जवळ अशक्यच असल्यानें ही आपसातीची भाषा आपोआपच बंद पडली.

## (१२) गर्भ देवालयांतील पुजेची वहिवाट.

मे. असि. जज्जसाहेबांच्या ठरावाचा वर सारांश दिलाच आहे. त्यांतील वहिवाटीच्या मुद्याविषयीं जरा विवेचन करणें जरूर आहे. कारण साहेब-बहादुरांनीं ' श्रीचरंतीस्वामी हे हक्कदार पुजारी आहेत व ते प्राचीन काळा-पासून सन १८६२ पर्यंत अखंडितपणें श्रीवीरभद्रलिंगाची पूजा करीत आले आहेत. ही गोष्ट साधाकबाधक पुराव्यांचा पूर्ण विचार करून स्पष्ट केली आहे. पण पुढें मात्र ' लिंगायतांनीं प्रत्यक्ष पूजा करण्याची वहिवाट सोडिली आहे ' असें ते म्हणतात. वास्तविक हजर झालेल्या शेंकडों कागदांत अगर तोंडी पुराव्यांत तसा कोठेंही आधार नाहीं. तेव्हां हा हक्क केव्हां कसा गेला ? व लिंगायतांनीं तरी कां सोडिला ? त्यांना तो

नको होता कीं काय ? आणि जर नको होता तर हल्लीं तरी खटला कां झाला असता ? हे प्रश्न उत्पन्न होतात. तेव्हां ही गोष्ट केवळ ग्रहीत धरिलेली दिसते, याला कांहींच आधार नाहीं. तथापि आम्ही क्षणभर असें धरून चालूं कीं, त्या ठरावाप्रमाणेंच अलीकडे ५० वर्षें लिंगायतांनीं श्रीवरिभद्रलिंगाची प्रत्यक्ष पूजा केली नाहीं. अशी जरी खरी स्थिति असती तरी लिंगायतांचा प्रत्यक्ष पूजा करण्याचा हक्क नष्ट होत नाहीं. कारण आमच्या वाडवडिलांनीं ५० वर्षांपूर्वीं जाऊन श्रीवीरभद्रलिंगाची प्रत्यक्ष पूजा केली आहे असें समजा, आणि आतां आम्ही त्यांचे पुत्र श्रीवीरभद्रलिंगाची पूजा करण्यास गेलों तर आम्हांस ती पूजा करितां येणार नाहीं काय ? पन्नास वर्षांत आम्ही कोणीच तिकडे जरी फिरकलों नसलों तरी आजमितीस आमचा पूजा करण्याचा हक्क नष्ट झाला, आम्हास त्या देवळांत जातां येणार नाहीं, असें होईल काय ? मुळींच नाहीं. ५० वर्षेंच काय पण मध्यंतरीं शेंकडों वर्षें जरी कांहीं कारणानें आम्ही ( आमच्या पूर्वजांनीं ) न आल्यानें अगर येऊनही पूजा न केल्यानें ती करण्याची वहिवाट बंद असली तरी मागें लिंगायतांनीं जर पूजा केली असेल तर आजच्या त्यांच्या वंशजांना पूजा: करण्यास मुळींच प्रत्यवाय येणार नाहीं, व त्यांनीं पूजा केल्यास लिंगही पण भ्रष्ट होणार नाहीं ! म्हणून जर पूर्वकाळीं लिंगायत लोक श्रीवीरभद्रलिंगाची प्रत्यक्ष पूजा करीत होते, तर आजही ( मध्यंतरी जरी ५०-७५ वर्षें वहिवाट सोडिली असली तरी ) त्यांना प्रत्यक्ष पूजा करण्याचा पूर्ण हक्क आहे हें निर्विवाद आहे. ही झाली सामान्य भक्ताची गोष्ट. यावरून प्रत्यक्ष श्रीवीरभद्र लिंगापुढील सर्व उत्पन्न हक्कानें घेणाऱ्या हक्कदार पुजाऱ्याचा पूजा करण्याचा हक्क कधीं नष्ट होईल काय ? शक्यच नाहीं.

असाच एक मुद्दा इ. स. १८६८-७० सालच्या प्रसिद्ध खटल्यांत त्या वेळच्या प्रतिवादीनें पुढें आणिल्यावेळीं तेव्हांच्या मे. सबजज साहेबांनीं त्यावर लिहितांना आपल्या ठरावांत स्वच्छ म्हटलें आहे कीं, 'या खटल्यापूर्वी जरी लिंगायत पुजाऱ्यानें २५ वर्षें प्रत्यक्ष पूजा केल्याचें दिसत

नाहीं; तरी त्याचा पूजा करण्याचा हक्क नष्ट होत नाहीं.' [ पहा असल नं. ९२८०८ वरील ठराव ) आणि हा ठराव या खटल्यांत हजर केला असून तो मे. नार्मन साहेबांनीं पाहिला असतांही त्याचा त्यांनीं विचार केल्याचें दिसत नाहीं. जर सन १८६८ सालापूर्वी २०-२५ वर्षे लिंगायतांनीं श्री-वीरभद्रलिंगाची प्रत्यक्ष पूजा केली नसेल, तर हिलाच प्राचीन वहिवाट असें समजून त्यावेळच्या सबजज्ज साहेबांनीं विरुद्ध निकाल कां दिला नाहीं? अर्थात् २५-३० अगर ५६-६० किंवा शें दोनशें वर्षे जरी वहिवाट बंद असली तरी तो हक्क नष्ट होत नाहीं. अशा ठिकाणीं वहिवाटीस केव्हांही प्रतिबंध येत नाहीं; याचें कारण असें कीं, उत्पन्नाकरितां पूजा करणाऱ्या पुजाऱ्याचें लक्ष देवाच्या व्यवस्थेशीर भक्तियुक्त पुजेपेक्षां त्यापुढें येणाऱ्या उत्पन्नाकडेच जास्त असतें. सबब तो सहसा पूर्ण भक्तीनें पूजा करीत नसतो, तर ती केवळ नित्याची आवश्यक बाब म्हणून करीत असतो; आणि अशाप्रकारें भक्तिविना साधारणतः सक्तीनेंच नित्याची पूजा करणाऱ्या पुजाऱ्याच्या अगोदर जर कोणी एखादा भक्त नित्य भक्तीनेंच पूजा करून जाऊं लागला तर त्यानें त्या पुजाऱ्याचें एक काम हलकें केलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि भक्त हा अशाप्रकारें नुसती पुजाच जोंपर्यंत करीत राहील म्हणजे त्या देवापुढील उत्पन्नाकडे मुळींच ढुंकून पाहणार नाहीं; तोंपर्यंत पुजाऱ्यानें तरी त्याच्या पुजेस हरकत कां करावी? आणि अशाप्रकारचीं बिन हकाची भक्तियुक्त पुजेची वहिवाट, एकाद्या आत्मोन्नति करून घेणाऱ्या भाविक भक्तानें पुष्कळ वर्षे चालविली, म्हणून त्या हक्कदार पुजाऱ्याला वाईट वाटण्याचें कारण काय? कांहींच नाहीं; कांकीं, त्याचें उत्पन्न त्यास अबाधित मिळत असतेंच; आणि तो भक्त पूजा करीपर्यंत हक्कदार पुजारी तिकडे कदाचित् लक्ष देत नसला म्हणून त्याचा देवापुढें बसून उत्पन्न घेण्याचा अगर प्रत्यक्ष पूजा करण्याचा हक्क नष्ट होईल काय? मुळींच नाहीं. कारण-जेव्हां तो भक्त येऊन पूजा करणार नाहीं तेव्हां पुजाऱ्यास ती करावीच लागेल; ' आज पूजा कां केली नाहीं?' असें पुजाऱ्यास कोणीही हक्कानें विचारूं शकेल; पण

भक्तांस तसें विचारितां येणार नाहीं. यावरून मध्यंतरीं कितीही वर्षें प्रत्यक्ष पूजेविरहित गेलीं म्हणून 'हक्कदार पुजाऱ्याचा पुजेवरील हक्क नष्ट होत नाहीं.' असें जें सन १८६८ सालच्या ठरावांत म्हटलें आहे, तें अगदीं योग्य आहे. असा प्रकार कदाचित् त्या खटल्यापूर्वी श्रीवीरभद्रगर्भ देवालयांत झाला असावा व तसा कांहीं पुरावाही त्यावेळच्या मे. सबजज्जांपुढें आला असावा; म्हणून त्यांना वरील प्रकारें उत्तर देणें भाग पडलें आहे. पण हल्लींच्या खटल्यांत तसा यत्किंचित् पुरावा नसून हक्कदार लिंगायत पुजारी व इतर सर्व मोठमोठे वजनदार लिंगायत भक्तही आपली पुजेची वहिवाट अबाधित आहे, असें सांगत असून त्यांस प्रत्यक्ष १५-२० ब्राह्मण साक्षीदारांचें पाठबळ असतांना 'अलिकडे ५० वर्षें लिंगायतांनीं श्रीवीरभद्र गर्भ देवालयांत प्रत्यक्ष पुजेची वहिवाट केल्याचें दिसत नाहीं.' असा मे. नार्मन साहेबांनीं केलेला तर्क निराधार नव्हे काय ? या विधानास या खटल्यांत कोठेंही थोडासुद्धां आधार नाहीं म्हणूनच सदरहू ठराव कोर्टांत प्रसिद्ध होतांच सर्वच ब्राह्मण वकिलांनीं एकमतानेंच म्हटलें कीं, 'हा ठराव टिकणें कठीण आहे.' आणि हें त्यांचें म्हणणें अगदीं रास्त होतें. कां कीं मे. नार्मन साहेबांपुढें देखील आपण श्रीवीरभद्रदेवापुढील एकाद्या हक्काबाबीस मालक आहों असें आतांसुद्धां यङ्करच्या वादी भटांना दाखवितां आलें नाहीं. फक्त 'आपली वहिवाट आहे, इतकेंच ते दाखवीत होते. म्हणून ती वहिवाट ग्राह्य धरून भटांना श्रीवीरभद्रदेवाची पूजा कायमची अर्पण करितांना मे. नार्मनसाहेबांना 'पुजेच्या हक्कास उत्पन्नाची जोड पाहिजे' असें वाटूं लागलें म्हणून 'श्रीवीरभद्रलिंगापुढें गर्भदेवळांत ठेविलेलें उत्पन्न ब्राह्मणांनीं घ्यावें.' असा परभारें पावणेतेराचा फुकटा हक्क, मे. नार्मन साहेबबहादुरांनीं बहाल केला आहे. पण जेथें मूळ वहिवाटीवरून ठरविलेला पुजेचा हक्कच डळमळीत होता तेथें त्यांवर अवलंबून असणारा उत्पन्नाचा मिळालेला हक्क तरी कसा टिकावा ? म्हणून ह्या दोन्ही बिन्नबुडाच्या हक्कांचा पुढील कोर्टांतून कसा बोजवारा उडाला व बिन्नहक्कदार वादी भटांचे दोन्ही दावेच

कसे मुळासुद्धां काढून टाकण्यांत आले ही हकिकत अत्यंत मनोरंजक व बोधप्रद असल्यानें ती ऐकण्यास्तव आपण पुढील प्रकरणांकडे वळूं.

## [ १३ ] बेळगांव डि० जज्जकोर्टाकडे अपील.

ता० ४ फेब्रूवारी सन १९२० इ. रोजीं मे० असि० जज्जसाहेबांनीं आपला ठराव जाहीर केला. तेव्हां तो पुढें टिकणार नाहीं ही गोष्ट जरी पटली होती, तरी यड्डूरच्या भटांना तात्पुरता आनंद झाला. पण श्रीचरंतीस्वामींना व इतर प्रतिवादींना सर्व लिंगायत लोक दोष देऊं लागले कीं, ' तुम्ही अदूरदृष्टीनें सदरहू खटला बुडविला. आतां पुढें लवकरच जज्जकोर्टाकडे अपील दाखल करून धोरण राखून शिकस्तीचा प्रयत्न करा. आपल्या पक्षाकडील कागदपत्रांचे पुरावे इतके बळकट असतांना खटल्याचा निकाल लिंगायतांच्या विरूद्ध व्हावा याला श्रीचरंतीस्वामींच्या व तुम्हां इतर पुढाऱ्यांच्या मंदपणाशिवाय दुसरें काय कारण असणार ? ' हा दोषारोप ऐकून ' घोडा मेल्याचें दुःख बाजूस राहून जीन खांद्यावर वाहण्याची पाळी आली या अर्थाच्या कानडी म्हणीप्रमाणें पुढाऱ्यांची अवस्था झाली. त्यांना खटला विरुद्ध झाल्याच्या दुःखापेक्षां योग्य प्रयत्न केला असूनही समाजाकडून होणाऱ्या दोषारोपांबद्दलच विशेष वाईट वाटलें; पण असें वाईट वाटून घेऊन हातपाय गाळून हताश होऊन बसणारे रडवे पुढारी त्या खटल्याच्या वेळीं लिंगायत समाजाच्या वांट्यास आले नव्हते; तर ठोशास ठोसा लगावून, निर्भीड सत्यप्रतिपादनानें, असत्यावर चढविलेला खरेपणाचा बुरखा बाजुला भिरकावून देणारे वीरमर्द वीरशैवभाईच श्रीचरमूर्तिस्वामींच्या विजयी भगव्या झेंड्याखालीं यावेळीं जमा झाले असल्याकारणानें त्या विरुद्ध ठरावरूपी धक्क्यानें जमीनदोस्त तर झालें नाहींतच; पण उलट 'कीं तोडिला तरु फुटे अणखी भरानें।' या स्फूर्तिदायक कव्युक्तीप्रमाणें या अपयशाच्या पहिल्या धक्क्यानें त्यांना गदगदां हालवून चांगलें जागें केलें; म्हणून ते त्या उसळीसरसें पुनः जे उत्साहानें उठले तों त्यांनीं प्रतिज्ञाच केली कीं, 'हें अपयशाचें घाणेरडें गाठोडें श्रीवीरभद्रदेवाच्या कृपेनें लवकरच अरबीसमुद्रांत भिरकाऊन देऊन विजयश्रीला

वीरशैवांकडे खेंचून आणूं तेव्हांच श्रीवीरभद्र देवालयाचा उंबरठा चढूं.' असें म्हणून ते शिकस्तीच्या प्रयत्नास लागले. या नव्या उमेदीच्या उत्साही वीरशैवांचें नेतृत्व त्यावेळीं साहाजिकच समाजाभिमानानें प्रेरित झालेले वीरशैव वीर श्रीमंत कराळे यांजकडे आलें. त्यांनीं त्यावेळीं जी प्रयत्नाची शिकस्त केली तीमुळेंच मुख्यतः खटला यशस्वी झाला म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. तो प्रयत्न असा—

वरील निकालानंतर लागलेच त्या ठरावाचे उतारे वगैरे घेऊन मि. आजरेकर वकील साहेबांमार्फत सन १९२० च्या एप्रील महिन्यांत बेळगांव येथील जज्जकोर्टांत अठ्ठावीस कलमांचा अपील अर्ज दाखल करण्यात आला. त्यांतील मुख्य तक्रार ह्मणजे कीं, 'आह्मी हक्कदार पुजारी असून आह्मांस पुजेबाबत जमिनी आहेत. आणि आजतागायत श्रीवीरभद्रलिंगाची प्रत्यक्ष पूजा करण्याची वहिवाट चालू असतांना ती मनास न आणितां मे. आसि. जज्जसाहेबांनीं आह्मांस पुजेच्या बाबतींत कायमची मनाई केली आहे, ती दूर होऊन आह्मांस पूर्ववत् प्रत्यक्ष पूजा करण्यास मोकळीक असावी.' अशी होती. हें अपील दाखल केल्यावेळीं मे. बॉइड साहेब हे डिस्ट्रिक्ट जज्ज होते, पण पुढें सन १९२० इ. अखेर ते पेन्शनींत गेले व मे. पामर साहेब हे त्या जागेवर आले. ते सोलापूर येथें दोनतीन वर्षें डि. जज्ज होते ह्मणून त्यांना वीरशैव लोकांचा मनःस्वभाव ह्मणजे त्यांची सत्यप्रीति, सरळपणा व त्याबरोबरच त्यांच्या आळशी स्वभावाची चांगली ओळख झाली होती. विशेषतः त्यांच्यातील सत्यप्रियतेमुळें वीरशैव समाजासंबंधीं मे. पामर साहेबांच्या ठिकाणीं बराच आदर होता असें समजून आल्यामुळें श्रीचरंतीस्वामी व सर्व लिंगायत पुढाऱ्यांना आपल्या खटल्यासंबंधीं योग्य न्याय होईल अशी अंधुक आशा उत्पन्न झाली होती; पण प्रत्यक्ष खटला चालल्यावेळीं जो प्रकार घडला त्यावरून वीरशैव समाजापेक्षां त्यांतील सत्यत्वाकडेच त्याची कशी सूक्ष्म दृष्टि होती हें स्पष्ट कळून येईल; ह्मणून पुढील प्रकरणाकडे लक्ष पुरवूं.—

श्रीवीरभद्र देवाच्या प्रेरणेनें, वीरशैवसमाजाच्या अत्यंताभिमानानें प्रेरित होऊन, आपल्या अंगच्या धैर्य, दीर्घोद्योग व निर्भीडपणा इत्यादि अनेक सद्गुणांनीं विजयश्रीला वीरशैवांकडे खेचून आणणारे वीर



श्रीमंत चवनबसापा मलापा कराळे —एकसंबे

# [ १४ ] डि. जज्ज कोर्टांतील चौकशी.

सन १९२१ सालच्या जुलई महिन्याच्या प्रारंभालाच त्या प्रख्यात खट-ल्याची चौकशी सुरू झाली. मे. पामर साहेब हे अत्यंत नाणावलेले, अनुभविक व सुप्रसिद्ध जज असल्यामुळें त्यांच्या ठरावानुरोधानेंच मुंबई हायकोर्टाचा निकाल होणार अशी अटकळ सर्व लोक बांधीत होते. अर्थात् त्यांचा ठराव ह्मणजेच हायकोर्टाचा निकाल होय, अशी सामान्यतः स्थिति होती. त्यास्तव येथें जर मागील ( असि. जज्ज ) कोर्टाप्रमाणेंच वीरशैव समाजाच्या विरुद्ध निकाल झाला, तर कारभार आटपलाच होता. ह्मणून श्रीस्वामींना व सर्व वीरशैव पुढाऱ्यांस अत्यंत काळजी वाटत अस-ल्यास नवल नाहीं. चौकशीच्या मुदती दिवशींच श्रीमंत कराळे व श्री. हालाप्पनवर हे बेळगांवास आले होत. त्यांना विरुद्ध बाजूची तयारी व स्वपक्षाची ढिलाई पाहून अत्यंत निराशा वाटली ह्मणून त्यांनीं नेटानें उद्योग आरंभिला. प्रथमतः अपील वादी (लिंगायत समाजा ) तर्फेंचे सुप्रसिद्ध हॉयकोर्ट वकील मि. सिंहेश्वरकर यांचें आर्ग्युमेंट (स्पष्टीकरण) सुरू झालें. त्यांनीं मुख्यतः पुढील नऊ कलमांमध्यें आपल्याकडील सर्व महत्वाच्या कागदपत्रांचें उत्तम प्रकारें कोर्टापुढें स्पष्टीकरण केलें. त्यांचें सुमारें दोन दिवस आर्ग्युमेंट झाल्यावर, ते सर्व मुद्दे खोडून काढण्यास्तव विरुद्ध बाजूच्या प्रख्यात राव वकिलांनीं तीन दिवसपर्यंत जोरानें आर्ग्युमेंट केलें व शेवटीं त्यांनीं 'लिंगायत हे शूद्र आहेत.' असा एक नवीनच दहावा वादग्रस्त मुद्दा मुद्दाम कोर्टापुढें ठेविला. मि. राव वकिलांच्या त्या तीन दिवसांच्या विवेचनाला हरताळ फांसण्यास ( प्रत्युत्तर देण्यास ) पुनः जेव्हां मि. सिंहेश्वरकर वकीलसाहेब उभे राहिले तेव्हां त्यांना फक्त तीन तासांचीच अवधि कोर्टानीं दिली! पण तेवढ्या अल्पावधींतच त्यांनीं विरुद्ध बाजूचे सर्व मुद्दे सप्रमाण खोडून काढून शेवटीं 'लिंगायत हे शूद्र नाहींत' असें सिद्ध करून दिलें! त्या चार पांच दिवसांत कोर्टाचा ग्रह कसकसा बदलत जाऊन शेवटीं वीरशैवांना पूर्ण अनुकूल झाला, त्याचें विस्तृत

विवेचन करावयाचें ह्मटल्यास पुनः प्रस्तुत ग्रंथाइतकाच एक ग्रंथ होईल. त्याकरितां त्यांतील महत्वाच्या मुद्यांवरील दोघां वकील महाशयांच्या वादविवादांचें त्रोटक स्पष्टीकरण पुढें दिलें आहे, त्यावरून त्याची वाचकांना कल्पना करितां येईल. असो.

हा वादविवाद उत्तरप्रत्युत्तररूपानें देणें जरूर असल्यानें प्रथम मि. सिंहेश्वरकरांचें ह्मणणें देऊन त्यानंतर त्यापुढें लागलेंच मि. राव वकिलांचें उत्तर व पुनः जरूर असेल येथें मि. सिंहेश्वरकरांचें ह्मणणें दिलें आहे. व विवेचनांतील कागद कालानुक्रमानें घेतले आहेत.

१ प्रथमारंभीं मि. सिंहेश्वरकरांनीं (मागें पृष्ठ ४१० वर उद्धृत केलेली) आईसाहेबांनीं दिलेली मुख्य सनद विवेचनास घेतली. त्यांत उल्लेखिलेला यङ्कूर येथील 'श्री' म्हणजे 'श्रीवीरभद्रदेवच' होय व त्यांची पूजा प्राचीन काळापासून लिंगायत लोक व त्यांचे श्रीचरंतीस्वामी हेच करीत होते, असें खालच्या कोर्टांनीं केलेलें विधान अगदीं सत्य असून तशीच वहिवाट आजतागायत चालू आहे; असें माझें स्पष्ट मत असून शिवाय,

२ (मागें पृष्ठ ४१५ वर उल्लेखिलेल्या) नंतर मिळालेल्या सहाही सनदांतील 'श्री' म्हणजे 'श्रीवीरभद्रदेव' होय. यावरून आमची वहिवाट फार प्राचीन काळापासून आज तारखेपर्यंत अखंडित सुरू आहे.

मि० राव—या सर्व सनदांमध्यें फक्त यङ्कूर येथील 'श्री' असाच उल्लेख असून श्री म्हणजे श्रीवीरभद्रदेवच असा अर्थ गृहित धरणें योग्य नाहीं 'श्री' या शब्दानें यङ्कूरांतील कोणत्याही दुसऱ्या देवाचा उल्लेख होणें शक्य आहे. म्हणून खालच्या कोर्टाचा तो तर्क बरोबर नाहीं.

पण मे० जजसाहेबांनींच खालच्या कोर्टाची विचारसरणी मान्य केल्यामुळें हा वाद मिटला.

३ नंतर सिंहेश्वरकरांनीं मागें पृष्ठ ४२० वर उल्लेखिलेली प्रसिद्ध सहा कलमी यादी पुढें घेतली. ती निशाण नं. ४३ ची यादी खालच्या कोर्टांत बनावट ठरविण्यांत आल्यानंतर सुरक्षित राहण्यास्तव पक्की मोहोरबंद करून सीलबंद पेटींत बंदोबस्तानें ठेविली होती. जर खटला ब्राह्मणाप्रमाणें

निकालांत निघाला असता तर त्या यादीबद्दल काम चालवून श्री. चिरंतीस्वामींचा पूर्ण समाचार घेण्याचा भटांचा विचार होता; पण दुर्दैव भटांचें कीं, ही सहा कलमी यादी सन १८५४ सालींच वारसा चौकशीच्या खटल्यांत श्रीसिद्धगिरीकर स्वामींनीं हजर केली असून तिजबद्दल श्रीसिद्धगिरीकर व यड्डूरकर स्वामींतर्फेच्या वटमुखत्यार कारभाऱ्यांनीं आपापल्या जबाबांत त्या यादीचा उल्लेख केला होता. त्या दोघांच्याही जबाबाच्या सरटीफॉईड कॉप्या त्याचवेळीं घेऊन ठेवलेल्या यड्डूर येथील मठाच्या दप्तरांत सापडल्या. त्या यावेळीं कोर्टांत हजर करून मि० सिंहेश्वरकरांनीं त्या यादीचा खरेपणा सिद्ध करितांच मि० राव वकील स्तब्ध झाले व कोर्टाची पूर्ण खात्री झाली.

४ यानंतर मि. सिंहेश्वरकरांनीं श्रीवीरभद्रदेवाच्या पूजेकरितांच मिळालेली कल्लोळ येथील जमिनीची समरी सेटलमेंटची मुख्य सनद चर्चेस घेतली व म्हटलें कीं, 'ही सनद श्रीवीरभद्रदेवाच्या पूजेकरितांच आहे, मठास इनाम असलेल्या जमिनीची नाहीं.'

मि. राव.—ही सनद वीरभद्र यड्डूर गांवांतील चरंतीमठाच्या इनाम जमिनीची असल्याबद्दलचा निकाल खालच्या कोर्टांत झालाच आहे. आतां पुनः त्यावर चर्चा कशाला?

मि. सिंहे.–(निश्चयी स्वरानें) नाहीं. ही सनद श्रीवीरभद्रदेवाच्या पुजेकरितांच आहे. इतर कामाकरितां मुळींच नाहीं.

मि. राव.–( त्रासिकपणानें ) तुम्हाजवळ तसा कांहीं आधार आहे काय? असल्यास दाखवा. उगीच कोर्टाची वेळ कां घालवितां?

त्यावेळीं मि. सिंहेश्वरकराजवळ श्रीवीरभद्रदेवाच्या पुजेकरितां असलेल्या कल्लोळच्या जमिनीच्या सनदेबद्दल एक व श्री उत्सवमूर्तीच्या पुजेकरितां यड्डुरास असलेल्या जमिनीच्या सनदेचा एक असे दोन लँड ॲलिअनेशन बुकाचे उतारे होते; पण मुद्दाम जरा गंमत करण्याकरितां आपला वकिली कावा लढवून त्यांनीं प्रथम त्यांतील श्रीउत्सवमूर्तीच्या सनदेचा उतारा कोर्टापुढें ठेवून म्हटलें, 'हा पाहा आमच्या जवळचा पुरावा.'

तेव्हां कोर्टांनीं तो कागद वाचून पाहून म्हटलें 'उत्सवमूर्तीबद्दल कांहीं तंटा आहे काय?' नंतर मि. राव वकिलांनीं साशंक मुद्रेनें लगबगीनें तो कागद हातांत घेऊन निरखून पाहून जरा रागीट स्वरानेंच उत्तर केलें. "अहो, हा कसला पुरावा? हा तर श्रीउत्सवमूर्तीच्या पुजेच्या जमिनी-बद्दलचा उतारा आहे. सध्यां त्याबद्दल तंटा मुळींच नाहीं; ती पूजा श्री-चरंतीस्वामींकडे आहे हें आम्ही कबूल केलेंच आहे. या उताऱ्यांत ज्या-प्रमाणें 'श्रीउत्सवमूर्ति देव वहिवाटदार श्रीकाडदेवरु चरंती' असें स्वच्छ लिहिलें आहे. याचप्रमाणें 'श्रीवीरभद्र देव वहिवाटदार (म्यानेजर) काडदेवरु चरंती' असें लिहिलेला उतारा असेल तर दाखवा." असें म्हणून ते विजयी मुद्रेनें मि. सिंहेश्वराकडे पाहूं लागले; त्यावेळीं मि. सिंहेश्वरकरांनीं आपल्याजवळ असलेला दुसरा उतारा कोर्टापुढें टेबलावर ठेवीत तशाच निश्चयी स्वरानें सांगितलें कीं, 'तुम्हीं म्हणतां तसाच हा उतारा आहे पाहून घ्या.' असें म्हणून तो कोर्टाच्या हातीं दिला. मे. पामर साहेबांनीं तो कागद हातीं घेऊन त्यांतील 'श्रीवीरभद्रदेव' हा शब्द पाहतांच त्यांची चर्या एकदम पालटली, आणि लिंगायत समाजातर्फेची सर्व हकीकत अक्षरशः खरी आहे अशी त्यांची पक्की खात्री झाली. त्या-मुळें आतांपर्यंत या खटल्यासंबंधांत ब्राह्मणांना अनुकूल असलेला त्यांचा ग्रह एकाएकीं पालटून तो लिंगायतांना पूर्ण अनुकूल झाला. सदरहू कागद पाहून होतांच त्यांनीं तो मि. राव वकिलांकडे दिला.

तो कागद हातीं घेऊन निरखून पाहातांच, मि. राव वकीलसाहेबांचा 'राव' एकदम उतरून गेला! व त्यांचा चेहरा अगदीं सचिंत झाला. त्या वेळीं असे अव्वल दर्जाचे कागदपत्र प्रतिवादीकडे असतांना त्यांची खरी माहिती न देतां आपली भलतीच समजूत करून दिल्याबद्दल त्यांनीं मि. यड्डूरकर वकिलांना दोष दिला. मात्र ते कसलेले वकील असल्यामुळें त्यांनीं प्रसंगावधान राखून लागलाच आपल्याकडे असलेल्या कल्लोळच्या जमिनीच्या इनाम चिठ्ठीचा उतारा कोर्टापुढें ठेवून म्हटलें कीं, 'या उता-ऱ्यांत देव हा शब्द मुळींच नाहीं, आणि प्रतिवादींनीं हजर केलेल्यांत जर

श्रीकाडदेवरु मठांतील कारभारी



शिव० महारुद्रय्या मलकय्या
यरगट्टीमठ ( श्रीक्षेत्र यड्डर. )



श्रीचरमूर्ति स्वामीचे सल्लागार व सदरी
खटल्याचे सूत्रधारः—



श्री. कलाप्पा सिद्ध लिंगाप्पा करोसी (श्रीक्षेत्र यड्डर)

तो आहे तर ती उतारा करणाऱ्या कारकुनाची नजरचूक होय. करितां तो उतारा आम्हांस मुळींच मान्य नाहीं.'

मि. सिंहे.–असें असेल तर या उताऱ्याची मूळप्रत जें 'लँड ॲलिअ-नेशन बुक' तेंच पाहाण्याकरितां मागवा म्हणजे झालें.

मि. राव –त्याचें मूळ जर आणविणार तर इनामचिठ्याचें मूळही आणविलेंच पाहिजे.

ही त्या दोघांची तक्रार ऐकून कोर्टानीं तीं दोन्ही बुकें उलट टपालीं पाठ-विण्याविषयीं चिकोडी मामलेदार कचेरीस तारेनें कळवून त्या दिवशीं ५ वाजून गेले असल्यानें कोर्टास सुटी झाली. तार दिल्यानंतर हीं दोन्ही बुकें तेथल्याच कलेक्टर ऑफिसांत असतात असें कळलें; पण त्याचा कांहीं उपयोग नव्हता.

दुसऱ्या दिवशीं कोर्टाच्या सुरवातीस चिकोडीहून १ लँड ॲलिअनेशन व २ इनामचिठ्ठा हीं दोन्ही बुकें टपालमार्फत आलेलीं कोर्टाच्या टेबला-वर ठेविलीं होतीं. त्यांतील पहिल्या बुकांत देव हा शब्द आहे ही लिंगाय-तांतर्फेच्या वकिलांना व इतर सल्लागारांना खात्री होतीच; परंतु इनाम चिठ्यांत मात्र अद्याप कोणी तपास केला नव्हता, म्हणून त्यांत काय आहे हें पाहाण्याची उत्कंठा सर्वांना होतीच. त्या कारणानें श्री. कलापा करोसी यांनीं बेधडक पुढें जाऊन, कोर्टासमक्षच टेबलावरील तें बूक ओढून घेऊन त्यांत कल्लोळ गांवापैकीं देवस्थान सदराखालीं असलेलें सदरहू वाद-ग्रस्त जमिनीचें खातें पाहिलें तों चमत्कार हा कीं, त्यांतही 'श्रीवीरभद्रदेव वहिवाटदार काडदेवरु चरंती' असें स्वच्छ लिहिलें होतें! तें पाहातांच त्यांना अत्यानंद होऊन त्यांचा चेहरा प्रफुल्लित झाला. नंतर त्यांनीं तें बूक तेथेंच झांकून ठेविलें व ते आपल्या जागेकडे जाऊं लागले. त्यावेळीं त्यांच्या एकंदर हालचालींवर कोर्टाचें पूर्ण लक्ष होतें, म्हणून तें बूक झांकून ठेवून ते परत फिरतांच कोर्टानीं विचारिलें कीं, 'तुम्ही त्यांत काय पाहिलें?' तेव्हां त्यांनीं न डगमगतां उल्हासानें उत्तर दिलें कीं, 'त्यांत देव हा शब्द आहे कीं नाहीं हें पाहिलें.'

3373

कोर्ट०— कोठें आहे तें दाखवा.

मग कलापांनीं तें बूक उघडून त्यांतील खातें काढून तें बूक कोर्टापुढें ठेविलें; परंतु तें मोडींत लिहिलेलें असल्यामुळें त्याचा मे. पामर साहेबांना नीट उमज पडेना म्हणून त्यांनीं मि. सिंहेश्वरकरांना पुढें बोलावून तें स्वच्छ वाचून दाखवा असें सांगितलें. त्यांनीं ताबडतोब वाचून दाखवितां च कोर्टांनीं तेथेंच पडलेलें ल्यॉंड ॲलिअनेशन बुकही उघडून पाहिलें दोहों-मध्यें 'श्रीवीरभद्रदेव वहिवाटदार काडदेवरुचरंती' असें स्पष्ट लिहिलेलें असल्यामुळें कोर्टाची पूर्ण खात्री होऊन गेली. नंतर कोर्टांनींच तीं दोन्ही बुकें मि. राव वकिलांना दाखविण्यास सांगितलें. मि. राव यांनीं प्रथम लँड ॲलिअनेशन व मागाहून इनामचिठ्ठा हीं पाहिलीं; त्या दोहोंत देव हा शब्द स्वच्छ लिहिल्यानें त्यांना तक्रारीस जागा राहिली नाहीं; म्हणून ते जरा स्तब्ध झाले. परंतु निराश होणें हें उत्तम वकिलांचें लक्षण नसल्यानें त्यानीं लागलाच कोर्टास प्रश्न केला कीं, 'या दोन्ही बुकांतून श्रीवीरभद्रदेव वहिवाटदार ( अगर म्यानेजर ) काडदेवरु चरंती' असें लिहिलें असल्यानें ते त्या जमिनीची वहिवाट करीत असतील; पण ती जमीन पुजेकरितांच आहे असें त्यांत कोठें जाणविलें आहे ? श्रीवीरभद्रदेवाच्या इतर सेवेकऱ्यांच्या सर्व जमिनीसंबंधीं खात्यांत ती ती जमीन धारण करणारांकडे ती कोणत्या कारणाकरितां इनाम दिली आहे हें बहुधा दाखविलेलें आहे; परंतु यांत तसा उल्लेख नसल्यानें ही जमीन पुजेकरितांच आहे व हे पुजारी आहेत असें कसें म्हणतां येईल ? असें जर मानावयाचें तर 'श्रीवीरभद्रदेव म्यानेजर ईरा नायकीण' असें खातें असलेली ही ईरा नायकीण सुद्धां श्रीवीरभद्रदेवाची पुजारीणच समजावयाची काय ?

कोर्ट— ईरा नायकीण असें मोघमांत म्हणतां पण ती कोणती सेवा करिते ?

मि. राव— ती देवाची नौकरी करिते.

कोर्ट— श्रीचरंतीस्वामी या जमिनीबद्दल कोणती नौकरी करितात ?

मि. राव— तें मला माहीत नाहीं.

कोर्ट– तें आपणांस माहीत नसेल; पण आम्हास माहीत झालें.

प्रत्यक्ष कोर्टानींच याप्रमाणें कबुली दिल्यानंतर प्रश्नच आटपला. त्यामुळें त्या वेळींच ब्राह्मणांना खटल्याचा निकाल बहुतेक समजून येऊन भटांचीं तोंडें काळवंडून गेलीं. म्हणून हा खटला ऐकण्यास कोर्टांत आलेले सर्व ब्राह्मणब्रुव गुपचिप निघून गेले; आणि वीरशैव समाजास विजयाची आशा वाटूं लागून आनंद झाला. एकंदरींत या दिवसापासून या खटल्याचें पारडें फिरलें व तो वीरशैवांना विजयाशा उत्पन्न करणारा तर भटांना निराशेच्या गर्तेंत लोटणार असा भासूं लागला.

५ यानंतर मि. सिंहेश्वरकरांनीं सन १८६० सालीं सहा वर्षें वारसा चौकशीच्या खटल्यानिमित्त जप्तींत असलेलें सर्व उत्पन्न (श्रीवीरभद्र देवापुढील व मठाचें इ. सर्व) त्यावेळचे मठाधिपति श्रीआद्यसिद्धलिंगेश्वर याच्या स्वाधीन करून त्यांजकडून मे. मामलेदारसाहेब चिकोडी यांनीं लिहून घेतलेल्या पावतीचा उतारा कोर्टापुढें मांडिला. तो पाहून मि. राव यांनीं 'हा बाहेरील हक्क होय.' असें म्हटलें पण त्यावेळीं अगर त्यापूर्वीं बाहेरील व आंतील असे दोन भाग झाल्याचें त्यांना दाखवितां न आल्यानें ती पावती साहाजिकच खरी ठरली.

६ मग मि. सिंहेश्वरकरांनीं असल नं. १०५/१८६८ चा ठराव चर्चेस घेतला. मि. राव यांनीं त्यावर आक्षेप घेतला कीं, 'यापूर्वीं पंचवीस वर्षें लिंगायतांनीं श्रीवीरभद्रलिंगाची प्रत्यक्ष पूजा केली नाहीं.' परतु या मुद्याचें पूर्ण स्पष्टीकरण मागें याच भागांतील १२ व्या प्रकरणांत केलें असल्यानें तेंच उत्तर देऊन मि० राव वकिलांना निरुत्तर करितां आलें.

७ वरील अ. नं. १०५।१८६८ च्या खटल्यांतील महत्वाचे साक्षीदार [ कीं ज्यांची कमिशन मार्फत श्रीस्वामींतर्फे साक्ष झाली, त्या ] कोन्हेरराव ऊर्फ बापूसाहेब जहागिरदार यांचा जबाब मि. सिंहेश्वरकरांनीं विचारास घेतला. त्या जबाबांत नमूद केल्याप्रमाणें पूजा करणें व हक्क घेणें गर्भदेवालयाबाहेर राहून शक्य तरी आहे काय ? अशा प्रकारचे यच्चावत् हक्क उपभोगणारे श्रीचरंतीस्वामी प्रत्यक्ष पूजाच करीत नव्हते, असें

मानणें म्हणजे सूर्याला प्रकाशच नाहीं, असें म्हणण्याइतकेंच मूर्खपणाचें होय! पण मि० रावसारखे प्रसिद्ध वकीलही जेव्हां हा हक्क 'बाहेर बसूनच घेतात' असें म्हणतात तेव्हां आश्चर्य वाटतें; असो.

८ नंतर इ. स. १८६८ च्या खटल्यांत हजर केलेला (पृष्ठ ४२७ वर विवेचन केलेला) महादेव भटाचा अर्ज आणि

९ त्याच वेळीं दुसऱ्या दोघां भटांनीं 'पूजा आपल्या मालकीची आहे व सर्व उत्पन्न आपणच घेत असतों;' असा दुसरा एक अर्ज केला होता. त्या दोन्ही अर्जाविषयीं मि. सिंव्हेश्वरकरांनीं इतकेंच सांगितलें कीं, हे पूर्वतयारीचे अर्ज होत. तसें नसतें आणि श्रीवीरभद्र गर्भदेवालयांत भटांचा यत्किंचित् जरी हक्क असता, तर जेव्हां सन १८५३ सालीं यड्डूर येथील मठाधिकारी श्रीआद्यसिद्धलिंगेश्वर स्वामी व भवानराव यांच्यांत वितुष्ट आलें, तेव्हां मठाच्या विरुद्ध श्रीवरिभद्रदेवालयांतील एकंदर उत्पन्नावर हक्क सांगण्यास दुसरा लिंगायत स्वामीच उठवावा लागला; तसा उठविण्याची जरूरी न पडतां यड्डूरच्या भटांनाच तशी यादी लिहून देऊन श्रीस्वामीविरूद्ध प्रोत्साहन देतां आलें असतें. अर्थात् मूळ आडांतच नाहीं तर पोहऱ्यांत कोठलें येणार? तसें श्रीवीरभद्रदेवालयांत भटांचा मुळींच संबंध नव्हता मग त्याची वाच्यता व्हावी कशी? म्हणूनच या दोन्ही अर्जांना पूर्वतयारीचे म्हणजे साधणुकीचे अर्ज असें मि. सिंहेश्वरकरांनीं जें नांव दिलें आहे तें अगदीं बरोबर आहे.

पण यावरही मि. राव वकिलांनीं 'जेव्हां जरूरी उत्पन्न झाली तेव्हां वादी भटांच्या पूर्वजांनीं आपला हक्क सांगितला आहे.' अशी मखलाशी केली. सातारा व कोल्हापूर येथील छत्रपति महाराज आपापसांत मुलुखाकरितां भांडत असतांना मधल्याच एकाद्या भुरट्या मराठ्यानें उठून त्या राज्यांत माझा अमुक अमुक हक्क असून मीच त्या राज्यांचा अधिपति होय, आणि माझी नुकसानी करण्यासाठींच हे आपसांत भांडतात. तर माझ्या हक्काचा विचार व्हावा! असा इंग्रज सरकाराकडे अर्ज करण्यासारखाच हा प्रकार दिसतो. गर्भदेवालयांत पुजेची परवानगी मिळतांच तें

देऊळच माझें आहे म्हणून उलट मालकावरच फिर्याद ठोकून त्याला व त्याच्या जातभाईंना आंत येण्यांस मज्जाव करण्यास्तव मनाई हुकूम मागणाऱ्या मनुष्यांच्या मनाची रचना कशा प्रकारची असावी हें ओळखावें. यावरून ती घडविण्यांत देवापेक्षां सैतानांचे श्रम जास्त कारणीभूत झाले असावेत यांत संदेह नाहीं. तेव्हां अशा विचित्र माणसांचा असा उलटा उत्कर्षच सदैव होत राहाणार हें सृष्टिक्रमाला अनुसरूनच आहे. असो.

१० मि. राव वकिलांनीं भरलेले हे सर्वच वार जेव्हां सिंहेश्वरकरांनीं वांझ ठराविले तेव्हां कट्टा ब्राह्मण्याचा दर्शक, आणि ऐदी ब्राह्मणांच्या अगदीं अंगवळणीं पडून गेलेला असा अगदीं निर्वाण समयीं उपयोगांत आणावयाचा अस्सल बाण त्यांनीं भात्यांतून बाहेर काढिला. तो भटांच्या दृष्टीनें भीमपराक्रमी पण इतरांच्या दृष्टीनें शिळपट व कुचकामीं ठरलेला असा बाण म्हणजे ' लिंगायत हे शूद्र आहेत, म्हणून त्यांस वेदाधिकार नसल्यानें ज्या प्राचीन व वेदमंत्राधारें स्थापन झालेल्या पुरातन श्रीवीरभद्रलिंगाची पूजा वेदमंत्रद्वारेंच नित्य करावी लागते; ती करण्यास लिंगायतांना मुळींच अधिकार नाहीं; म्हणून आम्ही पंचद्रविड ब्राह्मणच पुजेचे मालक आहों. ' हा नेहमींचा शंख फुंकिला! हा शंख फुंकितांना म्हणजे याविषयीं मि. राव यांचें कोर्टामध्यें आर्ग्युमेंट चाललें असतांना, त्यांनीं आपल्या वक्तृत्वानें जेव्हां सदरहू न्यायमंदिर दणाणून सोडिलें; तेव्हां सर्व ब्रह्मवृंदांस पुनः अवसान येऊन आनंदाच्या गुदगुल्या होत होत्या. त्यांना त्यावेळीं तरी असें वाटलें असावें कीं, या निर्वाण अस्त्राच्या प्रभावानें सर्व वीरशैव समाज नामोहरम होऊन जाईल; डोकें वर उचलण्याची त्यांना छातीच होणार नाहीं; पण अरेरे! दुर्दैव बिचाऱ्या भटांचें की हें निर्वाणीचें अस्त्रही पुढीलप्रमाणें अगदीं निरुपयोगी ठरलें! कसें तें पहा—

लिंगायत अगर वीरशैव हे शूद्र आहेत या म्हणण्याच्या स्पष्टीकरणार्थ मि. राव वकिलांनीं पुढलिप्रमाणें सांगितलीं तीं:—

(१) सन १८८८ सालीं मुंबई हॉयकोर्टानें लिंगायत हे शूद्र आहेत असें ठरविलें आहे. (२) त्यांच्यांत पुनर्विवाह रूढ आहे, आणि (३)

पुनर्विवाहित दंपतीच्या पुत्रांना पित्यामागें इस्टेटीवर हक्क प्राप्त होतो इ० यावर मि. सिंहेश्वरकरांनीं जें सप्रमाण विस्तृत उत्तर देऊन हे सर्व मुद्दे खोडून काढून 'लिंगायत हे शूद्र[1] नाहींत.' असें सिद्ध केलें. त्यांच्या त्या म्हणण्याचा सारांश असा.

(१) जरी मुंबई हायकोर्टांत लिंगायत हे शूद्र समजले जात असले तरी ती गोष्ट सप्रमाण सिद्ध झालेली नसून त्यांत प्रसंगानुसार धर्मग्रंथांचें संशोधन होईल तसतसा विचार करून योग्य निर्णय द्यावयास पाहिजे आहे अशी त्याच हायकोर्टानें सन १९१३ सालीं कबूली दिली आहे. ह्मणून हा आधार प्रमाणभूत मानितां येत नाहीं. (२) पुनर्विवाहाची चाल लिंगायतांमध्यें सर्वत्र प्रचलित नसून ती त्यांच्या धर्मशास्त्रासही संमत नाहीं. कांहीं थोड्या ठिकाणीं पुनर्विवाह होत असले, तरी तो रूढीचा प्रभाव आहे, व तो अपवादात्मक होय असेंच मानिलें पाहिजे. (३) पुनर्विवाहच जर शास्त्रसंमत नाहीं तर त्यापासून होणाऱ्या संततीला अधिकार तरी कोठला ? याप्रमाणें हे तीन मुद्दे खोडून काढून उलट त्यांनीं 'शूद्र-

---

१ लिंगायत हे शूद्र नसून 'अप्राकृत ब्राह्मण' आहेत. असें चिकोडी २ रा वर्ग सबजज्ज कोर्टाच्या सन १९२३ इ. च्या अस्सल नं. ३७४ वरील आपल्या विस्तृत व विचारपरिपक्व ठरावांत मे० वीरभद्रापा बसापा हालभावी सबजज्ज चिकोडी (हल्लीं फर्स्टक्लास सबजज्ज विजापूर) यांनीं अनेक शास्त्राधार व इतर प्रमाणें देऊन सप्रमाण सिद्ध केलें आहे. त्या ठरावाचें कानडी भाषांतर श्री० गंगाधरापा संगापा सावोजी शहापूर यांनीं पुस्तक रूपानें प्रसिद्ध केलें असून तें मराठी भाषांतर करून लवकरच पुस्तक रूपानें छापण्याचा प्रस्तुत लेखकाचा विचार आहे.

या चिमुकल्या पुस्तकावरून हिंदुधर्मांतील चतुराश्रम पद्धतीपेक्षां श्रेष्ठतम व योग्य तत्वें ज्यांत समाविष्ट झालीं आहेत अशा आपल्या वीरशैव मताचे निरुपम सिद्धांत या ठरावांत थोडक्यांत उत्तम तऱ्हेनें कसें गोंविले आहेत तें समजून येऊन त्यांचा पूर्ण बोध होईल. अशा प्रकारचा सरकार दरबारचा निर्णय देऊन मे. हालभावी सबजज्जसाहेबांनीं वीरशैव समाजावरील शूद्रत्वाचा कलंक पार धुवून काढिला आहे. हे त्यांचे आपल्या समाजावर कधींही न फिटणारे उपकार झाले आहेत. हें पुस्तक प्रत्येक वीरशैवानें एकदां तरी अवश्य वाचावें.

कमलाकर ' व ' मनुस्मृति ' यांच्या आधारानें शूद्रांचीं लक्षणें सांगून त्यांतील एकही लक्षण लिंगायतांना लागू होत नाहीं. कां कीं, शूद्र हे ब्राह्मणांस गुरु मानितात, त्यांच्यांत अन्न खातात, इतकेच नव्हे तर द्विजन्म संस्कार असलेले क्षत्रिय व वैश्य हे सुद्धां ब्राह्मणांच्यांत जेवण करितात, व शूद्र हे त्यांची सेवा करणें हें कर्तव्य मानितात, आणि त्यांना द्विजन्मसंस्कार नाहीं; परंतु [ १ ] लिंगायतांचे गुरु लिंगायतच असून त्यांना ते ब्राह्मणाप्रमाणेंच आपल्यांत श्रेष्ठ समजतात. ( २ ) जेथें लिंगायतांची वस्ती फार आहे तेथें किंवा एक घर असेल त्या ठिकाणीं सुद्धां गरीब लिंगायतही ब्राह्मणांच्या घरीं जेवीत नाहींत. ( ३ ) सेवावृत्ति हा आपला धर्म समजत नसून लिंगायत हे आपण ब्राह्मणांहून श्रेष्ठ आहों, असें समजत असतात. ( ४ ) ब्राह्मण मुलांस ज्याप्रमाणें ' उपनयन ' रूपी द्विजन्मसंस्कार करावा लागतो त्याप्रमाणें लिंगायतांनाहीं ' दीक्षा ' घेऊन प्रत्येक व्यक्तीनें ( पुरुष व स्त्रियांसुद्धां ) मंत्रदेही बनावें ह्मणजेच ती व्यक्ति शिवसायुज्यतेस लायक होते अशी शास्त्राची आज्ञा आहे. या शिवाय ( ५ ) लिंगायत ही स्वतंत्र जात असून ते ब्राह्मणी धर्मशास्त्र मानीत नाहींत ( पहा—विरसंगाप्पा—विरुद्ध रुद्राप्पा इं० लॉ० रि० ८ मद्रास ४४० पान ४५० व बसव्वा—विरुद्ध—संगनगौडा इं० लॉ० रि० १९ मुंबई ४२८ पान ४५७ ).

या स्वरूपाची शास्त्र, रूढी व कायदा या तिहींस अनुसरणारी योग्य टीका करून कोर्टाची पक्की खातरी करून दिली कीं, लिंगायत ही स्वतंत्र जात असून ते शूद्र मुळींच नाहींत, ह्मणून त्यांना पुरातन अशा श्रीवीरभद्रलिंगाची प्रत्यक्ष पूजा करण्यास मुळींच हरकत नाहीं.

शेवटीं महत्वाचे तोंडी पुरावे आपल्यातर्फे बरेच झाले असून त्याबाबतींत खालच्या कोर्टाची टीका ग्राह्य मानिली पाहिजे असें मि० राव वकिलांनीं स्पष्टीकरण केलें; परंतु लिंगायत पक्षातर्फेंही तशा साक्षी झाल्या असून त्यांपैकीं ग्राह्य कोणत्या हें ठरविण्याचें काम कोर्टाचें आहे. असें मि. सिंहेश्वरकरांनीं उत्तर देतांच राव वकीलसाहेब स्तब्ध झाले. यापुढें चौकशीचें

काम पुरें होऊन अखेर निकालाकरितां कोर्टानीं. ता० ११-७-२१ ही मुदत नेमिली.

## [ १५ ] विजयश्रीचें शुभदर्शन.

खटल्याची चौकशी पुरी होऊन अखेर निकालाची तारीख नेमिल्यानंतर मध्यंतरीं ६।७ दिवसांची सवड राहिली; तथापि त्यावेळीं श्रीचरंतीस्वामी अगर दुसरे कोणी गांवाकडे न जातां बेळगांवासच राहिले. खटल्याचा निकाल कसा होणार हें जरी बहुतेक सर्वांना कळून चुकलें होतें, तरी ठराव पाहीपर्यंत मनास स्वस्थता वाटणें शक्य नव्हतें. अखेर एकदां तारीख ११ जुलईचा सुवर्णदिन उगवला. त्या दिवशीं कोर्टांत निकाल ऐकण्याकरितां शेंकडों लिंगायत व ब्राह्मण लोक जमले होते. कोर्टाच्या सुरवातीसच मे. पामर साहेबबहादुरांनीं आपला लिंगायतांच्या वतीनें निकाल दिलेला अमूल्य ठराव कोर्टांत जाहीर केला. अशा रीतीनें सत्याचा विजय होऊन सुमारें दोनशें वर्षांपूर्वीं ज्या श्रीवीरभद्रगर्भदेवळांत भटांनीं जबरदस्तीनें शिरून अन्याय मांडिला होता त्याचें कायदेशीरपणेंच परिमार्जन झालें !

खरोखर याच तारखेस यडूरच्या श्रीवीरभद्रदेवालयांतील पेशवाई नष्ट झाली ! असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यामुळें पेशवाईच्या चाहत्या भटांना अत्यंत खेद झाला. इकडे तो ठराव ऐकतांच तेथें जमलेल्या सर्व वीरशैवांना अत्यानंद झाला. आणि या आनंदी जयजयकारानें सारें बेळगांव शहर त्यांनीं दणाणून सोडिलें ! श्रीचरंतीस्वामींनीं त्याच वेळीं ६।७ मोठ्या गांवांस तारा करून ही आनंददायक वार्ता सगळीकडे कळविली. वीरशैवांचा हा विजयघोष ऐकून यडूरच्या भटांना तर मरणप्राय दुःख झालें असावें पण तेथें त्यांचा नाइलाज होता. तथापि स्वस्थ बसणें हा त्यांचा स्वभावधर्म नसल्यानें त्यांनीं तो ठराव जाहीर होतांच वीरशैवांच्या आनंदांत विरजण घालण्याच्या हेतूनेंच कीं काय तेथेंच कोर्टापुढें एक अर्ज दाखल करून 'लिंगायतांना श्रीवीरभद्रगर्भदेवालयांत जाण्यास तात्पुरती

मनाई नोटीस काढा, ' अशी विनंति केली. कोर्टांनीं तो अर्ज वाचून पाहून मि. आजरेकर वकिलांना ( कारण मि. सिंहेश्वरकर वकील साहेब हे चौकशी संपतांच मुंबईस निघून गेले असल्यानें त्या दिवशीं श्रीचरंतीस्वामींतर्फेचे फक्त मि. आजरेकर एकटेच वकील हजर होते, म्हणून त्यांनाच ) कोर्टांनीं म्हटलें कीं, 'या अर्जावर तुमचें काय म्हणणें आहे ? '

मि० आजरेकर— ज्या कोर्टानें मनाई कायमची दूर केली त्याला पुनः मनाई देतां येत नाहीं.

हें म्हणणें रास्त असल्यामुळें कोर्टांनीं तें मान्य करून तो अर्ज काढून टाकिला. तेव्हां ब्राह्मण वकिलांना अत्यंत राग येऊन त्यांपैकीं कोणा एकानें तेथेंच म्हटलें कीं. 'आम्ही गर्भदेवालयास कुलूप घालून लिंगायतांना आंत जाण्यास प्रतिबंध करूं.' (दुसऱ्या बाजीराव पेशव्याच्या वेळीं कोणा भोजनबहाद्दर भटानें सोंवळीं गुंडाळून पुणें शहराचे शत्रूंपासून रक्षण करण्याची युक्ति सुचविल्याप्रमाणेंच ही अजब कल्पना होय.) पण हें उर्मटपणाचें उत्तर ऐकूनही कोर्टांनीं शांतपणेंच त्यांना सांगितलें कीं, 'लिंगायत लोक तें कुलूप मोडून आंत जातील.' असें म्हणून मे. पामर साहेबांनीं याबद्दल एक गंमतीचा दृष्टांत सांगितला. तो दृष्टांत म्हणजे एका मुलाची सख्खी आई व सावत्र आई यांच्यामध्यें नवऱ्याच्या पश्चात् तो मुलगा आपलाच औरसपुत्र होय अशाबद्दल चाललेला तंटा कोर्टानें कसा तोडिला व त्यांत त्या सावत्र आईचा निर्दयपणा कसा व्यक्त झाला; हा दृष्टांत सांगितला. तो सर्वांच्या परिचयांतला असल्यानें येथें दिला नाहीं. मात्र या दृष्टांतानें मे. जज्जसाहेबांनीं ब्राह्मणांस स्वच्छ जाणविलें कीं, 'ज्या अर्थीं कुलूप घालून श्रीवीरभद्रदेवाची पूजाच वर्षानुवर्ष बंद ठेवण्याची तुमची तयारी दिसते त्या अर्थीं तुम्ही श्रीवीरभद्रलिंगाचे खरे पुजारी मुळींच नव्हे.'

त्या अर्जावरील कोर्टाचा स्वच्छ खुलासा ऐकितांच भटांना भयंकर धास्ती वाटली; आणि आतां लिंगायत लोकांना प्रतिबंध करण्यास मुंबई हायकोर्टाच्या मनाई हुकुमाशिवाय गत्यंतर नाहीं असें पक्कें समजून येतांच

त तावडतोब कोर्टाबाहेर पडले व सर्व कची तयारी करून घेऊन त्याच दिवशीं मुंबईच्या वाटेस लागले. इकडे दुसऱ्याच दिवशीं म्हणजे तारीख १२ जुलई सन १९२१ रोजीं सकाळींच श्रीचरंती स्वामींसह सर्व प्रमुख लिंगायत लोकांनीं श्रीवीरभद्रदेवाच्या जयघोषांतच गर्भदेवालयांत प्रवेश करून सुमारें तीन वर्षेपर्यंत आपल्या खऱ्या व प्रिय लिंगायत भक्तांपासून जबरीनेंच सोंवळ्यांत गुंडाळून ठेवलेल्या श्रीवीरभद्रदेवाची पुनश्च आत्यंतिक भक्तीनें प्रत्यक्ष पूजा केली ! त्यावेळीं यडुरांत मोठा उत्सव झाला व लहानशी यात्राच भरली आणि वीरशैवांच्या आनंदी जयजयकारानें सर्व यडूरक्षेत्र दुमदुमून जाऊन, सर्वत्र आनंदी आनंद झाला ! न्यायमूर्ति मे. पामर साहेबबहादुरांनीं हा जो योग्य न्याय केला तो वीरशैव समाज केव्हांही विसरणार नाहीं. त्यांची न्यायी कारकीर्द श्रीवीरभद्र देवाचे भक्त सदैव कृतज्ञतेनें स्मरतील. त्यांनीं जो अत्यंत विचार करून ठराव लिहिला आहे तो किती निःपक्षपातपणाचा आहे हें पुढें तो संपूर्ण ठरावच दिला आहे तो पाहिला असतां पूर्णपणें समजून येईल. तरी तो प्रत्येकानें अवश्य वाचावा. या ठरावानें, केवळ एका यडूर क्षेत्रांतील नव्हे, तर ज्या ज्या ठिकाणीं पेशवाई सैतानशाहींत त्यांच्या बगलबच्चा आवडत्या भटांनीं बळजबरीनें शिरून मस्तपणानें मालकालाच गचांडी देण्याचा मर्दपणा गाजविला आहे त्या त्या क्षेत्रस्थानांतून त्यांना कायदेशीरपणें कायमचेंच घालवून देण्याचें भक्कम कार्य भविष्यत्कालीं होणार आहे ! ही तशा प्रत्येक स्वार्थी भटानें मनांत खूण गांठ बांधावी. तेव्हां इतकी उन्नत कामगिरी ज्या साहेब बहादुरांनीं केली त्यांचे उपकार लिंगायत व भटांच्या अन्यायांनीं गांजलेले अन्य समाज सदैव स्मरत राहातील यांत आश्चर्य काय ?

## [ १६ ] खटल्यास समुद्र दर्शन.

खटल्याचा विरुद्ध निकाल पाहतांच भटमंडळी जी बेळगावांहून निघाली ती थेट मुंबईस गेली, व तेथें मि० राव वकिलांमार्फत त्यांनीं ता. २१ जुलई रोजीं हायकोर्टांत 'अपील दाखल केलें. नंतर तावडतोब लिंगा-

यत समाजाला तूर्तातूर्त मनाई नोटीस लागू करण्याचाच प्रयत्न केला; त्यांत त्यांना यश मिळालें. ती मनाई नोटीस लागू होतांच श्रीचिरंतीस्वामींना मुंबईस जाणें भाग पडलें. तेथें जाऊन पुनः मि० सिंहेश्वरकर यांनाच वकीलपत्र दिलें, आणि चौकशी मुदतीस्तव मि० स्ट्रॅांगमन बॅरिस्टरसाहेबांनाच सांगण्याविषयीं सुचवून ठेविलें. पण भटांनीं यांच्या आधींच लगवग करून मि० स्ट्रॅांगमनसाहेबांना आपल्यातर्फे वकीलपत्र दिल्याकारणानें श्रीचरंतीस्वामींना त्यांच्या तोलाच्या मि० कांयाजी या नामांकित बॅरिस्टर साहेबांना आपल्यातर्फे नेमावें लागलें.

## मुंबई हायकोर्टांतील शेवटची मुदत.

अपील दाखल झाल्यापासून दीड दोन वर्षांत आठ दहा मुदती पडून शेवटीं ता. ११ एप्रील सन १९२३ इ. रोजीं या प्रख्यात खटल्याची हॉयकोर्टांत न्यायमूर्ति मेक्लिआड व न्याय. क्रॅंप या दोघा सुविख्यात हायकोर्ट जजांपुढें चौकशी सुरू झाली. त्यावेळीं तेथें जो एक विशेष प्रकार घडून आला, त्यावरून श्रीचरंतीस्वामींना व लिंगायत समाजाला म्हणजे सत्पक्षाला श्रीवीरभद्रदेवच कसा साह्यकारी झाला तें स्पष्ट दिसून आलें. किंबहुना श्रीचरंतीस्वामींना या प्रख्यात खटल्याच्या वेळीं दैवी साह्य जर मिळालें नसतें तर नुसत्या मानवी प्रयत्नानें हा खटला केव्हांही जिंकिला गेला नसता आम्हास तर असें वाटतें कीं, श्रीस्वामीं हे या प्रख्यात खटल्यास केवळ निमित्तमात्र होत. बाकी सर्व यशाची कामगिरी आपल्या खऱ्या प्रिय भक्तांकरितां स्वतः श्रीवीरभद्रदेवानें आपली आपणच करून घेतली आहे! असें जर नसतें तर सरकारी अधिकारी व वकीलसुद्धां बहुतेक सर्वस्वी ब्राह्मणच असल्यावेळीं ब्राह्मणसमाजाच्या विरुद्ध असा खटला लिंगायतांतर्फे निकालांत निघावा याला दैवी साह्य म्हणावयाचें नाहीं तर काय म्हणावें? दुसरी गंमत अशी कीं, हा खटला चालू झाल्यापासून समाप्ति होईपर्यंत ज्या ज्या वेळीं लिंगायतांना जसजसे अनुकूल सरकारी कामगार पाहिजे होते तसे त्या त्या वेळीं नेमके यदृच्छेनेंच नेमिले जात व त्यांचें काम

संपलें कीं ते बदलून जात! याला तो भाग, तालुका अगर जिल्हा व खुद्द मुंबई हायकोर्ट जज्ज येथपर्यंतच्या अधिकाऱ्यांतसुद्धां मुळींच अपवाद दिसून येणार नाहीं. मे. पामर जज्ज साहेबांची बेळगांव येथें नेमणूक, हा खटला चौकशीस निघण्याच्या पूर्वीं केवळ एक दीड महिन्यांतच झाली होती; तर हायकोर्टांतील सुविख्यात जजसाहेबबहादुर मे० मेक्लिआड हे या खटल्याचे निकालानंतर दुसऱ्याच दिवशीं विलायतेस रजेवर निघून गेले! या बाबतींतील एक अत्यंत ठळक उदाहरण म्हणजे श्रीमन्महनीय शांतवीरस्वामी वडेयर मामलेदार साहेबांची चिकोडी तालुक्यांत सन १९२० सालीं झालेली नेमणूक होय. त्यांनीं यड्डूर येथलि श्रीवीरभद्रदेवाच्या सेवेकऱ्यांच्या वतनी जमिनींबाबत स्वतंत्र खातें ठेवण्याकरितां दिलेल्या [ मागें पृष्ठ १३६ वर उल्लेख केलेल्या ] स्पेशल हुकुमाच्या निमित्तानेंच श्रीचरंतीस्वामींना लँड ऑलिअनेशन बुकाची प्रथम माहिती होऊन त्यांतील उतारे घेण्याची बुद्धि उत्पन्न झाली. त्यामुळेंच कल्लोळच्या जमिनीची मुख्य सनद मागें विवेचन केल्याप्रमाणें श्रीवीरभद्रदेवाच्या पुजेकरितांच असल्याचा पुरावा उत्तमप्रकारें सिद्ध करितां आला; नाहींतर हा खटला लिंगायतांप्रमाणें होण्याची आशाच नव्हती. असो.

त्याचप्रमाणें हायकोर्टांतलि शेवटच्या मुदतीच्या ऐन आणीबाणीच्या प्रसंगींसुद्धां श्रीवीरभद्रदेवाला आपली अलौकिक करणी क्षुद्र मानवी मनाला पटविण्याची इच्छा झाली असावी; म्हणूनच त्या मुदतीदिवशीं ऐनवेळीं मि. कोयाजी बॅरिस्टर साहेब तापानें आजारी होऊन त्यांना हायकोर्टांत येतां आलें नसावें! त्या दिवशीं सदरहू खटल्याची सुनावणी होण्यापूर्वीं १५।२० मिनिटें अगोदर ब्राह्मणपक्षाचे वकील मि. राव व मि. स्ट्रँगमन बॅरिस्टर साहेब हे हायकोर्टांत येऊन दाखल झाले. या खटल्यांतील हा शेवटचाच आणीबाणीचा प्रसंग असून येथें कायमचाच सोक्षमोक्ष होणार असल्यानें तो ऐकण्यास ब्राह्मणपक्षाचे अनेक इनामदार व पुढारी हायकोर्टांत आले होते. लिंगायतांतर्फेचे हायकोर्ट वकील मि. सिंहेश्वरकर हे अगोदरच कोर्टांत हजर झाले होते. तसेंच श्रीचरंतीस्वामी श्रीमंत

कराळे, श्री. हालाप्पनवर, श्री. करोसी व इतर बरीच मंडळी मि. आजरेकर वकिलांसह हजर होती. अशी दोन्ही बाजूंची जय्यत तयारी झाली. तों खटला पुकारण्यापूर्वी ५ मिनिटें अगोदर मि. कोयाजी बॅरिस्टर साहेबांकडून मि. सिंहेश्वरकरांना चिठ्ठी आली कीं, 'आज मी सीक असल्यानें मला कोर्टास येतां येत नाहीं.' ही चिठ्ठी पाहतांच श्रीस्वामींची तर कंबरच खचली व सर्व पुढाऱ्यांच्या तोंडचें पाणी पळालें. त्या सर्वांना वाटलें कीं, हें सर्व कागदपत्रांचें व विजयी ठरावाचें गाठोडें नीट बांधून घेऊन येथें समुद्रांत फेंकून देण्याकरितांच आम्ही आलों कीं काय? अर्थात् अशी अपेशाचीं तोंडें परत गांवीं जाऊन आप्तस्वकीयांपुढें दाखविण्यापेक्षां या खटल्याबरोबरच आपणही 'समुद्राःस्तृप्यंतु' व्हावें. अशा अनेकविध कुविचारांनीं त्यांचीं मनें करपून गेलीं; व दुर्दैवानें अद्यापही आपली पाठ सोडिली नाहीं' असें वाटून सर्वांना अत्यंत दुःख झालें.

"सर्व तयारी होऊन चौकशीला सुरवात होण्यापूर्वी मि० सिंहेश्वरकरांनीं श्रीचरंतीस्वामी व इतर पुढाऱ्यांच्या इच्छेनुरूप न्यायमूर्तींना विनंति केली कीं, 'मि० कोयाजी बॅरिस्टरसाहेब आज सीक असल्यानें कोर्टांत येऊं शकत नाहींत, सबब चौकशीची तारीख दुसरी नेमावी.'

न्यायमूर्ति—मि० कोयाजी बॅरिस्टरसाहेब आले नसले तरी आपण आहांतच. खटल्याच्या अनेक मुदती यापूर्वीच पडून गेल्या असल्यानें यापुढें मुदत देतां येत नाहीं.

हें न्यायमूर्तींचें स्पष्टोत्तर ऐकतांच मि० सिंहेश्वरकर स्तब्ध झाले, तों तत्काळ मि० स्ट्रॅंगमन साहेब आर्ग्युमेंट सांगण्यास उभे ठाकले. मि० आजरेकरांच्या तोडून वरील संवादाचा सारांश ऐकतांच सर्वांना भयंकर चिंतेनें ग्रासिलें; पण अखेर सर्वांनीं श्रीवीरभद्रदेवाची इच्छा असेल तसें होईल. असा मनाचा हिय्या करून या संकटांतून सोडविण्याविषयीं मनांतून अनन्यभावानें त्याला शरण जाऊन त्याचा धावा चालविला.

ही लिंगायतांची करुणास्पद स्थिति व श्रीस्वामींसह सर्व पुढाऱ्यांचे चिंताग्रस्त चेहेरे पाहून तेथें जमलेल्या भटांना व ब्राह्मणकंपूला आनंदाच्या

गुदगुल्या होऊं लागल्या. अखेर दैवानेंच खैर केली म्हणून मि० कोयाजी बॅरिस्टरसाहेबांना आज गैरहजर राहण्याची बुद्धि झाली असें वाटून आपल्यावरील दैवाची वक्रदृष्टि आज लिंगायतांकडे वळल्याचा क्षणभर भास झाला व ते सर्व जण मनोराज्यांतील सुख मनमुराद भोगण्यांत मग्न होऊन गेले.

इकडे मि. स्ट्रॅांगमन बॅरिस्टर साहेबांनीं आपल्या अपूर्व वक्तृत्वशैलीनें मुख्यतः पुढील तीन मुद्यांवर कोर्टापुढें आपली तक्रार मांडिली पण त्या तक्रारीला परभारें कोर्टाकडून खालील उत्तरें मिळालीं असें सांगण्यांत येतें

(१) मि. स्ट्रॅांगमन– यड्डूरच्या वादी भटजींना श्रीवीरभद्रदेवाच्या पुजेकरितां अनेक श्रीमंत जहागिरदार व इनामदार अशा मोठमोठ्या भक्तांकडून जमिनी मिळाल्या आहेत; सबब ते हक्कदार पुजारी आहेत.

कोर्टः– अनेक श्रीमंत भक्तांकडून जमिनी मिळाल्याची गोष्ट लिंगायतांनीं कबूल केलीच आहे; पण तीवरून लिंगायत पुजारी नव्हेत, या गोष्टीला दुजोरा मिळत नाहीं.

(२) मि. स्ट्रॅांगमन— ब्राह्मणांच्या पुजेची वहिवाट फार प्राचीन आहे.

कोर्ट— ही गोष्टही लिंगायतांनीं कबूल केलीच आहे.

(३) मि. स्ट्रॅांगमन– ब्राह्मणांतर्फे मोठमोठ्या प्रसिद्ध व्यक्तींच्या साक्षी झाल्या असून त्यांनीं भटजीच पुजारी आहेत असें ठासून सांगितलें आहे.

कोर्ट– मोठमोठ्या लोकांनीं सांगितलें म्हणून व ते ते साक्षीदार श्रीवीरभद्र देवालयांत गेल्यावेळीं गर्भदेवळांत लिंगायत दिसले नाहींत म्हणून मागील अनेक जुन्या महत्वाच्या कागदपत्रांवरून शाबीत झालेली लिंगायतांची श्रीवीरभद्र पुजेवरील मालकी नष्ट होते कीं काय? हे बडे साक्षीदार बहुतेक परगांवचे आहेत; व ते श्रीवीरभद्र देवदर्शनास गेल्यावेळीं कदाचित् लिंगायत लोक त्यांना गर्भदेवालयांत दिसले नाहींत एवढ्यावरून मालकी हक्क नष्ट होणें शक्य नाहीं. उदाहरणार्थ–परगांवचा परका पाहुणा घरीं आल्यावेळीं घरचा मालक तेथें दिसला नाहीं तर ते घर दुसऱ्याचें होत नाहीं.

या तीनही मुख्य मुद्यांस अशा तऱ्हेनें कोर्टाकडून हरताळ लागतांच शेवटीं बॅरिस्टर साहेबांनीं चौथा एक विचित्र मुद्दा कोर्टापुढें मांडिला असें त्यावेळीं तेथें हजर असलेल्या कित्येकांकडून ऐकण्यांत येतें; पण मि. स्टॉंगमन सारखे प्रख्यात बॅरिस्टर साहेब असा निराधार मुद्दा कोर्टापुढें मांडितील हें निदान आम्हांला तरी शक्य दिसत नाहीं. परंतु ज्या खट-ल्यांत जोरानें प्रतिपादन करितां येण्यासारखे जिवंत मुद्दे अगर कागदपत्रांचे भक्कम पुरावे नसतील तेथें सुविख्यात बॅरिस्टर किंवा खुद्द ब्रह्मदेव असला तरी तो काय करणार? याच कारणानें पुढील मुद्दा ब्राह्मणपक्षातर्फे कोर्टापुढें त्यावेळीं मांडिला गेला असावा असा संशय येतो. तो मुद्दा व त्यावरील कोर्टाचें उत्तर असें आहे.—

मुद्दा—' लिंगायतांनीं श्रीवीरभद्रलिंगास स्पर्श केल्यास तें भ्रष्ट होतें! '

कोर्ट— या म्हणण्याला कांहीं आधार आहे काय ?

उत्तर— आधार नाहीं; फक्त वहिवाट आहे.

कोर्ट— अशा निराधार गोष्टी हायकोर्टांत प्रमाणभूत मानितां येत नाहींत; व ' लिंगायत ' हें जातिवाचक नांवच लिंगपुजेचें दर्शक आहे.

असें उत्तर देऊन त्याचवेळीं न्यायमूर्तींनीं या अपीलावरील आपला जज्जकोर्टांतील ठरावाप्रमाणेंच निकाल लिहून ठेवून ते उभय न्यायमूर्ति निघून गेले.

## वीरशैवांचा पूर्ण विजय

न्यायमूर्ति निघून जातांच मि. सिंहेश्वरकर बाहेर आले, व त्यांनीं श्री-स्वामी आदिकरून जी पुढारी मंडळी बाहेर त्यांच्या येण्याचीच वाट पाहात बसली होती त्यांजपुढें मोठ्या आनंदानें सांगितलें कीं, 'स्वामी महाराज, आज खटला तुमच्यासारखा निकालांत निघून माझ्या शिरावरील एक मोठें ओझें खालीं उतरलें गेलें!' हे आनंदोद्गार ऐकतांच सर्वांना अत्या-नंद झाला व श्रीवीरभद्रदेवानेंच कृपा केली असें जाणून त्याचेच धन्यवाद गात ती सर्व मंडळी बाहेर पडली; व त्यांनीं त्याच दिवशीं मुख्य मुख्य गांवास तारा करून हें विजयवृत्त सर्व कर्नाटकांत पसरवून सोडिलें.

श्रीस्वामी व इतर पुढाऱ्यांना राहून राहून आश्चर्य वाटे कीं, आमच्यातर्फें बॅरिस्टर तर आले नाहींतच, पण हजर असलेल्या मि. सिंहेश्वरकर वकिलांनासुद्धां एक वाक्यही बोलण्याची जरूरी न पडतां या प्रख्यात खटल्याचा केवळ १५।२० मिनिटांच्या अल्पावधींत फक्त वादींतर्फेच्या आर्ग्युमेंटवरूनच आपल्यातर्फें निकाल झाला कसा ? शेवटीं ही शंका कोणी एकानें वकिलांना विचारलीच; तेव्हां ते ह्मणाले—' खुद्द न्यायमूर्तीच जर तुमच्या वतीनें बोलूं लागले तर तेथें दुसऱ्याचें काम काय ? म्हणून मला एक शब्दही बोलण्याची जरूरी पडली नाहीं!, हें भाषण ऐकतांच सर्वांची पूर्ण खात्री झाली कीं, आज खरोखर श्रीवीरभद्रदेवानेंच वीरशैवांना पूर्ण विजयी केलें; व आपल्या ५ वर्षांच्या प्रयत्नांचें सार्थक झालें !

## ( १८ ) जयजयकार व श्रीस्वामींचें विजयाभिनंदन.

हायकोर्टाचा निकाल ऐकतांच वीरशैवसमाज विजयानंदानें डोलूं लागला; व भटांना अत्यंत दुःख झालें. तथापि निराश होणें अगर प्रतिवाद्यांना पूर्ण आनंदांत पाहणें हें यड्रूरच्या भटांचें ब्रीद नसल्यानें अखेरपर्यंत अत्यंत त्रास देण्याचें त्यांनीं ठरवून पुनः कोर्टाची उन्हाळ्याची सुटी संपतांच ता० १८ जुलई १९२३ रोजीं प्रिव्हीकौन्सिलाकडे अपील करण्यासंबंधीं परवाना मागण्याचा अर्ज हायकोर्टांत गुदरला! हा प्रिव्हीकौन्सिलकडे अपील करण्याचा पोरखेळ भटजी खेळणार नाहींत असें लिंगायतांना वाटत होतें; कारण प्रथमतः हायकोर्टाकडे जें अपील केलें त्यांतच जर कांहीं हशील नव्हतें तर त्यापुढें जाण्यांत अर्थ काय ? परंतु हा आपल्या लोकांचा तर्क खोटा ठरून अपील दाखल होतांच पुनः श्रीस्वामी मुंबईस गेले व सर्व व्यवस्था करून परत आले.

सरते शेवटीं ता० ८ फेब्रुवारीं सन १९२४ इ. रोजीं त्याचा विचार होऊन तो हायकोर्टानें नामंजूर केला! आणि अशा रीतीनें एकदां श्रीचिरंतीस्वामी व वीरशैवसमाज यांच्या पाठमिागें लागलेली भटांची ब्रह्मपीड!

अरबी समुद्रास अर्पण होऊन तो पूर्णपणें मुक्त झाला. त्यावेळीं सर्व लिंगायत समाज आनंदानें फुलून गेला व वीरशैवांच्या जयजयकारानें सारा कर्नाटक प्रांत दुमदुमून गेला!

श्रीसिद्धलिंगेश्वरपट्टचरमूर्तिस्वामींनीं आपल्या अतुल धैर्यानें व अत्यंत खर्चानें या ब्राह्मणांविरुद्ध चाललेल्या प्रख्यात संग्रामांत शेवटीं पूर्ण जय मिळविला, याबद्दल त्यांचें वीरशैवसमाज आनंदानें अभिनंदन करीत आहे. या खटल्यानें वीरशैवांच्या कपाळावरचा 'शूद्रत्वा' चा शिक्का पूर्णपणें पुसून टाकिला आहे; इतकेंच नव्हे तर, सामान्य वीरशैवांच्या मनावरील ब्राह्मणी वर्चस्वाचा पगडा धुळीस मिळविला असून आपणही ब्राह्मणांप्रमाणेंच किंबहुना कांकणभर जास्तच श्रेष्ठ आहों हें कायदेशीरपणें सिद्ध केलें आहे. हें सामान्य कार्य नव्हे. हें विचार व संस्कृति यांमध्यें क्रांति घडवून आणणारें अवर्णनीय कार्य ज्या श्रीसिद्धलिंगेश्वरांनीं धडाडीनें केलें त्यांचें व त्यांना त्यावेळीं पूर्ण साह्य केलेल्या सर्व वीरशैव पुढाऱ्यांचें उपकार वीरशैव समाज केव्हांही विसरणार नाहीं.

येथें यड्डूर येथील आमच्या भट व ब्राह्मण बंधूंनाही दोन शब्द सांगणें अस्थानीं होणार नाहीं. जें मुळांतच नव्हतें तें मिळावें कसें? 'सत्याचा वाली परमेश्वर' या न्यायानें जिकडे सत्य तिकडे जय हें तत्व लक्षांत ठेवून श्रीक्षेत्र यड्डूरांतील श्रीकाडदेवरु मठाधिकाऱ्यांशीं प्राचीन काळापासून ज्या ज्यावेळीं तुमच्या पूर्वजांनीं निष्कारण विरोध केला, त्या त्या प्रसंगीं त्यांना असेंच नामोहरम व्हावें लागलें आहे; हें पहात असतांही तुम्ही तोच मार्ग अनुसरावा हें योग्य आहे काय? याचा विचार करून निदान यापुढें तरी श्रीचिरंतीस्वामी व वीरशैव समाजांशीं गुण्यागोविंदानें वागाल तर त्यांत सर्वांचें हित आहे.

वीरशैव समाजबांधवांनीं या बाबतींत हाच बोध घ्यावयाचा कीं, अशिक्षितपणा हेंच सर्व संकटाचें मूळ आहे. सबब समाज सुशिक्षित करण्याचा प्रयत्न करा. आणि जगांतील स्वार्थी लोकांशीं वागतांना जास्त जागरूकता ठेवा. स्वार्थबुद्धि लोक दिसतात तसे अंतरीं नसतात; म्हणून त्यांच्या

मायावी भाषणांस भुलून भलत्याच ठिकाणीं विश्वास ठेवूं नका. शेवटीं अशा संस्कृतीच्या प्रचंड संग्रामांत ज्या भगवान् श्रीवीरभद्रदेवानें वीरशैव समाजास पूर्ण विजयी केलें, तोच परमात्मा आपणांस सुबुद्धि देऊन असेंच सदैव विजयी करो; अशी अनन्यभावें प्रार्थना करून हें विजय खटल्याचें वर्णन येथेंच संपवूं.



श्रीवीरभद्रलिंगायनमः

# भाग पांचवा.

## श्रीवीरभद्रदेवाचा जागृतपणा व साक्षात्कार.

### ( १ ) प्रास्ताविक—मूर्तिपुजेची आवश्यकता.

मागें अनेक प्रकरणांतून श्रीवीरभद्रदेवाचें माहात्म्य वर्णिलें आहे. तथापि भगवान् श्रीवीरभद्रदेवाचा महिमाच असा आहे कीं, तो प्रत्यक्ष श्रीसरस्वति देवीकडूनही पूर्ण वर्णिला जाणार नाहीं; तेथें मजसारख्या पामराची कथा काय? तरी चंदन जितका उगाळावा तितका सुवासच सुटत असल्यानें तो पुनः पुनः उगाळण्याची इच्छा होणें साहजिक आहे. तद्वत् या भागांत ( मागें वर्णिला असतांही ) श्रीवीरभद्रदेवाचा प्राचीनकाळीं अनेक सत्पुरुषांनीं अनेक प्रकारें वर्णिलेला अनंत महिमा आजच्या परिस्थितींत कांहीं प्रत्यक्ष अनुभवास येतो कीं काय? तें पहावें आणि आतां तें पूर्वीचें देवत्व कोठून दृग्गोचर होणार? असा संशय बाळगणारे कोणी असतील, तर त्यांना दाखवितां यावें या उद्देशानें श्रीवीरभद्रदेवाचा येथें प्रत्यहीं दिसून येणारा महिमा व त्याच्या जागृतपणाच्या प्रत्यक्ष घडून आलेल्या अगदीं अलीकडच्या गोष्टी आमच्या सुज्ञ वाचकांपुढें ठेवण्याचा विचार केला आहे. या योगानें आस्तिक्यबुद्धीच्या मनुष्यांस अचंबा वाटून त्यांच्या अंतःकरणांत भक्तीचें भरतें येईल, व नास्तिक मनुष्याच्या मनामध्यें आजच्या ईश्वरां-

---

१ असितगिरिसमं स्यात् कज्जलं सिंधुपात्रे
सुरतरुवरशाखा लेखनीपत्रमुर्वी ।
लिखति यदि गृहीत्वा शारदा सार्वकाले
तदपि तव गुणानामीश पारं न याति ॥
महिम्नस्तोत्र ३२.

शाच्या दर्शनानें अल्पाशानें कां होईना, आस्तिक्य बुद्धीचा उदय होऊन, त्यांचीं मनें धार्मिक विषयाकडे ओढिलीं जातील. आणि त्यायोगें हिंदुधर्मांतील अनेक जाति पंथांतील आधुनिककाळीं माजलेल्या असंख्य मतभेदांस धार्मिक ऐक्य साधण्याच्या कार्यांत अल्पाशानें तरी साह्य होईल याच केवळ हेतूनें हें प्रकरण लिहिलें आहे.

यांत प्रथमारंभींच मूर्तिपुजेच्या किंवा भक्तिमार्गाच्या विरुद्ध असणाऱ्या हिंदुलोकांकडूनच आमच्यावर असा आक्षेप येईल कीं, 'स्वतःच्या उपास्य देवतेचें हें सुशिक्षितपणाचें थोतांड माजविण्याकरितां तुह्मी हें कांहींतरी बरळत सुटलां आहां. यांत बिलकुल तथ्यांश नाहीं.' पण अशा शंकेखोरांना तूर्त इतकेंच सुचवावेसें वाटतें कीं, "त्यांनीं बाहेर दूरच्या प्रदेशांत राहून, भलभलत्या शंका कुशंका काढीत बसण्यापेक्षां व भलभलतें वडबडत बसण्यापेक्षां एकदां अनुभव घेण्याच्या निमित्तानें कां होईना अशा एकाद्या जागृत देवस्थानांत चार सहा महिने अवश्य घालवावे व तेथें प्रत्यहीं घडणाऱ्या धार्मिक गोष्टींचा नीट विचार करावा; मग आपला अनुभव जगापुढें मांडावा." कित्येक आधुनिक आंग्लविद्याविभूषित अननुभवी लोकांचें जर कोठें चुकत असेल तर तें येथेंच. शाळेंत किंवा कॉलेजांत चार पुस्तकें वांचून होतांच, तेथेंच आपलें कांहींतरी उष्टें मत बनवावयाचें आणि बाहेर पडतांच सर्वच जुन्या गोष्टींवर भरमसाट टीका करीत सुटावयाचें; त्याला अनुभवाचा ओलावा मुळींच नसावयाचा. ही खरोखरच मोठी घोडचूक आहे. यावरून 'जुनें तें सर्वच सोनें' अशा विश्वासाचे आह्मी आहों असें कोणी समजत असतील, तर त्यांना आमचें इतकेंच सांगणें आहे कीं, बाबांनो, मीही तुमच्यापैकींच एक आहें. प्रचलित हिंदुधर्मांतील अनेक मूर्तिपूजनाच्याच नव्हे तर एक मूर्तिच कां होईना ती आजन्म कवटाळून बसण्याच्या मी विरुद्धच आहें. हें पहिल्यानेंच आपणांस सांगून ठेविलेलें बरें. वास्तविक 'मूर्तिपूजा' हीच हिंदुधर्माचें अंतिम ध्येय केव्हांही नव्हतें व नाहीं. जगांतील सर्वच लहानमोठ्या धर्मांना आधारभूत असलेला किंबहुना जन्मदाता, उदार व विश्वव्यापि

हिंदुधर्म असा मूर्तिपूजनांतच सदैव गुरफटून राहिलेला असेल अशी तुमची कल्पना तरी कशी होते? हिंदुधर्मतत्वानुसार मूर्तिपूजा ही केवळ निराकार ईश्वरोपासना सिद्ध होण्याच्या पूर्वीचें एक साधन आहे. पुढें बी. ए. परिक्षेंत उत्तीर्ण होणाऱ्यास प्रारंभीं मुळाक्षरबोध करून घेण्याची काय जरूरी आहे? असें ह्मणून जसें चालावयाचें नाहीं, तसें निराकार, निर्विकार, निरामय अशा परमात्म्याच्या विश्वव्यापी स्वरूपाचें पूर्ण ज्ञान होण्याकरितां मुळाक्षरबोधरूपी साकार मूर्तिपूजा अत्यंत आवश्यक आहे. तसेंच बी. ए. झालेल्या गृहस्थास प्रारंभीं आवश्यक वाटणारी अंकलिपी पुढें घटविण्याची जशी जरूरी नाहीं, तद्वत् अनंत ब्रह्मांडनायक, विश्वव्यापी अशा-निरवयव व निराकारी स्वरूपाचें आकलन करण्याची शक्ति आपल्यामध्यें उत्पन्न होतांच मूर्तिपुजेचेंच काय, पण सर्व जगाचें व शेवटीं स्वतःच्या शरीराचें सुद्धां भान राहाणार नाहीं! परंतु अशा उच्च प्रतीच्या परमहंस पदवीस पोहोंचेपर्यंत मूर्तिपुजेसारख्या खालच्या अवश्य असणाऱ्या पायऱ्या चढून गेल्याशिवाय चालेल काय? कां एकदम विश्वस्वरूपालाच कवटाळावयास जावयाचें?

मूर्तिपुजेचा तिरस्कार करणाऱ्या सर्वच सुज्ञांना आम्ही असें विचारितों कीं, आज जगतीतलावर प्रचलित असलेल्या बहुतेक धर्मांत कोणत्याही प्रकारें मुळींच मूर्तिपूजा[1] न करणारा एक तरी धर्म आपण दाखवूं शकाल काय? प्रथमतः हिंदुधर्मांतीलच मूर्तिपूजा न करणाऱ्या आधुनिक अनेक निरनिराळ्या पंथांचीं उदाहरणें घेऊं. उदाहरणार्थ—आर्यसमाज घ्या. हा मूर्तिपूजेच्या अगदीं विरुद्ध आहे; परंतु तो ज्या वेदांना वंद्य व प्रमाणभूत मानितो त्या वेदांतून कशाचें वर्णन आहे हें आर्य समाजियन जाणतात ना? त्यांत उषा, सूर्य, व सृष्टींतील रौद्र, उत्पात यांचेंच स्वरूप सहज साध्य अशा सुलभ व ओबडधोबड भाषेंत वर्णिलेलें आहे ना? आणि

---

१ येथें मूर्तिपूजा याचा अर्थ केवळ दगडामातीचा देव असाच नसून एखादें अक्षर, चिन्ह, दिशा, किंवा एखादा सृष्टीचा देखावा असा विशाल गर्भित अर्थ समजावा.

हें वर्णन वदकालच्या ऋषिवर्यांना सुचण्याचें कारण हे प्रत्यहीं दिसणारे सृष्टींतील पदार्थ व घडामोडी ह्याच होत. सष्टींत हरहमेश सहज दिसणाऱ्या या पदार्थांवरून व चमत्कारांवरूनच विचार करतां करतां त्यांनीं या सर्वांचें नियंत्रण करणारा कोणी परमात्मा असावा असा तर्क केला व पुढें सामान्य जनसमूहाच्या दृष्टीला अतर्क्य पण दिव्य ज्ञानचक्षूंला स्पष्ट दिसणाऱ्या अशा त्या सर्वव्यापी अनंताचा शोध लावून त्यांत ते विलीन होऊन गेले. ही गोष्ट जर सत्य आहे तर हे वेदकालीन पूज्य पूर्वज ऋषिवर्य ज्या मार्गानें गेले त्याच मार्गानें तुम्ही जाणार ना ? कां भलताच मार्ग पतकरणार ! जर तोच मार्ग पतकरणार असाल तर उषा, आप, तेज, आकाश व सूर्यचंद्र इत्यादि परमेश्वराचें अस्तित्व दर्शविणारीं पूर्वसाधनें मानिलींच पाहिजेत व तुम्ही तीं मानितांही. मग ही मूर्तिपूजा नव्हे कां ? आमच्या दृष्टीनें ही सुद्धां एक प्रकारची सूक्ष्म मूर्तिपूजाच होय. याचप्रमाणें ब्रह्मसमाज, प्रार्थनासमाज व सत्यशोधकसमाज यांचाच नव्हे तर विश्वव्यापी परमेश्वराचें अस्तित्व मान्य करणाऱ्या कोणत्याही पंथाची गोष्ट आहे. या सर्व समाजांनीं मान्य केलेल्या ध्येयांतच एक ना एक प्रकारें मूर्तिपूजा दाखवितां येईल.

आतां ख्रिस्ती धर्माचें उदाहरण घेऊं. ख्रिस्ती लोक आपल्यास मूर्तिपूजा मुळींच मान्य नाहीं असें म्हणतात मात्र; परंतु कृति पाहावी तर अगदीं त्याच्या विरुद्ध असते. याना आम्ही इतकेंच विचारितों कीं, ' तुम्हास निराकारी व जगांत सर्वत्र, सर्वदा परिपूर्ण भरून राहिलेल्या परमेश्वराचें ध्यान करण्याकरितां चर्चमध्येंच कां जावयास पाहिजे ? व आकाशाकडेच कां दृष्टि लाविली पाहिजे ? तुमच्या घरांत अगर तुमच्या आसपास किंवा खुद्द तुमच्या देहांत तुमचा सर्वव्यापी ईश्वर ओतप्रोत भरलेला आहे ना ? मग कोणत्याही स्थळीं, कोणत्याही वेळीं कोणत्याही दिशेकडे तोंड करून त्या सर्वेश्वराची प्रार्थना केली तरी ती त्याला पोहोंचलीच पाहिजे. मग चर्चमध्येंच, मुख्यतः रविवारींच आणि आकाशाकडे तोंड करूनच प्रार्थना केली पाहिजे हें बंधन कां ? शिवाय चर्चमध्यें तरी ख्रिस्ताचे फोटो व चित्रें

आणि क्रॉसच्या आकृति किंवा धार्मिक चित्रें तरी कशास पाहिजेत ? एकूण तुम्हांससुद्धां दिशा, स्थळ व वार ह्या उपाधि आहेतच मग हीं सुद्धां एकप्रकारें मूर्तिपूजाच नव्हे कां ?

याचप्रमाणें कोणताही धर्म घेतला तरी त्यांत एकना दुसऱ्या प्रकारें निदान भावनाप्रधान मूर्तिपूजा तरी आहेच. आतां कोठें ती स्पष्ट असेल कोठें गर्भित असेल इतकेंच; पण कोणत्याही प्रकारें मुळींच बंधनें न मानणारा धर्मच जगांत नाहीं, पूर्वीं नव्हता व पुढें होणार नाहीं हें प्रत्येक धर्माभिमान्यानें पक्कें लक्षांत ठेवावें.

मूर्तिपुजेसंबंधीं इतका खुलासा करण्याचें कारण इतकेंच कीं, सध्यां जो उठतो तो मूर्तिपूजेविषयीं भरमसाट वाटेल तें बरळत सुटतो. मूर्तिपुजेंत ग्राह्यांश कितपत आहे, त्याज्य भाग किती आहे याचा, किंवा हें साध्य आहे अगर साधनरूप आहे याचासुद्धां पुरता विचार न करतां बेजबाबदारपणें भलभलतें बडबडत जातो. अशा बडबडण्यानें त्याचें जगांत हसें मात्र होतें. याहून कोणाचा किंवा स्वतःचासुद्धां कांहींएक फायदा न होतां उलट स्वधर्मनिंदेचें पातक मात्र पदरीं येतें. याचा अशा टीकाकारांनीं अगोदर विचार करावा. जर मूर्तिपूजा इतकी त्याज्य असती तर आज जगतीतलावर वंदनीय झालेले पूज्य पुण्यपुरुष ती मूर्तिपूजा कां करीत होते ? मग तुमच्या दृष्टीनें ते पुरूष तरी वंदनीय नव्हते किंवा ते मूर्तिपूजा तरी करीत नव्हते असें समजावें लागेल. ज्यांनीं आपल्या ओजस्वी व अमृतमय वाणीनें वेदांताचा फैलाव करून हिंदुधर्माची विजयी ध्वजा सर्व जगांत फडकविली ते खरे खरे जगद्गुरु श्रीविवेकानंदस्वामी व त्यांचे अथवा त्यांचेच काय सर्व जगाचेच पुण्यश्लोक गुरुवर्य श्रीमद्रामकृष्णपरमहंस या महात्म्यांनीं श्रीकालिकामातेचें पूजन कां करावें ? श्रीमच्छत्रपति शिवाजीमहाराजांना श्रीभवानीचें पूजन करण्याची काय जरूरी होती ? महानुभव श्रीबसवेश्वरांना शिवपूजा करण्याची काय कारण होतें ? संतमुकुटमणि तुकाराममहाराजांना श्रीविठ्ठलभक्ति करण्याचें काय आवश्यकता होती ? यावरून तुमच्या मताप्रमाणें पाहतां हे सत्पुरुष मूर्ख होते किंवा ते मूर्तिपूजा

तरी करीत नव्हते. या दोहोंपैकीं कोणतीही एक गोष्ट मान्य केलीच पाहिजे परंतु या गोष्टी खऱ्या नाहींत. मग हे जगद्वंद्य सत्पुरुष ज्या हेतूनें मूर्तिपूजन करीत होते, त्याच कारणास्तव तिचा अवलंब करणें अत्यंत अगत्याचें आहे. ही गोष्ट या सत्पुरुषांना कांहीं अक्कल नव्हती आणि आम्हींच काय ते अकलेचें खंदक आहों असें ज्या मूर्खांना वाटत असेल त्यांच्याशिवाय अन्य कोणीही सूज्ञ मनुष्य केव्हांही कबूल करील.

सांप्रत प्रचलित असलेल्या आमच्या प्रिय हिंदुधर्मांत सध्यां मूर्तिपुजेचा अगदीं अतिरेक झाला असून कित्येक ठिकाणीं तर त्यास अत्यंत हिडीस स्वरूप प्राप्त झाल्याचें दिसून येतें; ही गोष्ट नाकबूल करून चालावयाचें नाहीं. म्हणून जर ती मूर्तिपूजा अजीबाद नष्टच करून टाकूं असें कोणी म्हणेल तर तो मूर्खपणाच ठरेल; कारण मूर्तिपूजा ही हिंदुधर्माचें प्राथमिक अंग आहे तें नष्ट केल्यास हिंदुधर्म लुप्त झाल्याशिवाय केव्हांही राहाणार नाहीं. शिवाय असें म्हणणें सोपें असलें, तथापि हजारों वर्षांपासून प्रचारांत आल्यामुळें जिचीं पाळेंमुळें अत्यंत खोल गेलीं आहेत; अशी दृढमूल मूर्तिपूजा समूळ नष्ट करणेंही अत्यंत दुरापास्त आहे. आणि मनुष्यस्वभाव तर असा विलक्षण आहे कीं, त्याला कोणत्याही रीतीनें मूर्ति ह्या पाहिजेतच. यास्तव 'येन केन प्रकारेण' मूर्तिपूजा करावयाचीच तर आहे त्याच पूजाप्रकारांत सुधारणा करणें हेंच शहाणपणाचें लक्षण नव्हे काय? कारण आम्ही मूर्तिपूजा अजीबात सोडितों असें म्हणून जें आमच्यांत मुळींच नाहीं, अशा अगदीं नवीनच अपरिचित प्रकारची मूर्तिपूजा प्रचारांत आणण्याचा आव आणून भलताच प्रकार लोकांच्या गळीं उतरविण्याची यातायात करण्यापेक्षां जें मूळचें आहे त्यांतच उत्तम असेल त्यांचा स्वीकार कां करूं नये? हेंच तत्त्व या धार्मिक सुधारणेंतही मान्य करणें अत्यंत श्रेयस्कर होईल.

या दृष्टीनें विचार करितां आमच्या वीरशैव पूर्वजांनीं जो सूक्ष्म विचार केला आहे व सामान्य जनांसही सुगम असा जो एकच एक मूर्ति [ शिवलिंग ] पूजनाचा, आणि तोही साध्य म्हणून नव्हे तर ऐक्यपदीं ( स्वस्वरूपीं ) लीन होईपर्यंतचें साधन म्हणून पूजण्याचा सहजसाध्य उपाय

सांगितला आहे तो अत्यंत हितावह आहे. त्याचा अवलंब केल्यानें एक प्रकारें मूर्तिपुजेचें महत्व आपोआपच कमी होईल.

## [ २ ] लिंगपूजेचें महत्व.

असंख्य प्रकारच्या मूर्तिपूजनास आणि मूर्तिपुजेच्या हिडीस स्वरूपास आळा बसण्याचा अत्यंत सुलभ उपाय म्हणजे प्रथम कोणती तरी एकच मूर्ति पूजण्याचा प्रघात सुरू करणें होय. अनेक मुर्तिपूजनावरून—एकमूर्तिपूजन व तीवरून निराकारपूजन या पायऱ्या मान्य केल्यावांचून अन्य मार्ग नाहीं. आतां अनंत प्रकारच्या मूर्तिपुजेपासून लोकांनीं परावृत्त होऊन त्या सर्वांची एकच एक मुर्तिपुजेपर्यंत प्रगति होण्यास्तव सर्वांना पटेल व पूर्वपरंपरेस धरून असेल अशीच एक मूर्ति लोकांपुढें ठेवण्याचा सर्व विद्वानांनीं प्रयत्न करणें जरूर आहे. सर्व हिंदुस्थानभर ज्या हजारों मूर्ति पुजिल्या जातात त्यांच्या मुळाशीं कांहीं तत्व आहे कीं, नुसता पाहिलेला पाषाण पुजण्याचा प्रघात आहे हें प्रथम पाहिले पाहिजे. यद्यपि हिंदुस्थानांत निरनिराळ्या प्रकारच्या असंख्य मूर्ति दिसत असल्या तरी, त्या मूळ मुख्य जें देवतात्रय ( ब्रह्मा, विष्णु, महेश ) त्याचाच विस्तार आहे असें म्हणतां येईल. त्या त्रयीमध्येंसुद्धां मुख्य देव जो महेश [ महादेव, शिव किंवा शंकर ] आणि त्याची पत्नी महासती, जगन्माता पार्वतीदेवी ह्यांचाच विस्तार अतोनात आहे. कसें तें पहा:— सर्व हिंदूनीं परमपवित्र मानलेलीं महाक्षेत्रें श्रीवाराणशी [ काशी ] व श्रीरामेश्वर येथील मुख्य दैवतें श्रीविश्वनाथ व श्रीरामेश्वर म्हणजे श्रीशिवच होय. याचप्रमाणें हिंदुस्थानच्या चारी दिशांस असलेलीं चार प्रख्यात धामें म्हणजे १ पूर्वेस जगन्नाथपुरी, २ पश्चिमेस द्वारका, ३ उत्तरेस केदारनाथ, व ४ दक्षिणेस रामनाथ अगर रामेश्वर यांमधील पहिलीं दोन सोडून बाकीच्या धामांतील मुख्य देव आणि हिंदुस्थानांतील मध्यप्रदेशांत सर्वत्र स्थापिलीं गेलेलीं प्रसिद्ध बारा ज्योतिर्लिंगें

---

१ बारा ज्योतिर्लिंगें:- १ सौराष्ट्रांत ( काठेवाडांत ) सोमनाथ. २ श्रीशैल्य पर्वतावर (मद्रास —कर्नूल जिल्हा ) मल्लिकार्जुन. ३ उज्जनींत ( सं. इंदूर ) महा-

हीं सर्व शिवालिंगेंच होत. यावरून भरतखंडाचा सर्व भाग शिवलिंगांनींच व्यापिला आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ह्मणून बहुतेक हिंदु श्रीशिव-पूजा करणारे शैवच आहेत. आतां कित्येक प्रांतीं अन्य देवतांपूजन करणारे हजारों हिंदुभक्तजनही आढळतात हें आह्मी जाणून आहों; त्यांतील कित्येक देवतांचा उल्लेख करणें जरूर आहे. उदाहरणार्थ— पंढरपूर येथील श्रीविठ्ठल, मद्रास इलाख्यांतील शेषाद्रीपर्वतावरील श्रीव्यंकटेश, बंगालप्रांतीं श्रीकालीमाता, संयुक्त प्रांतांत श्रीद्वारकाधीश आणि अयोध्या नाथ, [ श्रीरामचंद्र ] निजामस्टेटमध्यें तुळजापुरची भवानी, कोल्हापूरची महालक्ष्मी, इत्यादि अनेक पूज्य दैवतेंही मुळचीं श्रीशिवस्वरूपी अगर शिवभक्तच आहेत असें प्राचीन शास्त्राधारें व हल्लीं दिसणाऱ्या तेथील व्यवस्थेवरूनसुद्धां दिसून येईल. जसें पंढरपूर येथील श्रीविठ्ठल, अगर व्यंकटागिरिवरील श्रीव्यंकटरमण आणि द्वारकाधीश [ श्रीकृष्ण ] म्हणजे श्रीविष्णु होय. आणि हा श्रीविष्णु तर श्रीशिवाचा निस्सीम भक्त होय. याच्या उत्कट भक्तीस वश होऊन श्रीशंकरांनीं त्यास 'सुदर्शन' चक्र व वैकुंठ लोक दिला; असे अनेक पुराणांतून स्पष्ट उल्लेख आहेत. यास्तव हीं दैवतें पूर्ण शिवभक्त आहेत. आणि हें दर्शविण्याकरितांच आमच्या पूर्व-जांनीं या प्रत्येकाजवळ श्रीशिवालिंग स्थापिलें आहे. श्रीविठ्ठलाच्या मस्तका-वरच शिवलिंग आहे! द्वारकाधीश श्रीकृष्ण व अयोध्यापति श्रीरामचंद्र हे क्षत्रिय राजे तर पूर्ण शिवभक्तच आहेत. सुप्रसिद्ध शिवगीता तर श्री-शिवानें दाशरथि रामास केलेला उत्तम उपदेशच होय. आतां श्रीकाली-माता, श्रीभवानी ह्या तर प्रत्यक्ष शिवपत्नी आदिमाता श्रीपार्वती देवी हिचींच निराळीं नांवें होत; अर्थात् त्या शिवस्वरूप आहेत यांत मुळींच

---

कालेश्वर. ४ नर्मदातीरा—ओंकारेश्वर. ५ डाकिनी वनक्षेत्रांत ( पुणेजिल्ह्यांत ) भीमाशंकर. ६ परळी येथें ( निजामस्टेट ) वैजनाथ. ७ दारुकावनांतील (निजाम-स्टेट) नागेश्वर [ औंढ्या नागनाथ. ] ८ सेतुबंधाजवळ—रामेश्वर. ९ वाराणशी ( काशी ) येथील विश्वेश्वर. १० गौतमीतट ( गोदावरी नदीतीरीं, नाशिकजिल्हा ) त्र्यंबकेश्वर. ११ हिमालय पर्वतांत-केदारनाथ. १२ वेरूळास ( निजामस्टेट ) घृष्णेश्वर.

शंका नाहीं. म्हणूनच श्रीभवानीच्या वक्षस्थळावर शिवलिंग आहे. आणि कोल्हापूरच्या श्रीमहालक्ष्मीच्या मस्तकावरच शिवलिंग विराजत आहे! यावरून लिंगरूपानें पुजिलीं न जाणारीं सर्वच प्रख्यात पूज्य दैवतेंसुद्धां एकप्रकारें शिवलिंगासच महत्व देतात असें दिसून येईल. किंबहुना श्रीशिवलिंगावांचून आपल्यास अस्तित्व नाहीं असेंच जाणवीत आहेत. आतां यांहून भिन्न अशीं जीं श्रीदत्तात्रय, श्रीखंडोबा, श्रीमारुती, श्रीयल्लम्मा (श्रीरेणुकादेवी) श्रीमाया इत्यादि अनेक पूज्य दैवतें आहेत; तींही श्रीशिव अगर पार्वतीशीं एक ना दुसऱ्याप्रकारें संबंधींच आहेत. असें त्या त्या देवतांच्या पुराणांवरून स्पष्ट दिसून येईल. श्रीवीरभद्र श्रीरावेश्वर, श्रीगणपती, श्रीषडानन श्रीनंदिकेश्वर व श्रीभैरव यांच्या संबंधीं जास्त सांगणें नकोच. हे सर्व शिवावतारी, शिवापत्य अगर शिवसेवक आहेत. यास्तव या सर्व विवेचनावरून आम्हांस इतकेंच दाखवावयाचें आहे कीं, सर्व हिंदुस्थानांत जरी हजारों भिन्न प्रकारच्या मूर्ति पूजिल्या जात आहेत तरी त्या सर्व अनेकविध मूर्तींमधूनसुद्धां एका शिवलिंगासच प्राधान्य देऊन अनेकांमधील एकत्व ( अभिन्नता ) सिद्ध करण्याची एकवाक्यता दाखविण्यांत आमच्या पूर्वजांनीं अत्यंत चातुर्य दर्शविलें आहे! हें कोणी विसरतां कामा नये. अर्थात् सध्यां अनेकविध मूर्तिपूजा चालू असली तरी, त्या सर्वांत मुख्य दैवत कोणतें? असा प्रश्न उत्पन्न झाल्यास प्रत्यक्ष त्या त्या मूर्तिच स्वच्छ जबाब देतात कीं, 'श्रीशिवलिंगच' मुख्य व श्रेष्ठ देव होय. यास्तव अनेकविध मूर्तिपूजनास आळा बसून एक मूर्तिपूजन सुरू करण्याची आवश्यकता ज्या ऐक्येच्छु सज्जनांस पटली असेल त्यांनीं पूर्वपरंपरा, शास्त्राधार व रूढि या तीन्ही कसोटींस पूर्ण उतरणारी असूनही अति सुलभ असणारी 'श्रीशिवलिंगपूजा' तत्काळ सुरू करावी व इतरांस प्रोत्साहन द्यावें. या लिंगपूजेवरून आत्मज्ञान होऊन निराकाराच्या पूजनाचा मार्ग कळतो, आणि निराकार व सर्वव्यापी ईश्वराचें ध्यान करण्याची व त्याच्या स्वरूपाचें आकलन करण्याची खरी पात्रता अंगीं येतांच परमेश्वरप्राप्ति होण्यास अवधि लागत नाहीं. शिवयोग संपन्न अनेक प्राचीन ऋषिवर्य व अर्वाचीन अनेक पुण्यपुरुष

याच मार्गानें परमात्म्याशीं तादात्म्य पावले असून हल्लीं हिंदुस्थानांतील अनेक महात्मे याच मार्गानें परमात्मसाधन करीत आहेत.

येथें प्रथमपासूनच लिंगपूजा व इतर अन्यदेवतापूजन हीं दोन्ही करीत असणाऱ्या अगर लिंगपूजा करण्याचा जाति निर्बंध असतांही तो न मानितां कांहींच न करणाऱ्या अथवा लिंगपूजा बाजूस ठेवून अन्य देवताराधन, अन्य धर्मीय देवांची भक्ति करणाऱ्या सर्व हिंदु भाविकांना आम्हांस इतकेंच सुचवावयाचें आहे कीं, आपण जर हिंदुधर्मशास्त्राचें अध्ययन केलें असेल आणि जर खरें हिंदु असाल तर त्यांत एकाच व्यक्तीनें अनेक देवतापूजन करावें असें कोठें सांगितलें आहे काय? तें पहावें. शिवाय ज्या एका सर्वमान्य व सर्वश्रेष्ठ शिवलिंगाचें पूजन करण्याविषयीं तुम्हांस तुमच्या जातीनें आज्ञा केली आहे त्या समर्थ देवाकडून तुमच्या इच्छा पूर्ण होणार नाहींत काय? त्या एका शिवाच्या ठायींच अनन्य भक्ति ठेवून वागल्यास तो सर्व जगाच्याच इच्छा पूर्ण करण्यास समर्थ असलेला महादेव तुमची इच्छातृप्ति खास करील. करितां अन्य देवतापूजन सोडून अव्यभिचारिणी भक्तीनें फक्त एका शिवलिंगाचेंच पूजन करावें. त्यापासून इहपरसौख्यसाधन घडेल. आतां अशाप्रकारें सर्व हिंदुलोक म्हणजे पृथ्वीवरील सुमारें ½ जनता ज्या श्रीशिवलिंगाची पूजा करिते, त्या लिंगाचें स्वरूप कसें आहे व हें रूप कां उत्पन्न झालें तें पाहूं या. जगन्नियंता परमेश्वर निर्गुण व निराकारी आहे हें तत्व हिंदु धर्मानेंच प्रथम जगापुढें मांडिले आहे. हा निराकारीपणा म्हणजे शून्याकार [ अव्यक्त ] होय आणि या निर्गुण शून्याकारापासून ( अव्यक्तापासून ) सगुण व साकार ( व्यक्त ) जग उत्पन्न होतें. व शेवटीं त्या शून्याकारांतच [अव्यक्तांत] त्याचा लय व्हावयाचा हें तत्व आतां सर्वमान्य झालें आहे. अशाप्रकारचें जें जगदुत्पत्तिस्थितिलयकारक सर्वव्यापि महाशून्यस्वरूप [ अव्यक्तस्वरूप ] त्यासच ‘ परमात्मा ’ हें नांव आहे. या परमात्म्याचें पूर्ण निदर्शक असें हें लिंगस्वरूप होय. जगाचीं उत्पत्ति-स्थिति-लय हीं जशीं क्रमानें चक्राकार परिभ्रमणांत परिवर्तित होत असतात त्याप्रमाणें त्याच अवस्थात्रयांनीं प्रत्यक्ष प्रतीत होणाऱ्या निराकारी

परमात्म्याचेंही तेंच गोलाकार स्वरूप मानिलें गेलें असल्यास नवल नाहीं. अर्थात् लिंगस्वरूप म्हणजे निराकारी निर्गुण परमात्म्याचें सगुण व साकार दृश्य होय. म्हणून अद्वैतवादी अनेक साधु प्राचीनकालापासून परमेश्वरचें हेंच स्वरूप मान्य करून त्याचें ध्यान करीत असतात. व या लिंगपुजेवरूनच पुढें विशाल अशा परमात्मरूपांत विलीन होऊन जातात. हल्लींसुद्धां अनेक पाश्चिमात्य योगसाधकांनीं योगसाधनसमर्थी ध्यान करण्यास लिंगस्वरूपच [ Crystal Gazing ] पूर्ण मान्य करून त्यावरूनच दृष्टीची एकतानता साधीत असतात. यावरून निराकारी परमात्म्याचें आकलन करण्यास लिंगस्वरूपावांचून जगांत अन्य साधन नाहीं, म्हणून प्रत्येक हिंदूनें आपलें पारमार्थिक उच्च ध्येय साधण्याकरितां शिवलिंगपूजाच करणें कसें जरूर आहे हें समजून येईल.

येथें आमच्या वाचकांना हें सुचवावेसें वाटतें कीं, मूर्तिपूजा मान्य नसलेले कित्येक हिंदु व अन्यधर्मीय कित्येक अहंमन्य पंडित लिंगस्वरूपासंबंधानें भलभलती निंदाव्यंजक माहिती अनेकवेळां बुध्या प्रसिद्ध करीत असतात; त्यामुळें सामान्य जनांच्या मनावर भलताच परिणाम कधीं कधीं होत असतो, परंतु अशा सर्व अहंमन्यांनीं ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, निंदा अगर कुचेष्टा करावयाचीच तर खुद्द आपल्या जन्मदात्या आईबापांची अथवा प्रत्यक्ष परमेश्वराचीसुद्धां हवी तशी करतां येईल. जगांत सर्वांगपरिपूर्ण व निर्दोष अशी परमेश्वराशिवाय एकही वस्तु नाहीं. म्हणून अशा या अहंमन्यांनीं पूज्य मानिलेल्या त्यांच्या देवांचीही कुचेष्टा इतरांना करतां येणार नाहीं काय ? पण अशाप्रकारें अनेक भाविक जनांच्या मनोवृत्ति दुखविणारी कुचेष्टा करून प्रतिष्ठा मिळवूं पाहणें म्हणजे आपला क्षुद्रपणा व्यक्त करणेंच होय. अशा पाजीपणा करणाऱ्या निंदकांकडे सुज्ञ जनता कोणत्या दृष्टीनें पाहते हें उघड करून सांगणें नकोच. वास्तव ज्यांचीं त्यांचीं आराध्य दैवतें त्या त्या व्यक्तिसमूहाला पूज्य असतातच. हें लक्षांत ठेवून कोणी कोणाच्या मनोवृत्ति दुखविण्याचा प्रयत्न करूं नये यांतच सर्वांचें कल्याण आहे. असो.

वरील विवेचनावरून सर्व मानवी प्राण्यांना आपल्या देहाची सार्थकता करण्यास सुलभ साधन म्हणून निराकारी परमात्म्याचें व्यक्तस्वरूपी लिंग मान्य होतांच त्याची पूजा करण्याचा प्रघात प्राचीन काळीं सर्वत्र सुरू होऊन सर्व हिंदुस्थान लिंगमय बनून गेलें, व अनेक ठिकाणीं बारा प्रख्यात ज्योतिर्लिंगें व इतर पुष्कळ प्रसिद्ध लिंगें पूर्वकाळापासूनच स्थापन करण्यांत आलीं. अशा पुरातन प्राचीन लिंगांपैकींच श्रीक्षेत्र यड्डूर येथील प्रख्यात श्रीवीरभद्रलिंग होय. या प्राचीन स्वयंभू लिंगाची वरील कारणानेंच भक्तिपूर्वक पूजा करणें अत्यंत जरूर आहे. अशा प्रकारें सूक्ष्म दृष्टीनें विचार करूनच आमच्या वीरशैव पूर्वजांनीं सामान्य शैवजनांकरितां स्थावरलिंग, व त्याहून ज्ञानी अशा लोकांना इष्टलिंगपूजानिरत होण्याचा योग्य उपदेश केला असून तो कोणत्याही काळीं योग्य असाच आहे. आणि वरील एकंदर विवेचनावरून सर्वच हिंदूंनीं मग ते कोणत्याही पंथांचे असोत त्यांना जर एकमुर्तिपूजन करण्याची आवश्यकता वाटत असेल तर 'लिंगपूजा' करणें हेंच इष्ट व श्रेष्ठ आहे कारण कांहीं ठिकाणचे अपवाद वर्ज्य केले तर हल्लीं बहुतेक सर्व हिंदु शिवलिंगपूजक शैवच आहेत. शिवाय प्राचीन व अर्वाचीन सर्व हिंदूना लिंगपूजाच मान्य आहे. करितां या दृष्टीनेंच सर्व विचारी पुढाऱ्यांनीं प्रयत्न करून अनेक मूर्तिजनास आळा घालावा व एकमूर्ति ( शिवलिंग ) पूजेस उत्तेजन द्यावें म्हणजे धार्मिक ऐक्यास अत्यंत साह्य होऊन त्या अनेक मूर्ति ही आपोआप कमी होऊन जातील.

## [३] श्रीवीरभद्रदेवाचा महिमा (प्रत्यक्षानुभव).

मागील प्रकरणांतील विवेचनावरून सांप्रतकाळीं सर्व हिंदूजनतेनें शिवलिंगपूजाच करणें कां अवश्य आहे तें कळलें असेलच. त्यावरून श्रीक्षेत्र यड्डूर येथील श्रीवीभद्रलिंगाची म्हणजे श्रीवीरभद्रदेवरूपी शिवलिंगाची पूजा कां करावी याचा उलगडा झालाच आहे.

आतां सांप्रत निष्कामबुद्धीनें (देवार्पणबुद्धीनें) आपलीं सर्व कामें करणारा साधुपुरुष आम्हा संसारी जनांमध्यें अत्यंत विरळा असून, बहुतेक सर्व भक्त

सकामबुद्धीनें ( फलेच्छेनें ) देवताभजनपूजन करीत असतात. अशा फलापेक्षेनें ज्या सद्भक्तांनीं श्रीवीरभद्रदेवाची भक्ति केली त्यांना काय फायदा झाला आहे व सध्यां होत असतो हें सर्वांस माहीत आहेच.

थोडक्यांत सांगावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, संतति, संपत्ति, विद्या इत्यादिकांची प्राप्ति व रोगनिवृत्ति, शत्रुनाशन वगैरे होण्यास्तव आणि अशाच प्रकारच्या अनेक शुभेच्छांनीं प्रेरित झालेले असंख्य भक्त, श्रीवीरभद्रदेवास जे जे नवस करितात, त्यांच्या त्यांच्या या अल्पफलेच्छा लवकरच फलद्रूप होतात. याप्रमाणें ऐहिक शुभ भावनांची तृप्ति येथें तत्काल होत असल्यानेंच हजारों सद्भक्तांनीं हें क्षेत्र सर्वदां गजबजलेलें असतें. यामुळें वर दिलेल्या अनेक बावींत इच्छित फलें त्वरित देणाऱ्या श्रीवीरभद्र देवासंबंधाच्या हजारों विश्वासनीय गोष्टी येथें चिकित्सक भक्तांच्या कानीं पडतील. शिवाय याहून निराळ्या प्रकारच्या गोष्टी म्हणजे रात्रीं वाट चुकून भलतीकडे जात असलेल्या यात्रेकरूंना अकस्मात् जंगम रूपानें येऊन वाट दाखविणें, एकट्या दुकट्या भक्तांस मार्गांत अवेळ झाल्यास त्यांना मनुष्यरूपानें प्रत्यक्ष येऊन जरूर तेंयपर्यंत सोबत देऊन त्यांची भीति दूर करणें; अशा तऱ्हेच्या शेंकडो गोष्टी येथें नित्य ऐकण्यांत येतात. सात आठ वर्षांच्या स्वतःच्या प्रत्यक्षानुभवावरून तर असें आह्मांस खात्रीपूर्वक म्हणतां येतें कीं, श्रीवीरभद्रदेवाची मासिक वारी करणाऱ्या दृढनिश्चयी भक्तास त्या त्या वेळीं कोणत्याही अडचणी असल्या तरी त्या तत्काळ दूर होऊन जाऊन अमावास्येच्या दर मासिक नियमित दर्शनास सवड मिळतेच. पण येथें वारी करणाऱ्या भक्ताच्या निश्चयी मनोभावनेचा प्रश्न मुख्य आहे हें केव्हांही विसरतां कामा नये. असो.

आतां, ज्याप्रमाणें श्रीवीरभद्रदेव आपल्या सर्व भक्तांच्या सद्वासना पूर्ण करण्यास सर्वदा सिद्ध आहे, त्याप्रमाणेंच दुर्जनांच्या दुष्ट वासनांना अगर नीतिबाह्य वर्तनाला शासन करण्याविषयींही तो नित्य जागृत आहे, ही गोष्ट विसरून चालावयाचें नाहीं. या कारणानेंच श्रीक्षेत्र यड्डूरामध्यें देवाच्या सद्भक्तांना जाचक होणारा, श्रीमंतांचा द्रव्यमद, सत्ताधाऱ्यांचा

आधिकारमद, व तारुण्यमद इत्यादि कोणत्याही प्रकारचा मद टिकाव धरीत नाहीं. म्हणजे कोणत्याही कारणांनीं मस्तवाल बनलेलीं दुष्ट माणसें, या क्षेत्रांत तग धरूं शकत नाहींत. ज्याप्रमाणें मस्तवाल माणसें येथें टिकत नाहींत, त्याचप्रमाणें लोकांना त्रासदायक अगर किळसवाणे धंदे करणारे सोनार, खाटीक, ढोर इ. धंदेवाईक लोकसुद्धां येथें पुष्कळ वेळां येऊन त्यांनीं आपला धंदा सुरू करून पाहिला; पण लवकरच त्यांचें समूळ उच्चाटन झालें अशीं उदाहरणें आढळतात. शिवाय लबाडीनें लवकर श्रीमंत होऊं पाहाणाऱ्या वाणी, उदमी, सणगर, कासार फार तर काय पाणी मिसळलेलें दूध विक्री करणाऱ्या निव्वळ शेतकऱ्यांची देखील येथें फार वेळ डाळ शिजत नाहीं. लवकरच कांहीं तरी ठोकर बसून त्यांचा तो लबाडीचा सर्व पैसा भस्मसात् झाल्याशिवाय मुळींच राहात नाहीं. ढोंगी, व्यभिचारी, धर्मलंड व शिव अगर शिवभक्त निंदक इत्यादि दुराचारी लोकांचाही येथें फार वेळ टिकाव लागत नाहीं. इतकेंच नव्हे तर या क्षेत्रांत शिव किंवा शिवगण अथवा श्रीशिवासंबंधीं कोणताही देव अगर साधु यांच्या उत्सवाखेरीज दुसऱ्या कोणत्याही अन्य देवतांचें टोलेजंग उत्सव अगर त्यांचें भजन—पूजनही येथें सरळपणें पार पडत नाहीं. असा प्रत्यक्ष अनुभव आहे. अशा प्रकारचें हें अत्यंत जागृतस्थान असल्यामुळें येथें दुर्गुणी, लबाड, धर्मभ्रष्ट वगैरे लोकांची वस्ति फारच कमी आहे.

यापूर्वीं श्रीवीरभद्रदेव आपल्या सद्भक्तांच्या इच्छा परिपूर्ण करून सुष्ट-परिपालन कसें करितो तें सांगितलें. आतां तो दुष्टांचें निर्दालन कसें करीत असतो, याविषयीं एकदोन ठळक उदाहरणें देऊन हें प्रकरण आटोपतें घेऊं.

(१) आठ नऊ वर्षांपूर्वींचि गोष्ट श्रीवीरभद्रदेवालयाच्या महाद्वाराच्या बांधणीकरितां या भागांतील एका प्रख्यात श्रीमंत रावसाहेबांनीं एक उत्तम मेस्त्री येथें पाठविला होता. तो कामावर देखरेख करीत देवालयांतील महाद्वाराजवळच्याच एका ओंवरींत रहात असे. तो अन्यधर्मी व मांसाहारी असल्यामुळें केव्हां केव्हां तेथेंच प्राणीहिंसा करून मांसान्न तयार करून खाऊं लागला. तेव्हां येथील सेवकांना ती घाण सहन न होऊन, त्यांनीं त्यास येथें मांसान्न

शिजवूं नकोस व जीवहत्या करूं नकोस असे अनेक वेळां सांगितलें. तथापि त्यानें तें मुळींच जुमानिलें नाहीं, कारण तो जरा उर्मट व एककल्ली होता. शेवटीं त्याचें तें घाण कृत्य सेवकांस असह्य होऊन सर्वांनीं श्रीस्वामीमहाराजांकडे त्याबद्दल तक्रार केली. तेव्हां श्रीस्वामींनीं त्यास मठांत बोलावून सांगितलें कीं, 'श्रीवीरभद्रदेवालयांत तुला रहावयाचें असल्यास मांसान्न वर्ज्य केलें पाहिजे. नसल्यास तुला दुसरीकडे एक घर देतों तेथें जाऊन राहा व हवें तें कर.' परंतु श्रीमंतांच्या उदार आश्रयावर पुष्ट झालेला तो उर्मट मनुष्य श्रीस्वामींचें म्हणणेंही मान्य न करितां, हट्टानें येथेंच राहिला; इतकेंच नव्हे. तर तेव्हांपासून तो जास्त हिंसा करून जास्त घाण करूं लागल्याकारणानें त्यायोगें एक दोन दिवस सेवकांना व पुजाऱ्यांना अत्यंत त्रास झाला. म्हणून त्यांनीं श्रीस्वामींना न कळूं देतां, त्यास देवालयाबाहेर हांकलून काढण्याचें ठरविलें; परंतु आश्चर्य हें कीं, ज्या दिवशीं त्याला हांकून देण्याचा सेवकांनीं विचार केला. त्या दिवशीं रात्रभर त्या मेस्त्र्यास जुलाब व उलट्या होऊन त्याचें पैलवानाप्रमाणें कसलेलें पीळदार शरीर अत्यंत रोड होऊन गेलें व दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठ नऊ वाजण्याच्या आंत श्रीवीरभद्रदेवाच्या सेवकांनीं फक्त देवालयाबाहेर हांकून देण्याच्या पूर्वींच तो मृत्यु पावून या मृत्युलोकांतूनच कायमचा हांकलला गेला! तेव्हां त्याचें जे अन्यधर्मी अनेक सांथीदार होते ते कोणास न कळवितां गुपचूप आपापल्या गांवीं पळून गेले! त्यामुळें तेथील ती घाण आपोआपच निघून गेली. आणि तेव्हांपासून दुसरा चांगला जाणता मेस्त्री न मिळाल्यानें महाद्वाराचें तें काम तसेंच अपुरें राहिलें आहे.

(२) श्रीक्षेत्र यड्डूरांत त्यांतही प्रत्यक्ष श्रीवीरभद्र देवालयात श्रीशिव किंवा शिवावतारी अगर शिवसंबंधीं कोणतेही देव अगर शिवावतारी अथवा शिवशरण सत्पुरुष यांशिवाय अन्यदेवताभजनपूजन वगैरे मुळींच करितां उपयोगी नाहीं ही गोष्ट सर्वांस नव्यानें पटवून देणारी एक अत्यंत अद्भुत गोष्ट येथें अगदीं अलीकडे म्हणजे ३--४ वर्षांत घडून आली ती अशी—

दरसाल नवरात्रांत श्रीवीरभद्र देवालयांत शिवभजनसप्ताह करून जागराचे ( आश्विन शु॥ ८ ) दिवशीं समाप्ति करण्याचा प्रघात आज अनेक वर्षे चालू असून त्याप्रमाणें सन १९२३ इ. सालींही येथील पेठेंतील व गांवांतील सर्व जातींच्या अनेक सद्‌गृस्थांनीं मिळून तो सप्ताह पार पाडिला. या वेळीं लिंगायत व ब्राह्मणांतील पुजेसंबंधाचा खटला हायकोर्टांत अपील होऊन जाऊन मोठ्या अहमहमिकेनें चालला होता. वरील सप्ताह समारंभांत इतर कोणी खर्च घालून पुढें येण्यास तयार होत नाहींत म्हणून लिंगायत लोकच मुख्यतः भाग घेत असतात. हें येथील कांहीं भटांना सहन न होऊन त्यांच्यातील एक अहंमन्य तरुण भट पुढें झाला व त्यानें हे लिंगायत लोक श्रीशिवभजन सप्ताह करितात तर आम्ही ( ब्राह्मणांनीं ) याच ठिकाणीं श्रीविष्णुभजनसप्ताह समारंभ कां करूं नये ? असा द्वैत भाव मनांत धरून चार टारगट उनाड पोरें मदतीस घेऊन सर्व गांवातर्फेचा हा श्रीशिवभजनसप्ताह समाप्त होतांच, देवालयांतच मोठ्या सभामंडपापुढें पुनः एक जंगी सुशोभित लतामंडप उभा करून त्यांत आपल्या घरांतील एक श्रीविष्णुमूर्ति आणून ती उच्चासनावर स्थापिली. आणि जवळपासच्या बऱ्याच गांवांतून हरिभजनाचे अनेक मेळे बोलावून नुकत्याच संपून गेलेल्या सप्ताह समारंभावर ताण करण्याच्या ईर्षेनें मोठ्या कडाक्यानें हरिभजन सुरू केलें. यावेळीं कित्येक समंजस वृद्ध ब्राह्मणांनींही त्या तरुण भटास बोलावून ' असें करणें योग्य नव्हे; तुला हरिभजन करावयाचेंच आहे तर दुसऱ्या स्थानीं कर, तेथें श्रीवीरभद्र देवालयांत नको.' असें परोपरीनें सांगितलें. तरी अंगीं दक्षप्रजापतीचाच जणू संचार झालेल्य त्या हेकेखोर भटानें त्या सर्व समजुतदार वृद्धांचें म्हणणें धाब्यावर बसवून आपलाच हेका पुढें चालविला. उलट त्या सप्ताहास येथील शिवभजननिपुण अशा अनेक लोकांना तो आग्रह करकरून बोलावून घेऊन जाऊं लागला इतकेंच नव्हे तर त्यांना तेथें हरिभजनपर अभंग म्हणा असा आग्रह करूं लागला ! अशा प्रकारें चुरशीनें ( भक्तीनें नव्हेच ) चालविलेला हा सप्ताह पाहण्यास जवळपासच्या खेड्यांतील शेंकडों लोक नित्य

येत जात होते. समाप्तीच्या व त्याच्या अगोदरच्या दिवशीं तर श्रीवीरभद्र देवालयांत दोन तीन हजार लोक जमले! त्यावेळीं सभामंडपापुढें भजनानिमित्त झालेल्या त्यांच्या दाटीनें सकाळच्या श्रीवीरभद्र देवाच्या नित्याच्या पालखी–प्रदक्षिणेसही वाट मिळेना. तेव्हां सेवेकऱ्यांनीं त्या म्होरक्या भटास बोलावून सांगितलें कीं, 'श्रीउत्सवमूर्तींच्या पालखीप्रदक्षिणेस अडथळा होतो, तरी कांहीं वेळ थोडी वाट करून द्या.' त्यावर त्यानें मोठ्या तोऱ्यानें उत्तर दिलें कीं, 'आमच्या सप्ताहसमारंभांत गडबड होते सबब तुमची पालखीसेवा दोन दिवस बंद ठेवा.' पहा कीं, हें देवालय श्रीवीरभद्रदेवाचें व त्यांत नित्यनियमाप्रमाणें त्रिकाळ पालखी प्रदक्षिणोत्सव होणार, तोही श्रीवीरभद्र देवाचा, पण त्यायोगें या देवालयांत आगंतुकपणा करून घुसलेल्या या उपटसुंभांस (श्रीविष्णुदेवास नव्हे) त्रास होऊं लागला! आहे कीं नाहीं भटी न्याय? हें ऐकून त्या सेवेकऱ्यांस अत्यंत चीड आली; पण ते पडले थोडे व या उपटसुंभाचा जमाव पडाला मोठा; यामुळें व शिवाय श्रीस्वामीमहाराजाकडूनही यावेळीं कोणत्याही प्रकारें भांडण तंटा करूं नका, अशी सक्त वर्दी आल्यामुळें, स्वतःचा उत्सव अबाधित चालवून घेण्यास श्रीवीरभद्र देव पूर्ण समर्थ आहे, अशी नाइलाजास्तव मनाची समजूत करून घेऊन, ते सर्व सेवक मूग गिळून स्वस्थ बसले. व एक दोन दिवस पालखी बाहेर न काढितां श्रीउत्सवमूर्तींच्या देवळापुढेंच राहून त्रिकाळ सेवा आटपली.

समाप्तीच्या दिवशीं रात्रीं तर सर्व देवालय व क्षेत्र यड्डर श्रीविष्णुनामानें दुमदुमून गेलें. बिचारा श्रीवीरभद्रदेव या दैत्यांच्या कारवाईनें त्यावेळीं लोपला कीं काय असें वाटूं लागलें; पण पूर्व युगामध्यें याच प्रमाणें अहंकारानें ताठलेल्या मुर्दाड म्होरक्या दक्षानें त्रिभुवनांतील कोट्यनुकोटि बाजारबुणगे गोळा करून याच ठिकाणीं केलेला महायज्ञ, वीरांचा वीर अशा ज्या श्रीवीरभद्रदेवानें क्षणार्धांत विध्वंसून त्या म्होराक्यास धूळ चारिली, त्या सर्वसमर्थ भगवान् श्रीवीरभद्र देवाला हीं चार टारगट मुर्कुंडें हुसकून लावणें विशेष कठीण असेल काय? मुळींच नाहीं. भग-

वार् श्रीवीरभद्रदेवास असा किंचित् त्रास पोहोंचतांच त्यानें त्याच दिवशीं रात्रीं या सर्व कारवाईस कारण असलेल्या त्या अहंमान्य भटास अलगत उचलून नेण्याची यमराजास आज्ञा केली असावी. कारण दुसऱ्याच दिवशीं रात्रीं कांहीं विशेष रोगराई नसतांना दोन तीन जुलाब होऊन सूर्योदयाच्या आंतच तो भट मृत्यु पावला ! तेव्हां त्याचे ते सर्व उपटसुंभ साथीदार कोणांस न सांगतां गुपचूप आपापल्या ठिकाणीं पळून गेले श्रीवीरभद्रदेवालयांतील ती विष्णुमूर्ति काढून तो मंडप उतरण्यासही कोणी धनी राहिला नाहीं. त्या भटास सामील असलेला कोणीही फुकटखाऊ त्या मंडपास हात लावण्यासच नव्हे, तर कित्येक दिवस श्रीवीरभद्रदेवालयासमोर येण्यासही धजेना, इतका दरारा बसून गेला होता. त्यामुळें तो मंडप दोन अडीच महिने या आधुनिक दक्षकृतीचा विचित्र आदर्श होऊन उभा होता. शेवटीं श्रीवीरभद्रदेवाच्या सेवकांनींच पालखी प्रदक्षिणेस अडथळा होतो असें पाहून तो काढून ती जागा स्वच्छ केली. यावरून दुष्टबुद्धि लोकांस येथील क्षेत्रदेव कशी तत्काळ शिक्षा करितो हें समजून येईल, तरी येथें कोणींही देवाच्या इच्छेविरुद्ध असणाऱ्या गोष्टी करूं नयेत, हेंच श्रेयस्कर होय.

## [४] आख्यायिका.

मागील प्रकरणांत श्रीवीरभद्रदेवाच्या माहात्म्याविषयीं ज्या गोष्टी दिल्या आहेत त्या सर्व अगदीं अलीकडच्या असून लेखकानें प्रत्यक्ष पाहिलेल्या अशाच आहेत. नुकत्याच होऊन गेलेल्या प्रख्यात खटल्यांतही श्रीवीरभद्रदेवानें ज्या ज्या वेळीं आपला प्रभाव दाखविला आहे, त्याचा त्या त्या ठिकाणीं आदरपूर्वक उल्लेख केला आहे. आतां अलीकडच्या काळांत घडलेल्या अशा प्रकारच्या अनंत अद्भुत चमत्काराच्या गोष्टी सर्व वीरभद्रभक्तांना माहीत असतीलच, परंतु त्या सर्व येथें देणें शक्य नाहीं, व जरूरीही नाहीं. मात्र पूर्वकाळीं ज्या अत्यंत महत्वाच्या अनेक गोष्टी घडल्या आहेत, त्यांपैकीं आश्चर्यकारक अशा एक दोन सर्वश्रुत ऐकीव गोष्टी येथें देण्याचा मानस आहे.

यापूर्वीच प्रस्तुत पुस्तकांत अशा चमत्कृतिजन्य दैवी शक्तीच्या बऱ्याच गोष्टी मागें दिल्या आहेत. पृष्ठ २९ वरील श्रीउत्सवमूर्तीची व पुढील पृष्ठ ३४० वरील श्रीवीरभद्रलिंगाच्या पुनरुद्धाराची गोष्ट ह्या दोन्ही अशाच प्रकारच्या आहेत. याहून विशेष प्रकारच्या प्रत्यक्ष श्रीवीरभद्रलिंगाच्या जागृतपणाच्या ज्या कांहीं गोष्टी पूर्वकाळीं म्हणजे ४०--५० वर्षांपूर्वीं घडल्या असून त्या प्रत्यक्ष पाहिलेले कित्येक वृद्ध लोक येथें सध्यां हयात आहेत; अशा खऱ्या गोष्टी त्या वृद्धवचनांवर विश्वास ठेवूनच खालीं दिल्या आहेत. असो.

## दैवी चमत्कार.

दरसाल श्रावणमासीं श्रीवीरभद्रलिंगाची प्रातःकालपूजा पहाटे ६ वाजतां संपते हें पूर्वार्धांत पहिल्या भागांत सांगितलेंच आहे. सन १८६७ सालीं एके श्रावण सोमवारीं पहाटे ४ वाजतां श्रीवीरभद्रदेवाचा पुजारी नदीस्नान करून शुचिर्भूत होऊन आला; आणि यथासांग पूजा करून नंतर नैवेद्य आणण्याकरितां गर्भदेवळाबाहेर गेला. मात्र अद्याप कोणी भक्त देवदर्शनार्थ आले नसल्यानें व येण्याची ती वेळही नसल्यानें गर्भदेवालयाचें द्वार सहज पुढें ओढून घेऊन गेला होता. नैवेद्य घेऊन परत आल्यानंतर आंत जाण्याकरितां तें द्वार उघडणार तोंच दोन्ही दारांच्या मधल्या फटींतून आणि त्या दोन्ही दारांना असलेल्या कमलाकार विवरांतून सर्व गर्भदेवालय आंतल्या भागीं दिव्य तेजानें प्रकाशित झाल्याचें त्यानें पाहिलें ! तेव्हां भयचकित होऊन हा भयंकर चमत्कार कशाचा आहे तें पाहण्यास्तव त्यानें मोठ्या धैर्यानें गर्भदेवालयाचें द्वार आंत लोटिलें तों श्रीवीरभद्रदेवाच्या पिंडीवर

## दोन तेजोमय नेत्र.

दिसून आले ! तेव्हां अत्यंत भयभीत होऊन त्यानें किंकाळीच फोडिली, व त्यास नैवेद्य दाखविण्याचें भान न राहिल्यानें आंत न जातां तो यज्ञकुंडांतून नैवेद्यासह तडक वर आला. ही किंकाळी ऐकून वरच्या देवळांतील म्हणजे श्रीउत्सवमूर्तीचा पुजारी देखील दचकला व काय झालें तें पाहण्यासाठीं धांवतच आला आणि पाहतो तों पूर्वीपेक्षांही ते नेत्र जास्त

प्रज्वलित झाले असून हजारों चंद्रांचा प्रकाश एकवटल्यास जसा प्रकाश दिसावा तशा चंद्रज्योतिमय देदीप्यमान प्रभेनें सर्व गर्भदेवालय व समोरील सभामंडपसुद्धां प्रकाशमय होऊन गेला होता ! हा विलक्षण देखावा पाहतांच तोही मनांत चरकला. त्यामुळें त्यास खालीं यज्ञकुंडांत उतरून गर्भदेवालयासमोर जाण्याची छाती झाली नाहीं. इतक्यांत भयानें थरथर कांपत असणारा तो श्रीवीरभद्रदेवाचा पुजारी त्याच्या समोर आला. त्यास पाहतांच त्याची अशी स्थिति कां झाली असावी हें चटकन ओळखून श्रीउत्सवमूर्तींच्या पुजाऱ्यानें म्हटलें 'घाबरूं नकोस मी येथें आहें, तो नैवेद्य मजकडे आण; आणि मठांत जाऊन श्रीस्वामींना हा प्रकार सांग.' असें म्हणून त्याच्या हातांतील नैवेद्य घेवून त्यास बाहेर लावून दिलें. तोंच दोघे चौघे सेवक हातांत कंदील घेऊन सेवेकरितां आले. त्यांना पाहातांच यास बराच धीर आला व दूरून नैवेद्य दाखवून तो वर आला. ही दिव्य प्रभा पाहातांच ते सर्व सेवेकरी आश्चर्यचकित झाले. इकडे मठांत या महिन्यांतील नित्यनेमाप्रमाणें इतक्यांत स्नान आटपून घेऊन श्रीस्वामी शिवपुजेस बसणार होते तोंच ही विचित्र बातमी कांनीं पडतांच तो अलौकिक प्रकार पाहाण्यास्तव तत्काळ ते श्रीवीरभद्र देवालयांत आले. त्याच्या आंतच वाड्यांत ही बातमी कळतांच तेथील श्री. भवानराव प्रभृति सर्व मंडळी व पेठेंतील लोकही येऊन देवालयांत गर्दी झाली होती. श्रीस्वामीमहाराज येऊन पाहतात तों तेथें गर्भदेवालयांत पिंडावरील अपूर्व कांतिमान् अशा त्या दोन देदीप्यमान् झगझगीत नेत्रांशिवाय दुसरें कांहींच दिसत नव्हतें. त्या नेत्रांच्या प्रकाशावर दृष्टि ठरत नसे. त्या तेजोमय दीप्तीनें सर्व मध्यभाग व सभामंडप भरून गेला होता. अद्याप त्या नेत्रांचें तेज सारखें वाढतच होतें तें पाहून, अनंत ब्रह्मांडनायक श्रीशंकराचा, मदनाला दग्ध करणारा, महाप्रयलकारी, कोटिसूर्यप्रभा–सदृश आणि ज्यांतील स्फुलिंगामधूनच वीरांचा वीर अशा या तेजोराशी श्रीवीरभद्र देवाचा जन्म झाला; त्या तृतीय अग्निनेत्राची प्रखरता कशी असावी याची अंधुक कल्पना या नेत्रांच्या दर्शनानें होत होती. त्यावेळीं श्रीस्वामींसह

सर्व लोकांना असें वाटूं लागलें कीं, कांहीं तरी भावी अनर्थसूचक हें चिन्ह आहे; म्हणून श्रीवीरभद्रदेव असे कोपाविष्ट झाले आहेत. त्यांचा कोप शांत करण्यास्तव अनेक प्रकारें शांति करणें जरूर आहे. असें म्हणून त्यावेळीं सर्वांनीं बाहेरूनच स्तवन चालविलें. इतक्या अवधींत पहाट होऊन सूर्योदयाचा समय प्राप्त झाला तथापि त्या नेत्राचें तेज कमी झालें नव्हतें. लोकांची दाटी तर सारखी वाढतच चालली होती. पुढें सूर्य उगवून तो आकाशांत जसजसा वर येऊं लागला तसतशी त्या नेत्रांची चकाकी कमी होत जाऊन नंतर आठ साडे आठ वाजण्याच्या सुमारास ते नेत्र लुप्त झाले.

त्यावेळीं देवालयांत हजारों लोक दर्शनार्थ आले होते. त्यांनीं महारुद्राभिषेक, बुत्तिपूजा वगैरे अनेक प्रकारें श्रीवीरभद्रदेवास शांत करण्याचा आपापल्यापरी प्रयत्न चालविला. त्या दिवशीं संध्याकाळपर्यंत जवळपासच्या सर्व खेड्यांतील लोकांची श्रीवीरभद्रदेवाच्या दर्शनार्थ सारखी रीघ लागली होती. त्यामुळें तेव्हां एक लहानशी जत्राच भरली असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यानंतर ८–१० महिने गेले नाहींत, तोंच सन १८६८–७० सालच्या पूजा व उत्पन्नासंबंधाच्या प्रसिद्ध खटल्याची धुमश्चक्री सुरु होऊन यड्डूर गांवांत भांडणांचा भयंकर वणवा पेटला, त्यामुळें सदरी चमत्काराची सर्वांस प्रचीति आली.

## देव भावाचा भुकेला.

सन १८८५ सालच्या यात्रेंतील गोष्ट. बिजरगी [जि. विजापूर] कडील एक अत्यंत गरीब भाविक म्हातारी व तिची नात अशा दोघीजणी मिळून कोणा पायीं चालणाऱ्या भक्तांबरोबर श्रीवीरभद्रदेवाच्या यात्रेस आल्या होत्या. घरची अत्यंत गरिबी असल्यानें त्यांच्याबरोबर विशेष सामान नव्हतें. मात्र त्या म्हातारीनें श्रीवीरभद्रदेवाच्या नैवेद्याकरितां मोठ्या भक्तीनें शाळु जोंधळ्याच्या कण्या भरडून आणल्या होत्या. त्यावेळीं फार मोठी यात्रा भरत असल्यानें त्या म्हातारीला श्रीवीरभद्रदेवालयांत अगर जवळपास नुसतें बस-

ण्याससुद्धां जागा मिळणें दुरापास्त झालें. त्यामुळें देवाची धूळभेट होतांच ती बनाच्या एका बाजूस ( हल्लींच्या बावाच्या मळीजवळील एका चिंचेच्या झाडाखालीं ) जाऊन तेथें आपल्या नातीसह उतरली. नंतर लवकरच नदीस्नान करून येऊन बरोबर भरून आणिलेल्या लहानशा तपेलींत त्या जवळच्या कण्या शिजत ठेविल्या; आणि नैवेद्याकरितां एक पैशाचें दूध विकत घेऊन तेंही तापत ठेविलें. थोड्या वेळानें कण्या शिजून तयार होतांच एका लहानशा वाडग्यांत भरपूर वाढून वर दूध ओतिलें, तेव्हां नैवेद्य तयार झाला तो घेऊन त्या दोघीजणी देवास दाखविण्याकरितां देवालयाकडे निघाल्या; परंतु यात्रेच्या समाप्तीचा तो दिवस असल्यानें वाटेंत अत्यंत गर्दी झाली होती. हजारों भक्त वाजत गाजत मोठ्या समारंभानें आपापले षड्रस पक्वान्नांचे नैवेद्य नेत होते तर दुसरे असंख्य भक्त दर्शनार्थ जात होते. त्यामुळें या भक्तजनांच्या दाटीनें रस्त्यांत रीघ मिळेना! अशा धांदलींत या बिचाऱ्या म्हातारीच्या नैवेद्यास कोण विचारतो ! अशा गर्दींतून जाऊन श्रीवीरभद्रदेवास आपला नैवेद्य पोहोंचविणें त्या म्हातारीस शक्य न वाटल्यानें तास दोन तास वाट पाहून ही दाटी जरा कमी होतांच मग नैवेद्य नेऊं, असा विचार करून त्या दोघीजणी आपल्या उतरल्याठिकाणीं परत आल्या. नंतर तो नैवेद्य व बाकीच्या कण्या दोन्ही नीट झांकून ठेवून विश्रांतीस्तव त्या दोघी जरा लवंडल्या. आज पहाटेपासून दोन तीन कोस चालून आल्यानें त्या बऱ्याच श्रमल्या होत्या आणि आतांही तास दीड तास उन्हांत राहून त्या कंटाळून आल्या होत्या; म्हणून त्या झाडाच्या गार सावलींत जमिनीस अंग टेंकतांच त्यांना तत्काळ गाढ झोंप लागली, व सूर्यास्त होऊन २।३ तास रात्र झाली तरी त्या जाग्या झाल्या नाहींत.

इकडे श्रीवीरभद्रदेवालयांतील त्या दिवशींची धांदल काय विचारावी पंचपक्वानांचे हजारों नैवेद्य हरघडीं वाजत गाजत मोठ्या समारंभानें येत होते. कोणी भक्त श्रीवीरभद्रालिंगास रुद्राभिषेक करीत होते तर कोणी महिम्नाभिकानें तोषवीत होते. कोणी नुसतें गंध, पुष्प, अक्षता, त्रिदळ इ. वाहात होते, तर कोणी श्रीआद्यकाडदेवरुस्वामींचीं वचनें म्हणत होते. कोणी संस्कृत

श्लोक मोठ्यानें म्हणत, तर कोणी प्राकृतांत शिवभजनपर अभंग म्हणत होते. कोणी सनईच्या सुरावर करडी - ढोल - करताल वाजवीत होते तर कोणी समेळ वाजवीत होते. इतक्यांत संध्याकाळ होऊन तृतीय पूजा संपतांच मंगल मंत्रपुष्प चाललें. नंतर रात्रीचा तृतीय पालखी - महोत्सव सुरू झाला. पालखीपुढें कोणी अनुभविक वचनें म्हणत तर कित्येक भक्त मोठ्या वीरावेशानें स्तुतिपाठ म्हणत होते. पुजाऱ्यांची तर या दिवशीं एकच घांदल उडून गेली होती. नारळ वाढवून देतां देतां हात सुजले तर दक्षिणेच्या पैशाच्या ओझ्यानें त्यांचें खिसे फुगले! एकीकडे नैवेद्यांच्या अनेकविध अन्नांचे पर्वतप्राय ढीग सांचले, तर एकीकडे नारळ, खारका, केळीं, साखर, पानसुपारी, लिंबू इत्यादिकांच्या राशी जमल्या! अशाप्रकारें खातां संपूं नये व देतां सरूं नये इतकी समृद्धि देवालयांत झाली होती. श्रीवीरभद्र देवाचा सेवकवर्ग व यात्रेंतील सर्व जंगम आकंठ पक्कानें झोडून पूर्ण तृप्त झाला होता. अशाप्रकारें एकसारखी चाललेली गर्दी रात्रीं बारा वाजल्यानंतर पालखी सेवा संपतांच जरा कमी झाली. श्रीवीरभद्र देवाचा पुजारी देवाचें अंग रगडून पिंडीवर रात्रींचा पोषाख चढवून गर्भदेवळाच्यां उंबऱ्या बाहेर पडला तोंच भयंकर ध्वनि काढून ओरडूं लागला कीं, ' अरे, मी भुकेलों आहेरे ! माझी भूक गेली नाहीं रे ! ' असें ओरडून गर्भदेवालयासमोर थैमान करूं लागला. त्याचें तें भयंकर ओरडणें व तांडवनृत्य पाहून नुकतेच पालखी सेवा संपवून खालीं बसलेले सर्व सेवेकरी व हजारों भक्त लोक त्याच्यापुढें धूप कापूर जाळून बरेच नारळ फोडूं लागले तेव्हा त्याची घांदल जरा कमी झाली. मग त्यास खालीं बसवून ' तुम्हास काय पाहिजे ' असें विचारितांच ' ब्रिज्जरगीच्या म्हातारीचा नैवेद्य आणून द्या. ' असें तो म्हणाला व नंतर ती व तिची नात अशा दोघी अमुक दिशेस अमक्या ठिकाणीं आहेत असें सांगितलें. तेव्हां तेथें जमलेल्या सर्व लोकांस अत्यंताश्चर्य वाटलें. पंचपक्वान्नांच्या इतक्या पर्वतप्राय अन्नाचा आस्वाद घेऊन देखील श्रीवीरभद्र देवाचें पोट भरलें नाहीं! म्हणून वरती त्या कोणा म्हातारीचा नैवेद्य हे मागतात, तर त्या म्हातारीनें

अशा कोणत्या अमूल्य अन्नाचा नैवेद्य आणिला असावा? असें सर्व लोक म्हणूं लागले, इतक्यांत कांहीं सेवक १०-१२ कंदील घेऊन पुजाऱ्यानें सुचविलेल्या ठिकाणाकडे शोध करण्याकरितां निघाले. देवालयांतील ही अपूर्व हकिकत लागलीच कर्णोपकर्णीं होऊन यात्रेंत सगळीकडे समजून आल्यामुळें जो तो इसम त्या म्हातारीच्या शोधास लागला.

इकडे त्या चिंचेच्या झाडाखालीं झोंपलेल्या त्या आजींना आपल्या जवळपास कोणाचा शोध करीतच पांच पन्नास लोक येत आहेत तें पाहून त्या गलबल्यानें पूर्ण जाग्या होऊन बसल्या व पाहातात तों रात्रीचे बारा वाजून गेले असल्यानें जिकडे तिकडे निजानीज होऊन गर्दी बरीच कमी झाली आहे असें दिसून आलें. तेव्हां आतां नैवेद्य शांतपणें नेण्यास ही वेळ योग्य आहे असें त्या म्हातारीस वाटून तिनें उठून मुखमार्जन केलें व नातीसही करावयास सांगून भस्मधारण केलें. नंतर त्या दोघी नैवेद्य घेऊन देवळा-कडे जाण्यास तयार झाल्या. तोंच वरील शोध करणाऱ्या मंडळीचा घोळका तेथें येऊन ठेपला. पुजाऱ्यानें सांगितलेल्या मोठ्या चिं-चेच्या झाडाखालीं या दोन बाया असून त्या आजी: नाती शोभतात तर बहुधा ह्याच त्या असाव्या असा तर्क करून ती सर्व मंडळी त्यांजकडे आली व त्यांच्या भोंवतीं उभी राहिली. त्यांना पाहातांच त्या बाया अगदीं घाबरून गेल्या व हें काय अरिष्ट आहे हें त्यांना मुळींच कळेना. इतक्यांत एका सेवेकऱ्यानें, 'तुम्ही बिजरगीच्या बाया काय? व तुम्ही देवास नैवेद्य देणार आहां काय?' असें विचारिलें. तेव्हां त्यांना इष्ट असलेल्या गोष्टींसंबंधींच हे प्रश्न असल्यामुळें ते ऐकून बराच धीर येऊन म्हातारीनें 'होय' असें उत्तर दिलें. तेव्हां त्या सेवकानें म्हटलें, 'हे भाग्यवान् माते, तुझ्या नैवेद्याकरितां श्रीवीरभद्रदेव भुकेला आहे तरी तावडतोब तो नैवेद्य घेऊन देवास दाखीव चल.' हे शब्द ऐकतांच त्या भाविक म्हातारीचें अंतःकरण कळवळलें व ती गहिंवरून म्हणाली, खराच काय हो माझा देवबाप्पा अगदीं भुकेला आहे! चला तर त्याला लवकर जेवूं घालूं.' असे म्हणून ती तो नैवेद्य घेऊन नातीसह निघाली.

तेव्हां ती सर्व मंडळीही त्या दोघींच्या पाठोपाठच देवालयाकडे परतली. देवालयांत पोहोंचतांच श्रीवीरभद्र पिंडीवरील रात्रीचा पोषाख उतरून तिचा तो भक्तिमय नैवेद्य तिला आपल्या हातानेंच देवास दाखविण्यास सांगितलें. जेव्हां तिनें आपल्या प्रेमळ अंतःकरणाचा तो नैवेद्य देवास दाखविला तेव्हां गर्भदेवालयाबाहेर भ्रमांत बसलेल्या त्या पुजाऱ्यानें मोठ्यानें ढेंकर दिली ! आणि नंतर तो लागलाच पूर्ण शुद्धीवर आला! हा चमत्कार पाहातांच तेथें जमलेल्या लोकांस अति आश्चर्य वाटलें. नैवेद्य दाखवून होतांच त्या म्हातारीनें तो एका पुजाऱ्याच्या हातीं दिला. तेव्हां ज्याकरितां श्रीवीरभद्रदेव भुकेले होते तो नैवेद्य आहे तरी कशाचा ? हें पाहाण्याचें तेथील पुजाऱ्यांसह सर्व मंडळींस कुतूहल उत्पन्न होऊन त्यांनीं त्या नैवेद्यावरील झांकलेलें वस्त्र काढून पाहिलें तों काय कण्या व दूध! तें पाहून तेथल्या हजारों भक्तांना वाटलें कीं, देव हा पक्वान्नांचा भुकेला नाहीं तर तो भक्तीचा भुकेला आहे. असें म्हणून सर्वांनीं त्या प्रेमळ म्हातारीच्या भक्तीची फारच वाहवा केली. येथें सुदाम्याचे पोहे आवडीनें खाणाऱ्या भक्तप्रियकर श्रीकृष्णपरमात्म्याची आठवण झाल्यावांचून राहात नाहीं. असो.

नैवेद्य दाखवून होतांच प्रेमळ अंतःकरणानें त्या बाईनें श्रीवीरभद्रदेवास साष्टांग नमस्कार घालून नैवेद्य आणण्यास उशीर लावून देवाला बराच वेळ उपाशी राहविल्याबद्दल त्याची क्षमा मागून करुणा भाकिली व नंतर ती नातीसह बिऱ्हाडी जाण्यास निघाली. जातांना तिनें एका जंगम सेवकास जेवण्यास पाठविण्याविषयीं पुजाऱ्यास विनंति केली. पण आकंठ पक्वान्नें झोडून तृप्त झालेले ते जंगम सेवक रात्रीं १–२ वाजतां कण्या खाण्यास जातील काय ? त्यामुळें त्यांच्यातील कोणीही सेवक जाण्यास कबूल होईना. इकडे म्हातारी तर जंगमावांचून तेथून निघेना. तेव्हां श्रीवीरभद्रदेवाचा वर सांगितलेला खास पुजारी त्या सर्व जंगम सेवकांस उद्देशून म्हणाला, ' इतकीं पर्वतप्राय पक्वान्नें झोडूनही ह्या मातेच्या कण्याकरितां भुकेलेला श्रीवीरभद्रदेव, तुम्ही जर असा तिच्या अन्नाचा तिरस्कार

दाखविला तर तुम्हांस पुढें घांसभर अन्न तरी मिळूं देईल काय? याचा विचार करा. आणि कोणी तरी लवकर तिजबरोबर चला. त्या बायांना उशीर होतो, कारण त्या कालपासून जेवल्या नाहींत.' हें भाषण ऐकून सेवकांतील एक तरुण इसम पुजाऱ्यास म्हणतो कीं, 'तुम्हाला इतकें सर्व कळतें तर दुसऱ्यास सांगण्यापेक्षां तुम्हींच स्वतः जेवणास कां जात नाहीं? आम्हां सर्वांतर्फे आपणच जा म्हणजे झालें! तेव्हां तेथें जमलेल्या सर्वांना व शेवटीं त्या म्हातारीलाही ती सूचना अत्यंत योग्य वाटली, त्यामुळें सर्वानुमतें मुख्य पुजाऱ्यानेंच जावें असें ठरलें. तेव्हां तो चटकन उठून त्या म्हातारीच्या बिऱ्हाडी जेवण्यास निघून गेला. तेथें जेवण तें कसलें? शिळ्या कण्या व थंडगार झालेलें दूध! तरी त्यानें त्या म्हातारीच्या भक्तीस मान देण्याकरितां दोन घांस गोड करून घेतलें व दक्षिणा घेऊन स्वारी देवालयाकडे आली. दुसऱ्या दिवशीं श्रीस्वामीमहाराजांनीं त्या म्हातारीस व तिच्या नातीस मठांत बोलावून घेऊन त्यांचा सन्मान करून त्यांना आशीर्वाद देऊन त्यांच्या गांवीं रवाना केलें.

यावरून देव हा भावाचा भुकेला आहे. पक्वान्नांचा अगर पैशाचा भुकेला नाहीं ही गोष्ट उघड होतें, कारण सर्व जगाचा पोषणकर्ता भगवान् श्रीवीरभद्रदेव तुमच्या पक्वान्नाकरितां हपापलेला असेल हें शक्य तरी आहे काय? हीं मिष्टान्नें फक्त पुजाऱ्यांस पुष्ट करण्यास अगर स्वतःचें जिव्हालौल्य पुरण्याकरितांच असतात. मात्र आम्ही देवाचें निमित्त पुढें करीत असतों इतकेंच. यावरून एकंदरींत तात्पर्य एवढाच कीं, मिष्टान्नांपेक्षां देवाला भक्तीच प्रिय आहे. करितां सर्वांनीं भक्तिवान् व्हावें हेंच इष्ट होय.

## (५) उपसंहार

अशा प्रकारच्या अनेक गोष्टी श्रीक्षेत्रयड्डूरांत वारंवार घडून येऊन श्रीवीरभद्रदेवाचा जागृतपणा वेळोवेळीं व्यक्त झाला आहे, हल्लीं होत असतो व पुढें होत राहील. यांत तिळमात्र संदेह नाहीं. यास्तव येथें यात्रेस येणाऱ्या कोणाही भक्तांनीं ही गोष्ट सदैव ध्यानांत ठेवावी. शिवाय वरील विवेचनावरून या पुण्यक्षेत्रांत प्रत्येकानें कसें वागावें हें समजून येईलच, तें निराळें.

सांगितलें पाहिजे असें नाहीं. तथापि येथें श्रीशिव अगर अन्य देवनिंदा, शिवभक्तांना त्रास देणें, ह्या गोष्टी आणि असत्य भाषण, असत्याचरण, दगलबाजी, चोरी, चहाडी, अहंकार आणि अधर्माचरण इत्यादि निंद्य व पापमूलक गोष्टींचा प्रतिकार तत्काळ होऊन पातक्यांस दंड होण्यास मुळींच अवधि लागत नाहीं. असा आजपर्यंतचा अनुभव आहे. ही गोष्ट पूर्णपणें लक्षांत ठेवून या क्षेत्रांत येणाऱ्या कोणत्याही व्यक्तींनें येथें देवाला प्रिय असणाऱ्या सत्य व न्याय्य गोष्टीच करण्यांत काल घालवावा, म्हणजे अशांना श्रीवीरभद्रदेव सदैव सुखी ठेवील; असें सांगून, तशाप्रकारें सद्वर्तनी होण्याची बुद्धि तोच परत्मामा सर्वांना देवो असें त्यासच अनन्यभावें विनवून आतां तूर्त आपली सर्वांची रजा घेतों.

इतीशम्।

# पुरवणी — [ अ ]

# ठरावाचा उतारा वगैरे.

चिकोडी सबजज्ज कोर्टांत—

| | | | |
|---|---|---|---|
| १ | वादी—सांभट त्रिंबकभट जोशी यड्डूर.<br>प्र.वादी—श्रीसिद्धलिंगेश्वर पट्टचरमूर्तिस्वामी. | असल नं. $\frac{१९२}{१९१८}$ | दाखल ता. २२।६।१८ |
| २ | वादी—सांभट हणमंतभट जोशी.<br>प्र.वादी—श्रीसिद्धलिंगेश्वरस्वामी. व इतर चौघे. | असल नं. $\frac{५}{१९१९}$ | दाखल ता. ४।१।१९ |

हे दोन्ही दावे ट्रान्सफर होऊन बेळगांव असि. जज्ज कोर्टास रवाना झाले. ता. ११।६।१९.

बेळगांव असि. जज्जकोर्टांत अ. नं. ४,५।१९१९ यांस दाखल होऊन लिंगायत समाजाविरुद्ध निकाल ता. ४।२।२० इ. रोजीं झाला.

नंतर बेळगांव डिस्ट्रिक्ट जज्ज कोर्टांत अपील नं. ६६, ६७।१९२० यांस दाखल होऊन ता. ११।७।२१ रोजीं श्रीचरंतीस्वामी व लिंगायत समाजातर्फे निकाल झालेल्या प्रसिद्ध ठरावाचा इंग्रजी तर्जुमा पुढें दिला आहे.

( सूचना—या ठरावाचें मराठी भाषांतरही त्यापुढें द्यावयास पाहिजे होतें; परंतु शुद्ध भाषांतराची प्रत वेळेवर हातीं न आल्यामुळें व हल्लीं इंग्रजी जाणणारा एकाद दुसरा इसम खेड्यांतूनसुद्धां आढळून येतो; म्हणून आणि या ठरावांतील महत्वाच्या भागाचेंच नऊ दहा कलमांतून मागें पृष्ठ ४९७ ते ५०७ अखेर विस्तृत विवेचन केलें असल्याने तें दिलें नाहीं. )

# APPEALS NOS. 66 & 67 / 1920.

# JUDGMENT.

1. These are two companion suits. One filed by a Brahmin *pujari* on his own behalf against the *Charanti*--Deft., who is the head of a Lingayat Math at Yedur and admittedly has the right to offerings placed before *Shri Virbhadra Dev* in its temple at Yedur – to restrain him from taking offerings presented in the *Garbhgudi* or inner shrine of that temple, from entering that shrine, from touching the *Ling* or Symbol of the God contained therein and from pouring water on it or worshipping it in any way. The other suit was filed by a *bhauband* of the first Plaintiff on behalf of the whole Brahmin community against the *Charanti* and others as representing the Lingayat community and asked for the same reliefs against Lingayats as in the former suit, with the exception that the plaintiff did not claim the offerings placed before the *Ling* in the *Garbhagudi*. The learned Assistant Judge. Mr. Norman, who tried the suit, wrote a long and careful judgment and granted the perpetual injunction asked for.

2. The following issues are raised in appeal:—

(1) Is the plaintiff the *haqdar pujari* ?

(2) Are the members of the Brahmin community entitled to exclude the Lingayats from the Garbhagudi ?

(3) Is the Brahmin *pujari* entitled to appropriate the offerings to the *Ling* placed inside the Garbhagudi ?

I decide all these points in the negative.

3. It may be stated at the outset, as mentioned above, that the defendant-Charanti's right to offerings to the *Ling* placed before and on the threshold of the *Garbhagudi* is admitted. But the plaintiff claims that not only has the *Charanti* no right to enter the *Garbhagudi* or to worship the *Ling* contained therein, but that he has no right to offerings to the *Ling* placed inside the *Garbhagudi a fortiori* no member of the Lingayat community has any right to enter the *Garbhagudi*. Diwan Bahadur G. S. Rao, who argued Plaintiff's case exhaustively, based his claim for the exclusion of the Lingayats from the *Garbhagudi* on the ground that Lingayats are Sudras by caste, citing *Somasekhara Rachappa* v *Subhadra Antaji*. ( I. L. R. 6 Bom. 524 ) and *Gopal Narhar v. Hanmant Ganesh*, and another ( I L R. 3 Bom. 273 ). It is desecration for a Sudra to touch an idol; consequently the Lingayats can never have been allowed to enter the *Garbhagudi* and touch the *Ling* Further he pointed out that certain of the ceremonies used in worshipping the *Ling*. for example the *abhishek* and *panchamrits* must be accompanied by the recital of vedic *Mantras*. No Sudra is permitted by the old law of Manu to hear, much less to recite the *mantras*, and clearly therefore no Lingayat can perfrom a ceremony, the proper carrying out of which requires the reciting of *mantras*.

4 It is admitted that no land was given in *inam* by Government for the worship of *Shri Virbhadra Dev* to the Brahmin *pujari*. But Plaintiff produced five grants ( exhs. 152, 157, 160, 161 & 162 ) varying in date from 1769 to 1839 to show that Plaintiff's family have been exercising *pujari* rights and receiving grants for the purpose of performing *Puja* and *Naivedya* and the lighting in the temple of *Shri Virbhadra Dev* From these grants it is argued that Plaintiff's ancestors were the *Pujaris* of *Shri Virbhadra Dev* and no other Brahmin family has any right to officiate in the temple, much less has Lingayat the right to officiate.

5. To show that Plaintiff is not only the *pujari*, but the *haqdar pujari* of the shrine, reliance is placed on three statements ( exhs. 53, 378 & 379 ) made in 1862 in the course of an inquiry by the Mamlatdar as to the turns of the *Bhats* or Brahmin *pujaris* to do *puja* in the temple. Exh. 53 is a Statement of the *Charanti's mukhtyar* that the *wahivat* of the *puja* is in the family of three persons. The person whose turn it was took the *naivedya*. In exh. 378 the Yedur *Patil* said that the right of worship (*pujaki bab*) of the *Ling* belongs to three *Bhats*; that the articles put before the God belong to the *Charanti* ( this is now explained to mean that the articles referred to are only those placed before or on the threshold of the shrine), while *naivedya* given by the Brahmins goes to the three *Bhats*. The *kulkarni*, exh. 379, stated that the *pujaki* belongs to three *Bhats*, who each do *puja* for one year and take the *naivedya* offered by Brahmins.

6 It is urged that these documents show that the Brahmin *pujaris* take the offerings in their right as *pujaris* The *pujaris* all belong to one family and Defendant cannot appoint any one to do *puja*. The right of *pujaki* was divided and let out for money from time to time. Consequently the right of *puja* is shown to be hereditary and capable of division and subdivision and of alienation to other members of the family. When the need arose Plaintiff's ancestors asserted their right to *pujaki* as shown by the applications exh. 52 and 165 made by two *Bhats* in suit no. 105 of 1868 asking that they might be made parties on the ground of their ownership of the *pujaki* of *Shri Virbhadra Dev*. These applications were rejected on the ground that that suit was to get the income of the *puja* and to establish the right over the *puja*. The applicants were told that the decision in that suit was not likely to affect their right and it is therefore urged that it would be unfair to Plaintiff if the judgment ( exh. 49 ) in that suit and the judgment. ( exh

50) in appeal from it were used in any way to affect Plaintiff's right.

7. Finally the oral evidence of the 59 witnesses examined for Plaintiff is relied on to prove, not that the Brahmins have ousted the Lingayats or that the Lingayats have waived their rights to enter the *Garbhagudi* two alternative cases set up by the lower court *suo motu* and without reference to the pleadings of the parties—but what the practice for the last 50 or 60 years has been. This practice, it is argued, entitles the Plaintiff to say that the Brahmins have been exercising this exclusive right to enter the *Garbhagudi* for so long a period that the exercise must be deemed to be rightful and to have had a legal origin.

8. I will deal with Plaintiff's contentions in the order given above. Though the touch of a Sudra may as a general rule mean pollution for an idol, that rule, especially in this part of India, admits of exceptions. Evidence has been given of temples where idols are touched and worshipped by Sudras but are nevertheless not regarded as polluted and are worshipped by Brahmins. I am unable to concede that the fact that Lingayats were held by the Bombay High Court in 1888 to be Sudras, renders it impossible that they could have ever been the *haqdar pujaris* of *Shri Virbhadra Dev* at Yedur. No evidence could be given as to the origin of the idol and temple of *Shri Virbhadra Dev* at Yedur, but in estimating the probabilities that the original *pujari* was a Lingayat or a Brahmin. It must be borne in mind that the Lingayat sect originated in the 12th century after Christ and speedily attained considerable dimensions in this part of the country. The founder was "one Basava; who held that caste-distinctions were unworthy of acceptance and who repudiated Brahmanical observances". *Vide Virsangappa v. Rudrappa* (I. L. R. 8 Mad. 440, at p. 450.) It is stated in *Basavva v. Sangangavds.* (I L. R. 19 Bom. 428, at p. 457). "The Lingayats are admittedly a heretical sect and are not subject to Brahmanical religious

laws and repudiate the *shastras* in the matter of the obligatory character of funeral rites and *Shradhas* on which Brahmins lay so much stress." Now the chief deity of the Lingayats is the *Ling* the symbol of the God Siva or Mahadev known in this temple as Virbhadra. The Lingayats have a *math* at Yedur and the Charanti or head of that *math* admittedly has a right to all the offerings made to the *Ling*, except those deposited inside the inner shrine. It seems to me much more likely that this temple began as a Lingayat foundation with a Lingayat *pujari* and that the Brahmin *Bhats* have worked their way in, than that the converse was the case. It may well be, that the desire of Brahmin worshippers to have Brahmin *pujaris* to perform their ceremonies for them led to the admission of this particular family of Brahmin *pujaris* who also are the hereditary *Joshis* of Yedur, to the temple. The fact that the *inamdar* or *wahivatdar* of Yedur, who pays its income for the upkeep of the *Uchavmurti*, a movable image which is also located in this temple, is a Brahmin, would account for the absence or weakness of opposition on the part of the Lingayats to such admission. Though the Lingayat *pujari* may be ignorant of Sanscrit and consequently unable to recite the *mantras*, appropriate to Brahmins ceremonies, yet as he is a member of what the Brahmins regard as heretical sect which wants neither the Brahmins nor their ceremonies, this inability is unlikely to be resented by the Lingayat worshippers of the idol. Brahmin woshippers of course are in a different position. They naturally want ceremonies carried out in the orthodox way by Brahmin *pujaris*. These *pujari* have to be maintained and the four grants of land [ exhs. 157, 160, 161, and 162 | were undoubtedly made for that purpose, while the grant [ exh. 152 ; allowed the *Bhats* to enjoy the fees for *mahapuja*, which is admittedly a special form of worship. As pointed out by the lower court " this document does not do more than recognise the right of *Bhats* to be *Ashrit pujaris*," *i.e.*, Brahmins who perform *puja* on

behelf of absent devotees It may be noted here that the Lingayats do not object to Brahmin worshipping *Shri Virbhadra Dev* or performing special ceremonies and they admit the right of the Brahmin *pujari* to take the offerings made for such ceremonies as distinct from offerings made to the *Ling*. All these five grants are in fact made for special ceremonies and this distinguishes them from the grant of the land at Kalol, evidenced by the extract (exh. 47) from the register of Lands, to the *Charanti* for the worship of the *Ling*. This extract was rejected by the lower court, because the word 'Dev' did not appear in it–but this was due to the copyist's omission–and because the land was not in Yedur but in Kalol The second reason is as bad as the first. The whole village of Yedur had been given in *inam* to the *Uchavmutri* and there was consequently nothing left in it to give to the *Ling*. Besides Kalol is only one mile from Yedur, so the distance of the land granted from the Ling is no argument that the grant was not made for the worship of the *Ling*.

9. Besides the land at Kalol, another piece of land at Saundatti in Kolhapur was granted for service of the *Ling* as shown by the tenants' receipt book (exh. 330 ) The heading on the first page of this book is ' Virupax Ling Dev at Yedur *Vahivatdar Charanti* '. There can, I think, be no question that this land was given for the service of the *Ling* It was resumed two years ago by the Kolhapur State.

10 The Charanti–Defendant relies on varius documents in addition to his possesion of land at Kalol for the worship of the Ling to show that he is the *haqdar pujari* In order of date the first document is exh. 337, which is an order from Aisaheb, the mother of the Maharaja of Kolhapur in 1757 to the *Inamdar* of Yedur to allow the *Shri Kada Deveru Gosavi* to do the *puja* of *Shri* at Yedur as he had been doing it from ancient times. Two objections are raised to this order. Aisaheb's right to issue the order is questioned and it is suggested that *Shri* may refer to some other idol

at Yedur and not to the *Ling*. There seems to be no basis for either objection. It is not shown that Aisaheb had not the right to issue the order and there is no reason to suppose that the term '*Shri*' unqualified would be used for any but the principal deity worshipped at Yedur. The same remark applies to the next group of documents ( exhs 29, 30, 32, 33 & 39 ) issued in 1827 to the local authorities and to the then *Charanti* ordering that the *Charanti* was to continue the *puja* and *urcha* of *Shri*. I agree with the lower court's reasons and conclusions that these documents can only refer to the *Shri Virabhadra Ling* and that they show that the *Charanti* was the *pujari* till 1827.

11. In 1853 there was a dispute between the *Charanti* and his deputies as to the appropriation of the offerings placed before the *Ling* and the *Uchavmurti*. This was settled by the deputies admitting the *Charanti*'s right to the offerings before the deity and to the office of *pujari* of *Virbhadra Dev*. The lower court's surmise that the reason that exh. 44 refers only to the *Uchavmurti* was probably because the *Charanti* was unable to substantiate his whole claim is negatived by the order written below exh. 41 that the *pujki* of *Virbhadra Dev* should be with the *Charanti* and the reply endorsed on exh. 40 to the same effect.

12. In the same year 1853 the *inamdars* of Yedur passed the memo (exh. 43) to the head of the Sidigiri *math* in the Kolhapur State acknowledging his right to the income before *Shri Virbhadra* in Yedur and " *to all the income* before the *Ling* ". except in *Falgun* the month in which the fair was held " *as it is yours by custom* ". This document (exh. 43 ) was held by the lower court to be a forgery. In this the lower court was wrong. The lower court confused the Muppin of the Sidigiri *math*, which in the past exercised some sort of authority over the Yedur *math* to the extent at least of approving the person nominated as head of the Yedur *math*, with a Muppin who was *Chanranti* and head

of the Yedur *math* in the early part of 19th century ( vide exh. 356 ). There was a dispute in 1853 between the disciples of the *Charanti Gurushid Kada Deveru* of the Yedur *math* and the head of the Sidigiri *math* as to the temple-income. The *inamdars* for some reason sided with the head of the Sidigiri *math*. The offerings before the *Ling* were attached and an inquiry was made. Exh. 375 is a statement made by rayats of Yedur in 1859 that the *Charanti* (Shidling) was receiving the coin etc., presented to the God by devotees and that no *Ayya* from Sidigiri *math* had ever come to the village. The Charanti's clerk, Satvirappa, in 1860 stated (exh. 376) that the *Charanti* had the right to do *puja* and exercised it and took the presents to the deity. The same year the dispute was settled by handing over the income of the land as well as that before *Shri Virbhadra* to the *Charanti* as evidenced by the receipt (exh.46)

13. I have dealt with the proceedings in connection with the heirship dispute at some length, because in the first place they show that in the middle of the 19th century the Brahmin *inamdars* did not advance any right of their own or of *pujaris* of their own caste to offerings placed before *Shri Virbhadra Dev*, but set up the claim of a rival Lingayat *Swami* to those of the *Charanti*; secondly that no claim to the attached offerings was made by any Brahmin *pujari* and all the offerings were consequently handed over to the *Charanti*.

14. It is convenient here to consider the three statements ( exhs. 53, 378 and 379 ) on which plaintiff relies to prove he is a *haqdar pujari*. As mentioned earlier in the judgment the first is made by the *Charanti's mukhtyar* the second by the Yedur *Patil*, and the third by the Yedur *kulkarni* in 1862. All three witnesses agreed that *puja* was done by three *bhats* who took the *naivedhya* offered by Brahmins. Now the right of Brahmins to do *puja* and to take the offerings made by deovtees to the Brahmins for the ceremonies performed by them as opposed to the offerings made to

the *Ling* itself is not disputed; and these statements do not help plaintiff The distinction between the two classes of offerings is brought out in the statement of the Patil Exh. 378 who says "the articles placed before God by devotees being with *Charanti* the said three *Bhujengbhat* and others receive " *naivedya* given by Brahmins." Similarly the Brahmin *kulkarni*, Vyanakaji Annaji ( exh. 379 ) said the three *Bhats* took the *naivedya* given by Brahmins. Six years later in the trial of a suit No. 105 of 1868 brought by the *Charanti* against the Yedur *inamdars* to establish his right to perform the *puja* of the *Virbhadra* and to recover the offerings wrongly taken by them, this same witness definitely stated that all that is offered to the God is received by plaintiff (the *Charanti*); further that "plaintiff has been taking the income of *Shri Virabhadra Dev* now since I attained the age of discretion ...... hence I say plaintiff is the *Pujari* : finally and this is of importance with reference to the qnestions whether Lingayats can worship or touch the deity "plaintiff s servants Sidhaya and Mahadevayya do the *Puja* of *Virbhadre Dev* every morning .... It is not easy to understand how they could do the *puja* without touching the God or entering the shrine in which he is located. the Brahmin *inamdar* Konherao ( exh. 374). who was examined on commission in 1868 said that ownership of the *pujaki* of *Shri Virbhadra Dev* was with the Lingayat *Charanti* who sits at the door and takes all the offerings relating to *pujaki* the Brahmins worship in the inner part of the temple. The lower court seemed to regard this statement as a proof that only Brahmins could enter the inner part of the temple, but in view of the later statements of this witness that " the Charanti has the right over the offerings placed before the God, *i e. daxina*, coconut etc, and he takes them that the Charanti keeps the God's ornaments, offers *Mahanaivedya* and performs *dhuparti and naivedya* to the God three times a day and that he has the right of ser-

vice," it is difficult to support the lower court's conclusion. The witness [exh. 240] may have stated that the *Charanti* offers *mahanaivedya* from outside, but the statement does appear in the type record at page 57 In the absence of more satisfactory evidence that a pujari whether Lingayat or other can perform the different ceremonies mentioned without touching the God, I am not prepared to hold that only Brahmins can enter the *Garbhagudi* or touch the Ling.

15. It is urged that it is unfair to Plaintiff if the judgment [ exh 49-50 ] are used to affect Plaitiff's rights. It is true that Plaintiff was not a party to suit 105/68 though he applied to be made one or to the appeal 38/69 from it or to suit 301/71 the jndgment in which is exh. 51, but the Court is not debarred from considering those judgments on that account. The parties were the Lingayat *Charanti* on one side and the Brahmin *inamdars* on the other and as was inevitable some of the claims set up by the present Plaintiffs as representing the Brahmin community were also advanced in the earlier suits. In those the *Charanti* was held to have established his right as *pujari* and to damages for the offerings taken by the Brahmin *inamdars* It is to be noted that when Plaintiff's ancestor made application ( Ex. 52 ) to be joined as a party to suit 105/68, he made a definite admission as to the *Charanti's* rights to " money and valuable presents placed before the deity *Virabhadra* food ( cooked), offerings of all castes except Brahmins, coconuts and fruits, leaves, betels etc., whatever things are placed before the God by devotees of any caste whatever." No distinction was made between the offerings placed inside and those placed outside the *Garbhgudi* and it is clear that this distinction is a later development of Plaintiff's case. The offerings claimed by Plaintiff's ancestors were for special caremonies and the cooked food offerings by Brahmins to neither of which does the *Charanti* lay claim and to uncooked food offerings made by castes other than Bra-

hmins to which also the *Charanti* lays no claim when they are presents to the Brahmin *pujari* and not to the God. It is clear therefore that the learned Sub-Judge in 1868 was right in refusing to make Plaintiff 's ancestors a party to suit 105/68.

16. The oral evidence remains for consideration 59 witnesses were examined for Plaintiff and 26 for Defendant. Without in any way reflecting on the character of any of them—some men of position have been examined on each side—I would only say that the evidence as given is not conclusive on the points to be decided. Plaintiff's witnesses at best only assert that for the last 50 or 60 years they have not seen Lingayats entering the *Garbhgudi* and worshipping the *Ling* and have seen Brahmin *pujaris* taking offerings placed inside the *Garbhagudi.*

17. In view of the fact that the *Charanti's* rights as *pujari* were declared and his claim to all offerings placed before *Virbhadra Dev* was decreed in 1868 and 1871, and that the plaintiff 's ancestor then only claimed offerings that the Charanti admits he is entitled to get, it is difficult for me to hold that the Brahmins have been exercising an exclusive right to enter the *Garbhagudi* for even 50 years, and this would obviously be too short a period on which to base any presumption as to the exercise being of right and having a legal origin. But the defendant's witnesses assert that Lingayats had been entering the *Garbhagudi* and worshipping the *Ling* all along and there is ceurtainly nothing in the documents on the record to indicate that they are likely to have abandoned their right since 1871. *Though slow to take action and desirous of li ing at with their neighbours they apparently are tenacious of their right, and when forced can be relied upon to assert and maintain them.* Till the present suit they have been uniformly successful in maintaining them and I see no reason to make this suit an exception to the general rule.

18. By my opinion Plaintiff has failed to establish that he is the *haqdar pujari* or is entitled to the offerings to the *Ling* placed inside the *Garbhagudi*, nor can the Brahmins exclude Lingayats from the *Garbhagudi*.

19. I therefore reverse the lower court's decree and dismiss Plaintiff's suits with all costs throughout on Plaintiff.

11th July 1921. DISTRICT JUDGE.

---

यानंतर वादी भटांनीं, सदरहू ठरावावर, मुंबई हायकोर्टांत अपील हुकूमनाम्यावरील हायकोर्टकडील अपील नं. ४५५।१९२१ ( स्पेशल अपील नं. ४६५।१९२१ सहित ) ता. २१।७।२१ अपील केलें. या दोन्ही अपीलांचा प्रतिवादी, श्रीचरंतीस्वामी व लिंगायत समाजातर्फे, ता. ११।४। १९२३ इ. रोजीं निकाल झाला.

शेवटीं ब्राह्मणांनीं आपल्यातर्फे सांभट हणमंतभट जोशी या एकट्यासच मुख्य वादी करून हायकोर्टानें दिलेल्या निकालाविरूद्ध बादशहा सरकारच्या प्रिव्ही कौन्सिलाकडे अपील करण्यास परवानगी देण्याबद्दलचा दिवाणी अर्ज नं ४८१।१९२३ इ. ( सोबत दिवाणी अर्ज नं. ४८२ सहित ) चा ता. १८।७।२३ रोजीं दाखल केला, तो अर्ज तारीख ८।२। १९२४ रोजीं नामंजूर होऊन पुढील मार्ग खुंटला आणि वीरशैव समाज पूर्णत्वानें विजयी झाला.

---

॥ श्रीवीरभद्रदेवाय नमः ॥

प्रस्तुत ‘ श्रीक्षेत्र यड्डूर ’ या पुस्तकाच्या प्रकाशनार्थ ज्या समाजाभिमानी उदारधी श्रीमंतांनीं व सहृदय बंधु-भगिनींनीं सदयांतःकरणानें, व सढळ हातानें द्रव्यसाह्य करून हें भगवान् श्रीवीरभद्रदेवाला वाहिलेलें प्रथम पुष्प प्रसिद्ध करविण्याचें अभिमानास्पद कार्य केलें, त्या माझ्या प्रेमळ आश्रयदात्या

# देणगीदार महाशयांचीं नांवें.

## १०१ रुपये देणार.

१ श्रीसिद्धालिंगेश्वर गुरु गुरुसिद्धेश्वर पट्टचरमूर्ति काडदेवरुमठ संस्थान श्रीक्षेत्र यड्डूर. — यड्डूर

२ श्रीमंत सरदार लखमगौडा बसवप्रभु सरदेसाई साहेब संस्थान वंटमुरी — वंटमुरी

३ श्रीमंत चचडीकर सरदेसाई साहेब संस्थान — चचडी
( आश्वासन मिळालें आहे. )

४ श्रीमंत रावसाहेब मलापा गंगापा शिंत्रे — कुर्ली
( आश्वासन मिळालें आहे. )

५ श्रीमंत चनबसापा मलापा कराळे — एकसंबें

६ श्रीमंत मलापा सिद्धलिंगापा हालाप्पनवर — सदलगें

## ३१ रुपये देणार.

ती. स्व. आप्पासा. ऊर्फ शिवरामापा सदाशिवापा जिरेसाळ. पांथर्डी.

## २५ रुपये देणार.

श्री. आण्णासाहेब ऊर्फ शंकरगौडा सिदगौडा पाटील संकेश्वर.

,, महालिंगापा वीरापा कोठीवाले प्रेसिडेंट म्युनिसिपालिटी निपाणी

,, सदाशिवापा बशेट्यपा कराळे अकोळ

,, अद्दशापा शिवलिंगापा बिरदे निपाणी

## २१ रुपये देणार.

,, रुद्रगौडा भिम. पाटील औरनाळ

## २० रुपये देणार.

,, रावसाहेब रुद्रापा चनवीरापा हालाप्पनवर सदलगें.

ती. स्व. महादेवराव रु. कराडकर पुणें

श्री. रेवापा नंद्यापा हत्तरकी हलकर्णी

,, मलगौडा बाबाजी पाटील बेनाडी

## १५ रुपये देणार.

,, गुरलिंगापा महारु. इंगोट्टी निपाणी

११ रुपये देणारे.
,, महादापा सि. मेंडगुदली संकेश्वर
,,शिवगौडा सि. ना. पाटील सुळकूड
,, रामगौडा चनगौंडा पाटील गळतगें

१० रुपये देणारे.
शिव.शंकरय्या मुरगय्या मनोळी संकेश्वर
श्री. आपासा.मलगौडा पाटील कडलगे
,, बाळगौडा रा. नां पाटील खडकलाट
,, बसपरापा अण्णा घटनट्टी मुंबई
,, वीरापा शिवापा घुगरे गडहिंग्लज
,,बसापा दु.पाटील ऊर्फ पणदे निपाणी
,, गंगापा बसापा देशमाने ,,
,, चुडापा शिवापा व्हनशेट्टी शिरगांव

८ रुपये देणारे.
,, शिवापा चनबसापा वाली महागांव

७ रुपये देणारे.
,,शिवपुत्रापा निजलिं. दड्डी गडहिंग्लज
,,विश्वनाथ मलकापा पट्टशेट्टी संकेश्वर
,, वीरापा निजलिंगापा ढंग ,,
,,सिद्दापा सिदगौडा पाटील हंचिनाळ
,, देवगौडा नरसगौडा पाटील कल्लोळ
,, बसापा विरपाक्षपा हिडदुग्गी नेसरी
,, आणापा महादेवापा नकाते राशिवडे

६८१२ ते ५८४ पर्यंत देणारे.
शिवमूर्ति सिद्राम अय्या मानूरकर पुणें
श्री. वीरापा शिवरुद्रापा साखरे नेसरी
,, कलापा वि मोंगले (पट्टण) कोडोली

५ रुपये देणारे.
,, गुरुलिंगापा विरु. शिंत्रे निपाणी

,, वीरापा महालिंगापा खराबे ,,
,, वीरापा सिद्दापा बोड्डु ,,
,, बसापा नीलापा बोड्डु ,,
,, सिदगौडा नाथ. पाटील, कागवाड
,, गुरुपादपा जोतिलिंगापा तेली ,,
शिव. महांतया गु. कुमारमठ, सांगली
श्री. सिद्धलिंगापा महांतपा कत्ती, ,,
,, कृष्णापा मादापा रिसवडे, ,,
,, सदाशिव रामचंद्र तेली, ,,
,, विठोबा वीरापा तांबोटे, कोले
,, सिद्धराम बसापा बड्डे, शिरोळ
,, दत्तू आपा कोरे, ,,
,, बसलिंगापा वशे. पावटे, कुरुंदवाड
,, शंकर आणापा पोतदार, ,,
,, मुरलीधर बळवंत बोरगांवकर, ,,
,, कल्लाप्पा भर० लोखंडे, बुबनाळ
,, लक्ष्मण भीमापा कारदगे, ,,
,, बाळापा सत्यापा शापुरे ,,
,, कलापा नाना शापुरे, ,,
,, बसापा गुरापा इचलकरंजी, ,,
,, तातोबा सत्यापा शापुरे, ,,
,, आणापा वीरापा सैसाळे, सिरडोण
,, भीमगौडा शिवगौडा पा, टाकवडे
,, धुळापा शस्यापा चौगुला, ,,
,, आणा खानगौडा पाटील, ,,
,, सिदगौडा लगमगौडा पा, चंदूर.
,, व्हनगौडा पीरगौडा वांगरे पाटील,
इचलकरंजी.
,, विरुपाक्ष गुरुपा. सुलतानपुरे, ,,

,, बसापा भीमापा करोसी, निडसोसी
,, भरमापा कलापा हुक्केरी, सिरगूर.
,, बसापा शिव. जवळी, करडीगुद्दी.
,, संतू बाळू जाधव, फरीदखानवाडी.
,, शिवरायापा रा. कोकटनूर, परमानं.
;; रामापा बसापा तेरदाळ, परमानंद
,, शिवलिंगापा आपा मुर्तेले, कागल.
,. ईरगौडा रामगौडा पारवते पा, सुळ.
,, नागौडा मलगौडा पारवते पा. ,,
,, कलगौडा शिव. मुद्दाणा पा. ,,
,, बाळगौडा वीर. हेरवाडे पा. ;;
,, बाबाजी बाळापा. खोत. सुळकूड
,, सिद्गौडा स. भेंगे पाटील. ,,
,, तमापा वीरापा कावरी. संकेश्वर
,, आपया मलापा उदोशी. ,,
,, राचापा शिवलिंगापा गंजी. ,,
,, रेवणसिद्दापा सि कणगल. ,,
,, शिवरुद्रपा शि.हालाप्पनवर संदलगे
,, सत्यगौडा ब. पाटील. खणदाळ
,, हांपाणा शंकरापा गड्डी. ,,
,, बाळापा भरमापा मगदूम. ,,
,, लिंगौडा भरमगौडा पाटील. ,,
शिव. श्रीशैल आपया हिरेमठ. अकोळ
श्री. दानापा घुळापा सदलगे. ,,
,, निजलिंगपा आलतगे. ,,
,, शिवलिंगपा गो. रामनकटी. ,,
,, बाबाजी सातू मलबादे. ,,
,, शिवराम नाना दिवाणजी. ,,

,, शिवलिंग हातागिणे. अकोळ.
श्री. आणा लक्ष्मण देसाई. खडकलाट.
,, आणगौडा नरस. पाटील. ,,
,, दुंडापा सभू व्हदडी. ,,
,, बाबू पीरगौडा पाटील. ,,
,, केपागौडा अद्द. पाटील. ,,
,, तिमाणा छायापा कूट. ,,
,, रामगौडा यल. पाटील. ,,
,, लक्ष्मण वरिापा संकाजे. ,,
,, बनापा सिद्दापा संकाजे. ,,
,, मुप्पिनगौडा सि. पाटील. ,,
,, बाबू सत्यापा निपाणी. ,,
,, लक्ष्मण राचापा केरगुटे. ,,
,, लक्ष्मण बाबाजी संकेश्वरे. ,,
,, आलापा भीमांपा बोरगले. ,,
,, गोविंदा भीमा देसाई. ,,
,, भीमा कल्लापा कुंभार. ,,
,, भीमा रघुनाथ कमते. ,,
,, लक्ष्मणगौडा हुव. पा चिखलवाळ.
,, सातगौडा रु. चौगुला. इंगळी.
,, बसापा मलापा सगरे. ,,
,, कलापा सत्यापा चौगुला. ,,
,, मलगौडा पर. पो पाटील. गळतगे
,, शिवरुद्र जोत्यापा लट्टे. ,,
,, सत्यगौडा भरमगौडा पाटील. ,,
,, आपया दुंडापा माने. ,,
,, सिद्गौडा घनगौडा पाटील. ,,
,, काडगौडा सिदगौडा पाटील. ,,

